मानस गूढार्थ चंद्रिका

# अयोध्याकाण्ड

## खंड २

लेखक

श्री.प.प.ब्र स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती





॥ श्री सद्गुरवे नमः॥

॥ श्री राम समर्थ ॥



# ✻ विनम्र आवाहन ✻

श्रीरामकृपेने महाराष्ट्रीय संतांच्या मंदियाळीतील आधुनिक 20व्या शतकातील संत परमपूज्य प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी यांचे स्मारकरूपाने श्रीराम - मंदिर ''श्रीराम विश्रामधाम'' या नांवाने परांडा येथे विद्यमान आहे. या मंदिरातील श्रीराम - सीता सिंहासनाधिष्ठित, चरण स्पर्शित हनुमान, व लक्ष्मण या मूर्तींची प्रतिष्ठापना राष्ट्रसंत पू. मुरारी बापूंचे शुभहस्ते 2003 मध्ये झाली आहे तर भरत, शत्रुघ्न व नंदिसह शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा पू. आचार्य किशोरजी व्यास (प. पू. गोविंद देवगिरी स्वामी) यांचे शुभ हस्ते झाली आहे. तसेच या मंदिरात गणेश, दास-मारूती, माखनचोर याही मूर्ती असून या संगमरवरी मंदिरात श्रीरामचरितमानसातील मंगलाचरणे, दोहे चौपायाही कोरलेल्या आहेत. कारण श्रीरामचरितमानसावरच प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींनी आपले समग्र जीवन समर्पित केलेले होते. हे अति सुंदर मंदिर आपण एकदा तरी आवर्जून पहावेच पहावे असे आहे कारण 'संपूर्ण राम दरबार' फारच क्वचित आढळतो तो पाहिल्याने खऱ्या अर्थी मनास ''विश्राम'' मिळतो.

ह्या मंदिरात भोजनशाळा व भक्तनिवासाचे बांधकाम लवकरच सुरू करीत आहोत. तरी यासाठी आपणासारख्या उदार दात्यांकडून सढळ हाताने आर्थिक देणग्यांची अपेक्षा आहे. देणग्यांसाठी 80G आयकर सवलत उपलब्ध आहे. तरी आपण आपले चेक, डी. डी. वा मनी ऑर्डर्स ''श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ'' या नावाने खालील पत्यांवर पाठवाव्यात ही विनंतीवजा कळकळीची प्रार्थना.

(१) **सौ. रेखा नी. पटवर्धन,**
अक्षय रेस्टॉरंट समोर, 'पटवर्धन' बंगला, मिरज. जि. सांगली - 416410.
फोन : (0233) 2221083

(२) **सौ. राजश्री भा. दिवाकर,**
'मल्हार' बंगला समर्थ नगर, मु. पो. उस्मानाबाद (धाराशिव)- 413501
फोन : (02472) 224989

## विशेष सूचना -

सदर श्रीराम मंदिर व प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींची समाधी (त्याच वास्तूत प. पू. हंसराज स्वामी व प. पू अनंतदास रामदासी यांच्या समाधी) ''हंसराज मठ'' या एकाच वास्तूत आहेत. ही दोन्ही स्थाने पंढरपूर जवळील कुर्डुवाडी पासून 20-22 कि. मी. वरील परांडा बस स्थानकापासून चालत केवळ 5 मिनीटांचे अंतरावर आहेत प. पू. तेजोमयानंद स्वामीजी प. पू. शंकराचार्य इ. संत येथे आवर्जून येतात.

आपल्या विनम्र
**डॉ. कमल वैद्य,**
**सौ. रेखा नी. पटवर्धन**

---

*येन केन विधि देतां दान करी कल्याण ॥*
*तें धन धन्य जयां प्रथम गति (दान)॥ (श्रीरामचरितमानस उत्तरकांड)*

# श्रीरामचरित मानस गूढार्थचंद्रिका

## द्वितीय सोपान अयोध्याकाण्ड

### खण्ड २ रा

'रामचरित मानस' यावरील मराठी बृहत् टीकेचा अंश

(दोहा ४६/६ ते १४७/२ पर्यंत)

लेखक : प. पू. स्वामी प्रज्ञानानन्द सरस्वती

प्रकाशक

रामचरितमानस प्रेमी मंडळ,

डोंबिवली.

# प्रस्तावना

## श्रीसद्गुरवे नमः ।

पुरवासीजन विरह विषाद प्रकरणाने या खंडाचा प्रारंभ होतो. राम-विरहाचे दुःख हे इंगळीच्या विषाप्रमाणे संपूर्ण अयोध्येभर कसे पसरले व त्या अति तीक्ष्ण विषाने सर्व अयोध्या कशी व्याकुळ झाली ते वर्णन किती यथार्थतेने स्वामींनी शब्दांकित केले आहे ते दिसते. अन् त्यायोगे करुणारसाने जणू सैन्याची जाहीरपणे अयोध्येवर केलेली चालही सविस्तर वर्णिली आहे. त्या निमित्ताने कैकेयीची प्रत्येकजण आपआपल्या परीने कशी निर्भत्सना करतो तेही टीकेतून तपशीलवार अनेक प्रकाराने रंगवून दाखवले आहे. त्यानंतर सर्व अयोध्येत कैकेयी व भरत यांचे विषयी सर्वत्र सर्व स्तरांतून लोकमत कसकसे प्रगट होत होते तेही 'पिंडे पिंडे मतिर्भिन्नाः' नुसार सविस्तर वाचावयास मिळते. शेवटी अनुभवी विदुषी ब्राह्मणस्त्रिया कैकयीस काय व कसा उपदेश करतात यावरून अयोध्येतील विद्वत्‌जनांचे मन सहजी वाचता येते. 'दिन भानुविण, प्राणविण तन, चंद्रविण जशी यामिनी' यानुसार रामाविण अयोध्या कशी असेल याचेही चित्र कैकेयीपुढे अगदी आरशाइतके स्पष्ट करून सांगून देखील कैकेयीचे मन का बदलत नाही तिला कोणता रोग जडला आहे हे स्वामी टीकेत जेव्हा स्पष्ट करून दाखवतात त्यावरून त्यांचा आयुर्वेदादींचा सखोल अभ्यास प्रकर्षाने जाणवतो.

त्यानंतर कौसल्येचा निरोप घ्यायला जेव्हा श्रीराम जातात तेव्हा त्या माता-पुत्रांचा तो संवाद अक्षरशः वाचकाचे मन पिळवटून टाकतो. कारण कौसल्येचे पराकोटीचे वात्सल्य शब्दाशब्दातून ठिबकलेले श्रीस्वामींनी टीकेतून सखोल-सुंदर-रसिकतेने खुलवले आहे. 'पिडा टळो स्नाना कर सत्वर' या प्रेमळ सूचनेमागे असलेली कौसल्येची धर्मनिष्ठा, अन् 'बघुनि राम-मन-अलि भुलला ना' हे सुस्पष्ट करताना रामांचे मर्यादा पुरुषोत्तमत्व स्वामींनी अचूकपणे कसे टिपले आहे ते सुस्पष्ट जाणवते. त्यानंतर पित्याने दिलेले 'काननराज्य' स्वीकारण्यासाठी मातेनेही आनंदाने कृपाशीर्वाद द्यावेत ही भूमिका स्पष्ट करताना कौसल्येची धर्मगती

सहजपणे स्वामी टीकेतून सविस्तर समजावून देतात. येथेच तिचे 'ईश्वरमातृत्व' सिद्ध होते. काननराजाज्ञा ऐकून राममातेची झालेली कासाविशी - घालमेल शब्दाशब्दातून प्रतीत होते अन् अशा प्रतिकूल परिस्थितीत एक क्षणही 'धर्मनिष्ठा' तिचे मन का व कसे सोडीत नाही यातच तिचे श्रेष्ठत्व कसे दिसते ते सारे स्वामी समजावून देतात. आदर्श माता व आदर्श पुत्र याची झलक या संवादातून फार सुरेखपणे रेखाटलेली दिसते. कारण प्रत्यक्ष प्रसंग सांगताना श्रीराम सचिवसुताचा आधार घेतात. ते वृत्त कळताच तिने श्रीरामांना केलेला सुंदर उपदेश व स्वतःसह अयोध्येस 'अभागिणि' म्हणवताना वाचकाचे मन दुःखाने गुदमरून जाते. अन् लगेचच 'देव पितर गण करोत रक्षण' असे स्वत्ययन कसे करते. वा.रा.शी लगेच तुलना करून, प्रसंगी अध्यात्मपर अर्थ सांगून 'रामांचे परमात्मपण' जपून जणू वाचकांना स्वामी सजग करतात.

त्यानंतर सीता व कौसल्या संवाद याद्वारे आदर्श सासू व आदर्श सून जणू या दोन आदर्शांत चढाओढच लागल्याचे दिसते. 'अति सुकुमारी' हे विशेषण सासूने स्नुषेसाठी वापरावे यातच सारा स्नेह एकवटलेला दिसतो. 'चारुचरणनखिं धरणी उकरित' यावरील व त्यापुढील टीका म्हणजे स्त्री-मन वाचावे कसे याचाच जणू स्वामींनी दिलेला आदर्श वस्तुपाठ ! 'प्राण ठेवूं जानकीवर लावुनि' यात सासू-सून दोघींचेही परस्पर प्रेम अत्युच्च पातळी गाठलेले स्पष्टपणे दिसते. 'दीपवात सार ही ना कथिते' यातूनच सासू सुनेस कशी जपते - 'स्नेहजलें' ते सुस्पष्ट केलेले चित्र सुरेख रसिकतेने बहरलेले कळते.

त्यानंतरच्या श्रीराम-सीता संवादातून उभयतांचे वडिलधाऱ्यांना मान देणे, त्यांचा संकोच लज्जा तरीही एकमेकांवर असलेले संयमी पण प्रगाढ प्रेम व विश्वास यांचे अतिशय उत्तम दर्शन आहे. अशा नाजूक प्रसंगी धर्माचे अवधान राखूनही संयमी प्रेमाचे श्रेष्ठत्व प्रकर्षाने जाणवून देणारे तुलसीदास वाल्मिकी रामायणापेक्षाही कसे सरस ठरले हेही लगेच स्वामी स्पष्ट समजावून देतात तेही अध्यात्मिक अर्थाची जोड देत देत. इथेच स्वामींचे खास वैशिष्ट्य प्रतीत होते व त्यांची मूळ आध्यात्मिक बैठक कशी भक्कम व पक्की आहे हे ठायी ठायी जाणवते.

इतिहास - तर्क - मानसिकता व लोकाचार या साऱ्या साऱ्या अंगाने श्रीराम हळूवारपणे सीतेला कसकसे समजावून सांगतात ते स्वामी टीकेत खुलवून सांगतात. अन् त्यावर सीतेने दिलेले उत्तर समर्पक-संयमी व पतिव्रता स्त्री या दृष्टिकोनातून कसे चपखल आहे तेही स्वामी अधिक सूक्ष्मपणे अभ्यासू दृष्टीने उलगडून सांगतात. अन् शेवटी ती हृदयान्तर्यामींना शेवटचे ठेवणीतले कोणते अस्त्र काढून कशी त्यांच्या सहगमनात यशस्वी होते ते सुंदरपणे रेखाटतात. त्यानंतर सीता स्वतः श्रीरामांची कशी सेवा करून त्यांना वनातही प्रसन्न राखेल हे तर टीकेतून उलगडून सांगताना पतिव्रता - धर्मपालनाचे सुंदर धडे कसे गिरवावे हे सहजतेने सांगत राहतात. शेवटी सीतेचे पारडे कसे जडावले व श्रीरामांना तिला का व कसे नेणे भाग पडले हे काव्यमयतेने वर्णिले आहे. शेवटी कौसल्याही सीतेच्या पतिव्रत्यापुढे हतबल ठरते.

रामांच्या वनवासाची वार्ता कळताच लक्ष्मण रामांकडे कसा कासावीस होऊन धावत येतो त्यातच त्याचे प्रेम-दृढ प्रेम दिसते. 'उभा देह घर काडी मोडुनि' यावरील टीकेतून लक्ष्मणाचे परम वैराग्य कसे दिसते ते पहावे. त्यानंतर रामवचन ऐकताच त्याची व्याकुळता व त्यातून त्याची 'राम-अनन्यता' व 'प्रभू-स्नेहिं शिशु मी प्रतिपालित' ही त्याची सुकोमल मनोभूमिका स्वामी टीकेतून त्याच उत्कटतेने समजावून देतात व शेवटी रामदासांचा राम-विजय वर्णिताना तदनुषंगाने 'देव जोडे तरी करावा अधर्म' तो कसा हे स्वामी टीकेतून सांगतात.

लक्ष्मण-सुमित्रा भेट प्रकरणातून सुमित्रेचे आजवरचे लपलेले रामप्रेम व जीवनाची यथार्थतेची जाणीव अतिशय रमणीयतेने स्वामी खुलवून सांगतात अन् तिचे 'मातृत्व' सार्थकी कसे लागले ते समजते अन् इथेच मातेच्या सुसंस्कारातून 'रामसेवामूर्ती लक्ष्मण' कसा बनला याचे गुपित स्पष्ट होते. सर्वात शेवटी सुमित्रेने लक्ष्मणाला जो उपदेश केला आहे त्यावर प.पू. स्वामी तर इतके भाळलेले आहेत की त्यांनी टीकेत अधोरेखितात 'श्री मानसातील सुमित्रेसारखे मातेचे चरित्र अन्य कोणत्याही ग्रंथातच नव्हे तर कोणत्याही देशांत वा भाषेत मिळणे अशक्य आहे' असे न राहवून लिहिलेच.

विपिन गमन प्रकरणात सर्व अयोध्यावासी 'कृशतनु दुःखी उदास वदने जणूं विकल माशा मध हरणें' कसे विरह व्याकुळ झाले त्याची यथार्थ कल्पना स्वामी स्पष्ट करतात. प्रत्यक्ष वनात जायला निघालेल्या श्रीराम-सीता-लक्ष्मणांना पाहून दशरथांची दशा वर्णन करताना वाचकांचे डोळे कधी पाणावतात ते समजतही नाही. राम-सीतांवरील अति आर्तभावाने परम स्नेहाने दशरथ कसे कातर-व्याकुळ-विव्हल होतात ते स्वामी आपल्या नेहमीच्या शैलीने तो प्रसंग साक्षात दृगोचर करतात. रामांना वल्कल-वसनांत पाहिल्यावर त्या वृद्ध पित्याच्या हृदयाची काय व कशी अवस्था झाली हे वर्णन वाचताना एखादा पाषण हृदयीं वाचकही द्रवीभूत होईल इतकी तुलसीवाणी सुकोमल-करुण बनली आहे. अशा नाजूक प्रसंगी देखील रामांचे धर्माचे भान (सदैव) कसे जागरूक आहे ते टीकेतून सुस्पष्ट होते. त्यानंतर श्रीरामांनी नगरजनांना केलेली विनवणी पाहून तर आजच्या पुत्रांनी 'पुत्र कसा मातृपितृभक्त असावा' हा सुंदर उपदेश अनुकरण करावा असा आहे !

शेवटी नाईलाजास्तव सुमंताकरवी दशरथांनी श्रीरामांची रथातून केलेली पाठवणी व तिघांनाही दिलेला संदेश पाहता भावनावश पुत्रप्रेमी पिता डोळ्यांसमोर उभा राहतो.

श्रीराम रथातून अयोध्येतून बाहेर गेल्यावरचे अयोध्येचे वर्णन कसे भयाण भीषण व अंगावर शहारा आणणारे आहे ते टीकेतून स्पष्ट होते म्हणूनच समर्थांनी म्हणून ठेवले आहे 'नसे राम ते धाम सोडोन द्यावे !'

किरातिनी कैकेयीने सुंदर अयोध्येस (वनास) कसा वणवा लावला इतकेच नव्हे तर दशदिशींही तो वणवा कसा असह्य होतो हे टीकेतून स्वामींनी अध्यात्मिक अर्थाने कोष्टकासह खुलवून सांगितले आहे.

शेवटी अशा भयाण अयोध्येत राहण्यापेक्षा रामानुगमन करणे केव्हाही श्रेयस्कर या विचाराने सारे अयोध्यावासी रामांमागे जातात पण प्रेमाने राम त्यांना कसे परत कर्तव्यरत करण्यासाठी अयोध्येत जाणे भाग पाडतात ते टीकेतून सविस्तर वाचनीय आहे.

परंतु अयोध्येत सारे अयोध्यावासी कसे राहतात हे गूढ सुंदरपणे स्वामींनी

टीकेतून उलगडून दाखवले आहे. किंबहुना हाच रामराज्याचा पाया आहे काय? - हेच कदाचित टीकाकारास सूचित करायचे आहे.

सुमंतांसह राम-लक्ष्मण-सीता देवसरिप्रत कसे पोचतात, तेथे त्यांना कोणते सुख प्राप्त होते, ते 'मंगलमूल' कोणते इ. भाग टीकेतून सुस्पष्ट होतो.

रामांचे 'नरचरित' असा जाणीवपूर्वक उल्लेख अधून मधून केल्याने त्यांचे 'परमात्मा' तत्त्व टीकाकारास जाणवून देणे आहे हे सूज्ञ वाचकांनी नेहमी सजगपणे सावधपणे ध्यानी घेतले पाहिजे.

निषादराज गूह किंवा गूहक रामांना कसा प्रेमादरपूर्वक भेटतो व त्यातून त्याची 'रामभक्ती' कशी प्रतीत होते त्याचे टीकेतून सुरेख दर्शन घडते. प्रत्यक्ष निषादराजास रामांची सेवा करण्याची किती संधी मिळते व त्याचा तो कसा लाभ उठवून स्वजन्म कृतार्थ करतो हे फारच मननीय व अनुकरणीय आहे. सुमंत-सीता-लक्ष्मणही कसे सेवारत होते हेही प्रसंगोपात्त स्वामींनी प्रकर्षाने जाणवून दिले आहे.

त्यानंतर लक्ष्मणापुढे निषादाने आपला विषाद कसा प्रकट केला व त्यातून त्याचे रामप्रेम कसे डोकावते हे फारच पाहण्यासारखे आहे.

त्याच्या प्रत्युत्तरादाखल लक्ष्मण-गीता हे प्रकरण तर ज्ञान-वैराग्य व भक्ती यांची अगदी लयलूट आहे. यामध्ये सुभाषिते व सिद्धांतही भरलेले असे हे प्रकरण तर फारच अप्रतिम असे आहे हे सटीक वाचल्याने 'उत्तम साधक' बनण्यास फारच पूरक व पोषक असे आहे. तेव्हा वाचकांनी हे शब्द न् शब्द सुजाण-शांतपणे वाचावे व अनुभवावे.

त्यानंतर श्रीरामांनी आपल्या वनवासी जीवनक्रमावर काय व कसे शिक्कामोर्तब केले व ते पाहताना सुमंतांची अवस्था कशी झाली, त्यानंतर प्रेमादरपूर्वक श्रीरामांनी सुमंताची पाठवणी कशी केली हा साराच भाग मोठा भावविव्हळ करणारा आहे. टीकेतून प. पू. स्वामींनी धर्म-अध्यात्मपर त्या सर्वांचे अर्थ विवेचन केलेले पाहून आपली मति गुंग होते.

त्यानंतर भक्तीची परमोच्चावस्था गाठणारे असे नाविक अनुराग म्हणजेच केवट-प्रकरण सुरू होते. केवटाची वेडीवाकडी ग्राम्य भाषा पण त्यातील भक्तीचा

ओलावा, रामांचे मर्म जाणणे, त्यासाठीची त्याची पूर्वजन्मापासूनची भूमिका इत्यादींची सांगोपांग चर्चा टीकेतून वाचताना श्रीरामांचे 'करुणासागर' रूप मनी भरते, भावते. हा सारा प्रसंग अतिशय उत्कट प्रेमभक्तीचा नमुना असा आहे.

पुढे श्रीराम-सीता-लक्ष्मण तीर्थाचा कसा सन्मान करतात, तेथे कोणकोणते यथाशास्त्राचरण करतात हे अतिशय सूक्ष्म अभ्यासलेले पाहून सामान्यजनांनी तीर्थ-पवित्र क्षेत्री कसे वागावे हे स्वामी ओघात सहजतेने सांगून सर्वांना सुंदर उपदेश देतात, प्रसंगी शिक्षकी ढंगाने कोपरखळ्याही मारतात. तीर्थराज प्रयागाचे सांगरूपक स्वामी खोलवर जाऊन स्पष्ट करतात. त्यानंतर प्रभू श्रीराम व शरभंग मुनी भेट, शरभंगांची भावावस्था, त्यांनी केलेली श्रीरामांची स्तुती व त्याची नक्षत्र नामासह सर्व वैशिष्ट्ये नेहमीच्या पद्धतीने स्वामी टीकेत सविस्तर वर्णितात.

श्रीरामांचे प्रयागातले आगमन कळताच बटु, तपस्वी, सिद्ध, उदासीन आणि ग्रामीण सर्वच थरातले आबालवृद्ध श्रीरामांचे दर्शन कसे घेतात व भरद्वाज शिष्यांसह हे त्रिदेव पुढे वनप्रदेशातून वाल्मीकींच्या आश्रमात कसे पोचतात ते सारेच वर्णन अनेक तऱ्हेच्या ज्ञानशाखांनी युक्त असल्याने वाचनीय अभ्यासनीय असे आहे.

आता प्रभु वाल्मीकी आश्रमात जाईपर्यंत अनेक ग्रामीण नर-नारी या त्रिदेवांना कोणते प्रश्न विचारतात त्याची उत्तरे हे तिघेही कसे देतात तोही भाग अतिशय काव्यमयतेने तुलसीदासांनी रंगविलेला स्वामी टीकेत अधिक सुस्पष्ट करून दर्शवितात. दरम्यान 'तापस-प्रकरण' हा अतिशय छोटेखानी पण गूढ-काव्य-ज्ञान-वैराग्य व भक्तीने संपृक्त असा असून हा तापस कोण ही उत्सुकता टीकेतून सूक्ष्मावलोकन करूनच पुरी करावी. पुन्हा लक्ष्मणांसह अनेक तऱ्हेच्या नीतींचा इत्यादी उपदेश देत अनेक गावे, वने, नद्या पार करीत वाल्मीकी आश्रम जवळ करू लागले. मार्गात चालताना श्रीराम सर्वात पुढे मध्ये सीता व सर्वात मागे लक्ष्मण असा क्रम असे. इतकेच नव्हे तर लक्ष्मणांची यातही असलेली 'लक्ष्मण चालति उजवीं घालुनि' ही सुंदर किमया व आणखी दृष्टांत स्वामी अगदी फोड करून सांगतात त्यामुळे परमतत्त्व स्पर्श वाचकांचे हृदयास सतत होत राहतो.

वाल्मीकी आश्रमातील शोभा व त्यांचे वैशिष्ट्य स्वामी जेव्हा उलगडून

दाखवितात तेव्हा त्यांचा अधिकार आपल्या सामान्यांच्या ध्यानी येतो अन् इथे नामसाधना कशी व किती अनंत दानी आहे याचे प्रत्यंतर येते. कोणा कोणा मुनीस राम कसे भेटतात याचे कोष्टकरूपाने सविस्तर वर्णन स्वामी खुलेपणाने प्रत्येकासमोर उलगडून ठेवतात. नंतर वाल्मीकींचे ब्रह्मज्ञान व इतर ऋषींचे ब्रह्मज्ञान यात असणारा सूक्ष्म भेद तुलसीदासांनी कसा गूढ रूपाने भरून ठेवला आहे हे वाचताना स्वामींचा अधिकार व सूक्ष्म अभ्यास ध्यानी येऊन त्यांचे 'सद्गुरुत्व' विशेषत्वाने खोलवर रुजते; हृदयावर कोरले जाते.

त्यानंतर वाल्मीकी प्रदीर्घपणे श्रीरामांचे मर्म त्यांची स्तुती भरभरून करीत जातात व त्याद्वारे स्वामी गृहस्थाश्रमींनी त्या चौदा भुवनांचा स्वतःच्या अध्यात्मिक प्रगतीसाठी कसा सुंदर सदुपयोग करून घ्यावा हे सद्गुरुच्या करुणामयतेने समजावून देतात तेव्हा त्या संतत्वापुढे आपण खरोखरच सहजी विनम्र होतो. रामांचे जगदीशत्व मायापतित्व व सीतेचे जगजननीत्व ध्यानी आल्यावर तरी साधकाने आपले छोटेपण त्याला समर्पित करावे ही अत्युच्च भूमिका या टीकेतून प्रकर्षाने जाणवते. रामांचे स्वरूप, त्यांची नरलीला, त्यांची कृपा 'तो जाणे ज्यां जाणूं देता । तुम्हीच होइ तो तुम्हा जाणता । या सारख्या सिद्धांताने भरलेल्या चौपाया व प्रेमरसार्द्र भक्तीने द्रवित असलेली ही स्तुती जणू रामप्रेमाचा वर्षाव करीत रहाते. रामांचे 'भक्त-उर-चंदनत्व' वाचकाला त्या भावपूर्ण भक्तीने शीतल-सौम्य-आल्हादक प्रसन्न करीत राहते.

नवविधाभक्तीची मर्यादा ओलांडून चौदा भुवनांपर्यंतचा हा भक्तीरसाचा प्रवाह खऱ्या रामभक्ताला भक्तीची ही चौदा दालने दाखवून त्यामध्ये निदान एकेका दालनात कायम वस्ती करायला खुणावतो.

श्रवण कसे करावे, प्रभुदर्शनासाठी नेत्र कसे आतुरलेले व आसुसलेले हवेत, जिव्हेने रामगुण कसे टिपावेत, प्रभू-पूजा कोणती व कशी करावी, राम-तीर्थासाठी कसे जावे, दैनंदिन जीवनात भक्ती कशी ठायी ठायी भरलेली असावी, मंत्र-जपाचे महत्त्व जाणून जप कसा करावा आणि शास्त्रानुसार सदाचाराने राहण्यातच रामभक्ती कशी भरलेली आहे हे सारे वाचताना आपल्याला आत्मपरीक्षण करून स्व-प्रगती कशी करून घ्यावी याचे सुंदर दिग्दर्शन येथे आपोआप घडते. आणि

स्व समर्पण करून श्रीरामांचे ठायी सर्व नाती समजून, सारे दोष व षड्विकार रहित होऊन प्रभू सेवा सर्वगुणसंपन्न होऊन कशी करावी असे अनेक (चौदा) प्रकारचे वस्तुपाठ जणूं साधकांसाठी येथे दाखवून दिले आहेत. शेवटी वाल्मीकींनी श्रीरामांना लौकिक दृष्टीने राहण्यासाठी कोणते स्थळ दाखविले व का हे टीकेतून समजते. येथे वाल्मीकी भेट हे प्रदीर्घ प्रकरण संपते.

वाल्मीकींच्या सूचनेनुसार लक्ष्मण त्या स्थानाचे वर्णन कसे करतात व तेथे पर्णकुटी बांधून कसे राहू लागतात त्या वेळी त्या वनश्रीसमवेत श्रीराम व सीता कसे शोभून दिसतात याचे वर्णन अत्यंत रमणीय असे केलेले आहे.

तेथे रामांना भेटायला कोण कोण, कोणत्या हेतूस्तव भेटून गेले ह्या वर्णनावरून परमेश्वराला किती वैविध्याने भेटायला जाणारे आहेत ते समजते.

'प्रेमचि केवल रामा प्यारे, जाणणार घ्या जाणुनि सारे ।' हे सुंदर प्रेम-तत्त्व रामांचे बाबतीत सर्वतोपरी कसे लागू पडते ते सर्वांच्या भेटी-दर्शन-संवादातून सुंदर तऱ्हेने सिद्ध करून दाखवले आहे.

ज्या प्रदेशात 'रघुनायक' वस्ती करतात तो प्रदेश कसा 'मंगलमय' बनतो याचे वर्णन वाचताना ते सुखद दृश्य डोळ्यांसमोर तरळते. जिथे जिथे रघुनाथांचा पदरव असतो वा चरणरज पडते तो सारा प्रदेश कसा 'धन्य' होतो हे वाचताना खरोखरी मन तृप्त होऊन जाते अन् वाचक जणू रामपदरज आपल्या मस्तकी लागावी म्हणून मनाने का होईना पण आपली ही काया रघुवरासाठी सर्वत्र पायघड्यांसारखी पसरीत जातो अन् स्वतःलाच धन्य करण्याचा प्रयत्न करतो.

लक्ष्मण-सीता व राम यांची वनातील राहणी सविस्तर सुरेख वर्णिलेली वाचून आपणही त्यांचे समवेत तेथेच त्या सुंदर सुखद प्रदेशात जणू वस्ती करून राहतो.

त्यानंतर हळूवारपणे रंगमंचावरील दृश्य बदलते अन् रामांना वनात सोडून सचिव-सुमंत अयोध्येत कसे परत येतात हे वर्णन चालू होते. सम्राटाचा सुजाण सचिव रामविरहाने कसा विव्हळ होतो व स्वतःला किती हीन-दीन समजू लागतो हे वाचून मनाची अनंत शकले होतात.

अयोध्येत जाऊन राम-मातांना, विशेषतः शोकाकुल राजांना व साऱ्या रामप्रेमी अयोध्याजनांना कसे तोंड दाखवायचे या चिंतेने ग्रासून काळवंडून गेलेले सचिव

अयोध्येच्या सीमेपर्यंत कसे पोचले ते त्यांचे त्यांनाच माहिती !

नाईलाजस्तव नगरात प्रवेश करणे तर भागच आहे. तेव्हा ते नगरीत कसे प्रवेश करतात, सर्वांच्या प्रतिक्रिया काय होतात व कोणते महानाट्य घडते ते पुढील खंडात पाहू.

तोपर्यंत - जय सियाराम

श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ।

**प्रज्ञाशिष्या रामदासी**

## अयोध्याकांड - खंड २

# अनुक्रमणिका

# पुरवासीजन - विरह - विषाद प्रकरण

हिं. *। नगर ब्यापि गइ बातु सुतीछी । छुअत चढ़ी जनु सब तन बीछी ॥६॥*
*। सुनि भए बिकल सकल नरनारी । बेलि बिटप जिमि देखि दवारी ॥७॥*
*। जो जहँ सुनइ धुनइ सिरु सोई । बड़ बिषादु नहिं धीरजु होई ॥८॥*

म. *। वृत्त तीक्ष्ण अति नगरिं पसरलें । इंगळी विष जणुं देहीं चढलें ॥६॥*
*। परिसुनि विकल सकल नर नारी । वेलि विटप दव बघुनि किं भारी ॥७॥*
*। कळे जिथें ज्या तो शिर पिटतो । थोर विषाद धीर अति सुटतो ॥८॥*

**अर्थ :** ही अति तीक्ष्ण बातमी नगरात अशी पसरली की जणू इंगळी चावून तिचे विषच सर्व शरीरात चढले.॥६॥ ऐकून सर्व स्त्रिया व पुरुष असे व्याकुळ झाले की मोठ्या दावाग्नीला पाहून जशा वेली व वृक्ष.॥७॥ ज्याला जिथे हे कळले तो तिथेच डोके बडवून घेऊ लागला; अत्यंत विषाद वाटू लागला व धीर अगदी सुटला.॥८॥

**टीका. - चौ. ६ - (१) बीछी** - बिच्छि, बिच्छू हे हिंदीत पुल्लींगी शब्द आहेत. येथे कैकयी व 'बात' या स्त्रीलिंगी शब्दाशी साम्य दाखविणे असल्याने 'चढ़ी' हे स्त्रीलिंगी रूप वापरले आहे. मराठीत इंगळी हा स्त्रीलिंगी शब्द विंचवाच्याच एका मोठ्या काळ्या जातीला आहे. इंगळीचे विष फारच वेगाने सर्व शरीरभर पसरते. शरीर काळे पडते. वांत्याही कदाचित होतात व कदाचित माणूस मरतोही. मंत्र किंवा औषध सहसा लागू पडत नाही. (क) **कैकयी जणूं इंगळी आहे;** वर मागणे हे **नांगी मारणे-चावणे** आहे. **ही बातमी विष आहे.** इंगळीच्या विषासारखी ही अत्यंत दुःखशोकदायक बातमी सर्व **नगररूपी शरीरात** क्षण न लागता पसरली. (ख) शूद्र हे पाय, वैश्य मांड्या, क्षत्रिय बाहू, ब्राह्मण डोके व राजा मुख आहे. राजकुटुंब पोट व आतील अवयव म्हणता येईल. पोटात विष पसरण्यास थोडा जास्त वेळ लागतो इतकेच. राम व सचिव राजद्वारांतून जाताना सुमंत्रांकडून ही बातमी कळली असली पाहिजे. कारण कोपभवनात राजा व राणी आहेत. राम व सुमंत्र तेथून आले. इतर कोणी तेथे नव्हते. रघुनाथाने आपल्या मुखाने सांगितली असणे शक्य नाही व सुमंत्र जवळ

असता त्यांस कोणी विचारणार नाहीत. राजद्वाराजवळ असलेला सूतपुत्र नंतर रघुनाथाबरोबर गेला व राजद्वाराजवळील गर्दीने वेढून घेतल्यामुळे सुमंत तेथे अडकला व त्याच्याकडून लोकांनी सर्व हकीगत काढून घेतली, असे मानणेच भाग आहे. (ग) ही बातमी भयंकर विषारी आहे. इंगळीच्या विषाइतके लवकर चढणारे विष इतर कोणत्याही प्राण्याचे, सर्पाचेसुद्धा नाही; म्हणून हे **उपमान वापरल्याबद्दल कवीच्या प्रतिभेचे कौतुक करावेसे वाटते !** (घ) **उत्प्रेक्षा करण्याचे कारण** इतकेच की ही इंगळी चावली राजाला पण विष सर्व नगरांतही चढले. इंगळीला पाय नसतात पण हिला दोन पाय आहेत. इंगळी आत-बाहेर काळी, पण ती आत काळी बाहेर गोरी; इंगळी विंचवाला चावत नाही; पण हिने आपल्या पतीलाच दंश केला. इंगळी बहुधा मोकळ्या उघड्या जागेत, शेतात वगैरे असते. पण ही इंगळी अगदी अंतःपुरातच होती. अशा पुष्कळ अशक्य गोष्टींची शक्यता मानली म्हणून उत्प्रेक्षा. (मा.पी. पहा!)

**चौ. ७ - (१) विकल सकल नर नारी** - नगररूपी देहामध्ये बातमीरूपी विष अत्यंत वेगाने पसरताच दक्षिणांगरूपी पुरुष व वामांगरूपी स्त्रिया व्याकुळ झाल्या. दृष्टान्त वेली, विटपांनी दावाग्नि पाहण्याचा दिला. (क) नर नारी असा क्रम प्रथम चरणात असता वेली (नारी) व विटप (नर, वृक्ष) **असा उलटा क्रम का केला?** विटपवेलि म्हणण्याने वृत्तदोषसुद्धा उत्पन्न होत नाही. **वेली विटपांना दावाग्नि दिसतो का?** त्यांना नेत्रेंद्रिय नाही मग दिसते कसे?

I. बातमी आधी पुरुषांना मिळाली (कारण राजद्वाराजवळ पुरुषांची दाटी होती, स्त्रियांची नव्हती). व नंतर नारींपर्यंत पसरली. म्हणून नरनारी असा क्रम योग्यच आहे. व्याकुळ होण्यात वेलींप्रमाणे स्त्रिया लवकर व अधिक व्याकुळ झाल्या. वेली-लता वृक्षांपेक्षा फार कोमल असतात. तशाच स्त्रिया पुरुषांपेक्षा शरीराने व हृदयाने स्वभावतःच अधिक कोमल व भावनाप्रधान असतात. दावाग्नि दृष्टीस पडताच वेली एकदम सुकून जाऊन मलूल, निर्जीवशा होतात; पण विटपांना-वृक्षांना तितके मलूल व निर्जीवसे होण्यास वेळ लागतो. वणवा (दावाग्नि) ज्यांनी पाहिला असेल त्यांना हा अनुभव असेलच.

II. वेली विटपांना दिसते, ऐकू येते, सुख-दुःख होते; हे आधुनिक विज्ञान

शास्त्राने सप्रयोग सिद्ध केले (डॉ. बोस) आहे. महाभारतातसुद्धा 'तस्मात्पश्यन्ति पादपाः' 'तस्माच्छृण्वन्ति पादपाः' वृक्ष पाहतात, वृक्ष ऐकतात असे उल्लेख कारणे देऊन केलेले आहेत. सजीव प्राण्यांना भक्षण करणाऱ्या वनस्पती आफ्रिकेत उपलब्ध आहेत. जेथे सजीवता प्रगट आहे तेथे ज्ञानेंद्रिये, मन इत्यादी आहेतच. ही कार्ये कुठे स्थूल, सूक्ष्म किंवा अतिसूक्ष्म रीतीने होतात व मानवाच्या स्थूल ज्ञानेंद्रियांस त्यांच्या सूक्ष्मातिसूक्ष्म ज्ञानशक्तीचे ज्ञान सहज होत नाही इतकेच.

(२) **विकल झालीं** - इंगळीचे विष चढल्यावर अंगाचा जो दाह होतो तो दावाग्नीच्या तापासारखा असतो. स्त्रिया व पुरुष सुकून, कोमेजून गेले. देह निस्तेज व इंद्रिये-अवयव-शिथिल पडले. चलन-वलन करण्याची शक्ती राहिली नाही. स्त्रिया तर बातमी ऐकताच मटामट खाली बसल्या; पण पुरुषांचे तेवढे झाले नाही. हे वेली विटप व दावाग्नी या दृष्टान्ताने सुचविले. वृक्षांना गुंडाळलेल्या लता दावाग्नी दिसताच शिथिल पडून खाली खाली येतात. ज्या आधारांनी त्यांनी वृक्षांना घट्ट धरून ठेवलेले असतात ते अवयवच निर्जीव झाल्याने असे होते. वणवा लागून गेलेल्या वनात जाऊन पहावे म्हणजे असेच दिसेल. (क) या दृष्टान्ताने हे पण सुचविले की अयोध्या नगर आता वनाप्रमाणे होणार. हे पुढे स्पष्टच सांगितले असून तेथे दावाग्नी आहेच.

**चौ. ८ - (१) कळे जिथें ज्या तो शिर पिटतो** - पुरुष उभ्याने व स्त्रिया मटामट बसून डोके बडवून घेऊ लागल्या. सर्वांचा धीर साफ सुटला. सर्व शोक करू लागले. ज्यांना रस्त्यात कळले त्यांची रस्त्यांत तेथल्या तेथेच अशी दशा झाली. बसलेल्यांना उठवे ना. आडवे पडलेल्यांना बसवे ना. उभे असलेल्यांना चालता येईना. बोलता येईना. उघडे असलेले डोळे मिटत ना व मिटलेले उघडत ना, अशी दुर्दशा जिकडे तिकडे झाली. (क) **धीर अति सुटतो** - राजा व राम हे दोघेही सत्यसंध व धर्मनिष्ठ असल्यामुळे जो निर्णय घेतला गेला आहे त्यात बदल होणे शक्य नाही व त्यामुळे रामवनवास चुकविता येत नाही अशी सर्वांची खात्री झाली; म्हणून धीर साफ सुटला. उपायाची शक्यता वाटली असती तर त्या आशेने धीर धरता आला असता. (ख) राम व सीता जनकपुरीतून अयोध्येस येण्यास निघताना धीराला कुठे आश्रय मिळेना म्हणून तो विदेही जनकाच्या

आश्रयाला जातो न जातो तोच करुणा विरहांनी त्याला तेथूनसुद्धा हाकलून लावला. तेव्हा तो सीता रघुवीरांबरोबर अयोध्येत येऊन सुखाने नांदत होता; पण अयोध्याधीशालाच शोकाने कैद केल्याबरोबर तेथून तो पळाला. इंगळीचे विष नगरात चढू लागताच ते त्याला असह्य झाले व तेथून पळाला. रामसीता अयोध्येत जाणार म्हणून विदेही जनकाजवळसुद्धा त्याला थारा मिळाला नाही. मग राम वनात जाणार हे निश्चितपणे कळल्यावर त्याला कोण थारा देणार? तो आता रघुवीरांबरोबर वनवासच पत्करणार असे दिसते. सध्या तो रामाश्रयाने राहिला आहे; व अंतःपुरात आहे. पण अंतःपुरातून त्याला लवकरच पळ काढावा लागणार. शोकाची सेना अयोध्येलाच ताब्यात घेत आहे असे वाटताच शेवटी अनाथांचा नाथ रघुनाथच हे जाणून तो त्यांचा आश्रय मात्र सोडणार नाही. ही पहा करुणारसाची सेना आलीच चाल करून :

*हिं.दो. । मुख सुखाहिं लोचन स्त्रवहिं सोकु न हृदयँ समाइ ॥*
*। मनहुँ करुन रस कटकई उतरी अवध बजाइ ॥४६॥*

*म.दो. । मुख सुकतीं स्रवती नयन उर अपुरा शोकास ॥*
*॥ नगरिं करुणरस-कटक करि चाल पिटुन डंक्यांस ॥४६॥*

**अर्थ** : सर्वांची तोंडे सुकून चालली, डोळे पाझरू लागले. शोकाला हृदय अपुरे पडू लागले (हृदयात मावेना) (तेव्हा वाटले) की करुणारसाच्या सेनेने डंके पिटून अयोध्येवर स्वारी-हल्लाच केला की काय?॥४६॥

**टीका.** - (१) **करुणरस - करुणारस** - हा नवरसांपैकी एक फार महत्त्वाचा रस आहे. याचा स्थायीभाव शोक आहे. करुणारस हा जणू राजा आहे. परमानंदरूप झालेल्या दशरथ राजाला त्याने केव्हाच कैद केला. 'शोक शोक करि धरुनि हो ! तन' (२९।७) राजा आता आपल्या कैदेतून पळून जात नाही असे नक्की ठरल्यानंतर त्याने - करुणारसाने आपले सैन्य अयोध्या ताब्यात घेण्यास पाठविले व ते चारी दिशांनी अकस्मात हल्ला करू लागले. स्थायी भाव, उद्दीपन विभाव, अनुभाव व संचारी भाव हे त्याचे चतुरंग सैन्य आहे. रामवनवासाच्या बातमीने एकाएकी करुणेचे उद्दीपन केले. त्यामुळे मुख सुकणे, अश्रुपात इत्यादी शोकाची प्रगट झालेली लक्षणे अनुभाव आहेत. डोके पिटणे,

हातपाय गळणे, विलाप करणे इत्यादी संचारी भाव कुठे आहेत, कुठे नाहीत. शोक हा स्थायी भाव सर्वत्र आहे. स्थायी भाव रथ, उद्दीपन विभाव हत्ती, अनुभाव घोडे व संचारी भाव पदाति - पायदळ आहे असे म्हणता येईल. आलंबन विभाव रामचंद्र आहेत.

(२) सार हे की सर्वांची तोंडे सुकून अश्रूंचे प्रवाह चालू आहेतच; पण कोणी डोके पिटीत आहेत, कोणी विलाप करीत आहेत, कोणी प्रलाप करीत आहेत. कोणी रामगुण गात आहेत; तर कोणी कैकयीला शिव्या देत आहेत; कोणी पुढे काय होणार, कसे करावे इ. चिंता करीत आहेत. काय अपेक्षा होती व काय झाले इ. म्हणत कोणी विधीला दोष देत आहेत. हाय हाय, हुंदके, रामराम इ. उद्‌गार, डोके पिटणे, ऊर बडवणे हेच जणू डंके वाजत आहेत. या प्रमाणे सर्व नगरात अगदी अल्पावधीत शोकाचे साम्राज्य पसरले. उत्साह, आनंद, धीर, सुख, सौंदर्य इत्यादीकांनी वनवास समाचार रूपी उद्दीपनाच्या - हत्तींच्या धडके बरोबर पळ काढला व हे सर्व रघुवीराला शरण गेले; कारण ते शरणागत दीनार्त परित्राण परायण आहेत हे यांना माहीत आहे.

दोन ओव्यांत किती सजीव व भावपूर्ण चित्र उभे केले आहे ! या दोन ओळींवरून त्या प्रसंगींच्या अयोध्येचे-करुणारसात वहात चाललेल्या दशरथपुरीचे चित्र पडद्यावर सहज रंगविता येईल ! याचाच विस्तार पुढील चौपायांत आहे.

हिं. *। मिलेहि माझ बिधि बात बेगारी । जहं तहँ देहिं कैकइहि गारी ॥१॥*
*। एहि पापिनिहि बूझि का परेऊ । छाइ भवन पर पावकु धरेऊ ॥२॥*
*। निज कर नयन काढि चह दीखा । डारि सुधा बिषु चाहत चीखा ॥३॥*
*। कुटिल कठोर कुबुद्धि अभागी । भइ रघुबंस बेनु बन आगी ॥४॥*
*। पालव बैठि पेडु एहिं काटा । सुख महुँ सोक ठाटु धरि ठाटा ॥५॥*

म. *। विधिनें असुनी मेळ बिघडिला । जिथं तिथं देति शिव्या कैकइला ॥१॥*
*। सुचे कुमति या काय पापिणिस । घर शाकारुनि लावी अग्निस ॥२॥*
*। स्वकरिं नयन काढुनि बघुं बघते । सुधा त्यजुनि विष चाखुं पाहते ॥३॥*
*। कुटिल कठोर कुबुद्धि अभागिनि । होइ आग रघुवंश-वेणु-वनिं ॥४॥*
*। शाखे वसुनी बुंधा छाटी । सुखीं शोक थाटा बहु थाटी ॥५॥*

**अर्थ** : (सगळ्या कुटुंबात) चांगला मेळ (एकी) असता विधीने बिघाड करून टाकला. जिथे तिथे (नरनारी) कैकयीला शिव्या देऊ लागले ।।१।। या पापिणीला काय दुर्बुद्धि सुचली की घर आधी शाकारून मग त्याला आग लावली ! ।।२।। आपल्या हातांनी आपले डोळे काढून घेऊन ते पाहण्याची इच्छा झाली ! आणि सुधा (अमृत) टाकून देऊन विष चाखू पहात आहे ! ।।३।। अभागीण ! कुटिल कठोर कुबुद्धी बनली व रघुवंशरूपी वेणूंच्या वनात आग (निर्माण) झाली, बनली ।।४।। मोठ्या फांदीवर बसून हिने बुंधा (कीं हो !) तोडला; व सुखात असता शोकाचा सर्व थाट (कीं हो !) थाटला ।।५।।.

**टीका. चौ. १ - (१) विधिने मेळ बिघडिला** - शोक करताना लोक (नरनारी) प्रथम विधीला (दैवाला - ब्रह्मदेवाला) दोष देत आहेत. ५।५; १०।१० स्त्रिया किंवा पुरुष एकत्र जमून एकमेकांस सांगत आहेत किंवा जो तो स्वगतच बोलत आहे, पुटपुटत आहे. **(क) मेळ असुनी** - राजाच्या सर्व कुटुंबांत चांगली एकी नांदत होती. एकमेकांचे निःस्वार्थी प्रेम होते. एवढ्या राण्या असून बहिणींसारख्या प्रेमाने वागत होत्या. फूट, मत्सर यांचे नाव नव्हते. ते जणू ब्रह्मदेवाला पाहवले नाही व अचानकपणे त्याने सगळा बिघाड केला. एकीची बेकी करून टाकली. विधि = दैव = प्रारब्धकर्म भोग हा अर्थ घेतला की लोकांचे म्हणणे अक्षरशः खरे आहे. 'जीव कर्मवश सुख दुखभागी' (२२।५) असे देवांनी आधी शारदेला सांगितले व मग हा बिघाड करण्याचा उपाय योजला. **(ख) जिथं तिथं देति शिव्या कैकयीला** - पापीण, कुबुद्धि, अभागीण, आगलावी, पतिघातिनी इत्यादी शब्द शिव्यांसारखेच आहेत. कैकयीला हे दोष देणारांत नर व नारीही आहेत, कैकयी दोषवर्णनाचा येथे उपक्रम केला व 'देति कुचाळिस गालि हि भारी' (५१।४) याने उपसंहार केला आहे. मनुष्य एखाद्या विकाराने अति आर्त होऊन धीर सुटला म्हणजे शोकाचा आवेग कमी करण्यास बडबडणे, रडणे, डोके पिटणे इत्यादींचा चांगला उपयोग होतो. यांचा उपयोग करता आला नाही तर शोकादिकांचा आवेग असह्य होऊन मूर्च्छा किंवा मरणसुद्धा येते.

**चौ.२** - दोष-शिव्या का देतात व कशा देतात हे आता येथून सांगतात. **(१) सुचे कुमति या काय पापिणिस** - सर्वांना आश्चर्य वाटत आहे की कैकयीने

एकाएकी असे कसे केले? हिचा असा स्वभाव नव्हता. **'प्रिय न भरत रामा सम माला । सदा वदांनी विदित जगाला ॥ रामिं सहज तुम्हीं करतां स्नेहा'** (४९।६-७) इ. कैकयीच्या मैत्रिणीच म्हणत आहेत. कैकयीनेही कुबडीला प्रथम असेच सांगितले आहे. दशरथसुद्धा कैकयीला असेच म्हणाले आहेत. 'असुनी मेळ' हे शब्द हेच सांगतात. म्हणून लोक या सगळ्यांचे मुख्य कारण विधि व निमित्तकारण कैकयीचे दुर्भाग्य मानतात. शोकाचा वेग थोडा कमी झाला म्हणजे आपल्या भाग्यालाही दोष देतीलच. **(क) पापीण कां म्हणतात** हे पुढील वर्णनावरून स्पष्ट दिसते. त्यांत हे दाखविले आहे की स्वतःच्या मूर्खपणाने, अविचाराने हिने दुसऱ्यांचा नाश करून स्वतःचा नाश करून घेतला. **(ख)** घराला आग लावणारा साधा पापी नसून घोर पातकी, आततायी आहे. 'आततायिनमायान्तं हन्यादेवाऽविचारयन्' (म.भा.) अशी राजनीती आहे. भाव हा की घराला आग लावीत आहे असे कळताच हिला ठार करणे जरूर होते. धर्मनीतीपेक्षा राजाने अर्थनीतीला (राजनीतीला) आधी मान दिला पाहिजे. म्हणूनच द्रोणाचार्यासारख्या गुरुबरोबरही युद्ध करण्यास भगवंतांनीच अर्जुनास प्रेरणा दिली आहे. **(ग) घर शाकारुनि -** रामावर भरतापेक्षा अधिक प्रेम आहे असे दाखविणे, रामाला राज्याभिषेक करण्याविषयी राजाला आग्रह करणे हे घर शाकारणे आहे. शाकारलेल्या घरात सुखाने राहता येते. रामराज्याच्या छत्राखाली-छायेखाली सर्व लोक सुखाने राहिल्यासारखेच होते. नगररूपी घर शृंगारणे पुरे होऊन, त्यात आनंदोत्सव सुरू झालेच होते. पण रात्री कोणास कळू न देता हिने अचानकपणे घर पेटवले, आग लावली हे कोणास कळलेसुद्धा नाही. आगीचे डोंब एकाएकी उठून विझविणे अशक्य झाले. पण हिला याच जळत्या घरात रहावयाचे आहे, हा विचार हिने केला नाही. पण **या ज्वाळा हिलासुद्धा भाजल्याशिवाय राहणार नाहीत. हे या रूपकातले सार आहे.** हिला अत्यंत क्लेश भोगावे लागतील हे सुचविले.

**चौ.३ - (१) स्वकरिं नयन काढुनि बघु बघते - यांत दुर्बुद्धीचे,** अविचाराचे **महामूर्खपणाचे कार्य दाखविले. मागील रूपकात कपटाचे व दुष्टपणाचे कार्य दाखविले आहे.** आपल्या हाताने आपले डोळे बाहेर काढून पाहण्याची इच्छा हिला झाली. कैकयी अति सुंदर आहे. ज्या सुंदर डोळ्यांच्या कटाक्षांनी, दशरथासारख्या अनुपम

सम्राटाला वश करून ठेवला, ते डोळे आरशात जरी पाहिले तरी उलटे दिसतात. म्हणून ते प्रत्यक्ष पाहण्याची इच्छा होऊन हिने आपल्या हातांनीच काढून ते पाहण्याचा प्रयत्न केला. या अविचाराने डोळे पाहण्याचे बाजूस राहून स्वतःस अंधत्व व कुरूपता येते, असलेले सौंदर्य नष्ट होते. याने मुख्य तोटा करणाराचाच होतो व त्या व्यक्तीचे मुख पाहणारांना अपशकुन होतो व किळस येते. 'गमे कुमतिला कुवेष केवीं । जणुं भावी वैधव्या सुचवी' (२५।७) राजा मुठीत असल्याने आजपर्यंत ऐश्वर्य व सत्ता हिच्या मुठीत होती; पण ती जाऊन आता वैधव्यरूपी विपत्तींत आंधळ्यासारखे दिवस काढावे लागतील. कुबडीशिवाय इतर कोणासही तोंड दाखविण्याची लाज वाटेल व आपल्या महालात वनवास भोगावा लागेल.

(२) येथे नयन कोणाचा किंवा कोणाचे हा उल्लेख नाही. मुळात 'निज कर नयन काढि' असे असले तरी 'निज' चा संबंध हाताशीच आहे व यापूर्वी 'भरतराम दोन्ही किं ममाक्षी' (३१।६) असे दशरथ म्हणाले आहेत; म्हणून या चरणात दशरथांचा संबंधही घेता येतो व अर्थ नीट लागतोच. भरत व राम हे दशरथाचे दोन डोळे आहेत. त्यातील रामरूपी डोळा कैकयीच्या दोन्ही डोळ्यांत खुपू लागला. म्हणून तो आपल्या हाताने काढून वनात फेकून देण्याचा तिने प्रयत्न केला. कारण मग आपल्या डोळ्यांनी चांगले दिसू लागेल असे तिला वाटले. डोळ्यांत सलत असलेली वस्तू काढल्याशिवाय डोळ्यांना चांगले दिसत नाही. पाहता येत नाही. राम दोन्ही डोळ्यांसमोर नकोसे झाले. **या अर्थाने कवि कठोरता व मत्सर दाखवितात.** पतीचा एक डोळा पत्नीने आपल्या हाताने काढणे ही साधी कठोरता नाही. कठोरपणाची सीमाच आहे. 'नृपप्रीति **कैकयी कठिणता** । विधिविरचित **अवधीच** उभयता' (३७।४) यांत कैकयीला कठीणपणाची-कठोरतेची सीमा म्हटलेच आहे. म्हणून हा अर्थ घेणेही आवश्यक आहे. सवतीचे नेत्रसुख नष्ट करून, तिला कष्ट झालेले पाहणे व भरतराजा झाल्याचे नेत्रसुख भोगणे हा हेतु यांत दिसतो. पुढल्या चरणांत रसना-स्वाद तृप्ति हा हेतु दाखविला जातो.

(३) **सुधा त्यजुनि विष चाखुं पाहते** - चाखणें रसनेचे कार्य आहे व रस चाखावयाचा असतो. सुधेचे मुख्य दोन गुण - स्वाद व तोष. **'स्वादतोषसम सुगति सुधेचे'** (१।२०।७) सुधा = सद्‌गति हे ठरले म्हणून विष = दुर्गति हे

सिद्ध झाले. रामविरोधी, पतिविरोधी, प्रजाविरोधी व्यक्तीला दुर्गती मिळावयाचीच. हिला सहज मिळणारी सद्गति राज्यभोगाच्या वासनेने नष्ट होऊन दुर्गती प्राप्त होणार असे लोकांस वाटत आहे. **रामराज्याभिषेक ही सुधा व रामवनवास हे विष** हे येथे दाखविले. रामवनवासाची बातमी विषारी हे इंगळीच्या दृष्टांताने पूर्वीच दाखविले आहे. कैकयीसारखी दुर्गती - दुर्दशा मरेपर्यंत कोणाचीच झाली नाही. पण रामचंद्रांनी कृपा केली म्हणून कैकयी मेल्यावर मात्र तिला दुर्गती मिळाली नाही. (वा.रा.उ.कां ९९।१५।१८) आणि (यु.कां. १२२।२४-२६ पहा.)

**चौ. ४ - (१) कुटिल कठोर-कुबुद्धि-अभागिनी** - कुटिल, कठोर, कुबुद्धि व अभागीच कशी हे मागील तीन चरणांत दाखविलेच आहे व मुख्यतः तिने आपला स्वतःचा विनाश कसा करून घेतला हेही दाखविले. इतरांचा नाश कसा केला हे पुढील तीन चरणांत दाखवीत आहेत. **(क) होइ आग रघुबंश-बेनु-बनि** - वंश व वेणु हे दोन्ही शब्द समानार्थक असून दोन्ही दोन दोन अर्थांनी येथे वापरले आहेत. 'वंशो **वेणौ कुले** वर्गे पृष्ठाद्यवयनेऽपिच (विश्व) वेणु = वंश, वेळू, कळक, बांबू; व मुरली, बांसरी, वेणु = मुरली या अर्थाने स्त्रीलिंगी आहे पण वंश = वेणु = कळक, बांबू या अर्थाने तो पुल्लिंगी आहे. वेळूच्या - कळकांच्या बेटांतील वेळू उन्हाळ्यात वाऱ्याने एकमेकांवर घासू लागले की त्यातील एखादा वेणू पेट घेतो व तो अग्नि ती आग सगळ्या वंशवनाला जाळून टाकते. वाऱ्याने वेणु एकमेकांवर घर्षण करू लागले की वेणुनादासारखा मधुर ध्वनि निघतो. वेणु = मुरली, वेणूची - वेळूची केलेली असते; तशी कैकयी रघुवंशरूपी वंशवनांतीलच एक असून तिने आपल्या मधुर ध्वनीने असे घर्षण केले की त्या घर्षणाने भयंकर **आग उत्पन्न झाली; तीच कैकयी.** तिनेच रामविरहानलरूपी वणवा - वनानल, रघुवंशरूपी वंशवनांत - वेणुवनांत पसरला. त्या आगीने प्रथम रघुवंशांतील व्यक्ती होरपळणार व नंतर तो वणवा सर्व नगरांत व इतरत्रही पसरणार. 'नगर सफल बन' असे पुढे म्हणणार आहेत. वेळूंच्या वनांत जो वंश (कळंक) पेटतो तो तर साफ जळून जातो. त्याप्रमाणे हिचा सर्वनाश होणार व हिच्यामुळे सर्व रघुवंश, पूर्वजसुद्धा अत्यंत दुःखी-कष्टी होणार हे येथे सांगितले. पुढील चौपाईत आणखी दोन गोष्टी सांगतात.

**चौ. ५ - (१) शाखे बसुनी बुंधा छाटी - पालव** = पल्लव - झाडाची फांदी, 'पल्लवः विटपे विस्तरे... (अ.व्या.सु.) विटप = शाखा, मोठी फांदी = पल्लव; बुंधा = झाडाचे मुख्य खोड झाड. फांदीवर बसून बुंधा तोडणे अत्यंत आत्मघातकी अविचार आहे. बुंधा तोडला की फांदी, तिच्यावर बसणारी व्यक्ती व कुऱ्हाड ही झाडाबरोबरच खाली पडणार. झाड सुकून मरणार, नष्ट होणार; मग त्यालाच फुटलेली फांदी कशी राहणार? 'तरु तोडुनि शाखेस शिंपले' (१६१।८) असे भरत कैकयीलाच म्हणाला आहे. **(क) बुंधा = झाड कोणते व शाखा कोणती?** राणीने एका वराने भरताला राज्य मागितले व दुसऱ्या वराने रामवनवास मागितला. दशरथ भरताला राज्य देण्यास कबूल झाले पण रामाला वनात जा म्हणून सांगत नाहीत. राम वियोग झाला तर मी जगणार नाही असे स्पष्ट सांगितले. 'राम वियोगें मार न मजला' (३४।७) असे स्पष्ट म्हणाले. पण तिने हट्ट सोडला नाही. यावरून मानसाधारेच ठरले की दशरथ राजा हा वृक्ष (बुंधा) भरतराज्य ही शाखा, फांदी, ही फांदी राजाने खुशीने हिच्या ताब्यात दिली आहे. ती या फांदीवर बसली आहे. रामवनवासरूपी दांडा असलेली रामवियोग रूपी तीक्ष्ण कुऱ्हाड मारून मला मारू नकोस असे दशरथ विनवीत असता हिने तो दांडा हातातून न सोडता ती कुऱ्हाड मारली; वारंवार घाव केले; व दशरथरूपी वृक्ष तोडून टाकला; त्याबरोबर तो धाडकन जमिनीवर पडला आहे व आता लवकरच मरणार. झाड मेले की फांदी मरतेच म्हणजेच भरतराज्यरूपी फांदी पण मरणार हे निश्चित ठरले. 'उलथी भूपरूप तरु-मूला' (१४।४) टी.पहा. ल.ठे. कुऱ्हाड व दांडा यांचा विचार ऐन वेळी सुचला व 'रामवियोगें मार न मजला' हे दशरथ वचन चटकन आठवले म्हणून हे रूपक निर्दोषपणे उकलले गेले.

**(२) राम हा बुंधा (= वृक्ष) मानल्यास कसा अनर्थ होतो पहा :** तोडलेला वृक्ष जगत नाही. ठार मरतो व जाळण्याच्या योग्यतेचा होतो. राम लवकरच मरणार असे ठरेल ! (क) रामराज्य वृक्ष मानल्यास पुन्हा रामराज्य व्हावयास नको होते, पण ते झाले. कोणी म्हणतील की सागासारखा वृक्ष तोडल्यावर काही वर्षांनी नवे झाड तयार होते; पण हे अर्धसत्य आहे. नवे एक झाडच तयार न होता मूळच्या झाडाच्या तोडलेल्या बुंध्याच्या बाजूस अनेक कोंब फुटून वाढतात

व ते जुन्या झाडाएवढे मोठे होत नाहीत. शिवाय तोडून राहिलेला जमिनीवरील बुंधा जमिनीबरोबर चांगल्या प्रकारे तोडून साफ करावा लागतो; (रेंजरला विचारावे); म्हणून रामराज्य हा वृक्ष मानणे अनर्थकारक ठरेल. **(ख) तोडलें ती कुऱ्हाड व तिचा दांडा दाखवितां येत नाहीं** - राम वियोगानेच दशरथ मेले आहेत व भरतानेच दहन केले आहे. (ग) **भरत ही शाखा मानल्यास,** झाडाच्या मृत्यूने शाखेला मृत्यू येतोच पण या भानगडीत भरत मेले नाहीत. भरत राज्य ही शाखा मात्र मेली आहे. रामपादुकांचे राज्य म्हणजे प्रातिनिधीक रामराज्यच १४ वर्षे चालू राहिले. (घ) **दशरथाचा मनोरथ हा वृक्ष मानणेही चुकीचेच.** कारण तो साधा वृक्ष नसून सुरतरु म्हणून वर्णिला आहे. स्वतः जिवंत असता रामराज्याभिषेक पाहणे हा त्यांचा मनोरथ होता; पण **त्याला भरत** किंवा **भरतराज्य ही फांदी नव्हती.**

रूपकांत अध्याहृत असलेल्या अत्यावश्यक अंशांचा विचार बरोबर सुचला तरच कवीच्या मनातील यथार्थ सापडतो. (मा.पी. पहा!) कोष्टकरूपाने तुलना पुढे आहे.

(३) **सुखीं शोक थाटा बहु थाटी** - या चरणाने कैकयीच्या विपरीत करणीचा उपसंहार केला. 'सुचे कुमति या काय पापिणिस' या प्रश्नाचे सारांश रूपाने उत्तर या चरणात आहे. चांगली सर्व प्रकारच्या सुखांत, ऐश्वर्यात, सौभाग्यात नांदत होती ते तिला नकोसे झाले व शोकाचे साम्राज्य थाटले. शोकाचा संसार थाटला. पतिमरण, वैधव्य, पुत्रविरह, अपकीर्ति, कलंकित मुख, पश्चात्तापाचा दावानल, लोकनिंदा हा सर्व थाट तिने स्वतःसाठी सजविला. **(क) रघुवंशाला** शोक दुःख दशरथास शोक, रामवियोगाने मरण; १४ वर्षे शोक विव्हळता व स्त्रीजित झाल्याचा पश्चात्ताप, सर्व राण्यांना वैधव्य व शोक. भरताला रामवियोग शोक दुःख, कैकयीपुत्र झाल्याचा पश्चात्ताप, रामवनवासाचे निमित्त बनल्याची आत्मग्लानि, तपश्चर्येचे कष्ट; सर्व प्रजेला शोक दुःख व तपश्चर्येचे कष्ट हा तिने इतरांच्यासाठी शोकथाट - शोकाचा सरंजाम तयार केला. यावरून कळले की इतर कोणाहीपेक्षा अधिक व चिरकाळ टिकणारी शोकसंपत्ती तिने आपल्या वाट्यास घेतली आहे व त्या प्रमाणात सर्व सुखांचा त्याग तिलाच जास्त करावा लागणार आहे. पण हे ध्यानी येण्यास अजून २१ दिवसांचा अवकाश आहे.

भरत येऊन जेव्हा सणसणीत डागण्या देईल तेव्हा तिला झालेला उन्माद वायू उतरेल. आता शोकविलापात लोक तिचीच चर्चा करतात. एक गोष्ट लक्षात आलीच असेल की या राणीच्या नावाचा उच्चार लोक करीत नाहीत. 'ही, ती' असेच म्हणतात.

## शाखे बसुनी बुंधा छाटी (४७।५)

| | | | |
|---|---|---|---|
| १. कैकयी | भिल्लीण | ६. राम वनवास | कुऱ्हाडीचा दांडा |
| २. अयोध्या | वन | ७. दशरथ मरण | झाड मरते |
| ३. दशरथ राजा | बुंधा, झाड | ८. भरत राज्य घेत नाही | फांदी मरते |
| ४. भरतास राज्य | शाखा - फांदी फुटली | ९. कैकयीचा अधःपात | तोडणारी पडते |
| ५. राम वियोग | तीक्ष्ण कुऱ्हाड | १०. कैकयीला दुःसह पीडा | मरणप्राय पीडा |

हिं. ***। सदा रामु एहि प्रान समाना । कारन कवन कुटिलपनु ठाना ।६॥***
***। सत्य कहहिं कबि नारि सुभाऊ । सब बिधि अगहु अगाध दुराऊ ॥७॥***
***। निज प्रतिबिंबु बरुकु गहि जाई । जानि न जाइ नारि गति भाई ॥८॥***

म. ***। सदा राम हिजला प्राणां परि । कवण हेतु धरि कुटिलपणा तरि ॥६॥***
***। स्त्रीस्वभाव वदती कवि सत्य चि । विविधा कपट अगाध अगम्य चि ॥७॥***
***। प्रतिबिंबहि निज करीं घेववे । परि नारी गतिं कधिं न जाणवे ॥८॥***

**अर्थ :** राम हिला सदा प्राणांसारखे (प्रिय होते); मग काय कारणाने ही कुटिलपणा सोडित नाही. (धरून बसली) ॥६॥ स्त्रीस्वभावाविषयी कवि म्हणतात ते अगदी सत्य आहे. त्यांचे नाना प्रकारचे कपट अगाध व अगम्य (अगह = अग्राह्य) च असते (यांत शंका नाही) ॥७॥ स्वतःचे (निज) प्रतिबिंबसुद्धा (कदाचित-बरुकु) स्वतःच्या हातात घेता येईल पण स्त्रियांची गति (चरित्र-करणी) कधीही जाणता येणार नाही.॥८॥

**टीका. चौ. ६-७ (१) 'राम मला प्रिय प्राणांहुनि तर'** (१५।८) असे कैकयीच

म्हणाली आहे. (क) **स्त्रीस्वभाव** - वर्णन आम्ही विविध ग्रंथांत ऐकत, वाचीत, सांगत आलो; पण अयोध्येत ते आज अनुभवास आले. (ख) **विविध प्रकारचे कपट** करण्यात त्या प्रवीण असतात व त्यांचे कपट इतके गूढ असते की अगाध सागराचाही ठाव लागेल पण स्त्री कपटसागराचा ठाव कधी कोणास सापडणे शक्य नाही. त्यांच्या मनात काय आहे हे आधी कोणास कळणार नाही. आग हातात घेववेल पण त्यांचे मन (हृदय) हातात सापडणार नाही. '**अग्राह्यं** हृदयं तथैव वदनं यद्दर्पणान्तर्गतम् । भावः पर्वत सूक्ष्म मार्ग विषमः स्त्रीणां न विज्ञायते' (भर्तृहरि) आरशातील मुख व स्त्रियांचे हृदय धरता येत नाही (घेता येत नाही). पर्वतातील सूक्ष्म व विषम मार्गाप्रमाणे त्यांच्या मनातील भाव सूक्ष्म वा कठीण असून जाणता येत नाही. 'अन्तःक्रूरा सौम्यमुखा **अगाधहृदयाः** स्त्रियाः ॥ अन्तर्विषा बहिःसौम्या भक्ष्या विषकृता इव' (सु.र.) आणखी अवतरणे मा.पी.मध्ये पहावी. सार हे की मुखात कपट, डोळ्यांत कपट, वाणीत कपट, मनात कपट, कृतीत कपट, हावभावांत कपट असे सर्व प्रकारचे कपट त्यांच्यांत असते (असू शकते) हे सर्व प्रकार कैकयीने दाखविलेच.

**चौ.८ - (१) प्रतिबिंबहि निज करी घेववे** - आरशांत, पाण्यात किंवा कशांतही पडलेले स्वतःचे किंवा कोणाचेही प्रतिबिंब कोणालाही हातात घेता येणे शक्य नाही. एक वेळ हे कदाचित घडेल असे मानले तरी स्त्री हृदयाचा व स्त्रीचरित्राचा पत्ता लागणार नाही. 'नारीस्वभाव' आणि '**श्रीतुलसीदास व नारीवर्ग**' प्रस्तावनेत पहा.

***हिं.दो.*** *। काह न पावकु जारि सक का न समुद्र समाइ ॥*
*॥ का न करै अबला प्रबल केहि जग कालु न खाइ ॥४७॥*

***म. दो.*** *। काय न वन्हिस जाळवे राहि सागरिं न काय ॥*
*। काय न करि अबला प्रबल कोणा काळ न खाय ॥४७॥*

**अर्थ :** अग्नि काय जाळू शकत नाही? समुद्रात काय राहू शकत नाही? प्रबल झालेली अबला काय करीत नाही? व काळ कोणाला खात नाही? ॥दो.४७॥

**टीका. :** (१) अग्नि, समुद्र व काळ हे तीन दृष्टान्त या प्रबल झालेल्या

अबलेला दिले आहेत. ही प्रबल अबला दावानल झाली आहे. रामविरहानलाने रघुवंशाला, अयोध्येला व जनकपुरीला होरपळून काढणार आहे. अग्नि स्वतःला सुद्धा जाळून भस्म करतो (त्याला पाहिजे ते इंधन मिळाले नाही म्हणजे) भरत राज्यरूपी इंधन मिळाले नाही. भरताने ते घातले नाही. म्हणजे कैकयी विरहानल व पश्चात्ताप दावानलांत जन्मभर जळणार आहे. पहिल्या प्रश्नाचे सामान्य उत्तर अग्नि वाटेल ते जाळू शकतो हे आहे; परंतु **प्रल्हाद, बिभीषण, हनुमान यांच्यासारख्या भक्तांना जाळू शकत नाही.** तथापि रामविरहानल भरत, विदेही जनक, कौसल्या, वसिष्ठ इत्यादी महान रामभक्तांनासुद्धा भाजणार आहे. हा विरहाग्नि कैकयीच्या मत्सरांतून निघाला आहे. **(क) हठयोगाने** ज्यांनी पंचभूत धारणांपैकी अग्निधारणा सिद्ध केली असते **त्या योग्यांना अग्नि जाळू (भाजू) शकत नाही.**

(२) **समुद्रात काय रहात नाही? पाण्यापेक्षा हलके पदार्थ** समुद्रात रहात नाहीत, ते किनाऱ्यावर टाकले जातात. रामवनवासाने **कैकयीने शोकसागर, दुःख-विपत्ति सागर निर्माण केले आहेत.** शेवटी कैकयीसुद्धा यात बुडणार आहेच. जलाच्या सागरात न बुडणारे शेकडो पदार्थ व अनेक पोहणारे आहेत, पण कैकयीने निर्माण केलेल्या सागरात स्वतः रामसुद्धा पडणार आहेत. रघुनाथांस अनेक विपत्ति भोगाव्या लागल्या आहेत; ते अनेक वेळा इतरांच्या दुःखाने दुःखी झाले आहेत; पितृनिधनवार्ता, सीताहरण, लक्ष्मणमूर्च्छा इ. प्रसंगी शोक केला आहे. (नरनाट्य का असेना.) मग इतरांची कथा ती काय? वसिष्ठ विदेहादि सुद्धा यात पडले आहेत. पशुपक्षी सुद्धा यातून सुटले नाहीत. एका स्त्रीच्या प्राबल्याचा केवढा प्रताप हा !

(३) **काय न करि अबला प्रबल** - अबला प्रबल यांत **विरोधालंकार** आहे. टीकाकार म्हणतात की सर्व स्त्रिया शरीराने अबला असतात पण हृदयाने प्रबला असतात. म्हणजे अर्थ होतो की कैकयीसारख्या असतात. पण हा अर्थ दुष्ट आहे. स्त्री समाजाची निरर्थक निंदा करणारा आहे. कारण मग या अर्थातून अनसूया, सीता, कौसल्या, मंदोदरी, सुमित्रा इ. सती पतिव्रताही सुटत नाहीत. येथे भाव हा आहे की अबला स्त्रिया सामान्यपणे दुर्बल असतात; पण त्या जेव्हा प्रबल होतील त्या वेळी त्या वाटेल ते पापकर्म, दुष्कर्मादि करू शकतील. फक्त

एकच गोष्ट **सुविचार-सुविवेक-त्या करू शकत नाहीत. 'माग करुनि सुविवेक'** (३२१) असे राजाने सांगितलेले तिने केले नाही म्हणून सर्व अनर्थ झाला. (३३।३ पहा.) **(क) सर्व अबला प्रबल नसतात यास आधार - 'अबला यत्र प्रबला बालो राजा निरक्षरो मंत्री ॥ नहि नहि तत्र सुखाशा । जीवत आशाऽपि दुर्लभा भवति'** (जीविते आशा = जीवित आशा) (सु.र.) 'यत्र प्रबला' शब्दांनी सिद्ध झाले की क्वचित कुठे एखादी अबला प्रबल होते. पेशवाईत आनंदीबाई अशीच प्रबळ झाली म्हणून नारायणरावाचा खून झाला व पेशवाईच्या विनाशाचा पायाच घातला गेला. **आनंदीबाई** हे नाव 'कैकयी'सारखेच कुप्रसिद्ध झाले आहे. प्रबल अबला 'घ्नन्त्यल्पार्थेऽपि विश्रब्धं पतिं भ्रातरमप्युत' (सु.र.) त्या त्यांच्यावर विश्वासलेल्या पतीचा किंवा भावाचा सुद्धा खून अगदी क्षुद्र गोष्टीसाठीही करतील. **'हत नारीबिश्वासिं'** (२९) असे राजाने म्हटलेच आहे; म्हणूनच सुभाषितकार म्हणतात **'विश्वासो नैवकर्तव्यः स्त्रीषु राजकुलेषुच' 'त्यजुं पतिपुत्र शकेन'** असे ही म्हणालीच आहे. पतीचा त्याग हिने केलाच व पुत्रच हिचा त्याग करणार आहे, परिणाम एकच.

**(४) कोणा काळ न खाय? - काकभुशुंडीसारखे** असतात, त्यांच्या देहाला सुद्धा काळ खात नाही. **'काळ कधीं व्यापी ना तुजला । स्मरण निरंतर कर भज मजला'** (७।८८।१) **'नाश महाप्रलयिं न अपणांसी'** (७।९४।७२) ही राणी आपल्या पतीला काळरूप होणार आहे असे लोकांस वाटते. **'नारिमिषें शिरिं मृत्यू नाचे'** (३४।५) **'पिशाच्चसा लागून तुज वदवि काळ मम-'** (३५) असे दशरथ तिलाच म्हणाले आहेत. दशरथाच्या म्हणण्यातील भावच या दोह्यांत प्रबला अबला व काळ यांची सांगड घालून व्यक्त केला आहे. **(क)** जिथे अबला प्रबल असेल तिथे तिला निमित्त करून काळ कोणाचा तरी मृत्यू, नाश इ. घडवीत असतो. **प्रबल अबला निमित्तमात्र होते** हे सार या दोन गोष्टींच्या संयोगाने येथे सांगितले. **किती सुंदर समन्वय व कार्यकारण भाव निदर्शन आहे !** प्रबल होण्यास लायक असलेल्या अबलेचा सुविचार सुमति हरण करून तिच्यात कुविचार-कुमति निर्माण करतो. निसर्गतः चंचल, भीरु, दुर्बल व कोमल हृदयी असणाऱ्या स्त्रिया हट्टी, दृढनिश्चयी, निर्भय, क्रूर, निर्दय, निर्लज्ज, प्रबल केव्हा व कोठे होतात हे पुढील चौपायांत सुचविले आहे. **(ख)** या दोह्यांत व पुढील चौपायांत मिळून

**कारणमाला अलंकार आहे.** विरहाग्नि व शोकादिसागर निर्मितीचे कारण प्रबल झालेली अबला; ती कारण होण्याला कारण काळ, इतके येथे सांगितले.

**ल.ठे.** - एका दोह्यांत चार सुभाषिते, बहिर्लापिका, कारणमाला अलंकार, कैकयीकरणी व त्याचा परिणाम इतक्या गोष्टी सहज भरून ठेवल्या आहेत.

*हिं.* *। का सुनाइ बिधि काह सुनावा । का देखाइ चह काह देखावा ॥१॥*
*। एक कहहिं भल भूप न कीन्हा । बरु बिचारि नहिं कुमतिहि दीन्हा ॥२॥*
*। जो हठि भयउ सकल दुख भाजनु । अबला बिबस ग्यानु गुनु गा जनु ॥३॥*
*। एक धरम परमिति पहिचाने । नृपहि दोसु नहिं देहिं सयाने ॥४॥*

*म.* *। विधी ऐकवुनि काय ऐकवी । काय दाखवुनि काय चाखवी ॥१॥*
*। एक म्हणति नहिं नृपें कृत भलें । वर विचारविण कुमतिस दिधले ॥२॥*
*। होति हटें सब दुःखा भाजन । वश अबले, गत जणूं ज्ञान गुण ॥३॥*
*। धर्म परम जे सुज्ञ जाणती । ते दोष न भूपास लावती ॥४॥*

**अर्थ** : विधीने (कालच) कानी घातले काय व (आज) हे ऐकवीत आहे काय (राज्याभिषेक आणि वनवास); (काल) काय दाखविले आणि (आज) काय चाखवीत आहे? (राज्याभिषेकोत्सव आणि शोकरस) ॥१॥ काही लोक (एक) म्हणत आहेत की राजाने भले नाही केले, त्या दुर्बुद्धीला वर दिले ते विचार करून नाही दिले.॥२॥ (वर देण्याच्या) हट्टाने आज सर्व दुःखांचे भाजन (पात्र) बनले; एका अबलेला वश झाले व जणू ज्ञान व गुण गेले - नष्ट झाले.॥३॥ धर्मच श्रेष्ठ असे जाणणारे जे सुज्ञ-शहाणे आहेत ते राजाला दोष देत नाहीत.॥४॥

**टीका. चौ. १** (१) अयोध्येतील लोक शोकार्त होऊन विलाप करीत आहेत हे विसरू नये. काळाने तरी कैकयीला निमित्त करण्याचे कारण काय? विधि-दैव, ब्रह्मदेव, विधिलिखित येथपर्यंत कारणपरंपरा न तुटता सांगितली. पण शोकार्त असल्याने सुसंगतपणा राहणे अशक्य झाले. काय होणार होते व काय झाले हे? काल व आज ! कसे विपरीत झाले हे शृंगारलेल्या नगरातील प्रत्येक स्थान स्मरण देऊ लागले; त्यामुळे ते विचार मधे येऊन कारणमाला थोडी तुटली; पण पुन्हा सुरू होईल. (क) **काय ऐकवुनि** - उद्या सकाळी रामराज्याभिषेक

होणार, राम अशा पद्धतीने अमुक रस्त्याने मिरवत जाणार व सीतेसहित सिंहासनावर बसणार या परमानंदाच्या बातम्या कालच की हो कानांवर पडत होत्या ! मधे पुरती एक रात्र सुद्धा गेली न गेली तोच रामवनवासाची बातमी एकाएकी कानांवर आदळली ! काय हा विधात्याचा पोरखेळ ! काय ही दैवाची विपरीत फसवी करणी ! **'शोकें वदली देवि सुमित्रा । विधि गति अति विपरीत विचित्रा ॥ तो सृजि पाळी मग करि होळी । बालकेलिसम, विधि मति भोळी ॥** (२।२८२।१-२) हाच भाव येथे आहे.

(२) **काय दाखवुनि काय चाखवी !** : कालपासून सर्व नगरांत जिकडे तिकडे आनंद, उत्साह, शृंगार, सौंदर्य, माधुर्य, वात्सल्य, वाद्यांचा गजर इत्यादी गोष्टी दिसू लागल्या काय, आता उजाडेपर्यंत आशा दाखविली काय, की कनक सिंहासनी राजवेषांत रामचंद्र सीतेसह विराजमान झालेले पाहिले की नेत्रांची नी जन्माची सुफलता होईल ! व आता एका घटकेतच हे काय पहावे लागत आहे ! 'शिर पिटती स्रवती नयन उर अपुरा शोकास' इ. काय हा प्रारब्धाचा खेळ ! पुन्हा या विपत्तीच्या कारणाच्या मुळापर्यंत जाण्याचा प्रयत्न करतात.

**चौ. २. (१) - विधीनें** - दैवाने असे आजच का केले याचा विचार करू लागताच दशरथ सापडले तडाक्यात. राजानेच विचार करून वर दिले असते तर हा अनर्थ झाला नसता. ब्रह्मदेवाने - **दैवाने असे विपरीत करण्यास निमित्त राजाने अविचाराने वर देणे हे ठरले.** तेव्हा राजाने हे काही चांगले (भले) नाही केले ! असे एक = काही लोक म्हणू लागले. राजा अविचारी, मूर्ख नसून त्यांनी हे कसे केले?

**चौ.३ - (१) होति हटें सब दुःखा भाजन** - आणा शपथा घेऊन हट्टाने निग्रहाने, वर देतो असे सांगितले म्हणून तिने पेचात पकडून भलतेच वर मागितले. मोठेपणाच्या, **कुलाभिमानाच्या इरेस चढले असतील म्हणून सगळा अनर्थ झाला.** पण याला तरी कारण काय? तिला तशीच तडफडत ठेवून गेले असते झोपायला तर हा अनर्थ झाला नसता. तसे का केले नाही? चांगले ज्ञानी, राजनीतिनिपुण सद्गुणांची खाण असून असे कसे केले. कुठे गेले ज्ञान व सर्वगुण? (क) त्यावर कोणी म्हणतात की तुम्ही म्हणता ते खरे; पण जो पुरुष बायकांच्या

अगदी मुठीत गेला असेल तिच्याशिवाय ज्याला मुळीच करमत नसेल असा स्त्रीवश-अबलेला वश झाला असेल त्याच्याकडून ते व्हावे कसे? आमचे राजे स्त्रीवश झाले पहिल्यापासून म्हणून तर ती प्रबल झाली व हे सर्व तिला करता आले. पुरुषाने आपले स्वातंत्र्य बायकोच्या मुठीत दिले, तो नारीविजित झाला की मग त्याला तिने आपल्या तंत्राने का नाचवू नये? दशरथ **अबलेला वश झाले म्हणून ती प्रबला बनली; व सर्वनाश झाला.** अबला प्रबला केव्हा होते हे येथे दाखविले. येथपर्यंत ही कारणपरंपरा आणून पोचविली.

**ल.ठे.** - पुरुष अबलावश झाला की त्याचे ज्ञान, वीर्य, शौर्य, धैर्य, धर्म, दया, दाक्षिण्य इ. गुण व शहाणपण इ. असून नसल्यासारखी होतात. **अबला प्रबल होण्यास पुरुषाची कामासक्तिच मूळ कारण असते.**

**चौ. ४** - (१) या प्रमाणे कोणी काळ, कोणी ब्रह्मदेव, कोणी दैव, कोणी कैकयी तर कोणी राजाच या दुःखाचे कारण ठरवितात; पण **'धर्म परम'** जे **जाणती** - जे थोडे धर्मतत्त्व जाणणारे, शहाणे लोक आहेत ते मात्र राजाला मुळीच दोष देत नाहीत. राजाचा निर्दोषीपणा ते पूर्वेतिहासांतील उदाहरणे देऊन पटवून देण्याचा प्रयत्न करतात :

*हिं.* *। सिबि दधीचि हरिचंद कहानी । एक एक सन कहहिं बखानी ॥५॥*
*। एक भरत कर संमत कहहीं । एक उदास भायँ सुनि रहहीं ॥६॥*
*। कान मूदि कर रद गहि जीहा । एक कहहिं यह बात अलीहा ॥७॥*
*। सुकृत जाहिं अस कहत तुम्हारे । रामु भरत कहुँ प्रानपिआरे ॥८॥*

*म.* *। हरिश्चंद्र - शिबि - दधीचि - चरितें । एक दुजाला होती कथिते ॥५॥*
*। एक म्हणति कीं भरत-संमती । उदासीन कुणि ऐकुनि असती ॥६॥*
*। मिटुन कान करिं, चाविति रसने । एक म्हणति हें असत्य वदणें ॥७॥*
*। वदतां असें नाश सुकृतांसी । प्राणप्रिय हि राम भरतासी ॥८॥*

**अर्थ** : हरिश्चंद्र, शिबि, दधीचि इत्यादींच्या कथा कोणी कोणांस सांगू लागले.।।५।। कोणी म्हणाले की (कैकयीच्या कुटिल करणीला) भरताची संमती असलीच पाहिजे, तर कोणी हे ऐकून उदासीनपणाने स्वस्थ राहिले आहेत.।।६।। कोणी कानांवर हात ठेऊन जीभ (रसना) चाऊन म्हणाले की हे तुमचे म्हणणे

खोटे आहे.॥७॥ असे बोलण्याने तुमचे सर्व सुकृत नष्ट होईल की ! कारण भरताला राम प्राणांहून प्रिय आहेत.॥८॥

**टीका : चौ. ५ (१)** धर्म परम श्रेष्ठ आहे हे जाणणारे लोक राजाला दोष देणारांस समजाऊन सांगत आहेत की राजांनी आपली प्रतिज्ञा पालन केली यात मुळीच दोष नाही. 'धर्म न दुसरा सत्य समान' धर्म नित्य आहे, सुखदु:खादि अनित्य आहेत. 'जन्ममरण सुखदु:खे भोगहि । विरह लाभहानी प्रिय योगहि ॥ स्वामी ! कालकर्मवश घडती । बलपूर्वक जशिं रात्र दिवस ती ॥ (१५०।५-६) ९२।४ ते ९३।१ पर्यंत पहा. अनेक राजांनी, ऋषींनी सत्यपालनासाठी, वचनासाठी याहून कितीतरी भयंकर दु:ख-संकटे भोगली आहेत. असा उपक्रम करून शिबि, हरिश्चंद्र, दधीचि, बली इत्यादींच्या कथा-चरित्रे कोणी कोणांस सांगत आहेत. (क) शिबि, दधीचि यांच्या कथा ३०।७ च्या टीकेत दिल्या आहेत.

**(२) हरिश्चंद्र कथा** - हरिश्चंद्राची कथा सुप्रसिद्ध आहे. हरिश्चंद्र महाराज सूर्यवंशांतील इक्ष्वाकु राजाचा पुत्र. इंद्राच्या सभेत, विश्वामित्र असता, वसिष्ठांनी हरिश्चंद्राची खूप प्रशंसा केली. महाराजांची परीक्षा पाहण्यासाठी विश्वामित्राने विप्र रूप घेऊन प्रथम संपूर्ण राज्य मागितले. राज्य दान दिल्यावर दक्षिणा मागितली; पण जी म्हणून दक्षिणा देऊ लागले ती राज्यातलीच ! ती निरुपयोगी ठरली. राज्य सोडून स्त्री व पुत्र यांना विकून आलेले द्रव्य दक्षिणेचा काही भाग म्हणून दिले व शेष दक्षिणा स्वत:स एका चाण्डालाला विकून पुरी केली. तरीसुद्धा परीक्षा पुरी झाली नाही. सर्प बनून राजपुत्र रोहितला चावले; त्याला जाळण्यासाठी माता आली तेव्हा काशीतल्या डोंबाला कर दिल्याशिवाय तो जाळू देईना. राणीने आपले अर्ध वस्त्र दिले. तेव्हा बातमी पिकविली की ती मुडदे खाते. तेव्हा हरिश्चंद्राच्या मालकाने, त्या डोंबाने तिचा वध करण्याची आज्ञा हरिश्चंद्रास दिली. आपलीच राणी आहे हे गुलाम बनलेल्या त्या राजाने ओळखले; पण मालकाची आज्ञा पाळणे हा आपला धर्म आहे हे जाणून राणीचा वध करण्यासाठी तलवार उगारली तोच भगवंतांनी त्याचा हात धरला. मुनी प्रसन्न झाले व त्यांनी रोहिदासला जिवंत केला. हरिश्चंद्रास पुत्र व राणी परत देऊन सर्व राज्यही परत दिले. (क) इतके कष्ट, अपमान, संकटे तर आपल्या महाराजांस नाही ना भोगावी लागणार?

**चौ. ६** - (१) कोणी म्हणू लागले की राणीने जे कपट केले ते भरताच्या संमतीनेच केले. भरत जाण्यापूर्वीच त्यांनी हा कट केला असला पाहिजे. **(क)** कोणी लोक हे खरे खोटे काही न म्हणता उदासीन आहेत, ते काहीच बोलत नाहीत; पण इतर काहींना ते ऐकवेना.

**चौ. ७ - (१) मिदुनि कान करिं** - ती रामभक्ताची, राजपुत्राची निंदा कानात पडू नये म्हणून कोणी कानांवर हात दिले, कानांत बोटे घातली व दातांनी जीभ चावली. जीभ चावणे **ही आश्चर्यमुद्रा आहे.** भाव हा की असे भलतेच काय बोलता? **'संत शंभु मापति अपवादा। ऐकती तेथें अशि मर्यादा ॥ जीभ कापण्या शक्त असावे। ना तर कानां मिदुनि पळावें।** (१।६४।३-४) असले भाषण करणे व ऐकणे मोठे पाप आहे. भरत संत आहेत हे येथे दाखविले.

**चौ. ८ - (१) 'असे वदतां सुकृतांसी नाश' होय** - सर्व सुकृतांचा, पुण्यसंग्रहाचा नाश तर होतोच; पण ही भरताची निंदा घडली; कारण त्याने हा दोष केलेला नाही. 'होति उलूक संतनिंदारत' (७।१२१।२६). 'परनिंदा अघ अधिक गिरीशा'. हे येथे दाखविले की शहाणे, विचारवंत लोक भरताचा स्वभाव चांगला जाणतात. राजाला दोष दिले त्या वेळी हे लोक असे म्हणाले नाहीत. असलेल्या किंवा घडलेल्या दोषांचे वर्णन म्हणजे निंदा नाही. ते दोष वर्णन आहे. ते सुद्धा मोठे पाप असले तरी परनिंदा व संतनिंदा यांच्या इतके घोर नाही. **(क) 'तुज हें संमत' जे जगिं म्हणती। ते स्वप्निं न सुख सुगति पावती।** (१६९।४) **कौसल्या भरतास म्हणाली. 'मनिं आणति कुटिलता तुम्हांवर। करिति लोक ते घाता इह पर'** (२६३।७) असे श्रीरघुनाथ भरतास म्हणाले. यावरून ठरले की हे बोलणारे लोक भरताच्या पक्षाचे नाहीत. जी कुकल्पना काही नगरलोकांच्या मनात आली, ती कौसल्येच्या हृदयास शिवली देखील नाही. सावत्र मुलाचा भरताचा स्वभाव कौसल्येला व काही नगरजनांनासुद्धा कळला पण स्वतःच्या पुत्राचा स्वभाव मोहांध कैकयीला कळला नाही ! **(ख)** प्राणप्रिय ही राम भरतासी - या विषयी पूर्वी लिहिले गेले आहे. आता काही लोक भरताविषयी आपले मत ठासून सांगतात :

***हिं.दो.*** *। चंदु चवै बरु अनल कन सुधा होइ बिषतूल ॥*
*॥ सपनेहुँ कबहुँ न करहिं कछु भरतु राम प्रतिकूल ॥४८॥*

म.दो. *। स्रवे चंद्र जरि अनल कण बिषसम होइ सुधा हि ॥*
*॥ स्वप्निं न कधिं करिती भरत रामाविरुद्ध कांही ॥४८॥*

**अर्थ :** चंद्र जरी अग्निकणांचा (ठिणग्यांचा) वर्षाव करू लागला आणि (ही) सुधा विषासारखी झाली तरीही भरत कधीं स्वप्नांतसुद्धा रामाच्या विरुद्ध काही करणार नाहीत ॥४८॥

**टीका :** (१) भरताची निंदा करणारा एक वर्ग, उदासीन राहून ऐकणारा दुसरा वर्ग, भरताची निंदा सहन न होऊन भरतास राम प्राणप्रिय आहेत असे सांगणारा तिसरा वर्ग पूर्वी सांगितला. आता हा चौथा वर्ग म्हणतो की कधीही न संभवणाऱ्या गोष्टी संभवल्या, घडल्या तरी भरत रामविरोध करणार नाहीत. हे अधम, कनिष्ठ, मध्यम व उत्तम असे चार वर्ग जनस्वभावाचे दाखविले. हा वाच्यार्थ झाला; पण येथे गूढार्थ नसेल तर गोस्वामींचे वैशिष्ट ते काय?

(२) **गूढार्थ - 'अनल जरी प्रगटला हिमांतुनि । विमुख राम सुख पावे ना कुणि'** (७।१२२।१९) 'हरिं नरा भजंति येऽति दुस्तरं तरंति ते' हे दोन सिद्धान्त भरतास पूर्णपणे माहीत आहेत व भरत रामभक्त आहेत हे या मर्मज्ञ लोकांस माहीत आहे. राम परमात्मा आहेत हे या लोकांस कळले आहे हे येथे सुचविले आहे. वरील उ.कां. चौपाईत **'हिम'** शब्द आहे तर येथे चंद्र = हिमांशु, हिमकर आहे. दोघांचा स्वभाव एकच. **हा दोहा वरील चौपाईचे कमल आहे.**

(३) **चंद्र कोण व सुधा कोण** हे मानसांतील आधारांनी ठरविणे जरूर आहे. भरताला कुटील, रामद्रोही म्हणणारा एक वर्ग वर दाखविलाच आहे. भरत म्हणतात, **'मला कुटिल जरी राम समजले' स्वामि - गुरुद्रोही जग वदलें ॥ सीताराम चरणरति अनुपम । तुझ्या कृपें वाढो अनुदिन मम ॥ न करो स्मरणा जलद जन्मभर । जल याचित पवि वर्षो प्रस्तर ॥ चातकघोष घटे तर दूषण । प्रेम वाढतां सर्व भलेपणा** । (२०५।१-४) रामचंद्र मला कुटिल समजणार नाहीत; पण जरी कदाचित समजले तरी माझे सीताराम प्रेम रात्रंदिवस वाढावे असे भरत म्हणतात. मेघाने चातकाला कुटिल मानला म्हणजे तो त्याच्यावर पवि = वज्र, वीज व पाषाण = गारा यांचा वर्षाव करू शकेल व जरी केला तरी चातकाचे प्रेम कमी होता नये; ते वाढले पाहिजे. म्हणून हे निश्चित ठरले की **राम = चंद्र;** 'प्रगट ×××

**रघुपति शशि चारु । विश्व सुखद खल कमल तुषारू**' (१।१६।५) तुषार = **हिम. 'अनल जरी प्रगटला हिमांतुनि ।** विमुख राम सुख पावेना कुणि' **अग्निकण, अग्नि, वर्षणे म्हणजे कुटिल समजून दंड शिक्षा करणे.** या शिक्षेबद्दल भरत काय म्हणतात पहा - **'रामसिता लक्ष्मण मम नांवा । श्रवुनि न जाती त्यजुनि किं ठावा ॥ मातृमतीं मज मानुनी थोडें जें करितील** ॥२३३॥ **'त्यागिति जरि मन मलिन समजुनी ॥' 'राम-उपानह सुशरण मजला? स्वामी राम शुभ, दोष जनाला** ॥ (२३४।१-२). कुटिल समजून त्याग करणे म्हणजेच चंद्राने वन्हिकणांचा, अग्नीचा वर्षाव करणे. म्हणून त्या लोकांचा भाव हा की भरताला कुटिल मानून रामचंद्रांनी जरी त्यांचा त्याग केला तरी भरत रामचंद्रांस वाईटसुद्धा म्हणणार नाहीत. 'स्वामि राम शुभ' व आपण स्वतःच दोषी, वाईट आहोत असे भरत म्हणतील. मग राम विरोध, रामप्रतिकूल वर्तन त्यांच्याकडून कसे घडेल?

**(क) सुधा कोण? व विष कोणते? - 'सुधा त्यजुनि विष चाखुं पाहते'** (४७।३) हे कैकयी विषयीच म्हटले आहे. रामराज्याभिषेक कधी करणार म्हणून राजाला विचारणारी, रामावर प्राणांसारखे प्रेम करणारी **'स्नेह विशेष करिति माझ्यावर' 'रामतिलक जर सत्व सकाळीं देउं माग वाटे तें आली'** (१५।४) अशी **'रामस्नेहसुधे** (१८४।१) मध्ये परमसुख मानणारी रामस्नेहसुधा जिच्याजवळ होती ती कैकयी विषासारखी झाली नाही काय? 'लोक वियोग - विषम - विषिं जळतां (१८४।२). रामवियोग, रामवनवास हेच घोर विष. रामस्नेहरूपी सुधा असलेली कैकयी जरी रामविरहविषरूप बनली असली व तिचा पुत्र भरत असले तरी ते रामविरोधी बनणार नाहीत. 'मातृमतीं मज मानुनी' (२३३) पहा. मातेला पुत्र अनुकूल असणार, आईसारखाच असणार, असा सर्वसाधारण समज असला तरी ती गोष्ट भरतांच्या बाबतीत अशक्य आहे. मानसाधारे निःसंदेहपणे ठरले की कैकयीचा रामस्नेह, रामप्रीती म्हणजे सुधा व रामवनवास, रामवियोग म्हणजे जालीम विष.

**ल.ठे.** - या प्रमाणे भरताच्या चरित्राचे सारसर्वस्व या दोह्यांत भरून ठेवले की नाही हे वाचकांनीच ठरवावे. भरत मातृविरोधी होतील. पण रामविरोधी होणार नाहीत. आता या विलाप वर्णनाचा उपसंहार करतील :

*हिं. । एक बिधातहि दूषनु देहीं । सुधा देखाइ दीन्ह बिषु जेहीं ॥१॥*
*। खरभरु नगर सोचु सब काहू । दुसह दाहु उर मिटा उछाहू ॥२॥*
*म. । एक विधात्या देती दूषण । सुधा दाखवुनि दे विष उल्बण ॥१॥*
*। तंव खळबळ पुरिं सशोक सर्वहि । दुसह दाह हृदिं, गत उत्साहहि ॥२॥*

**अर्थ :** कोणी ब्रह्मदेवाला दोष देतात की त्याने सुधा दाखवून घोर विष दिले ॥१॥ तेव्हा नगरात सर्वत्र खळबळ उडाली असून सर्वच शोक (चिंतादी) करीत आहेत; (सर्वांच्या) हृदयांत दुःसह दाह होत असून (सर्व) उत्साह पार मावळला आहे.॥२॥

**टीका. चौ. १** - (१) विधिने असुनी मेळ बिघडिला (४७।१) व 'विधी ऐकवुनि काय ऐकवी' (४८।१) या पूर्वी केलेल्या उपक्रमांचा येथे उपसंहार केला. पहिल्या दहा ओळींत विलापांत कैकयीचे वर्णन केले व नंतरच्या दहा ओळींत दशरथ व भरत यांचे वर्णन केले व येथे २१ व्या ओळींत उपसंहार केला. रामराज्याभिषेक, रामस्नेहरूपी सुधा दाखवून रामवनवास, रामविरहरूपी विष विधीने चाखविले, दिले. याला कारण रामस्नेहसुधामय असलेली कैकयी रामविरहविषदायक विषमय बनली.

**ल.ठे.** - मागील दोहा पूर्ण झाल्यानंतर मुद्दाम एकच चौपाई घालून तिच्यात मागील विलाप-विषयाचा उपसंहार का केला? नवीन विषय का सुरू केला नाही अशी शंका आली व एक गूढ उकलण्याचे साधन सहज मिळाले. (१) विलापवर्णन अशा प्रकारे २१ व्या ओळींत व भरत रामविरोध करणार नाहीच पण मातृविरोध करील या वर्णनानंतर का? याचे उत्तर हेच की राम वनवासात निघण्याच्या दिवसापासून २१ व्या दिवशी लोकांस कळले की भरत रामविरोधी नसून या बाबतीत मातृविरोधी आहे. असेच कशावरून? I पूर्वी टीकेत (५/७) दाखविले आहे की रामवनवास दिवसापासून **साहव्या दिवशी दशरथांचे मरण** घडले. II ते रात्री घडते व सकाळी वसिष्ठ येऊन त्यांनी भरतास आणण्यासाठी **दूत पाठविले. सातव्या दिवशी.** III वा. रा. पाहता दूत घोड्यांवर बसून गेले आहेत; पण जाण्यास त्यांस किती दिवस लागले हा उल्लेख नाही; तथापि भरत मामाकडून निघाल्यापासून **सात रात्री वाटेत मुक्काम करून** म्हणजे आठव्या दिवशी अयोध्येत

आले आहेत. म्हणून **दूतांना जाण्यास ७ दिवस** लागले असले पाहिजेत. IV या प्रमाणे ६ रात्री वनवासापासून दशरथ मरणापर्यंत + ७ रात्री दूतांना वाटेत लागल्या + ७ रात्री भरतास येताना वाटेत लागल्या = **२० रात्री उलटून गेल्यावर २१ वे दिवशी भरत अयोध्येत आले.** अयोध्यां मनुना राज्ञा निर्मितां संददर्श ह तां पुरीं पुरुष व्याघ्रः सप्तरात्रोषितः पथि ॥ (वा.रा. २।७१।१८). आले त्याच दिवशी मातृविरोधी बनले व रामविरोधी मुळीच नाहीत हे सिद्ध झाले आहे. अधम कनिष्ठ वर्गातल्या लोकांचा भरताविषयीचा गैरसमज २१ व्या दिवशी दूर होईल आणि मध्यम व उत्तम लोकांचे म्हणणे खरे झाल्याचे प्रत्ययास येईल हे दाखविण्यासाठी २१ व्या ओळींत, भरतस्वभाव वर्णनानंतर उपसंहार केला. (क) पुढे सुचवितात की २२ व्या दिवशी दशरथांच्या **देहाचा** दहन संस्कार होईल. भरत आले ती रात्र कौसल्येच्या महालात शोकविलापात गेली आहे. 'यापरिं करतां विलाप भारी बसल्या सरली रात्रच सारी' (१६९।६). अशा अनेक मजा करून ठेवलेल्या सापडल्या म्हणजे मोठे कौतुक वाटते.

**चौ.** २ - (१) ४६ व्या दोह्यांत सांगितले की करुणारसाच्या सेनेने अयोध्येवर स्वारी केली. नंतर शोकविलापांचे वर्णन मागील चौपाईपर्यंत केले. मागील ४६ व्या चा संदर्भ लक्षात घेऊन येथे अर्थ केला पाहिजे. (क) तंव- तेव्हा, करुणारसाच्या सेनेने अकस्मात नगर ताब्यात घेतले तेव्हा. या अर्थाचा शब्द मुळात नाही. पण पूर्व संदर्भ सुचविण्यासाठी घातला गेला. (ख) **खळबळ पुरिं** - शत्रूच्या सेनेने चारी बाजूंनी अकस्मात हल्ला केला की नगरात खळबळ उडणारच. हा हल्ला वीररसाने केला असता तर उत्साह वाढला असता. परंतु शूरवीरांचे अप्रतिम नगर असून करुणारसाच्या सेनेने सर्वांना सशोक - शोकाकुल करून टाकले व वीररसाचा जो स्थायी भाव तो **'गत उत्साहही'** - पार मावळला, दिसेनासा झाला व सर्वांच्या हृदयांत दुःसह दाह झाला. (ग) **ही चौपाई दशरथांची दाहक्रिया** (दहन संस्कार) **सूचक आहे.** त्या दिवशी म्हणजे भरत आल्यावर दुसऱ्या दिवशी या चौपाईत वर्णिल्या प्रमाणे स्थिति सर्व नगरात असेल की नाही याचा विचार करावा. पुढील चौपाईपासून थोडे निराळे प्रकरण सुरू होत आहे. कैकयी व तिच्या प्रिय मैत्रिणी यांच्या भेटीचे वर्णन आता सुरू होते.

हिं. *। विप्रबधू कुलमान्य जठेरी । जे प्रिय परम कैकयी केरी ॥३॥*
*। लगीं देन सिख सीलु सराही । बचन बान सम लागहिं ताही ॥४॥*
*। भरतु न मोहि प्रिय राम समाना । सदा कहहु यहु सबु जगु जाना ॥५॥*
*। करहु राम पर सहज सनेहू । केहिं अपराध आजु बनु देहू ॥६॥*

म. *। कुलमान्या वृद्धा द्विजनारी । ज्या ज्या कैकयिला प्रिय भारी ॥३॥*
*। स्तवुनि सुशीला प्रबोधुं लागति । वचन बाणसम तिजला वाटति ॥४॥*
*। 'प्रिय न भरत रामासम माला' । सदा वदा नी विदित जगाला ॥५॥*
*। रामिं सहज तुम्हिं करतां स्नेहा । काय गुन्हा देतां वनगेहा ॥६॥*

**अर्थ** : उत्तम (प्रतिष्ठित) कुळातल्या सन्मान्य वृद्ध स्त्रिया व ब्राह्मणांच्या स्त्रिया ज्या ज्या कैकयीला फार प्रिय आहेत.॥३॥ त्या कैकयीच्या सुस्वभावाची प्रशंसा करून तिला उपदेश करू लागल्या; पण त्यांची वचने तिला बाणांसारखी वाटू लागली ॥४॥ भरत मला रामाच्या सारखा प्रिय नाही असे तुम्ही नेहमी म्हणत असता, आणि सर्व जगही जाणते ॥५॥ तुम्ही रामावर सहज स्नेह करीत असून असा काय गुन्हा (त्यांनी केला) की तुम्ही त्यांस वनवास देता (वनात राहण्यास धाडता)? ॥६॥

**टीका. चौ. - ३ (१) कुलमान्या** - रघुकुलांतील व क्षत्रिय कुळातील सन्मान्य स्त्रिया, **वृद्धा** हे कुलमान्यांचे विशेष घेणेच इष्ट आहे. **द्विजनारी** - विप्रस्त्रिया. या सर्व कैकयीला **भारी प्रिय** - फार आवडत्या, फार प्रेमातल्या, नसत्या तर अशा राणीची समजूत घालण्यास अशा प्रसंगी तिच्याकडे गेल्या असत्या कशाला? वैश्य स्त्रिया व दासी यांचे बरोबरीचे किंवा श्रेष्ठ नाते नसल्याने त्या जाणे शक्य नाही. ल.ठे. अशा प्रसंगी सुहृदांचे कर्तव्य काय व ते कसे पार पाडावे हे या छोट्याशा प्रकरणात दाखवीत आहेत.

**चौ. ४ - (१) सीलु (हिं.)** = शील - **सुशील** - सुस्वभाव असा अर्थ करणेच येथे इष्ट आहे. प्रशंसा, स्तुती करण्यात इतकाच हेतु आहे की विरोध करण्यास, किंवा निंदा करण्यास आल्या आहेत असे तिला वाटू नये. या वृद्ध सन्मान्य स्त्रिया जी प्रशंसा करणार आहे तो तोंडपुजेपणा नसून कैकयीच्या कालपर्यंतच्या चरित्राचे कोमल, सुंदर व यथार्थ चित्र तिच्यापुढे व जगापुढे

मांडण्यासाठी काढीत आहेत. प्रेमळ मैत्रिणींचे कर्तव्यच या स्त्रिया करीत आहेत. सर्वांवरच्या विपत्ती टळाव्या, आपल्या सुस्वभावी, प्रेमळ मैत्रिणीच्या चरित्राला चिरंतन कलंक लागू नये व तिचा विनाश होऊ नये या सद्हेतूनेच त्या समजूत घालीत आहेत. ४।७।४.५ पहा. दुर्दैवाने एखादी सुशील व्यक्ती, भलत्याच विकाराला वश झाली म्हणजे पूर्वचरित्राचे, शीलाचे व पूर्वपरिस्थितीचे विस्मरण होते व वात झालेल्या किंवा भुताने झपाटलेल्या व्यक्तीप्रमाणे एखादे विक्षिप्त वेड, हट्ट, धरून बसते.

(२) **वचन बाणसम बाटति** - आपली सत्य प्रशंसा केलेली ऐकून साधारण, प्रापंचिक माणसांस, आणि विशेषतः सत्ताधारी, धनाढ्य व्यक्तींस आनंद होतो; पण आज उजाडण्यापूर्वी भाटादिकांनी केलेली स्तुती दशरथांस जशी बाणांसारखी क्लेश-दुःखदायक वाटली तशीच पण प्रेमाने, निःस्वार्थ बुद्धीने, सखीहित साधून अहित निवारण करण्यासाठी, कर्तव्य म्हणून केलेली ही स्तुती तिला बाणांसारखी बोचू लागली. तिने ओळखले की या माझी समजूत घालून माझ्या निश्चयांत परिवर्तन करण्यासाठी आलेल्या आहेत; पण परमप्रिय मैत्रिणी व ब्राह्मण स्त्रिया असल्याने व प्रजेत विरोध उत्पन्न होऊ द्यावयाचा नसल्याने ती उलट विषारी बाण सोडू शकत नाही. इतर कोणी स्त्रिया असत्या तर दासींकडून हाकलून लावल्या असत्या.

**चौ. ५-६ (१) प्रिय न भरत रामासम** - रामाला वनात धाडू नका हीच मुख्य गोष्ट सांगावयाची असल्याने प्रथम रामसंबंधाचाच उल्लेख केला. भरत मला रामासारखा प्रिय नाही असे तुम्ही काल-परवापर्यंत म्हणत होता व त्या प्रमाणे तुमचं वागणंही होतं, हे आम्ही स्वतः व अनेकांनी प्रत्यक्ष अनुभवलं आहे. असं असून आज अगदी उलटच कसं घडले? असे मैत्रिणी विचारतात तिला. मुख्य आगलावी कुबडी आहे हे यांना किंवा इतर कोणास ठाऊक नाही. कैकयी काही बोलत नाही असे पाहून आणखी विचारतात की ज्या **रामावर तुमचा सहज स्नेह होता** ते राम एका रात्रीत तुम्हाला इतके अप्रिय कसे झाले? रामचंद्रांनी असा काही मोठा गुन्हा - घोर अपराध - केला की काय की १४ वर्षे वनवासाची घोर शिक्षा करून १४ वर्षे त्यांचे मुखदर्शन करू नये असे

तुम्हाला वाटले? (क) दशरथांनी असाच रामापराध तिला विचारला. रामचंद्रांनी अपराध विचारलाच पण तिच्याविरुद्ध केलेलाच नव्हे इतकेच. त्यांच्या म्हणण्यातील भाव हा की अपराध केला असला तरी शिक्षा देणारे राजे समर्थ आहेत. स्वतःच कायदा हातात घेऊन घराला, कुळाला व सर्व नगरीला दुःखाच्या आगीत लोटणं स्वहिताचे नाही.

हिं. *। कबहुँ न कियहु सवति आरेसू । प्रीति प्रतीति जान सब देसू ॥७॥*
*। कौसल्याँ अब काह बिगारा । तुम्ह जेहि लागि बज्र पुर पारा ॥८॥*

दो. *। सीय कि पिय सँगु परिहरिहि । लखनु कि रहिहहिं धाम ॥*
*। राजु कि भूँजब भरत पुर नृपु कि जिइहि बिनु राम ॥४९॥*

म. *। कधिंहि न सवतीमत्सर करितां । देशा प्रीती प्रतीति विदिता ॥७॥*
*। कौसल्या करि काय बिघाडा । ज्यास्तव वज्र तुम्हीं पुरिं पाडा ॥८॥*

दो. *। सीता सोडि किं पतिपदां त्यजि न किं लक्ष्मण धाम ।*
*॥ पुरिराज्य किं भोगिति भरत नृप किं जगति विण राम ॥४९॥*

**अर्थ :** तुम्ही कधीही सवतीमत्सर केला नाहीत व तुमची परस्पर प्रीति व एकमेकांवरील विश्वास सर्व देशाला विदित आहे.॥७॥ आताच कौसल्येने असा काय बिघाड केला की ज्यामुळे तुम्ही सगळ्या अयोध्येवर वज्रपात केलात?॥८॥ सीता का रामचरणांना सोडून राहणार आहे? लक्ष्मण घर सोडल्यावाचून राहील काय? भरत का अयोध्येचे राज्य भोगणार आहेत? आणि महाराजा रामाशिवाय का जगणार आहेत?॥दो.४९॥

**टीका. - चौ. ८ (१) कधिंहि न सवती मत्सर करितां** - रामाचा अपराध काहीच सांगत नाही यावरून स्त्रियांनी ताडले की मूळ कारण राम नसून सवतीमत्सर कारण आहे; म्हणून म्हणतात की तुमची, सर्व राण्यांची, परस्पर पूर्णप्रीति होती व पूर्ण विश्वास होता. हे सर्व देशाला माहीत आहे. तुमच्यात कधीच द्वेष, मत्सर, वैर इ. काही नव्हते कालपर्यंत. आजच तुम्ही कौसल्येविरुद्ध उठलेल्या दिसता. तेव्हा त्यांनी असा कोणता अपराध केला? केला असल्यास सांगा, म्हणजे चौकशी करता-करविता येईल. अपराध नाही सांगितलात तर आम्ही समजू की त्यांनी काहीही अपराध केला नाही. जरी केला असला तरी

त्याला एवढी भयंकर शिक्षा? आणि सर्व नगरीलासुद्धा भयंकर शिक्षा? हा केवळ वज्राघातच अयोध्येवर केला म्हणायचा. हे तुमच्या नावाला, कुळाला, तुमच्या मोठेपणाला व तुम्हाला शोभतं का? बरं एकट्या कौसल्या राणीच्या मत्सराने रघुनाथास वनात धाडल्याने परिणाम काय होतील याचा चांगला विचार तरी केलात का? काय होईल ते आम्ही सांगतो :

**दो.** (१) सीता रामचंद्रांबरोबर वनात गेल्याशिवाय राहणार नाही; आणि लक्ष्मण रामास सोडून घरी राहतील असे तुम्हाला तरी वाटते का? जिकडे राम तिकडे लक्ष्मण जाणारच. रामलक्ष्मण वनात गेल्यावर भरत आले की ते अयोध्येचे राज्य स्वीकारतील असे तुम्हाला वाटतं की काय? तेही घडणे शक्य नाही. फार काय ते घरी राहिले तर नशीब? बरे सर्वात अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे, राम वनात गेल्यावर दशरथ महाराज जगतील असे तुम्हाला वाटते तरी कसे? ते जगणे शक्य नाही. हे घडणे योग्य आहे का? राजांचा स्वभाव तुम्हाला चांगलाच माहीत असून या गोष्टीचा तरी विचार कसा नाही केलात?

*हिं । अस बिचारि उर छाड़हु कोहू । सोक कलंक कोठि जनि होहू ॥१॥*
*। भरतहि अवसि देहु जुवराजू । कानन काह राम कर काजू ॥२॥*
*। नाहिन रामु राज के भूखे । धरम धुरीन बिषय रस, रूखे ॥३॥*
*। गुर गृह बसहुँ राम तजि गेहू । नृप सन अस बर दूसर लेहू ॥४॥*
*। जौं नहिं लगिहहु कहें हमारे । नहिं लागिहि कछु हाथ तुम्हारे ॥५॥*

*म. । या सुविचारें रोषा त्यजणे । शोक-कलंक-कोठि ना बनणे ॥१॥*
*। भरत अवश्य करा युवराजा । रामा कानन कवणे काजा?॥२॥*
*। राम नसति मुळिं राज्यबुभूक्षू । धर्मधुरीण विषयरस - रुक्षू ॥३॥*
*। भवनिं न राम वसो गुरुगेहां । दुसरा वर मागुन घेणें हा ॥४॥*
*। जर माना ना वचन आमचें । करिं लागेल न काहीं तुमचे ॥५॥*

**अर्थ :** असा सुविचार करून क्रोध सोडा आणि शोक व कलंक यांची कोठी नका होऊ ॥१॥ भरताला युवराजा जरुर जरुर करा, पण रामाला वनात धाडण्याचे काम काय (काय आवश्यकता)?॥२॥ रामचंद्रांना राज्याची मुळीसुद्धा भूक-भोगेच्छा नाही; ते धर्म धुरंधर असून विषयभोगांच्या ठिकाणी अगदी विरक्त-उदासीन-रुक्ष

आहेत.॥३॥ (तेव्हा) दुसरा वर असा मागून घ्या की रामचंद्रांनी घरी न राहता गुरुगृही रहावे (राज्याचा त्याग करावा) ॥४॥ आमचे (हे) सांगणे जर तुम्ही मानले नाहीत तर तुमच्या हाती काहीसुद्धा लागणार नाही; (हे नक्की समजा)॥५॥

**टीका. - चौ. १ - (२) या सुविचारें** - या = वरील दोह्यांत सांगितलेल्या - ज्या भरताला राज्य मिळावे व ते निष्कंटक व्हावे म्हणून आटापिटा चालला आहे तो रामप्रेमी भरत, रामलक्ष्मण वनात गेल्यावर राज्य करील का नाही करणार? व दशरथ महाराज, स्वतःचा प्रेमळ पती, जगेल का नाही या गोष्टींचा चांगला विचार करा. दशरथ मरण पावल्यावर भरताने राज्याचा स्वीकार केला नाही की असलेले सौभाग्य व सत्ता हातची जाईल, नवीन सत्ता हाती येणार नाही व कोणी तुम्हाला विचारणार नाही. या गोष्टींचा विचार करा आणि सुविचाराने वागा. अर्थात सर्व विनाशाचे मूळ राम वनवास मागू नका. **(क) रोषा त्यजणें** - पण जोपर्यंत तुमचे चित्त क्रोधाने संतप्त झालेले आहे तो पर्यंत तुम्हाला सुविचार, सुविवेक करता येणार नाही म्हणून तो प्रथम सोडा. ती त्यांना रोषाने फुगलेली दिसली म्हणून हे सांगितले. **(ख) शोक कलंक कोठि ना बनणें** - रोष सोडून सुविचार केला नाहीत तर जिवंतपणी शोक व पश्चात्ताप करावा लागेल आणि तुमच्या नावाला लागलेला कलंक मेल्यावरसुद्धा जाणार नाही. कोठी = साठवण; कोठार - कोठी; कुबडीला शारदेने अपयशाची पेटी बनविली. त्या पेटीच्या संगतीने भोळी कैकयी शोककोठी व कलंक कोठी बनत आहे. कलंक कोठी बनली आहेच.

**चौ. २ - (१) भरत करा युवराजा** - भरताला राज्य देऊ नका असे आम्ही मुळीच म्हणत नाही; कारण भरतास राज्य दिल्याने काही अनर्थ होणार नाही, हानी होणार नाही; पण राम वनात गेल्याने तुमचा किंवा भरताचा फायदा तरी काय? काहीच नाही, उलट राम वनात गेल्यास काय दुष्परिणाम होतील ते आम्ही सांगितलेच. राम भरताचे वैरी बनतील अशा भीतीने का रामवनवास मागितलात? पण तशी भीती वाटण्याचे मुळीच कारण नाही, कारण :

**चौ. ३-४ (१) राम नसति मुळिं राज्यबुभुक्षू** - त्यांना राज्यभोगाची लालसा मुळीच नाही, उलट व्यावहारिक उपाधींचा त्यांना मनापासून कंटाळा आहे;

विषयरस त्यांना अगदी रुक्ष वाटतो; म्हणजेच राम अत्यंत विरक्त आहेत; म्हणून भरताला राज्य दिल्याने त्यांना मनापासून आनंदच वाटेल. म्हणून भरताच्या राज्याला रामचंद्रांपासून मुळीच धोका नाही. **(क)** तुम्हालाच राम डोळ्यांसमोर नकोसे झाले असले तर त्यांनी अयोध्येत प्रवेश करू नये व अयोध्येच्या बाहेर वसिष्ठ गुरुंच्या आश्रमात रहावे असा दुसरा वर बदलून घ्या म्हणजे झाले. या मागण्यांना महाराजा व प्रजासुद्धा मुळीच विरोध करणार नाहीत; आणि सर्व अनर्थ टळेल. भरतराज्य चालू होईल. महाराज मरणार नाहीत. तुमचं सौभाग्य राहील व प्रजेलाही दुःख होणार नाही. **(ख) वसिष्ठाश्रम** अयोध्येच्या बाहेर दक्षिण दिशेला होता असे वा.रा. वरून ठरते. (२।१४।२६ पहा.)

**चौ. ५ -** (१) कैकयीच्या मुद्रेत काही अनुकूल फरक पडलेला नाहीच दिसला पण भिवया जास्तच चढलेल्या व कपाळाला आठ्या पडलेल्या दिसल्या म्हणून या स्त्रियाही खऱ्या हितचिंतकाप्रमाणे जरा चढत्या सुरात निक्षून बजावतात की आम्ही सांगितले तसे केलेत तर भरतराज्य मिळेल व सौभाग्य राहील; नाहीतर तेल ना तूप हाती धुपाटणे अशी गत होईल व पाठीमागून पश्चात्ताप करून काही उपयोग होणार नाही. असलेली सत्ता, सौभाग्य व पुत्रप्रेम गमावून बसाल व कोणास तोंड दाखविण्यास जागा उरणार नाही. तुम्ही आपल्या हातांनी आपले नाक कापून घेऊन दुसऱ्यांस अपशकून करण्याइतक्या मूर्ख असाल असे आम्हाला अजून वाटत नाही; तरी :

*हिं.* *। जौं परिहास कीन्हि कछु होई । तौ कहि प्रगट जनावहु सोई ॥६॥*
*। राम सरिस सुत कानन जोगू । काह कहिहि सुनि तुम्ह कहुँ लोगू ॥७॥*
*। उठहु बेगि सोइ करहु उपाई । जेहि बिधि सोकु कलंकु नसाई ॥८॥*

*म.* *। जर असेल केला परिहास किं । प्रगट करुनि सांगावें त्यास किं ॥६॥*
*। रामसदृश सुत योग्य कानना ! । श्रवुनि काय जन म्हणति आपणां ॥७॥*
*। शीघ्र उठा त्या करा उपाया । शोक-कलंका शक्त पुसाया ॥८॥*

**अर्थ :** जर ही काही थट्टाच केली असेल तर आता तसे स्पष्टपणे उघड करून सांगा।।६।। रामासारखा पुत्र काय वनवासात पाठविण्यास योग्य आहे? हे ऐकून लोक तुम्हाला काय म्हणतील?।।७।। उठा सत्वर व घाईघाईने असा

उपाय करा की जो शोक व कलंक पुसून टाळण्यास समर्थ होईल ॥८॥

**टीका. - चौ. ६ - (१) जर विनोद केला असेल** तर स्पष्टंच सांगा की मी विनोद केला. परीक्षा पाहिली, की महाराज किती सत्यवादी आहेत व राम आईबापांच्या आज्ञेचे पालन करतात की नाही. जगाला दाखवून दिले की आमचे महाराज किती सत्यनिष्ठ आहेत आणि राम किती धर्मशील, मातृपितृभक्त आहेत हे ! रामासारख्या अनुपम पुत्राला घोर काननात मी पाठवीन असे माझ्या प्रिय मैत्रिणींना व प्रजेला वाटले तरी कसे; असे उघड उघड सांगून टाका पाहू. म्हणजे जिकडे तिकडे तुमच्या नावाचा जयजयकार होईल. नगरावर पसरलेली काळाची छाया एका क्षणात नष्ट होईल व जगात तुमची कीर्ती होईल.

**चौ. ७ - (१) रामसदृश सुत योग्य कानना?** - मात्र विनोद असून न बोलण्याची वेळ संपत आली. थट्टा नसून हा तुमचा हट्टच असेल तर नीट विचार करा की रामासारखा अनुपम अलौकिक पुत्र अरण्यात हाकलून देण्याला का योग्य आहे? अपराधाशिवाय एवढी घोर शिक्षा ! नी रामासारख्या पुत्राला ! एका अत्यंत प्रेमळ मातेने ! हे ऐकून लोक तुम्हाला काय म्हणतील, काय कसकशी नावे ठेवतील, काय काय विशेषणे देतील याचा विचार तर करा व तुमच्या विषयी लोक बोलतील ते ऐकून आम्हाला किती दुःख होईल याचा विचार करा. आम्हालासुद्धा लोकांस तोंड दाखविण्यास लाज वाटेल.

**चौ. ८ - (१) शीघ्र उठा, करा उपाया** - काय करायचा असेल तो उपाय अगदी लवकर करा. राम वनात जाण्यास बाहेर पडले म्हणजे मग काही करता येणार नाही. वाटेल ते करा पण तुम्हाला व कोणालाही शोक करावा लागणार नाही आणि तुमच्या नावाला लागलेला कलंक नाहीसा होईल असे करा, त्वरेने करा, उठाच आता. आता राम वनात जाण्यास निघण्याच्या तयारीतच असतील.

**ल.ठे.** - दशरथ राजांनी ज्या ज्या पद्धतीने समजूत घातली व जे जे भाकीत केले त्याच पद्धतीने व तेच भाकीत या स्त्रियांनी, कैकयीच्या प्रिय मैत्रिणींनी केले. राम वनात गेले म्हणजे अयोध्येची कशी दुर्दशा होईल हे आता या स्त्रिया सांगतात :

***हिं. छंद*** *। जेहि भाँति सोकु कलंकु जाइ उपाय करि कुल पालही ।*
*। हठि फेरु रामहि जात बन जनि बात दूसरि चालही ॥*

*। जिमि भानु बिनु दिनु प्रान बिनु तनु चंद बिनु जिमि जामिनी ॥*

*। तिमि अवध तुलसीदास प्रभु बिनु समुझि धौं जियँ भामिनी ॥१॥*

म. छंद *। करुनी उपाय कलंक शोकां नाशि जो कुळ पाळणें ।*

*॥ वळवा हटें वनिं जात रामा गोष्ट दुसरि न काढणें ।*

*। दिन भानुविण कीं प्राणविण तन चंद्रविण जशि यामिनी ।*

*॥ तुलसी प्रभूविण तशि अयोध्या जाणणें मनिं भामिनी ॥१॥*

**अन्वय** - जो कलंकशोकांनाशि (तो) उपाय करुनी कुळ पाळणे; वनिं जात रामा हटें (हट्टें) वळवा, दुसरी गोष्ट न काढणे.

**अर्थ :** जो कलंकाचा व शोकाचा नाश करील असा उपाय करून कुळाचे पालन (रक्षण) करा; राम वनात जात असता त्यांना हट्टाने (हट्ट धरून) परत वळवा; दुसरे काही बोलूच नका. भानूशिवाय जसा दिवस, प्राणाशिवाय जशी तनु व चंद्राशिवाय जशी रात्र, तशीच हे भामिनी ! तुलसीदासांच्या प्रभूशिवाय (ही) अयोध्या (होईल) हे लक्षात ठेवा (जाणून घ्या). ।।छंद।।

**टीका. चरण १-२ -** (१) मागल्या चौपाईत जे सांगितले ते पुन्हा पहिल्या चरणात सांगितले; कारण ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. शोककलंक निवारणाचा जो उपाय सांगितला तो कर नाहीतर तुझ्या हाती काही न येता कुळाचा विनाश तुझ्यामुळे होईल. आता वर बदलून घेणे शक्य दिसत नाही; बराच वेळ झाला राम वनात जाण्यास निघालेसुद्धा असतील. आता साधा उपाय चालणार नाही. **(क) वनिं जाता राम हटें वळवा -** तुम्ही माता आहात; बापापेक्षा मातेचा अधिकार मोठा आहे. तुम्ही जाऊन वाटेत हट्ट धरून बसा. मी जाऊन देणार नाही तुला वनात; थट्टेने म्हणाले मी त्याचे एवढे काय? माझं नाही ऐकलेस तर माझ्यासुद्धा सर्व मातांची व भरताची शपथ आहे इ. सांगा तरच परत फिरतील. **(ख) गोष्ट दुसरि न काढणें -** वनवासाची भाषा मुळीच बोलू नका. नाहीतर अयोध्येची अशी दुर्दशा होईल.

(२) **भानुविण दिन -** सूर्योदय होऊन रात्र संपली पण अकाळी मेघांनी आकाश व्यापले की भानूचा प्रकाश मिळत नाही, भानु दिसत नाही; उष्णता कमी होते, थंडी वाढते. उदासीनता, विषण्णता वाढू लागते. **'मेघच्छन्नेऽन्हि दुर्दिनम्.'**

अशी दशा दिवसा ढवळ्या अयोध्येची होईल. रामरूपी भानुकुल भानूचे दर्शन नाही व विपत्तींचे ढग सर्वत्र भरतील. **'बागांमधिं तरु वेलि कोमजती । नदी तलाव न मुळीं पाहवति ॥८३।८॥ सकल विचार करिति सुख नाहीं । विना रामलक्ष्मण सीता ही ॥८४।५॥ विकल लोक सब पाठीं धावति'** अशी दशा पुढे झालीच आहे. **(क) प्राणविण तन** - प्राणांवाचून देह म्हणजे प्रेत, शव, ते जिथे असेल ती जागा अपवित्र, स्मशानासारखी भासते. प्राण जाण्याच्या वेळी यमकिंकर तेथे येत असतात. स्मशानात भूतपिशाचे वावरतात, तशीच अयोध्या होईल. **जणुं भूतें परिजन मसाण घर । मित्र सुहृद सुत जणुं यम किंकर** ॥८३।७॥ असे प्रत्यक्ष घडले आहे. **(ख) चंद्रविण जशि यामिनी** - यामिनि = रात्र. ज्या रात्री चंद्र मुळीच उगवत नाही अशी एकच रात्र महिन्यात येते; ती म्हणजे अमावस्येची रात्र. जिकडे तिकडे गडद अंधार पसरतो, भयानकता पसरते; चोर-दरोडेखोर, पिशाच्चे यांची भीती, मार्ग दिसत नाही. अशीच दशा अयोध्येची होईल. **'दिसे अयोध्या भीषण भारी । काळरात्र कीं जणुं अंधारीं ॥ घोर जंतु सम पुरनरनारी । बघुनि परस्पर भितात भारी'** अशी दशा अयोध्येत भरदिवसा रोज दिसू लागली. भानु निघून गेला की अंधार पडणारच.

(३) **तुलसी प्रभूविण** - 'तुलसीदास म्हणतात की, असा एक अर्थ 'तुलसी (तुलसी दास) चा करता येईल. 'तुलसीदासांच्या' प्रभूशिवाय असा दुसरा अर्थ आहे. तुलसीदासांची या विषयाशी इतकी तदाकारता झाली आहे की जणू ते या वेळी तेथे प्रत्यक्ष हजर आहेत.

***हिं.सो.*** *। सखिन्ह सिखावनु दीन्ह सुनत मधुर परिनाम हित ।*
*। तेइँ कछु कान न कीन्ह कुटिल प्रबोधी कूबरी ॥५०॥*

***म.सो.*** *। सखी करिति उपदेश श्रवणिं मधुर परिणामिं हित ॥*
*। कानिं न घे लवलेश कुटिल कुबडिनें प्रबोधित ॥५०॥*

**अर्थ :** (या प्रमाणे) सखींनी उपदेश केला. तो ऐकण्यास मधुर व परिणामीं (शेवटी) हित करणारा आहे (तरीसुद्धा) तिने जरासुद्धा कानांवर घेतला नाही; (कारण) कुटिल कुबडीने तिला पढविलेली आहे.॥दो.५०॥

**टीका.** (१) येथे हे दाखवले की एका दुष्ट, कुटिल, नीच, कुलहीन दासीच्या

उपदेशाने (प्रबोधाने) केलेला, तमोगुणी व दुर्बुद्धी झालेल्या चित्तावरील परिणाम अनेक सज्जन सखींच्या प्रेमळ, मधुर, निर्हेतुक, परमहितकारी उपदेशाने जरासुद्धा कमी झाला नाही ! हा दैव-दुर्विपाक नव्हे तर काय? **कुसंगतीने अल्पावकाशात केलेला दुष्परिणाम व दुष्ट संस्कार किती दृढमूल बनतात पहा** ! कैकयीची सुमति कुबडीच्या कपटी उपदेशाने सहज कुमति झाली; पण सखींच्या वरच्या सारख्या सदुपदेशाने काहीच बदल होऊ शकला नाही. **कवींना खेद वाटत आहे.**

हिं. *। उतरु न देइ दुसह दिस रूखी । मृगिन्ह चितव जनु बाघिनि भूखी ॥१॥*
*। ब्याधि असाधि जानि तिन्ह त्यागी । चलीं कहत मतिमंद अभागी ॥२॥*
*। राजु करत यह दैअँ बिगोई । किन्हेसि अस जस करइ न कोई ॥३॥*
*। एहि बिधि बिलपहिं पुर नर नारीं । देहिं कुचालिहि कोटिक गारीं ॥४॥*

म. *। न वदे भारि दिसे रुसलेली । बघे मृगिंस वाघीण भुकेली ॥१॥*
*। व्याधि असाध्य समजुनी त्यजती । म्हणत 'मंदमति अभागि' फिरती ॥२॥*
*। बुडविलि दैवें राज्य करित ही । हिनें कृत तसें कुणी करि नही ॥३॥*
*। विलपति यापरिं पुर-नर-नारी । देति कुचालिस गालिहि भारी ॥४॥*

**अर्थ** : (ती कुमति) काहीच बोलली नाही पण फार रुष्ट झालेली दिसली; व (जणू) अत्यंत भूक लागलेली वाघीण हरिणीकडे पाहू लागली.॥१॥ व्याधि असाध्य आहे असे समजून त्यांनी तिचा त्याग केला आणि मंदबुद्धि अभागीण आहे असे म्हणत परतल्या.॥२॥ ही चांगले राज्य करीत असता दैवाने हिला बुडवली. हिने जसे केले तसे कोणीसुद्धा करणार नाही.॥३॥ याप्रमाणे नगरातील पुरुष व स्त्रिया विलाप करीत आहेत; व या कुचाळकी करणारीला खूप शिव्या (गाली) देत आहेत.॥४॥

**टीका. : चौ. १** - (१) तिने जरी शब्दांनी काहीच उत्तर दिले नाही तरी रोषाने लाल झालेल्या चेहऱ्याने व क्रोधी तिरस्कारयुक्त दृष्टीने उत्तर दिलेच की ॥ इथ न लागे तुमची माया । व्यर्थ करां कां कुटिल उपायां ॥१॥ सखीं समजुनी दंड न करतें । कौसल्या केलें तें भरते ॥२॥ सखिनां वाटे वाघिण खाया । ये धाउनि कां वदणें वाया ॥३॥ (प्रज्ञा)

**चौ. २ - (१) व्याधि असाध्य समजुनी त्यजती - 'बघुनी व्याधि असाध्य नृप**

**पडे धरणिं पिटि माथ ॥ परम आर्त बोलत वचन राम राम रघुनाथ** (३८). असे दशरथाने केले तेथे 'व्याधि असाध्य' टी.प. यासुद्धा आर्त वचने बोलत आहेत; पण राजाप्रमाणे राम राम, न म्हणता कैकयीचे दोष वर्णन करीत आहेत. या तुलनेने दशरथांची अति व्याकुळता व शुद्ध सात्त्विक वृत्ति यांचा परिचय मिळतो. स्वतःच्या बायकोने विश्वासघात केला तरी राजाने अपशब्द उच्चारला नाही ! **(क) मतिमंद अभागी - 'मग पस्तावसि अंतिं अभागी'** दशरथ म्हणाले आहेत. (३६।८) **ल.टे. - सुहृदांचा प्रेमळ उपदेश जे माणूस मानीत नाही ते अभागी, दुर्दैवी,** विनाशाच्या प्रवाहात सापडलेले आहे असे समजावे. 'वधिल अभागी देतां उत्तर' (२।२६।६) असे रावणाविषयी मारीच म्हणाला. **'सुहृदांचे वचन न मानणें' प्र.प्र. १६।५ पहा.**

**चौ. ३ - (१) बुडविलि दैवें** - अभागी - दुर्दैवी कशी ते येथे सांगितले. दुर्बुद्धि का सुचली? याचे उत्तर दैवाने बुडवली हे दिले आहे. 'बुद्धिः कर्मानुसारिणी', 'हरि इच्छा भावी बलवान् अति' 'काळ न दण्डें कुणास वधतो । धर्म नि मति बल विचार हरतो' इत्यादी वचने वरील एका सिद्धान्तच निरनिराळ्या प्रकारे सांगतात.

**चौ. ४ - (१) विलपति यापरिं पुरनरनारी** - कैकयीला लोक शिव्या देऊ लागले असे ४७।१ मध्ये पूर्वी सांगितले व त्याचा येथे उपसंहार केला. रघुनाथास मातेच्या महालाकडे जाताना पाहिले तेव्हा शोकाला अधिक भरती आली. त्या शोकाचे वर्णन पुढील चौपायांत आहे. **(क) ल.टे.** - कैकयीला दोष देणे, शिव्या देणे इ. वर्णनात ४७।१ पासून ५१।४ पर्यंत ४८ ओळी आहेत. याने सुचविले की ४८ दिवसांपर्यंत हे कार्य कोठे ना कोठेतरी चालू राहणार. कैकयी दोषी नाही हे अधिकारी वाणीने कळेपर्यंत हे दोष देणे चालू राहिले असावे. 'तात न कैकयि दोषि, गत गिरा मतिस फिरवून' (२०६). असे भरद्वाजानी भरतांस सांगितले आहे. भरतभरद्वाज भेट ४८ व्या दिवशीच झाली आहे.

दशरथ व कैकयी-प्रियसखी यांच्या उपदेशाची तुलना

| | | |
|---|---|---|
| १. | वदती । वाणी तिज आवडती | स्तवुनि प्रबोधुं लागति |
| २. | भरता राज्यीं बसवू | भरत करा युवराजा |

| | | |
|---|---|---|
| ३. | राज्यलोभ रामा नसे | राम नसति राज्य बुभुक्षू |
| ४. | रुष परिहासिं किं खरोखर | जर असेल केला परिहास |
| ५. | वद किं राम अपराधू | काय गुन्हा देतां वनगेहा? |
| ६. | रामजननि कांहिं न सांगत | कौसल्या करि काय बिघाडा? |
| ७. | तूंही करिशी स्नेहा | रामिं तुम्हिं करतां स्नेहा |
| ८. | वच उपजवि संदेहा | काय जन म्हणति आपणां? |
| ९. | हास-रुष सोडुनी माग | या सुविचारें रोषां त्यजणें |
| १०. | वदसि कसं भलत्या रीतीं | रामसदृश सुत योग्य कानना? |
| ११. | सोडुनी प्रचिती प्रीती | देशा प्रीती प्रतीति विदिता |
| १२. | जीवन मम रामाविण नाहीं | नृप किं जगति विण राम |
| १३. | रामा राखि गमे तें कर | दुसरा वर मागुनि घेणे हा |
| १४. | अडचणिचा वर दुसरा | रामा कानन कवणे काजा? |
| १५. | बघुनी व्याधि असाध्य | व्याधि असाध्य समजुनी |
| १६. | भरत न होउं इच्छि नृपती | पुरिराज्य किं भोगिति भरत |
| १७. | विधिवश जीविं वसे कुमती | बुडविलि दैवे (हे त्या मनात म्हणाल्या आहेत.) |
| १८. | तव कलंक मम पस्तावा | शोक कलंक कोठि ना बनणें |
| १९. | पस्तावसि अंतिं अभागी | म्हणति मंदमति अभागि (आपसात म्हणाल्या) |
| २०. | भूप विलपतां प्रभात | विलपति पुरनरनारी |
| २१. | कपटपटु न काहीं वदे | न वदे - (कांहीं) |
| २२. | सरुष समीप दिसे कैकेयी | भारि दिसे रुसलेली. |

**सूचना** : डाव्या बाजूची अवतरणे ३१।४ पासून ४०।२ पर्यंत पहावी; व उजव्या बाजूची ४९।४ पासून ५१।४ पर्यंत पहावी. मात्र अगदी वरील क्रमानेच सापडणार नाहीत. तुलनेत अवतरणे संक्षिप्त दिली आहेत.

***हिं.*** *। जरहिं विषम जर लेहिं उसासा । कवनि राम बिनु जीवन आसा ॥५॥*
*। बिपुल बियोग प्रजा अकुलानी । जनु जलचर गन सूखत पानी ॥६॥*

*। अति बिषाद बस लोग लोगाई । गए मातु पहिं राम गोसाई ॥७॥*
*। मुख प्रसन्न चित चौगुन चाऊ । मिटा सोचु जनि राखै राऊ ॥८॥*
*म. । श्वास घेति जळती विषमज्वरिं । रामाविण जीवन-आशा तरि ॥५॥*
*। विपुल वियोगें प्रजा विव्हळत । जणुं जलचर-गण पाणी आटत ॥६॥*
*। विषादास वश नर नारी अति । गत गोस्वामि राम मातेप्रति ॥७॥*
*। मुखें प्रसन्न मनीं सुत्साहित । गत चिंता 'नृप नाहिं न राखित' ॥८॥*

**अर्थ :** विषमज्वराने दाह होत आहे व सर्व दीर्घ उसासे घेत आहेत. (व म्हणतात की) रामाशिवाय जीवनाची आशा तरी (कुठली)?॥५॥ अत्यंत वियोगाने प्रजा अशी विव्हळत (तळमळत) आहे की जणू पाणी आटले असता जलचरांचे समूहच ॥६॥ सर्व पुरुष व स्त्रिया विषादाला वश आहेत. (जेव्हा) स्वामी राम मातेकडे गेले.॥७॥ (तेव्हा) त्यांचे मुख प्रसन्न असून चित्तांत अत्यंत (चौगुन = चौपट) उत्साह आहे; (कारण) राजा (घरीं) ठेवीत तर नाहीत ना? ही चिंता दूर झाली.॥८॥

**टीका. - चौ. ५ (१) विषमज्वर** - या रूपकाचे सविस्तर वर्णन प्रस्तावनेत केले आहे म्हणून येथे अगदी संक्षेप करणेच योग्य आहे. विषमज्वराचे कारण - धातुमन्यतमं प्राप्य करोति विषमज्वरम् (मा.नि.) 'यः स्वादनियतात्कालात् शीतोष्णाभ्यां तथैवच ॥ वेगतश्चापि विषमो ज्वरःस विषमः स्मृतः (भालुकिना पठितम्). **त्याचे प्रकार** - सन्ततः सततोऽन्येषु स्तृतीयक चतुर्थकौ' (मा.नि.) सप्त धातूंपैकी कोणत्या तरी धातूत ज्या वेळी ज्वर जातो तेव्हा त्याचे संतत, सतत, अन्येषु, तृतीयक व चतुर्थक असे भेद आहेत. येथे ज्या विषमाचा उल्लेख केला आहे तो **संतत अन्तर्वेग असाध्य विषमज्वर आहे. संतत** - सात १०, १२, १४ वगैरे दिवस सतत राहतो तो. हा ज्वर-ताप-रोज केव्हातरी एकदाच थोडा उतरतो. (२।३४) सततज्वर दिवसातून दोन वेळा थोडा कमी होऊन पुन्हा वाढतो. (मा-नि. २।३५). (क) ही लक्षणे नगरलोकांच्या ज्वराला लाऊन पाहू. रामराज्याभिषेकाची प्रबल आशारुपी शीतलता पूर्ण होण्याच्या वेळीच रामवियोगरूपी उष्णता एकाच वेळी पराकोटीला पोचली; त्यामुळे हा ज्वर, विषमज्वर झाला. याची मुदत १४ वर्षांची आहे. चित्रकूटला गेल्यावर राम

परत येतील असे वाटताच किंचित कमी झाला; पण राम परत येत नाहीत व चित्रकूटला लोकांना राहता येत नाही असे ठरताच तो वाढला म्हणून हा संतत विषमज्वर आहे.

(२) संतत किंवा सतत विषमज्वराचे पुन्हा अन्तर्वेग व बहिर्वेग असे दोन प्रकार आहेत. येथे वर्णिलेला संतत विषमज्वर अंन्तर्वेग आहे हे मानसातील वचनांवरून अगदी निःसंदेह ठरते. अन्तर्वेग संतत विषमज्वर असाध्य असतो. उसासे घेणे, पाण्याची फार तहान, जीवनाची आशा सुटणे, आतल्या आत दुःसह दाह, बडबड, भ्रम इ. सर्व लक्षणे या लोकांच्या ठिकाणी - याच मुख्य प्रकरणात (पुरजनविरह विषाद) वर्णिली आहेत. प्रस्तावनेत विस्ताराने तुलना केली आहे. माधव निदानात लक्षणे - 'अन्तर्दाहोऽधिकः, तृष्णा प्रलापः श्वसनं क्षमः ।। संध्यास्थिशूलमस्वेदो दोषवर्चोविनिग्रहः (मा.नि. ५९) 'गंभीरतीक्ष्णगार्त ज्वरिंत परिवर्जयेत्' (सुश्रुत उ. तं. ३९) गंभीरवेग म्हणजे अंतर्वेग आणि तीक्ष्ण वेग हे असाध्य जाणून सोडून द्यावे. उपाय करू नये. अयोध्येतील लोकांना घाम आल्याचे वर्णन या प्रकरणात कोठेच नाही. माधवनिदान या सर्वमान्य ग्रंथांत वर्णिलेली एकूण एक लक्षणे येथे वर्णिलेली आहेत. श्रीतुलसीदासांच्या आयुर्वेदशास्त्राभ्यासाची सजीवसूक्ष्मता या एकाच रूपकाने व भरून ठेवलेल्या आधारांनी सिद्ध झालेली पाहून सकौतुक आश्चर्य वाटते.

(३) **श्वास घेति जळती** - जोराचे श्वास घ्यावे लागत आहेत. (१३।६।टी.प.) विरहदाह हृदयांस जाळीत आहे. 'दुसह दाह हृदिं गत उत्साहहि' (४९।२) **(क) रामाविण जीवन आशा तरि?** लोक विलाप करीत म्हणत आहेत की राम वियोग झाला की जगण्याची आशा कुठली? मरण ओढवणार?

**चौ.७ - (१) विषादास वश नरनारी अति** - वरच्या सारखा ज्वर झाल्याने त्या क्लेशामुळेच जगण्याची आशा नष्ट झाल्यामुळे अत्यंत दुःख, शोक, खेद होईल यात नवल काय? **(क) ल.ठे.** - सुमंत्राकडून रामवनवासाची वगैरे बातमी पसरल्यावर लोकांची जी दुर्दशा झाली तिचे वर्णन प्रथम केले. सुमंत्र राजद्वाराशी थांबले व राम कौसल्येकडे गेले. म्हणजेच एकीकडे ही विषारी बातमी पसरली व दुसरीकडे त्याच वेळी राम मातेकडे गेले. दोन्ही कडील परिणामांचे वर्णन

एकदम करता येणेच शक्य नसल्याने, पुरनरनारींच्या विलापादिकांचे वर्णन करून आता राममातेकडे उडणाऱ्या दुर्दशेचे वर्णन करावयाचे आहे. राम कसे गेले हे मध्ये सांगतात. **(ख) गोस्वामि** - गोसाई = इंद्रियांचे स्वामी - हृषीकेश १।६९।८ 'हृषीकेश' टी. पहावी. या एका शब्दाने व राम = 'आनंदसिंधु सुखराशी' याने उत्तम प्रकारे सुचविले की रामचंद्रांच्या मनात व इंद्रियांत माता वगैरेंना भेटून निरोप घेताना जरासुद्धा चंचलता, विकार, दोष इ. उत्पन्न होणार नाही. उलट त्यांना काय वाटले व ते कसे दिसले पहा.

**चौ.८ - (१) मुखें प्रसन्न** - मुखावर दुःख, शोक, भय, चिंता इत्यादींची छटा तर नाहीच दिसली पण मुख प्रसन्न दिसत आहे. लोकांची तोंडं सुकून कोरड पडली व स्रवती नयन, तर एकट्या रामचंद्रांचे मुख अगदी प्रसन्न ! **(क) मनीं सूत्साहित - सु + उत्साहित,** सु = अति - मनात अत्यंत उत्साह - हर्ष वाटत आहे. अवतारकार्यास प्रारंभ करताना किंवा भक्तांवर कृपा करतानाच रघुवीरांस हर्ष (उत्साह) झाला आहे व विषाद फक्त भक्तांचे दुःखादि पाहून झालेला आहे, असे मानसात स्पष्ट दिसते. 'श्रीरामजी को हर्ष' लेख मा. म. पहा. येथे अति उत्साह झाला; कारण दोन्ही कार्ये करण्यासाठी प्रयाण करावयाचे आहे. निमित्त कारण पुढील चरणांत सांगतात. **(ख) गत चिंता 'नृप नाहिं न राखित?'** दशरथ राजा वनात जाऊ नको, घरी रहा असे सांगतील की काय अशी धाकधुक वाटत होती ती गेली; म्हणून अति उत्साह वाटला, याला दृष्टान्त पुढील दोह्यांत दिला आहे. (ग) विषमज्वर रूपक कोष्टकरूपाने दाखवून मग दोहा पाहू.

## विषमज्वर रूपक (माधवनिदानोक्त) लक्षणे

| | |
|---|---|
| १. अन्तर्दाह; अधिकः | दुसह दाह हृदिं |
| २. तृष्णा | मुख सुकती |
| ३. विलापः | विलपति, शिव्या देती |
| ४. श्वसनं | श्वास घेति |
| ५. भ्रमः | भूतें परिजन, यम किंकर, दिसतात. |

| | |
|---|---|
| ६. सन्ध्यस्थिशूलम् | प्रजा विव्हळत. |
| ७. अस्वेदः (घाम नाही) | घाम आल्याचे वर्णन नाही. |
| ८. दोष वर्चो विनिग्रहः | देहप्रवृत्ति नष्ट झाल्या आहेत. |
| ९. असाध्य, परिवर्जयेत् | व्याधि असाध्य, त्यजती. |
| १०. ७।१४ दिवसादि मुदतीचा | १४ वर्षे मुदतीचा. |
| ११. थोडा कमी होऊन वाढतो. | चित्रकूटला थोडा कमी झाला, पण पुन्हा वाढला |
| १२. असाध्य - जीवनाशा नाही. | रामाविण जीवन आशा तरी ! |

प्रस्तावना पृ. ३४-३६ सविस्तर साधार विवरण केलेले पहावे.

**हिं.दो.** *। नव गयंदु रघुबीर मनु राजु अलान समान ॥*
*। छूट जानि बन गवनु सुनि उर अनंदु अधिकान ॥५१॥*

**म.दो.** *। नव गजेंद्र रघुवीर मन राज्य अलान-समान*
*॥ सुटलें जाणुनि गमन बनिं ह्रदिं आनंद महान ॥५१॥*

**अर्थ** - रघुवीराचे मन नवीन (तरुण) गजेंद्र असून राज्य आलाना (बंधनस्तंभा) सारखे आहे. वनात गमन करावयाचे हे जाणून (म्हणजे) ते बंधन सुटले असे जाणून, ह्रदयात महान आनंद झाला आहे. (अलान = आलान, हत्ती बांधण्याचा खांब).

**टीका.** (१) अलान = **आलान**; 'आलानं बंधनस्तंभः' (अमरे) येथे हत्तीला बांधण्याचा खांब, खुंटा असा अर्थ आहे. (क) **नव गजेन्द्र** - नवीनच पकडून आणलेला तरुण हत्ती, वनात स्वच्छंदतेने भटकून वन नद्यांतील डोहात विहार करणाऱ्या तरुण हत्तीला बंधनाचा तिटकारा वाटतो; ते मरणाहून दुःखद वाटते. रघुवीर मनाला राज्यबंधनात पडणे दुःखद वाटले हे पूर्वी (१०।४-८) दाखविले आहे. राज्य = आलानस्तंभः; त्या खांबाला यौवराज्याभिषेकरूपी साखळदंडाने पाय बांधले जाणार होते. शृंखला - साखळदंड येथे अध्याहृत आहे. हत्तीला बांधण्यास दृढ साखळदंड लागतोच. तसाच राज्याभिषेक संस्कार-विधि-केला गेला तरच राज्यरूपी खांबाला (मन-हत्ती) बांधला गेला असता. (ख) तें **बंधन तो,** साखळदंडच) **सुटलें** म्हणजे त्या हत्तीला अपार आनंद होतो व तो जसा अति

उत्साहाने उड्या मारीत वनात निघून जातो (पळ काढतो) त्या प्रमाणेच राज्याभिषेक साखळदंडाने राज्यरूपी खुंट्याला बांधीत नाहीत व वनात जावयाचे आहे हे कळताच रघुवीराच्या मनात अपार आनंद झाला; व त्यामुळे अत्यंत उत्साहाने प्रसन्न मुखाने मातेकडे जात आहेत.

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या कांड अध्याय ५ वा समाप्त.***

●●●

# अध्याय ६ वा

## कौसल्या - रघुनाथ संवाद (५२।१ ते ६०)

हिं. *। रघुकुलतिलक जोरि दोउ हाथा । मुदित मातु पद नायउ माथा ॥१॥*
*। दीन्हि असीस लाइ उर लीन्हे । भूषन बसन निछावरि कीन्हे ॥२॥*
*। बार बार मुख चुंबति माता । नयन नेह जलु पुलकित गाता ॥३॥*
*। गोद राखि पुनि हृदयँ लगाए । स्रवत प्रेमरस पयद सुहाए ॥४॥*
*। प्रेमु प्रमोदु न कछु कहि जाई । रंक धनद पदवी जनु पाई ॥५॥*

म. *। रघुकुल-तिलक जोडुनी हातां । मुदित मातृपदिं ठेविति माथा ॥१॥*
*। दे आशीर्वच धरि हृदयासी । ओवाळी भूषण - वसनांसी ॥२॥*
*। वारंवार माय मुख चुंबित । स्नेह-नीर नयनीं तनु पुलकित ॥३॥*
*। घे मांडीवर दे आलिंगन । झरे प्रेमरस पयोदिं शोभन ॥४॥*
*। प्रेमा प्रमोद नाहिं वर्णवत । रंक धनद-पदवी जणुं पावत ॥५॥*

**अर्थ :** रघुकुळतिलकांनी दोन्ही हात जोडले व आनंदाने मातेच्या पायांवर मस्तक ठेवले.॥१॥ तिने आशीर्वाद दिले व त्यांस हृदयाशी धरले; मग वस्त्रे भूषणे त्यांच्यावरून ओवाळून टाकली.॥२॥ माता वारंवार (राम) मुखाचे चुंबन करू लागली (पटापट मुके घेऊ लागली), तिच्या डोळ्यांत प्रेमाश्रु आले व शरीर रोमांचित झाले.॥३॥ (त्यांस चटकन) मांडीवर घेऊन (पुन्हा) आलिंगन दिले, तेव्हा तिच्या पवित्र (शोभन) स्तनांतून (पयोद) प्रेमरस पाझरू लागला.॥४॥ रंकाला कुबेरपद मिळाल्याने जसा आनंद व्हावा तसा कौसल्या मातेला अवर्णनीय प्रेमानंद झाला.॥५॥

**टीका. चौ. - १ (१) रघुकुलतिलक** - रघुकुलश्रेष्ठ, रघुकुलभूषण हा सामान्य अर्थ येथे आहे. तथापि रामचंद्रांस प्रसन्न मुखाने आलेले पाहून मातेला वाटले की राज्यतिलक होण्यापूर्वी राम मला नमन करण्यास आला आहे, हे **तिलक शब्दाने सुचविले आहे.** वनवासाची हृदयविदारक वार्ता तिच्या कानांवर अजून आलेली नाही, हे पुढे (चौ.७) सिद्ध होत आहेच. (क) अशा बिकट प्रसंगी आईला नमन करताना आनंद होणे दूरच राहो. पण तिला पाहताच कोणाही

पुत्राने आई ! म्हणून टाहोच फोडला असता. येथे **त्यागवीरता व विद्यावीरता** यांची परमावधि दिसून येते. हे कसे शक्य झाले आहे हे आधीच (५१।७ ख, पहा) सुचविले आहे.

(२) **वा.रा. सुद्धा** राम निरोप घेण्यास गेले तोपर्यंत ही विषारी वार्ता तिला कळलेली नाही. अशी दुःखद बातमी अशा पुत्राच्या आईला कळविण्याइतकी क्रूर, निर्दय व्यक्ति दशरथपुरीत असणे शक्यच नाही. **दुसऱ्याच्या सुखाचे निमित्त कारण बनण्यात अहमहमिका असणे श्रेयस्कर आहे; परंतु दुसऱ्यांच्या दुःखाला निमित्त बनणे माणुसकीला सोडून आहे.** असे करणाऱ्यास विघ्नसंतोषी, दुर्जन म्हणणेच योग्य. **(क) वा. रा.** (२।२०) राम दशरथांजवळून निघाले तेव्हाच अंतःपुरातील इतर सर्व राण्या आक्रोश करीत दशरथांस दोष देऊ लागल्या आहेत. फक्त कौसल्येलाच कळलेले नाही. वा.रा.प्रमाणे कौसल्येने सर्व रात्र भगवंत ध्यानात घालवून पहाटेस विष्णूची पूजा केली व हवन वगैरे उरकून तर्पण करीत असता राम तेथे लक्ष्मणांसह गेले आहेत. मानसांत लक्ष्मण बरोबर नसून सचिव पुत्र बरोबर आला आहे हे पुढे दिसेलच. **(ख) वाल्मीकीतले राम** दशरथांकडून निघाले तेव्हा मानसातील रामासारखे सुप्रसन्न, जितेंद्रिय, निर्विकार व अत्यंत हर्षित नाहीत. 'रामस्तु भृशमायस्तो निःश्वसन्निव कुञ्जरः ।। जगाम सहितो भ्रात्रा मातुरन्तःपुरं वशी' (२।२०।८)

**चौ. २ - (१) दे आशीर्वच** - 'वृद्धानां धर्मशीलानां राजर्षीणां महात्मनाम् ।। प्राप्तु ह्यायुश्च कीर्तिंच धर्मचाऽप्युचितं कुले' (वा.रा. २०।२३) असा आशीर्वाद दिला आहे. वृद्ध, धर्मशील, राजर्षी महात्म्यांचे आयुष्य तुला लाभो; कीर्ती मिळो व या कुळाला उचित अशी धर्माची प्राप्ति होवो. राज्याभिषेक होणार या भावनेनेच प्रथम कौसल्या वागत आहे. कौसल्या कृश झालेली असून शुभ्र (पांढरी) रेशमी वस्त्रे ती नेसलेली आहे. आधीच कृश होण्याचे कारण तेथे पुढे दिले आहे.

**चौ. ३ - (१) बारंवार मुख चुंबित** - आजचा दिवस म्हणजे पूर्वायुष्यातील प्रदीर्घ वनवास रात्र संपून सुखाचा सूर्योदय होण्याचाच सुयोग असे मातेला वाटत असल्याने तिला परमानंद झाला आहे, हे मुके घेण्याने सिद्ध झाले. मानसातील ही माता सध्या ऐश्वर्यभाव विसरली आहे; पूर्ण माधुर्यभावाने

वात्सल्यरस सिंधूत बुड्या मारीत आहे. वा.रा. माधुर्यभावच आहे **पण इतक्या परमोच्च कोटीचे वात्सल्य नाही. स्तनांतून** दुग्धधारा पाझरल्या नाहीत.

**चौ. ४ - (१) घे मांडीवर दे आलिंगन** - आपला पुत्र कितीही मोठा झाला तरी आईला तो बालकासारखाच वाटत असतो, हे दाखविणारे इतके सजीव सुंदर चित्र इतरत्र कुठे पाहण्यास सापडत नाही. वारंवार मुके घेणे, मांडीवर घेणे, वारंवार हृदयाशी धरणे व स्तनांतून प्रेमरस पाझरू लागणे हे सर्व संचारी भाव दाखवितात की राम अजून स्तन्य पिणारे व मातेच्या मांडीवर लोळणारे शिशु आहेत, अशीच मातेची भावना झालेली आहे. शिशुवात्सल्य रसाचे येथे चित्रण केले आहे. '**बघतां माता धावत येई । वदुनि वचन मृदु हृदयीं घेई ॥ घेइ अंकिं देई स्तनपाना ॥**' (७।८८।७-८) हे राम रांगणारे होते त्या वेळचे वर्णन आहे. तुलना वाचकांनी करावी. (**क**) **झरे प्रेमरस पयोदिं शोभन** - पयोद, पयद = स्तन (जे दूध देतात ते) मातेच्या दुधाला काय म्हणावे हे येथे स्पष्टपणे सुचविले आहे. तो शोभन = पवित्र, प्रेमरसच आहे; म्हणून पयोद शोभन आहेत. त्या रसाला दूध म्हणणे म्हणजे मातेच्या वात्सल्याला शून्य बनविणे, त्याचा अनादर करणे आहे. ल.ठे. - **या वेळी रामचंद्रांस नुकतेच १७ वे वर्ष संपून १८ वे वर्ष लागलेले आहे**. 'दश सप्तच वर्षाणि तव जातस्य राघव ॥ आसितानि प्रकांक्षंत्या मया दुःखपरिक्षयम् ॥ (वा.रा. २।२०।४५) राघवा तुझ्या जन्मापासून सतरा वर्षे (१०+७) दुःखांचा नाश होण्याची वाट पहात मी कशीतरी घालविली, असे कौसल्या रामास या प्रसंगी म्हणाली आहे. (वा.रा. २।२०।३८-४५ श्लोक पहावे). वा.रा. सर्ग २० पासून २५ वाचून मानसातील कौसल्या व लक्ष्मण यांच्या चरित्रांशी तुलना करून पहावी म्हणजे कळेल की मानसांतील दोन्ही तिन्ही चरित्रांचे चित्रण परमोच्च निर्दोष आदर्श आहे. (ख) मुलाच्या १८ व्या वर्षी मातेच्या स्तनांतून प्रेमपयोधारा पाझरू लागल्या **व आज अठराव्या दिवशी बालकांना या प्रेमरसाचा बिंदुसुद्धा चाखण्यास मिळत नाही** ! हा फरक कशाने झाला याचा विचार दांपत्यांनी व समाजाने करणे आवश्यक नाही काय? कौसल्येने प्रेममग्न होऊन रामाला हृदयाशी धरताच पयोद प्रेमरस वर्षू लागले हे नवल आहेच आहे; पण जी सवत सर्व राण्यांच्या वैधव्याला कारण झाली व जिने मत्सराने

रामाला वनात धाडला त्या सवतीच्या मुलाला, भरताला शोकाकुल होऊन आलिंगन दिले तेव्हासुद्धा अशाच दुग्धधारा वाहू लागल्या आहेत ! असा वा यापेक्षा श्रेष्ठ **'समत्वं योग उच्यते'** (भ.गी.) **याचा आदर्श** जगात कोठे, कोणी, कधी स्त्रीचरित्रांत पाहिला आहे काय? दिसणे शक्यच नाही.

(२) **शोभन,** पयोद - मुळांत पयद, सुहाए = शोभन, सुंदर, प्रिय, आवडते हा अर्थ आहे. पण मातेच्या स्तनांना अशा परिस्थितीत सुंदर वगैरे म्हणणे औचित्यभंग करणारे ठरेल. येथे पुत्रसंबंधाने मातेच्या स्तनांची शोभनता पुत्र १७ वर्षाचा असता वर्णिली आहे. पति संबंधाने नव्हे. म्हणून येथे सुहाए = **शोभन = पवित्र,** पावन असाच अर्थ करणे भाग आहे. **पुत्राला प्रेमाने आलिंगन देताना ज्या स्तनांना पान्हा फुटतो ते स्तन पावन होत;** व असा पान्हा ज्यांना फुटत नाही ते कशा प्रकारचे हे अर्थापत्तीने सहज कळते. भरताला भेटण्याच्या वर्णनात प्रेमरस न म्हणता दूध-पय म्हटले आहे. कारण सावत्र मुलाला प्रेमाने भेटताना पान्हा फुटत नाही तरी ते स्तन अपावन ठरत नाहीत. (क) **कौसल्या योगिनी, महातपस्विनी होती असे वा.रा.** २०।४८,५२ या श्लोकांवरून ठरते. तेथे योगिनी तपस्विनी असून मानसांतील कौसल्येसारखी समता, योगबुद्धि व सहनशीलता तिच्या ठिकाणी दिसत नाहीत. मानसांतील कौसल्या योगिनी महातपस्विनी ठरत नसून परमोच्च समता व परमावधीची सहनशक्ती इ. हिच्या ठिकाणी दिसतात.

**चौ. ५ - (१) प्रेमा प्रमोद -** प्रेमा = प्रेम, प्रमोद = आनंद. **रंक =** अत्यंत निर्धन. या एका शब्दाने कौसल्येच्या आजपर्यंतच्या कष्टमय स्थितीची कल्पना कवींनी दिली आहे. वा.रा. २।२०।३८-४४ पहा. त्या स्थितीचे सार येथे रंक शब्दाने सुचविले आहे. रंकाला अपमान, कष्ट, दुःख, कृशता, चिंता, तपश्चर्या, सहनशीलता, नम्रता इत्यादींचा संग्रह सतत करावा लागतो. तशीच कौसल्येची स्थिती होती हे ध्वनित केले. कौसल्येच्या हाल-अपेष्टांचे मानसांत उघड-उघड वर्णन नसले तरी ते अशा एखाद्या शब्दाने मधेमधे ध्वनित केले आहे. कौसल्येला वाटले की आजपासून आपली रंकदशा संपून कुबेरदशेला प्रारंभ होणार; परंतु रामकृपेशिवाय व सीतेच्या कृपादृष्टीशिवाय कोणी लोकपाल होऊ शकत नाही. **'लोकप होति बिलोकनिं तव नर'** (२।१०३।६) असे गंगेने सीतेला सांगितले

आहे. कुबेर उत्तर दिशेला लोकपाल आहे. (क) हा वेळपर्यंत प्रेमानंद मग्नतेमुळे मातेला बोलवले नाही. आता बोलते –

*हिं. । सादर सुंदर बदनु निहारी । बोली मधुर बचन महतारी ॥६॥*
*। कहहु तात जननी बलिहारी । कबहिं लगन मुद मंगलकारी ॥७॥*
*। सुकृत सील सुख सीवँ सुहाई । जनम लाभ कै अवधि अघाई ॥८॥*

*म. । निरखुनि सादर सुंदर वदना । वदली माय मधुर मृदु वचना ॥६॥*
*। वदा तात ! कुरवंडिं कलेवर । कथिं शुभ मुहूर्त मुदमंगल-कर ॥७॥*
*। सुकृत-शील-सुख-सीमा परमा । जन्मलाभ अवधी किं निरुपमा ॥८॥*

**अर्थ** : सुंदर मुख आदराने निरखून पाहून माता मधुर व मृदु वाणीनें म्हणाली की.॥६॥ ताता ! मी आपला देह ओवाळून टाकते ! आनंदमंगलकारक तो शुभ मुहूर्त केव्हा आहे सांग पाहू.॥७॥ (जो) सुकृत, शील व सुख यांची परम सीमा असून जन्मलाभाची उपमारहित (अत्यंत) परमावधि आहे, (व तो) ॥८॥

**टीका. - चौ. ६ (१) सादर वदना निरखुनि** - रामचंद्रांनी नमस्कार करताच मातेची वात्सल्य रसाने व प्रेमानंदाने कशी स्थिति झाली होती हे वर वर्णिले. त्यात तिचे नेत्र आनंदाश्रूंनी भरल्याचे सांगितले आहे. त्या अश्रूंमुळे राममुखाकडे बघता आले नाही. ती प्रेमदशा जरा ओसरल्यावर डोळे पुसून मोठ्या आदराने राममुखाकडे पाहू लागली. **(क) आदराने** - आज राज्याभिषेक होणार हे कळले आहे. राम युवराजा होणार म्हणून आदर. केव्हा एकदा राज्याभिषेक पाहू असें कौसल्येला झाले आहे यात काहीच नवल नाही हे पुढील दोह्यांवरून कळेल. कौसल्येची अपेक्षा होती की सुंदर राजवेष धारण करून अभिषेकापूर्वी नमन करण्यास आले असतील, म्हणून रामशरीराकडे पायांपासून आदराने निरखित गेली; पण राजचिन्हाचा मागमूसही दिसला नाही. मुखावर दृष्टी जाताच मात्र दुःख झाले; पण जो संशय आला तो प्रश्नरूपाने आता कळेल –

**चौ. ७ - (१) कथिं शुभ मुहूर्त** - हे विचारण्यात भाव हा आहे की अजून राज्याभिषेकाच्या तयारीची चिन्हे काहीच नाहीत व कळलेली वेळ तर टळून गेली आहे; म्हणून विचारले की तो मुहूर्त केव्हा आहे? पुढे ढकलला की काय?

अजून राम स्नानसुद्धा केलेले नाहीत असे तिला दिसले (५३।१ पहा). रामचंद्रांना कसेसेच जाताना पाहून लोकांनासुद्धा संशय आला. तसाच कौसल्येला आला आहे. मनात भीती वाटत आहे की काही विघ्न येऊन मुहूर्त पुढे तर ढकलला नाही ना? 'सत्यप्रतिज्ञं पितरं राजानं पश्य राघव । अद्यैव हि त्वां धर्मात्मा यौवराज्येभिषेक्ष्यति (वा.रा. २०।२४) सत्यप्रतिज्ञ असलेल्या तुझ्या पित्याला महाराजांना जाऊन भेट. आज ते तुला यौवराज्याभिषेक करणार आहेत, असे कौसल्या म्हणाली व तेथे असला प्रश्न नाही. विघ्नाची शंका आली म्हणूनच **(क) तनु कुरवंडिं** - तुझ्यावरील इडापिडा टळावी म्हणून मी आपला देह तुझ्यावरून ओवाळून टाकते, असे म्हणून मग वरील प्रश्न विचारला आहे. कैकयीला अशीच शंका आली की राम वनवासात दशरथ काहीतरी विघ्न आणणार. तेव्हा तीसुद्धा असेच म्हणाली, 'तनु कुरवंडिं पित्या समजावा' (४२।५). कौसल्या आता त्या मुहूर्ताचे महत्त्व सांगते.

**चौ. ८ - (१) सुकृत-शील-सुख-शोभा परमा** - सुकृत = पुण्य, धर्माचरण, सुकृत व शील किंवा सुकृतशील असा अर्थ घेता येईल. सुकृतशील = सुकृती, धर्मशील, पुण्यपुरुष. सुकृतशील सुख = धर्मशीलांनां मिळणारे सुख. 'तशि न मागता सुखसंपत्ती सहज धर्मशीलासी येसी' (१।२९४।३) (क) सुकृत व शील असे शब्द घेतल्यास सुकृताचे मूळ शील, सदाचरण आहे व सुकृताने सुखप्राप्ती अनायासे होते. सुकृताने मिळणारे सुख हीच शोभा आहे. साम्राज्याचा यौवराज्याभिषेक होणार यापेक्षा आणखी जागतिक सुखाची सीमा ती कोणती? जन्मास येऊन स्वतः प्रयत्न न करता, रक्ताचा थेंब न सांडता साम्राज्याचे युवराज होण्यापेक्षा जगात मिळणारा परम लाभ तो कोणता? व या लाभाला जगात दुसरी उपमा तरी कुठली? पुत्राला ज्या प्रमाणात सुख व ऐश्वर्यादि लाभ होईल त्या प्रमाणात त्याच्या जननीला, त्यामुळे आनंदाचा लाभ होतोच. सुख, संपत्ती, ऐश्वर्य, विषयभोग, मानसन्मान इ. मिळतेच. म्हणून मातेलाही तो मुहूर्त परमसुखसीमा व निरुपम जन्मलाभ आहेच व वाटणारच. मातेला वाटला तर नवल नाही पण -

***हिं.दो.*** ***। जेहि चाहत नर नारि सब अति आरत एहि भाँति ॥***
***॥ जिमि चातक चातकि तृषित बृष्टि सरद रितु स्वाति ॥५२॥***

म.दो. *। तो वांछिति नर नारि सब या प्रकारिं अत्यार्ति ।*
*॥ जशिं चातक चातकि तृषित वृष्टि शारदी स्वाति ॥५२॥*

**अर्थ** - जशीं तृषार्त चातक चातकी शरद ऋतूंतील स्वातीच्या पावसाची वाट बघत असतात त्याच प्रकारे सर्व स्त्रिया व पुरुष मुहूर्ताची अत्यंत आर्तीने आकांक्षा करीत आहेत.

**टीका.** - (१) चातक चातकी शरद ऋतूंतील असले तरी इतर नक्षत्रातील पाणी चोचीत घेत नाहीत. फक्त स्वाति नक्षत्रातील पावसाचीच अत्यंत तृषार्त होऊन वाट पहात असतात. अयोध्येतील स्त्रीपुरुष रामराज्यरूपी स्वातीच्या पावसाचीच अपेक्षा अत्यंत तृषार्त होऊन करीत आहेत. ज्या वेळी हा पाऊस पडेल तो मुहूर्त त्यांनासुद्धा परम भाग्याचा व परमलाभ वाटेल. कवींच्या मनातील भाव हा की नगरलोकांची जर अशी स्थिती आहे तर लोकांना झालेला विषमज्वर रामजननीला किती असह्य होईल. **हा दोहा कौसल्येचे वचन आहे.** (क) भरतादि कोणाचेही राज्य प्रजेला नको आहे हेही सुचविलेच. (ख) कौसल्येचे पुत्रवात्सल्य व तिच्या भावी सुखाशा यांचे परमोच्च, परमोदात्त, अनुपम शब्दचित्र उभे करून कवि हे दाखवू इच्छितात की **'देति तात मज कानन राज्य'** हे रामवचन कानी पडताच मातेच्या हृदयाची जी अवस्था होईल तिचे शब्दचित्र काढणे कल्पनेनेसुद्धा शक्य नाही. असे असून माता जगली ती केवळ ज्ञानाच्याच बळावर !

(२) स्वातीचा पाऊस पडावा अशी तीव्र तळमळ असली तरी प्रथम शरद ऋतू तर आला पाहिजे. रामविवाहरूपी वसंत ऋतू नुकताच संपत आला आहे. ग्रीष्म व वर्षा हे दोन ऋतू जाऊन अर्धा शरद संपेल तेव्हा स्वातीचा पाऊस पडण्याची शक्यता असते. **'वर्णित रामविवाहसमाजा । तो मुदमंगलमय ऋतुराजा ॥३॥ दुःसह ग्रीष्म रामवनगमनचि । पंथकथा खर आतप पवनचि ॥** असा रामवनगमनरूपी दुःसह ग्रीष्म ऋतू व **'वर्षाघोर असुररण भारी ।** सुरकुल-शालि सुमंगलकारी ॥५। हा वर्षा ऋतू संपल्याशिवाय **'रामराज्य सुख विनय महत्ता । विशद सुखद ती शरदरम्यता** ॥६॥ कशी दिसू लागणार? स्वातीचा पाऊस वैशाखात पडेल कसा? **कौसल्या रामसंवाद वैशाख शुद्ध पंचमीला होत आहे.**

हिं. *। तात जाउँ बलि बेगि नहाहू । जो मन भाव मधुर कछु खाहू ॥१॥*
*। पितु समीप तब जाएहु भैआ । भइ बड़ि बार जाइ बलि मैआ ॥२॥*
*। मातु बचन सुनि अति अनुकूला । जनु सनेह सुरतरु के फूला ॥३॥*
*। सुख मकरंद भरे श्रियमूला । निरखि राम मनु भवँरु न भूला ॥४॥*

म. *। पिडा टळो स्नाना कर सत्वर । गोड घास खा दोन किं रुचिकर ॥१॥*
*। वडिलांजवळ जाइ मग बाळा । तनु कुरवंडिं उशिर बहु झाला ॥२॥*
*। मातृवचां ऐकुनि अनुकूलां । जणूं स्नेह-सुरतरुचे फूलां ॥३॥*
*। श्रीमूलां अति सुख-सुरसांना । बघुनि राम-मन-अलि भुलला ना ॥४॥*

**अर्थ -** बाळा ! सर्व इडापिडा टळो ! लवकर स्नान कर व आवडीचे दोन गोड घास खाऊन घे कसा.॥१॥ मग वडिलांकडे जा. किती उशीर झाला हा ! (हा देह ओवाळून टाकते.) सर्व इडापिडा टळो.॥२॥ जणू स्नेह कल्पतरुच्या फुलांसारखी मातेची अनुकूल वचने ऐकून - ॥३॥ (ती जरी) सुखरूपी सुंदर रसाने भरलेली व सर्व श्री चे मूळ आहेत. तरी त्यांना पाहून रामचंद्राचे मन रूपी भुंगा (भ्रमर) भुलला नाही.॥४॥

**टीका. - चौ. (१ व २) पिडा टळो -** देह ओवाळणे व इडापिडाटळो म्हणून म्हणणे या गोष्टी या वेळी कौसल्येने तीन वेळा केल्या आहेत. तिला आलेली विघ्नाची शंका खरी ठरणार हे त्रिवार केलेल्या या उच्चाराने सुचविले आहे. **(क) स्नाना कर सत्वर -** दिवस बराच वर आला तरि **स्नान झाले नाही असे ठरले.** यामुळे शंका वाटली व चिंता उद्भवली. सुमंत्र बोलावण्यास गेल्यामुळे **रोजचे प्रातःकर्म सुद्धा राहिले हेही सिद्ध झाले.** रात्री जागरण व उपवास व व्रतस्थ असल्याने अभिषेक होईपर्यंत भोजन करावयाचे नाही, हे माहीत असल्याने काही खा असे या वेळी सांगणे योग्य नव्हते. मग असे का सांगितले? **(ख)** मातेचे परमावधीचे प्रेम पाहून सुद्धा तिला अत्यंत दुःखदायक ठरणारी बातमी सांगावयाची आहे. ऐकल्यावर तिचे काय होईल कोणास ठाऊक? असे प्रभूला, भक्तवत्सलास वाटले असणारच. त्याची छाया मुखावर पडली व ती मातेला दिसली. तिला वाटले उपवासाचा व जागरणाचा परिणाम झाला असावा; म्हणून वात्सल्यरस तिच्या मुखाने सांगत आहे की रुचिकर दोन चार गोड घास

खा व मग जा; कारण आधीच उशीर झाला आहे व अभिषेक विधी उरकेपर्यंत फारच उशीर होईल? मात्र **ल. ठे. कीं अशाही परिस्थितीत स्नान न करताच खा असे सांगितले नाही, हे मातांनी मुद्दाम लक्षात ठेवावे.** (ग) मातेच्या प्रेमसागराच्या मोठ्या भरतीच्या या लाटा हृदयापर्यंत गेल्यावर १७ वर्षांच्या मुलाची काय अवस्था झाली असती याची कल्पना करून मग पुढील उत्प्रेक्षा पहावी.

**चौ. ३-४ (१) सुरतरु** इच्छित कामना पूर्ण करणारा असतो. कौसल्येचा स्नेह हा जणू कल्पवृक्ष आहे. स्नेहाने उच्चारलेली **वचने** त्याची **फुले आहेत. सुख** हा त्या फुलातील मधुर रस (सु-रस) **मकरंद** आहे; व साम्राज्य, सत्ता, सर्व प्रकारची संपत्ती इ. **ऐश्वर्यरूपी श्रीं**चे लक्ष्मीचे मूळ **ही वचने आहेत.** ही सर्व प्रकारची संपत्ती व ऐश्वर्य व त्यापासून मिळणारे सुख, या आज्ञेचे पालन केल्याने सहज मिळाले असते. पित्यापेक्षा मातेचे महत्त्व अधिक असल्याने मातेची आज्ञा पालन करण्यासाठी पित्याच्या वचनाचा भंग केला असता तरी दोष लागला नसता. पण रामचंद्रांचा **मनरूपी भ्रमर** या फुलांवर व त्यातील सुखरूपी मकरंदावर मुळीच आसक्त झाला नाही. सुंदर मकरंदाने भरलेली फुले दिसली की त्यांवर भ्रमर बसल्याशिवाय रहात नाही. भाव हा की इतर कोणी पुत्र असता तरी त्याच्याकडून असे घडले नसते. इतर कोणीही या मातेच्या वचनाचा आधार घेऊन वनवास चुकविला असता व सिंहासन पटकावले असते. परंतु कौसल्या जे बोलली ते आकस्मिक परिस्थितीचे ज्ञान नसल्यामुळे बोलली असल्याने ही आज्ञा प्रमाण मानता येत नाही. सर्व समाचार कळल्यावर जर तिने असे सांगितले असते तर ती आज्ञा ठरली असती.

(२) लक्ष्मणाने भृगुपतीच्या वचनास फुले म्हटले आहे. 'वदतां वचन झरति जणुं फूलं' (१।२८०।४) पण ती वचने प्रतिकूल असल्याने त्यांना सुरुतरुची फुले म्हटले नाही. कारण सुरतरु कोणालाही प्रतिकूल नसतो. कौसल्येचा स्नेह तसाच आहे. कोणालाही प्रतिकूल नाही हे या प्रकरणात व पुढे भरतभेटीत वगैरे दिसणार आहे. आता रघुवीराने बोलण्याची पाळी आली.

*हिं. । धरम धुरीन धरम गति जानी । कहेउ मातु सन अति मृदु बानी ॥५॥*
*। पितॉं दीन्ह मोहि कानन राजू । जहँ सब भाँति मोर बड़ काजू ॥६॥*

*। आयसु देहि मुदित मन माता । जेहिं मुद मंगल कानन जाता ॥७॥*
*। जनि सनेह बस डरपसि भोरें । आनँदु अंब अनुग्रह तोरें ॥८॥*
म. *। धर्म-धुरीण धर्म गति जाणुनि । सांगति माते अति मृदु बोलुनि ॥५॥*
*। देति तात मज काननराज्य । कार्य बहुत मम तेथें प्राज्य ॥६॥*
*। माते दे आज्ञा मुदिता मनिं । मग मुदमंगल जातां काननिं ॥७॥*
*। चुकुनि न घाबरि हो स्नेहास्तव । अंब देइ आनंद कृपा तव ॥८॥*

**अर्थ** - (रघुवीर) धर्मधुरीण असल्याने त्यानी धर्मगति जाणली व अति मृदु बोलून मातेला सांगितले की- ॥१॥ वडिलांनी मला काननाचे राज्य दिले आहे व माझे तेथे महत्त्वाचे पुष्कळ कार्य आहे.॥६॥ (म्हणून) आई ! मला आनंदित मनाने आज्ञा-निरोप दे. म्हणजे मग वनात गेल्याने (सुद्धा) मला आनंद मंगलाचीच प्राप्ती होईल.॥७॥ स्नेहामुळे चुकूनसुद्धा घाबरी होऊ नकोस; कारण की माते ! (अंब) तुझी कृपाच मला आनंद देईल.॥८॥

**टीका. चौ. ५ - (१) धर्मधुरीण** - धर्माची धुरा (जूं-जोखड) ज्यांनी आपल्या खांद्यावर घेतली आहे असे. 'धर्मधुरीण भानुकुल भानू । राजा स्ववश राम भगवानू ॥ सत्यसंघ पाते श्रुतिसेतू'(२५४।२-३) असे वसिष्ठ म्हणतात. 'स्वामी धर्मास्तव अवतरला' (४।९।५) असे वाली म्हणतो. धर्माचे संरक्षण करण्याची जबाबदारी त्यांच्या शिरावर असल्या कारणाने धर्मसंरक्षण - पालन, स्वतः करणे हे मुख्य कर्तव्य ठरले. **(क) धर्मगति जाणुनि** - मातेची आज्ञापालन करणे हा धर्म आहे. पण मागील आज्ञा मातेने सत्य परिस्थिति न जाणता दिली आहे व ती पितृवचनाच्या विरुद्ध व सापत्न मातेच्या आज्ञेच्या विरुद्ध आहे. राजाने वचन देऊन ते पुत्र स्नेहाने मोडणे हा अधर्म आहे. राजा स्वतःच प्रतिज्ञा-वचनभंग करील तर त्याच्या राष्ट्रात धर्माचे पालन व संरक्षण होणार नाही. इत्यादी अनेक परस्पर विरोधी धर्माचा विचार केला व सर्वांच्या धर्माचे पालन होईल असा धर्माचरणाचा मार्ग निश्चित केला. हे करण्यास वेळ किती लागला? मागल्या दोन व ही चौपाई उच्चारण्यास जेवढा वेळ लागेल तेवढ्यात स्वकर्तव्याचा निश्चय केला; म्हणूनच कवींनी कौसल्येचे भाषण व रामभाषण यात या तीन चौपाया पडद्यामागील सूत्रधाराच्या भाषणासारख्या घातल्या आहेत.

**चौ. ६ - (१) कानन राज्य** - माते तू म्हणालीस त्याप्रमाणे वडिलांनी मला राज्य दिले आहे व ते ताब्यात घेण्यासाठी मी निघालो आहे. मात्र ते अयोध्येचे राज्य नसून वनाचे राज्य दिले आहे. **'पित्याने राज्य देण्याचे कबूल करून वनवास दिला'** असे मानसातील रघुवीर म्हणाले नाहीत. वा.रा. राम म्हणाले 'भरताय महाराजो यौवराज्यं प्रयच्छति ।। मांपुनर्दण्डकारण्ये निवासयति तापसम् ।। देविनूनं न जातीषे महद्भयमुपस्थितम् ।।' (२०।२७-२८) हे आसन मला आता काय कामाचे, आता दर्भासनावर बसले पाहिजे. वन्य मूलफले खाऊन मुनिव्रताने राहिले पाहिजे वगैरे सांगितले आहे. **(क) कार्य बहुत मज तेथें प्राज्य** - प्राज्य = पुष्कळ, मोठे. हे म्हणणे अगदी खरे आहे. सर्व पृथ्वीवर दशरथांचे साम्राज्य असून राक्षसांनी दण्डकारण्यादिकांत येऊन ते ते भाग काबीज केले आहेत. तेथील रहिवाशांना मारले, भक्षण केले वगैरे अत्याचार व अधर्म केला आहे. प्रजेचे व विप्रमुनींचे विशेष संरक्षण करणे राजाचे कर्तव्य आहे. म्हणून राजांनी मला काननराज्य दिले असे वाटते. भरत रामभेटीसाठी चित्रकूटास गेले तेथे चित्रकूटवनाचे राज्य म्हणूनच वर्णन केले आहे. दुष्ट मांडलिक राजांचा नाश करून सम्राट चक्रवर्ती महाराजा, प्रजापालक, धर्मशील राजांना त्यांच्या जागी स्थापन करतो व चांगले असतील त्यांचा आदर-सत्कार करतो. त्या प्रमाणे या काननराज्यात रघुवीर धर्मशील निषाद राजाचा सन्मान करतात. वाली पापी म्हणून त्याचा वध करून सुग्रीवास ते राज्य देतात. महादुष्ट, धर्मविध्वंसक दशमुखाचा बिमोड करून धर्मशील बिभीषणास ते राज्य देतात. दण्डकारण्यात पुंडाई करणाऱ्या खरदूषणांचा विनाश करून मुनींचे भय हरण करून तो देश निर्भय व वस्ती करण्यास योग्य करतातच.

(२) काननराज्य दिले या म्हणण्याने, दशरथांवर केला जाण्यासारखा एक आरोप दूर केला. राज्य न देता वनवास दिला असे म्हणण्याने दशरथांवर मिथ्यावादीपणाचा आरोप केला गेला असता तो टाळला.

**चौ. ७ - (१)** वरील शब्द उच्चारताच, कौसल्येला एकदम वज्रपातासारखा धक्का बसून तिचा आनंद पार रसातळास गेला असणारच. म्हणून म्हणतात प्रभु की, **'आज्ञा दे मुदिता मनिं'** अशी खिन्न विषण्णा शोकाकुल होऊ नकोस.

वा.रा. कौसल्या तत्काळ मूर्च्छित होऊन, धाडकन पडली आहे. पण मानसातील कौसल्या कितीतरी धैर्यसंपन्न आहे. (क) जातां काननिं = वनात जाताना व वनात गेल्यावर हे दोन्ही अर्थ आहेत.

**चौ. ८ - (१) चुकुनि वर घाबरि हो स्नेहास्तव =** दुःखाने फार व्याकुळ होत असलेली पाहिली तेव्हा म्हणाले की लौकिक स्नेहाला वश होऊन घाबरून जाऊ नकोस. घाबरण्याचे कारण नाही. तुझी कृपा असली म्हणजे वनातसुद्धा आनंदाला तोटा नाही. मातेची कृपा नसेल तर अयोध्येचे राज्यसुद्धा सुख आनंद देऊ शकणार नाही. कृपायुक्त आनंदाने दिलेला मातेचा आशीर्वाद असेल तर काननराज्य सुद्धा सदा आनंदमंगलकारकच होईल.

*हिं.दो. । बरष चारिदस बिपिन बसि करि पितु बचन प्रमान ॥*
*। आइ पाय पुनि देखहउँ मनु जनि करसि मलान ॥५३॥*

*म.दो. । वर्ष चार दश वसुनि वनिं पाळुनि पितृवचनास ॥*
*॥ येउन पाहिन पाय मीं म्लान करी न मनास ॥५३॥*

**अर्थ :** वनात चार वर्षे राहीन आणि दहा वर्षे, पित्याचे वचन पालन करून (परत) येईन व या पायांचे दर्शन घेईन. तू मन खट्टू करू नकोस.॥दो.५३॥

**टीका. -** (१) मातेला कमीत कमी दुःख होईल अशा रीतीने राम बोलत आहेत. वनवासास जातो न म्हणता वनराज्य करण्यास जातो, या म्हणण्याने मनावर होणारा दुःखाचा आघात कमीच होणार. १४ वर्षे वनात राहीन असे एकदम सांगितले असते तर जो आघात झाला असता त्यापेक्षा चार वर्षे ही लहानशी संख्या आधी उच्चारून मग हळूच 'दश' (दहा) उच्चारण्याने पुष्कळ कमी आघात होईल. म्हणून आरंभीच म्हटले की अति मृदु बोलून सांगितले. **ल.ठे.** अत्यंत प्रेमी व्यक्तीला अत्यंत दुःखाची बातमी एकदम सगळी भराभर सांगू नये. तुकडे तुकडे पाडून थोडथोडी सांगावी. काचेच्या बरणीत एकदम आधणाचे पाणी ओतल्यास ती ताडकन फुटते. पण तिच्यात गार पाणी भरून ती स्टोवर ठेवून तिच्यात पाणी उकळले तरी फुटत नाही; किंवा ती कोमट व अधिकाधिक उष्णतेच्या पाण्यात क्रमशः ठेवीत गेल्यावर मग आधणाच्या पाण्यात ठेवली तरी फुटत नाही. (हे अनुभवले आहे या लेखकाने.) असेच मनुष्याच्या मनाचे आहे. 'जयति वचनरचना

अतिनागर' असे परशुधराने म्हटले ते उगाच नव्हे !

(२) **येउन पाहिनं पाय** - मी अगदी सुखरूपपणे परत येईन व तू तेथपर्यंत नक्की जगणार आहेस; म्हणून काळजी करण्याचे मुळीच कारण नाही. **(क) म्लान न करी मनास** - मात्र तू दुःखी, कष्टी होऊन राहू नकोस. तू आनंदात राहिलीस की मी वनात आनंदात आहे म्हणून समज. मातेने फार शोक-दुःख करीत राहू नये म्हणून हे सांगितले. मुलाला दुःख होऊ नये म्हणून तरी धैर्याने मन आवरून धरील हे मर्म आहे यातले. वा.रा. सर्ग २०, २१ मुद्दाम पाहून तुलना करून पहावी. येथील कौसल्या चरित्रासारखे निर्दोष, परम उदात्त, परम उज्ज्वल, परम धैर्यसंपन्न व सती धर्माला किंचितही कमीपणा न आणणारे कौसल्याचरित्र इतर कोणत्याही रामायणात नाही. **प्रस्तावनेत 'पुनीत कौसल्यादेवी' चरित्र पहावे.**

*हिं.* ***। वचन बिनीत मधुर रघुबर के । शर सम लगे मातु उर करके ॥१॥***
***। सहमि सूखि सुनि सीतलि बानी । जनु जबास परें पावस पानी ॥२॥***
***। कहि न जाइ कछु हृदय बिषादू । मनहुँ मृगी सुनि केहरि नादू ॥३॥***
***। नयन सजल तन थरथर काँपी । माजहि खाइ मीन जनु मापी ॥४॥***

*म.* ***। रघुवर वचनें मधुर विनम्रहि । सलति मातृहदिं जशिं बाणाग्रहिं ॥१॥***
***। सुके घाबरुनि वचनें शीतल । पडत यवासि जसें वर्षाजल ॥२॥***
***। वदवे ना मुळिं हृदय-विषादा । श्रवुनि मृगी जणुं केसरि-नादा ॥३॥***
***। सजल नयन तन थरथर कापे । खाउनि गढुळि मीन जणुं धापे ॥४॥***

**अर्थ** - रघुवराची अत्यंत मधुर व नम्र वचनेसुद्धा मातेच्या हृदयांत बाणांसारखी सलू लागली.॥१॥ पावसाचे पाणी यवासावर (धमासा) पडले म्हणजे ती झाडे जशी सुकतात तशीच जणू कौसल्या ती शीतल वाणी ऐकून घाबरून सुकून गेली.॥२॥ तिच्या हृदयांतील विषादाचे मुळीच वर्णन करता येत नाही (पण अशी दिसली की) जणू सिंहाची गर्जना श्रवण केलेली हरिणीच ! ॥३॥ नेत्र अश्रूंनी डबडबले व देह असा थरथर कापू लागला की जणू गढूळी खाऊन मासाच मूर्च्छित झाला.॥४॥

**टीका : चौ. १-२ (१) वचन विनीत मधुर** - कैकयीचे शब्द सुद्धा मधुर व

कोमल होते पण विनम्र नव्हते. पण रघुवराचे विशेष नम्र आहेत (होते) तरी सुद्धा परिणाम एकच झाला. 'करके - करकना = सलले, खुपून पीडा, तिडका उत्पन्न करू लागले. **(क) पडत यवासी जसें वर्षाजल** - यवास - यवास (सं.) लाल काटे धमासा. मारवाडांत रेताड मैदानात होतो. पाऊस त्याच्यावर पडला की पाने झडून जातात व नुसत्या काड्या राहतात. याची पाने किंवा काटे अंगाला लागल्यानेसुद्धा खरूज होते व कंड खूप सुटते म्हणून तिला कच्छुरा, रोदनी अशी नावेही आहेत. पावसाळा संपला म्हणजे यांना पुन्हा पालवी फुटते. ही लहान लहान झाडे असतात. काष्ठौषधित काढ्यासाठी याचा उपयोग होतो. पावसाचे पाणी शीतल असते तशीच रघुवराची वचने शीतल आहेत. यवासा जसा पावसाच्या शीतल पाण्याने सुकून गेल्यासारखा होतो व नुसत्या काड्या राहतात तसे कौसल्येचे शरीर सुकून गेले.

(२) **ल. ठे.** - हा यवासाचा दृष्टान्त व उत्प्रेक्षा फार गूढ आहे. शीतल वाणीरूपी जे पाणी पडल्याने कौसल्या धमासाची पाने झडून नुसत्या काड्या झाल्या ते पाणी कैकयीच्या कुटिलता, निष्ठुरता, निर्दयतादि क्षारयुक्त सवती मत्सरसागरांतून रोषानलाने तयार केले आहे. ते रघुवर मेघांत शिरताच क्षारहीन म्हणजेच मधुर विनम्र झाले असले तरी ज्या जलाची वाफ रोषानलाने बनली तेच हे पाणी आहे. **कैकयीला कौसल्या काटे - धमाशासारखी** वाटत होती (आहे.) राममाता मला रडविणार (रोदनी - रडविणारी = यवासा) असे तिला वाटत होते (आहे) म्हणूनच कैकयीला भरतराज्य ममतारूपी गजकर्ण व ईर्षारूपी खरूज (कच्छु) उत्पन्न झाली. कच्छु = खरूज देणारी ती कच्छुरा = यवासा. हा पाऊस पडण्याचे मूळ कारण कैकयीच आहे. हा यवासाचा दृष्टान्त किती समर्पक आहे हे अर्थाची वरील व्यापकता पाहिल्याशिवाय कळत नाही व हा व्यापक अर्थ कळल्याशिवाय या दृष्टान्ताची सार्थकता नाही. शरीराची दुर्दशा वर्णन करून आता तिच्या हृदयाची दुर्दशा वर्णू इच्छितात.

**चौ. ३ - (१) बदवेना मुळिं हृदय-विषादा** - ज्या मातेच्या पुत्रस्नेहाला उपमा नाही त्या मातेला अत्यंत सुखाच्या वेळी झालेल्या दुःखाचे, त्या भीषण पुत्रविरहविषादाचे वर्णन कोणता कवि करू शकेल? **रघुपतीच्या रथाच्या घोड्यांना**

**झालेला विषाद पाहून निषादालाही भारी विषाद झाला !** मग कौसल्येच्या विषादाचे वर्णन करण्यास शब्द व उपमा कोठल्या? तथापि ती कशी दिसली हे उत्प्रेक्षेने सांगतात. रघुवीराचे शब्द शीतल, मृदु व मधुर असूनसुद्धा ते ऐकून विषाद कसा होईल असे म्हणाल तर सिंहाची गर्जना कानी पडताच वनातील हरिणीस जसा होतो तसा झाला. **ते शब्द शीतल असून दाहक व शोषक ठरले** (यवासाला वर्षाजल). तसेच विनीत - **विनम्र असून** सिंहाच्या गर्जनेप्रमाणे कौसल्या हरिणीच्या हृदयाचे पाणी पाणी करून टाकणारे **घोर, हृदय विदारक, भयंकर ठरले. अमृतासारखे मधूर असून हालाहल विषासारखे कसे झाले** हे आणखी एका उत्प्रेक्षेने सांगतात :

**चौ. ४ - (१) जणुं गदुळी खाऊन मीन - गदुळी** (माजा) = पावसाचे नवे गढूळ पाणी व त्यावरील फेस. गदुळी हा कोळ्यांच्या भाषेतील (पारिभाषिक) शब्द आहे. हे पाणी माशांना विषाप्रमाणे ठरते. त्याने मासे आंधळ्यासारखे होतात. जलात पोहण्याची व श्वासोच्छ्वास करण्याची त्यांची शक्ती नष्ट होते. ते पाण्यात असूनच गुदमरतात. मेलेल्या मीनांसारखे पाण्यावर तरंगू लागतात. (त्यांना पकडण्यासाठी मच्छीमार लोकांची धावपळ सुरू असते). अशीच कौसल्येची दशा झाली आहे. रामराज्यरूपी परमलाभ व परमसुख यांच्या मनोरथरूपी डोहात पोहोत असता हे गढूळ नवे पाणी एकाएकी, मोठ्या प्रमाणात आले. तिला जणू दिसत नाहीसे झाले, बोलता येईना. तीव्र विषादाने गुदमरली. काय करावे हे सुचेना. सुखमनोरथ जलात बुडून त्यात विहार करणारी विषादाने फुगून जणू शोकाच्या प्रवाहात तरंगू लागली.

यावरून आता खात्री होईल की शीतल, विनम्र व मृदु-मधुर या गुणांचे भिन्न परिणाम दाखविण्यासाठी निरनिराळी तीन उपमाने वापरली. विषादाचा परिणाम दाखविण्यासाठी शेवटची उत्प्रेक्षा वापरली. इतका विषाद झाला तरी मूर्च्छा आली नाही; आणि आता -

*हिं. । धरि धीरजु सुत बदन निहारी । गदगद बचन कहति महतारी ॥५॥*
*। तात पितहि तुम्ह प्रानपिआरे । देखि मुदित नित चरित तुम्हारे ॥६॥*
*। राजु देन कहुँ सुभ दिन साधा । कहेउ जान बन केहि अपराधा ॥७॥*
*। तात सुनावहु मोहि निदानू । को दिनकर कुल भयउ कृसानू ॥८॥*

म. *। धीर धरूनि सुतमुखा न्यहाळी । माता गद्गद्-कंठ म्हणाली ॥५॥*
*। प्राणप्रिय तूं बाळ । पित्या तंव । मुदित नित्य पाहुनि चरितां तव ॥६॥*
*। राज्य अर्पण्या शुभ दिन काढिति । वनिं कोण्या अपराधें धाडिति ॥७॥*
*। सांग वासरा । मजसि निदानू । कोण भानुकुळिं होइ कृशानू ॥८॥*

**अर्थ** : (मग) धीर धरून पुत्राच्या मुखाकडे न्याहाळून पाहिले व माता सद्गदित होऊन (गदगद कंठाने) म्हणाली की - ॥५॥ बाळ ! तू तर वडिलांना प्राणांपेक्षा प्रिय आहेस व तुझ्या चरित्रांना पाहून ते नित्य प्रसन्न (मुदित) होतात. ॥६॥ राज्य देण्यासाठी शुभदिवस पाहिला (शोधला) आणि आता कोणत्या अपराधासाठी वनात धाडीत आहेत?॥७॥ तान्हुल्या ! (वासरा) मूळ कारण (निदान) कोण झालं? सूर्यवंशाला अग्नि कोण बनलं हे (तरि) सांग.॥८॥

**टीका. चौ. ५ - (१) सुत मुखा न्यहाळी** - मुखाकडे निरखून पाहण्यात भाव हा आहे की ज्या मुखाकडे पाहून मी कसेतरी सुखाने दिवस कंठीत होते व भाग्योदयाच्या क्षणाची चातकीसारखी वाट पहात होते, तो क्षण जवळ आलेला दिसत असता, हे सुखनिधान मुख मला अंतरणार ! आता मी कोणाच्या तोंडाकडे बघत जगणार ! इत्यादी विचार करीत मुखाकडे बघत राहिली. बोलण्याची शक्ती नाही; पण स्वस्थ बसणेही अशक्य आहे. अमृताचे विष कसे झाले, कोणी केले हे जाणण्याची प्रबळ इच्छा तिला धीर देऊन अडखळत का होईना बोलावयास लावीत आहे.

**चौ. ६-७ - (१) प्राणप्रिय तूं बाळ पित्या** - इ. विपत्तींचे पहाड अचानकपणे कोसळले असून पुत्राचे मुख निर्विकार व प्रसन्न आहे. त्यामुळे तर माता बुचकळ्यातच पडली. राजाला प्राणांहून प्रिय असलेला व नित्य आनंददायक असणारा पुत्र राज्यावर बसविण्याचे ठरले असता त्यांनीच वनात धाडणे **हे दुसरे आश्चर्य**. दशरथ रामाला वनात पाठवतील ही अशक्य असलेली गोष्ट घडली कशी असे वाटणारच. **स्वभावाविरुद्ध गोष्ट करण्यास काहीतरी बलवान, अलौकीक कारण असावे लागते.** म्हणून विचारले की **'वनिं कोण्या अपराधें धाडिति.'** पण रामाकडून अपराध घडेल हे शक्य वाटेना म्हणून वाटले की इतर कोणीतरी कारण बनल्याशिवाय हे घडले नाही; म्हणून विचारले.

**चौ.** ८ - (१) **निदानू** - निदान; 'निदानं त्वाहिकारणम्' (अमरे) = मुख्य कारण. भाव हा की रामापराध मुख्य कारण बनून दशरथ निमित्त कारण नाहीत. इतर कोणीतरी मुख्य कारण बनून दशरथ निमित्त कारण झाले असले पाहिजेत. जे मुख्य कारण असेल त्यानेच दिनकर कुलाला - भानुवंशाला आग लावली. म्हणून विचारते की **अग्निरूप कोण बनले? 'होइ आग रघुबंश-वेणुबनि'** असे कैकयीबद्दल लोकांनी म्हटलेच आहे. 'तूं दिनकर कुल कुठार बन ना.' (३४।६) टी.प. असे राजानेही तिला म्हटले आहे. या प्रश्नामुळे रघुवीरापुढे मोठा पेच पडला आहे तो कोणता हे आता पाहू -

*हिं.दो.* ***। निरखि राम रुख सचिव सुत कारनु कहेउ बुझाइ ॥***
***॥ सुनि प्रसंग रहि मूक जिमि दसा बरनि नहिं जाइ ॥५४॥***

*म.दो.* ***। बघुनि रामकल सचिवसुत कारण सब समजावि ॥***
***॥ ऐकुनि राही मूकशी कशी दशा वर्णावि ॥५४॥***

**अर्थ** : रामचंद्रांचा कल पाहून सचिव पुत्राने सर्व कारण समजाऊन सांगितले. ते ऐकून माता मुकीसारखी (तटस्थ) होऊन राहिली. तिची ती दशा कशी वर्णन करता येईल?॥५४॥

**टीका.** (१) कौसल्येच्या प्रश्नाचे उत्तर रामचंद्रांनी दिले असते तर दशरथांचा स्त्रैणपणा व कैकयी मातेची कुटिलता वगैरेंचे वर्णन स्वतःच्या मातेच्या देखत करावे लागले असते. कैकयीला राम कौसल्येपेक्षा अधिक मान देत असतात. तिलाच ते जननी म्हणतात हे पूर्वी (४१।७) च्या टीकेत दाखविले आहे. कौसल्येला 'जननी' असे रघुनाथाने मुळीच म्हटलेले नाही. येथे कारण सांगण्याचा प्रसंग येणार हे जाणूनच येताना सचिव पुत्राला बरोबर आणला असावा. वा. रा. लक्ष्मण बरोबर आहे. लक्ष्मणाने कौसल्येचे सांत्वन करताना राजाची पुष्कळ निंदा केली आहे व राम वनात जात आहेत याबद्दल नापसंती व्यक्त केली आहे. त्यातला थोडासा नमुना - **'गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ॥ उत्पथं प्रतिपन्नस्य कार्यं भवति शासनम् ॥ हनिष्ये पितरं वृद्धं कैकेय्यासक्तमानसम् ॥ कृपणं चास्थिरं बालं वृद्धभावेन गर्हितम्** (२०।१३,१९) हा सर्व सर्गच पाहण्यासारखा आहे. सचिव पुत्राचे नाव अभिनन्दन होते असे मा.पी. म्हणते, पण आधार दिलेला नाही.

लक्ष्मणाचा कडक स्वभाव जाणून पितृनिंदा मातेच्या समोर ऐकण्याचा प्रसंग येऊ नये म्हणूनच त्यास येथे बरोबर आणला नसावा. हा सचिवपुत्र सुमंत्रासारखाच सौम्य वृत्तीचा आहे हे जाणून त्याला आणला असावा असे पुढील अशाच प्रसंगावरून ठरते. (क) वाल्मीकी भेटीत प्रभूंनीच सर्व का सांगितले हे तेथील टीकेत स्पष्ट केले आहे. लक्ष्मण व सीता या शिवाय दुसरे कोणी बरोबर नाही आणि लक्ष्मणाच्या स्वभावामुळे त्याच्याकडून सांगविणे इष्ट नाही हे मुख्य कारण तेथे आहे. (ख) **बघुनि रामकल** - रामचंद्रांनी आपल्या नेत्रांनी खुणावले असेल किंवा त्यांच्या मुद्रेवरून सचिव सुताने त्यांची इच्छा जाणली. 'बघुनि भूपकल सचिव निघाले' या प्रमाणे सुमंत्राचे वर्णन केले आहे. येथे सचिवपुत्राने रामकल जाणला. पित्यासारखाच पुत्र आहे हे दाखविले. (ग) **मूकशी राही** - काय करावे, काय बोलावे हेच सुचेना, धर्म संकटात पडली. धर्मसंकट कोणते ते आता कळेल :

*हिं.* *। राखि न सकइ न कहि सक जाहू । दुहूँ भाँति उर दारुन दाहू ॥१॥*
*। लिखत सुधाकर गा लिखि राहू । बिधि गति बाम सदा सब काहू ॥२॥*
*। धरम सनेह उभयँ मति घेरी । भइ गति साँप छुछुंदरि केरी ॥३॥*
*। राखउँ सुतहि करउँ अनुरोधू । धरमु जाइ अरु बंधु बिरोधू ॥४॥*

*म.* *। जा म्हणवे ना राखुं न शकते । दारुण दाहिं उभयपरिं जळते ॥१॥*
*। लिहित चंद्र राहू लिहिला ही । बिधि गति वाम सदा सकलां ही ॥२॥*
*। धर्मस्नेह घेति घेरुनि मति । झाली साप चिचुंदरिची गति ॥३॥*
*। राखिन पुत्र करुनि जर आग्रह । धर्महानि नी बंधूविग्रह ॥४॥*

**अर्थ :** वनात जा म्हणण्याचे धाडस करवत नाही व ठेऊनही घेऊ शकत नाही. दोन्ही प्रकारांनी हृदयात दारुण दाह होत आहे.॥१॥ ब्रह्मदेवाने (चंद्र) सुधाकर लिहिताना लिहिले गेले राहू? दैवाची गति सर्वांनाच सदा उलटी आहे.॥२॥ धर्म व स्नेह यांनी (कौसल्येच्या) बुद्धीला घेरून घेतली आहे. आणि साप व चिचुंदरी यांची गत झाली आहे.॥३॥ आग्रह करून मुलाला ठेऊन घ्यावा तर धर्महानि होते व बंधुविरोध होतो. (जा सांगावे तर स्नेह आड येतो.)॥४॥

**टीका. - चौ. १** - (१) रघुवंशांतीलच कोणी व्यक्ति भानुकुलकृशानु झाली असेल ही कल्पनाच कौसल्येला शिवली नव्हती. त्यामुळे आशा होती की पित्यापेक्षा

माता अधिक मान्य असते. म्हणून आपण त्या आधारावर रामाला ठेऊन घेता येईल असे वाटत होते. पण भरतजननीच दिनकरकुल कृशानु बनली हे ऐकताच मुकीसारखी झाली आहे. **(क) 'वनात जा'** असे सांगणे हा एक मार्ग व माझी जननीची आज्ञा मानून घरी रहा, जाऊ नकोस असे सांगणे हा दुसरा मार्ग आहे. दोन्ही गोष्टी अशक्य वाटतात. याचेच नाव धर्मसंकटात पडली आहे. असे का हे पुढे सांगतात.

**चौ. २ - (१) लिहित चंद्र राहू लिहिला;** बिधीनें - कैकयी रामाला राज्याभिषेक करण्याचा आग्रह राजास करीत असे व आज तिनेच वनवासात धाडले असे सचिव सुताकडून कळाले. एकाच माणसाकडून दोन अगदी परस्पर विरोधी गोष्टी कशा घडल्या याचा विचार करता ठरले की हे भरतजननीच्या स्वभावाविरुद्ध घडले आहे. तेव्हा यात दैवच मुख्य कारण आहे. ललाट रेषा लिहिताना ब्रह्मदेवाकडून ही चूक झालेली दिसते. चंद्र लिहीत असता राहु असे लिहिले गेले. चंद्र, 'राकेश' असे लिहिण्यासाठी **'रा'** काढले व केश ही अक्षरे त्याच्यापुढे लिहिली न जाता **'हु'** हे अक्षर पुढे लिहिले गेले. त्याबरोबर 'राहू' लिहिले गेले. **(क)** रामराज्याभिषेक शरद ऋतूतील पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे-राकेशाप्रमाणे सर्वांनाच आल्हाददायक, तापनाशक, उत्साहवर्धक, सर्वसुखशान्तिप्रद, अमृतासारखा वाटत होता. या सर्वांना ग्रासून टाकून 'चंद्रविण जशि यामिनी' (५० छंद) अशी परिस्थिती निर्माण करणारा राम वनवासरूपी राहु लिहिला गेला; म्हणून ऐनवेळी तोंडाजवळ आलेला सुग्रास हिसकून घेऊन विषान्न तोंडात कोंबण्याची कुबुद्धि तिला (कैकयीला) झाली. मानसात दशरथ राजाने कैकयीला निमित्त म्हणून का होईना किंचित कठोर शब्द वापरले आहेत; पण रामचंद्रांनी कैकयीला मुळीच दोष दिला नाही. कौसल्या तसेच करीत आहे. मानसातील कौसल्येने दशरथांससुद्धा दोष दिला नाही !

(२) **बिधिगति बाम सदा सकलां ही -** अहल्या, इन्द्र, दमयन्ती, हरिश्चंद्र, नल इत्यादीकांनासुद्धा दैव वाम झालेच. तसेच आज घडत आहे. यात कोणाचाच दोष नाही. 'विधिगति अति विपरीत विचित्रा.' **ल. ठे. वा. रामायणात** दैव प्राबल्याचे वर्णन स्वतः रघुवीराने केले आहे. तो सगळा सर्ग २२ (श्लो. १-

३०) पाहण्यासारखा आहे. त्यावर लंक्ष्मण क्रुद्ध होऊन दैवाचा पराभव करण्याची भाषा सर्ग २३ मध्ये बोलत आहे. त्यानंतर रघुवीराने मातेची पुन्हा समजूत घालून अनुज्ञा मिळविली आहे. पण सर्ग २० मध्ये कौसल्या प्रथम म्हणाली आहे की - 'मी तुझ्याबरोबर येणार' व २१ मध्ये म्हणाली की तू जाऊ नकोस. मी तुला अनुज्ञा देत नाही. तशातही गेलास तर मी प्रायोपवेशन करून मरेन व तुला नर्कात पडावे लागेल. (२५, २७, २८) अशा भाषेचा विचारसुद्धा मानसातील कौसल्येच्या मनास शिवला नाही.

**चौ. ३ - (१) धर्मस्नेह घेति घेरुनि मति** - एकीकडे धर्म तिच्या बुद्धीला खेचून सांगत आहे की, पतिविरोध व सवतीशी विरोध करणे अधर्म आहे. पुत्र स्नेह दुसरीकडे ताणून सांगतो की रामासारखा पुत्र आणि तू त्याची आई? 'वनात जा' म्हणून तू सांगणार? तुला आई म्हणावी तरी कशी? वाटेल ते कर पण मुलाला ठेऊन घे. इ. एक धरवत नाही व एक सोडवत नाही. अशी तिच्या बुद्धीची दशा झाली आहे. **(क)** सापाने एकदा चिचुंदरीला चुकून धरली म्हणजे फार कठीण प्रसंग असतो. गिळली तर मरतो व सोडली तर आंधळा बनतो. अशाच पेचात रामजननी सापडून हृदयात चिंतेचा दारुण दाह होत आहे. **(ख)** येथे 'धर्मस्नेह' म्हणून धर्माचा उल्लेख प्रथम करून सुचविले की रामजननी शेवटी धर्मालाच प्राधान्य देणार.

**चौ. ४ - (१) धर्महानि नी बंधूविग्रह** - ठेऊन घेतला तर धर्मनाश होणार व भावाभावात विग्रह = विरोध म्हणजेच भाऊबंदकी व गृहकलह माजणार. पितृवचन - परिपालनापासून पुत्राला पराङ्मुख करावा लागणार. पतीच्या आज्ञेविरुद्ध मुलाला आज्ञा द्यावी लागणार. सापल मातेच्या आज्ञेचा भंग करण्यास पुत्रास भाग पाडावे लागणार व सवतीशी विरोध करावा लागणार. हाच धर्मनाश करावा लागणार. बंधुविरोध सुरू झाला की प्रजेतही फूट पडणार. या प्रमाणे पुत्राला ठेऊन घेण्याने दोन्ही प्रकारे महा अनर्थच होणार. ल.ठे. हा अत्यंत महत्त्वाचा विचार वा. रा. कौसल्येने केला नाही. कोणता आदर्श अधिक वंद्य हे वाचकांनीच ठरवावे.

हिं. *। कहउँ जान बन तौ बड़ि हानी । संकट सोच बिबस भइ रानी ॥५॥*
*। बहुरि समुझि तिय धरम सयानी । रामु भरतु दोउ सुत सम जानी ॥६॥*
*। सरल सुभाउ राम महतारी । बोली बचन धीर धरि भारी ॥७॥*
*। तात जाउँ बलि कीन्हेहु नीका । पितु आयसु सब धरमक टीका ॥८॥*

म. *। म्हणूं वनीं जा तरि अति हानी । संकट-चिंता-व्याकुळ राणी ॥५॥*
*। स्त्री धर्मा समजुनी शहाणी । राम भरत सुत-युग सम मानी ॥६॥*
*। राममाय ती स्वभाव-सरला । वदे धरुनि भारी धीराला ॥७॥*
*। धन्य बाळ ! करिशी कीं इष्ट चि । सर्वधर्मि पित्राज्ञा श्रेष्ठचि ॥८॥*

**अर्थ** - (विचार करते की) वनात जा असे सांगावे तर मोठीच हानी होणार. या प्रमाणे धर्मसंकट व चिंता-शोक यांनी राणी व्याकुळ झाली.॥५॥ (पण) स्त्रीधर्म काय आहे हे मनात जाणून त्या शहाण्या राणीने राम व भरत हे दोन्ही पुत्र सारखेच आहेत (मला) असे मानले (जाणले)॥६॥ ती रामजननीच असल्याने स्वभावताच सरळ आहे; म्हणून भारी धीर धरून म्हणाली की - ॥७॥ बाळ ! धन्य आहेस ! जे इष्ट (उचित) आहे तेच करीत आहेस; कारण सर्व धर्मामध्ये (धर्मी) पित्याची आज्ञा (आज्ञापालन करणे) हा धर्मच श्रेष्ठ आहे.॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) म्हणूं वनीं जा तरि अति हानी** - वनात जा सांगितले तर काय होईल याचा विचार करू लागली तेव्हा दिसले की फार मोठी हानी होईल. राजाला, प्रजेला, स्वतःस व रामाला प्रचंड क्लेश होतील. ज्या भरताला राज्य देण्याचे ठरविले आहे त्यालाही अत्यंत क्लेश होणारच. हीच फार मोठी हानी वाटली. धर्महानी व बंधुविरोध पदरात घ्यावयाचा की इतक्या सर्वांच्या पदरात प्रचंड क्लेश घालावयाचे आणि वनात जा असे सांगावयाचे. ही चिंता उत्पन्न झाली; म्हणून म्हटले **'संकटचिंताव्याकुळ राणी'. (क) 'राणी' शब्द का? माता का** नाही? राणी शब्द राज्याचा संबंध दर्शविणारा आहे. राणी या भूमिकेवरून कौसल्येने विचार केला तेव्हा धर्म हानी अल्प वाटली व स्नेहहानि फार मोठी वाटली. पण मी राणी नसते तर माझे कर्तव्य काय याचा विचार ती करू लागली तेव्हा जे ठरले ते आता सांगतात.

**चौ. ६** - (१) स्त्रीधर्माचा विचार करू लागली तेव्हा ठरले की राणीधर्मापेक्षा

स्त्रीधर्म श्रेष्ठ आहे. मी प्रथम दशरथपत्नी झाले व मग पट्टराणी झाले. **पत्नीधर्म नित्य आहे. राणी धर्म आगंतुक, अनित्य आहे. 'नारिधर्म पतिदेव न दूजा'** 'धैर्य धर्म सन्मित्र **सुनारी** । आपत्काळि **परीक्षित** चारी ।।७।। **वृद्ध** रोगवश निर्धन जडमति । अंधबधिर **कोपिष्ट दीन अति** ।। करि अशाहि पतिच्या अपमाना । नारि भोगि यमलोकिं यातना ।।९।। **पतिस विरोधी जिथें जन्मते । तरुणपणीं ती विधवा बनते** ।।१९ (३।५). राजे वृद्ध झाल्याने त्यांच्या बुद्धीस भ्रम पडून ते वचनबद्ध होऊन अतिदीन झाले **तरी पति वचनाच्या विरुद्ध आज्ञा मुलाला देणे हा स्त्रीधर्म नाही.** (क) कैकयीच्या कुटिलपणाचे वर्णन करताना कवींनी अनेक ठिकाणी वरचेवर राणी शब्द वापरला आहे. येथे कौसल्येविषयी बऱ्याच वेळा माता शब्द वापरला व नंतर त्याचा संबंध राणीशी जोडला. कैकयीने राणी या भावनेनेच बोलण्यास प्रारंभ केला. स्त्रीधर्माचा व मातृधर्माचा विचारच तिने सोडला व तिला राज्यच दिसत होते. पति, प्रिय या शब्दांचा उपयोग करण्याचे सोडून नृप ! नृप नरेश ! म्हणूनच ती दशरथांस संबोधू लागली. येथे उलट झाले. प्रथम मातृभावना जागृत झाल्यामुळे पुत्राला वनात पाठविणे महा हानी वाटली. राज्याचा विचार करू लागली तेव्हा बंधु विरोध दिसू लागला. पण स्त्रीधर्माचा विचार करू लागताच निश्चय झाला की रामाने वनात जाणेच इष्ट आहे; व तसे स्वतः पुत्रास सांगणे हे आद्य कर्तव्य आहे. **स्त्रीने स्वतःच्या व सवतीच्या मुलांत भेद मानणे योग्य नव्हे.** कारण ते सर्व पतीचेच पुत्र असतात. रामाला राज्य मिळाले काय व भरताला मिळाले काय सारखेच असा निर्णय घेतला. त्यामुळे राज्याभिषेकाचा व राज्याचा प्रश्न व संबंध तुटला. येथे प्रथम पत्नीधर्म, नंतर त्याला प्रतिकूल नसेल तो मातृधर्म व पत्नीधर्माला प्रतिकूल नसणारा राज्ञीधर्म असा क्रम कौसल्येने आपल्या मनाशी ठरविला. पत्नीधर्म मुख्य मानून त्या प्रमाणे वागण्याचे तिने ठरविले म्हणून कौसल्या शहाणी ठरली. **अशा वेळी पत्नी धर्माला प्रामुख्य देऊन इतर धर्मांना गौणत्व देणारी स्त्री शहाणी.**

**ल. ठे. मानसांतील कैकयी व वा. रा. कैकयी** पत्नीधर्म विसरल्या व राणीधर्मालाच प्रामुख्य देणाऱ्या ठरल्या. वा. रा. कौसल्या मातृधर्माला प्राधान्य देऊन पत्नीधर्माला गौण समजणारी अशी स्वभावतः आहे. त्यामुळे पुष्कळ उपदेश

करून पत्नीधर्माचे महत्त्व पटवून देण्याची कठीण कामगिरी रघुनाथास करावी लागली आहे. मानसांतील कौसल्या स्वभावतःच पत्नीधर्माला प्राधान्य देणारी 'राममाताच ती' असे म्हणण्यास लावणारी आहे.

**चौ. ७. (१) राममाय ती स्वभाव सरला** - राम जसे सहज सरल आहेत तशी त्यांची माता कौसल्या आहे. **(क) धरुनी भारी धीराला वदे** - जो निश्चय केला आहे तो बोलून दाखवायचा आहे. मातेने रामासारख्या पुत्राला 'वनांत जा' असे वा या अर्थाचे शब्द सांगणे भाग आहे. अत्यंत प्रेमळ मातेच्या हृदयाला हे करणे अत्यंत कठीण, कठोर आहे. म्हणून भारी धीर धरावा लागला. हृदय अत्यंत कठीण करावे लागले. वनगमनाची वार्ता ऐकून झाल्यावर मुखाकडे पाहण्यास व बोलण्याससुद्धा धीर धरावा लागला. तरीपण गदगद कंठानेच बोलता आले. पण येथे भारी धीर धरल्यामुळे कंठ गदगद झाला नाही. सार हे की पत्नीधर्माच्या विवेकाने पुत्रवात्सल्यावर विजय मिळविला. आज्ञा देताना जे शब्द वापरीत आहे त्यात पुत्र वात्सल्याचे संरक्षण वाणीने केले आहे असे दिसेल.

**चौ. ८ - (१) करिसी कीं इष्ट चि** - जे इष्ट आहे तेच करीत आहेस असे म्हणाली. 'वनात जा' असे पुत्रवत्सल वाणीला म्हणवले नाही. तिच्या शब्दांचा अर्थ वनात जात आहेस तेच योग्य आहे. म्हणजे वनात जा माझी हरकत नाही. असाच असला तरी 'वन व वनवास' हे शब्द उच्चारण्यास धीर झाला नाही. दशरथानीसुद्धा 'रामवनवास' हे शब्द उच्चारण्याचे टाळले आहे. 'दुसरा वर' या शब्दांनीच त्या अर्थाचा बोध केला आहे.

*हिं.दो. । राजु देन कहि दीन्ह बनु मोहि न सो दुख लेसु ॥*
*॥ तुम्ह बिनु भरतहि भूपतिहि प्रजहि प्रचंड कलेसु ॥५५॥*

*म.दो. । राज्य देउं वदुनी दिलें बन, मज दुःख न लेश ॥*
*॥ तुजविण भरत-नृपां प्रजे दुःसह होती क्लेश ॥५५॥*

**अर्थ** : राज्य देऊ म्हणून सांगून वन दिले याबद्दल मला लेशमात्र दुःख वाटत नाही; (पण) तुझ्या वाचून भरताला, राजांना व प्रजेला दुःसह क्लेश होतील (याचे फार दुःख वाटते) ।।दो.५५।।

**टीका.** - पूर्वार्धावरून हे स्पष्ट झाले की 'राज्यलोभ रामा नसे' हे जितके

खरे तितकेच हेही खरे की ॥ **रामजननिला राज्यलोभ नहि** ॥ पण पत्नी धर्माचा त्याग न करता रामास ठेऊन घेता आला तर थोडा प्रयत्न मातृहृदय करून पहात आहे. ज्या भरताला राज्य दिले जाणार त्याला तुझ्या वाचून दुःसह क्लेश होतील. असे क्लेश प्राणप्रिय भरताला देणे हे त्याला अनुकूल वागणे ठरेल की प्रतिकूल? **(क) भरताचा उल्लेख प्रथम** करून हे दाखविले की जास्तीत जास्त क्लेश भरतास होतील. हे कौसल्येचे भाकीत शब्दशः खरे झाले आहे. भरताइतके क्लेश रामचंद्रांनीही सोसले नाहीत हे या काण्डात दिसेल. भरताला राज्य म्हणजे शोकसमाज वाटला आहे. 'भरतविषयिं मज खंति', 'मज चिंता भरताची भारी' असे कौसल्या म्हणाली आहे. **(ख)** भरतानंतर उल्लेख दशरथांचा केला. कारण त्यांना भरताएवढे क्लेश सोसावे लागले नाहीत. फक्त सहा दिवसच त्यांनी क्लेश भोगले. **सहाव्या रात्री क्लेशांचा अंत देहान्ताबरोबर झाला आहे.** पित्याची आज्ञा-वचन-पालन करून पित्यालाच दुःसह दुःख देणे सुद्धा योग्य नाही. शिवाय सर्व प्रजा अति दुःखी होणार व 'जिथें प्रजा प्रिय दुःखी भारी । तो नृप खचित निरय-अधिकारी' (७१।६) असा परिणाम राजांना भोगावा लागणार, तेव्हा वडिलांची आज्ञा पालन करून त्यांना नर्काचे अधिकारी बनविणे योग्य आहे काय? याचा विचार केला पाहिजे. यामुळेच मला विशेष वाईट वाटते. मी सर्व क्लेश कसेतरी सहन करीन पण यातील गोष्टी घडणे इष्ट नाही; म्हणून म्हणते की -

*हिं. । जौं केवल पितु आयसु ताता । तौ जनि जाहु जानि बड़ि माता ॥१॥*
*। जौं पितु मातु कहेउ बन जाना । तौ कानन सत अवध समाना ॥२॥*
*। पितु बनदेव मातु बनदेवी । खग मृग चरन सरोरुह सेवी ॥३॥*
*। अंतहुँ उचित नृपहि बनबासू । बय बिलोकि हियँ होइ हराँसू ॥४॥*

*म. । जर केवळ पित्राज्ञा ताता । जा न, जाणुनी श्रेष्ठा माता ॥१॥*
*। माय बाप जर कथिती जावें । वन किं अयोध्याशत समजावें ॥२॥*
*। बाप माय वनदेव नि देवी । खगमृग चरणसरोरुह - सेवी ॥३॥*
*। नृपां उचित वनवासहि अंतीं । विलोकुनी वय वाटे खंती ॥४॥*

**अर्थ :** जर (तुम्ही म्हणालात त्याप्रमाणे) केवळ पित्याचीच आज्ञा असती तर माता अधिक श्रेष्ठ असे जाणून जाऊ नको (असे म्हटले असते)॥१॥ पण जर

(सचिव पुत्राने सांगितल्याप्रमाणे) पिता व माता यांनी वनात जा असे सांगितले आहे तर अरण्य शंभर अयोध्येसारखे आहे.।।२।। वनात वनदेव तुमचे पिता व वनदेवी माता (होतील आहेत) व पशुपक्षी चरणकमलांची सेवा करणारे (सेवक) होत ।।३।। आयुष्याच्या शेवटच्या काळात (म्हातारपणी) राजांनी वनवासास जाणे योग्य आहे. (पण तुमच्या) वयाकडे पाहिले म्हणजे दुःख होते (इतकेच) ।।४।।

**टीका. चौ. १ -** (१) मागील 'धन्य तात करिसी कीं इष्ट चि । सर्वधर्मि पित्राज्ञा श्रेष्ठ चि ।।' या चौपाईत व येथील पहिल्या चौपाईत विरोध दिसतो; पण विरोध नाही. 'देति तात मज कानन राज्य' इतकेच रघुवीराने सांगितले आहे. म्हणजेच केवळ पित्राज्ञेचाच उल्लेख आहे. पण सचिवसुताकडून सर्व हकीकत ऐकल्याने कळले आहे की माता व पिता दोघांनी आज्ञा दिली आहे. सचिवपुत्राच्या वचनाबद्दल संशय वाटला असता तर 'बाप माय वनदेव नि देवी' इ. निरवानिरवीची भाषा न बोलता विचारले असते की यात खरे काय आहे? पण तसे घडलेले नाही. म्हणून या चौपाईत 'असे मी म्हटले असते' हे शब्द अध्याहृत आहेत. मग ही चौपाई येथे कशाला असे कोणी म्हणतील. येथे हेच दाखवावयाचे आहे की, केवळ पित्याची आज्ञा असती तर मागील दोह्यांतील उत्तरार्धाचा टीकेत दाखविलेला गूढार्थ लक्षात घेऊन 'जाऊ नको' असे म्हणण्याचा अधिकार मातेला होता.

(२) **सिद्धान्त हा दाखवावयाचा आहे की** पित्याच्या या आज्ञेच्या पालनाने पित्यासच प्रचंड क्लेश व नरकप्राप्ती होईल असे स्पष्ट दिसत असेल तर मातेने पुत्रास विरुद्ध आज्ञा द्यावयास हरकत नाही. पुं नावाच्या नर्कापासून सोडविणारा तो पुत्र. तो पित्याची आज्ञा पालन करून पित्यास नरकात पाडण्यास कारण होत असेल तर पतीचे परलोकहीत साधण्यासाठी व पुत्राचे पुत्रत्व सार्थक करण्यासाठी मातेने विरोध करणे पत्नीधर्मविरोधी नाही. मात्र मातेने पित्याच्या आज्ञेच्या विरुद्ध आज्ञा दिलेली नसता बापाची आज्ञा पालन करताना परिणामाचा विचार करणे उचित नाही. 'उचित किं अनुचित करत विचारा । धर्मनाश, शिरिं पातक भारा' (१७७।४) हा नियम केवळ पित्राज्ञा असेल तेथे पाळलाच पाहिजे पुत्राने; कारण 'सर्व धर्मि पित्राज्ञा श्रेष्ठ चि'.

**चौ. २ -** (१) ज्या अर्थी मातेने (कैकयीने) व पित्यानेही आज्ञा दिली आहे

त्या अर्थी आता मी नको म्हणणे शक्य नाही. सापत्न माता की स्वतःची माता हा विचार पुत्राने अशा वेळी करावयाचा नाही, हे येथे कैकयी शब्द न घालता, 'माय' (मातु) शब्द घालून दाखविले आहे. (क) नोकर-चाकर, माता-पिता यांस वनात बरोबर नेता येत नाही, तेव्हा तेथे पालनपोषण व संरक्षण आणि सेवा कोण करणार हा प्रश्न मातेच्या पुढे उभा राहिला आहे. उत्तर पहा :

**चौ. ३-४** (१) वनदेवींना माता समजा व वनदेवांस पिता समजा म्हणजे ते तुमचे पालनपोषणादि करतील. पशुपक्षीगणांनी सेवा केल्याचा उल्लेख पुढे चित्रकूट कथेत आहे. (क) या कोवळ्या वयात राजांनी, राजपुत्रांनी वनात जाणे इतरांच्या दुःखास कारण होणार व होत आहे असे कौसल्या म्हणते. खंती = विषाद, खेद, चिंता = हरासू, हरास हा 'न्हास' चा अपभ्रंश आहे. आता राममहती वर्णन करता करता न कळत माधुर्य भावातून ऐश्वर्यभावात प्रवेश करीत आहे.

***हिं.*** *। बडभागी बनु अवध अभागी । जो रघुबंस-तिलक तुम्ह त्यागी ॥५॥*
*। जौं सुत कहउँ संग मोहि लेहू । तुम्हरे हृदयँ होइ संदेहू ॥६॥*
*। पूत परम प्रिय तुम्ह सबही के । प्रान प्रान के जीवन जी के ॥७॥*
*। ते तुम्ह कहहु मातु बन जाऊँ । मैं सुनि बचन बैठि पछिताऊँ ॥८॥*

***म.*** *। बहुभागी वन अभागिणी पुरी । रघुकुळटिळका त्यजा जिस पुरी ॥५॥*
*। न्या मजला संगें सुत ! म्हणुं जर । हृदिं संदेह होइ तुमच्या तर ॥६॥*
*। पुत्र ! परम तुम्हिं प्रिय, सर्वांचे । प्राणां प्राणहि जीव जिवांचे ॥७॥*
*। ते तुम्हिं म्हणां जाउं माते वनिं । श्रवुनि, बसुनि मी पस्तावें मनिं ॥८॥*

**अर्थ :** (ज्या वनात तुम्ही जाल) ते वन महा भाग्यवंत व हे रघुकुळटिळका जिला तुम्ही पुरी = पूर्णपणे त्यागता ती ही पुरी पुरी अभागी आहे.॥५॥ पुत्रा ! मला बरोबर (वनात) न्या असे मी सांगितले तर तुमच्या हृदयात संशय येईल. (हे मला माहीत आहे म्हणून मी तसे म्हणत नाही)॥६॥ पुत्रा ! तुम्ही सर्वांनाच परम प्रिय आहात; (कारण) तुम्ही प्राणांचे प्राण व जिवांचे जीव आहात.॥७॥ ते तुम्ही म्हणता की 'माते मी वनात जातो.' (तेव्हा) हे ऐकून मला स्वस्थ बसून पश्चात्ताप करीत राहिले पाहिजे.॥८॥

**टीका. चौ. ५** - (१) बहुभागी वन अभागिणी पुरी - पुरी = अयोध्या

नगरी व पुरी = पुरती, पूर्ण. या नगरीतील सर्वांचे भाग्य संपले व अभाग्य उदयास आले. म्हणूनच तुम्हाला या पुरीचा त्याग करून वनात जाण्याची इच्छा झाली आहे. दाखविले की रामसांनिध्य हे भाग्याचे मूळ आहे व रामवियोग अभाग्याची सीमा आहे. 'तिलक' शब्दाने राज्याभिषेक सुचविला. भाव हा की रघुवंश विभूषण होणार होतात अशा परम भाग्याच्या वाटणाऱ्या दिवशीच तुम्ही तिचा त्याग करीत आहात. (क) कौसल्येच्या चित्तांत एकाएकी ऐश्वर्य भाव जागृत झाला आहे. ती म्हणते की 'तुम्ही त्याग करता.' ती असे नाही म्हणत की 'विधीने तुम्हास अयोध्येतून नेले. वनाच्या भाग्याची स्तुती देवांनीसुद्धा केली आहे. (दो. १३८।१, १३९।७ पहा.)

**चौ. ६ - (१) हृदिं संदेह होइ तुमच्या** - माझी माता पतिव्रतपरायण नाही; म्हणून पिता माझ्या वियोग शोकाने अत्यंत व्याकुळ झालेले असता त्यांना तसेच टाकून माता माझ्याबरोबर वनास येण्यास निघाली अशी शंका तुम्हाला येईल. 'अनुव्रजिष्यामि वनं त्वयैव' (वा.रा. २०।५४) मी तुझ्या मागोमाग वनात येईन. असे कौसल्या म्हणाली आहे. त्यावर रामचंद्रांनी चांगले खरमरीत उत्तर दिले आहे की 'तस्मिन् पुनर्जीवति धर्मराजे । विशेषतः स्वेपथिवर्तमाने ॥ देवी मया सार्धमितोऽ पगच्छेत् । कथांविदन्या विधवेव नारी' (२।२१।६१) राजा धर्मराजा असून व विशेषतः आपल्या धर्ममार्गात वर्तमान असून ते **जिवंत असता एखाद्या साधारण विधवा स्त्रीप्रमाणे देवीने माझ्याबरोबर येणे कसे शक्य आहे? मानसांतील कौसल्येने पुत्राच्या मुखाने असा तडाका खाण्याची वेळ येऊ दिली नाही. कोणता आदर्श वाचकांस शुद्ध व श्रेष्ठ वाटतो?**

**चौ. ७ - (१) पुत्र परम तुम्हिं प्रिय सर्वांचे... जिवांचे** - या चौपाईने ऐश्वर्यभावना पूर्णपणे व्यक्त केली. **'हे प्रिय सर्वां जितके प्राणी'** (१।२१६।७) या वचनाने विश्वामित्राने रघुवीराविषयीचा विदेही जनकाचा संदेह निवारण केला आहे. **'जीवन जीवा प्राणां प्रियंही । सकलसखा निःस्वार्थि रामही । पूजनीय जे प्रिय अति जितके । मान्य रामनात्यानें तितके** ॥ ७४।६-७ ॥ असे सुमित्रेने लक्ष्मणास सांगितले आहे. **(क) पुत्र ! (पूत) तुम्ही सर्वांचे परमप्रिय आहात.** सर्वांना प्रिय असतो आत्मा. 'प्रेष्ठतमः आत्मा' **प्राणां प्राणहि** = प्राणांना प्राणन करण्याची

शक्ति ज्याच्यामुळे असते तो तुम्ही आहात व जिवांचे जीव म्हणजे जिवांचे जीवन ज्याच्यामुळे असते तेच तुम्ही आहात. म्हणजेच तुम्ही परमात्मा, ब्रह्म आहात हे येथे उघड केले. 'यत् प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्राणीयते... तद् एव ब्रह्म' (के.उ.) जे प्राणाच्या योगाने श्वसन करीत नाही पण ज्याच्यामुळे प्राण प्राणन करतात ते ब्रह्म.

**चौ. ८ - (९) ते तुम्हिं म्हणां जाउं वनिं माते !** असा जो परमात्मा तोच पुत्ररूपाने मला विचारीत आहे की माते ! मी वनात जातो ! भाव हा की 'आले देवाजीच्या मना । तेथें कोणाचे चालेना' ज्याच्या दर्शनासाठी 'जन्म जन्म मुनि झिजति साधनीं' पण 'अंतीं राम न येत आननीं' (४।१०।३) तो साक्षात्पुत्ररूपाने प्राप्त झाला असता मला मातेला व सर्वांना सोडून जाण्यास निघाला असता त्याच्या इच्छेविरुद्ध कोण काय करू शकणार? अत्रि-आश्रमातून जाताना राम अत्रींची अनुज्ञा मागतात तेव्हा अत्रि असेच म्हणाले - 'कसें सांगुं 'जा आता स्वामी' । वदा नाथ तुम्हिं अंतर्यामी । यत्कृपेसि अज शिवसनकादिहि । वांछिति परमार्थवादि सर्वहि ।। राम ! अकामप्रिय आपण ते । दीनबंधु मृदु वचना वदते' (३।६।९,५,६) **(क) श्रवुनि, बसुनि मी पस्तावें मनिं** - आतां स्वस्थ राहून पश्चात्ताप करीत बसण्याशिवाय माझ्या हाती काही राहिले नाही. **'शोक' न म्हणतां 'पश्चात्ताप' कां म्हटले?** भाव हा की पुत्ररूपाने प्राप्त झालेला परमात्मा, मला सोडून १४ वर्षे वनात जात असता माझे मातेचे हृदय शतशः विदीर्ण होऊन रामाच्या हाती या देहाचे दहन व्हायला पाहिजे होते. पण ही छाती वज्रापेक्षाही कठोर ! व माझे रामावर पाहिजे तितके प्रेम नाही, याबद्दल आता पश्चात्ताप करणेच भाग आहे. पुढे कौसल्या स्पष्टच सांगते भरतास - 'गत वनिं राम स-सीता-लक्ष्मण । गेल्यें ना, पाठविले प्राण न ।। हे घडले देखत नयनी या । त्यजि न अभागि जीवन तरि काया ।। लाज न मज मत्प्रेम पहातां । रामसदृश सुत मी तन्माता ।। (१६६।५-७)

**ल.ठे.** - रामस्वरूपाचे रहस्य ज्ञान या वेळी जागृत झाले नसते तर कौसल्येचीसुद्धा दशरथांसारखीच स्थिती झाली असती. पण शतरूपा असताना जो वर मागून घेतला व विश्वरूप दर्शनानंतर 'प्रभु न अतां कधिं लाभो तव

माया मजला हि' (१।२०२) असे सांगितले त्यामुळे ती मायेच्या आवरणात राहिली नाही व **ज्ञानशक्ति जागृत झाली आहे.**

*हिं.दो. । यह बिचारि नहिं करउँ हठ झूठ सनेहु बढ़ाइ ॥*
*॥ मानि मातु कर नात बलि सुरति बिसरि जनि जाइ ॥५६॥*

*म.दो. । या विचारिं करितें न हट मिथ्या स्नेह धरून ॥*
*॥ मान मातु नातें मला जाउं नको विसरून ॥५६॥*

**अर्थ** : या विचाराने (असा विचार करून) मिथ्या स्नेह बाळगून मी हट्ट करीत नाही. पण मातेचे नाते तू मान आणि (तू मात्र) मला विसरून जाऊ नकोस.॥दो.५६॥

**टीका. (१) या विचारिं** - या विचाराने. मी माता असून अशा पुत्राच्या वियोगाने माझे हृदय फुटून मी मेले नाही त्या अर्थी माझे प्रेमच मिथ्या-खोटे आहे. खरे प्रेम असते तर वनात जा असे म्हणण्यास मी जगले नसते, असा विचार करून, हट्ट धरून बसण्याइतके माझे प्रेम आहे कुठे? **प्रेम नसता हट्ट** धरणे - **सत्याग्रह करणे - मूर्खपणा आहे.** सार हे की रामाची माता होण्यास मी लायक नाही. 'कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति' या वचनाला मी अपवाद ठरले. तू सुपूत्र असून मी कुमाता आहे. तथापि. **(क) मान मातु नाते** - मी माता व तू पुत्र हे नाते, माझ्या अपात्रतेमुळे नष्ट होत नाही. हा पापी अभागी देह जोपर्यंत राहील तोपर्यंत लोक मला राममाता, रघुनाथमाता म्हणणारच. मी जरी पुत्रवात्सल्याला पारखी झाले असले तरी तू मातृभावनेला पारखा होऊ नकोस; आणि नालायक, कठोर हृदयी, प्राणलोभी का असेना पण माझी कौसल्या नावाची एक माता आहे हे **तू मात्र विसरू नकोस. येथे हे दाखविले की प्रेम नाहीसे झाले तरी नाते नष्ट होत नाही; देह असेपर्यंत ते मानणे जरूर आहे.** हा व्यावहारिक, देहसंबंधी दृष्टीने अर्थ झाला.

**आधिदैविक अर्थ** - मी जीव व तुम्ही परमात्मा भगवान आहात. दासाला सोडून जर परमात्मा, भगवान जाऊ लागले तर दासाचा तो निरुपाय आहे. तुझ्या मायेच्या योगानेच आमचे तुझ्यावर पूर्ण प्रेम बसत नाही व तुझ्या वियोगाने माझे प्राण जात नाहीत. माझ्यापेक्षा अधिक प्रेमी दास असतील त्यांच्यावर कृपा

करण्यास जात असलात तरी पुत्र वात्सल्यभावाने वेडेवाकडे प्रेम करणारा एक कौसल्या देहधारी अपात्र जीव सेवक आहे हे इतके भगवंता ! तुम्ही तरी विसरू नका. **'बहुत भक्त तुम्हाला आम्हाला कोण पूसते'** असे व्हायचे नाहीतर? **'एक मी मंद मोहवश कुटिल हृदय अज्ञान ॥ त्यात मला प्रभु भुलविती दीनबंधु भगवान ॥** (४।३) **'नाथ ! जीव तव मायें मोहित । केवळ तुमच्या कृपेंचि मोचित'** (४।३।२) असे जे रामदूताने म्हटले तोच भाव येथे आधिदैविक दृष्टीने आहे.

**अध्यात्मपर अर्थ** - तुम्ही जीवांचे जीव, प्राणांचे प्राण ब्रह्म आहात; या विचाराने हट्ट करणे अज्ञान आहे. कारण की जागतिक स्नेह मिथ्या आहे. तुम्ही सर्व व्यापक असल्याने कुठे जात नाही नी येत नाही. मग विरह कुठला? हे जरी तात्त्विक दृष्टीने खरे असले तरी व्यावहारिक सत्ता प्रारब्ध क्षयापर्यंत नष्ट होत नाही; म्हणून व्यावहारिक नाते तुम्ही विसरू नका इतकेच सांगणे आहे.

**ल.ठे.** पुत्रावर, रामावर काही संकटे येऊ नयेत, तो निर्भय निरोगी, कुशल रहावा म्हणून वा. रामायणात सर्ग २५।१-४६ मध्ये **मातेने स्वस्त्ययन केले आहे.** वा.रा. कौसल्या हे जाणत नाही की राम परमात्मा, ब्रह्म आहेत. म्हणून तेथे ते आवश्यकच होते. मानसातील कौसल्या हे रहस्य जाणते तरीपण 'सोंगायोग्य किं नटे नाचणे' या न्यायाने थोडेसे करतेच. वा. रा. २।२५ हा सर्ग अवश्य मननीय आहे. कोणी दूर देशात जात असता माता-पिता इत्यादी वडील माणसांनी कशी व कोणाकोणाची प्रार्थना करावी व खरे संरक्षक व कल्याणकर्ते कोण याचे ज्ञान त्या एका सर्गावरून करून घेणे आवश्यक आहे.

*हिं.* *। देव पितर सब तुम्हही गोसाई । राखहुँ पलक नयन की नाई ॥१॥*
*। अवधि अंबु प्रिय परिजन मीना । तुम्ह करुनाकर धरम धुरीना ॥२॥*
*। अस बिचारि सोइ करहु उपाई । सबहि जिअत जेहिं भेंटहु आई ॥३॥*
*। जाहु सुखेन बनहि बलि जाऊँ । करि अनाथ जन परिजन गाऊँ ॥४॥*

*म.* *। गोस्वामी तव देव - पितर - गण । पक्ष्म नयन इव करोत रक्षण ॥१॥*
*। जल अवधी प्रिय परिजन मीन । तुम्हिं करुणाकर धर्म-धुरीण ॥२॥*
*। जाणुनि हें त्या करा उपाया । जितां सकल याल किं भेटाया ॥३॥*
*। लिंबलोण करुं, सुखें किं जा वनिं । जन परिजन पुर अनाथ बनवुनि ॥४॥*

**अर्थ** - गोस्वामी ! पापण्या जसे डोळ्यांचे रक्षण करतात तसे देवांचे व पितरांचे सर्व समूह तुमचे रक्षण करोत.॥१॥ चौदा वर्षाचा अवधि हे पाणी असून प्रिय असणारे सर्व लोक व कुटुंब हे मासे आहेत व तुम्ही करुणेचे आगर असून धर्मधुरीण आहात.॥२॥ याचा विचार करून (जाणून) असा उपाय करा की (अवधि सरताच) सर्वजण जिवंत असता तुम्ही भेटण्यास येऊ शकाल.॥३॥ जा, सुखाने वनात जा, मी तुमच्यावरून (देह कुरवंडून) लिंबलोण करते. सर्व नगरी, आपले कुटुंब व सेवक या सगळ्यांना अनाथ बनवून (करून) खुशाल जा ! ॥४॥

**टीका. चौ. १ - (१) देवपितरगण रक्षण करोत** - हे स्वस्त्ययनाचे सार आहे. श्रीतुलसीदास वाल्मीकीचेच अवतार असल्याने वा.रा. मध्ये ज्या गोष्टींचा विस्तार केला आहे त्यांचा मानसांत संक्षेप किंवा अतिसंक्षेप केला आहे. कारण ती वर्णने लोकांच्या पुढे आहेतच. पुनरुक्ति करून ग्रंथ वाढविण्यात काय अर्थ? ज्या विषयांचे वर्णन तेथे अति संक्षेपाने आहे त्यांचा विस्तार व चरित्रचित्रण परमोच्च आदर्श करण्यात वाल्मीकी रामायणात जेथे जेथे न्यूनता आहे तेथे तेथे ती अन्य ग्रंथांच्या आधारे भरून काढली आहे हे आतापर्यंतच्या या टीकेवरून कळले असेलच.

## वा. रा. मधील स्वस्त्ययनाचे सार

कौसल्या माता रामचंद्रास म्हणते : संतांच्या मार्गाने चाल. ज्या धर्माचे तू पालन करीत आहेस तो धर्म तुझे रक्षण करो. ज्या देवांना व ऋषींना तू नमस्कार करतोस ते तुझे रक्षण करोत. विश्वामित्राने जी अस्त्रे दिली आहेत ती पितृसेवा, मातृसेवा, सत्य, विप्रांच्या वेदी, स्थंडिले, पर्वत, वृक्ष, झुडपे, डोह, पतंग, पन्नग, सिंह, साध्य, विश्वदेव, मरुत, महर्षी तुझे रक्षण करोत. स्वस्ति धाता, विधाता पूषा, भग, अर्यमा, लोकपाल, इंद्रादि देव, ऋतु, पक्ष, मास, वर्ष, रात्र, दिवस, मुहूर्त तुझे कल्याण करोत. पृथ्वी, सरिता, नक्षत्रे, ग्रह तुझे रक्षण करोत. आदित्य व दैत्य तुला सुख देवोत. राक्षस, पिशाच, हिंस्र पशुपक्षी, विंचू, सर्प, डास, मशक, सरडे, किडे यांच्यापासून तुला भय नसो व पीडा न होवो. ज्या ज्या देवतांची व

पितरांची मी पूजा, सेवा केली आहे ते सर्व तुझे रक्षण व पोषण करोत. अग्नि, वायु, धूम, ऋषींनी उच्चारलेले मंत्र तुझे संरक्षण करोत. ब्रह्मा तुझे रक्षण करो. नंतर तिने देवदेवतांचे पूजन करून रामाच्या मंगलासाठी होमहवन केले आहे. वसिष्ठांनी हवन करून, शेष द्रव्यांपासून देवांना बली समर्पण केले आहेत.

इंद्र वृत्रासुराबरोबर युद्धास निघताना इंद्राचे जे मंगल केले; गरुड अमृत आणण्यास जाताना विनतेने जे मंगल केले; अमृतोत्पादनाचे वेळी आदितीने वज्रधराचे जे मंगल केले; वामन बलीविजयास जात असता त्याचे जे मंगल केले गेले; ते सर्व मंगल रामा ! तुझे असो. ऋतू, सागर, द्वीप, लोक, वेद, दिशा तुझे शुभमंगल करोत. या प्रमाणे पुत्राच्या मस्तकावर गंधाक्षतादिकांनी मंगल करून, विशल्यकरणी, सिद्धार्थ (इंद्रपुष्पी गडुची व पांढऱ्या मोहऱ्या) इत्यादी औषधींनी मंत्रजपयुक्त रक्षाबंधन कौसल्येने केले. नंतर नमन करून, मस्तकावघ्राण करून, आलिंगन देऊन, विविध आशिर्वाद देऊन पुत्राला प्रदक्षिणा घालून 'अवदत् पुत्र सिद्धार्थो गच्छ राम यथासुखम् ॥ अरोगं सर्वसिद्धार्थ अयोध्या पुनरागतम् ॥ पश्यामित्वां सुखं वत्स सुस्थितं राजवर्त्मनि ॥

**चौ. २ - (१)** राम वनात गेल्यावर सर्व लोक कोणत्या आशेवर जगणार ते आता सांगते. १४ वर्षांची अवधि = मुदतरूपी पाणी सुकून गेले. १४ वर्षे पूर्ण होताच तुम्ही जर अयोध्येत आला नाहीत, तर पाण्यातून बाहेर काढलेल्या माशांसारखे सर्व लोक गुदमरून तडफडत प्राण सोडतील म्हणून एक दिवस सुद्धा जास्त लावू नका ही विनंती आहे. **(क) तुम्हि करुणाकर धर्मधुरीण** - लोकांना किती क्लेश होतील हे तुम्ही जाणता; एवढ्या सगळ्यांना दुःखांत ढकलून जाताना तुम्हाला लोकांची करुणा येईल, वाईटही वाटेल. पण तुम्ही आहात धर्मधुरीण - धर्माचे पालन करण्यासाठी सर्वांना दुःखात लोटून जाणे तुम्हाला भाग पडत आहे. परंतु एक घटका जर जास्त लावलीत परत येण्यास, तर त्याचा अर्थ असा होईल की कोणाच्याही दुःखाचे तुम्हाला काही वाटत नाही. मग मात्र करुणाकर व धर्मधुरीण या नावास बट्टा लागेल; म्हणून :

**चौ. ३ - (१) जाणुनि हें त्या करा उपाया... भेटाया** - हे जाणून वाटेल तो उपाय करा पण १४ वर्षे संपतांच परत येऊन आज जिवंत असलेल्या सर्वांना

भेटा. स्पष्ट न बोलता कौसल्या असा वरच मागत आहे की आज जिवंत असलेल्या अयोध्येतील माणसांपैकी पुढील १४ वर्षात कोणीही मरू नये. हे सांगण्यांत दशरथांना मरण येऊ नये हा मुख्य हेतू आहे. (क) राम सर्वज्ञ त्रिकालज्ञ असल्याने दशरथांस ते **'येऊन भेटेन'** असे म्हणाले नाहीत. 'परत येईन' इतकेच कबूल केले आहे. (४६।३ पहा) मातेला मात्र **'येउनि पाहिन पाय मी'** (५३) असे म्हणाले आहेत. कौसल्येची ही विनंती मान्य करणे अशक्य असल्याने धर्मधुरीण काहीच बोलले नाहीत. त्यामुळे कौसल्येने मर्म जाणलेच; पण स्पष्ट बोलण्याची ही वेळ नाही; तथापि पुन्हा शोकाचा आवेग आलाच म्हणून म्हणते :

**चौ. ४ - (१) सर्व इडा पिडा टळो -** बाकीच्या शब्दांतील भाव हा आहे की एका धर्मपालनासाठी करुणासागर असून, अत्यंत कठोर बनून, विरहदावानलांत सर्वांना लोटून, सर्वांना अनाथ करून जाणे बरे वाटते का? जायचे असेल तर सुखाऽऽने जा; नी करा सगळ्यांना अनाथ. अंतरीचा हेतु आहे की सर्वांनाच बरोबर नेलंत तर काय वाईट? न गेलात तर सर्वांना परमसुख होईल; पण नका जाऊ असे मी म्हणत नाही हो? खुश्शाल जा वनांत नी बनवा सगळ्यांना अनाथ. वात्सल्य रसांतील स्वभावोक्तीचा एक सुंदर नमुना या चौपाईत आहे. (क) विवेकाला मागे सारून पुत्रवात्सल्य व भक्तिरस यांनी आपला अम्मल गाजविण्यास या चौपाईत प्रारंभ केला आहे. तो येथे वाणीमध्ये दिसला. काही वेळ वाणीत राहून तो कृतीत उतरेल व मग हृदयांत पसरेल.

*हिं.* *। सब कर आजु सुकृत फल बीता । भयउ कराल कालु बिपरीता ॥५॥*
*। बहुबिधि बिलपि चरन लपटानी । परम अभागिनि आपुही जानी ॥६॥*
*। दारुन दुसह दाह उर ब्यापा । बरनि न जाहिं बिलाप कलापा ॥७॥*
*। राम उठाइ मातु उर लाई । कहि मृदु बचन बहुरि समुझाई ॥८॥*

*म.* *। आज सुकृतफल सकलांचे गत । झाला काल कराल चि विपरित ॥५॥*
*। विविधा विलपुनि चिकटे चरणां । परम अभागिनि मानि आपणां ॥६॥*
*। भरे दाह हृदिं दुःसह दारुण । विपुल विलाप न करवे वर्णन ॥७॥*
*। उठवुनि राम हृदयिं तिज धरती । मृदु वचनें बहु सांत्वन करिती ॥८॥*

**अर्थ** - सर्वांच्या सुकृताचे फळ आज गेले. काळ विपरीत व कराल झाला.॥५॥ या प्रमाणे नाना प्रकारे विलाप करून कौसल्या रामाच्या पायांना चिकटली (मिठी मारली) व मी अत्यंत अभागीण आहे असे तिला वाटले. (तिने मानले.॥६॥ हृदयांत दु:सह दारुण दाह पसरला; तिच्या (त्या वेळच्या) अपार (विपुल - पुष्कळ) विलापांचे वर्णन करवत नाही.॥७॥ रामचंद्रांनी तिला उठवून हृदयाशी धरली व मृदु वचनांनी तिचे सांत्वन केले.॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) आज सुकृतफल सकलांचे गत** - सर्वांच्या सुकृताचे फळ दिसू लागून आज ते पदरात पडणार होते तो आजच कराल कालाने पलटी खाल्ली व ते फळ पळवले (वनात) **'आज सुफल तप तीर्थे त्यागहि । आज सुफल जप योग विरागहि ॥ सुफल सकल शुभ साधन साज । राम तुम्हा अवलोकत आज ॥** (१०७|५-६) रामचंद्रांचे दर्शन हे सर्वांच्या सुकृताचे फळ रोज मिळत होते व राज्यसिंहासनावर बसलेल्या रामाचे दर्शन हे फळ आज मिळणार होते. पण आता आजपासून लोक रामदर्शनाससुद्धा अंतरणार. तोंडाशी आलेला सुग्रास जाऊन विषारी अन्न तोंडात कोंबले जाणे हे काळ एकाएकी उलटल्याशिवाय घडत नाही. **'विधि विपरीत'** असे लोक म्हणाले. कौसल्या म्हणते **काळ विपरीत** व कराल झाला.

**चौ. ६-७ (१) चिकटे चरणा** - पायांना घट्ट मिठी मारली. 'शबरी चिकटुनि पडली पाई' (३|३४|८) माता असून पाय कसे धरले हा प्रश्न येथे पुढे येतो; पण सुनयना भेटीत हा प्रश्न सुटला आहे. **'वदुनि राणि पद धरुनि राही'** (१|३३७|१ टी.प.) कौसल्येच्या ठिकाणी ऐश्वर्यभाव जागृत झाल्याचे ५६|४ - दो. ५६ च्या टीकेत आधीच सिद्ध केले आहे. येथे ऐश्वर्य व वात्सल्य यांचे युद्ध चालू होते. शेवटी ऐश्वर्य भावयुक्त भक्तीने विजय मिळविला. राम म्हणजे पुत्ररूपाने अपरिमित परमानंद देणारा परमात्मा या भावनेने पाय धरले व अनन्य गतिकत्व सुचविले.

**(२) ल. ठे.** - या भावनेने करुणारसाची सरसता कमी होते हे खरे असले तरी नाट्यकाव्य करुणारसाचा परिपोष उत्तम प्रकारे करून महाकाव्य पद्धतीप्रमाणे एका भक्तिरसात त्याचे पर्यवसान करीत आहेत. नाटकांत शान्तरस अंगी असू

नये, शृंगार किंवा वीर असावा पण महाकाव्यात शान्त-भक्ति-अंगी असणे योग्यच आहे. सर्वत्र (मानसांत) हेच दिसेल की प्रत्येक रसाचे पर्यावसान शेवटी एकाएकी किंवा येथल्यासारखे क्रमशः भक्तिरसांतच केले आहे. वाचकांच्या श्रोत्यावक्त्यांच्या हृदयांत भक्तिरसाचा स्थायी भाव (भगवत्प्रेम) मुख्य बनविणे हे या नाट्य महाकाव्याचे मुख्य ध्येय आहे व ते उत्तम प्रकारे साधले आहे. करुणारसाची कमान खाली येते म्हणून द्राविडी प्राणायामाने या चौपायीचा अर्थ लावण्याची आवश्यकता नाही. वा.रा. कौसल्येने नमन करून प्रदक्षिणा घातल्या आहेत व मग निरोप दिला आहे. सर्ग २५ वा पहा.

(३) **परम अभागिनी मानि आपणां** - अयोध्या नगरी अभागिनी असे मातेने पूर्वीच म्हटले आहे. त्या हिशोबाने कौसल्या माताच असल्याने परम अभागिनीच आहे, यात संशय नाही. नुसत्या पुत्रवात्सल्याने दाह झाला असता व तोहि दुःसह दारुणच असता मग जेथे भक्ति व पुत्रवात्सल्य या दोन भावांचे पूर्णत्वाने मिश्रण आहे तेथे किती दुःसह व किती भयंकर दाह झाला असेल याचे वर्णन कोण व कसे करणार? **या एका चौपाईचा उच्चार करण्यास जेवढा वेळ लागेल तितका वेळच तिला पायांचा आश्रय करता आला.** तिला मात्र वाटत आहे की हे पाय सोडू नयेत.

**चौ. ८** - (१) सचिवपुत्र जवळ आहे. त्याच्या देखत मातेने पुत्राचे पाय धरणे बरे नाही व मातेला जास्त वेळ त्या स्थितीत ठेवणे उचित नाही; म्हणून प्रभूंनी तिला चटकन उठवली, हृदयाशी धरली व नाना प्रकारांनी समजूत घातली. समजूत घालण्यात 'मी ईश्वर आहे हे तू जाणतेसच' असे किंवा हे रहस्य प्रगट करणारे काहीही बोलणे शक्य नाही; कारण सचिवपुत्र जवळ हजर आहे. हे रहस्य कोणाला सांगू नको असे स्वतः मातेला ईश्वरभावाने सांगितले असता (१|२०२|८ पहा) स्वतःच ते रहस्य कसे प्रगट करतील? **रघुवीराने सांगितले असेल की** तू जरासुद्धा घाबरी होऊ नकोस. मी १७ वर्षांचाच मुलगा असता मला जरासुद्धा वाईट वाटत नाही. अशा स्थितीत मला धीर द्यायचा का स्वतःच अधीर व्हायचे वडील माणसांनी? मी केवळ तुझ्या आशीर्वादाच्या बळावर वनात जात आहे. तू कधी अधर्म किंवा कोणतेही पाप केले नाहीस. ईश्वराची उपासना

करतेस; ते तुझे पुण्य व वडिलांची पुण्याई वनात मला सर्व सुख देईल. दिवस तेव्हाच निघून जातील. मी तुला कसे विसरेन? सुखामागून दुःख व दुःखामागून सुख कोणाच्या वाट्यास येत नाही? दिवसरात्री प्रमाणे ती येणार व जाणारही. **ईश्वर करतो ते बऱ्यासाठीच करतो हे ध्यानात ठेऊन ज्ञान व वैराग्ययुक्त होऊन भगवंताच्या भजनात काळ घालविण्याची ही सुसंधी लाभली आहे असे समज** इ. प्रकारे समजूत घातली. **(क)** आता या रंगमंचकावर सीता प्रवेश करील; व कौसल्या सासू कशी आहे हे आपल्याला दिसेल.

***हिं.दो.*** ***। समाचार तेहि समय-सुनि सीय उठी अकुलाइ ॥***
***॥ जाइ सासु पद कमल जुग बंदि बैठि सिरु नाइ ॥५७॥***

***म.दो.*** ***। वृत्त परिसुनी ते समयिं सीता विकल उठून ॥***
***॥ गता, सासुपद कमलिं शिर, नमुनि बसे, वंदून ॥५७॥***

**अर्थ :** त्याच समयाला (ही) बातमी ऐकून सीता व्याकुळ होऊन उठून गेली व सासूच्या पदकमलांना वंदन करून मान (मस्तक) खाली घालून (नमवून) बसली.।।दो.५७।।

**टीका. - (१) ल.ठे.** - वा.रामायणाप्रमाणे राम आपल्या महालात गेले आहेत व तेथे राम-सीता संवाद झाला आहे. मानसात सीता, लक्ष्मण व सुमित्रा यांना ही विषारी बातमी लवकर कळली नाही. सुमित्रेला तर सर्वांच्या शेवटी लक्ष्मणांकडूनच कळणार आहे.

**(२) वृत्त परिसुनी** - राम सुमंत्राबरोबर गेले ते स्नान वगैरे न करताच गेले व सीता महालातच होती. एका प्रहरापेक्षा जास्त दिवस गेला तरी राम परत आले नाहीत. तेव्हा सेवकांजवळ तपास केल्यावर ही बातमी आणि राम कौसल्येच्या महालाकडे गेल्याची हकीकत कळली; असे मानणे भाग आहे व हे व्यवहाराला धरून आहे. **(क) गता** - 'आली, 'येऊन' असे का म्हटले नाही? राम कौसल्येचे सांत्वन करू लागताच कवि रामधामात गेले. हेतु हा की प्रभु आता तेथे जाणार असे वाटले. तेथे जाताच - सीता विकल उठून गता - सीतामाई व्याकुळ झालेल्या दिसल्या व लगेच उठून तेथून निघाल्या. त्या पुढे व कवि त्यांच्या मागोमाग आले म्हणून 'जाणे' क्रियापद वापरले. **(ख) वंदून बसली**

- आज्ञा मिळाल्याशिवाय कशी बसली अशी शंका कोणी घेतात. वंदन व बसण्याची आज्ञा या दोन्ही गोष्टी एकाच क्षणाला घडल्या म्हणून वर्णन केले नाही. कौसल्येचे पुढे दाखविलेले सीतेवरील प्रेम पाहिले म्हणजे हे म्हणणे मान्य होईल व आज्ञा मिळाल्याशिवाय सीता बसणार नाही हे वाचकांना सहज कळण्यासारखे असल्याने विस्तार केला नाही. जवळ जवळ बसूनच दोन्ही हातांनी पदर पसरून, त्या दोन्ही हातांनी, त्या दोन्ही पायांना स्पर्श करून वंदन करण्याची पद्धती तिकडे असलेली अनुभवाने कळली आहे.

*हिं.* *। दीन्हि असीस सासु मृदु बानी । अति सुकुमारि देखि अकुलानी ॥१॥*
*। बैठि नमित मुख सोचति सीता । रूपरासि पतिप्रेम पुनीता ॥२॥*
*। चलन चहत बन जीवन नाथू । केहि सुकृती सन होइहि साथू ॥३॥*
*। की तनु प्रान कि केवल प्राना । बिधि करतबु कछु जात न जाना ।४॥*

*म.* *। सासू मृदु आशीर्वच वदली । 'अति सुकुमारी' बघुनि विकळली ॥१॥*
*। सीता विनतमुखी चिंता मनिं । पतिप्रेम सुपुनीत रूपखनि ॥२॥*
*। जीवननाथ जाउं वनिं बघती । कोण बरोबर जाइल सुकृती? ॥३॥*
*। प्राण सतनु कीं प्राण एकले । विधि कर्तृत्व न कांहिं आकळे ॥४॥*

**अर्थ** - सासूने कोमल वाणीने आशीर्वाद दिला; व सीता अति सुकुमार आहे असे पाहून (सासू) व्याकुळ झाली.॥१॥ रूपाची खाण व अति पवित्र पतिप्रेम असलेली, खाली मान घालून बसलेली सीता मनात चिंता करते की ॥२॥ जीवननाथ वनात जाऊ इच्छित आहेत; तरी आता कोण सुकृती बरोबर जाणार आहे?॥३॥ देहासहित प्राण बरोबर जाणार की एकटे प्राणच जाणार? विधीचे कर्तृत्व जरासुद्धा आकलन करता येत नाही (कळत नाही) ! ॥४॥

**टीका. - चौ. - (१) सासू मृदु आशीर्वच वदली** - नमस्कार करीत असलेल्या सीतेच्या मुखाकडे सासूची नजर जाताच, सासूबाई पुत्रवियोग व्यथा विसरल्या; व सुनेकडेच पाहू लागल्या. सून जितकी कोमल दिसली तितक्याच कोमल-मृदु स्वराने आशीर्वाद दिला. अशी सासू अशा अति कोमल सुनेला एक क्षणभर तरी उभी कशी ठेवील ! आशीर्वाद नमस्कार केल्यानंतर द्यावयाचा असतो व नंतर बसण्यास सांगतात. जनक विश्वामित्र भेटीत (१।२१५।१-३) क्रम पहावा.

येथे सीता आधीच बसली आहे. म्हणून मागील दोह्याच्या टीकेत सांगितले की नमस्कार करणे व बसण्याची आज्ञा देणे या दोन्ही गोष्टी एकदम घडल्या. सून उभी राहिली तर तिला कष्ट होतील म्हणून नमन, आशिर्वाद, बसण्याची आज्ञा देणे व बसणे असा जो नेहमीचा क्रम तो बदलला व नमन, बसण्याची आज्ञा, बसणे व आशीर्वाद असा क्रम सिद्ध झाला. **काहीही न सांगता या युक्तीने कवींनी सासूची भावना व्यक्त केली.**

(२) **अति सुकुमारी बघुनि** - पुढे कौसल्या पुत्रास सांगते. 'बाळ ! सिता बघ अति सुकुमारी' (चौ.८) या वाक्यांची तुलना वनगमन प्रसंगांतीलच दशरथांच्या वचनाशी करून पाहिली म्हणजे दोघांचे दृष्टिकोन समजतात. 'अति सुकुमार-कुमार युग जनकसुता सुकुमरि' (८१) असे दशरथ म्हणतात. रामलक्ष्मण सितेपेक्षा अधिक कोमल आहेत असे दशरथांस वाटते व कौसल्या सासू सुनेला रामापेक्षाही कोमल मानिते ! हा माधुर्य प्रेमभाव व वास्तववाद यांतील भेद आहे. कौसल्या वास्तववादी आहे व दशरथ माधुर्य प्रेमात रंगलेले आहेत. सीता व राम यांचे वास्तविक ज्ञान कौसल्येला आहे. ते ज्ञान दशरथांस नाही. हा भेद पूर्वजन्मांत मागून घेतलेल्या वरांमुळे आहे. (क) **विकळली** - सासू व्याकुळ झाली. या अतिसुकुमारीचे आता काय होईल या चिंतेने व्याकुळ झाली.

**चौ. २-३** (१) सीता खाली मान घालून मनात चिंता करीत बसली आहे. रूपखनि - रूपाची खाण, 'सुंदर सुंदरतेला करते' अशी शरीराने परम सुंदर आहे व हृदयात अतिपुनीत पतिप्रेम आहे. म्हणजेच अंतर्बाह्य निर्मळ, निर्दोष परमसौंदर्य आहे. हिंदीतील पुनीता = पुनीत; जसे रामा = राम. (क) **कोण बरोबर जाइल सुकृती** - रामचंद्रांबरोबर वनात जाईल, ज्याला जाण्यास सापडेल, तो सुकृती = पुण्यवान, धन्य. भाव हा आहे की मला वनात नेतील की नाही कोण जाणे ! ज्यांच्यापासून राम दूर जातील त्यांचे सुकृतफल संपले (गेले) असे कौसल्या म्हणाली आहे. (ख) **जीवननाथ** - जीवनाचा आश्रय, जीवनाचा आधार गेला की जीवन शिल्लक राहणे शक्य नाही. नाथ = स्वामी, पती असाही अर्थ आहेच. प्राणनाथ हा शब्द सीतेने पुढे वापरला आहेच (६५।६ पहा). जीवनाधार पति येथेच टाकून गेले तर जीवन राहणे शक्य नाही; पण प्राणनाथ असल्याने

जिकडे नाथ तिकडे प्राण जाणारच, त्यांना कोणी प्रतिबंध करू शकणार नाही. (१०९।५ पहा). प्राण = जीव (अ.व्या.सु २।८।१०२ पहा).

**चौ. ४ - (१) प्राण सतनु कीं प्राण एकले** - मी सदेह बरोबर जाण्याइतका पुण्यवान हा देह आहे की नाही कळत नाही. असे न घडले तर प्राण बरोबर जाणारच. प्राण जाणार म्हणजे जीव जाणार हे ठरलेच. जीवच प्राणांदिकांना घेऊन शरीर सोडून जात असतो. या दोन गोष्टींपैकी एक होणार यात शंका नाही. परंतु प्रारब्धाची-दैवाची लीला काय आहे हे कळत नाही. देह प्रारब्ध कर्मानुसार मिळत असतो; तो सौंदर्य खाणी तर आहे, पण बरोबर जाण्याइतका पवित्र नसला, त्याच्या भाग्यात नसले, तर तो नेला जाणार नाही. पण प्राणमनादि लिंग देहासहीत जीव तरी जाईलच जाईल. **जीव व प्राण हे शब्द पुष्कळ वेळा समानार्थक वापरले जातात.** उदा. त्याचा जीव गेला; त्याचा प्राण गेला - जीव दिला, प्राण दिला, इत्यादी.

*हिं. । चारु चरन नख लेखति धरनि । नूपुर मुखर मधुर कबि बरनी ॥५॥*
*। मनहुँ प्रेम बस बिनती करहीं । हमहि सीय पद जनि परिहरहीं ॥६॥*
*। मंजु बिलोचन मोचति बारी । बोली देखि राम महतारी ॥७॥*
*। तात सुनहु सिय अति सुकुमारी । सासु ससुर परिजनहि पिआरीं ॥८॥*

*म. । चारु चरणनखिं धरणी उकरित । नूपुर-मुखर मधुर कवि वर्णित ॥५॥*
*। जणूं प्रेमवश विनती करिती । सीतापद आम्हां ना त्यजिती ॥६॥*
*। मंजुल लोचनिं अश्रु ढाळते । बघुनि माय रामास सांगते ॥७॥*
*। बाळ ! सिता बघ अति सुकुमारी । सासु-सासरा-परिजन प्यारी ॥८॥*

**अर्थ :** सीता आपल्या सुंदर पायांच्या नखांनी धरणी उकरित आहे. (त्यामुळे होणारा जो) नूपुरांचा मधुर ध्वनि (मुखर) त्याचे कवि वर्णन करतात- ॥५॥ (सीतेच्या पायांतील नूपुरे) प्रेमवश होऊन जणूं प्रार्थना करीत आहेत की सीतेच्या पायांनी आमचा त्याग करू नये.॥६॥ व सीता आपल्या सुंदर नेत्रांतून अश्रू ढाळीत आहे. (हे सर्व) पाहून माता रामचंद्रांस सांगते की-॥७॥ बाळ ! हे पहा की सीता अति सुकुमार आहे आणि सासवा-सासरा व परिजन यांना फार प्रिय (प्यारी) आहे.॥८॥

टीका. चौ. ५-६ (१) **चारु चरण नखिं धरणी उकरित** - स्त्रिया शोकचिंतामग्न

बसल्या असल्या म्हणजे पायाच्या अंगठ्याच्या नखाने जमीन कुरतडीत असतात. सीतेच्या अंगावर सर्व अलंकार आहेत. त्यात पायात वाळे, तोरड्या वगैरे आहेत. जमीन कुरतडताना पाय हालतो आहे व त्यामुळे पायातील नूपुरादिकांचा मधुर आवाज (मुखर) होत आहे. त्या आवाजावर कवि उत्प्रेक्षा करतात. (क) जणूं प्रेमवश विनती करिती - तो आवाज म्हणजे त्या नूपुरांची भाषा आहे. प्रेमविव्हळ होऊन नुपूर पायांना विनंती करतात की, 'सितेच्या पायांनो ! तुम्ही रामचंद्राबरोबर जाणार हे आम्हाला नक्की माहीत आहे; पण आमचा त्याग मात्र करू नका ! कारण की आमच्या मधुर आलापांनी प्रभूचे चित्त हरण करून त्याला तुमच्या स्वामिनी जवळ आणण्याची कामगिरी-सेवा आम्ही करीत असतो; ती आमची सेवा अंतरेल व तुमच्या स्पर्शाने आम्हाला जे सुख होते तेही नष्ट होईल. तुमच्या स्वामिनीकडे तिच्या जीवन नाथाचे लक्ष-चित्त आम्ही वेधले म्हणजे त्यांचे नेत्र सीता मुखचंद्रावर चकोर बनतात व सीता चकोरी बनून राममुखचंद्राकडे बघत बसते. पायांनो ! पुष्पवाटिकेतील आठवण असेलच की, तुमच्या मालकिणीकडे रघुनाथाचे चित्त चोरून आणण्यात आम्ही मुख्य होतो. **'कंकणकिंकिणि नूपुर रुणझुण'** ऐकल्याबरोबर **'वळुनि बघति जिकडे मनचोर ॥ सीतामुख शशि नयन चकोर ॥'** (१।२३०।१,३) या उत्प्रेक्षेने कवींनी रमणीयरीत्या ध्वनित केले की सीता रघुनाथाबरोबर वनात जाणार व देहावरील अलंकार भूषणांसहित जाणार.

**चौ. ७-८ (१) मंजुल लोचनिं अश्रु ढाळते** - सीता चिंतामग्न बसली आहे. सासूबाई व्याकुळ झाल्या असल्याने त्याही काही बोलत नाहीत. सासूबाईंना विचारल्याशिवाय बोलता येत नाही व सासूसमोर पतीशी बोलता येत नाही, की बघता येत नाही त्यांच्याकडे. चिंता शोकांचा असा हृदयात कोंडमारा होऊन तो नेत्रांतून बाहेर पडू लागला. सीतेच्या नेत्रांतून गळत असलेले अश्रू कौसल्येला दिसले. सीतेची अति सुकुमारता पाहताच ती व्याकुळ झाली व आता सुनेला रडताना पाहिली व तिचे हृदय विरघळले व बोलल्याशिवाय राहवेना. **(क)** बाळ ! सिता बघ अति सुकुमारी - भाव की तुझ्यापेक्षासुद्धा कोमल आहे व कशी दुःख करते आहे बघ ! या दुःखाने हिची काय दशा होईल याचा काही विचार कर. **(ख)** सासुसासरा परिजन प्यारी - यांत सासूचा उल्लेख प्रथम करून सुचविले की

मलाही अधिक प्रिय वाटते. सासऱ्यापेक्षा सासूचे प्रेम सीतेवर अधिक आहे हे चौ. १ च्या टीकेत सकारण दाखविले आहे. दो. ८१ व १।३५५।८ टीका पहावी.

*हिं.दो.* *। पिता जनक भूपाल मनि ससुर भानुकुल भानु ॥*
*॥ पति रबिकुल कैरव बिपिन बिधु गुन रूप निधानु ॥५८॥*

*म.दो.* *। पिता जनक भूपालमणि श्वशुर भानुकुल - भानु ॥*
*॥ पति रविकुल कैरव विपिन-विधु गुण-रूप-निधानु ॥५८॥*

**अर्थ :** (हिचा) पिता भूपति शिरोमणि (भूपतींत श्रेष्ठ) जनक महाराज आहेत; श्वशुर सूर्यवंशाचे सूर्य आहेत आणि हिचा पति रविकुलरूपी कुमुद वनास पूर्ण चंद्र असून गुण व रूप यांचे निधान आहे.।।दो.५८।।

**टीका.** - येथे सुनेची महती व तिचे भाग्य सासू कौसल्या सांगत आहे. अशा सर्व प्रकारच्या सुखांत व वैभवांत वाढलेल्या सीतेला, माझ्या प्रियतम सुनेला वनात नेणार की काय हा प्रश्न यांत ध्वनित आहे. सीता म्हणते - **'मज पितृवैभव विलास दिसले । नृपकिरीट पदपीठिं लागले ॥ सुखनिधान मम तात गृह असें ॥... सम्राट श्वशुरही कोसलराव । भुवनिं चतुर्दश प्रगट प्रभाव । पुढे येऊनी सुरपति नेती । आसन सिंहासनार्ध देती ॥ असे श्वशुर, कोसिला निवासू । प्रिय परिवार मातुसम सासू ॥९८।१-५॥** याने पूर्वार्धातील भाव स्पष्ट कळतील. **(क) 'पति रविकुलकैरवविपिन-विधु गुणरूप निधानू'** ही ओळ ॥ रविकुलकैरवबिपिन बिधु पति गुणरूप निधानू ॥ अशी लिहिली असती तर कैरवबिपिन आणि बिधु यांची उच्चारात ताटातूट झाली नसती व प्रसादगुण वाढला असता. 'बिपिन' शब्दानंतर तिसरा चरण समाप्त होतो व तेथे यति (विश्रामस्थान) येतो आणि 'बिधु' चा संबंध तुटतो, वियोग होतो. या युक्तीने सुचविले की रघुकुलकैरववन आणि रामचंद्र यांची ताटातूट होणार; 'विधु' बिपिनापासून दूर जाणार ! चंद्र उगवलेला असेल तोपर्यंत कुमुदे (कैरवे) प्रसन्न, प्रफुल्लीत राहतात. चंद्र दूर गेला की ती म्लान होतात. माना खाली घालतात व शोक करीत असतात व सूर्य त्यांस भाजीत असतो. **(ख) गुणरूपनिधानु (बिधु)** - हा विधु गुणांचे व रूपाचे निधान आहे. त्या विधूंत 'चंद्रांत' त्याच्या कलांच्या इतके तरी अवगुण आहेत. ३।२८।६ **'रावणशशिराहू'** वरील गू.चं. पहा. (ग) चंद्राचा वियोग होणार

असे दिसताच कुमुदिनी म्लान होऊन मान खाली घालतात. तशी ही सीता वियोगभयाने मान खाली घालून, म्लान होऊन अश्रू ढाळीत आहे. कौसल्या सासूचे सुनेवरील प्रेम आता दिसेल.

*हिं. । मैं पुनि पुत्रवधू प्रिय पाई । रूप रासि गुन सील सुहाई ॥१॥*
*। नयन पुतरि करि प्रीति बढ़ाई । राखेउँ प्रान जानकिहिं लाई ॥२॥*
*। कलपबेलि जिमि बहुबिध लाली । सींचि सनेह सलिल प्रतिपाली ॥३॥*
*। फूलत फलत भयउ बिधिबामा । जानि न जाई काह परिनामा ॥४॥*

*म. । पुत्रवधू प्रिय मला लाभली । रूपराशि गुण-शील-आगळी ॥१॥*
*। नयनपुतळिशी प्रीति वाढवुनि । प्राण ठेवुं जानकिवर लावुनि ॥२॥*
*। कल्पवेलिसम विविधा लालन- । केलें स्नेहजलें प्रतिपालन ॥३॥*
*। विधी वाम जंव फुलते फळते । काय होय परिणाम न कळतें ॥४॥*

**अर्थ :** मला (तर) अत्यंत रूपवती (रूपराशि - रूपसागर) उत्तम गुणांची व उत्तम शीलाची प्रिय अशी सून (पुत्रवधू) मिळाली.॥१॥ डोळ्यांतील पुतळी समजून तिच्यावर प्रीति वाढविली व माझे प्राण जानकीवर लाऊन ठेवले.॥२॥ कल्पवेलीसारखे तिचे नाना प्रकारे लालन केले; व स्नेहजल घालून तिचे प्रतिपालन केले.॥३॥ आता कुठे फुलणार फळणार तोच दैव फिरले व पुढे परिणाम काय होणार ते काही कळत नाही.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) रूपराशि -** ५८।२ मध्ये 'रूपराशि' वापरलाच आहे. राम व सीता गुण, शील, स्नेह इत्यादींचे सागर असले तरी प्रथम प्रभाव रूपाचाच पडतो; म्हणून रूपाचा उल्लेख प्रथम केला. आगळी = श्रेष्ठ, उत्तम **(क) लाभली -** पूर्वपुण्याईनेच मिळाली. अशी सून कोणासही लाभली नाही व लाभणार नाही. विरहशोकाने हळुवार झालेल्या हृदयास सीता रडत असलेली दिसताच वात्सल्य रसाला भरती आली व सुनेच्या मुखावर, मुलाच्या देखत, तिची प्रशंसा करू लागली. व्यावहारिक मर्यादेचे भान राहिले नाही म्हणा किंवा वनवास व सीता यांतील स्वाभाविक विरोध प्रगट करून अशा सीतेला वनात नेणार काय हा प्रश्न विचारण्यासाठी म्हणून द्विरुक्ति करून प्रशंसा करीत आहे. अशा ठिकाणी द्विरुक्ति दोष नाही. **सर्वोत्तम रूप सर्वोत्तम सर्व सद्गुण आणि**

**सर्वोत्तम शील या तिघांचा एकत्र निवास अत्यंत दुर्लभ आहे.**

**चौ. २ (१) नयनपुतळि** - डोळ्यांतील बाहुली; ही जीवाला फार प्रिय असते. कारण तिच्या योगानेच प्राणी पाहू शकतो. भाव हा की दूर गेली तर मी एका डोळ्याने आंधळी होणार. राम हा एक नेत्र वनात जाणार हे आधीच ठरले. आता हा डावा डोळा तरी जाऊ नये ही मातेची इच्छा येथे ध्वनित केली. 'नेत्रपुतळि तुज - आली' (२३।३) असे कैकयी कुबडीला म्हणाली आहे. (गू.चं.प.) **(क) प्राण ठेवुं जानकिवर लाऊनि** - भाव हा की मी तिला माझ्या प्राणापलीकडे जपत असते. नयनपुतळी = शरीराने जपणूक, प्रीति वाढविली - मनाने जपणूक आणि प्राण लावले = प्राणांनी जपणूक दाखविली. नेत्र हे ज्ञानेंद्रिय आहे म्हणून **ज्ञानेंद्रिये, मनबुद्धि व प्राण यांनी जपणे येथपर्यंत दाखविले.** आता कर्मेंद्रियांनी जपणे, सेवा करणे दाखवितात.

**चौ. ३-४ (१) कल्पवेलिसम लालन केलें** - लाडाने पालन केले. वाणी व हातपाय यांचे कार्य यांत मुख्य असते. सीता स्त्री आहे म्हणून कल्पवेली हा स्त्रीलिंगी शब्द वापरला. कल्पवेली = कल्पिलेले देणारी वेल, लता = सीता लग्नात ६ वर्षांची होती व रामास १४ वे वर्ष लागले होते. त्यानंतर ४ वर्षे गेली आहेत. कारण रामास १८ वे लागल्याचे नुकतेच सिद्ध केले आहे. म्हणजे सीता १० वर्षांची आहे. चार दिवसांनी ११ वे लागेल. कोवळ्या लतेला फार जपावे लागते. त्यात या पृथ्वीतलावर कोणास कधी न मिळणारी ही कल्पलता मला सहज, भाग्याने मिळाली ! **(क) केले स्नेहजलें प्रतिपालन** - लहान, कोवळी असल्याने खतपाणी घालून तिचे पोषण करणे जरूर होतेच. स्नेहरूपी पाणि स्वतःच्या हातांनी घालून-शिंपून तिचे सर्व प्रकारे पोषण व संरक्षण (प्रतिपालन) केले. येथे ही कर्मेंद्रियांनी सेवाच दाखविली. दृष्ट काढणे, न्हाऊ-जेऊ घालणे, थंडी, ऊन, वारा इ. पासून संरक्षण करणे इ. सेवा जननीप्रमाणे कौसल्या सासू स्वतः करीत असे हे दाखविले म्हणूनच सीता म्हणते 'मातेसम सासू' (९८।५).

(२) **फुलणे** - कल्पलतेला फुले येणे हे रूपकाचे अंग आहे. येथे फुलणे म्हणजे वयात येणे, **वयाने रजस्वला होणे; कारण रजस्वलेला पुष्पवती म्हणतात.** 'अथ **रजस्वला** । स्त्रीधर्मिण्यविरात्रेयी मालिनी **पुष्पवत्यपि** (अमरे) रजस्वला,

स्त्रीधर्मिणी, अवि, आत्रेयी, मलिनी, पुष्पवती, ऋतुमती व उदक्या' अशी नावे ऋतुमतीला आहेत. 'अष्टवर्षा भवेत् कन्या नववर्षा तु रोहिणी ।। दशवर्षा भवेद् गौरी अतऊर्ध्व रजस्वला' (मनु) १० वर्षे पूर्ण झालेल्या मुलीला रजस्वला = पुष्पवती असे मनुस्मृतीत म्हटले आहे. सीतेला १० वर्षे पूर्ण होऊन अकरावे लागण्याची ही वेळ आहे हे पूर्वी दाखविले आहे. सीतेचा जन्म वैशाख शुक्ल नवमीचा व वैशाख शुक्ल पंचमीला वनात जाण्याचा विचार येथे सासू करीत आहे. 'फूलत' या शब्दाने कवीनी सीतेच्या या वेळच्या वयाची निश्चित कल्पना ध्वनित केली आहे. प्रत्यक्ष रजोदर्शन न झाले तरी ११ वे वर्ष लागले की ती रजस्वला ठरते. **(क) फळणे** - राणी होणे, संतती होणे ही फळेच आहेत. अशा ऐन वेळी दैव फिरले आहे व परिणाम काय होणार कळत नाही. फुलणे, फळणे सध्या दूरच राहिले. पण आता ही वेल जवळ राहते की नाही, वनात जाणार, नेणार की काय हे कळत नाही. ठेवणे न ठेवणे कौसल्येच्या हाती नाही. ज्याची ही लता आहे, ज्या कल्पतरूने हिला आणली त्याने हे ठरवावयाचे आहे. कौसल्या कशी जपत असे पहा :

***हिं.*** ***। पलँग पीठ तजि गोद हिंडोरा । सियँ न दीन्ह पग अवनि कठोरा ॥५॥***
***। जिअनमूरि जिमि जोगवत रहउँ । दीप बाति नहिं टारन कहऊँ ॥६॥***
***। सोइ सिय चलन चहति बन साथा । आयसु काह होइ रघुनाथा ॥७॥***
***। चंद किरन रस रसिक चकोरी । रबि रुख नयन सकइ किमि जोरी ॥८॥***
***म.*** ***। अंक पलंग पीठ झोपाळा - । त्यजुन कठिण भुविं दे न पदाला ॥५॥***
***। जिवनमुळीसम जपत राहतें । 'दीपवात सार' हि ना कथितें ॥६॥***
***। ती सिय जाउं बघत वनिं साथ । आज्ञा काय असे रघुनाथ ! ॥७॥***
***। चंद्रकिरणरस - रसिक चकोरी । कशि निज नयनीं निरखि तमोरी ॥८॥***

**अर्थ :** सीतेने मांडी, मऊ आसन, पलंग व झोपाळा इत्यादी सोडून कठीण भूमीवर - जमिनीवर कधी पाऊल नाही टाकलं.॥५॥ जीवनमुळीप्रमाणे मी तिला जपत असते; व दिव्याची (दीपाची) वात सार असे सुद्धा तिला सांगत नाही.॥६॥ तीच सीता रघुनाथ ! तुमच्या बरोबर वनात जाऊ बघत आहे; तरी तुमची आज्ञा काय आहे? (ती मला कळू द्यावी.)॥७॥ (पण) चंद्रकिरणांतील रसाचा

(सुधेचा) आस्वाद घेणारी चकोरी आपल्या डोळ्यांनी सूर्याकडे (तमोरी, तमोरि) कशी निरखून पाहू शकेल !।।८।।

**टीका. चौ.** ५ (१) मऊ मऊ **मांडीवर,** नाहीतर उंची गालिचांवर बसण्याची जिला सवय ती कठीण जमिनीवर कशी बसेल? **पलंगावर** व **झोपाळ्यावर** गाईच्या दुधाच्या फेसासारख्या मऊ गाद्यांवर लोळण्याची व झोपण्याची जिला सवय ती पालापाचोळा गवतावर कशी झोपू शकेल? मऊ मऊ रमणीय गालिचांवर पाय टाकताना, तेसुद्धा जिच्या पायांना खुपतात ती जानकी पायी, अनवाणी चालत काट्याकुट्यांतून, वनांतून जाईल कशी?

**चौ. ६ - (१) जीवनमुळी** - संजीवनी मुळी. पूर्वी कल्पलता म्हटले; पण ती मृताला जिवंत करू शकत नाही. मरणारास जगवू शकत नाही. ऐश्वर्य नसले तरी चालते पण जीवन चालू रहावे असे प्रत्येकास वाटावे. भाव हा की ही माझ्या जीवनाचा आधार झाली असती. (क) **दीपवात सार हि ना कथितें** - देवाजवळ पूजेच्या वेळी लावलेले निरांजन किंवा तेलाचा वा तुपाचा दिवा विझू लागला म्हणजे तो विझण्यापूर्वी ती वात तेलांत किंवा तुपांत मागे सारली तर दिवा मालवल्यावर येणारी दुर्गंधी येत नाही. ही घाण देवाजवळ सुद्धा देऊ नये असा नियम आहे. तसेच नंदादीप बारीक झाला तर ती वात पुढे सारावी लागते. दीप विझविण्याचे कार्य पुरुषांनी न करता सौभाग्यवती स्त्रियांनीच करावे असे शास्त्र आहे. 'दीपनिर्वापणात्पुंसः कूस्मागुच्छेदनास्त्रियः । अचिरेणैव कालेन वंशजाशो भवेद्‌ध्रुवम् ।। (यजुर्वेदीय आन्हिक सूत्रातली) **दिव्याची वात सारण्याने सुनेला कष्ट होतील इतकी ती कोमळ आहे !**

(२) **शंका निरसन** - अयोध्येत मणिदीपांचा प्रकाश असला तरी देवांजवळ नंदादीप व पूजेच्या वेळी नीरांजनादि घृतदीप लावणे; सायंकाळी देव, तुळशीजवळ दीप लावणे अगदी आवश्यक होतेच. जिथे विजेचे दिवे आहेत तिथेसुद्धा देवपूजादि कार्यात तेलाचा वा तुपाचा दिवा इ. लावतातच. म्हणून मणिदीप असतां दिव्याची वात सारण्याचा प्रसंग कसा आला इत्यादी शंका व्यवहारशून्य पुस्तकी कीटकांच्याच असू शकतील.

**चौ. ७ (१) ती सिय** = तीच सीता; जिचे महत्त्व, अति कोमलता, स्वभाव,

सवयी इ. चे वर्णन केले ती वनात जाण्यास अगदी अपात्र असलेली. (क) वि. ल. ठे. - कौसल्या माता असूनसुद्धा पुत्र, राम न म्हणता रघुनाथ म्हणते व आज्ञा काय आहे असे विचारते. जणू माता व पुत्र हा संबंध विसरून, प्रजा व राजा हे नाते लक्षात घेऊन बोलत आहे. पुढे (६०।६) सुद्धा 'हें मनिं घेउनि आज्ञा जैसी' होईल असेच म्हणत आहे. (क) रघुनाथ व आज्ञा हा संबंध सकारण, उचित आहे. रघुवंशाचे स्वामी या नात्याने ते जे सांगतील ते सर्वांनी आज्ञा समजून पालन केलेच पाहिजे. राज्याच्या संबंधात खाजगी वैयक्तिक संबंध मिसळणे योग्य नाही. म्हणून कौसल्या 'आज्ञा काय असे' असे म्हणाली.

**चौ.** ८ - (१) या चौपाईत दृष्टांताने कौसल्या आपले मत सुचविते. चकोरी सूर्यबिंबाकडे पाहील तर तिचे डोळे फुटून दिसत नाहीसे होईल. ती पाहूच शकणार नाही. चकोरीचा देह व इंद्रिये सूर्याकडे पाहण्यासाठी निर्माण केली नसून जे इतरांस करता येत नाही ते चंद्रिकिरणांतील सुधा प्राशन, करण्यासाठी तिला निर्माण केली आहे. तशी सीतेची तनु वनात पाठविण्यासाठी - जाण्यासाठी निर्माण केलेली नसून राजमहालातील ऐश्वर्य, सुखोपभोग भोगण्यासाठी केलेली आहे असे सासूला वाटत आहे. हे सासूचे प्रेमाचे व प्रशंसेचे बोल खाली मान घालून रडत असलेल्या सीतेच्या हृदयास किती सुखद झाले असतील याची कल्पना वाचकांनी करून पहावी. कारण की रामविरह हा तमोरी = सूर्य आहे. तमः + अरि = तमोरी. (क) चकोरी चंद्रबिंबाकडे पाहून त्याच्या किरणांतील अमृत ग्रहण करून परम सुखात राहू शकते. **'रघुकुलकैरवविपिन विधु'** असे कौसल्येनेच रामचंद्रांचे वर्णन केले आहे. राम चारुचंद्र व सीता चकोरी आहे. ।। रामचंद्र मुखचंद्र चकोरी ।। **'शरदशशिस जणुं चकोरी पाहे'** (१।२३२।६). तिचा देह वनवासास अनुकूल नसला तरी मन पूर्णपणे अनुकूल आहे. **'रघुपतिबिरहदिनेश** (७।९।) या चकोरीला कसा सहन होणार? कौसल्या आपले मत आता आणखी स्पष्ट करून सांगेल :

***हिं.दो.*** ***। करि केहरि निसिचर चरहिं दुष्ट जंतु बन भूरि ॥***
***॥ बिष बाटिकाँ कि सोह सुत सुभग सजीवनि मूरि ॥५९॥***

***म.दो.*** ***। करि केसरि निशिचर चरति दुष्ट जंतु वनिं भूरि ॥***
***॥ विषवाटिकें खुले कि सुत शुभ संजीवनि मूरि ! ॥५९॥***

**अर्थ** : हत्ती, सिंह, निशाचर व इतर पुष्कळ दुष्ट जीवजंतु वनांत संचार करीत असतात (चरति). हे विचारवंत (सूरि) पुत्रा ! (सुत) विषाच्या वृक्षांच्या वाटिकेत (बागेत) सुंदर संजीवनि (मुळी) शोभेल काय? (कधीही नाही) ।।दो.५९।।

**टीका. : (१) करिकेसरि... भूरि** - यांच्या गर्जना, यांचे भीषण रूप पाहूनच सीतेचे काय होईल याचा विचार कर. 'केविं वसेल वनीं ती सीता । चित्रलिखित कपि बघुनिहि भीता' (६०।४) **(क)** संजीवनि विषवाटिके खुले किं? - विषारी वृक्षलतांच्या बागेत जशी संजीवनी लता तेव्हाच शुष्क होऊन जाते तशी वनात सीतेची दशा होईल की चांगली खुलून दिसेल? 'जिवनमुळी सम जपत राहतें' असे जे म्हणाली त्याचा हा विस्तार आहे. यांतील भाव पुढील चौपायांत आणखी स्पष्ट होणार आहे.

**ल.ठे.** कौसल्या व राजा जनक यांची दशा रामविरहांत साधारणपणे सारखी आहे. दोघांनाही आपल्या ज्ञानाबद्दल पश्चात्ताप करण्याची पाळी आली आहे. 'ते तुम्हिं म्हणां जाउं माते वनिं । श्रवुनि, बसुनि मी पस्तावें मनिं ।। (५६।८) असा पश्चात्ताप आताच कौसल्येला करावा लागला आहे. 'स्नेह शिथिल चिंतिति चित्ता ही । आलों इथें भलें कृत नाहीं ।।२।। रायें रामा वनीं धाडिलें । प्रिय प्रेम आपलें पाळिलें ।।३।। आम्हिं वनांतुनि धाडुं वनातें । प्रमुदित परतूं ज्ञानमहत्तें ।४।। (२९२-) असा पश्चात्ताप विदेही जनकांस झाला आहे. कौसल्या व जनकराजा या दोघांनीही दशरथांच्या जीविताची व मरणाची प्रशंसा केली आहे.

*हिं । वन हित कोल किरात किसोरी । रचीं बिरंचि विषय सुख भोरी ।।१।।*
*। पाहन कृमि जिमि कठिन सुभाऊ । तिन्हहि कलेसु न कानन काऊ ।।२।।*
*। कै तापस तिय कानन जोगू । जिन्ह तप हेतु तजा सब भोगू ।।३।।*
*म. । भिल्ल कोळि-कन्याच कानना । रचि बिरंचि सुख विषयिं विदित ना ।।१।।*
*। उपल - जंतुशा स्वभाव कठिणा । तयां क्लेश वनिं वाटे कधिं ना ।।२।।*
*। तापस वनिता या वन - योग्या । तपासाठिं ज्या त्यजिती भोग्यां ।।३।।*

**अर्थ** : भिल्ल व कोळी यांच्या कन्यानांच विरंचिने काननासाठी निर्माण केल्या आहेत व त्यांना विषयांतील सुख माहीतच नसते.।।१।। पाषाणातील किडींप्रमाणे त्या स्वभावताच कठीण (काटक) असतात. त्यामुळे त्यांना वनात

कधीही क्लेश होत नाहीत.॥२॥ किंवा तापसांच्या स्त्रिया वनात राहण्यास योग्य असतात कारण त्यांनी तपासाठी भोग्य विषयांचा त्यागच केलेला असतो.॥३॥

**टीका.** (१) वनवासास योग्य स्त्रिया कोणत्या याची सोपपत्तिक मीमांसा या तीन चौपायांत आहे. सीता वनवासास योग्य का नाही हे पूर्वी दाखविले व पुढेही दाखवतील. (क) वनवासयोग्य स्त्रियांचे दोन वर्ग पाडले आहेत. ज्यांचा जन्मच वनात वास करणाऱ्या व विषय विलासातच, ऐश्वर्यात न राहणाऱ्या आईबापांच्या पोटी झाला व ज्या वनांतच लहानाच्या मोठ्या झाल्या त्या. हा एक वर्ग. भिल्ल, कोळी, कातकरी, ठाकर, मितनी, वारली, गोंड, संताळ, लमाण, फासेपारधी इत्यादी वनात राहणाऱ्या व वनवासी जीवन कंठणाऱ्या जातींतील स्त्रिया, कन्या, बालके यांना जन्मापासूनच वारा, ऊन, पाऊस, थंडी, हिंस्र पशुंच्या गर्जना इत्यादी सहन करण्याची शक्ती असते. वनात राहणेच त्यांना सुखदायक वाटते. शहरे, कसबे इत्यादी त्यांस प्रतिकूल वाटतात. **(ख) दुसरा वर्ग तपस्व्यांच्या स्त्रिया.** यांचे शरीर जन्माने व सवयीने जरी वनवासास अनुकूल नसले तरी त्यांनी आपले मन वनवासप्रिय बनविलेले असते. त्यामुळे त्यांच्या तनूला प्रारंभी काही काळ क्लेश झाले तरी मन पूर्ण अनुकूल असल्यामुळे त्या ते कष्ट सहन करीत काया काटक करतात. वानप्रस्थाश्रम स्वीकारून वनात पतीबरोबर जाणाऱ्या शतरूपासारख्या स्त्रिया किंवा पार्वतीसारख्या मुद्दाम तपासाठी जाणाऱ्या कन्या.

(२) सीता या दोन्ही वर्गात घालता येत नाही हे कौसल्या सिद्ध करू बघत आहे. तथापि दुसऱ्या वर्गाचे केलेले वर्णन सीतेला प्रोत्साहन देऊन, तिने भोगेच्छा त्यागून पतीबरोबर जाण्यास आपले मन खंबीर करावे अशी सूचना ध्वनित करीत आहे. कौसल्या आता दुभाषा प्रमाणे स्वतःची व सीतेची बाजू रघुनाथ न्यायाधीशापुढे मांडीत आहे. कौसल्येच्या अंतःकरणाची स्थिती द्विधा झाली आहे. सीतेची अति कोमलता व आजपर्यंतची राहणी यांचा विचार आला की वनात हिचे काय होईल अशी धास्ती वाटते. तिच्या पवित्रतम पतिप्रेमाचा विचार आला म्हणजे वाटते की रामविरहात ही कशी जगेल? शिवाय मधून मधून स्वतःच्या सुखाचा विचार एक पारडे अधिक जड करीत आहेच. तथापि तो गौण आहे. सीतेच्या सुकुमारतेकडे पुन्हा लक्ष जाते.

*हिं. । सिय बन बसिहि तात केहि भाँती । चित्रलिखित कपि देखि डेराती ॥४॥*
*। सुरसर सुभग बनज बन चारी । डाबर जोगु कि हंस कुमारी ॥५॥*
*। अस बिचारि जस आयसु होई । मैं सिख देउँ जानकिहि सोई ॥६॥*
*। जौं सिय भवन रहै कह अंबा । मोहि कहँ होइ बहुत अवलंबा ॥७॥*
*म. । केविं वसेल तात ! वनिं सीता । चित्रलिखित कपि बघुनिहि भीता ॥४॥*
*। सुरसर - सुभग - वनज - वनचारी । डबक्या जोगि किं हंसकुमारी ॥५॥*
*। हें मनिं घेउनि, आज्ञा जैसी । जानकीस मी शिकविन तैसी ॥६॥*
*। सिता राहि गृहिं वदली अंबा । तर मज वेइल बहु अवलंबा ॥७॥*

**अर्थ :** बाळा ! चित्रांतल्या माकडाला पाहून (सुद्धा) जी घाबरून जाते ती सीता अरण्यात राहील तरी कशी?॥४॥ रमणीय मानस सरोवरातील कमलवनांत (वनजवन) विहार करणारी हंसकुमारी डबक्यांत राहण्यास का पात्र आहे?॥५॥ (तेव्हा) या सर्व गोष्टी विचारात (मनात) घेऊन जशी आज्ञा (होईल) तसा उपदेश मी जानकीला करीन.॥६॥ माता म्हणाली की जर सीता घरी राहिली तर मला पुष्कळ आधार (अवलंब) होईल (ती देईल) ॥७॥ **अन्वय :** अंबावदे (कीं) सीता गृहिं राहि तर मजबहु अवलंबा होईल.

**टीका. - चौ. ४-५** (१) या चौपायांत दाखविले की शरीराने अति कोमल व मनाने अति भित्री असलेली सीता सिंहव्याघ्रादिकांना व राक्षसांना पाहून व त्यांच्या गर्जना व आरोळ्या ऐकून जगेल तरी कशी? (क) दृष्टान्त हंसकुमारीचा दिला. सुरसर = देवांचे सरोवर = मानस सरोवर. मानसरूपक बालकांडांत पहावे. मानस अत्यंत 'निर्मल जल गंभीर' व पावन आहे. तेथे हंसकुमारी = हंसी, हंसिनी मोत्ये वेचून खातात. तसे अयोध्या हे मानससरोवर, विविध सुखद भोगविलास ही मोत्ये, ऐश्वर्य हे जल व सीता ही हंसी (हंसभार्या) आहे. डबक्यात थोडे, घाणेरडे पाणी असते. कमळांचे नाव नाही. पाय टाकला की चिखलांत अडकून जळवा मात्र डसतात; तेथे हंसी राहणे योग्य व शक्य आहे काय? अशा डबक्यांत जशी हंसी राहणे व जगणे शक्य नाही. तशीच जानकी वनात जगणे शक्य नाही; म्हणून नेणे अयोग्य वाटते.

(२) यांतील **हंसकुमारी शब्द सांगतो की वरील अर्थाला गुंडाळून ठेवा** - रघुनाथ,

राम **'हंसबंशअवतंस'** (दो.९) आहेत असे वसिष्ठ म्हणतात. हंस मानसांतच राहतात. मग रामरूपी हंसश्रेष्ठ जेथे राहील ते स्थान मानससरोवरच असणार ! व **'यश तुम्हें मानस बिमल हंसिनि जीभ जयाचि ॥ मुक्ताफळ गुणगण टिपी -'** (१२८।-) अशी हंसिनी, हंसकुमारी सीता नाही काय? जेथे हंस राहू शकेल तेथे हंसकुमारीने राहणे अशक्य कसे होईल? हंस = मानसौकसु = मानसवासी (इत्यमरे)

**चौ. ६ - (१) हें मनिं घेउनि -** याचा विचार करून कौसल्येने भाषणात दोन पक्ष मांडले आहेत. सीता घरी राहिली तर काय होईल हे काही वचनांनी सांगितले व वनात नेली गेली तर काय होईल हे दुसऱ्या बाजूने सांगितले. हे दोन्ही पक्ष विचारात घेऊन तुम्ही काय तो निर्णय घेऊन आज्ञा द्यावी. **(क) आज्ञा जैसी -** ५९।७ मध्ये आज्ञाच मागितली आहे व जानकी शब्दच वापरला आहे. मध्ये सुत, तात ही संबोधने वापरताना माधुर्य भावात प्रवेश झाला होता. पण पुन्हा येथे ऐश्वर्य भावात प्रवेश झाला. 'आज्ञा मिळेल तसे मी जानकीला शिकवीन' हे शब्द ध्यानात ठेवण्यासारखे आहेत. जानकी म्हणण्यात भाव हा आहे की ती जनकासारख्या लोकविश्रुत भूपालमणीची कन्या आहे हे पण लक्षात घेतले पाहिजे. जानकीला वनात नेली तर ते काय म्हणतील याचा विचार केला पाहिजे.

**चौ. ७ - (१) 'सिता रहि गृहिं' वदली अंबा - अवलंबा -** कौसल्या अलौकिक विवेक संपन्न असल्याने, रामवियोगाने आपले प्राण जात नाहीत व जाणार नाहीत असे तिला वाटत आहे; कारण **'येउनि पाहिन पाय मी'** असे प्रभूंनी वचन दिले आहे. (दो.५३) ते खोटे होणे शक्य नाही हे तिला माहीत आहे; म्हणून म्हणाली की मला आधार होईल. दशरथांनीही सांगितले आहे की **'ये तर अवलंबन या प्राणां'** (८२।६) सीता परत आली तर माझ्या प्राणांना आधार सापडेल. राजाचे प्राण वियोगाने जाऊ पहात आहेत म्हणून प्राणांना अवलंबन म्हटले आहे. कौसल्येची तशी स्थिती नाही म्हणून प्राण-अवलंबन म्हणाली नाही. (२) ल.टे. **'बाळ ! सिता बघ अति सुकुमारी'** (५८।८) पासून **'तर मज देइल बहु अवलंबा'** (६०।७) पर्यंत कौसल्येने आपल्या सुनेविषयी जे विचार प्रगट केले आहेत ते वाचून सुना **म्हणतील की 'सासू असावी तर अशी असावी'** 'घी देखा है पर बडगा नहीं देखा' याची आठवण असे म्हणणाऱ्या सुनांनी चांगली

ठेवावी. **सीतेसारखी सून व्हा म्हणजे कौसल्येसारखी सासू मिळेलच मिळेल. 'पुनीत कौसल्यादेवी' व 'श्रीसीता' प्र. प्र.** १४।२,३ पहा. (**ख**) येथे परमप्रिय कोमल सासूचा परमोच्च आदर्श चित्रित केला आहे. सुनेचा आदर्श सीता आहे. (३) सीता राहिली तर कौसल्येला आधार व सीता राहिली तर दशरथांच्या प्राणांस आधार. याचा अध्यात्म दृष्टीने विचार करू - (**क**) सीता = तुर्यावस्था, दशरथ = जीव व कौसल्या = शुद्ध सात्विक बुद्धिवृत्ति. दशरथाचे प्राण रामवियोगाने जाणार ते सीता तुर्या घरी आल्याने कसे राहतील? अहो ! जेथे तुर्या अवस्था असेल तेथे राम = आत्मा प्रगट होणारच. उर्मिलेसारखी सून असून एकाचे प्राण रहात नाहीत व एकीला सुख नाही; कारण विभूशिवाय आलेली अवस्था मृतवत असते. ती कोणास सुख देऊ शकत नाही. 'देह जिवाविण जलविण सरिता । तशिच पुरुषाविण वनिता' (६५।७) (ख) कौसल्या शुद्ध सात्त्विक बुद्धिवृत्ति. नेहमी तुर्येत रंगणारी असल्याने भरत जरी रामासारखा सुखद असला व माण्डवी सासूची सेवा करणारी असली तरी माण्डवी = सुषुप्ति व श्रुतकीर्ति = स्वप्नावस्था. या शुद्ध सात्विक बुद्धीला सुख कसे देऊ शकतील? तुर्या सतत राहिली की दुःख तोंड दाखविणार कोठे व कोणाला? पण रामाची इच्छाच जोपर्यंत हृदयरुपी घरात, देहरूपी अयोध्येत प्रगट होण्याची नाही तोपर्यंत तुर्या येणार कशी? चंद्र उगवला नाही तर चंद्रिका दिसेल कशी व शीतलता देईल कशी? प्रभाकरच उगवला नाही तर प्रभा कशी दिसणार? सीता स्वतःला रामरूपी चंद्राची चंद्रिका व रामरूपी प्रभाकराची प्रभा समजते व दृष्टान्ताने तसे सुमंत्राला सुचवीत आहे. (९७।५-६) **या अध्यात्म दृष्टीशिवाय मागील प्रश्नांची समाधानकारक उत्तरे देता येणे शक्य नाही**; म्हणूनच टीकाकारांनी हे प्रश्नच पुढे आणले नाहीत !

**हिं.** ***। सुनि रघुवीर मातु प्रिय बानी । सील सनेह सुधा जनु सानी॥***

**दो.** ***॥ कहि प्रिय बचन बिबेकमय । कीन्हि मातु परितोष ॥***

***॥ लगे प्रबोधन जानकिहि प्रगटि बिपिन गुन दोष ॥६०॥***

**म.** ***। या जणुं शीलस्नेह - सुधाखनि । मातृ वचां प्रिय रघुविर परिसुनि ॥८॥***

**दो.** ***। वदुनि विवेकी प्रिय वचन करिति मातृ-परितोष ॥***

***॥ बोधुं लागले जानकिसि प्रगटुनि वन - गुण - दोष ॥६०॥***

**अर्थ :** मातेच्या या जणू शील व स्नेहरूपी सुधा यांची खाण असलेल्या प्रिय वचनांना ऐकून रघुवीर ॥८॥ विवेकी प्रिय वचने बोलून मातेचा परितोष करते झाले. (व मग) वनाचे गुणदोष प्रगट करून जानकीला उपदेश करू लागले.॥दो.६०॥

**टीका. चौ. ८ - (१) शीलस्नेह सुधाखनि** - शील व स्नेहरूपी सुधा यांची खाण - कौसल्येच्या आतापर्यंतच्या भाषणात रघुवीरास शील प्रथम दिसले म्हणून त्याचा उल्लेख प्रथम केला. शीलच प्रधान आहे यात संशय नाही. **शील हेच :** 'सीतेला वनात नेऊ नकोस' अशी आज्ञा स्वतःच्या व पतीच्या सुखासाठी देणे तिच्या अधिकारातली गोष्ट होती. याने सवतीशी विरोध किंवा बंधुविरोधही उत्पन्न होण्यासारखा नव्हता; पण **अधिकार असला तरी त्याचा स्वतःच्याच सुखासाठी उपयोग करणे हे शीलाचे लक्षण** नाही. असा अधिकाराचा दुरुपयोग न करता, अधिकार न गाजवता, स्वतःकडे कमीपणा घेऊन सुनेने आपल्या पतीबरोबर जावे की न जावे याचा निर्णय पुत्राला मोठेपणा देऊन त्याच्यावरच सोपविणे हेच खरे शीलाचे लक्षण आहे. 'प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्' हे यथार्थ करून दाखविले. पुत्र व त्याची पत्नी यांच्या संबंधात सासूने ढवळाढवळ करणे हे शीलाचे लक्षण नाही. राम जसे स्नेहापेक्षा शीलालाच जास्त महत्त्व देतात तसेच या बाबतीत राममातेने केले. (२) स्नेहसुधा - कौसल्येच्या सीतेविषयीच्या भाषणात सीतास्नेहाचा सागरच भरलेला आहे. त्यातच पुत्रवात्सल्य व भगवद्भक्ति यमुना-गंगा येऊन मिळाल्या आहेत. येथे मुख्यतः सीतास्नेहालाच सुधा म्हटले आहे. रामस्नेहसुधा आहेच. 'पूर्ण राम सुप्रेम पियूषें' (२०९।५) यावरून ठरले की **रामस्नेह = सुधा = सीतास्नेह.** अशा रीतीने कवीनी येथे सीता व राम यांत अभेद सिद्ध केला आहे. **(क) प्रिय** - एवढ्याचमुळे की स्नेहापेक्षा शीलाला महत्त्व अधिक दिले. रघुवीराला जे आवडते तेच केले. नको नेऊ म्हटले असते तर स्वतः वनात जाणेसुद्धा निरुपयोगी ठरले असते. कारण अवतारकार्य करता आले नसते.

**दोहा. - (१) विबेकीवचन** - विवेक : ज्ञान. ज्यात ज्ञानाचा विषय मुख्य आहे असे. मातेच्या विवेकारूढ हृदयाची विवेकशक्ति अधिक वाढेल. तिचे आत्मज्ञान दृढ होऊन ती मायिक संबंध विसरू शकेल व आपल्या (रामाच्या) स्वरूपाचे रहस्य ती विसरणार नाही. अशा युक्तीने प्रेमाने समजूत घातली. पण

सचिवपुत्र जवळ आहे हे विसरले नाहीत. कदाचित सीतेने प्रवेश केल्यावर सचिवपुत्र तेथून निघूनही गेला असेल; तो परत गेल्याचा उल्लेख पुढे कुठे नाही किंवा रामलक्ष्मणांबरोबर दशरथांकडे गेल्याचाही उल्लेख नाही. **परितोष** = सर्व प्रकारे तोष. (**क**) **बन** = बिपिन - गुणदोष = वनात बरोबर येणे कसे दोषमय आहे, संकटमय आहे व वनात न येणे कसे गुणपूर्ण आहे हे सांगून तिने घरी रहावे या उद्देशाने उपदेश करू लागले. (**ख**) **जानकिसि** - ती जनक महाराजांची कन्या आहे. राजकुमारी आहे. हा मुद्दा लक्षात घेऊन व याच मुद्द्यावर बोलण्यास प्रारंभ केला. सीतेशी बोलण्यास प्रारंभ 'राजकुमारी' संबोधनानेच करीत आहेत. (६०।६) मध्ये कौसल्येने दिलेल्या सूचनेची अम्मलबजावणी करणार.

**शंका** - आज्ञा होईल त्या प्रमाणे मी जानकीला उपदेश करीन (६०।६) असे मातेने सांगितले असता मातेच्या देखत बायकोला उपदेश स्वतःच का करू लागले? समाधान : (**क**) मातेला आज्ञा देणे पुत्राचे कर्तव्य नाही. राम आदर्श मातृभक्त आहेत. (**ख**) 'सासूसासऱ्यांची सेवा करणे हा तुझा धर्म आहे.' अशी भाषा मातेच्या मुखांतून निघणे शक्य नाही व तो तर महत्त्वाचा मुद्दा सांगावयाचा आहे. (**ग**) वनाची भीषणता स्पष्ट शब्दांत सांगितल्याशिवाय वनात येण्याची लालसा दबण्याची शक्यता नाही व अरण्याचे वर्णन कौसल्येसारखी शुद्ध, सात्त्विक वृत्तीची पट्टराणी कसे व किती करू शकणार? (**घ**) स्वतःच्या शब्दांत जे सांगावयाचे असते त्याचा सारांश दुसऱ्यास सांगून नंतर त्या दुसऱ्या व्यक्तीने सांगण्यापेक्षा स्वतःच सांगणे अधिक प्रभावी ठरते. (ङ) 'माझी इच्छा पाहिली म्हणून 'जनककुमारीने वनात येऊ नये' असे म्हणाला असेल.' अशी शंका मातेला येऊ नये म्हणून स्वतः सांगणेच इष्ट होते. परिस्थिती इतकी बिकट आहे की अशा वेळी सीतेची समजूत घालण्याची जबाबदारी कौसल्येवर टाकली असती तर, आम्ही टीकाकारांनीच असा आक्षेप घेतला असता की बिचारी प्रेमळ कौसल्या काय सांगणार व सीतेने आपली बाजू मांडल्यावर काय उत्तर देणार? बरोबर न्यावी अशी स्वतःचीच इच्छा होती म्हणून पडत्या फळाची आज्ञा मानून दिले ढकलून मातेवर !

***श्री मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकाण्ड अध्याय ६ वा समाप्त.***



अध्याय ७ वा

# श्रीराम - सीता संवाद (६१।१-६९ अखेर)

*हिं.* *। मातु समीप कहत सकुचाहीं । बोले समउ समुझि मन माहीं ॥१॥*
*। राजकुमारि सिखावन सुनहू । आन भाँति जियँ जनि कछु गुनहू ॥२॥*
*। आपन मोर नीक जौं चहहू । बचनु हमार मानि गृह रहहू ॥३॥*
*। आयसु मोर सासु सेवकाई । सब बिधि भामिनि भवन भलाई ॥४॥*

*म.* *। वदण्या माते समोर लाजति । साजे समया समजुनि बोलति ॥१॥*
*। राजकुमारि सांगुं ऐकावें । भलतें काहीं मनीं न घ्यावें ॥२॥*
*। तुमच्या मम कुशला इच्छा जर । अमचें वचनें गृहीं रहा तर ॥३॥*
*। मम आज्ञा सासू-शुश्रूषण । अवघें भामिनि भवनिं भलेपण ॥४॥*

**अर्थ :** (रघुवीरास) मातेच्या समोर (बायकोशी) बोलण्यास लाज (संकोच) वाटत आहे; पण या प्रसंगी शोभण्यासारखे आहे असे समजून बोलू लागले- ॥१॥ राजकुमारी ! मी सांगतो ते ऐका; (मात्र) भलता सलताच समज मनात करून घेऊ नका.॥२॥ तुमचे व माझे कल्याण व्हावे असे वाटत असेल तर आमच्या वचनाने (वचन मानून) घरी रहा.॥३॥ माझी आज्ञा व सासूंची सेवा-शुश्रूषा (शश्रूषण) करण्यामुळे हे भामिनि ! घरी राहण्यातच सर्व प्रकारे भलेपणा आहे.॥४॥

**टीका. चौ. १-२** (१) मातेच्या (वगैरे वडील माणसांच्या) देखत बायकोजवळ न बोलणे ही भारतीय आर्यांची सभ्यता आहे. या सभ्यतेच्या परंपरेचा भंग करणे रघुवीराच्या जीवावर आले आहे. राम आधीच संकोची स्वभावाचे, पण प्रसंगच बिकट आहे की न बोलावे तर धर्महानी होते; म्हणून बोलत आहेत. सीता व राम यांच्या वयाच्या दृष्टीनेही संकोच वाटणे स्वाभाविक आहे.

(२) **राजकुमारि !** - या एका शब्दानेच पुढील सर्व उपदेशाचे सार सुचविले आहे. भाव हा की 'तुम्ही राजकन्या आहात. ऐश्वर्यात, भोगविलासात, सर्वदा सर्व सुखात वाढलेल्या आहात. वय अगदी लहान आहे. म्हणून तुम्ही मजबरोबर वनात येणे इष्ट नाही.' कौसल्येच्या भाषणातील दो. ५८; ५९।६ - ६०।२ *

६०।५) 'हंसकुमारी' पर्यंतच्या भागाचे सारसर्वस्व 'राजकुमारी !' शब्दांत भरले आहे. गीतावलीत राम म्हणतात, 'राजकुमारि ! कठीणकंटक मग मृदुपद गजगामिनी ।। दुसह बात (वात) बरषा हिम आतप कैसे सहिं हौं । अगनित दिन जामिनि' (२।५।२) **(क) भलतें काहीं मनीं न घ्यावें** - मी तुमचा परित्याग करीत आहे इत्यादी प्रकारचा गैरसमज करून घेऊ नका. तुमचे माझे व रघुवंशाचे हित होईल तेच करण्यास मी सांगत आहे हे ध्यानात ठेऊन माझ्या बोलण्याचा अर्थ ग्रहण करा.

**चौ. ३ (१) तुमचे मम कुशला इच्छा जर** - ल. ठे. या संपूर्ण संवादात राम स्वतःबद्दल एकवचन व सीतेबद्दल बहुवचन वापरीत आहेत. हल्लीच्या उल्लू झालेल्या तरुणांना यात काही वाटणार नाही; उलट ते म्हणतील की रघुवीरानेसुद्धा बहुवचनाने आदरच राखला आहे. पण अशा प्रसंगीसुद्धा आईसमोर बायकोशी बोलताना संकोच वाटला त्याची वाट काय? अत्यंत निकट संबंधाच्या प्रेमातील व्यक्तीशी बहुवचनाने बोलण्यात त्या व्यक्तिला उलट वाईट वाटते. परकेपणा दिसतो व प्रेमाला ओहोटी लागली असे वाटते. माते समोर प्रेम व्यक्त करणे उचित नाही, म्हणूनच बहुवचनी प्रयोग करीत आहेत; आणि म्हणूनच 'भलतें कांहीं मनी न घ्यावें' ही सूचना आधी देऊन ठेवली. (क) सुंदर कांडांत सीतेला जो संदेश पाठविला आहे त्यात प्रिये ! हे संबोधन आहे व बहुवचने नसून 'तोरा, तोहि' अशी एकवचनेच आहेत. संदेश वडील माणसांदेखत पाठवायचा किंवा तेथे सांगावयाचा नव्हता व हनुमान सेवक आहे; म्हणूनच तेथे एकवचनी भाषाच योग्य आहे. (मा.पी.मौन !) या अन्वयव्यतिरेकाने वरील भावार्थाचे समर्थन होते की नाही हे ठरवावे.

(२) **अमचे वचनें** - पूर्वी व पुढे मम; माझे असे एकवचन वापरले असता येथेच अमचे (हमार) वापरून - माझे व माझ्या मातेचे हा गूढार्थ सुचविला आहे. **'सिता राहि गृहिं 'वदली अंबा । तर मज देइल बहु अवलंबा' हे मातेचे वचन व 'गृहीं रहा' हे माझे' वचन. दाखविले की सासूच्या इच्छेला पतीची इच्छा किंवा आज्ञा प्रतिकूल नसेल तर सासूची इच्छा पूर्ण करणे सुनेचे कर्तव्य आहे.**

**चौ. ४ (१) मम आज्ञा सासू शुश्रूषण - भलेपण** - पतीची आज्ञा पालन केली

पाहिजेच पण पतीच्या मनातील हेतु जाणून तसे वागणे व सासुसासरा, गुरुजन यांची सेवा करणे हाही सती-पतिव्रतांचा धर्म आहे. धर्माचे पालन करण्यातच सर्व भलेपणा आहे. घरी राहण्यानेच तुमच्या या धर्माचे यथार्थ पालन करता येईल. कारण माझी आज्ञा आहे की तुम्ही घरी रहावे व सासू वगैरेंची सेवा करावी.

(२) **भामिनी** = रागीट, क्रोधी स्वभावाची सुंदर स्त्री, असा या शब्दाचा अर्थ कोषात दिला आहे. पण येथे कोपिष्ट असा अर्थ घेणे अनर्थकारक, मानसांतील सीतेच्या स्वभावाच्या विरुद्ध व निराधार ठरेल. वा.रा. सीता व मानसांतील सीता यात महदंतर आहे. 'पुरुष वेषांत असलेली स्त्री' (२।३०।३) असे तेथे सीता रघुनाथास म्हणाली आहे. तेथे सीता क्रोधाने अती संतप्त झाली आहे. परंतु मानसांतील सीतेच्या पुढील भाषणांत क्रोधाचा गंध नाही. मानसांतील सीता रावणाशिवाय कोणावरही रागावली नाही व अपशब्दही बोलली नाही. (क) रघुनाथाने शबरीला (३।३५।४; ३६।७-१०) वारंवार 'भामिनी' म्हटले आहे व तीसुद्धा मुळीच क्रुद्ध झालेली नाही. वा.रामायणातील सीता क्रुद्ध झाली आहे व तो भाव दाखविण्यासाठी येथे भामिनी शब्द वापरला असे म्हणावे तर वा.रा. शबरी मुळीच रागावलेली नाही. मग प्रभूंनी (मानसांत) तिला तीन वेळा भामिनी का म्हटले? येथे **भामिनी = सुंदरी, रामा** असाच अर्थ आहे. शबरीला बाह्य सौंदर्य नव्हते पण तिचे हृदय अति सुंदर होते म्हणून वारंवार भामिनी म्हटले आहे. सीता अंतर्बाह्य सुंदर असल्याची साक्ष सासूनेच दिली आहे.

**ल.टे.** - तुलसीमानस म्हणजे वा.रा. अनुवाद नाही किंवा सार नाही. मानसांतील व वा.रा. प्रत्येक चरित्रांत पुष्कळ अंतर आहे. वा.रा.च्या आधारे मानस ग्रंथ लिहिला नाही. चरित्र चित्रणाच्या तुलनेसाठी वा.रा. उपयोग करणे उचित असले तरी स्वभाव चित्रणाचा अर्थ लावताना प्रत्येक ठिकाणी वा.रा. आधारास घेणे वरच्यासारखे खड्ड्यात पाडणारे व धोक्याचे ठरेल. वा.रा. शबरी स्वर्गाला गेली आहे. मानसांतील शबरीला निर्वाण, कैवल्य, यद्गत्वा न निवर्तन्ते' असा मोक्ष मिळाला आहे. शबरी भेटीच्या वर्णनात 'भामिनी' शब्दावरील टीका पहावी. धात्वर्थाने भामिनि = कोपिष्ट (भाम क्रोधे) असा अर्थ आहे व तो दशरथ कैकयी संवादात कैकयीला योग्य आहे. अपरोक्ष = प्रत्यक्ष असा अर्थ संस्कृतांत आहे. पण मराठीत

अगदी उलटा अर्थ रूढ आहे. त्रास = भीती हा संस्कृतांतील अर्थ मराठीत त्या शब्दास आहे काय? अशी पुष्कळ उदाहरणे आहेत.

हिं. *। एहि ते अधिक धरमु नहिं दूजा । सादर सासु ससुर पद पूजा ॥५॥*
*। जब जब मातु करिहि सुधि मोरी । होइहि प्रेम बिकल मति भोरी ॥६॥*
*। तब तब तुम्ह कहि कथा पुरानी । सुंदरि समुझाएहु मृदु बानी ॥७॥*
*। कहउँ सुभायँ सपथ सत मोही । सुमुखि मातु हित राखउँ तोही ॥८॥*

म. *। याहुन धर्म अधिक ना दूजा । सादर सासु सासरा पूजा ॥५॥*
*। जैं जैं स्मृति मम ये मातेला । प्रेमविकल होई भ्रम मतिला ॥६॥*
*। तैं सांगुनि तुम्हिं कथा पुराणी । सुंदरि ! समजावा मृदु वाणीं ॥७॥*
*। वदतो सहज शपथ शत मजला । सुमुखि राखुं मातेस्तव तुजला ॥८॥*

**अर्थ :** आदराने सासुसासऱ्यांची सेवा (पूजा) करण्यापेक्षा अधिक (श्रेष्ठ) धर्म नाही.॥५॥ जेव्हा जेव्हा मातेला माझी आठवण येईल व प्रेमाने व्याकुळ होऊन बुद्धिभ्रम झाल्यासारखे होईल.॥६॥ तेव्हा तेव्हा सुंदरी ! तुम्ही पुराण (पुरातन) कथा सांगून मृदु, मधुर शब्दांनी समजूत घालीत जा.॥७॥ सुमुखि ! मी सहज सांगतो (कपटाने नव्हे) शंभर शपथा घेऊन सांगतो की केवळ मातेसाठी मी तुला ठेवीत आहे.॥८॥

**टीका. चौ. ५ - (१) याहुन अधिक दुजा धर्म ना** - सीता पतिसेवेला प्राधान्य देते आहे हे पुढील तिच्या भाषणावरून स्पष्ट आहे. तो तिचा हेतु रघुवीराने जाणला; म्हणून सांगतात की पतीच्या आज्ञा पालन करणे हा मुख्य धर्म आहे; आणि माझी आज्ञा आहे की सासू-सासऱ्यांची सेवा करून त्यांस सुख देऊन त्यांचे दुःख निवारण करीत जा. **'न मातु परदैवतम्'** हा माझ्यासाठी नियम आहे व **'नारिधर्म पतिदेव न दूजा'** हा नियम तुमच्यासाठी आहे हे मी जाणतो. पण माझ्या आज्ञेने माझ्या परम दैवताची पूजा करणे माझ्या पूजेपेक्षा अधिक महत्त्वाचे आहे. त्यामुळे माझ्या सेवेचे फळ तर मिळेलच पण सासू-सासऱ्यांच्या सेवेचे फळही लाभेल. **(क) सादर** = माझी आज्ञा पालन करण्यासाठीच नव्हे तर कर्तव्य म्हणूनसुद्धा श्रद्धेने तनमनवाणीने सेवा करून माझ्या माता-पित्यांस सुखी ठेवा; म्हणजे धर्मपालनाचे सर्व श्रेय लाभेल.

**चौ. ६-७ (१) जैं जैं स्मृति मम ये मातेला** - मला जाणे भागच आहे हे तुम्ही मान्य करालच. मी गेल्यावर माझ्या विरहांत मातेला माझी वारंवार आठवण होणार व त्यामुळे व्याकुळ होऊन मातेच्या बुद्धीला भ्रम झाल्यासारखे होणार. तो दूर करणे कोणाही दासदासींना साधणार नाही. तुम्हाला ते सहज करता येईल. (क) **सांगुनि कथा पुराणी** - पुराणादिकांतील पुष्कळ कथा तुम्ही जाणता, त्यातील प्रसंगानुकूल नवीन नवीन कथा सांगून मातेच्या बुद्धीचा भ्रम दूर होईल असे करीत जा. (ख) रामविरहाने **कौसल्येला भ्रमिष्टपणा आल्याचे** करुणावात्सल्य-रसभरीत सुंदर मधुर वर्णन गीतावलीत आहे. पद ५२, ५३ राग सोरठ.

I 'कबहुँ प्रथम ज्यों जाइ जागवति कहि प्रिय वचन सवारे ।।१।। उठहु तात बलि मातु बदन पर अनुज सखा सब द्वारे ।।२।। कबहुँ कहति यों, **बड़ी बार भइ जाहु भूप पहिं भैआ ।। बंधु बोलि जेंइअ जो भावै, गई निछावरि भैआ ।।३।।** कधी पूर्वी सारखी जाऊन सकाळीच प्रिय वचनांनी हाका मारून उठविण्याचा प्रयत्न करते, बाळा ! ऊठ, तुझ्या मुखावरून हा देह ओवाळून टाकते. तुझे बंधु व मित्र दाराशी जमले आहेत की रे ! कधी म्हणते की बाळा ! किती उशीर झाला, भूपांकडे लवकर जा की. कधी म्हणते की भावांना बोलावून काय इच्छा असेल ते त्यांच्याबरोबर खा की रे ! यातील ठळक अक्षरांतील वाक्यांची तुलना २।५३।१-२ या चौपायांशी करून पहावी.

II माई री ! मोहि कोउ न समुझावै ।। रामगवन साँचो कि धौ सपनो, मन परतीति न आवै ।।१।। लगेइ रहत मेरे नयननि्ह आगे राम लखन अरु सीता ।। तदपि न मिटत दाह या उर को बिधि जो भयो बिपरीता ।।२।। दुख न रहै रघुपतिहि बिलोकत, तनु न रहै बिनु देखे ।। करत न प्रान पयान सुनहु सखि ! अरुझि परी एहि लेखे ।।३।। आई ग ! माझी कोणी समजूत घालीत नाही. रामगमन खरे की स्वप्न याची प्रतीति मनाला येत नाही.।।१।। कारण राम लक्ष्मण नी सीता सतत माझ्या डोळ्यांसमोर आहेतच आहेत; तरी पण या हृदयाचा दाह शान्त होत नाही. बर, रघुपति (खरेच) दिसले असते तर दुःख राहिले नसते; पण जर दिसले नसते तर देह राहिला नसता. प्राण निघूनही जात नाहीत. तेव्हा हे पहा सखी ! यांत काहीतरी गडबड झाली असली पाहिजे.

(पण काय गडबड झाली आहे हे कोणी मला समजाऊन सांगत नाही).

**(२) सुंदरी !** - मातेच्या देखत कसे म्हटले? भाव हा आहे की माझ्यापेक्षा तुम्ही फार सुंदर असल्यामुळे तुमच्याकडे पाहिले मातेने म्हणजे माझी आठवण माता विसरेल व भ्रम सहज दूर होईल.

**चौ. ८ (१) सुंदरि व सुमुखि** - या शृंगारिक प्रेमळ शब्दांच्या साहचर्याने न कळत कसा परिणाम झाला तो पाहण्यासारखा आहे. आतापर्यंत परक्याप्रमाणे 'तुम्ही' वगैरे बहुवचन वापरीत आले. पण येथे 'तोहीं', 'तुला' हे आत्मीयता व गाढ प्रेमनिदर्शक एकवचन चटकन बाहेर पडले. 'अंतरींचे धावे स्वभावें बाहेरी' **(क) सहज सांगतो** - मनात आहे तेच सांगत आहे. दुसऱ्या कोणत्याही हेतूने घरी राहण्यास सांगत नाही. विश्वास बसावा म्हणून शपथ घेतली. कारण प्रेमातिशयाने आर्त झालेल्या मनास अनेक संशय येतात. **'प्रीति अधिक मनिं धरि संदेहा'** (६।८०।२). त्याग करण्याच्या इच्छेने काहीतरी बनवाबनवी चालली आहे असे समजू नका.

***हिं.दो.*** *। गुर श्रुति संमत धरम फलु पाइअ बिनहिं कलेस ॥*
*॥ हठ बस सब संकट सहे गालव नहुष नरेस ॥६१॥*

***म.दो.*** *। श्रुति-गुरु-संमत-धर्मफल मिळे विनाही क्लेश ॥*
*॥ हट्टें बहु संकट सहति गालव नहुष-नरेश ॥६१॥*

**अर्थ :** गुरु व श्रुति यांना संमत असलेल्या धर्माचे पालन केल्यास त्याचे फळ क्लेश न करताच मिळते; (पण) हट्ट करून गालव (मुनि) व नहुषराजा यांना पुष्कळ संकटे सोसावी लागली.।।दो.३१।।

**टीका. -** (१) 'पतिर्भर्ता पतिर्गुरुः' या शास्त्र वचनावर जोर देऊन सीतेच्या मनात फक्त पतिसेवापरायणच व्हावयाचे आहे. सासू व पति (गुरु = वडील माणसे) सांगत आहेत की घरी रहा व गुरुजनांची सेवा कर, म्हणजे नारीधर्म - पालनाचे फळ, स्वर्गादिक, काही कष्ट न करता सहज मिळेल. सीतेच्या मनात केवळ श्रुतिशास्त्रोक्त धर्माचे पालन करावयाचे आहे. ते करणे म्हणजे वनवास स्वीकारणे भाग आहे. कल्पनातीत क्लेश सहन करावे लागतील; म्हणून सांगतात की श्रुतिधर्माला गुरुजनांची संमति असेल तरच तो क्लेशांशिवाय फलदायी होतो.

हट्टाने गुरुजनांच्या वचनांकडे दुर्लक्ष केल्यास भयंकर संकटे सहन करावी लागतात. **श्रुति वचनांचें मर्म गुरु, महाजन जाणतात, म्हणून गुरु व श्रुति यांचे ऐक्यमत होईल त्या धर्माचे आचरण करावे.** दृष्टान्तासाठी गालव मुनि व नहुष राजा यांची नावे सांगितली. यांच्या कथा सीतेला माहीत होत्या म्हणून त्या कवींनी वर्णिल्या नाहीत. पण सगळ्या वाचकांना माहीत असतीलच असे नाही म्हणून त्या पुढे दिल्या आहेत. या दोघांनी गुरुवचनाकडे दुर्लक्ष करून आपलाच हट्ट चालविल्यामुळे त्यांना कल्पनातीत संकटे व कष्ट भोगावे लागले.

(२) **गालव मुनि** - गालव मुनि विश्वामित्रांचे शिष्य होते. एकदा विश्वामित्रांची परीक्षा पाहण्यासाठी भगवान धर्माने वसिष्ठांचे रूप घेतले व विश्वामित्रांजवळ जाऊन भोजन घाला म्हणून सांगितले. विश्वामित्र भोजनाची तयारी करीत आहेत तोच त्यांनी इतर मुनींकडे भोजन केले. विश्वामित्र अन्न घेऊन आले तेव्हा वेषधारी धर्माने सांगितले की माझे जेवण झाले आहे. पुन्हा भूक लागली म्हणजे मी येईन; तोपर्यंत तुम्ही याच जागी उभे राहा. ते कढत कढत अन्न डोक्यावर घेऊन विश्वामित्र तेथेच उभे राहिले. त्या काळात गालव मुनीनें प्रेमाने व श्रद्धेने त्यांची सेवा करणे चालू ठेवले. या प्रमाणे शंभर वर्षे लोटली तेव्हा धर्म पुन्हा त्याच रूपाने आले व ते अन्न भक्षण केले. विश्वामित्रांवर प्रसन्न होऊन त्यांस 'ब्रह्मर्षि' असे म्हटले व भगवान धर्म निघून गेले.

गालवाने केलेल्या सेवेने गुरु विश्वामित्र प्रसन्न झाले व त्यांस आशीर्वाद देऊन इच्छा असेल तेथे जाण्याची परवानगी दिली. गालवाने विनंती केली की गुरुदक्षिणा देण्याची माझी इच्छा आहे. काय इच्छा असेल ती देतो, तरी आज्ञा व्हावी. विश्वामित्रांनी पुष्कळ सांगितले की मला गुरुदक्षिणा पोचली; तुम्ही या बाबतीत आग्रह धरू नका. पण गालव घट्ट धरून बसला. तेव्हा विश्वामित्रांनी सांगितले की ८०० श्यामकर्ण घोडे, रंगरूपाने अगदी सारखे असलेले द्या व लवकर आणून द्या. ही गोष्ट अशक्यासारखीच असल्याने गालव अति चिंतातुर झाले, सुकून गेले व आत्महत्या करावी असे वाटू लागले. शेवटी विष्णूला शरण गेले. गरुडाने साह्य केले व त्यांना ययाति राजाकडे घोडे मागण्यास पाठविले. तेथे ययातीने आपली कन्या माधवी त्यांस दिली. तिच्या साह्याने हर्यश्व राजाकडून

दोनशे घोडे मिळविले. याप्रमाणे कष्ट भोगित जेमतेम ६०० घोडे मिळविले. पृथ्वीतलावर श्यामकर्ण घोडा दुसरा राहिला नाही. शेवटी ६०० घोडे व ती कन्या विश्वामित्रांस अर्पण केली. या प्रमाणे गालव मुनीला त्याच जन्मात कितीतरी काळ अनेक संकटे व क्लेश भोगावे लागले. गुरुदक्षिणा द्यावी हा श्रुतिकथित शिष्यधर्म आहे. गुरुच्या वचनानुसार वागले असते तर विनाश्रम श्रुतिधर्माचे पालन झाले असते. पण गुरुवचनाकडे दुर्लक्ष करून श्रुतिवचनाचेच पालन करण्याचा हट्ट धरला व त्याचा परिणाम वर सांगितल्याप्रमाणे कष्टमय झाला व मागितलेली दक्षिणा पुरी करता आली नाहीच. हा दृष्टान्त सीतेला कसा लागू पडतो ते पुढे पाहू.

**(३) नहुष नरेश - नहुष राजा.** हा महा तेजस्वी, धर्मिष्ठ, यशस्वी व दाता होता. वृत्रासुराच्या वधाने इंद्राला ब्रह्महत्येचा दाह होऊ लागला तेव्हा तो जाऊन पाण्यात दडून राहिला. राजा नसला म्हणजे अराजक कसे माजते हे माहीत असल्याने देवांनी नहुष राजाला इंद्रपदाचा अभिषेक करून देवराजा बनविला. एक दिवस इंद्राणी-शची त्याच्या दृष्टीस पडताच तो कामांध झाला व त्याने निरोप पाठविला की इंद्राणीने आपली पत्नी बनावे. इन्द्राणी = इंद्राची पत्नी; हे श्रुतिकथित समीकरण त्याला आठवले. इन्द्राणी देवगुरु बृहस्पतीला शरण गेली. देव व ऋषि यांनी नहुषाची - इंद्राची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरला. देव व ऋषी बृहस्पतीकडे गेले तेव्हा त्यांनी सांगितले की इंद्राणीने बदली इंद्राकडून काही मुदत मागून घ्यावी. त्याप्रमाणे मुख्य इंद्राचा पत्ता लावण्यासाठी म्हणून नहुषाने - बदली इंद्राने मुदत दिली.

इंद्राणीने इंद्राचा पत्ता लावला व सर्व हकीगत सांगून काय उपाय करावा म्हणून विचारले. इंद्राने युक्ति सुचविली की नहुषाला एकान्तात भेटून सांगावे की ऋषीश्वरांना पालखीवाहक भोई बनवून त्या दिव्य वाहनांतून तुम्ही माझ्याकडे आलात तर तुमच्या इच्छेप्रमाणे होईल.

नहुषाने देवर्षी व महर्षी यांना भोई बनविले व त्या पालखीत बसून इंद्राणीकडे तो चालला. ऋषि थकले, दमले, तेव्हा त्यांनी नहुष - इंद्राला सांगितले की तुम्ही अधर्माचे अवलंबन करीत आहात. वादविवाद झाला. तेव्हा नहुष क्रोधांध होऊन

त्याने अगस्त्य ऋषींचा अपमान केला. तेव्हा अगस्त्याने शाप दिला की तू निस्तेज होऊन पृथ्वीवर पडशील व दहा हजार वर्ष अजगर होशील. जा ! ताबडतोब तसेच घडले.

इंद्राणी म्हणजे इंद्राची स्त्री हे सत्य असले तरी त्याचे मर्म हे नव्हे की परस्त्रीवर हक्क सांगावा. नहुषाने ऋषींचे = गुरुजनांचे न ऐकता हट्ट धरला त्याचा परिणाम किती भयंकर भोगावा लागला पहा ! या दृष्टान्तात हा भेद आहे की नहुषाचा पहिला देह तेथेच अदृश्य झाला व अजगर देहाने त्यास यातना भोगाव्या लागल्या व सहज मिळालेले देवराज्य आणि स्वर्गवाससुद्धा हातचा गेला.

(४) हे दृष्टान्त सीतेला कसे लागू पडतात पाहू = गालव मुनीला चिंता लागली व त्याच देहाने अनेक ठिकाणी भटकावे लागले व कष्ट सहन करावे लागले. सीतेला रानावनात भटकावे लागले. फार कष्ट सोसावे लागले. शूर्पणखेची भीती वाटलीच व खरदूषण युद्ध चालू असेपर्यंत चिंताग्रस्त होऊन लपून रहावे लागले. (क) नहुषदेह अदृश्य झाला तसे सीतेला अदृश्य व्हावे लागले अग्नीमध्ये. नहुषाला सर्प देहाने यातना भोगाव्या लागल्या. सीतेला मायासीता देहाने रावणाच्या बंदिवासात अत्यंत दुःखात दिवस काढावे लागले व अग्निदिव्य करावे लागले. शिवाय ही जनकनन्दिनी रावणाच्या बंदीत राहिली नसताही त्याच निमित्ताने लोकनिंद्य झाली व गर्भवती असताच पतिवियोग, परित्याग दुःख सहन करून शेवटी पुन्हा भूमिगर्भात अदृश्य होण्याची पाळी आलीच. यावरून हे ठरले की दोन्ही दृष्टान्त सहेतुक आहेत.

हिं. *। मैं पुनि करि प्रवान पितु बानी । बेगि फिरब सुनु सुमुखि सयानी ॥१॥*
*। दिवस जात नहिं लागिहि बारा । सुंदरि सिखवनु सुनहु हमारा ॥२॥*
*। जौं हठ करहु प्रेम बस बामा । तौ तुम्ह दुखु पाउब परिनामा ॥३॥*
*। काननु कठिन भयंकरु भारी । घोर घामु हिम बारि बयारी ॥४॥*

म. *। मी लवकर पाळुनि पितृवाणी । येइन सुमुखी ऐक शहाणी ॥१॥*
*। वेळ न लागे दिवसां जाया । श्रुणु सुंदरि आमचे वचना या ॥२॥*
*। प्रेमें हट्ट कराल किं वामे । तर पावाल दुःख परिणामें ॥३॥*
*। कानन कठिण भयंकर भारी । घोर घर्म हिम वारा वारी ॥४॥*

**अर्थ** - हे ! सुमुखी तूं शहाणी आहेस ऐक - मी पित्याचे वचन पालन करून लवकर येईन.।।१।। दिवस जायला वेळ नाहीं लागणार (केव्हाच निघून जातील) म्हणून सुंदरी ! आमचे हे वचन ऐक.।।२।। वामे ! प्रेमाला वश होऊन जर हट्ट कराल तर तुम्हाला शेवटी दुःख भोगावे लागेल.।।३।। अरण्य फार कठीण व भारी भयंकर आहे. ऊन, थंडी, वारा, पाऊस, पाणी इ. सर्वच भयंकर असतात.।।४।।

**टीका. - चौ. १ - (१) लवकर येईन** - सीतेला घरी रहा असे सांगितले त्यामुळे शंका येईल की १४ वर्षे वनात राहण्याची सवय झाल्यावर हे कसले परत येणार? अशी शंका येऊ नये म्हणून सांगितले की मी १४ वर्षे संपतांच अगदी लवकर परत येईन. एक दिवस उशीर लावणार नाही. मी पित्याचे वचन पालन करतो तू माझ्या आज्ञेने माझ्या मातेची सेवा कर. यातच सौंदर्याची शोभा आहे. (क) शहाणी - शाहणी. भाव हा की अशा बिकट परिस्थितीत माझा धर्म काय व मातेला सुख देण्याची व्यवस्था मी करणे आवश्यक आहे की नाही व माझी आज्ञा पालन करणे हा तुझा सर्वोत्तम धर्म आहे की नाही इ. सर्व तू जाणतेसच.

**चौ. २** - (१) चौदा वर्षे हे शब्द जड वाटतात. पण वर्षे तरी दिवसांचीच होतात. आलेला, उगवलेला दिवस राहात नाही. केव्हा जातो कळतसुद्धा नाही. तसेच हे दिवस केव्हाच निघून जातील. माझी १७ वर्षे केव्हा, कशी निघून गेली ते कळले देखील नाही. तशीच ही जातील. म्हणून (क) आमचे म्हणजे माझे व मातेचे म्हणणे ऐका व सुखाने घरी राहा. वनात माझ्या बरोबर येण्याचा हट्ट धरू नका. (ख) मागील चौपाईत 'सुनु' - 'ऐक' असा प्रयोग आहे. येथे व पुढील चौपाईत पुन्हा 'सुनहु' पाऊब' असा बहुवचनी प्रयोग करण्यास प्रारंभ केला आहे. ६१।७ पर्यंत बहुवचनाने बोलत होते. ६१।८ पासून एकवचनास प्रारंभ झाला व त्या बरोबरच सुंदरी, सुमुखी, सुंदरी ही सलगीची विशेषणे पण आली. सलगीने सांगून भागत नाही असे दिसताच आता थोडी कडक स्पष्टोक्ति करावयाची आहे. दोह्यांत दिलेल्या दोन दृष्टान्तानी प्रकाश पडला नाही म्हणून तोच अर्थ थोडक्यात आता स्पष्ट सांगतील.

**चौ. ३ - (१) प्रेमें हट्ट कराल किं बामे - बामा** = स्त्री, फार तर प्रेमळ स्त्री इतकाच अर्थ येथे घेता येईल. रघुवीराच्या या वाक्याप्रमाणे या जनकनन्दिनीला व माया सीतेलाही दुःख भोगावे लागलेच आहे. सगुण साकार रूपाने रामसमीप राहण्यास न सापडणे हे काही लहान-सहान दुःख नाही. पुढे गरोदरपणी तर परित्यागामुळे विरहदुःख भोगावे लागलेच आहे.

**चौ. ४ - (१)** येथून आता वनाची भीषणता वर्णन करतात - घाम = **घर्म** = उन्हाळा, उष्णता, **हिम** = थंडी; **बारा** - थंडीत अंगाला झोंबणारा व त्वचा फाडणारा असतो व उन्हाळ्यात अंगाला चटके देणारा व लू लागून मरणास कारण होणारा असतो. डोंगरांत उन्हाळा विशेष कडक असतो. **बारी** = पाणी, पाऊस. अयोध्येत राहणाऱ्या लोकांना दण्डकारण्यातील पाऊस म्हणजे महासंकटच ! नद्या, तलाव इत्यादींचे पाणी सुद्धा दूषित, रोगोत्पादक असते. थंडीत काल्यासारखे गार, उन्हाळ्यात तापलेले व पावसाळ्यात अति गढूळ ! एकूण वनामध्ये १२ महिने दुःखच दुःख.

*हिं.* ***। कुस कंटक मग काकर नाना । चलब पयादेहिं बिनु पदत्राना ॥५॥***
***। चरन कमल मृदु मंजु तुम्हारे । मारग अगम भूमिधर भारे ॥६॥***
***। कंदर खोह नदीं नद नारे । अगम अगाध न जाहिं निहारे ॥७॥***
***। भालु बाघ बृक केहरी नागा । करहिं नाद सुनि धीरजु भागा ॥८॥***

*म.* ***। कुश कंटक कंकर पथिं नाना । चालणें हि अनवाणी जाणा ॥५॥***
***। तुमचे चरण कमल मृदु सुंदर । मार्ग अगम्य महीधर दुर्धर ॥६॥***
***। दऱ्या गुहा नद नद्या नि निर्झर । दुर्गम अगाध बघणें दुष्कर ॥७॥***
***। व्याघ्र भल्ल वृक करी केसरी । गर्जनिं, नुरतें धैर्य अंतरीं ॥८॥***

**अर्थ :** मार्गात कुश, काटे, खडे (कच) इ. नाना प्रकार आहेत व चालावयाचे आहे अनवाणी (पायांत पादत्राण न घालता) ॥५॥ तुमचे चरण आहेत कमलासारखे कोमल व सुंदर; रस्ते अगम्य असून (वाटेत) दुर्धर पर्वत आहेत.॥६॥ दऱ्या, गुहा, नद, नद्या व नाले (वाटेत) आहेत आणि सर्व अगाध व अगम्य (दुर्गम) असून त्यांच्याकडे (नुसते) बघवत (सुद्धा) नाही.॥७॥ वाघ, अस्वले, लांडगे, हत्ती व सिंह यांच्या गर्जनांनी हृदयांत धीर रहात नाही (धैर्य पळते).॥८॥

**टीका. चौ. ५-६** (१) मागील चौपाईत अरण्याचे वर्णन केले. आता त्या वनातील मार्गाचा भयंकरपणा व प्रवासाची पद्धति वगैरे सांगतात. पायांत काही न घालता (अनवाणी) पायी चालत जावयाचे आहे. मार्गातले काटे पायात मोडले, खडे कच लागून पाय हुळहुळे झाले म्हणजे पाऊल पुढे टाकता येणार नाही. बोरिवली जवळची कान्हेरीची कोरीव लेणी बोरिवलीपासून अनवाणी चालत जाऊन सर्व (१०४) उन्हाळ्यात किंवा थंडीत एकदा पाहून यावी म्हणजे पुरुषांच्या पायांची सुद्धा कशी दुर्दशा होते ते समजेल. खरोखरच एक पाऊल पुढे टाकवत नाही ! (क) अशा मार्गाने कोळी भिल्लांची मुले, मुली भराभर चालत जातात; त्यांच्या पायांना काटे वगैरे घाबरतात; पण तुमचे पाय अति कोमल व सुंदर ! वनमार्गात २।४ पावले चालली असेल तोच पहिल्या दिवशी सीता दमून, घामाघुम झाली आहे. कवितावलीतील 'वन के मार्ग में' ही पदे पहावी. शहरांतल्या पुरुषांनासुद्धा या मार्गानी चालताना क्लेश होतात. (ख) **मार्ग अगम्य - रस्ते-**वाटा सापडणेच फार कठीण असते व वाटेत मोठमोठे डोंगर, पर्वत आहेत ते चढून उतरणे तुम्हाला तर अगदी अशक्य.

**चौ.७-८** (१) दऱ्याखोऱ्यांतून नद्या, नाले ओलांडीत जावे लागणार. दऱ्या भयंकर खोल असतात व दिवसासुद्धा बराच काळ तेथे अंधार असतो. नद्यानाल्यांना वेग व उतार फार असल्याने गुडघाभर पाण्यातून पलीकडे जाणे म्हणजे पुरुषांना सुद्धा प्राणसंकटच वाटते. त्यांच्याकडे नुसते पाहणेसुद्धा कठीण असते. (क) दऱ्या खोऱ्यांत, गुहांत रानटी, हिंस्त्र पशू असतात. त्यांची नुसती गर्जना कानी पडली तरी धीर पळून जातो. मग हे पशू प्रत्यक्ष दिसले की आटोपलेच. भल्ल = भल्लूक = अस्वल; वृक = लांडगा, चित्रातले माकड पाहिले म्हणजे घाबरून जाणाऱ्या तुम्ही ! सिंहादिकांच्या गर्जनेने प्राणच निघून जायचे !

***हिं.दो.*** *। भूमि सयन बलकल बसन असनु कंद फलमूल ॥*
*॥ ते कि सदा सब दिन मिलहिं सबुइ समय अनुकूल ॥६२॥*

***म.दो.*** *। भूमि शयन, वल्कल वसन, अशन कंद फल मूल ॥*
*॥ तीं किं सदा प्रतिदिन मिळति सर्व समयिं अनुकूल ॥६२॥*

**अर्थ :** जमिनीवर झोपावयाचे, वल्कले नेसावयाची आणि कंदमूळ फळांवर

जगावयाचे आहे. बरे ती तरी सदा सर्वकाळ रोज का मिळणार आहेत? अनुकूल समय (देश, ऋतू, परिस्थिति) असेल त्याप्रमाणे सर्व मिळणार !

**टीका.** - (१) ज्यांना गाद्या गिरद्यांवर, पलंगावर झोपण्याची सवय आहे त्यांना जमिनीवर नुसती घोंगडी घालून निजण्याची वेळ आली तर झोप येत नाही. मग नुसता पालपाचोळा, गवत वगैरे पसरून त्यावर झोपण्याने झोप तर नाहीच येणार पण नानाविध रोग मात्र होण्याची भीती असते. **गायत्री पुरश्चरण करणाराने** जमिनीवर कुश पसरून त्यांवर ओले (पिळलेले) वस्त्र घालून झोपावे असा नियम सापडतो. हा प्रयोग करून पाहण्यासारखा आहे. कुशच असतील तर बाधणार नाही अशी खात्री वाटते. (क) **वल्कलें** - झाडांच्या सालींची केलेली एक प्रकारची वस्त्रे. भूर्जपत्रे किंवा केळीची पाने नव्हेत. ही वस्त्रे फार जाडी (पासोडी इतकी) असतात. श्री सज्जनगडावर श्रीसमर्थांचे वल्कल अजून आहे. हल्लीसुद्धा ही (आफ्रिकेत) मिळतात. मुक्काम शीव (मुंबई) येथे श्रीयुत ग. गो. नवरे यांजकडे आफ्रिकेतून आणलेले चांगले नवे वल्कल पाहिले. खूप मोठे आहे. थंडीच्या दिवसात पांघरण्यास उपयोगी पडेल इतके जाडे व मोठे आहे. जाड असल्याने वनातील डास, मच्छर आदि चावले तरी त्वचेला त्रास होणार नाही. (ख) **कंदमूल** - ही द्विरुक्ति नाही. सुरणाला कंद हे नाव आहे. त्याच्यासारखे वाटोळे, गोल असणारे ते कंद व मुळ्यासारखी लांबट वाटोळी असणारी ती मुळे. बटाटे, सुरण, अलकोल, कारंदा वगैरे प्रकारांना कंद म्हणता येईल. रताळी, कोनफळ, लक्ष्मणकंद, मुसळी, मिस्त्री (सफेद, सालम) इत्यादींना मुळे म्हणता येईल. ही वनात नेहमी मिळतील असे नाही. कधी नुसत्या पाण्यावरसुद्धा रहावे लागेल. कंदमूलफलाहार वाटतो तितका त्रासदायक नाही. उलट आरोग्य चांगले राहून सत्त्वगुणाची वृद्धि होते. तरतरी, स्फूर्ति जास्त राहते. आळस पळतो. झोपेची मर्यादा कमी होते, मात्र जिभेच्या चवी पुरविता येत नाहीत. कंद = सुरण असाच अर्थ शब्दकोषांत आहे. हे तर फारच हितावह व आरोग्यवर्धक असतात. भाजून खाल्ले तर फार चविष्ट असतात. (ग) **फल** - फळे तर झाडावरून गळून पडलेलीच खावयाची असतात. 'फलैर्वृक्षाऽवपतितैः (वा.रा. २।२८।१२). आता यापेक्षा अधिक भयानक व प्राणांतक संकटांचे वर्णन करतात :

*हिं. । नर अहार रजनीचर चरहीं । कपट बेष बिधि कोटिक करहीं ॥१॥*
*। लागइ अति पहार कर पानी । बिपिन बिपति नहीं जाइ बखानी ॥२॥*
*। ब्याल कराल बिहग बन घोरा । निसिचर निकर नारि नर चोरा ॥३॥*
*म. । निशिचर मनुजाहारि विचरती । कपटवेष नानाविध करती ॥१॥*
*। लागे डोंगरिंचे अति पाणी । विपिन-विपति न वदवति वाणीं ॥२॥*
*। ब्याल कराल विहग वन घोर हि । निशिचर-निकर नारिनर चोर हि ॥३॥*

**अर्थ :** मनुष्यांना खाणारे निशाचर (रजनीचर) वनात भटकत असतात व ते नाना प्रकारची कपटरूपे (वेष) धारण करीत (घेत) असतात.॥१॥ डोंगरांतील हवा, पाणी फार बाधते (लागते). वनातील विपत्ती शब्दांनी वर्णन करता येत नाहीत (अपार, अनंत आहेत).॥२॥ मस्त हत्ती व सर्प (व्याल) पक्षी व अरण्य सर्वच भयानक ! राक्षसांच्या झुंडीच्या झुंडी वनात असतात व ते स्त्री-पुरुषांना चोरून नेतात. (वनांतील स्त्रिया व पुरुष चोर असतात).॥३॥

**टीका. चौ. १ - (१) निशिचर मनुजाहारि** - निशिचर = राक्षस. ते रात्रीसुद्धा भटकतात व ते माणसांना पकडून खाणारे असतात, व त्यामुळे रात्रभर जागत बसावे लागणार. **(क) कपटवेष नानाविध करती** - ते संन्यासी, ब्राह्मण, भिकारी, अतिथि इ. नाना रूपांनी येतात व माणसांना धरून खातात. कालनेमी मुनि बनला, रावण संन्यासी, अतिथि बनला आहे. शूर्पणखा सुंदर तरुणी बनली, मारीच मृग बनला. काही राक्षस अन्न, कंद, फळे यांचे रूप घेत असत व मुनींनी ती भक्षण केल्यावर पोट फाडून बाहेर पडत व त्या मुनींना खाऊन टाकीत असत. **म्हणून सीतेला धाक घालण्यासाठी येथे अतिशयोक्ति केली आहे असे मानण्याचे कारण नाही.**

**चौ. २ - (१) पाणी लागणे** - हवापाणी न मानवणे, बाधणे - डोंगरांतील हवेने हिवताप, वगैरे रोग होतात. डोंगरात पाणी आधी दुर्मिळ, नदीनाल्यांचे पाणी प्यावे लागते. त्यात झाडांचा पालापाचोळा कुजलेला असतो. विविध विषारी वनस्पति उगवलेल्या असतात. त्यामुळे संग्राहणी, सांधे धरणे, पोटदुखी, अपचन इ. नाना रोग होतात. बचनाग, धोतरा, कौंडळ (वृंदावन) कुचला यांची पाने, फळे, मुळे इत्यादींनी पाणी विषारी झालेले असते. सीताफळ, पांढरा चाफा, पिवळा धोत्रा (सत्यानाशी) इत्यादींच्या पानांमुळे जुलाब होतात. सार हे की

अरण्यात कल्पनातीत संकटे असतात. वा.रा. २।२८ या सर्गात वनदुःखाचे वर्णन (७-२६) आहे. तथापि येथील ८।१० ओळींतील वर्णन जितके हृदयस्पर्शी व वस्तुस्थितीचे चित्र सहज डोळ्यांपुढे उभे करणारे आहे तितके ते ११ श्लोक करीत नाहीत. पुढील चौपाईत साररूपाने उपसंहार करतात.

**चौ. ३ - (१) व्याल =** मस्त हत्ती व सर्प - व्यालो दुष्टगजे सर्पे शठे श्वापदसिंहयोः' (हैमः) उपलक्षणाने वन्य पशु व सरपटणारे प्राणी असा अर्थ घेणे जरूर आहे. खगांचा उल्लेख स्पष्टच आहे. आज अरण्यातील झाडी तोडली गेल्याने पुष्कळ ठिकाणी डोंगर बोडके झाले असले तरीसुद्धा दण्डकारण्यातील काही भाग अजून फारच भयंकर आहेत. मग त्या काळची दण्डकारण्यातील कानने किती भयंकर असतील? **(क) निशिचर निकर नारिनर चोर हि** - याचे दोन अर्थ होतात व ते प्रथम दिलेले आहेत. जेथे निशाचारांची वस्ती आहे तेथे ते नारीनरांना चोरणारे आहेत. 'नारि' शब्द प्रथम घातला. कारण की त्यांना चोरून नेण्यात खाण्याचाच हेतु असतो असे नाही. निशाचर स्वभावताच अति कामी व व्यभिचारी असतात. निशाचर लक्षण १।१८४।१-३ मध्ये दिलेले पहावे. येथे सुचविले की वनात स्त्रियांचे पातिव्रत्य, शील टिकणे फार कठीण आहे. सीतेला चोरून नेलीच आहे. **(ख)** जेथे राक्षसांची वस्ती नाही अशा चित्रकूटासारख्या वनात राहणाऱ्या भिल्ल, कोळी वगैरे जातींचे लोक चोऱ्या करण्यात पटाईत, क्रूर, निर्दय असतात. चित्रकूटचे भिल्ल-कोळी नारीनर म्हणतात 'हीं अमची अति मोठी सेवा । वस्त्र पात्र कीं चोरुं न देवा ! ।। आम्हिं जड जीव जीवगणघाती । कुटील कुचाली कुमति कुजाती ।। पाप करत रात्री दिन जातही ।। (२।२५१।३-५)

***हिं*** *। डरपहिं धीर गहन सुधि आएँ । मृगलोचनि तुम्ह भीरु सुभाएँ ।।४।।*
*। हंसगवनि तुम्ह नहिं बन जोगू । सुनि अपजसु मोहि देइहि लोगू ।।५।।*
*। मानस सलिल सुधाँ प्रतिपाली । जिअइ कि लवन पयोधि मराली ।।६।।*
***म.*** *। डरति धीर गहना स्मरतां मनिं । तुम्हीं स्वभाव भीरु मृगलोचनि ।।४।।*
*। हंसगमनि ! तुम्हिं वना योग्य ना । श्रवुनि देति मज जन अपयश ना ।।५।।*
*। मानससलिल - सुधें प्रतिपालित । जगे मराली कीं लवणाब्धित ।।६।।*

**अर्थ :** काननाची (गहनाची) आठवण झाली की धैर्यवान पुरुषसुद्धा घाबरून

जातात. मृगलोचनी ! तुम्ही तर स्वभावताच भित्र्या आहात.॥४॥ (म्हणून) हंसगमनी ! तुम्ही वनवासाला योग्य नाहीत. (असे असून मी नेल्या तर ते) ऐकून लोक मला अपयश देतील. नांवे ठेवतील ना ! ॥५॥ मानससरोवरांतील अमृतासारख्या जलाने जिचे पालनपोषण झाले आहे अशी मराली (हंसी) खाऱ्या पाण्याच्या सागरात जगेल काय?॥६॥

**टीका. - ल.ठे.** - सीता वनवासाला अपात्र आहे हे दाखविण्यासाठी कौसल्या सासूने जे दृष्टान्त दिले व जी कारणे दाखविली तेच बहुतेक दृष्टान्त देऊन व तीच कारणे दाखवून रघुवीर हे दाखवित आहेत की तुमच्या सासूबाईचे जे मत आहे तेच माझे मत आहे. त्यांची जी इच्छा आहे तीच माझी इच्छा व तुम्हाला आज्ञा आहे.

**चौ. ४ -** (१) **'चित्रलिखित कपि बघुनिहि भीता'** असे कौसल्या म्हणाली तेच - **'तुम्ही स्वभावभीरु मृगलोचनि'** याने येथे स्पष्ट सांगितले. स्वभावानेच भित्र्या असल्याने विवेकाने किंवा सवयीने तुमचा भित्रेपणा कमी होणार नाही. अरण्य = गहन, तर इतके भयंकर आहे की धैर्यवान पुरुषांनासुद्धा त्याच्या स्मरणाने थरकांप सुटतो व घाम फुटतो. असल्या अरण्यात धीर पुरुषसुद्धा प्रवेश करणार नाहीत. तुम्ही आधीच स्त्री, त्यात सुंदर व अति कोमल व त्यांतही भित्रा स्वभाव म्हणून वनात येण्यास अगदी अपात्र ! **(क) मृगलोचनि** - ज्याच्या स्मरणाने धीर पुरुषांची गाळण उडते ते भयानक कानन तुम्हाला पाहवेल तरी कसे? वनात राहणाऱ्या मृगीसुद्धा सिंहव्याघ्रादिकांच्या नुसत्या गर्जनांनी गर्भगळित होतात. त्यांना फार त्वरेने पळता येत असून पळवत नाही; त्यातूनही हरिणीसारख्या उड्या मारीत पळेन म्हणालात तर –

**चौ. ५ -** (१) तुम्ही हंसीसारख्या हळुहळु, मंदमंद चालणाऱ्या ! पळताही येणार नाही. **(क)** या प्रमाणे शरीराने व मनानेसुद्धा वनात जाण्याची व राहण्याची पात्रता नाही. **'तापस वनिता वा तपयोग्या'** (६०।३ टी. पहावी) या कौसल्येच्या वचनाचा आधार सीतेने घेऊ नये म्हणून स्वभावभीरुतेचे वर्णन केले. **(ख)** असे असता मी तुम्हास वनांत नेल्या तर लोक तुम्हाला नाही वाईट म्हणणार ! लोक म्हणतील की स्त्रियांची बुद्धि कोती व जनकनन्दिनीचे वय ते किती? त्यांना

काय वनाची कल्पना? वन म्हणजे जनकपुरीतील पुष्पवाटिकाच त्यांना वाटणार. लोक नावं ठेवतील मला. म्हणून सार हे की पतीची आज्ञा मोडून, सासूची इच्छा अतृप्त ठेऊन, कल्पनातीत विपत्तींत पडून पतीचा नावलौकिक कमी होईल व अपयश मिळेल असे करणे तुमच्यासारख्या सतीला शोभते का?

**चौ. ६ - (१) मानससलिल सुधे प्रतिपालित... लवणाब्धित - 'सुरसरसुभगबनज - बनचारी । डबक्या जोगि किं हंसकुमारी'** (६०।५) असे जे कौसल्येने म्हटले तोच अर्थ येथे आहे. येथे सीतेला 'मानसमराली' म्हटले आहे तर शरभंग मुनि रामचंद्रांस **'शंकर मानसराजमराला !'** (३।८।१) म्हणालेच आहेत. म्हणूनच सीता विचारणार आहे की **'मी सुकुमारी नाथ वनजोगे । तुम्हां उचित तप मज सुख भोगें?॥** (६७।८) **(क)** कौसल्येच्या मताला पूर्ण पुष्टी देणारे हे अगदी स्पष्ट वचन आहे. या चौपाईत वनात भोगाची पूर्ण प्रतिकूलता दाखविली. पालन लालन-पोषणाचा अभाव दर्शविला व जगणे अशक्य आहे हे सुचविले.

*हिं. । नव रसाल बन बिहरनसीला । सोह कि कोकिल बिपिन करीला ॥७॥*
*। रहहु भवन अस हृदयँ बिचारी । चंदबदनि दुखु कानन भारी ॥८॥*

*म. । नव रसाल - वनिं विहरणशीला । शोभे कारवि - विपिनिं कोकिळा ॥७॥*
*। रहा भवनिं या करुनि विचारा । चंद्रवदनि वन दुःखपसारा ॥८॥*

**अर्थ :** नवीन आम्रवनांत विहार करणारी जी कोकिळा ती कारवींच्या वनात शोभेल काय?॥७॥ चंद्रवदनी ! याचा विचार करून घरी रहा; वन म्हणजे केवळ दुःखांचा पसारा आहे.॥८॥

**टीका. चौ. ७ - (१) कोकिळा** तरुण (नवीन) आमराईत विहार करतात. तो त्यांचा स्वभाव आहे. तेथे छाया शीतल, फुलांचा सुगंध व रसाळ फळे इत्यादी सर्व गोष्टी कोकिळेला सहज मिळू शकतात. आंब्याच्या दाट छायेत पानांनी झाकलेली कोकिळा कोणाच्या दृष्टीस न पडता विहार करू शकते. उन्हाळ्याचा व वाऱ्याचा त्रास होत नाही. म्हाताऱ्या, जुन्या आम्रवृक्षांच्या शाखा लांब लांब असल्यामुळे कोणास न दिसता विहार करणे तेथे शक्य नसते म्हणून 'नव' = नवीन - तरुण शब्द घातला आहे. सीता अयोध्येतील अंतःपुरात, कोणाही पुरुषांच्या नजरेस न पडता विहार करणारी - आहे. (क) करीर =

कारव, (हिंदी, करील), करीलवन = कारवींचे वन. कारव हे मोठे झाड नसते. झुडुपही नसते. दीड-दोन पुरुष उंच, काडीसारखे वाढणारे एक झाड असते. त्याच्या काड्या फार तर पायाच्या अंगठ्या एवढ्या जाड्या होतात. तेव्हा त्या तीन वर्षांच्या असतात. त्यांस थाटे म्हणतात. हे फार कणखर व टिकाऊ असतात. हे घरांच्या ओमणांस वापरतात. ६०-६० वर्षे झाली तरी यांचे ओमण कुजत नाही. एक वर्षाचीच असते ती कारव फार ठिसूळ असते. कारवींना थोड थोड्या अंतरावर गाठी असतात व तेथे अगदी बारीक दोन-चारच पाने असतात. फुले अगदी बारीक तांबूस रंगाची असतात. फळे आलेली कुठे पाहण्यात नाहीत. कारवींचे कूड चांगले होतात. फळे व पाने नसल्याने कारवींच्या वनात पक्षी बहुधा नसतात. कोकिळा तर चुकूनसुद्धा दिसत नाही. पक्षी चुकून आल्यास पारध्यांची शिकार सहज होते. आश्रय नाही, छाया नाही, गारवा नाही, बसण्यास फांदी नाही, सौंदर्य नाही, फळ नाही, संरक्षण नाही. चिमण्यांनासुद्धा तेथे सुख होणे शक्य नसते. मग कोकिळेला तेथे स्थान कोठले? 'किं पुष्पैः किंफलैरतस्य करीरस्य दुरात्मनः ।। येन वृद्धिं समासाध्य न कृतः पत्रसंग्रहः ।। फले दूरतरेधारताम्' (सु.र.) करीरान्योक्ति.

**चौ. ८ - (१) रहा भवनिं या करुनि विचारा** - घरी राहिल्याने काय काय फायदे होणार व वनात आल्याने तोटे किती यांचे जे वर्णन करून सांगितले त्याचा विचार केला असता घरी राहण्यात धर्मपालन, सुख, निर्भयता, पतीच्या आज्ञेचे पालन, सासूंची सेवा इत्यादी सर्व श्रेयस्करच आहे. हा विचार निश्चित करून घरी राहा. (क) वन दुःखपसारा - वनात सुखाचा लेश नसून वन म्हणजे दुःखांचेच अरण्य. 'सदा सुखं न जानामि दुःखमेव सदावनम्' (वा.रा. २८।६) अतो दुःखतरम् वनम्; तस्मात्दुःखतरं वनम्, ततो दुःखतरंवनम्' असे उल्लेख १७।१८ वेळा आहेत. (वा.रा.सर्ग २८ पहा).

*हिं.दो.* *। सहज सुहद गुरु स्वामि सिख जो न करइ सिर मानि ॥*
*॥ सो पछिताइ अघाइ उर अवसि होइ हित हानि ॥६३॥*

*म.दो.* *। सहज सुहद गुरु धनी वच जे न शिरीं धरतात ॥*
*॥ ते पस्तावति पोटभर कधिं न टळे हितघात ॥६३॥*

**अर्थ :** स्वभावतःच जे सुहृद आहेत ते, गुरु व धनी (स्वामी) यांची आज्ञा व उपदेश जे शिरसामान्य करीत नाहीत त्यांना पोटभर पश्चात्ताप होतो व त्यांच्या हिताचा नाश झाल्याशिवाय रहात नाही. (टळत नाही; अवश्य होतो).॥६३॥

**टीका.** - स्त्रीला पति हा सहज सुहृद (मित्र) आहे); व स्वामी पण आहेच. गुरुही पतीच. 'पतिर्हि दैवतं स्त्रीणां पतिर्भर्ता पतिर्गुरुः' येथे कौसल्याही गुरु आहे. यापैकी एकाचे वचनसुद्धा शिरोधार्य मानणे हा हितेच्छु मानवांचा धर्म आहे. परम धर्म आहे. तुम्हाला तर तिन्ही प्रकारांनी सांगितले गेले आहे की घरी रहा. तुम्ही ऐकले नाहीत तर किती अधर्म होईल याचा विचार करा. स्वामींच्या आज्ञेविषयी शंकर रामचंद्रास सांगतात. 'पालन आज्ञा धरुनी माथां । परम धर्म हा आमचा नाथा !' माय बाप गुरु नी प्रभुवचनें । शुभ जाणुनि विण विचार करणें (१।७७।२-३) 'गुरु-पितृ-मातृ-धनी-हित-वचनें । मुदित मनें शुभ जाणुनि करणें ॥ उचित किं अनुचित करत विचारा । धर्मनाश, शिरीं पातकभारा' (२।१७७।३-४). (क) माता, पिता, गुरु, स्वामी इ. सर्व सुहृदच असतात व हिताचाच उपदेश करणारे असतात. त्यांची इच्छा, आज्ञा मोडली म्हणजे हिताची हानि होणारच; व पोटभर = भरपूर पश्चात्ताप त्यामुळे करावा लागणारच. (ख) रघुवीराने सीतेला केलेला उपदेश येथे संपला. 'अमचे वचनें गृहीं रहा तर' (६१।३) असा उपक्रम केला. मागील चौपाईत उपसंहार करून आज्ञा मानल्याचा परिणाम या दोह्यांत सांगितला. आता पुढे सीता आपले मत सांगून मागील वचनांतील आक्षेपांचे निरसन करील :

**हिं.** *। सुनि मृदु बचन मनोहर पिय के । लोचन ललित भरे जल सिय के ॥१॥*
*। सीतल सिख दाहक भइ कैसें । चकइहि सरद चंद निसि जैसें ॥२॥*
*। उतरु न आव बिकल बैदेही । तजन चहत सुचि स्वामि सनेही ॥३॥*

**म.** *। पतिवच मृदुल मनोहर ऐकुन । सजल ललित सीतेचे लोचन ॥१॥*
*। दाहति शीतल वचनें तीला । शरद चंद निशि जशि कोकीला ॥२॥*
*। वदवे ना, विकळ वैदेही । स्वामी शुचि तजुं बघती स्नेही ॥३॥*

**अर्थ :** (प्रिय) पतीचे कोमल व मनोहर भाषण (वच) ऐकून सीतेचे सुंदर

नेत्र पाण्याने भरले.॥१॥ शरद ऋतूंतील चांदणीरात्र जशी चक्रवाकीचा दाह करते तशी (ती) शीतल वचने तिला दाहक झाली.॥२॥ आणि वैदेही विव्हळ झाली, की माझे पवित्र स्नेही स्वामी माझा त्याग करू पहात आहेत. (त्यामुळे) तिला बोलवे ना ॥३॥.

**टीका. - चौ. १ -** (१) येथे रामवचनांनाच दुःखाचे कारण मानले आहे. कौसल्येचे भाषण दुःखद न वाटण्याचे कारण हेच की त्यात 'घरी रहा' अशी आज्ञा दिली नाही व काही वचने वनात नेणे जरूर आहे हा अर्थ ध्वनित करणारी आहेत. त्यामुळे आशातंतु साफ तुटला नव्हता; पण रामचनांनी तो साफ तोडला व निराशा झाली. (क) कैकयीच्या मृदु व **प्रेमळ** वचनांनी दशरथांच्या हृदयाचा दाह झाला. वनवासाची वार्ता इंगळीच्या विषासारखी सर्व नरनारींना दाहक झाली. रामचंद्रांचे **मधुर विनम्र व शीतल** भाषण **कौसल्येला** दाहक झाले व रघुवीराचे **कोमल, मनोहर व शीतल** भाषण **सीतेला** दाहक वाटले. पुढे नयनागर रामाचे 'सुकवी **शीतल** वचन तयाला' (**लक्ष्मणाला**) (७११८) आणि **सुमित्रा** मात्र 'घाबरली वच **कठोर** परिसुनि' (लक्ष्मणाचे) ॥७३।६॥ सर्व ठिकाणी दाहक होणे हे एकच कार्य घडले पण परिस्थितीप्रमाणे त्या त्या भाषणाला दिलेल्या विशेषणांत फरक कसा झाला हे पाहण्यासारखे आहे. ५४।१-२ मधील तुलना मार्गदर्शक होईल. रघुवीराने केलेला उपदेश जरी कोमल, शीतल, मनोहर वाणीने केलेला असला तरी त्याचा अर्थ १४ वर्षे रामविरह उत्पन्न करणारा असल्याने तो दाहक व दुःखद वाटला. सुंदरी, हंसगमनी, सुमुखी, चंद्रवदनी, मराली, कोकिला इ. शब्द मनोहर आहेत. कोमलता सर्वत्रच आहे व शीतलता मधून मधून आहेच. पण परिणाम मात्र कठोर व हृदयाचा दाह करणारा झाला. रामवचने कौसल्येला बाणांसारखी बोचली, तशी किंवा त्याहूनही अधिक क्लेशदायक ती सीतेला वाटली.

**चौ. २ -** (१) यवासावर पावसाचे शीतल पाणी पडले म्हणजे ती वनस्पति जशी होते तशी शीतल वचनांनी कौसल्या सुकून गेली आहे. येथे सुचविले की सीतासुद्धा सुकुन गेली. शरद ऋतूंतील चांदणी रात्र इतर सर्व जीवांना सुखद, शीतल, तापहारक, आल्हाददायक असली तरी कोकीला - चक्रवाकीला ते अमृतमय चांदणे व ती मनोहर रजनी दाहक वाटते. तसेच सीतेचे झाले. गुरु, स्वामी,

सुहृद इ. सर्वांच्या दृष्टीने रघुवीराने केलेला उपदेश कोमल, मनोहर व शीतल असला तरी तो सीतेला व्याकुळ करण्याइतका दाहक व कठोर ठरला. **(क) चंद = चंद्र** (अ.व्या.सु.) चंद व चंद्र यांचा अर्थ एकच असला तरी एका शब्दात रेक (रकार) नाही. 'र' अग्निबीज आहे. त्याचे अस्तित्व चंद्र शब्दात आहे व त्यामुळे तो दाहक होणे शक्य आहे. रघुनाथास तो पुढे दाहक झालाच आहे. (सं.का. १५।२) चंद शब्दांत रेक नाही त्यामुळे तो दाहक होणे शक्य नाही. 'शरद' शब्दांत रकार आहे. दाहकता आहे. शरदातप, शरदांतील उन्हाळा फार तापदायक असतो. परंतु चांदण्या रात्रीत तो ताप हरण करण्याचे सामर्थ्य असते. **'निशिं शशि शरदातपा निवारी'** (४।१७।६) असे असून चक्रवाकीला शरदातप दाहक वाटत नाही. पण त्यांतील चांदणी रात्र फार तापद वाटते. तसेच सीतेचे झाले आहे. तिला वनवास परमप्रिय व विश्वसुखद वाटत आहे. कारण त्यांत प्रियवियोग नाही व रामभाषण विरहदावानल उत्पन्न करणारे आहे.

**चौ. ३. (१) स्वामी शुचि स्नेही - 'स्वामि नाथ तुम्हीं दास मी त्यजता इलाज काय'** (७१) असे जे लक्ष्मणाने सांगितले तोच भाव येथे सीतेच्या मनात आहे. 'नेणार नाहीं बरोबर' असे निक्षून सांगितले असते तर मी काय केले असते? परंतु नाथ-स्वामी असून माझ्यावर फार स्नेह करणारे (स्नेही) आहेत. म्हणून माझी समजूत घालण्याचा प्रयत्न केला. मला विपत्ती सोसाव्या लागतील असे जाणून माझ्यावरील परम स्नेहामुळेच माझा त्याग करू बघत आहेत. **(क) शुचि** - पवित्र आहेत. धर्माचे पालन करण्यासाठी दुःसह वनवासाचे कष्ट सोसण्यास आनंदाने सिद्ध झाले आहेत. पण प्रेमाच्या पत्नीला दुःख का द्यावे या पवित्र भावनेने व मातेला सुख देण्याच्या पवित्र इच्छेने मला टाकून जाण्याची इच्छा आहे. त्यांच्या मनात दुसरा कोणताही अनिष्ट हेतु नाही, तरी टाकून जाण्याचा विचार दिसतो आहे. स्नेह न करणाऱ्या व्यक्तीने त्याग केला असता तर काही वाटले नसते; पण स्नेही व पवित्र असून त्याग करू पाहतात हे माझे दुर्दैव ! पण हा विरह कसा सहन करायचा ! या विचारांनी विव्हळ झाली. (ख) वैदेही - विदेहाची कन्या असून इतकी विव्हळ झाली की देहभान सुटल्यासारखे दिसू लागले. देहसुखाची विषय सुखाची मुळीच आकांक्षा नसूनही विव्हळ झाली. या दुःखाची कल्पना विषयी

जनांना कशी करता येणार? जे विदेह असतील त्यांना थोडी कल्पना करता येईल. (ग) वदवे ना - उत्तर देण्याची फार इच्छा आहे; पण शब्दांचा उच्चार करण्यास लागणारी मन, वाणी व प्राण यांची शक्तीच गेली आहे. पण :

*हिं. । बरबस रोकि बिलोचन बारी । धरि धीरजु उर अवनिकुमारी ॥४॥*
*। लागि सासु पग कह कर जोरी । छमबि देबि बडि अविनय मोरी ॥५॥*
*। दीन्हि प्रानपति मोहि सिख सोई । जेहि बिधि मोर परम हित होई ॥६॥*
*। मैं पुनि समुझि दिखि मन माहीं । पिय बियोग सम दुखु जग नाहीं ॥७॥*

*म. । वारि विलोचनिं बळेंचि बारी । धीर धरूनि उरिं अवनिकुमारी ॥४॥*
*। नमुनि सासुपदिं करयुग जोडी । क्षमा देवि ! अति अविनय खोडी ॥५॥*
*। मला प्राणपति तें उपदेशित । ज्यामधिं माझें होइ परम हित ॥६॥*
*। करूनि विचारा गमे मम मना । पतिवियोग-सम विश्विं दुःख ना ॥७॥*

**अर्थ :** डोळ्यांतील पाणी बळाने निवारण करून (दाबून) धीर धरून अवनिसुता (सीता) ॥४॥ सासूच्या पायांना नमन करून, हात जोडून म्हणाली की देवि ! माझा अविनय (उद्धटपणा), माझी खोडी (दोष) क्षमा करावी.॥५॥ ज्यामध्ये माझे परमहित होईल असा उपदेश मला प्राणपतींनी केला.॥६॥ विचार करून पाहता माझ्या मनाला वाटते की पतिवियोगासारखे दुःख या जगात नाही.॥७॥ (या दोहयाच्या सातच चौपाया आहेत).

**टीका. चौ. ४-५** - सासूच्या देखत पतीशी बोलावयाचे आहे म्हणून प्रथम सासूची क्षमा मागून, मुलीने लडिवाळपणाने, प्रेमाने, मातेजवळ जसे सांगावे तसे स्वतःचे मत सांगत आहे. (१) डोळे पाण्याने भरले होते म्हणून ते प्रथम पुसले व आणखी येत होते ते प्रयत्नांनी येऊ दिले नाही. बोलवत नव्हते पण बोलल्याशिवाय गत्यंतर नाही म्हणून शोकाचा आवेग धीर धरून आवरला. (क) **अवनिकुमारी** - अवनीची मुलगी. (अव रक्षणे) अवनि = रक्षण करणारी. अवनि = (पृथ्वी) जीवमात्राचे रक्षण करणारी आहे. तिला दुष्ट राक्षसांचा भार असह्य झाला आहे. या संकटांतून अवनीला सोडविण्यासाठी सीतेने वनात जाणे भाग आहे; म्हणून बोलणे भाग आहे. 'धीर धरणे'चा संबंध दाखवायचा असता तर धरणी, धरा शब्द जसा इतरत्र मानसांत वापरला आहे, तसा येथे वापरता

आला असता व अनुप्रास सौंदर्य वाढले असते. । धरि धीरजु उर धराकुमारी । असे सहज म्हणता आले असते. 'धरणिसुता धीरा धरि' (२८६), ४४।१ मध्ये 'अवनिप' शब्द रक्षणाच्या संबंधानेच वापरला आहे. (गू.चं.प.)

(२) **क्षमा देवि अति अविनय, खोडी** - आपल्या देखत त्यांच्याशी बोलणे हा मोठा उद्धटपणा आहे. खोडी = दोष आहे. मर्यादाभंग दोष आहे. पण आपण सुचविल्यावरून त्यांनी मला उपदेश केला व **'रहा गृहीं, या करुनि विचारा'** (६३।८) असे मला सांगितले. त्याप्रमाणे मी विचार करून पाहिला व मला काय वाटते ते सांगणे भाग आहे. त्यामुळे मला हा अविनय या प्रसंगी करावा लागत आहे. तथापि तो दोषच आहे. त्याची आपण क्षमा करावी.

**चौ. ६-७** (१) रघुवीराला सुद्धा आईच्या देखत बायकोशी बोलण्यास संकोच वाटला. परंतु त्यांनी प्रिये वगैरे शब्द वापरले नाहीत. तथापि त्या अर्थानेच सुंदरी, सुमुखी वगैरे वापरलेच. **'अति अविनय'** असे सांगून आधीच क्षमा मागितल्यामुळे सीता 'प्राणपति' 'पिय' वगैरेंचा उपयोग करीत आहे. तिला तसे केल्याशिवाय राहवतच नाही. (क) **प्राणपति** = प्राणांचे स्वामी. ते वनात गेले की प्राणांना तरी त्यांच्या सेवेसाठी जावेच लागणार.' सेवकांनी स्वामींचें अनुगमन करणे कर्तव्यच आहे. (ख) **ज्यामधिं माझे होइ परमहीत** - प्राणपतींनी केलेल्या उपदेशा प्रमाणे वागण्याने माझे परम हित होईल हे मला मान्य आहे. पण परमहित स्वर्गप्राप्ति, मेल्यावर होणार व जिवंत असता देहसुख, भोगविलास सुख मिळणार. पण मला तर असे वाटते की धर्माचरण करीपर्यंत प्राण राहिले असे मानले तरी अगदी दुःसह, दुःखमय दुर्दशेचाच अनुभव घ्यावा लागेल व ते दुःख तुम्हाला सुद्धा पाहवणार नाही व तुम्ही दुहेरी दुःखी व्हाल अशी मला भीती वाटते कारण (ग) **पतिवियोग सम विश्वि दुःख ना** - पतिपासून दूर, पतिविरहांत राहण्यासारखे दुसरे कोणतेही दुःख जगात असणे शक्य नाही, असे मला वाटते.

*हिं.दो.* *। प्राननाथ करुनायतन सुंदर सुखद सुजान ॥*
*॥ तुम्ह बिनु रघुकुल कुमुद बिधु सुरपुर नरक समान ॥ ६४ ॥*

*म.दो.* *। प्राणनाथ करुणायतन सुंदर सुखद सुजाण ॥*
*॥ तुम्हिं रघुकुल कुमुदेंदु विण सुरपुर नर्क-समान ॥६४॥*

**अर्थ :** आपण माझ्या प्राणांचे आधार (नाथ), करुणेचे माहेरघर, सुंदर, सुखदायक, सुजाण व रघुकुल कुमुदांना चंद्र (इंदु, बिधु) असून आपल्या वाचून (मला) सप्तस्वर्ग (सुरपुर) नरकासारखे आहेत (वाटतात).।।दो.६४।।

**टीका.** (१) पतिवियोगासारखे दुःख विश्वात नाही असे मागील चौपाईत सांगितले. पतिवियोग दुःख किती घोर आहे हे या एकाच दोह्यांत ध्वनित केले आहे. यांतील गूढ भागांचाच विस्तार पुढील चौपायांत आहे. (क) प्राणनाथ = प्राणांचे आधार; आधार गेला त्याच्या आश्रयाने असणारी वस्तु आधेय राहू शकत नाही. सुचविले की प्राण या देहात राहणार नाहीत. 'ठेवा पुरिं जर अवधिवरि राहति वाटे प्राण? (६६) असे पुढे स्पष्टच विचारले आहे. वा.रा. सीतेने सांगितले आहे की विष खाऊन मरेन, प्रायोपवेशन करून मरेन इ. इ. प्राण आपोआप सहज जाण्यात प्रेमाची व विरहदुःखाची उत्कटता व शोभा जास्त की विष खाऊन, प्रायोपवेशन करून, आत्महत्या करण्यात जास्त हे वाचकांनीच ठरवावे. (ख) **करुणायतन** - आपण करुणेचे निवासस्थान असून मला प्राणांतिक विरहाने मारणार काय? इतकी कठोरता करुणासागरात कशी आली? 'श्रवुनि वचन अस कठिण' (६७). असे पुढे स्पष्ट सांगत आहे. (ग) **सुंदर** - आपल्या सौंदर्य संपन्न मुखाकडे क्षणोक्षणी पाहिल्यावर दुःख कुठले? क्लेश कुठे प्रिय पतिस निरखता' (६७।४) 'वारंवार मूर्ति मृदु बघतां । लागे ना मज वाततप्तता. (६७।६) (घ) **सुंदर सुखद** - 'प्रभु ! सुख सकल तुम्हांसह असतां । शरद विमल विधुवदन निरखतां ॥ (६५।८) निरनिराळ्या प्रकारची सुखे कशी मिळतील व दुःख मुळीच का होणार नाही याचे वर्णन दो.६५ - ६७।७ पर्यंत केले आहे. (ङ) **सुजाण** - आपल्याबरोबर आल्यानेच मला दुःखरहित, सर्व प्रकारचे सुख होईल हे आपणांस माहीत असता माझ्या हृदयाची दशा आपण जाणत असता व सर्व प्रकारे समर्थ असता मला घरी राहण्यास सांगत आहात ना !

(२) **रघुकुल कुमुदेंदु** - कुमुद + इन्दु (चंद्र). चंद्र कुमुदांना आल्हाददायक असतो; तसेच आपण रघुकुलाला सुख देणारे आहात. भाव हा की मला टाकून जाल तर रघुकुलातील पूर्वजांना सुख होणार नाही. अपराधाशिवाय रघुकुलवधूचा त्याग केल्याने आपल्या नावास कमीपणा येईल. (क) **सुरपुर नर्कसमान** - घरी

राहिल्याने विनाकष्ट धर्माचे फळ मिळेल असे जे रघुवीराने सांगितले त्यावर हे उत्तर आहे. त्या धर्माचे पालन केल्याचे फळ स्वर्ग आहे. येथे सुरपुर = इन्द्राचा स्वर्ग, इंद्रलोक असा अर्थ घेणे इष्ट नाही. म्हणून स्वर्ग शब्द न वापरता सुरपुर वापरला. ।। सरगउ नरक समान ।। असे सहज म्हणता आले असते. सुरपुर = देवनगर, देवलोक म्हणजेच सत्यलोकादि सप्तस्वर्ग. हा भाव सुचविण्यासाठी या दोह्यांत सातच चौपाया घातल्या आहेत. आणखी हेतु पुढे दिसेल.

**वि.ल.ठे. - एकच चौपाई कमी का?** २।३ कमी का नाहीत? सप्त स्वर्गातील एकत्रित केलेले सुख सर्व नर्कातील एकत्रित केलेल्या दुःखासारखे होण्यास **एकच कारण पतिवियोग हे आहे;** अनेक कारणे नाहीत म्हणून एकच चौपाई कमी केली. **(क)** दुसरा भाव हा की पति समीप असता नर्क दुःखसुद्धा सप्त स्वर्गातील सुखांपेक्षा श्रेष्ठ वाटेल. 'पतिविणसर्वचि शोक - इयत्ता' 'यमयातना सदृश संसारहि' (६५।४-५)

**(३) घरी राहण्यात सप्तविध सुख आहे.** I परम सुंदर, ऐश्वर्य संपन्न नगरांत निवास. II सर्वसुखसंपूर्ण राजभवनात राहणे. III परमसुखदशय्या, आसनादि, IV उत्तमोत्तम वस्त्रालंकार V उत्तमोत्तम अमृतासारखे भोजन, खाद्य. VI सुधेसारखे आरोग्यवर्धक निर्मल जल. VII लालनपालन, पोषण संरक्षण करणारी सासु-सासरा इत्यादी प्रेमी माणसे. ही सप्तविध सुखे पतिवियोगात नर्का सारखी - यम यातनांसारखी अति दुःखद वाटतील. **(क)** ही साती प्रकारची सुखे मुळीच नसून या विरुद्ध सात प्रकारची दुःखे रघुवीरांनी वर्णिली आहेत : I वनवास म्हणजे दुःखांच्या पसाऱ्यात निवास. II मनुजाहारी राक्षसांच्या व नरनारी चोरांच्या वस्तीत, झाडाखाली नाही तर पर्णकुटीत राहणे. III भूमिशयन, IV वल्कल वसन, V अशन कंदे फलमूल, जेव्हा मिळेल तेव्हा, नाही तर पाणी. VI ते सुद्धा 'लागे डोंगरिंचें अति पाणी', घाणेरडे, रोगोत्पादक. VII संरक्षक, सेवक, लालन पालन पोषण करणारे कोणी नाहीत. उलट व्याघ्रसिंहादिकांचे भय सदा सर्वकाळ.' **पण ही सप्तविध दुःखें प्रभुसमीप असतां सप्तस्वर्गापेक्षा सुखद वाटतील,** असे सुजाण वैदेही सुचवीत आहे. ही सात प्रकारची दुःखे सुखरूप कशी होतील हेच पुढील दोह्यांतील चौपायांत जगदंबासीता स्पष्ट सांगत आहे. **एक चौपाई कमी का व सातच चौपाया का याचा शोध करीत असता हे तत्त्व बाहेर पडले की**

मनुष्याला आवश्यक सुखद गोष्टी सातच आहेत.

हिं. *। मातु पिता भगिनी प्रिय भाई । प्रिय परिवारु सुहृद समुदाई ॥१॥*
*। सासु ससुर गुर सजन सहाई । सुत सुंदर सुसील सुखदाई ॥२॥*
*। जहँ लगि नाथ नेह अरु नाते । पिय बिनु तियहि तरनिहु ते ताते ॥३॥*
*। तनु धनु धामु धरनि पुर राजू । पतिबिहीन सबु सोक समाजू ॥४॥*

म. *। माता पिता स्वसा प्रिय बंधू । प्रिय परिवार सुहृद संबंधू ॥१॥*
*। सासु सासरा गुरु सहकारी । सुत सुंदर सुशील सुखदाई ॥२॥*
*। नाथ ! पति विना स्नेह नि नातें । तापद तरणिहुनी स्त्रीला तें ॥३॥*
*। तन धन धाम धरणि नृपसत्ता । पतिविण सर्वचि शोक-इयत्ता ॥४॥*

**अर्थ :** माता पिता, प्रिय बहिणी व प्रिय भाऊ, प्रिय परिवार व सुहृद इ. संबंधी ॥१॥ सासू, सासरा, गुरु व सहकारी सुंदर, सुशील सुख देणारे पुत्र.॥२॥ हे सर्व स्नेहाचे संबंध आणि नाती, हे नाथ ! स्त्रीला पतिशिवाय सूर्यापेक्षाही अधिक तापदायक आहेत.॥३॥ शरीर, धनदौलत, जमीनजुमला व राज्यसत्ता इत्यादी सर्व गोष्टी पतिवाचून शोकाची परमावधि आहेत ! ॥४॥

**टीका. चौ. १ -** (१) या चौपाईत माहेरची नाती, तिकडील सुख व बालपणी विवाहापर्यंत पालन पोषणादी करणारांचा उल्लेख आहे. हा उल्लेख करण्यात सुद्धा **तु.दासांचे वैशिष्ट्य दिसतेच.** (क) माता-पिता यांना प्रिय हे विशेषण नाही. कारण लग्न झालेल्या मुलीवर आईबापांचे प्रेम असतेच. दक्षप्रजापतिसारखे बाप अपवादभूत होत. पण लग्न झालेल्या बहिणीवर बहिणींचे व भावांचे प्रेम असतेच असे नाही. बहिणी सुंदर व श्रीमंत वगैरे असतील व एखादी तशी नसेल तर ती त्यांना प्रिय वाटत नाही. तिचा अपमान, उपहास इतर सुस्थितीतील बहिणी करतात. लग्न झालेल्या बहिणींवर प्रेम करणारे भाऊ बहिणींपेक्षाही कमी. बहीण माहेरी आली म्हणजे केव्हा एकदा जाईल असे वयात आलेल्या व विवाहित भावांस वाटते. आई लेकीची भर करील की काय असे त्यांना वाटू लागते. माता, पिता, स्वसा (बहीण) व भाऊ हा क्रम उतरत्या प्रेमाच्या दृष्टीने यथार्थ आहे.

**चौ. २ -** (१) या चौपाईत सासरची नाती व संबंध सुचविले. गुरु = (गुरुजन, इतर वडील माणसे) = वडील जावा, नणंदा, दीर वगैरे. **सहकारी =**

सेवक, दास दासी. येथील क्रम सहवास व संगतीच्या दृष्टीने आहे. **प्रिय शब्द कोठेच वापरला नाही.** या युक्तीने सुचविले की मंडळी परघरच्या, परगोत्रांतल्या, मुलीवर, वधूवर बहुधा माहेरच्या माणसांसारखे प्रेम करीत नाहीत. कौसल्या, सुमित्रा, दशरथांसारखे अपवाद असतातच. **(क) सुत सुंदर सुशील सुखकारी -** पुत्राचा उल्लेख सासुसासरा वगैरेंच्या नंतर करण्याचे कारण हेच की सासरी गेल्याबरोबर काही पुत्र होत नाही. काही काळाने होतो किंवा होतही नाही. प्रथम सहवास व सुखदुःखप्राप्ती सासू, सासरा व वडील माणसे यांच्याकडूनच होते. **ल.ठे.** - पुत्राविषयी मातेची अपेक्षा काय असते व क्रम कसा असतो हे 'सुत सुंदर सुशील सुखकारी' यांत क्रमाने दाखविले आहे. प्रथम वाटते की पहिला सुत-मुलगा व्हावा नंतर वाटते की तो सुंदर असावा. पाच वर्षांचा होईपर्यंत सुशील-दुःशील हे कळणे कठीण असते. त्या काळात सौंदर्यच विशेष सुखदायक व प्रलोभनीय असते. नंतर १५ वर्षांचा होईपर्यंत मुलाच्या शीलाच्या योगानेच सुख-दुःख होते. १६ व्या वर्षापासून सौंदर्य व सुशील हीच सुखदायक होतील असे नाही. आईला सुख देणारा, तिची सेवा करणारा, तिच्या मनाप्रमाणे वागून आज्ञेचे पालन करणारा व तिच्यावर प्रेम करणारा पुत्रच १६ वर्षापासून सुखकर्ता वाटतो. १६ व्या वर्षानंतर मातेवरील प्रेम टिकतेच असे नाही.

**चौ. ३-४ - (१) पति बिना स्नेह नि नाते तापद...** सार हे आहे की 'भानु कमल कुल पोषणकर्ता । होइ जलाविण त्या संहर्ता' तसेच जोपर्यंत पति समीप असतो, विद्यमान असतो तोपर्यंतच सर्व नातेवाईक कदाचित सुख देतात; पण पतिविहीन स्त्रीला तेच नातेवाईक बहुधा दुःखदायक होतात. माताजी आपल्याबरोबर येत नाहीत व भीषण वियोगदुःख सहन करण्यास तयार झाल्या आहेत याचे तरी दुसरे कारण काय आहे? इयत्ता = मर्यादा, सीमा. 'सहज सुहृद गुरु...' (दो. ६३) चे खंडन या चौपायांत आहे. **(क)** शरीरादि राज्यसुखापर्यंतची सर्व सुखसाधने पतिविहीन स्त्रीला शोकाची सीमाच होय. पण ही गोष्ट आज किती स्त्रियांच्या बाबतीत खरी ठरते? पतिनिष्ठ, पतिप्रेमी स्त्रियांच्या बाबतीतच क्वचित अनुभवास येते ! हा कालप्रभाव आहे.

*हिं. । भोग रोगसम भूषन भारू । जम जातना सरिस संसारू ॥५॥*
*। प्रान नाथ ! तुम्ह बिनु जग माहीं । मो कहुँ सुखद कतहुँ कछु नाहीं ॥६॥*
*। जिय बिनु देह नदी बिनु बारी । तैसिअ नाथ पुरुष बिनु नारी ॥७॥*
*। नाथ सकल सुख साथ तुम्हारें । सरद बिमल बिधु बदन निहारें ॥८॥*
*म. । भोग रोगसम भूषण भार हि । यम यातना सदृश संसार हि ॥५॥*
*। प्राणनाथ ! अपणांविण जगतीं । कोणि सुखद काहीं मज नसती ॥६॥*
*। देह जिवाविण जलविण सरिता । नाथ ! तशिच पुरुषाविण वनिता ॥७॥*
*। प्रभु ! सुख सकल तुम्हांसह असतां । शरद विमल विधु-वदन निरखतां ॥८॥*

**अर्थ :** (पतिविहीन सतीला) विषयभोग रोगांसारखे व अलंकारादिक भाररूप वाटतात. सर्व संसार म्हणजे यमयातना वाटतात. (देह यातनादेह वाटतो)॥५॥ प्राणनाथ ! तुमच्या शिवाय मला (तरी) सर्व जगात कोणी व काहीसुद्धा सुखदायक नाही.॥६॥ जिवावाचून देह व पाण्यावाचून जशी नदी तशीच नाथ ! पुरुषावाचून (पतिविहीन) स्त्री (वनिता) होय.॥७॥ (उलट) प्रभो ! (नाथ) आपले शरच्चंद्रासारखे निर्मल मुख निरखीत असता, आपल्या संगतीत मला सर्व प्रकारचे सुख मिळेल व मिळते.॥८॥.

**टीका. चौ. ५ -** (१) तन, धन, धाम आणि नृपसत्ता यांचा उल्लेख मागील चौपाईत केला व ही सर्व शोकसीमा आहेत असे सांगितले. त्याचाच विस्तार या चौपाईत आहे. धन, धाम, धरणी, राज्य व सत्ता ही सर्व विषयभोगांची साधने आहेत.

धनादिकानेच अलंकारवस्त्रे इत्यादी मिळतात. या साधनांनी विषयभोग भोगावयाचे असतात. शरीररूपी घरात, भोगणारा असतो जीव; पण हे शरीर भोगायतन न राहता रोगायतन बनते-वाटते. अलंकार भूषणादि शरीराला भारासारखी ओझ्यासारखी वाटतात. किंबहुना मढ्याला केलेला शृंगारच वाटतो. देह मनुष्यदेह न वाटता यमयातना भोगण्यासाठी यमराजाने दिलेला यातनादेह वाटतो व सर्व संसार यमलोकासारखा व नर्कासारखा घोर, दुःखद, असह्य दाहकारक वाटतो.

**चौ. ६ - (१) प्राणनाथ -** दो. ६४ 'प्राणनाथ' शब्द व टीका पहावी. आतापर्यंत सर्वसाधारण पतिव्रता स्त्रियांविषयी सांगितले. येथे म्हणते की इतर कोणाशी मला

काय कर्तव्य आहे? मला तरी आपल्याशिवाय कसल्याही प्रकारचे सुख कोणीही किंवा काहीही देऊ शकणार नाहीत. याचे कारण पुढील चौपाईत सांगते.

**चौ. ७ -(१) देह जिवाविण** - जीव नसलेला मनुष्यदेह म्हणजे प्रेत, मढे, शवच. ते जेथे असेल ते स्थान अपवित्र, तो देह अति अपवित्र; त्या देहाला पाहिल्याने किळस वाटते. पतिविहीन स्त्री अपवित्र, अपूज्य, तिरस्कृत, किळसवाणी, शवासारखी वाटते. जीव नसलेला देह पुन्हा सजीव होऊ शकत नाही. म्हणून **हा दृष्टान्त विधवा स्त्रियांविषयी आहे.** (क) ज्यांना काही काळ पतिविहीन रहावे लागते **त्यांच्याविषयी दुसरा दृष्टान्त आहे.** उन्हाळ्यात पाणी नाहीसे झाले तरी तिला म्हणणार नदीच व पावसाळा सुरू झाला किंवा उन्हाळ्यातच चांगला पाऊस पडला तर नदीला पुन्हा पाणी येते. येथे १४ वर्षेच पतिविहीन राहण्याचा प्रश्न आहे. पुन्हा रामरूपी जल अयोध्येत येणारच. पण तोपर्यंत तरी आदर, मान, सुख इ. दूरच राहिली. पण रूपबिंदुजल न मिळाल्यामुळे १४ वर्षे जगणे तरी कसे शक्य आहे? पाणी नसलेल्या नदीत वाटेल ती घाण केली जाते. तिचा पवित्र, धार्मिक, पारमार्थिक कार्यासाठी उपयोग होत नाही. कोल्हा-कुत्र्यांनीसुद्धा खुशाल पायाखाली तुडवावी व माणसांनी जोड्यांच्या लाथा माराव्या अशी त्या शुष्क नदीची दुर्दशा होते. महानदी असून शुष्क पडेल तर तिचीही हीच दुर्दशा व्हायची. अशीच प्रोषितभर्तुकेची ही दुर्दशा मरणापेक्षाही असह्य आहे.

**चौ. ८** - (१) महानदी जलाने तुडुंब भरलेली असली तर तिच्या अस्तित्वाची शोभा असते. तसेच पतीच्या सहवासात सर्व प्रकारचे सुख मिळेल व दुःख तोंड काळे करील असे सीता सांगत आहे. 'वन दुःख पसारा' या मुद्याचे खंडन येथे केले गेले. वा.रा. १/२ श्लोक चांगले आहेत. त्यात कर्मविपाक सिद्धान्ताचे रहस्य सीतेने प्रगट केले आहे. '**आर्यपुत्र ! पिता माता भ्रात पुत्रस्तथा स्नुषा ॥ स्वानि पुण्यानि भुञ्जाना स्वं स्वं भाग्यमुपासते ॥ भर्तु र्भाग्यं तु नार्येका प्राप्नोति पुरुषर्षभ ॥ इह प्रेत्य च नारीणां पतिरेको गतिः सदा ॥** (२।२७।४-६) **सार हे की एकटी पत्नी मात्र पतीच्या कर्मफल भोगांची भागीदारीण आहे.** स्त्रीला इतर कोणीही गति नसून एक पतीच तेवढा या लोकी व मेल्यावरसुद्धा गति आहे. (वा.रा.) पतिपत्नी संबंध एकाच जन्माने संपणारा नसून अनेक जन्मान्तरीसुद्धा टिकतो. पुत्र, कन्या,

घरदार, कीर्ति, अकीर्ति, मानसन्मान, अधिकार, सत्ता इत्यादी सर्व गोष्टींत तिचे प्रारब्ध दूध व पाणी यांच्या स्तराने पतीशी निगडीत असते की नाही याचा विचार करावा. पतिविरहीत जीवन म्हणजे ग्रीष्मातील प्रचंड चंडकर-किरणांत चकोरीने सुखाकांक्षा करण्यासारखे आहे व पतिसमीप वाटेल त्या दुःस्थितीत असली तरी शारदी पौर्णिमेच्या चांदण्यांत चकोरीप्रमाणे निदान सीता तरी सर्व सुखसंपन्न होईल असे सांगितले. सप्तविध, सुख कसे मिळेल हे आता स्पष्ट सांगते. त्यांतील राममुखचंद्रांतील रूपसुधापान या आठव्या चौपाईत सांगितले आहे.

*हिं.दो. । खग मृग परिजन नगरु बनु बलकल बिमल दुकूल ॥*
*॥ नाथ साथ सुरसदन सम परन साल सुखमूल ॥६५॥*

*म.दो. । खगमृग परिजन, नगर वन, वल्कल विमल दुकूल ॥*
*। नाथ साथ सुरसदन-सम पर्णकुटी सुखमूल ॥६५॥*

**अर्थ :** नाथ ! आपण बरोबर असल्यावर (साथ-संगत) पशुपक्षीच कुटुंबातील व्यक्ति; वनच नगर; वल्कलेच मूल्यवान निर्मल रेशमी वस्त्रे (दुकूल) होत व पर्णकुटीच देवांच्या प्रासादाप्रमाणे सर्व सुखाचे मूल होय.॥दो.६५॥

**टीका.** (१) मागील चौपाईत सुखाचे मुख्य उगमस्थान सांगितले. येथे नगर, घर व वस्त्रे ही तीन सांगून चौथ्यांतील फक्त परिजन सांगितले. त्यांतील शेष सासुसासरा पुढील चौपाईत सांगतील. **(क) नगर** वन व **सुरसदन पर्णकुटी** असा उल्लेख केला. सुरसदने पृथ्वीवर नसतात. देवलोकांत असतात. म्हणून नगरचा अर्थ सुरनगर, देवनगर, सुरपुरी, सुरपुर, जे पतीशिवाय नर्कासारखे आहे असे पूर्वी (६४) सांगितले ते. इन्द्राच्या नगरीस अमरावती म्हणतात व त्याच्या सदनाला वैजयन्त प्रासाद म्हणतात व हाच अर्थ येथे घेणे जरूर आहे. हाच अर्थ प्रत्यक्ष पुराव्याने सिद्ध आहे. **राम अनुज सीतेसहित शोभति पर्णकुटींत ॥ शची जयन्ता सह जसे वासव अमरपुरींत'** (१४१।). चित्रकूट वनातील पर्णकुटीत राम असे शोभत होते. म्हणजेच दो. ६५ व १४१ ही जोड कमळे आहेत. एकांतील अर्थाची शोभा दुसऱ्याने पूर्ण होते व दुसऱ्यातील पहिल्याने पूर्ण होते. ६५ व्यांत (येथे) नगर. नगरी कोणती हे स्पष्ट नव्हते ते १४१ मधील 'अमरपुरीत' शब्दाने स्पष्ट केले व १४१ व्यांत वासवाचे अमरापुरीतील निवासस्थान कोणते

ते 'पर्णकुटी = सुरसदन' याने स्पष्ट केले. चित्रकूटला-अमरपुरी कोणती ते ६५ व्या वन शब्दाने स्पष्ट केले आहेच. (ख) दो. १३३ सुद्धा तुलनेस घ्यावा म्हणजे ब्रह्मलोक = ब्रह्मपुरी = चित्रकूट वन असा अर्थ निघेल. कारण की कामदेव ब्रह्मलोकांत निवास करणारा आहे. म्हणजे ६४ मधील सुरपुर = ब्रह्मलोक = ब्रह्मपुरी पासून इंद्रलोक = अमरावतीपर्यंतच्या सप्तस्वर्गाचा बोध केला जातो. निश्चितार्थासाठी मानसांतीलच धागेदोरे कसे विणले गेले आहेत याचे हे एक सुंदर उदाहरण आहे. (ख) साथ = संगत (म. हिंदी कोष वैशंपायन) साथ मराठीतील शब्द आहे. दुकूल = मूल्यवान रेशमीवस्त्र. 'पत्रार्ण' धौतकौशेयं बहुमूल्यं महाधनं । क्षौमं दुकूलम् (अमरे)

*हिं.* *। बनदेवीं बनदेव उदारा । करिहहिं सासु ससुर सम सारा ॥१॥*
*। कुस किसलय साथरी सुहाई । प्रभु सँग मंजु मनोज तुराई ॥२॥*
*। कंद मूल फल अमिय अहारू । अवध सौध सत सरिस पहारु ॥३॥*
*। छिनु छिनु प्रभु पद कमल बिलोकी । रहिहउँ मुदित दिवस जिमि कोकी ॥४॥*

*म.* *। वन-सुर देवि उदार सदा अति । सासु - सासऱ्यांसम सांभाळति ॥१॥*
*। कुश किसलय मय शय्या सुंदर । प्रभुसह मदन शयन सम सुखकर ॥२॥*
*। कंदमूल फल अमृत सुभोजन । अवध-सौध शत सम पर्वतगण ॥३॥*
*। प्रभुपदपद्मां पळ पळ पाहिन । जशि कोकी प्रमुदित दिनिं राहिन ॥४॥*

**अर्थ :** सदा अति उदार असणारे वनदेव आणि वनदेवी, सासरा व सासूप्रमाणे माझा सांभाळ करतील.॥१॥ कुश व कोवळी पाने यांनी तयार केलेली सुंदर शय्या प्रभूच्या संगतीत मला मदनाच्या गाद्यांसारखी सुखकर होईल.॥२॥ कंदमूळ फळे म्हणजे अमृताचे उत्तम भोजन व पर्वतांचा समूह म्हणजेच अयोध्येतील उंच उंच शत सौध (राजमहाल) होत.॥३॥ क्षणोक्षणी (पळपळ) प्रभुपद कमलांकडे पहात जाईन व कोकी जशी दिवसा अति आनंदित राहते तशी अगदी प्रसन्न राहीन.॥४॥

**टीका.** **चौ.** १ - (१) पूर्वी सातपैकी चार सुखांचा पूर्ण उलगडा केला व पाचव्यांतील परिजन म्हणजे खगमृग हे सांगितले. अगदी निकटच्या पालनपोषण करणारात सासूसासरा मुख्य. वनसुर = वनदेव = सासरा व वनदेवी सासू. (क) सासूसासरा पुत्र-पुत्रवधूंचे प्रतिपालन करतात; पण रात्री निद्रा, दुपारी विश्रांति

घेतातच; पण वनदेवी व वनदेव सदासर्वदा रात्रंदिवस सांभाळ करतील. सासूसासऱ्यांची सेवा देहाने जास्त व मनवाणीने थोडी करावी लागते. पण वनदेवी, वनदेवांची सेवा-पूजा नुसती मनाने केली तरी सदा प्रसन्न राहतील. सासुसासऱ्यांची सेवा जशी त्यांच्याच संपत्तीने करावयाची असते तशीच वनदेवी, वनदेवांची सेवा त्यांनी औदार्याने उत्पन्न केलेल्या 'पत्रं पुष्पं फलं तोयं' ने करावयाची. त्यात शरीरकष्ट फारच थोडे. **(ख) अवधसौध शत - पर्वतगण** - नगरांत संचार करणाऱ्या परिजनांना व नगराला उंच राजमहाल पाहून जसे सुख होते तसेच पर्वतावर चढून पाहिले की वनात संचार विहार करणारे पशुपक्षी व वन यांचे विविध मनोहर ईशनिर्मित सहज सौंदर्य पाहून सुख होईल. यात विविधता, विशालता व सहज मनोहरता असल्याने **हे सुख अयोध्येतील सौधांच्या शतपट होईल,** होते हे अनुभूत त्रिसत्य आहे. सासूसासऱ्यांची सेवा जशी घरातच करावयाची तशी वनदेवी-वनदेवांची पर्णकुटीतच करावयाची. खगमृगांशी प्रेमाने वागले म्हणजे तेसुद्धा परिजनांप्रमाणे प्रेम करू लागतात. जवळ येऊन सुख देतात. 'मुनिजन निकट विहगमृग जाती'. परिजन आपल्या नेत्रांनी जशा आपल्या भावना व्यक्त करतात तसे पशुपक्षीही करतात. त्यांस आपले बोलणे समजते, हे स्वानुभव सिद्ध आहे.

**चौ. २ - (१) साथरी = गवताचे** वगैरे केलेले **आंथरूण** = तृणादिनिर्मित शय्या. मन प्रसन्न व शरीर निरोगी असेल तर गवत, पाला इत्यादींच्या आंथरूणावर सुखाची झोप सहज येते व मन शोक-चिंता-रोगादिकांनी ग्रस्त असल्यास परांच्या गाद्यांवरसुद्धा झोप येत नाही. तृण शय्येवर सीता व राम यांस चटकन गाढ झोप लागली आहे. दो. ८९ व ९१।३ पहा. 'भूमिशयन' दुःखाचे निरसन केले. (क) मदन शयन = मदन झोपतो तो पलंग गादी वगैरे. मदन फार सुंदर व कोमल; म्हणून त्याची शय्या फार सुंदर व सुकुमार असणार. तशीच कुशपर्णशय्या मला सुखद वाटेल. पण प्रभु जवळ असले तरच. भाताचा पेंढा व गवत यांवर उघड्यावर थंडीतसुद्धा झोपल्याने खरोखर जी ऊब येते ती परांच्या गाद्यांवर राजमहालातसुद्धा येणार नाही. खऱ्या तृणपर्णकुटीत उन्हाळ्यात गारवा व थंडीत ऊब असते. अशी पर्णकुटी विशाल वडाच्या झाडाखाली असेल तर मग विशेषच सुखदायक ! चित्रकूटास रामपर्णकुटी विशाल वटवृक्षाच्या दाट छायेखालीच होती.

**चौ. ३** - (१) स्वर्गात - अमरावतीत अमृताचे भोजन असते असे म्हणतात. पण पृथ्वीतलावर कितीतरी प्रकारचे अमृत प्रत्यक्ष आहे व मिळू शकते. **'अमृतं यज्ञशेषे स्यात् पीयूषे सलिले घृते । अयाचिते च मोक्षेच ना धन्वंतरि देवयोः'** (अमरे). यांतील एक पीयूष तेवढे पृथ्वीवर नाही. बाकी सर्व आहेत. पण स्वर्गात नाहीत. अमृतासारखी स्वादिष्ट, मधुर, आरोग्यवर्धक अयाचित (अमृत) फळे व कंदमूळादिक यज्ञशेष भक्षण केल्यावर व रामसमीप राहिल्यावर मोक्षरूपी अमृत पायाशी वहात येईल. 'अशन कंद फलमूल' या आक्षेपाचे निराकारण केले. हे सहावे सुखसाधन सांगितले. (क) **अवध सौधशतसम पर्वतगण - अवध** = अयोध्या. अयोध्येतील राजवाड्यांवर उंच चढून पाहिले म्हणजे कृत्रिम सौंदर्य व अनेक उंच उंच सौध सभोवती दिसतात. शरयू व इतर नद्या नागमोडी वळणे घेत जाताना दिसतात. त्याहूनही रम्य असे अनेक पर्वत एका पर्वत शिखरावर उभे राहिल्याने सभोवती दिसतात व ते अयोध्येतील सौधांपेक्षा जास्त सुंदर, चित्र-विचित्र -मृग भृंगांनी भरलेले, पाने, फुले, फळे यांनी नटलेले दिसतील. त्यांमधून अनेक वन निर्झर व वननद्या रम्य, कर्णमनोहर संगीत म्हणून नागमोडी वळणे घेत, उड्या मारीत जाताना दूरवर दिसतील.

या प्रमाणे सुखाची मुख्य सात साधने वनात अयोध्येपेक्षा श्रेष्ठ, सहज, सुखदायक व रमणीय आहेत. **वि.ल.ठे.** - हे काननसौख्याचे वर्णन तु.दासांचा स्वतःचा अनुभव आहे असे ज्या कोणी पर्वतशिखरावर काही काळ निवास केला असेल ते खात्रीपूर्वक सांगतील. इतरांस हे खरे वाटेल न वाटेल. ॥ अनुभवियाच्या खुणा अनुभवी जाणती ॥

**चौ. ४** - (१) **प्रमुदित रहिन दिनिं जशि कोकी** - सीता चकोरी आहे व चक्रवाकी पण आहे. राममुखचंद्रास पाहण्यात ती चकोरी आहे व रामपदपद्मांकडे पाहण्यात ती चक्रवाकी आहे. चक्रवाकीला दिवसा सुख असते तसे रामचंद्रांच्या बालमार्तंडासारख्या लाल लाल चरणांना (पायाचे तळवे) व लाल लाल प्रकाशमय चरणनखांना पाहण्याने तेच पाय व तोच वर्ण सर्वत्र भरलेला दिसेल. (क) प्रपंच-संसार-रूपी दिवसांत ज्ञानरूपी प्रकाश पाहिजे असेल तर प्रभुपद्मांकडे सारखे पहात राहिले पाहिजे. 'श्रीगुरुपदनख मणिगण जोती' आहेत व राम

'जगद्‌गुरुंच शाश्वतम्' (अत्रिस्तुति) आहेत. सूर्याला दिनमणि वासरमणि म्हणतातच. तसे एक नव्हे दहा मणि, मणिगण, भगवंताच्या पायांच्या बोटांवर विराजतात. चक्रवाकी सूर्योदयाच्या वेळी विशेष प्रमुदित होते. 'सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा । उडि घालितो संकटीं स्वामि तैसा ।। (समर्थ.) उडी घालणे म्हणजे त्वरेने धावत येणे, हे काम पायांचेच आहे. ध्वनित केले की जे कोणी चक्रवाक - चक्रवाकी प्रमाणे भगवंताच्या भेटीसाठी, साह्यासाठी तळमळतील त्यांना प्रभु साह्य केल्याशिवाय राहणार नाहीत. चक्रवाकीच्या सर्वसुखाचा आधार जसा सूर्य तसा सीतेच्या सर्व सुखाचा आधार प्रभूचे चरण होत. प्रभु शब्दाने सुचविले की सर्व प्रकारचे सुख देण्यास हे चरणच समर्थ आहेत. **सीतेने येथे आपली दास्य भावना ध्वनित केली आहे**. ती पुढील दोह्याच्या २-५ या चौपायांत स्पष्ट केली आहे. सप्तविध स्वर्गीय सुख प्रभुबरोबर वनात गेल्यानेच मिळणार आहे हे या प्रमाणे दाखविले. पुढील चौपायांत प्रभुवियोग दुःखाची भीषणता व असह्यता सांगून वियोगाचा परिणाम दोह्यांत सांगतील.

***हिं.*** ***। बन दुख नाथ कहे बहुतेरे । भय बिषाद परिताप घनेरे ।।५।।***
***। प्रभु बियोग लवलेस समाना । सब मिलि होहिं न कृपानिधाना ।।६।।***
***। अस जियँ जानि सुजान सिरोमनि । लेइअ संग मोहि छाडिअ जनि ।।७।।***
***। बिनती बहुत करौं का स्वामी । करुनामय उर अंतरजामी ।।८।।***

***म.*** ***। नाथ ! कथित बहु वनदुःखानां । -बहु भय विषाद परितापानां ।।५।।***
***। तीं प्रभु - वियोग - लेशासम नहि । - होति कृपानिधि सर्व मिळूनही ।।***
***। हें जाणुनी सुजाण - शिरोमणि । टाकुं नका मजला न्या हो ! वनिं ।।७।।***
***। काय करूं बहु विनती स्वामी । करुणामय हृदयान्तर्यामी ।।८।।***

**अर्थ :** नाथ ! आपण पुष्कळ वनदुःखांचे व पुष्कळ भय विषाद परिमाणांचे वर्णन केलेत (खरे) ।।५।। (पण) कृपानिधि ! ती सर्व एकत्र झाली केली गेली - तरीसुद्धा प्रभुवियोग - दुःखाच्या लेशासारखी होऊ शकणार नाहीत.।।६।। सुजाणशिरोमणि ! हे जाणून - ध्यानी घेऊन, माझा त्याग नका हो करू ! मला न्या हो वनात ! ।।७।। स्वामी आपण करुणामय असून, हृदयांतील जाणणारे आहात, तेव्हा मी फार काय विनंती करू?।।८।।

**टीका. चौ. ५ - (१) विषाद** = खेद, **परिताप** = चिंता, शोक, पश्चात्ताप. सात प्रकारच्या वनदुःखांचे वर्गीकरण येथे तीन प्रकारांत केले. (**क**) सिंहव्याघ्रादि पशु, पक्षी, सर्पादि व निशाचर यांपासून **भय**. (**ख**) खाणे, पिणे, वस्त्रे, झोप, चालणे, हिंडणे इत्यादींचे क्लेश, रोग, **खेद**. (**ग**) राक्षसांनी चोरून नेली, वल्कले मुनिपात्रे चोरीस गेली. चालण्याने पाय सुजले. काटे मोडले पायांत व अति असह्य दुःख झाले की **पश्चात्ताप व शोक** आणि विपत्तींची चिंता ही मुख्य दुःखे आहेत. भाव हा आहे की वन आपल्या संगतीत परमसुखमय असून आपण ते दुःखमय असल्याचे पुष्कळ सांगितलेत व ते इतर नारींच्या दृष्टीने खरेही असेल. परंतु :

**चौ. ६** - (१) मी पुष्कळ विचार करून पाहिला आणि मला नक्की वाटते की ती **प्रभुवियोगलेशासम नहि** - वियोग दुःखाचा एक लेशमात्र एका पारड्यांत घातला व आपण वर्णिलेली सर्व दुःखे गोळा करून दुसऱ्या पारड्यांत घातली तरी ते प्रभुवियोग दुःखलेशाचे पारडे खालीच राहील. आपल्याला जे वाटते ते आपण कृपानिधि आहात त्यामुळे आपणास तसे वाटणे अगदी स्वाभाविक आहे. पण मला मात्र अगदी उलट वाटते.

**चौ. ७-८** (१) **सुजाण शिरोमणि** - आपण सुजाण लोकांचे शिरोमणि आहात. 'ज्ञानी-मुकुटमणी कोसलपति' (१।२८।१०) मी म्हणते ते खरे की खोटे हे आपण सहज जाणता. म्हणून मी आपल्याला पदर पसरून प्रार्थना करते की मला बरोबर न्यावी. नका हो करू त्याग ! (**क**) **हृदयान्तर्यामी** - हृदयांतील गुप्त रहस्येसुद्धा जाणणारांना जास्त सांगण्याची आवश्यकता नाही. फार विनविणेसुद्धा बरे नाही. न नेल्याने परिणाम काय होईल हे माझ्या हृदयदशेवरून आपण जाणू शकता. तथापि सांगितल्याशिवाय राहवत नाही.

*हिं.दो.* *। राखिअ अवध जो अवधि लगि रहत जानिअहिं प्रान ॥*
*॥ दीनबंधु सुंदर सुखद सील सनेह निधान ॥६६॥*

*म.दो.* *। ठेवा पुरिं जर अवधिवरि राहति वाटे प्राण ॥*
*॥ दीनबंधु सुंदर सुखद शील स्नेहनिधान ॥६६॥*

**अन्वय** - (१) अवधिवरि प्राण राहति (असे) जर वाटे (तर) पुरि ठेवा.

(२) जर अवधिवरि पुरी ठेवा (तर) प्राण राहति (असे) वाटे? याप्रमाणे दोन अर्थ आहेत.

**अर्थ** - १४ वर्षांच्या अवधीपर्यंत (माझे) प्राण राहतील असे (आपणास) जर वाटत असेल तर ठेवा अयोध्येत (पुरि). (जर ठेवलीत तर माझे प्राण राहतील असे आपणास वाटते का? हा दुसरा अर्थ आहे.) आपण दीनबंधु, सुंदर, सुखदायक आणि शील व स्नेह यांचे निधान आहात (हे मात्र विसरू नये.) ।।दो.६६।।.

**टीका. (१) पाठभेद :** रहत जानिअहिं, रहत न जनिअहिं, रहत न जानिअहिं, रहतन जानिअ असे पाठभेद आहेत. **रहत जानिअहि** = राहति जाणां = **राहति वाटे** या पाठात पूर्वापार संदर्भानुसार सुसंगत अशी भावाची परम शुद्धता व प्रेमाची हाक अगदी निर्मल आहे. 'प्राण राहणार नाहीत' (रहत न जनिअहिं इ.). या भाषेत हट्टाचा थोडासा अंश आहेच. हृदयांतर्यामी आहात व सर्व जाणताच असे (मागील चौपाईत) म्हटल्यावर प्राण राहतील असे वाटत असल्यास ठेवा हे म्हणणे अगदी सरळ ओघाने प्राप्त होणारे व श्रोत्यांच्या हृदयाला हालवून सोडणारे आहे. यांत हट्टाचा लेश नाही. 'प्रेमें हट्ट करिशि जर वामे । दुःख पावशिल तर परिणामें' (६२।३) असे स्नेही प्राणनाथांनी बजावले होते. त्याला अनुसरूनच हे सीतेचे वचन मानसांतील परमोच्च, निर्दोष आदर्श सीतेला शोभण्यासारखेच आहे. (दुसरा अर्थ वर दिला आहे. विशेष फरक नाही.)

**(२) सुंदर सुखद सुजाण** (दो. ६४) 'स्वामी शुचि तजुं बघती **स्नेही**' (६४।३) ही विशेषणे सीतेनेच पूर्वी वापरली आहेत. करुणामय, करुणानिधी, कृपानिधि ही सुद्धा वापरली आहेत. येथे दीनबंधु व शीलनिधान ही दोनच जास्त आहेत. **(क) दीनबंधु** - हे विशेषण मागल्या चौ. ७-८ मधील दीन, अनाथ, भावनेला धरूनच आहे. **'त्यजता? इलाज काय'** (७१) या लक्ष्मणाच्या म्हणण्यासारखे सीतेचे म्हणणे आहे. भाव हा की अशा दीन, अनाथ, अनन्य शरणागताचा त्याग करणे आपणास शोभत असेल तर करावा व ज्या हेतूने (मातेला सुख देण्याच्या) आपण मला घरी ठेवता तो हेतु साधेल की नाही याचा विचार आपण केलाच असेल. **(ख)** शीलनिधान म्हणण्यात भाव हा आहे की अनन्यगतिक

शरणागताचा त्याग करण्याने आपल्या शीलाला कमीपणा नाही का येणार? व 'नेत नाही' असे सांगितल्यावर जर हे प्राण आपोआप निघून गेले तरी शीलाला कलंक लागेल की नाही याचाही आपण पूर्ण विचार केला असेलच. ल.ठे. येथे सीतेनेसुद्धा स्नेहाच्या आधी शीलाचा उल्लेख करून शीलाला स्नेहापेक्षा अधिक महत्त्व रघुवीराप्रमाणेच दिले आहे. (ग) मी आल्याने आपणास अडचण, संकट नाहीच पडणार पण सेवाही करीन हे आता सांगतात -

*हिं.* *। मोहि मग चलत न होइहि हारी । छिनु छिनु चरन सरोज निहारी ॥१॥*
*। सबहि भाँति पिय सेवा करिहौं । मारग जनित सकल श्रम हरिहौं ॥२॥*
*। पाय पखारि बैठि तरु छाहीं । करिहउँ बाउ मुदित मन माहीं ॥३॥*
*। श्रम कन सहित स्याम तनु देखें । कहँ दुख समउ प्रानपति पेखें ॥४॥*
*। सम महि तृन तरु-पल्लव डासी । पाय पलोटिहि सब निसि दासी ॥५॥*

*म.* *। हार न खाइन मार्गी चालत । घडि घडि चरणसरोजां पाहत ॥१॥*
*। सर्वपरीं प्रियदास्य करीन हि । सगळे श्रम पथजनित हरीनहि ॥२॥*
*। प्रक्षालिन पद तरुतळि बसुनी । घालिन वारा मुदित होउनी ॥३॥*
*। श्यामल देहीं श्रमकण दिसतां । क्लेश कुठें प्रिय पतिस निरखतां ॥४॥*
*। सम महिवरि तृण पल्लव घालिल । पाय रात्रभर दासी दाबिल ॥५॥*

**अर्थ :** मार्गाने चालताना मी क्षणोक्षणीं (आपल्या) चरणकमलांकडे बघत गेले की मी हार खाणार नाही.॥१॥ मला सर्व प्रकारे प्रिय असलेले प्रिय पतीचे दास्य (सेवा) मी करीन व मार्गाने चालल्यामुळे (आपणांस व मला) झालेले सर्व श्रम हरण करीन.॥२॥ झाडाच्या छायेत बसून आपले पाय मी धुईन आणि मुदित होऊन वारा घालीन.॥३॥ श्यामल देहांवर श्रमांमुळे आलेले घामाचे (श्वेत) बिंदु दिसले की प्रिय पतीला निरखून बघत राहिले म्हणजे क्लेश कुठे राहतील शिल्लक ! ॥४॥ सपाट जमिनीवर गवत व झाडांची पाने ही दासी पसरील (घालील) व रात्रभर आपले पाय चेपीत बसेल.॥५॥

**टीका. चौ. १ - (१) 'कुश कंटक कंकर पथिं नाना । चालणें हि अनवाणी जाणां ॥** इ. (६२।५-६) यांतील आक्षेपांचे निरसन येथे करीत आहोत. **हार न खाइन** - प्रभुचरणकमल आल्हाद व स्फूर्ति देऊन प्रेमामृतमकरंद पाजणारे आहेत.

जी गोष्ट मनाला फार प्रिय वाटते ती करण्यास मन, बुद्धी कंटाळत नाहीत. कचरत नाहीत = हार खात नाहीत. जोपर्यंत मन कचरत नाही तोपर्यंत शरीरास होणारे श्रम सुखकर वाटतात. (क) शरीराला थकवा येणार नाही असा सीतेच्या म्हणण्यातील भाव नाही. मी तुमच्या बरोबरीने चालेन, मुळीच दमणार नाही, असे ती म्हणत नाही. असा अर्थ घेतल्यास सीता असत्य बोलली असे ठरेल. 'जाणुनि मनीं श्रमित सीतेसी । घडिभर थांबति वटछायेसी' (११५।२-३) या प्रमाणे सीता थकली, श्रमली असली तरी तिने नाही सांगितले की 'आता जरा थांबावे, मला चालवत नाही, मी दमले इ.' म्हणजे हार खाल्ली नाहीच. सीता दमलेली प्रभूंना दिसली. मानसातील सीतेने केव्हाही आपण दमल्याचे नुसते ध्वनितसुद्धा केलेले नाही. वर अवतरणातील दमल्याचा उल्लेख ज्या वेळी व ज्या ठिकाणी केला आहे ते स्थान ४० मैल चालल्यानंतर जेथे थांबले, तो **'कुअँर दो' तलाव होय.** अयोध्याकाण्ड परिशिष्ट २(५) पहावे. ४० मैल चालल्यानंतरसुद्धा सीतेने हार खाल्ली नाहीच ! कवितावलीतील 'पुर तें निकसी रघुवीर वधू' हे पद मुद्दाम पाहण्यासारखे आहे. फार गोड व सीतेच्या सुकुमारपणाचे सजीव प्रेमरसादि चित्र त्यात आहे. पण तो पहिल्या दिवसाच्या प्रारंभीचा अनुभव आहे व कवितावलीतला आहे. तसा उल्लेख मानसांत नाही. (ख) **हारि** (हार) मानना = हार खाणे हे शब्द मानसांत मनात कचरणे, पराजित होणे, या अर्थाने वापरले आहेत. उदा. 'श्रीहत राजे हृदयीं हरले' (१।२५१।५) 'हियँ हारा भय मानि' = कचला मनीं भिऊन' (४।८) पहा १।१२६; १।३३०।२-३; ३।२५ क; १।२९२।७; ७।११०।५; ६।८५ छंद २।३२०;८ इत्यादी. रामचंद्रांना मार्गाने चालण्याचे श्रम होतील व घाम येईल असे सीतेला वाटून तसे बोलून दाखवीत असता 'मी दमणार नाही' असे ती कसे म्हणेल? शरीराला श्रम झालेच तर त्यांचा परिहार कसा करणार हे आता सांगते.

**चौ. २ - (१) सगळे श्रम पथजनित हरीन हि** - हा चरण सीता व राम या दोघांकडे घेणे जरूर आहे. भाव हा आहे की चालताना मला श्रम झाले तरी मी विश्रांती घेत पडून वा बसून नाही राहणार. प्रसंगानुसार आपली नाना प्रकारे सेवा केल्याने माझ्या श्रमांचा परिहार सहज होईल. **(क) सर्वपरीं सेवा** - कंदमूळफलें

गोळा करून आणणे, पाणी, समिधा, दर्भ, फुले इत्यादी आणणे, फुलांचे हार करून आपल्या गळ्यात घालणे, आसन मांडणे इ. सेवेचे काही प्रकार पुढील चौपायांत दिले आहेत. आपण दमलांत व मीहि दमलेलीच असले तरी आपला श्रमपरिहार करण्यात मला जो आनंद होईल त्यानेच माझे श्रम नाहीसे होतील.

**शंका.** - सर्व प्रकारे दास्य-सेवा-करीन असे येथे म्हटले असता सीतेने सेवा केलेली मानसांत का दिसत नाही? नीट पाहिले तर दिसेल; डोळ्यांना पट्टी बांधल्यावर कसे दिसणार !

**ती पहा सीतेने केलेली सेवा** - 'तुलसी तरुवर विविध सुलक्षण । **सीता काही लावी लक्ष्मण'** (२१७।७) 'वटछाये वेदिका विरचिली । सुंदर सीतेने करकमली (२३७।८) वेदिका = ओटा. त्या ओट्यावर रामलक्ष्मण सीता व मुनींचा समुदाय बसत असे (दो. २३७) यावरून तो किती मोठा असेल व दगड, माती, खालच्या नदीचे पाणी, शेण इ. आणण्याचें किती कष्ट सीतेने केले असतील याचा विचार करावा. हे सीतेने केलेल्या लहान व मोठ्या सेवेचे नमुने मात्र आहेत.

**पुन्हा शंका** - चौपाईतील उल्लेख प्रवासातील सेवेचा आहे. प्रवासात सीतेने सेवा केल्याचा नुसता नमुनासुद्धा का नाही? **याचे उत्तर 'ज्ञाननयनि निरखत मानी मन'** असे आहे. वरील भाषण सीतेने केले त्या वेळी ही कल्पना तिला नव्हती की रामसेवामूर्ति लक्ष्मण बरोबर येणार आहेत. मार्गाने जाताना फक्त पाच मुक्काम झाले. पहिला तमसा तटिं मध्यरात्रीपर्यंतच. दुसरा शृंगवेरपुरास; तेथे सर्व सेवा निषाद राजाने केली व लक्ष्मणास सुद्धा सेवेचा विशेष लाभ मिळाला नाही. पुढे तीन मुक्कामांपैकी दोन मुक्कामांत गुहानेच सर्व सेवा केली आहे. तो बरोबर होता. त्यानंतर यमुनापार गेल्यावर 'कुअँर दो' तलावाच्या काठी एकच मुक्काम झाला आहे. **लक्ष्मण बरोबर असल्यावर सीतेला कोण सेवा करू देणार?** तिची इच्छा असूनही सेवा करता आली नाही. कवींनी नमुना कुठला दाखवावा?

**चौ. ३ (१) प्रक्षालिन पद तरुतळिं बसुनी इ.** - यांत सीता ध्वनित करते की चालण्याचे श्रम आपल्यालासुद्धा होणारच. माझे शरीर व पाय जितके कोमल आहेत निदान तितके तरी आपले आहेतच आहेत. आपण कोमल असून मनाने

कचरणार नाही तशीच आपल्या संगतीत मी नाही कचरणार. उन्हाळ्याने तप्त झालेल्या खरखरीत जमिनीवरून चालण्याने आपले पाय भाजतील, तेव्हा एखाद्या वडाच्या शीतल छायेत बसून आपण थोडी विश्रांती घेईपर्यंत मी कुठून तरी पाणी आणीन व आपले पाय धुवेन, म्हणजे जरा गार वाटेल. मग आपल्या शेजारी दासीप्रमाणे उभी राहून पदराने आपला घाम पुसून, पदराने नाही तर पळसाच्या पानांनी आपल्याला वारा घालीन. ही अल्पशी सेवा घडल्याने महद्भाग्य लाभले असे मला वाटेल. कवितावली पद १२ **'जलको गए लक्खनु हे लरिका'** हे फार फार मधुर भावपूर्ण पद पहावे. त्याच्या आधारे वर विस्तार केला आहे. लक्ष्मण बरोबर असल्याने पाणी आणण्यास सीतेला जावे लागले नाही. श्री रघुवीराने आपल्या हातांनी जानकीच्या पायांत मोडलेले काटे काढले आहेत !

**चौ. ४ - (१) श्यामल देहीं श्रमकण दिसतां - श्रमकण =** श्रमाने आलेले घामाचे बिंदु. श्यामसुंदर मनमोहक शरीरावर मोत्यांच्या सारखे घामाचे बिंदु पसरलेले ! किती सुंदर व चित्तलोचनचोर ते रूप झाले असेल ! त्या अलौकिक अप्रतिम रूपाकडे बघतच बसावे असे कोणास नाही वाटणार? कितीही श्रांत मनुष्याने हे रूप पाहिल्यावर श्रमाचे भान राहील काय? **'झलकी भरि भाल कनी जलकी'** (कवि. २।११) असे जे सीतेचे वर्णन केले आहे, तशीच स्थिती आपल्या प्राणप्रिय पतीची पाहिल्यावर कोणत्या सतीचे हृदय हळहळणार नाही व कोणती सती काहीतरी निमित्त पुढे करून पतीला वडाच्या झाडाखाली बसण्याचा आग्रह करणार नाही? अशा स्थितीत त्या सतीला स्वतःचे श्रम एक निमिषार्ध तरी आठवतील काय? **पतिव्रतांच्या श्रम-दुःख-परिहाराचे साधन विश्रांति घेणे हे नसून पतिसेवेने पतिश्रम परिहार करणे हे आहे.** पण हे कोणाला शक्य आहे? पतिवियोगात 'भोगरोगसम भूषण भारहि। यमयातना सदृश - संसारहि' इत्यादी पूर्वी वर्णिल्याप्रमाणे ज्यांना वाटत असेल त्या धर्मराष्ट्र विभूषण देवभक्त वंदनीय असणाऱ्या माऊलींनाच शक्य आहे. बाकीच्यांचे वर्णन 'विधवांचे शृंगार नवीनहि' इत्यादी मानसांतच केलेले आहे. हे प्रवासातील सेवेचे वर्णन झाले. प्रवास संपवून वस्ती करण्याची वेळ आली म्हणजे सेवा काय व कशी करणार ते आता सांगतात.

**चौ. ५ - (१) सम महिवर तृण पल्लव घालिल -** विषम भूमि असेल तर

स्वस्थ झोप लागणार नाही व पतीच्या शरीराला कष्ट होतील ! गवत पाला घालावयाचा म्हणजे आधी गोळा करून आणला पाहिजे. स्वतः प्रवास करून पतीबरोबरच पतीपेक्षा जास्त दमलेली असून नंतर गवत पाला जमविण्यासाठी हिंडणे, तो उचलून आणणे आणि रात्री झोपेचीसुद्धा इच्छा न ठेवता एकटीने वनात, रात्री जागत बसण्याची सीतेच्या मनाची तयारी आहे ! लक्ष्मण बरोबर नसते तर सीता बोलल्याप्रमाणे वागलीच असती. श्रीरघुवीराने हे सर्व स्वस्थ बसून पाहणे मात्र शक्य झाले नसते ! अशा वृत्तीच्या पतिव्रता स्त्रियांना ब्रह्मादिक देव का बरे भिणार नाहीत?

*हिं. । बार बार मृदु मूरति जोही । लागिहि तात बयारि न मोही ॥६॥*
*। को प्रभु सँग मोहि चितवनिहारा । सिंघबधुहि जिमि ससक सिआरा ॥७॥*
*। मैं सुकुमारी नाथ बन जोगू । तुम्हहि उचित तप मो कहुँ भोगू ॥८॥*
*हिं.दो. । ऐसेउ बचन कठोर सुनि जौं न हृदउ बिलगान ॥*
*। तौ प्रभु बिषम बियोग दुःख सहिहहिं पावँर प्रान ॥६७॥*
*म. । वारंवार मूर्ति मृदु बघतां । लागेना मज वात - तप्तता ॥६॥*
*। प्रभुसंगें मज पाहि कुणी कसा । सिंह-वधूला क्रोष्टु शश जसा ॥७॥*
*। मी सुकुमारि नाथ वनजोगे । तुम्हां उचित तप मज सुख भोगें ॥८॥*
*म.दो. । श्रवुनि वचन अस कठिण जर उर न भग्न मम होत ॥*
*॥ प्रभु वियोग-दुःखा विषम प्राण नीच साहोत ॥६७॥*

**अर्थ :** वारंवार कोमल मूर्तीकडे पाहात राहिल्याने उष्ण वाऱ्यांची झळ सुद्धा मला लागणार नाही.॥६॥ प्रभु बरोबर असल्यावर माझ्याकडे कोणी (वाकड्या) नजरेने पाहील तरी कसा? जसा कोल्हा किंवा ससा सिंहाच्या वधूला पाहू शकणार नाही (तसेच मला कोण पाहू शकतील).॥७॥ मी मात्र सुकुमारी आणि नाथ (तेवढे) तपाला योग्य (पात्र) ! तुम्हीच तप करणे उचित आणि मला मात्र सुख भोगांनी होईल ! ॥८॥ असे कठीण-कठोर, वचन ऐकून (सुद्धा) माझे हृदय ज्या अर्थी (शतशः) भग्न झाले नाही त्या अर्थी प्रभु ! आपल्या वियोगाचे दुःसह दुःख (या) नीच प्राणांना सोसावे लागणारच ! ॥दो.६७॥

**टीका. चौ. ६ - (१) लागेना मज वात-तप्तता - 'घोर घर्म हिम वारा वारी'**

(६२।४) याचे उत्तर येथे आहे. विरहशरदातपाचा विनाश करणाऱ्या रूपामृतमय कोमल मूर्तीच्या समीप त्या मूर्तीकडे पहात राहिले म्हणजे मला वाऱ्याच्या कढत झळासुद्धा लागणार नाहीत. मग इतर असली दुःखे तरी कशी होतील? उन्हाळा-वैशाख मास, आहे म्हणून उष्ण वायूचा उल्लेख केला.

**चौ. ७ - (१) प्रभुसंगें मज पाहि कुणि कसा - सिंहवधू** - सिंहाची भार्या, सिंहीण, क्रोष्टु = कोल्हा; शश = ससा (ससक = शशक) सिंहिणीकडे वाकड्या नजरेने पाहण्याची ताकद कोल्हा किंवा ससा यांना असू शकत नाही. ३।२८।१३-१५ पहा. त्याप्रमाणेच नराहारी (मनुष्यभक्षक) राक्षसादिकांनी मला त्रास देणे शक्य नाही. या दृष्टांन्ताने ध्वनित केले की मी स्वतःचे रक्षण करण्यास समर्थ आहे. सिंहिणीकडे क्रूर दृष्टीने पाहणारास शासन करण्याचे काम सिंहाला करावे लागत नाही. सिंहिणीच्या नुसत्या क्रोधाच्या नजरेने हत्तीसुद्धा पळून जातात नाहीतर मूर्च्छित होऊन पडतात. **'बघुनि सिंहिणिस पतित जणुं सभय वृद्ध गजराज'** (३९). सिंहिणीच्या गर्जनेने हत्तींचे कळपसुद्धा मृतप्राय होतात. तेथे कोल्हे, ससे यांची कथा ती काय? **पतिव्रतेचा - क्रोधाग्नि सिंहिणीच्या क्रूर दृष्टीपेक्षा, तिच्या नखांपेक्षा व गर्जनेपेक्षांही अति भयंकर असतो. (क) प्रभु** - याने सर्वसमर्थता सुचविली - सिंहिण गाफील असता तिची खोडी कोणी काढलीच तर, मग मात्र सिंह त्या सर्वांचा संहार केल्याशिवाय रहात नाही. येथे लक्षात ठेवले पाहिजे की **(मानसांतील) रावणाने जिला चोरली ती सीता ही नव्हे**. ती हिची मायिक मूर्ति आहे. तथापि तेवढी खोडी काढली रावणाने म्हणून रावणकुळाचा संहार केला रघुवीराने 'क्षुद्र ससा इच्छी हरि वधुसी । निशिचरनाथ कालवश अससी' (३।२८।१५) असे त्या माया सीतेने म्हटलेच आहे. म्हणून शश = ससे = निशाचर यांत शंका राहिली नाही. मग कोल्ह्याचा दृष्टान्त कशाला? पंचतंत्र किंवा हितोपदेश वाचणारांना माहीत असेल की असल्या बलवान पशूंची आगळिक कोल्हा स्वतः न करता इतर पशूंना पुढे करून आपला कावा साधतो. काळाने प्रेरित निशाचरांनीच आगळिक केली. म्हणून येथे कोल्हा म्हणजे काळ. **'शोध एकदा कसा हि जाणिन । काळच जिंकुनि निमिषे आणिन'** (४।१८।२) असे रघुवीराने त्या सीतेविषयी म्हटले व काळाचाच उल्लेख केला आहे. रावण कालवश

झाल्याचा उल्लेख वरील अवतरणांत माया सीतेनेच केला आहे व पुढे मंदोदरीने व कुंभकर्णानेही केला आहे. (६।३७।६; ६।६४।७ पहा) म्हणून कोल्हा = काळ हेही मानसाधारेच ठरले. मानसांतील आधार सापडले नाहीत म्हणजे कल्पनांच्या काननांत काळोखात चाचपडावे लागते !

**चौ. ८ - (१) मी सुकुमारि नाथ बनजोगे** - या चौपाईने सुचविले की आपण माझ्यापेक्षासुद्धा सुकुमार असून सर्व भोगांचा त्याग करून वनात जाण्यास व तप करण्यास योग्य आहात. अणि मी मात्र अपात्र ! पुष्पवाटिकेत वसंत ऋतूत विहार करीत असता, सकाळच्या प्रहरीसुद्धा नुसती फुले तोडण्याने किती श्रम झाले होते हे काय मला माहीत नाही असं का वाटतं? त्या वेळी मला मात्र मुळीच घाम आला नव्हता हे खरे ना? (१।२३३।३) **हंसगमनि तुम्हिं बना योग्य ना । श्रवुनि देति मज जन अपयश ना !' (६३।५) या वचनाचे येथे उत्तर आहे.** भाव हा की कोणी अपयश देणार नाही. उलट योग्यच केले असे म्हणतील. मीच आपल्यापेक्षा कठोर आहे याचे प्रत्यक्ष प्रमाणच पहावे.

**दो. - (१)** 'तू वनात येण्यास अपात्र आहेस म्हणून घरी रहा' हे अति कठोर, कठीण शब्द कानी पडताच माझ्या हृदयाचे तुकडे तुकडे उडाले नाहीत. यावरून ठरले की मी अति अति कठोर आहे. माझे हृदय वज्रापेक्षा कठीण आहे हे ठरलेच. वियोगाची भाषा ऐकून ज्या अर्थी हृदय विदीर्ण झाले नाही त्या अर्थी असे वाटते की प्राण हृदयापेक्षा स्वभावताच अधिक कठोर असल्याने, प्रत्यक्ष वियोग झाल्यावर तेसुद्धा प्रयाण करणार नाहीत. वियोगाचे अति कठीण, दुःसह दुःख सोसण्यास व विषयभोगानी सुख मिळविण्यास ते नीच राहतील व त्यांना कल्पनातीत दुःख सोसावे लागेल. भरतसुद्धा अनेक वेळा असेच म्हणतात. १७९।६-८; १८०।१-२, १९९, २००/१-४ पहा. **(क) नीच प्राण** - म्हणण्याचे कारण हेच की देहाला सोडून सर्वसुखनिधान, आनंदसिंधुबरोबर वनात जाण्याची त्यांची तयारी दिसत नाही. त्या अर्थी या प्राणांची विषयसुखभोगांवर अधिक प्रीती असली पाहिजे, असे तिला वाटले. येथे सीतेचे हे भाषण संपले.

***हिं.*** *। अस कहि सीय बिकल भइ भारी । बचन बियोगु न सकी सँभारी ॥१॥*
*। देखि दसा रघुपति जियँ जाना । हठि राखें नहिं राखिहि प्राना ॥२॥*

*। कहेउ कृपाल भानुकुलनाथा । परिहरि सोचु चलहु बन साथा ॥३॥*
*। नहिं बिषाद कर अवसरु आजू । बेगि करहु बन गवन समाजू ॥४॥*
म. *। वदुनि विकल अति सीता झाली । वचन-वियोग न साहूं शकली ॥१॥*
*। रघुपति जाणति बघुनि दशा कीं । हटें ठेवितां प्राण न राखी ॥२॥*
*। वदति कृपालु भानुकुलनाथ किं । सोडुनि शोक चला वनिं साथ किं ॥३॥*
*। नव्हे विषादा वेळ आजची । शीघ्र तयारि करा गमनाची ॥४॥*

**अर्थ :** असे सांगून सीता अत्यंत व्याकुळ झाली. नुसता वचनवियोगही तिला सोसवला नाही.॥१॥ ती दशा पाहून रघुपतिंनी जाणले की हिला हट्टाने ठेवली तर ही प्राण राखू शकणार नाही. (प्राणांचे रक्षण करता येणार नाही) ॥२॥ तेव्हा कृपालु भानुकुलनाथ म्हणाले की शोक सोडून द्या व माझ्या बरोबर वनात चला की.॥३॥ (मात्र) आजची (ही) वेळ खेद, शोक करीत बसण्याची नाही. वनात जाण्याची तयारी लवकर करा.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) वचनवियोग न साहूं शकली** - वियोग होणार असे ज्या शब्दांनी ठरले ते शब्दसुद्धा तिला सोसवले नाहीत. अजून प्रत्यक्ष वियोग झाला नाही. **(क) विकल अति झाली** - 'वदवे ना **विव्हळ** वैदेही' (६३।३ टी.प.) असे आरंभीच झाले होते. पण आता तर **अति विव्हळ** झाली. प्रत्यक्ष वियोग झाला कीं प्राणच जातील ! सोसू शकली नाही म्हणजेच अति विव्हळ झाली याचा अर्थ गीतावली स्पष्ट करते. 'तुलसिदास प्रभु बिरह वचन सुनि **सहि न सकी मुरुछित भइ** भामिनि' (२।५।३ पद) **सीतेला मूर्छा आली.**

**चौ. २ - (१) ती दशा बघुनि रघुपति जाणति** की हटे ठेविता प्राण राखी न - अयोध्येत ठेऊन गेल्यावर प्राण राहतील असे वाटत असेल तर जा ठेऊन, वगैरे जे सीतेने सांगितले ते व ही अति विव्हळ, मूर्च्छेसारखी दशा पाहून जाणले की प्राण न राखी - प्राण राखावे, ठेवावे अशी हिची इच्छा असली तरी हिला प्राण राखता येणार नाहीत. विरह होताच प्राण हिच्या देहाला सोडतील. **(क) रघुपति** - रघुकुळांतील एका श्रेष्ठ पतिव्रतेच्या मरण्याला आपला हट्ट (बलात्काराने ठेऊन जाणे) निमित्त होऊन व रघुकुळाला कलंक लावल्याचा दोष आपल्याकडे येईल हेही जाणले हे रघुपति शब्दाने सुचविले. रघुकुलाचे रक्षण

करणारा तो रघु + पति (पा रक्षणे, अ.व्या.सु.). **रघुपति हे नाव निरर्थक ठरेल, हे जाणले.**

**चौ. ३ - (१) कृपालु** - सीतेची दीन, अनाथ, केविलवाणी, अति आर्द्र दशा पाहून दीनदयाळू, दीनबंधूच्या हृदयास पाझर फुटला. द्रवले हृदय म्हणून कृपालु म्हटले. कृपा = दया, 'कृपा दयाऽनुकम्पास्यात् (अमरे). 'वेगें जिनें द्रवें मी भाई । ती मम भक्ति भक्त सुख दाई' (३।१६।२). 'सानुकूल भक्तिस रघुराया' (७।११६।५). 'भक्ति अवशा वश करी' (३।२६ छं.) येथे सीतेची अनन्यगतिक उत्तम भक्ति पाहून प्रभु तिला पूर्ण अनुकूल झाले. तिला वश झाले हे सिद्ध झाले. सीता तर साक्षात् देहधारिणी रामभक्तीच आहे. यथा 'ज्ञानसभे जणुं धृततनू भक्ति सच्चिदानंद' (२३९ पहा). राम = सच्चिदानंद, ब्रह्म आणि सीता = भक्ति. (क) शीघ्र तयारि करा गमनाची म्हणजे काय याचे उत्तर वा.रा. २।३० या सर्गात आहे. त्याचे सार हे की माझे जे काही महालात आहे ते सर्व ब्राह्मण, याचक, सेवक इत्यादींना अगदी त्वरेने देऊन टाक, उशीर लावू नकोस.

*हिं.* *। कहि प्रिय बचन प्रिया समुझाई । लगे मातु पद आसिष पाई ॥५॥*
*। बेगि प्रजा दुख मेटब आई । जननी निठुर बिसरि जनि जाई ॥६॥*
*। फिरिहि दसा बिधि बहुरि कि मोरी । देखिहउँ नयन मनोहर जोरी ॥७॥*
*। सुदिन सुघरी तात कब होइहि । जननी जिअत बदन बिधु जोइहि ॥८॥*

*म.* *। प्रिय भाषणें प्रिये समजावति । माते नमती आशिस् पावति ॥५॥*
*। प्रजादुःख हर ये हो ! सत्वर । निष्ठुर आइस विसरूं नको बरं ॥६॥*
*। विधे ! दशा मम पुन्हा टळे का । नयन मनोहर युगल दिसे का ॥७॥*
*। बाळ ! सुवेळ सुदिन कैं येइल । जननि जिवंत वदनविधु पाहिल ॥८॥*

**अर्थ :** प्रिय भाषणाने प्रियेची समजूत घातली व मातेला वंदन केले (तेव्हा) आशीर्वाद मिळाले.॥५॥ (माता म्हणाली) (बाळ !) लवकर ये हो ! आणि प्रजेचे दुःख हरण कर; (मात्र) या तुझ्या निष्ठुर जननीला विसरू नकोस बरं ! ॥६॥ अरे दैवा ! माझी ही दशा पुन्हा बदलेल का? व हे नयन मनोहर जोडपे (या डोळ्यांना) पुन्हा दिसेल का?॥७॥ बाळ ! ज्या वेळी या तुझ्या

मुखचंद्राला तुझी आई जिवंत असता पाहील तो दिवस व ती वेळ कधी येईल?॥८॥

**टीका. चौ. - ५ - (१) प्रिय भाषणें प्रिये समजावति** - हे जनकनन्दिनी ! चल बरं माझ्याबरोबर; आणि हो माझी सहधर्मचारिणी. तू सर्वतोपरी तुला, मला व कुळाला शोभेल असेच केलेस. हे सीते ! आता तुझ्याशिवाय मला स्वर्गसुद्धा गोड वाटणार नाही. (वा.रा. २।३०।४०-४२ पहा.) यामुळे तू आपल्या जनक कुळाचीही कीर्ति वाढविलीस इ. (**क**) हट्ट करणाऱ्या, क्रोधाने अपमान करून पतीला अपशब्द बोलणाऱ्या, आत्महत्त्येच्या व प्रायोपवेशनाच्या धमक्या देणाऱ्या, वा.रा. सीतेविषयी वर दाखविल्यासारखा आदर वा.रा. रामाला जर वाटला; तर मग ज्या सीतेने एक अपशब्द उच्चारला नाही, क्रोधाचा मागमूस नाही, हट्ट जिला शिवला नाही, जी दीन, अनाथासारखी हताश व अति आर्त बनली व वचन वियोगानेच जिला मूर्च्छा आली. जिने शुद्ध प्रेमाने, मर्यादा भंग न करता पतीच्या हृदयाला द्रव फोडला त्या मानसांतील सीतेबद्दल मानसांतील रामाला किती आदर वाटला असेल, किती समाधान झाले असेल व किती प्रेम वाढले असेल? पण ते कोणास कळणार !!

**चौ. ६ - (१) 'माता म्हणाली'** हा उल्लेख नाही. **प्रजा दुःख हर** - प्रजेचा उल्लेख प्रथम करून, नंतर स्वतःचा उल्लेख करून स्वतःस निष्ठुर ठरवून, सुचविले की मी जननी असून माझे प्रेम तुझ्यावर नाही; प्रजेचे तुझ्यावर माझ्यापेक्षा अधिक प्रेम आहे. मी निष्ठूर असल्यामुळे माझ्यासाठी लवकर न आलास तरी प्रजेच्यासाठी ये हो ! सीता ९ वर्षाची पत्नी असून वचन वियोगाने जेवढी व्याकुळ झाली तेवढी स्वतः प्रत्यक्ष वियोगाच्या वेळीसुद्धा होऊ शकली नाही. याबद्दल लज्जा व पश्चात्ताप कौसल्येला वाटत आहे म्हणून 'निष्ठुर' शब्द वापरला. (दो. ५६ पहा.)

**चौ. ७ - (१) विधे दशा मम पुन्हां टळे का** - रामजानकी यांचा वियोग होणे, त्यांचे दर्शन न होणे ही दुर्दशा आहे. ही महासाडेसाती आहे. कौसल्येला १४ वर्षेच ही दुर्दशा आहे. पण वाचकहो ! तुमची आमची दुर्दशा आहे की भाग्योदय? आपली ही दुर्दशा किती कल्पे गेली तरी सरत नाही ! पण दुर्दशा

आहे असे वाटते का? आम्ही भाग्योदय कशाला समजतो?

**चौ.** ८ - (१) **सुदिन कै येइल** - १४ वर्षे जगेन की नाही अशी शंका येणे स्वाभाविक आहे. 'येऊन पायांचे दर्शन घेईन' असे अभिवचन प्रभूंनी दिले असले तरी या वेळी कौसल्या शुद्ध माधुर्य भावांत असल्याने हे विसरली आहे की राम भगवान् आहेत व त्यांचे वचन मिथ्या होणार नाही. ज्या दिवशी रामजानकी दर्शन होईल तोच परमभाग्याचा दिवस व भाग्याची वेळ.

*हिं.दो.* *। बहुरि बच्छ कहि लालु कहि रघुपति रघुबर तात ॥*
*॥ कबहिं बोलाइ लगाइ हियँ हरषि निरखिहउँ गात ॥६८॥*

*म.दो.* *। पुन्हां वदुनि हे वत्स ! बा ! रघुपति रघुवर लाल ! ॥*
*॥ बाहुनि कैं ह्रदिं धरुनि, तनु हर्षे निरखिन बाळ ! ॥६८॥*

**अर्थ :** हे वत्सा, बाबा, रघुपति, रघुवर, लाल, बाळ ! अशी हाक मारून पुन्हा कधी हृदयाशी धरून हर्षाने (तुझी) तनु निरखून पाहीन का?॥दो.६८॥

**टीका.** - कौसल्या स्नेहवश होऊन घाबरली आहे व अधिकाधिक व्याकुळ होत आहे. बाळपणापासून आतापर्यंत ज्या विविध नावांनी हाक मारीत असे ती ती नावे, त्या लीला, ते परमानंदाचे दिवस इत्यादींचे चलच्चित्र तिच्या मनश्चक्षूं समोर वेगाने उलगडत व गुंडाळत जात आहे व शेवटी हृदयविदारक वियोग चित्र व पुढील १४ वर्षांतील विपत्तींचे, भीतीचे, संशयाचे भूत तिच्या पुढे नाचत आहे. अलौकिक विवेक कधी नष्ट होऊ नये असा वर मागील जन्मी मिळाल्यामुळे ती इतके तरी बोलू शकली. अन्यथा दशरथांसारखीच मूर्छित होऊन पडली असती. पुत्राच्या प्रयाणसमयी अपशकुन नको हे जाणून कसे तरी बोलत आहे. येथील शब्दांची पुनरुक्ति हा दोष नसून ही सहज स्वभावोक्ति आहे. स्नेहकातर, अधीर व व्याकुळ झालेल्या मातृहृदयाचे हे हृदयद्रावक बोल आहेत !

*हिं.* *। लखि सनेह कातरि महतारी । बचनु न आव बिकल भइ भारी ॥१॥*
*। राम प्रबोधु कीन्ह बिधि नाना । समउ सनेहु न जाइ बखाना ॥२॥*

*म.* *। स्नेह सभीत बघुनि निज आई । विव्हळ भारी बचन न येई ॥१॥*
*। प्रबोधिती तिज राम परोपरि । स्नेह समयिंचा वर्णवेल तरि? ॥२॥*

**अर्थ :** आपली आई स्नेहाने घाबरून भारी व्याकुळ झाली आहे व मुखांतून

शब्दसुद्धा निघत (येत) नाही असे पाहून.॥१॥ रामचंद्रांनी तिला परोपरीनी बोध केला. त्या समयींच्या स्नेहाचे वर्णन करता तरी येईल काय? (अशक्य आहे) ॥२॥

**टीका. चौ. १-२** (१) स्नेहाने घाबरून कशी अधीर झाली आहे हे मागल्या दोह्यात दाखविले आहे. व्याकुळ होऊन कंठावरोध होणे स्वाभाविक आहे. वनात जाण्यास उशीर होत असला तरी अशा स्थितीत मातेला सोडून जाणे बरे नाही म्हणून तिला धीर देण्यासाठी व आश्वासन देऊन तिची भीती नष्ट करण्यासाठी ज्ञान व वैराग्य यांची वृद्धी होईल असे समजाऊन सांगणे भाग होते. (वा.रा. सर्ग ३९।३४, ३५ पहा) आई ! दुःख व सुख जन्मास आलेल्या जीवाच्या पाठीशी लागलेलीच आहेत. दिवसामागून रात्र व रात्रीनंतर दिवस उगवतोच. १४ वर्षे आता निघून जातील व आम्ही कुशल आलो आहोत हे तू आपल्या याच डोळ्यांनी पाहशील यात जरासुद्धा शंका नाही. कवि म्हणतात त्या समयीच्या स्नेहाचे वर्णन कोण करणार? तो स्नेह अवर्णनीय ! हेच त्याचे वर्णन. आता सीता सासूचा निरोप घेईल.

*हिं.* *। तब जानकी सासु पग लागी । सुनिअ माय मैं परम अभागी ॥३॥*
*। सेवा समय दैअँ बनु दीन्हा । मोर, मनोरथु सुफल न कीन्हा ॥४॥*
*। तजब छोभु जनि छाडिअ छोहू । करमु कठिन कछु दोसु न मोहू ॥५॥*

*म.* *। मग जानकि धरि सासुपदांतें । पहा अभागि परम मी माते ॥३॥*
*। सेवासमयिं दैव वनिं धाडी । करुनी भग्न मनोरथ गाडी ॥४॥*
*। त्यजा क्षोभ परि कृपा त्यजा ना । कर्म कठीण मम दोष जरा ना ॥५॥*

**अर्थ :** मग जानकीने सासूचे पाय धरले (पाया पडली) व म्हणाली की माते ! हे पहा की मी परम अभागी आहे.॥३॥ सेवेच्या काळी दैव वनात धाडीत आहे व माझ्या मनोरथरूपी गाडीचा चक्काचूर करून टाकला आहे.॥४॥ माझ्या विषयींचा क्षोभ सोडा; पण कृपामात्र सोडू नका हो ! (कारण) कर्मच फार कठीण आहे, यात माझा मुळीच दोष नाही.॥५॥

**टीका. सूचना** - या तीन चौपायांत सीता कौसल्येचा निरोप घेत आहे. पुढील तीन चौपायांत व दोह्याच्या पूर्वार्धात कौसल्या जानकीला निरोप देते व उत्तरार्धात सीता सासूला नमन करून जाते. दोघींच्या वाटणीस ३/३ चौपाया व दोह्याची

१।१ ओळ देऊन दाखविले की दोघींचे परस्पर प्रेम अगदी समान आहे.

**चौ. ३ (१) मग** - रघुपतींनी सांत्वन करून मातेला आश्वासन दिल्यावर, कौसल्या चांगली सावध झाल्यावर उपक्रमोपसंहारांत जानकी शब्दच आहे. अभागी = भाग्यहीन का याचे उत्तर पुढील चौपाईत आहे.

**चौ. ४-५ (१) सेवासमयिं** - अजूनपर्यंत सीता अगदीच लहान होती. आता ४ दिवसांनी ११ वे वर्ष लागणार व त्यामुळे तेथून पुढे सासूची सेवा करण्याचा काळ होता. मनोरथ गाडी भग्न केली. मनोरथ सिद्धीस जाऊ दिले नाहीत. सेवा करण्याची फार इच्छा होती; पण दैवाने ती पुरी होऊ दिली नाही म्हणून अभागी. (२५२।२,४ पहा) (क) **दैव - ज्याच्याविषयी कार्यकारण संबंध निश्चित करणे अशक्य असते व ज्याचा प्रतिकार करता येत नाही ते दैव.** (वा.रा. २।२२।२०-२४ पहा) विवेकयुक्त, यथाशास्त्र, यथानीति, प्रारंभ केलेल्या कार्यात, अचानकपणे, कल्पनातीत कारण उत्पन्न होऊन सहज भलतेच - विरुद्ध घडते ते दैवाचे काम समजावे. (ख) क्षोभ - चिंता, परिताप - सीता अति सुकुमारी आहे. वनात तिचे काय होईल इत्यादी जी चिंता, तो क्षोभ. सुमंत्राबरोबर जो संदेश पाठविला त्यात या 'क्षोभ' याचा अर्थ स्पष्ट केला आहे. **'चिंता मम न करावि मुळीं मी वनिं सुखी स्वभाविं** (२।९८।-) (ग) **कर्मकठिण** - दैवाचे मूळ कर्म हे येथे सुचविले आहे. 'पूर्वजन्मकृतम् कर्म तद्दैवमिति मन्यते' दैव = पूर्वजन्मी केलेले कर्म.

*हिं. । सुनि सिय बचन सासु अकुलानी । दसा कवनि बिधि कहौं बखानी ॥६॥*
*। बारहिं बार लाइ उर लीन्ही । धरि धीरजु सिख आसिष दीन्ही ॥७॥*
*। अचल होउ अहिवातु तुम्हारा । जब लगि गंगजमुन जल धारा ॥८॥*

*म. । सासू व्याकुळ, ऐकुनि वचनां । दशा कशापरिं वदवे वदना ॥६॥*
*। वारंवार हृदयिं तिज घेई । धैर्ये शिकवण आशिस देई ॥७॥*
*। सदा अचल सौभाग्य असो तव । गंगा-यमुना-जल वाहे जंव ॥८॥*

**अर्थ :** (सीतेचे) भाषण ऐकून सासू व्याकुळ झाली. या वेळच्या तिच्या दशेचे वर्णन मुखाने कशा प्रकारे करता येणार ! ॥६॥ सासूने तिला वारंवार हृदयाशी धरली व धैर्य धरून (धैर्याने) तिला उपदेश केला व आशीर्वाद दिला.॥७॥ जोपर्यंत गंगायमुनांचे जल वहात आहे तोपर्यंत तुझे सौभाग्य अचल असो.॥८॥

**टीका. - चौ. ६** (१) वियोगाच्या वेळी जेव्हा कोणी व्याकुळ होतात तेव्हा प्रेम-स्नेह हेच मुख्य कारण असते. स्नेह सलिल शिंपून आपले प्राणच जिच्यावर लाऊन ठेवले होते ती कल्पलता कल्पवृक्षाबरोबर वनात जाणार? अशा वेळी व्याकुळता येणार नाही. तर मग केव्हा? येथे हे दाखविले की कौसल्येचे रामावर जितके प्रेम आहे तितकेच जानकीवर आहे. 'विव्हळ भारी वचन न येई' असे पुत्राला निरोप देताना झाले आहे. सीतेची लीनता, सुशीलता व प्रेम यांमुळे सासू व्याकुळ झाली. **ही व्याकुळता हर्ष व शोक या दोन्हींमुळे आहे.** सीतेची पतिनिष्ठा, अनन्यता व पतिप्रेम पाहून हर्ष व अशी सून वनात जाणार म्हणून शोक.

**चौ. ७ - (१) वारंवार हृदयिं तिज धरी** - हे मातृवात्सल्याचे लक्षण आहे. 'माता वारंवार भेटती' (१।३३७।६) 'वारंवार मुली हृदिं धरिल्या' (१।३३८।८) असे सीतेच्या माता व विदेही जनक यांनी केले आहे. तेच कौसल्या सुनेच्या बाबतीत करीत आहे. सीतेला भेटतानासुद्धा कौसल्येचा धीर सुटला होताच; पण ही वेळ जाणून धैर्य धरले व आईबापांनी अशा वेळी जसा उपदेश केला असता तसाच कौसल्या सासूने केला. १।३३४।३-४ व २।११७, ११८।१ पहा.

**चौ. ८ - (१) गंगायमुना** - दोन्ही सरिता परम पवित्र आहेत. यमुना श्यामवर्ण, भानुतनया, गंभीर, कलिमलहरणि तसेच राम श्यामवर्ण, भानुकुलतनय, गंभीर व कलिमलहारी आहेत. भगवच्चरणांपासून निघाली म्हणून गंगा परम पवित्र, धवल वर्ण; तशीच सीता पतिदेवांच्या चरणांमागून जाणारी, गौरवर्ण, गंगायमुनांचा मिळून एकच प्रवाह होतो आहे. त्याप्रमाणेच सीताराम एकरूपच आहेत. गंगायमुना एकत्र झाल्यावर जसा महिमा गाइला जातो गंगेचाच तसे मुख्य चरित्र रामाचेच. (क) पतीशिवाय इतर सर्व नाती, सर्व विषय व्यर्थ असे सीतेला वाटत असल्याने एकच आशीर्वाद दिला. आता या प्रकरणाचा उपसंहार करतात.

*हिं.दो. । सीतहि सासु असीस सिख दीन्हि अनेक प्रकार ॥*
*॥ चली नाइ पद पदुम सिरु अति हित बारहिं बार ॥६९॥*

*म.दो. । सीते आशीर्वाद दे शिकवण सासू फार ॥*
*॥ निघे नमुनि पदपद्मि शिर प्रेमें अति बहु बार ॥६९॥*

**अर्थ :** सासूने सीतेला पुष्कळ आशीर्वाद दिले व अनेक प्रकारे उपदेश

केला. सीतेने अति प्रेमाने पुष्कळ वेळा (वारंवार) चरण कमलांना वंदन केले व ती निघाली.।।दो.६९।।

**टीका.** - (१) **शिकवण व आशीर्वाद** देण्याचा पुन्हा उल्लेख करण्यात गूढ व फार मधुर हेतु आहे. याने कौसल्येची प्रेमविव्हळता दाखविली आहे. भाव हा आहे की सीतेला प्रेमाने पोटाशी धरावी, उपदेश करावा; तिने नमस्कार करावा व सासूने आशीर्वाद द्यावा व सीतेने जाण्यास निघावे; तो कौसल्येने तिला जवळ घेऊन पहिल्या सारखेच करावे. काही सांगावयाचे राहिले असे वाटून पुन्हा जवळ घ्यावी असे पुष्कळ वेळा घडले. उदा. - 'बोळविति परि परतुन भेटति । प्रीति परस्पर अशि वाढे अति ।। विलग करिति सखि, घडिघडि बिलगत । जशि नव धेनु बालवत्साप्रत' (१।३३७।७-८) सीतेला वरातीच्या आधी माता भेटतात त्या वेळचे हे वर्णन आहे. (गू.चं.प.)

(२) शिकवण काय दिली असेल? मानसांतील सीतेने परम उज्वल व आदर्श सतीधर्माचा विचार व आचार कौसल्येच्या देखतच केला असल्याने व तो कौसल्येने ऐकला व पाहिला असल्याने पतिव्रता धर्माचा उपदेश केला असे म्हणणे म्हणजे कौसल्येला काही अक्कल नव्हती असे ठरविणे आहे. **वा.रामायणांत रामसीतासंवाद कौसल्येसमोर झालेला नाही म्हणून** तेथे कौसल्येने पतिव्रताधर्माचा उपदेश करणे संयुक्तिक व योग्यच आहे. वनांतील अडचणी व संकटे लक्षात घेऊन आणि कोणी सेवक बरोबर नाही या भूमिकेवरून सीतेला आरोग्य रक्षण, संरक्षण, निर्भयता इ. दृष्टींनी मातेने जशा सूचना द्याव्यात तशा दिल्या असतील. पाणी उकळून पीत जा, उन्हात हिंडत जाऊ नकोस, कंदफळे वगैरे पोटभर खात जा. रघुवीराला सोडून एक क्षणभरसुद्धा एकटी राहू नकोस. तहान-भूक लागली तर सांगत जा. संकोच धरू नकोस कारण की तिसरे माणूसच नाही ! चालताना दमलीस तर न लाजता सुचवीत जा. नाहीतर तुझ्या प्रिय पतीलाच त्रास व तुला दुःख होईल; इत्यादी प्रकारे शिकवण दिली असेल. नंतर सीता नमस्कार करून गेली. (क) सीता गेली असे येथे म्हटले; पण राम कौसल्येच्या महालातून केव्हा गेले याचा येथे किंवा पुढेही कुठे उल्लेख नाही; म्हणून रामचंद्रांबरोबर सीता गेली असे मानणे पुढील काही उल्लेखांवरून भाग आहे. लक्ष्मण आल्यावर

तो कौसल्येच्याच महालात आला असता तर कौसल्येला नमस्कार केल्याचा व कौसल्या त्यास भेटल्याचा उल्लेख पाहिजे होता; पण तसा उल्लेख नाही. लक्ष्मण सुमित्रेचा निरोप घेऊन निघाले व 'जानकिनाथ तिथें गत लक्ष्मण' आणि रामसितापद सुंदर नमले । तयांसवें नृपमंदिरिं वळले ॥ (७६।१-२) यावरून.

●●●

## 'श्रीराम - लक्ष्मण संवाद' प्रकरण (७०।१-७३।२)

हिं. *। समाचार जब लछिमन पाए । ब्याकुल बिलख बदन उठि धाए ॥१॥*
*। कंप पुलक तनु नयन सनीरा । गहे चरन अति प्रेम अधीरा ॥२॥*
*। कहि न सकत कछु चितवत ठाढ़े । मीनु दीन जनु जल तें काढ़े ॥३॥*
*। सोचु हृदयँ बिधि का होनिहारा । सबु सुखु सुकृतु सिरान हमारा ॥४॥*

म. *। समाचार जैं लक्ष्मण पावति । उठुनि विकल; मुख उदास धावति ॥१॥*
*। तनु सकंप पुलकित जल नयनां । प्रेमाऽधीर धरति अति चरणां ॥२॥*
*। तिष्ठति बघत, न वदवे काहीं । मीन दीन जणुं बाह्य जला ही ॥३॥*
*। काय होय विधि ! सचिंत झाले । सकल सुकृत सुख अमचें पळलें ॥४॥*

**अर्थ :** (हा विषारी) समाचार जेव्हा लक्ष्मणास मिळाला तेव्हा ते व्याकुळ व उदासमुख होऊन उठून धावले.॥१॥ शरीराला कंप सुटला आहे; रोमांच उभे राहिले आहेत, डोळे पाण्हेरले आहेत. (अशा स्थितीत) प्रेमाने अधीर होऊन (रघुनाथाचे) पाय धरले.॥२॥ काहीच बोलवत नसून (राममुखाकडे) नुसते असे बघत राहिले की जणू पाण्याच्या बाहेर काढलेला दीन मीनच ! ॥३॥ दैवा? होणार तरी काय? (असे मनात म्हणत) चिंतातुर झाले आणि (वाटले की) आमचे सर्व सुकृत आणि सुख नाहीसे झाले (पळाले) ॥४॥

**टीका. - चौ. १-२ (१) समाचार जैं लक्ष्मण पावति** - कौसल्या व सीता यांस जसा हा विषारी समाचार कोणी सांगितला नव्हता, तसाच लक्ष्मणासही कोणी सांगितला नव्हता. लक्ष्मणास कोणाकडून कळला हे साधार सांगता येण्यासारखे नाही. परंतु बाकी सर्व नगरात तो पसरला असल्यामुळे कोणीतरी मित्र भेटण्यास आले व कळला. ऐकताच - तत्काळ उठून धावतच निघाले. **(क) मुख उदास** - निस्तेज, विवर्ण झाले. ताडकन उठले. प्राणक्षोम झाला, धावले - परम व्याकुळ झाले. अधीर झाले; कंप : **वेपथु**, पुलक - **रोमांच जलनयनां अश्रु,** डोळे व्याकुळ झाले. अति **प्रेमाधीर** - मन व्याकुळ झाले, धीर सुटला; धरति चरणां - हात व्याकुळ झाले. अष्ट सात्त्विक भावांपैकी वैवर्ण्य, कंप, रोमांच व अश्रु हे चार एकदम प्रगट झाले. तिसऱ्या चौपाईत ताटस्थ्य व स्वरभंग

= कंठावरोध स्पष्ट आहेत व घाम = स्वेद ध्वनित आहे. एकच अनुभाव प्रलय = मूर्छा किंवा मरण प्रगट झाला नाही. वनात बरोबर जाण्याची परवानगी मिळाली नसती तर तोही अनुभाव दिसला असता. **एकाच वेळी सात सात्त्विक भाव, संपूर्ण मानसांत कोणाच्याही ठिकाणी प्रगट झालेले नाहीत ! याने हे दाखविले की लक्ष्मणाचे रामप्रेम अनुपम व अलौकिक आहे.**

**चौ. ३ (१) रहति बघत - याने ताटस्थ्य** - स्तंभ हा अनुभाव दिसला. राममुखाकडे टक लावून केविलवाण्या मुद्रेने बघत स्तब्ध राहिले. प्रथम आल्याबरोबर पाय धरले व हात जोडले व वर मान करून बघत आहेत चित्रासारखे. (क) न वदवे काहीं - कंठावरोध = स्वरभंग हा अनुभाव दिसला. सेवक असल्यानेही स्वतःच काही बोलता येत नाही. **(ख) मीन बाह्य जलाही** - पाण्यातून बाहेर काढलेल्या माशाच्या अंगाला पाणी लागलेले असते, तसा अंगाला घाम सुटला आहे हे ध्वनित केले. स्वेद = घाम हा सातवा अनुभाव प्रगट झालेला दिसला. पाण्यातून बाहेर काढलेला मासा दीन, अनाथ, असहाय्य झालेला असतो. फार वेळ जगू शकत नाही. लवकर पाण्यात टाकला नाही तर मरतो. सुचविले की वनात जाण्याची आज्ञा जर लवकर मिळाली नाही तर लक्ष्मणाचे प्राण राहणार नाहीत. म्हणून जणू काय हा संवाद अवघ्या तीन दोह्यांतच संपविला आहे. त्यातील पहिल्या पाच चौपायांत तर लक्ष्मणाच्या प्रेमदशेचं वर्णन आहे ! लक्ष्मणाची प्रेमविव्हळता व अधीरता कौसल्या व सीता यांच्याहीपेक्षा अधिक तीव्र दिसतेच. (ग) या चार-पाच चौपायांतील काव्य अप्रतिम नाट्य आहे ! शब्द मुळीच नाही !

**चौ. ४ - (१) काय होय विधि !** - बरोबर नेणार की अयोध्येत रहावे लागणार? यांतील काय घडणार आहे? प्राणच बरोबर जाणार की सप्राण देह जाणार? हे प्रश्न मनात-दैवाला विचारीत आहे व हृदय चिंतेने जळत आहे. राममुखावर अनुकूलतेचे, हृदयाला द्रव फुटल्याचे, काहीच चिन्ह दिसले नाही, तेव्हा वाटले की घरी रहावे लागणार. त्यामुळे वाटू लागले की **(क) सकल सुकृत सुख अमचे पळलें - अमचें** = माझे व ज्यांना अयोध्येत रहावे लागेल त्या सर्वांचे 'भाग्यवंत वन अभागिणी पुरी । रघुकुलतिलका त्यजा जिस पुरी'

(५६।५) 'आज सुकृत-फल सकलांचें गत' (५७।५) असे कौसल्येने सुद्धा म्हटले आहे. लक्ष्मणांनी स्वतःबद्दल बहुवचनाचा उपयोग कधीच केलेला नाही. जेथे कोठे असा केलेला दिसेल तेथे इतर कोणाचा तरी संबंध त्यात आहेच आहे. 'होइ दैव उजु सकलां जेव्हां । राम समीप वास वनिं तेव्हां' (२८०।५) सुकृताचे, पुण्याचे फळ सुख असते. सर्वच लोकांचे सर्वच पुण्य पकून गेले (संपले) म्हणूनच सर्व सुखराशि, आनंदसिंधु राम वनात जात आहेत. सर्वांचे सुकृत व सुख वनात चालले आहे. ध्वनित केले की **सर्वांच्या सुकृताची व सुखाची मूर्ति म्हणजेच राम. रामचंद्रांबरोबर ज्या कोणांस वनात जाण्यास सापडेल त्यांस सर्वांच्या सकल सुकृताचे फळ जे सर्वसुख ते मिळेल. आधिदैविक दृष्टीने भाव** हा आहे की रामचंद्रांस हृदयस्थ करून जे कोणी वनांत राहतील त्यांचे सकल सुकृत उदयास आले व त्यांना सर्व सुख लाभले असे समजावे. 'सकल सुकृतफल रामीं स्नेहो' रामदर्शनसुद्धा अनंत जन्मांचे पुण्य फळाला आल्याशिवाय होत नाही.

*हिं.* *। मो कहुँ काह कहब रघुनाथा । रखिहहिं भवन कि लेहहिं साथा ॥५॥*
*। राम बिलोकि बंधु कर जोरें । देह गेह सब सन तृनु तोरें ॥६॥*
*। बोले बचनु राम नय नागर । सील सनेह सरल सुख सागर ॥७॥*
*। तात प्रेम बस जनि कदराहू । समुझि हृदय परिनाम उछाहू ॥८॥*

**म.** *। मला काय रघुनाथ सांगतिल । ठेविति भवनिं किं वनिं ये म्हणतिल ॥५॥*
*। राम बघति बंधुस कर जोडुनि । उभा, देह-घर-काडी मोडुनि ॥६॥*
*। वदले वचन राम नयनागर । शील-स्नेहार्जव-सुख-सागर ॥७॥*
*। प्रेमें बाळ ! न कातर होई । परिणामी मुद समजुनि हृदई ॥८॥*

**अर्थ :** मला रघुनाथ काय सांगतील बरं ! घरी ठेवतील की वनात ये असे म्हणतील?।।५।। बंधु घर, देह इत्यादिकांशी काडीमोड करून हात जोडून उभा आहे असे रामचंद्रांनी पाहिले.।।६।। (तेव्हा) नीतिनिपुण आणि शील, स्नेह, सरलता, (आर्जव) व सुख यांचे सागर राम म्हणाले.।।७।। बाळ ! परिणामी आनंद होणार आहे हे मनात समजून प्रेमाने (असा) घाबरा होऊ नकोस.।।८।।

**टीका. : चौ. ५ - (१) रघुनाथ मला काय सांगतील** - जनकनन्दिनीला बरोबर नेत आहेत. ती सहधर्मचारिणी, अर्धांगी असल्याने तिला बरोबर जाण्याचा

हक्क आहे व नेणे कर्तव्यच आहे. पण माझा तसा अधिकार नाही. मी कोणत्या बळावर म्हणू की मला नेलाच पाहिजे? नेणे न नेणे सर्वस्वी प्रभूच्या इच्छेवर आहे. **(क) रघुनाथ** - ते रघुवंशाचे नाथ, स्वामी आहेत. त्यांची आज्ञा मोडता येणार नाही की हट्ट धरता येणार नाही. तेव्हा जाणे न जाणे माझ्या सुकृतावर अवलंबून आहे. **(ख) ठेविति भवनिं** - हा उल्लेख प्रथम करून सुचविले की याचीच जास्त शक्यता दिसते. मुखावर अनुकूलतेचे चिन्ह मुळीच नाही व अयोध्येतील परिस्थितीही त्याच गोष्टीला पोषक आहे.

**चौ. ६ - (१) राम** - हृदयान्तर्यामी असल्याने त्यांनी भावाच्या मनातील भाव सहज जाणला. **(क) तृण तोडणे** = काडीमोड करणे, संबंध तोडणे. हात जोडून उभा आहे हे दास्यभावाचे चिन्ह आहे. उभा असून बोलत नाही यावरून दिसले की सेवक धर्माच्या मर्यादेचे पालन अशा बिकट प्रसंगीही लक्ष्मण करीत आहे. दैन्य व नम्रता यांची साक्षात मूर्तीच दिसत आहेत. देहगेहादिकांशी काडीमोड परम वैराग्य दाखविते. **(ख)** येथे रघुनाथ वगैरे सत्तादर्शक शब्द न वापरता **राम** वापरणे **सहेतुक** आहे. 'जो आनंदसिंधु सुखराशी तोच राम, असल्याने अशा परम विरागी, विनम्र, दीन व सेवकभावापन्न आपल्या भावाला दुःख देणार नाहीत. आनंद व सुखच देतील हे कवि सुचवितात.

**चौ. ७ - (१) नयनागर राम बदले - नय** = राजनीति, नागर = चतुर; निपुण, राजनीतीचे पालन करणे व आनंद देणे या दोन्ही गोष्टी एकाच वेळी करणे या प्रसंगी फार कठीण आहे. तसेच शील संरक्षण करणे व स्नेह राखणे हेही दुष्करच आहे व एवढे करून सुखसागरांतून दुःखाची वाफ न निघू देणे तर अत्यंत दुष्कर आहे. येथे **प्रथम** राम **नयनागर आहेत** व **शेवटी सुखसागर आहेत**. मध्ये शील, स्नेह व सरलता हे गुण आहेत. प्रथम राजनीती पालनाच्या दृष्टीने बोलतील. पण शील, स्नेह व आर्जव (सरलता, ऋजुता) यांचा भंग करणार नाहीत व शेवटी लक्ष्मणास सुखसागरात ठेवतील. 'दासांवरि मम अधिका प्रीती' हे या बाबतीत शीलसागराचे लक्षण आहे. 'कृपानिधाना परि हा बाणा । प्रिय तो ज्यातें गति ना आना' शरणागत रक्षक इत्यादी अनेक गुण येथे शीलांत अंतर्भूत होतात. शील + स्नेह + आर्जव = शीलस्नेहार्जव. या सर्वांचे सागर

राम आहेत. **येथेही शीलालाच प्राधान्य दिले आहे.**

**चौ. ८** - (१) बाळ = तात ! यांत स्नेह आहे. पुढील शब्द नयनागरत्व दर्शक आहेत. कौसल्या, दशरथ व सीता यांनासुद्धा सांगितले आहे की **प्रेमाला - स्नेहाला, वश होऊन शील व कर्तव्य यांचे भान विसरू नका.** कातर = भितरा, भ्याड, लक्ष्मण प्रेमाने अति अधीर झालेच आहेत, म्हणून धीर देण्यासाठी हे सांगितले. क्रोधाला वश होऊन जसे मनुष्य अकार्य करतो तसे प्रेमाला वश होऊनही करतो. क्रोध व प्रेम हे दोन्ही विकार शील, सरलता, कर्तव्यपरायणता इत्यादींपासून मनुष्यास पराङ्मुख करू शकणारे आहेत. मर्यादेच्या पलीकडे गेल्यास हे आंधळे बनतात. **(क) परिणामीं मुद समजुनि हृदई** - परिणामी मुद = आनंद होणार हे मनात समजून. भाव हा की हे दुःख व संकट शेवटी आनंददायक होणार आहे. म्हणून **परिणामाकडे दृष्टी ठेवून आलेली विपत्ती धैर्याने सहन करणे हे वीराचे, पुरुषाचे कर्तव्य आहे.** प्रभूंनी येथे स्पष्टपणे सांगितले आहे की शेवटी आनंद हे फळ मिळणार आहे. फलप्राप्तीसाठी साधनरूपी कष्ट करावे व सोसावेच लागतात. 'आधीं कष्ट मग फळ । कष्टेंवीण तें निर्फळ' (समर्थ)

*हिं.दो.* *। मातु पिता गुरु स्वामि सिख सिर धरि करहिं सुभायँ ॥*
*। लहेउ लाभु तिन्ह जनम कर न तरु जनम जग जायँ ॥७०॥*

*म.दो.* *। माय - बाप - गुरु - धनी वच सहज मान्य करतात ॥*
*॥ जन्मलाभ ते लुटिति जगीं व्यर्थ न तर जगतात ॥७०॥*

**अर्थ :** माता-पिता, गुरु व धनी (स्वामी) यांचे वचन जे सहज मान्य करतात ते (च) जगात जन्माचा लाभ लुटतात नाहीतर (न तर) ते वृथा जगतात. (जन्म व्यर्थ घालवितात)॥७०॥

**टीका.** : (१) माता पिता इत्यादी क्रम येथे उतरता आहे. येथे पुत्रधर्माचे पुन्हा वर्णन आहे. राम वनात जाणार म्हणजे सर्वांचे सुकृत व सुखच वनात जाणार असे रामानुजास मनात वाटले व राम वनात जाणार म्हणून लक्ष्मण दुःखी झाला आहे. म्हणून त्यास सुचवितात की माता कैकयी, पिता दशरथ व राजा दशरथ (स्वामी, धनी) यांची आज्ञा व वचन पालन करणे हे माझे कर्तव्य आहे. यामुळे माझ्या जन्माचा मला उत्तम लाभ मिळून जन्म सुफल होणार आहे.

**'करतलिं चारी पदार्थ त्यातें । तातम्बा प्राणप्रिय ज्यातें ॥ जन्मसुफलता आज्ञापालन । करुनि -'** (४६।२-३) असे दशरथांस राम म्हणाले आहेत. तेच येथे सांगत आहेत. **(क) सुभायँ** = सहज, स्वभावतःच, कण्हत-कुथत, नाखुषीने, नाईलाज झाला म्हणून वचन पालन करण्याने मात्र जन्मसुफलता होणार नाही. प्रेमाने मनापासून केले पाहिजे. असे न केल्यास, वचन न मानल्यास, जन्म वृथा दवडल्यासारखे ठरते; म्हणून मी आनंदाने वनात जात आहे. तूही आपल्या जन्माची सुफलता माता, पिता, गुरु, धनी, वचन आनंदाने मानून करून घे. कशी मानावयाची ते सांगतो.

*हिं.* *। अस जियँ जानि सुनहु सिख भाई । करहु मातु पितु पद सेवकाई ॥१॥*
*। भवन भरतु रिपुसूदनु नाहीं । राउ बृद्ध मम दुखु मन माहीं ॥२॥*
*। मैं बन जाउँ तुम्हहि लेइ साथा । होइ सबहि बिधि अवध अनाथा ॥३॥*
*। गुरु पितु मातु प्रजा परिवारू । सब कहुँ परइ दुसह दुख भारू ॥४॥*
*। रहहु करहु सब कर परितोषू । नतरु तात होइहि बड़ दोषू ॥५॥*
*। जासु राज प्रिय प्रजा दुखारी । सो नृप अवसि नरक अधिकारी ॥६॥*

*म.* *। जाणुनि बंधु ! वचन ऐकावें । माता - तात पदां सेवावे ॥१॥*
*। भवनि भरत रिपुसूदन नाहीं । राव वृद्ध मम दुःख मना ही ॥२॥*
*। घेउनि गेलो तुम्हांस वनिं जर । होइं अयोध्या अनाथ अति तर ॥३॥*
*। गुरु पितरी परिजन परिवारा । गांजिल दुःसह दुःख पसारा ॥४॥*
*। रहा करा सकलां परितोष हि । ना तर तात घडे बहु दोषहि ॥५॥*
*। जिथें प्रजा प्रिय दुःखी भारी । तो नृप खचित निरय-अधिकारी ॥६॥*

**अर्थ :** बंधू ! हे जाणून माझे म्हणणे ऐकावे व मातापितरांच्या चरणांची सेवा करावी.॥१॥ भरत व शत्रुघ्न घरी नाहीत व राजे वृद्ध झालेले असून त्यांच्या मनात माझे दुःख आहे. (माझ्यासाठी दुःखी आहेत).॥२॥ (अशा स्थितीत) मी जर तुम्हाला वनात घेऊन गेलो तर अयोध्या (सर्व प्रकारे =) अति अनाथ होईल ॥३॥ गुरु, माता, पिता, पुरजन (प्रजा) व परिवार यांना दुःसह दुःखांचा पसारा गांजील. (यांच्यावर पुष्कळ दुःसह दुःखे कोसळतील).॥४॥ (म्हणून घरी) रहा व सर्वांचा परितोष करा. नाहीतर तात ! मोठा दोष घडेल.॥५॥ (कारण,

ज्या राजाच्या राज्यांत =) जिथे प्रिय प्रजा फार दुःखी असते तो राजा अवश्य नरकाचा अधिकारी बनतो.॥६॥

**टीका. चौ. १ - (१) बंधु** ! भाव हा की मी मातापित्यांची आज्ञा पालन करण्यास जात आहे; म्हणून माझे एक महत्त्वाचे कार्य म्हणजे मातापितरांची सेवा माझ्या एका भावानेच नाही करावयाची तर इतर कोणी करावयाची? मला दोन्ही गोष्टी करता येणे शक्य नाही. **'संकटिं करिति सुबंधु सहाया । करचि बारतो अशनी घायां'** (३, ६।८). म्हणून तुम्ही घरी राहून ती सेवा केली पाहिजे. या एका चौपाईत 'बंधु !' शब्दांत स्नेह, कर्तव्यपालन व कर्तव्य जागृती देणे, याने शील, काही लपवालपव न करण्याने आर्जव (सरलता) व मायबापांच्या सेवेने, सुख होईल हे सुचविल्यामुळे सुखसागर आहे. भावाला घरी ठेवण्याने राजनीतीचा भंग न होता तिचे पालन हा मुख्य हेतु साधला जाणे शक्य आहे.

**चौ. २-५ (१)** भरतशत्रुघ्न घरी असते तर तुम्हाला नेले असते व नेणे चुकीचे ठरले नसते. पित्याच्या वृद्धपणी आणि विशेषतः माझ्या वियोगाने ते मूर्च्छित असता आपणा चौघा भावांपैकी एकानेही जवळ नसणे हा मोठा दोष ठरेल. राजा शोकवश मूर्च्छित वा अति दुःखी व दीन झालेले आहेत ही बातमी त्यांच्या शत्रूंस कळली व त्यांनी आक्रमण केले तर अयोध्येचे व प्रजेचे संरक्षण कोणी करावयाचे? पुत्रांनी वृद्धपणी उपयोगी पडावे व आपले संरक्षण करावे अशी माता-पिता यांची अपेक्षा पूर्ण करणे पुत्राचे कर्तव्य नाही काय? वडिलांनी केले ते योग्य का अयोग्य हा विचार पुत्रांनी करावयाचा नसतो. अशा परिस्थितीत वनात येण्याने तुम्ही दोषी ठराल व तुम्हास नेण्याने मी दोषी ठरेन. **(क) गुरु** = गुरुजन, वडील माणसे व विप्रवर्ग यांचे पालन पोषण कोण करणार? ते न केल्याने व सर्व माझ्या विरहाने दुःखी असल्याने धर्मानुष्ठाने कशी चालतील? माता, पिता, प्रजा, परिवार यांचे पालन, पोषण व सांत्वन कोण करील?

**चौ. ६ - (१) प्रजा पालन हा राजाचा मुख्य धर्म आहे**. त्या धर्माचे पालन करण्यास महाराजा दशरथ असमर्थ आहेत. त्यामुळे भरत येईपर्यंत ती जबाबदारी आता तुमची आहे. ती पार न पाडणे महादोष आहे व या दोषाचे फळ नर्कप्राप्ती आहे. म्हणून –

हिं. *। रहहु तात असि नीति बिचारी । सुनत लखनु भए ब्याकुल भारी ॥७॥*
*। सिअरें बचन सूखि गए कैसें । परसत तुहिन तामरसु जैसें ॥८॥*

हिं.दो. *। उतरु न आवत प्रेम बस गहे चरन अकुलाइ ॥*
*॥ नाथ दासु मैं स्वामि तुम्ह तजहु त काह बसाइ ॥७१॥*

म. *। रहा तात या नीति-विचारीं । ऐकत लक्ष्मण विव्हळ भारी ॥७॥*
*। सुकवी शीतल वचन तयांला । तुहिनपात कीं तामरसाला ॥८॥*

म.दो. *। उत्तर ये ना प्रेमवश व्याकुळ धरले पाय ॥*
*॥ नाथ ! दास मी स्वामि तुम्हिं त्यजता काय उपाय ॥७१॥*

**अर्थ :** तात ! (बाबा !) या नीतीच्या विचाराने घरी रहा. हे ऐकता ऐकताच लक्ष्मण भारी व्याकुळ झाले.॥७॥ व ज्याप्रमाणे हिमपाताने कमल (तामरस) सुकून जावे तसे लक्ष्मण त्या शीतल वचनाने (एकाएकी) सुकून गेले.॥८॥ प्रेमवश झाल्याने उत्तर (तोंडातून बाहेर) येत नाही व व्याकुळ होऊन पाय धरले (व) म्हणाले की नाथ ! आपण स्वामी आहात व मी दास आहे. त्याग करता? (मग) काय उपाय (मला करता येणार !) ॥दो.७१॥

**टीका. चौ. ७-८ (१) या नीति विचारीं** - मागील चौपायांत मुख्यतः जो नीतीचा विचार सांगितला तो ध्यानात घेऊन, त्याचा विचार करून. पण विचार करणारे मन 'रहा' हा शब्द ऐकताच भारी व्याकुळ झाले. रामवनवासाची बातमी कळतांच 'उठुनि विकल मुख उदास धावति' असे झाले होते. आता भारी व्याकुळ झाले यांत नवल नाही. **(क) शीतल वचन तयाला सुकवी** - शीतल वचनाने सुकून जाणारी ही तिसरी व्यक्ति आहे. तीन्हि ठिकाणी दृष्टान्त निरनिराळे आहेत. 'यवासिं वर्षाजल (५४।२) कौसल्येविषयी; शरच्चंद्र रजनी कोकीला' (६४।२) सीतेविषयी व येथे 'तुहिनपात तामरसाला' लक्ष्मणाविषयी. या दृष्टांतांची तुलना करता सुकण्याचा चढता क्रम कोकी, यवासा व तामरस म्हणजे सीता, कौसल्या व लक्ष्मण असा लागतो. कोकीला एक रात्र गेली की पुन्हा आनंद, उत्साह, टवटवी येते. यवासाला पालवी फुटण्यास पावसाळ्याचे चार महिने जावे लागतात. पण हिम पडून सुकून जाणारे तामरस = कमल पुन्हा टवटवीत होईलच असे सांगता येत नाही. म्हणूनच कौसल्या व लक्ष्मण या दोघांनाच हृदयाशी धरून

प्रभूंनी आपल्या अमृतमय स्पर्शाने टवटवी आणली आहे. सीतेने रामास मिठी मारल्याचे वर्णन वा. रामायणात आहे. पण तो संवाद कौसल्येसमोर झालेला नाही. म्हणून मानसांत ते गृहीत धरता येत नाही. किती व्याकुळ झाले पहा.

**दो. (१) उत्तर ये ना प्रेमवश व्याकुळ** - उत्तर देण्याची इच्छा आहे पण बोलण्याची शक्ति नाही. इतके व्याकुळ झाले आहेत. (७०।२-३ टी. पहा) उत्तर पाय धरण्यानेच सुचविले आहे. भाव हा की मला आपल्या पायांशिवाय दुसरा आधार व नातीच नाहीत. मग राजनीतीचा मला काय उपयोग ! सगळ्यांशी मनाने काडीमोड करूनच आले आहेत. (क) **'नाथ दास मी स्वामि तुम्हि त्यजता?** (मग) काय उपाय ! या एका ओळीत एकनिष्ठ सेवकाचा धर्म सार रूपाने सांगितला आहे. भारी व्याकुळ झाले असल्याने यांतील शब्द उसासे टाकीतच उच्चारलेले असणार. नाथ ! दास मी ! स्वामी ! तुम्हि त्यजता ! काय उपाय !!! प्रत्येक वेळी उसासा टाकीत व शेवटी दीर्घ उसासा टाकून हे शब्द थबकत थबकत उच्चारावे म्हणजे भारी व्याकुळतेची काही कल्पना येईल व ऐकणाऱ्या स्वामीच्या हृदयाला कसा पीळ पडला असेल याचीही थोडी कल्पना येईल. ५।१८।३ व ५।२७।१ (प्रथम चरण) तुलना करून पहावी. (ख) त्यजता काय? यांतून भाव निघतो की त्यजू शकता काय? आणि त्याग केल्यावर मग उपाय काय (करणार) ! उपायांचा उपयोग काय होणार? त्याग केल्यावर प्राण या देहांत राहतील असे वाटते काय? लक्ष्मण आता सांगतील की आपण केलेला उपदेश माझ्या उपयोगाचा नाही.

***हिं.*** ***। दीन्हि मोहि सिख नीकि गोसाईं । लागि अगम अपनी कदराई ॥१॥***
***। नरबर धीर परम धुर धारी । निगम नीति कहुँ ते अधिकारी ॥२॥***
***। मैं सिसु प्रभु सनेहँ प्रतिपाला । मंदरु मेरु कि लेहिं मराला ॥३॥***

***म.*** ***। मज गोस्वामि ! दिली शुभ शिकवण । कातरतें मम गमे कठिण पण ॥१॥***
***। नरवर धीर धर्मधुर-धारी । निगम-नीतिचे ते अधिकारी ॥२॥***
***। प्रभुस्नेहिं शिशु मी प्रतिपालित । मंदर मेरु किं मराल उचलित ॥३॥***

**अर्थ :** गोस्वामी (हृषीकेश, इंद्रियांचे स्वामी) आपण मला चांगलीच शिकवण दिलीत; पण माझ्या भित्रेपणामुळे (कातरते) मला ती कठीण (अगम्य, दुष्कर)

वाटते.॥१॥ जे कोणी धर्माची धुरी धारण करणारे धैर्यवान नरश्रेष्ठ असतील तेच वेद व नीती यांचे अधिकारी होत.॥२॥ मी (तर) शिशु आहे व प्रभूच्या स्नेहाने माझे प्रतिपालन केले आहे. हंस कधी मंदर वा मेरु पर्वत उचलणार का? (उचलू शकतील का?)॥३॥.

**टीका. चौ. १ - (१) मज शुभ शिकवण दिली -** प्रभूनी जे सांगितले ते अयोग्य, वाईट, अप्रिय आहे असे मला वाटत नाही; पण मी स्वतःच कातर (भित्रा) असल्यामुळे मला त्याचे पालन करण्याची शक्तीच नाही. त्याला मी तरी काय करणार ! दोष माझा आहे; पण तो स्वाभाविक आहे. लहान मुले स्वभावतःच भित्री असतात. वाघाचे कातडे पाहिले तरी भितात. मग वाघाच्या पाठीवर स्वार होणे त्यांना कसे शक्य होईल? ते काम धीरवीरांचे आहे.

**चौ. २ (१) धर्मधुर =** धर्माची धुरा. धर्मपालनाची, धर्म संरक्षणाची जबाबदारी लहान बालकाला काय माहीत? ती जबाबदारी जे कोणी धैर्यशील नरश्रेष्ठ असतील तेच घेऊ शकतात. मातेला जरा वेळ पाहिली नाही. ती दिसली नाही म्हणजे गुदमरेपर्यंत रडणे व आई आई असे ओरडणे याशिवाय बालक काय करू शकणार? **(क) निगम =** वेद = वेदधर्म. मातापितासेवा पुत्रांनी केली पाहिजे; वडील भावाला पित्यासमान मानून आज्ञा पालन केली पाहिजे इत्यादी निगम-धर्म आहे हे मान्य. वडिलांच्या वृद्धपणी ते असमर्थ असता प्रजेचे पालनादी केले पाहिजे ही नीती असेल, नाही कसे म्हणवेल? पण या धर्माच्या व नीतीच्या पालनाचा अधिकार धैर्यवंत, धर्मधुरंधर नरश्रेष्ठांचा आहे. बालकाला निगम म्हणजे काय आणि नीती कशाशी खातात हे सुद्धा माहीत नसते. हिरा व गारगोटी त्यांना सारखीच वाटतात ! **(ख) या दोन चौपायांत ध्वनि हा आहे की** आपण निगम व नीति यांचे पालन करण्यास पूर्ण समर्थ आहात म्हणून आपण मला आपल्या दृष्टीने योग्य असाच उपदेश केलात; पण ते करण्यास मी अगदी अपात्र आहे. अपात्रतेचे कारण पुढील चौपाईत सांगतात व दृष्टान्ताने सुचवितात की ते करू लागल्यास माझा आणि निगम नीतींचा ही विनाश, अधःपात व्हावयाचा !

**चौ. ३ - (१) प्रभूस्नेहिं शिशु मी प्रतिपालित -** मी प्रभुस्नेहिं प्रतिपालित

(प्रभूचा) शिशु आहे. शिशूला धर्म ना नीति. शिशूला स्वतःच्या देहाची काळजी घेता येत नाही ! तो माता व पिता यांची सेवा कशी करणार? शिशूचे पालन पोषण इ. सर्व जबाबदारी जननीवर असते. तिच्या स्नेहानेच शिशु जगतो व वाढतो. त्याला स्वतःचे पालन करता येत नाही, मग तो प्रजापालन कसे करणार ! स्नेह हा पवित्र रस आहे. 'स्त्रवे प्रेमरस पयोदिं शोभन'. प्रभूच माझी जननी आहे. आईशिवाय इतर नाते शिशूला माहीत नसते व त्याची कोठे ममताही नसते. लक्ष्मणाने इतर सर्व ममतेशी काडीमोड केली आहे. (क) **मंदर मेरु किं मराल उचलित** - मंदर = निगम व मेरु = नीति. पहिल्या चरणांतील 'शिशु'च्या साहचर्याने मराल = बाल मराल असा अर्थ होतो. 'बाल मराल किं मंदर घेई' मंदर किंवा मेरु पर्वत बालमरालास स्वतः घेता येत नाही. कोणी त्याच्या डोक्यावर ठेवण्याचा प्रयत्न केला की तो बाळहंस तर ठार मरणारच आणि तो पर्वत खाली पडणारच. सार हे सुचवितात की निगम धर्म व नीति यांचा भार माझ्या शिरावर दिल्यास माझा विनाश व धर्मनीतींचा अधःपात होईल. रामलक्ष्मणांना बालहंस म्हटलेच आहे. **'हे उभ सुत दशरथ रायांचे । अति कलयुगल बाल हंसांचे'** (१।२२१।३) पण राम गोस्वामी. इंद्रियांचे ईश व प्रभु = सर्व समर्थ असल्यामुळे त्यांनी धर्म व नीतिरूपी मंदरमेरु पर्वत सहज उचलले आहेत.

(२) **मंदर** पर्वताची रवी (मंथनदंड) करून क्षीरसागराचे मंथन करून अमृत काढले गेले. तसेच कार्याकार्यादि निश्चय करण्यात विचाररूपी मंथन ज्याने करावयाचे ते साधन निगम = वेद नाहीत काय? (७।११७।१५ पहा) म्हणून मंदर = निगम = वेद व त्याने काढलेले अमृत म्हणजे धर्म होय. धर्मानेच अमृत = मोक्ष मिळू शकतो. मेरु = नीति, तिचे प्रतिपालन करण्यास धैर्याचा महामेरु शिरावर घ्यावाच लागतो. **नरवर धीर असेल तरच धर्मधुरधारी होता येते. किती संयुक्तिक सहेतुक दृष्टान्त ! व किती सुंदर समन्वय !**

***हिं.*** *। गुर पितु मातु न जानउँ काहू । कहउँ सुभाउ नाथ पतिआहू ॥४॥*
*। जहँ लगी जगत सनेह सगाई । प्रीति प्रतीति निगम निजु गाई ॥५॥*
*। मोरें सबइ एक तुम्ह स्वामी । दीनबंधु उर अंतरजामी ॥६॥*

***म.*** *। गुरु पितु माय न कुणि मज ठावे । नाथ ! विश्वसा वदें स्वभावें ॥४॥*

*। जगिं जितकीं स्नेहादिक नातीं । प्रीती प्रचिती श्रुति निज गाती ॥५॥*

*। सर्व एक तुम्हिं मजला स्वामी । दीनबंधु ह्रदयांतर्यामी ॥६॥*

**अर्थ :** मला गुरु, पिता, माता इ. कोणी ठाऊक नाही; नाथ ! हे मी स्वभावतःच सांगत आहे. आपण विश्वास ठेवावा.॥४॥ जगात जितकी स्नेह आदि करून नाती, प्रीती, प्रतिति इत्यादी आपले (तुमचे) वेद वर्णितात.॥५॥ ती सर्व मला स्वामी ! दीनबंधु व ह्रदयांतर्यामी ! तुम्ही एकच आहात.॥६॥

**टीका. चौ. ४ - (१) गुरु पिता माता** प्रजा परिवार या सर्वांचा परितोष कर असे जे (७१।४-५) सांगितले त्यावर हे उत्तर आहे की गुरु, पिता, माता इत्यादी कोणालाच मी जाणत नाही. कारण मी आपला शिशु आहे आणि म्हणून मला आपल्या शिवाय गुरु, पिता, माता इ. कोणी नाही. **(क) वदें स्वभावें -** हे मी पुस्तकी ज्ञान किंवा कोणी पढविलेले सांगत नसून माझ्या मनाला सहजच असे वाटते. **'जाणुनि निजहित - पति आशिशुपण । रामचरणरत झाले लक्ष्मण'** (१) (१९८।३) असे सहजासहजी वाटणे अपवादात्मक असल्याने म्हटले की विश्वसा = विश्वास ठेवा.

**चौ. ५-६ (१) स्नेह,** संबंध, नाते, गोत्र, कुल इत्यादी जितके काही प्रकार वेदशास्त्रादिकांनी वर्णिले आहेत ते सर्व मला आपल्या ठिकाणीच आहेत. **'त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ॥ त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव त्वमेव सर्वं मम देव देव'** असे आम्ही पुष्कळ लोक रोज देवाला सांगतो पण आमचा स्वतःचाच असा विश्वास नसतो, मग अशा म्हणण्यावर कोण विश्वास ठेवील? परंतु लक्ष्मणाचे असे नाही. **(क) श्रुति निज =** निगम निज; आपल्या श्वासापासून निघालेले वेद. **(ख) दीनबंधु -** मी दीन, साधनहीन आहे हे सुचविले. **(ग) ह्रदयांतर्यामी -** आपण माझ्या ह्रदयांतच राहता व मी म्हटले ते खरे का खोटे हे जाणतां **ल.ठे.** - करुणामय ह्रदयांतर्यामी (६६।८) व 'दीनबंधु' (६६) असे सीतेने म्हटल्यावरच प्रभूंना दया आली आहे. लक्ष्मणसुद्धा आता 'कृपासिंधु'त्व जागृत करीत आहेत :

*हिं. । धरम नीति उपदेसिअ ताही । कीरति भूति सुगति प्रिय जाही ॥७॥*

*। मन क्रम बचन चरन रत होई । कृपासिंधु परिहरिअ कि सोई ॥८॥*

हिं.दो. *। करुनासिंधु सुबंधु के सुनि मृदु बचन बिनीत ॥*
*॥ समुझाए उर लाइ प्रभु जानि सनेहँ सभीत ॥७२॥*

म. *। धर्म नीति शिकविणें तयाला । कीर्ति भूति सुगती प्रिय ज्याला ॥७॥*
*। मन तन वचनें पदिं रत झाला । कृपासिंधु कीं त्यजणें त्याला ॥८॥*

म.दो. *। करुणासिंधु सुबंधु-वच परिसुनि मृदुल विनीत ॥*
*॥ प्रभु समजाविति धरुनि हृदिं बघुनी स्नेह-सुभीत ॥७२॥*

**अर्थ** : ज्याला कीर्ति, ऐश्वर्य (भूति) व सद्गति (मोक्ष इ.) प्रिय वाटत असेल त्याला धर्माचा व नीतीचा उपदेश करणे (उपयुक्त, जरूर आहे).॥७॥ जो मनाने, वाणीने व देहाने आपल्या पदी रत झाला असेल त्याला का कृपासिंधु ! त्यागावा ! ॥८॥ सुबंधूचे कोमल व विनम्र वचन ऐकून व तो स्नेहाने फार घाबरला आहे असे जाणून (पाहून) करुणासिंधु प्रभूंनी त्याला हृदयाशी धरून (त्याची) समजूत घातली.॥दो.७२॥

**टीका. चौ. ७ - (१) 'निगम नीतिचे ते अधिकारी'** (चौ.२) असे जे म्हटले त्याचाच उपसंहार येथे **'धर्म नीति शिकविणें तयाला'** याने केला व निगम = धर्म हे सुचविले. धर्माचे फल कीर्ति, ऐश्वर्य (भूति) व सद्गति यांची प्राप्ति हे आहे. 'गुरुपितृमातास्वामिनिदेश चि । सकलधर्मधरणीधर शेष चि । **सिद्धिद एक साधका सर्वहि । कीर्ती सुगति भूतिमय वेणिहि'** (३०६।२,४) अशा या धर्माचे व नीतीचे पालन करण्याचा जो उपदेश लक्ष्मणास केला गेला त्यावर हे उत्तर उपसंहार रूपाने आहे. भाव हा की मला कीर्ति नको, आणि अष्टमहासिद्धिरुपी भूति म्हणजे ऐश्वर्य नको किंवा मोक्षरूपी सद्गति सुद्धा नको. म्हणून हा उपदेश माझ्या उपयोगी नाही.

(२) **विरतिस धर्म योग दे ज्ञाना । ज्ञान मोक्ष दे -'** (३।१६।१) धर्माने वैराग्य, वैराग्याने योग व योगाने अष्टमहासिद्धिरुपी भूति = ऐश्वर्य सुद्धा मिळू शकते. म्हणजेच धर्माने भूतिलाभ होतो. योगाने ज्ञान मिळते व ज्ञानाने मोक्ष मिळतो - सुगति मिळते. पण या सुबंधूला भूति = सकलसिद्धी व मोक्षसुद्धा नको आहे. **'म्हणति तात तो परम विरागी । तृणसम सिद्धी त्रिगुणां त्यागी'** (३।१५।८) याने ठरले की **लक्ष्मण परमविरागी आहेत.** देहगेहादिकांशी काडीमोड

करून आल्याचे प्रभूंनी प्रारंभीच जाणले आहे. म्हणजेच **'अर्थ न धर्म न कामरुचि नको गतिहि निर्वाण'** असे लक्ष्मण आजच आहेत. भरताने हेच सांगून प्रयागराजाजवळ 'जन्म जन्म रति राम पदिं ।' हे वरदान मागितले आहे. यावरून दिसेल की **भरत व लक्ष्मण यांचे वैराग्य अगदी सारखे आहे. लक्ष्मणाच्या ठिकाणी रामपदरति आधीच परिपूर्ण आहे म्हणून ते कोणाजवळ मागत नाहीत व भरत रामपदरति मागत आहेत.**

**चौ. ८ - (१) मन तन वचनें पदिं रत झाला** - ३।९६ मध्ये याचा उलट क्रम 'वचन कर्म मन' असा आहे. लक्ष्मणाच्या ठिकाणी सहज क्रम मन तन (कर्म) वचन असा आहे. उदा. रामवियोग - समाचार ऐकताच, लक्ष्मण मनाने रामचरणरत होते म्हणून प्रथम मनाने व्याकुळ झाले; नंतर मुख उदास होणे, धावत येणे, पाय धरणे, हात जोडणे, मुखाकडे बघत राहणे हे कर्माने-शरीराने, रामचरणरत होणे दिसले आणि नंतर शेवटी वाणीने बोलून दाखविले की माझे सर्वस्व एक तुम्हीच आहात इत्यादी. हा स्वाभाविक सहज प्रेमाचा क्रम आहे; म्हणून म्हटले की 'वदें स्वभावें' **'आशिशुपण रामचरणरत झाले लक्ष्मण'** (१।१९८।३१) अगदी रांगणारे शिशु होते तेव्हाच लक्ष्मण रामचरणरत झाले. भरत तेव्हा रत नव्हते. लक्ष्मण त्या वेळी मुख्यतः मनाने व क्वचित क्रियेनेच रत असणार ! भगवत्प्रेमाच्या बाबतीत सर्व जीवांची अशी स्वाभाविक स्थिती नसते. त्यांचा क्रम उलटा 'वचन कर्म मन' असा असतो. मनाने रामचरण रत होणे तेथे शेवटी घडते. **(क) कृपासिंधु कीं त्यजणें त्याला** - अशाचा त्याग करणे कृपासिंधूला शोभेल काय? हा वाच्यार्थ आहे. गूढार्थ हा की कृपासिंधु असल्यामुळे प्रभु त्याग करू शकणारच नाहीत. **'तात निरंतर वश मी त्याला'** (३।१६।१२ टी.प.)

**दो. (१) करुणासिंधु** - याने सुचविले की लक्ष्मणावर कृपा करणार. **(क) सुबंधु** = उत्तम बंधु. बध्नाति इति बंधुः (अ.व्या.सु.) जो स्नेहरूपी बंधन घालतो तो बंधुः येथे लक्ष्मणाने स्नेहरूपी बंधनाने प्रभूंना उत्तम प्रकारे बांधून टाकले. बंधु शब्दाची यथार्थता दाखविली. 'उत्सवे व्यसने चैव दुर्भिक्षे शत्रुविग्रहे । राजद्वारे स्मशानेच यस्तिष्ठति स बांधवः' बांधव = बंधु. बान्धवो बन्धु मित्रयोः (हैमः)

**(ख) मृदुल विनीत बच** - अति मृदु व विशेषनम्र भाषण. दैन्य, निराशा, दास्यभाव, असहायता इत्यादींनी व स्नेहामुळे लक्ष्मणाचा प्रत्येक शब्द फार कोमल पण हृदयस्पर्शी आहे. हट्ट, आततायीपणा, क्रोध इ. विकारांचा स्पर्श नाही इतकी विनम्रता आहे. (ग) **बधुनी स्नेहसुभीत हृदिं धरिति** - भक्तवात्सल्याला भरती आली. स्नेहाने अति घाबरा झाला आहे व या वेळी जर कृपा केली नाही तर याचे प्राण निघून जातील हे जाणून हृदयाशी धरला. जे शब्दांनी सांगावयाचे ते हृदयस्पर्शाने जणू हृदयांतच घातले व आपल्या अमृतमय स्पर्शाने, सुकून गेलेल्या तामरसाला टवटवीत, प्रफुल्ल केले. त्या आलिंगनात शब्द उच्चारण्याची शक्ती भगवंतास तरी कशी राहणार? म्हणून मध्ये हा दोहा कवीचे वचन म्हणजे पडद्यामागून सूत्रधार बोलत आहे. पडद्यापुढे राम लक्ष्मणास भेटत आहेत. आपले अमूल्य धन जणू हृदयात लपवून ठेवीत आहेत. ५।४८।४-७ पहा.

(२) **प्रभु समजाविति** - 'प्रभु सर्वज्ञ तज्ञ' आहेत. ते पुढील सर्व भविष्य जाणतात. लक्ष्मण सुभीत अनन्य शरणागत आहे व राम प्रभु-भगवान आहेत. सांगितले की बाळा घाबरू नकोस. चल बरं वनात. करुणारसाच्या अशा हृदयद्रावक प्रसंगी आणखी जास्त सांगणे शक्य व आवश्यकही नाही. (क) वा. रा. लक्ष्मण व येथील लक्ष्मण यांची या वनगमनप्रसंगांतील वागणुकीच्या दृष्टीने थोडक्यात तुलना करावयाची तर म्हणता येईल की मानसांतील लक्ष्मण अगदी गरीबगाय आहे व वा.रा.लक्ष्मण पिसाळलेला, चवताळलेला वाघ आहे; म्हणून तेथे केलेला उपदेश येथे अगदी अप्रासंगिक, म्हणून अग्राह्य.

***हिं.*** *। मागहु बिदा मातु सन जाई । आवहु बेगि चलहु बन भाई ॥१॥*
*। मुदित भए सुनि रघुबर बानी । भयउ लाभ बड़ गइ बड़ि हानी ॥२॥*

***म.*** *। घ्यावा जननी-निरोप जाउनि । चला बंधु ! वनिं वेगें येउनि ॥१॥*
*। मुदित परिसुनी रघुवर - वाणी । झाला लाभ महा गत हानी ॥२॥*

**अर्थ :** बंधु ! आता जाऊन आईचा निरोप घ्यावा व त्वरेने येऊन वनांत चलावे.॥१॥ रघुवराची वाणी ऐकून (लक्ष्मणांस) आनंद झाला. (कारण) महाहानि टळली व महालाभ झाला (असे वाटले).॥२॥

**टीका. चौ. १ - (१) बंधु** = सुबंधु. - भाव हा की लक्ष्मणा ! तू जे केलेस

तेच 'बंधु' नावाला शोभणारे आहे. **'संकटिं करिति सुबंधु सहाया । करें चि वारिति अशनीघायां** ॥ (३०६।८) बाबा ! तू माझा उजवा हात आहेस. तुला टाकून मला कसे जाववेल ! तुझ्याशिवाय मी उजव्या हाताने थोटा काय करू शकणार? गीतावलीत लक्ष्मणमूर्छाप्रसंगी राम म्हणतात - **'मेरो सब पुरुषारथ थाको ॥ बिपति बँटावन बंधु बाह बिनु करौं भरोसो काको** ॥६।७।१॥ **'पुरुषार्थचि माझा सब थकला ॥ विपद-वाटणीदार बंधु-भुज विना भरवंसा कुठला** ॥ (अनुवाद). **(क) जाऊन निरोप** (आज्ञा) **घेऊन ये.** असे सांगितले. 'जर आज्ञा मिळाली तर वनांत चला' असे म्हणाले नाहीत. यावरून ठरले की सुमित्रा आज्ञा देईल अशी रघुनाथाची खात्री आहे. **(ख) 'जाउनि** (हिं. जाई) याने सुचविले की राम सुमित्रेकडे गेले नाहीत. वेगें येउनि - यानी सुचविले की तू येईपर्यंत मी येथे आहे. तू आपल्या आईची आज्ञा घेऊन आलास म्हणजे आपण बरोबरच जाऊ बरं ! इतके बजावून स्पष्ट सांगितले तरी आई आज्ञा देईल की नाही ही भीती वाटलीच आणि आईकडून निघताना 'साशंक मनिं' झाले आहेतच लक्ष्मण !

**चौ. २ (१) मुदित** - मनासारखे झाले म्हणजे आनंद होतोच. लाभ होणे व होणारी हानि टळणे म्हणजेच मनासारखे होणे. हरिभक्ताच्या दृष्टीने महालाभ कोणता व महाहानि कोणती हे येथे दाखविले. रामसंगतीचा व सेवेचा लाभ हा महालाभ होय. हेच महद्भाग्य. रामसंगतीचा व रामसेवा न घडता प्रापंचिकांची सेवा व व्यावहारिक प्रवृत्ति यांत राबणे ही महाहानि होय. मातृपितृसेवात्याग हा अधर्म आहे, हानि आहे. पण रामसेवा हा परम धर्म आहे व त्याचा त्याग परम हानि आहे. येथे 'देव जोडे तरि करावा अधर्म' या संतोक्तीचे आदर्श उदाहरण आहे. विषयी लोक ज्याला लाभ म्हणतात त्याला हरिपदानुरागी हानि समजतात. विषयीजनांना जी हानी वाटते तो रामचरणरतांनां लाभ वाटतो, अशी उलटी रीत आहे. 'या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी । यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः' (भ.गी.) हे येथे अक्षरशः घडले.

***श्रीरामलक्ष्मण-संवाद प्रकरण समाप्त.***



## श्रीलक्ष्मण - सुमित्रा भेट (७३।३-७५)

मागील प्रकरणांत 'बालकसुत सम दास अमानी' याचा परमोत्कृष्ट आदर्श लक्ष्मण चरित्राने दाखविला. परमोच्च आदर्श मातेचे (जीवाच्या) चरित्रचित्रण या प्रकरणात आहे. लक्ष्मणाच्या भक्तीचा प्रभाव कवीच्या बुद्धीवर इतका पडला आहे की प्रथम लक्ष्मणाच्या भावनेचेच चित्र रेखाटले जात आहे. या प्रकरणाला संवाद म्हटले नाही. कारण सुमित्रेच्या भाषणानंतर सुमित्रानंदवर्धन रामानुज काहीच बोलले नाहीत.

*हिं.* ***। हरषित हृदयँ मातु पहिं आए । मनहुँ अंध फिरि लोचन पाए ॥३॥***
***। जाइ जननि पग नायउ माथा । मन रघुनंदन जानकि साथा ॥४॥***

*म.* ***। आले जननिकडे हर्षित-मन । अंध पुन्हा पावे जणुं लोचन ॥३॥***
***। जाउनि नत शिर जननिपदांसी । मन रघुनंदन - जानकिपाशी ॥४॥***

**अर्थ :** जणूं अंधाला पुन्हा डोळे मिळावे त्याप्रमाणे हर्षित मनाने मातेकडे आले.॥३॥ (जवळ) जाऊन आईच्या पायांवर मस्तक ठेऊन नमन केले (खरे, पण) मन रघुनंदन व जानकी यांच्यापाशी आहे.॥४॥

**टीका - चौ. ३ (१) आले हर्षितमन** - येथे हर्ष = उत्साह, हुरूप. वनात जाण्यास सापडणार म्हणून आनंद झाला. मातेकडे जाऊन आज्ञा घेणे हे वनगमनातील प्रारंभीचे कार्य आहे. ते करण्यास जात असता उत्साह, हुरूप, आला की केव्हा एकदा जाईन व आज्ञा घेऊन परत येईन ! घाईघाईने भराभर गेले. किती उत्साह वाटला हा उत्प्रेक्षेचा विषय आहे. (क) **अंध पुन्हां पावे लोचन** - 'पुन्हां पावे' ने सुचविले की काही कारणाने, काही काळ गेलेली दृष्टी पुन्हा परत मिळाली, जन्मांध नव्हते. जन्मांधाला दृष्टी आली तर त्यास तत्काळ हर्ष (उत्साह) येणार नाही. आधी दृष्टी उत्तम असून मधेच जो आंधळा होतो त्याला ते जीवन मृतप्राय वाटते व त्याला एकदम दृष्टी आली म्हणजे तो जसा आनंदित होऊन उत्साहाने मातेकडे जाईल तितक्याच उत्साहाने लक्ष्मण मातेकडे गेले. सुमित्रेच्या महालात पोचले.

(२) **अंध केव्हां झाले?** विषारी समाचार समजला आणि जाऊन वंदन करून

राम मुखाकडे पाहिले तेव्हा जणू एक डोळा गेला; आणि 'घरी रहा' हे शब्द कानी पडताच दुसरा डोळा गेला. **नेत्र म्हणजे रूपदर्शनशक्ती.** राम आपल्याला टाकून जाणार असे वाटताच ती दर्शन शक्ती जणू अर्धी गेली व घरी रहा हे ऐकताच सर्वच शक्ती गेली. कारण रामरूपच लक्ष्मणाच्या अंतर्बाह्यदृष्टीचा विषय होता. हे प्रभूच दूर गेले की पाहण्यासारखे काहीच राहिले नाही. म्हणजे नेत्र निरुपयोगी ठरले; म्हणजेच अंधत्व एकाएकी आले. शिशुपणापासून लक्ष्मणनेत्र रामसंगतीत व रामचरणरत होते.

**चौ. ४ -** (१) मागल्या चौपाईत जननीकडे **आले** असे म्हटले व **येथे** 'जाउनि' म्हटले. जाऊन मातेची आज्ञा घेऊन या हे प्रभूचे भाषण संपतांच कवी सुमित्रेच्या महालात हजर ! नंतर लक्ष्मण तेथे पोचले म्हणून कवींनी म्हटले 'आले जननिकडे'. त्या वाड्यात आले. रामानुजांस झाला आहे परम उत्साह व त्वरा करावयाची आहे. पण माता चटकन दिसली नाही तेव्हा गेले भराभर तिला हुडकीत. कवि मागोमाग होतेच. गेले रामानुज मातेजवळ नी ठेवले पायांवर मस्तक ! पण **(क) मन रघुनंदन जानकिपाशीं -** येणे, नमन करणे इ. क्रिया घडल्या खऱ्या पण त्या केवळ शरीराने घडल्या. मन आईच्या पायांपाशी आले नाही. ते रघुनंदन व जानकी यांच्या पाशीच राहिले. रामलक्ष्मण संवादात राम, रघुनाथ, रघुवर हे शब्द वापरले पण रघुनंदन वापरला नव्हता. रघुवंशांतील लक्ष्मणाला आनंद देणारे ठरले तेव्हा रघुनंदन झाले (लक्ष्मणाला) लक्ष्मणाच्या मनाला इतर कोठे आनंद दिसत नाही म्हणून ते रघुनंदनाला सोडून जाण्यास तयार नाहीत. जानकी = चिदानंदलहरीच. मन तिकडे राहिले. तन इकडे आले व क्रिया करू लागले व जरा वेळाने वाणी थोडेसे बोलेल; म्हणजे मन, तन, वचन हा क्रम कायम आहेच. येथे उपदेश मिळतो की मन सदा रघुनंदनजानकीजवळ ठेवतील त्यांचे शरीर व वाणी प्रारब्धानुसार इतरत्र क्रियाशील झाली असली तरी प्रभु त्यांना आपल्याजवळ घेतात व आनंद देतात. येथे सार हे आहे की मनाने रघुनंदनजानकीचे स्मरण व चिंतन चालू आहे.

**शंका -** रघुनाथाने लक्ष्मणाला वनात न येण्याविषयी जी कारणे सांगितली ती एकदम नष्ट कशी झाली? याचें उत्तर 'ताता मी वश सदा तयानां'

(३।१६।१२) या श्रीरामवचनांत लक्ष्मणालाच अरण्यकांडांत सांगितले आहे. तेथील श्रीरामगीतेत जी भक्तीची लक्षणे सांगितली आहेत त्यांतील 'मन तन वचनिं भजन दृढ नेमां' (३।१६।९) पासून दो. १६ पर्यंतची सर्व लक्षणे या संवादांत लक्ष्मणाचे ठायी दिसतात.

| | |
|---|---|
| १. तन मन वचनिं भजन दृढ नेमां | मन तन वचनें पदि रत झाला. |
| २. माय बाप गुरु बंधु देव पति । सकल मला जाणुनि दृढ सेवति । | गुरु पितृ माय न कुणि मज ठावे ॥ सर्व एक तुम्हिं मजला स्वामी ॥ |
| ३. मम गुण गातां तनू पुलकते । गद्गद गिरा नयनजल गळतें । | मुख उदास । तनु सकंप पुलकित जल नयनीं ॥ |
| ४. काम आदि मद दंभ न ज्याला | उभा, देह - घर - काडी मोडुनि - |

लक्ष्मणाच्या ठिकाणी 'काम आदि मद दंभ' कसे नाहीत ते पाहू - (क) वनात जाण्याची परवानगी मिळतांच महालाभ झाला असे वाटले व अयोध्येचे अनुपम ऐश्वर्य महाहानि वाटली. यांत निर्लोभता सिद्ध झाली. **(ख)** 'रहा करा सकलां परितोष' असे अगदी मनाविरुद्ध सांगितले असता **जराही क्रोध आला नाही.** उलट प्रेमविव्हळ होऊन पाय धरले यांत **मदादिकांचा अभाव दिसला.** अति कोमल विनीत वचन बोलले हे मदाच्या अभावाचेच लक्षण आहे. **(ग) अकामता** तर इतकी की वनात (१४ वर्षे) जात असता उर्मिलेला भेटण्यास सुद्धा गेले नाहीत. **(घ)** जे मनात होते ते अत्यंत विनयाने व दीन बनून बोलून दाखविले यात **दंभाचा अभाव** दिसला. **(ङ)** जगातील कोणत्याही गोष्टीबद्दल ममता नाही हे **निर्मोह दशेचे लक्षण आहे.** अणिमादि महासिद्धी व मोक्ष अथवा कीर्तीचीसुद्धा इच्छा नाही, हे गुणातीताचे लक्षण आहे.

**ल.ठे.** - लक्ष्मणासारखा अन्तर्बाह्य त्यागी महापुरुष रघुवंशातील पुरुषांत कोणी झाला नाही. **'रमाविलास राम-अनुरागी । त्यजिति वमन सम जन बहुभागी'** हे वचन मानसांतील लक्ष्मणचरित्रांत जितके यथार्थ झाले तितके इतर कोणत्याही चरित्रांत झालेले नाही. **राम व भरत यांनी केलेला त्यागसुद्धा लक्ष्मणाच्या त्यागाची बरोबरी करू शकत नाही.** म्हणूनच 'दक्षिणे लक्ष्मणो यस्य' पूज्य झाले. **लक्ष्मणापेक्षा**

**मोठा त्याग उर्मिलेचा !** (क) मानसांतील लक्ष्मणासारखे पूर्ण निर्दोष बालकभक्त व सुबंधुचरित्र अन्यत्र दिसत नाही. राम लक्ष्मणाशी सदा बंधुभावाने वागत असले तरी लक्ष्मण आपणांस रामसेवकच मानतात हे ठायी ठायी दिसते. '**सेवामूर्ति लक्ष्मण**' चरित्र प्रस्तावनेत पहावे.

**हिं.** ***। पूँछे मातु मलिन मन देखी । लखन कही सब कथा बिसेषी ॥५॥***
***। गई सहमि सुनि बचन कठोरा । मृगी देखि दव जनु चहु ओरा ॥६॥***
***। लखन लखेउ भा अनरथ आजू । एहिं सनेह बस करब अकाजू ॥७॥***
***। मागत बिदा सभय सकुचाहीं । जाइ संग बिधि कहिहि कि नाहीं ॥८॥***

**म.** ***। माता, बघुनि उदास, विचारी । लक्ष्मण कथा निवेदिति सारी ॥५॥***
***। घाबरली वच कठोर परिसुनि । मृगी जणूं दव चहुदिशिं निरखुनि ॥६॥***
***। लक्ष्मण लक्षिति घडे अनर्थ हि । स्नेहविवश ही अकार्य करिल हि ॥७॥***
***। आज्ञा घेण्या सभय धजति ना । जा वनिं सवें म्हणे किं म्हणे 'ना' ॥८॥***

**अर्थ :** (लक्ष्मणांस) उदास - (म्लान-मलिन) पाहून मातेने (कारण) विचारले. तेव्हा लक्ष्मणांनी सर्व हकीगत सांगितली.॥५॥ ते कठोर वचन ऐकून सुमित्रा अशी घाबरली की जणू चारी बाजूस वणवा लागलेला पाहून जशी मृगीच.॥६॥ लक्ष्मणाला वाटले की अनर्थच घडला ! (कारण) ही स्नेहाला वश होऊन अकार्य च करणार ! ॥७॥ (यामुळे) आज्ञा मागण्यास धीर होत नाही (कारण की) रघुनाथाबरोबर वनात जा असे म्हणेल की नको जाऊ असे म्हणेल अशी धास्ती वाटत आहे.॥८॥

**टीका. ल.ठे.** - रामवनवासाची बातमी सुमित्रेला अजून कळलेली नाही आणि तो विषारी समाचार सुमित्रेला कळलेला नाही हे लक्ष्मणास माहीत नाही. यामुळे दोघांचाही गैरसमज झालेला आहे हे लक्षात ठेऊन पुढील भाग वाचावा म्हणजे कुतर्क करण्याची इच्छा होणार नाही.

**चौ. ५ - (१) बघुनि उदास, माता विचारी - (क) शंका** - हर्षित मनाने मातेकडे आले (चौ.३) असे म्हटले **मग लक्ष्मण उदास का?** सुमित्रेच्या वाड्यात पोचेपर्यंत हर्ष टिकला. पण आज्ञा मागण्यासाठी मातेला शोधीत जाताना शंकासुर दिसला की आज्ञा देईल की नाही कोणास ठाऊक? इतके कारण म्लान मुख,

उदास मुख होण्यास भरपूर आहे. (ख) रामवनवासाचा दुर्गंधसुद्धा सुमित्रेला न मिळाल्याने रामराज्यारोहणाचा परमानंदाचा आजचा दिवस असून लक्ष्मण उदास ? हे आहे तरी काय? असे तिला सहज वाटले व विचारले की बाळा ! आज उदास कां दिसतोस, काय झाले? तेव्हा लक्ष्मणाने रामवनवासाची अथपासून इतिपर्यंत सर्व हकीगत सांगितली. पण मी प्रभु बरोबर वनात जाण्यापूर्वी निरोप घेण्यास आलो आहे हे सांगितले नाही.

**चौ. ६ - (१) घबिरली बच कठोर परिसुनि** - रामवनवासाची हकीगत व कैकयीची कुटिल करणी मृदु, शीतल शब्दांत सांगणे रामदास्य निरत लक्ष्मणाच्या स्वभावाला शक्यच नव्हते. कौसल्या व सीता यांनासुद्धा ते रामचंद्रांचे कोमल शीतल भाषण कठोर बाणांसारिखे वाटलेच, लक्ष्मणाने कडक शब्दांत सांगितल्याने कैकयी करणीची कठोरता अधिक वाढणारच. (क) **मृगी दव निरखुनि** - चार बाजूंस चार गोष्टी तिला दिसू लागल्या. जानकी घरी राहणार नाही, भरत राज्य स्वीकारणार नाही. '[illegible] कि जगति विण राम' आणि त्याचा परिणाम स्वतःला वैधव्य ! अशी चारी बाजूंनी आग लागलेली दिसली. सीताराम वनात जाणे, 'नृप किं जगति विण राम' आणि वैधव्य घोर परिणाम, या तीन गोष्टी अत्यंत दाहक वाटल्या. (ख) सुमित्रेच्या या घाबरून जाण्याचा अर्थ लक्ष्मणाने जाणला की मी रामाबरोबर वनात जाईन असे वाटून ती घाबरली.

**चौ. ७-८ (१) लखन [illegible] भइ अनरथहि** - भा = झाला, घडला, घडे. लक्ष्मणाला वाटले की मोठा घात झाला व (हि). प्रभूंनी कृपा करून अनुज्ञा दिली [illegible]हानि टळली असे वाटले न वाटले तोच महा अनर्थ ! अकार्य करील [illegible] वनात जाऊ नकोस असे सांगेल, असे वाटले. (क) लक्ष्मण जरी स्नेहसभय व साशंक असले तर त्यास सुमित्रेच्या स्वभावाचे ज्ञान फारच कमी आहे असे म्हणणे भाग आहे. परंतु हा दोष नसून फार मोठा सद्गुण आहेच. गुरुपिता माता हीं मी जाणत नाही असे म्हटले त्याचे हे प्रत्यंतर, पुरावा आहे. जो माता जाणत नाही तो मातेचा स्वभाव कसा जाणणार? (ख) आणखी विशेष लक्षात घेण्यासारखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, माता, जननी, अकार्य करणार असे न म्हणता 'ही' असे म्हटले (एहि) ! लक्ष्मणाचे मन, वाणी सुमित्रेस माता मानीत

**नाहीत, हे स्पष्ट दिसले.** या भेटीत रामवनवासाची हकीगत सांगितल्यानंतर लक्ष्मणाने तोंडच उघडले नाही. प्रभूची आज्ञा मोडता येत नाही म्हणूनच केवळ शरीराने येऊन पायांवर डोके ठेवले. विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर असे दिले की त्या बाबतीत आणखी काही विचारले जाऊ नये. मातेने आज्ञा दिल्यानंतर जाताना नुसते नमन केले; पण मातेला आश्वासन देणे किंवा तुझ्या कृपेने, आशीर्वादाने वनांत सुखी राहीन, तू काळजी करू नकोस, किंवा निदान तुझ्या आज्ञेप्रमाणे मी रामसीतासेवा करण्याचा प्रयत्न करीन इ. एक शब्द सुद्धा उच्चारला नाही. हे वागणेसुद्धा लक्ष्मणाच्या मागील वचनांना साजेल असेच आहे. **(ग) सुमित्रा सुद्धा लक्ष्मणाचा स्वभाव नीट जाणत नाही.** हे तिच्या पुढील भाषणावरून सहज सिद्ध होते. पण हा तिचा दोष नाही. कारण लक्ष्मण नेहमी रामसंगतीत व राम कौसल्येपेक्षा कैकयीच्याच महालात बालपणी जास्त असत.

(२) **आज्ञा घेण्या सभय धजति ना** - आज्ञा घेऊन सत्वर या असे प्रभूंनी सांगितले असले तरी विचारण्यास भीती वाटते, न विचारावे तरी पंचाईत. कारण की 'जा' म्हणाली तर ठीक; पण नको जाऊ म्हणाली की सर्वच खेळ आटोपला ! म्हणून **तेंच घडे जे रामा वाटे । तर्क करुनि कां फोडुं फाटे'** (१।५२।७) असा विचार करून स्वस्थ राहिले. मनात मात्र रघुनाथांस प्रार्थना करीत राहिले असतील की ।। **नाथ ! तुम्ही सर्वांतरिं वसतां । या हिज सुमति किं न करी धाता** ।। रामवनवास वृत्ताने शोकाकुल झालेल्या सुमित्रेचे लक्ष पुन्हा लक्ष्मणमुखाकडे अजून गेले नाही. पण जणू सुबंधूची प्रार्थना सुमित्रेच्या हृदयांतील रघुनन्दनास ऐकू गेली व **'प्रेरक हृदिं रघुवंश विभूषण'** असल्याने ही **कुंजी** आता लवकर सुटणार.

***हिं.दो.*** *। समुझि सुमित्राँ राम सिय रूपु सुसीलु सुभाउ ॥*
*॥ नृप सनेहु लखि धुनेउ सिर पापिनि दीन्ह कुदाउ ॥७३॥*

***म.दो.*** *। स्मरुनि सुमित्रा रामसिता - रूप - सुशील - सुभाव ॥*
*॥ नृपस्नेह, मस्तक पिटी पापिण साधी डाव ॥७३॥*

**अर्थ :** राम व सीता यांचे रूप सुशील व शुद्ध भाव आणि राजाचा रामावरील स्नेह यांचे स्मरण होताच सुमित्रा आपले डोके बडवू लागली (व म्हणाली की) पापिणीने डाव साधला. ।।दो.७३।।

**टीका. - (१) सुभाउ** - याचा अर्थ येथे सुद्धा टीकाकार 'स्वभाव' असा करतात. इतर अनेक ठिकाणी हिंदीत मानसांत तो अर्थ आहे. पण शील व स्वभाव हे समानार्थक शब्द आहेत. 'शीलं स्वभावे सद्वृते' (विश्व). समानार्थक शब्द मानून मग अर्थभेदासाठी चाचपडत बसण्यापेक्षा सु + भाउ - भाव = सुभाव, शुद्ध भाव असा अर्थ होतो व हा प्रकरणानुसार अगदी योग्य आहे. 'राम चरन भल भाऊ' (१।३९।७) यांत भाऊ = भाव असाच अर्थ आहे. **(क) रामसीता सुभाव** - राम व सीता यांच्या मनात कैकयीविषयी किंवा कोणाही विषयी दुर्भाव, कुभाव, कपट भाव नसता पापिणीने डाव साधला. **(ख) नृपस्नेह** - रामावरील राजाच्या स्नेहामुळे या रामवियोग शोकाने राजाचे काय होणार हे सुमित्रेला चांगले कळले आणि मस्तक - कपाळ, बडवून घेऊ लागली. वाटले की माझे आणि सर्व राण्यांचे कपाळ फुटले. तिच्या डोळ्यांपुढे वैधव्याचे भीषण चित्र उभे राहिले. ही कल्पना कौसल्येला आली नाही, असे नाही पण तिने प्रत्येक वेळी त्या कल्पनेला बाजूस सारली आहे. ते करण्यास सुमित्रा असमर्थ ठरली. भगवंताची जननी आणि जीवाची जननी यांच्यात इतका विवेकाचा फरक असणारच. **(ग) पापिण साधी डाव - ल.ठे.** सुमित्रेने त्या पापिणीच्या नावाचा उच्चार केला नाही. लोकांनीही नाही केला. रामविरोधासारखे घोरतम पाप करणाराचे नाव उच्चारण्याने पाप लागेल हे तिला माहीत आहे. मानसांत अशी अनेक उदाहरणे आहेत. **प्र.प्र. १२।४ 'कपटी-पापी, यांचे नांव नको' पहावे.**

(२) कौसल्येने कैकयीचे नाव नाहीच घेतले. पण एकसुद्धा अपशब्द तिच्या विषयी उच्चारला नाही किंवा तिला दोष दिला नाही. रघुनाथाने सुद्धा कैकयीला दोष दिलेला नाही. हा भेद कौसल्या व सुमित्रा यांच्यांत दिसला नसता तर आश्चर्य ! **पण ईशमाता व जीवमाता यांची तुलना करणेच योग्य नाही.** सुमित्रेने भरतमातेला पापीण म्हटले यात तिची चूक नाही. **(क) डाव साधी** या म्हणण्याने सुद्धा दंभी, कपटी, लबाड, विश्वासघातकी, निष्ठुर इत्यादी विशेषणांचा संबंध कैकयीशी जोडला गेलाच. लक्ष्मणाने कैकयीची कड घेऊन गुहाची कानउघाडणी केली असली तरी रजोगुणाचा व तमोगुणाचा पगडा लक्ष्मणावर मुळीच बसला नाही असे नाही.

*हिं.* *। धीरज धरेउ कुअवसर जानी । सहज सुहृद बोली मृदु बानी ॥१॥*
*। तात तुम्हारि मातु बैदेही । पिता रामु सब भाँति सनेही ॥२॥*

*म.* *। कुसमय जाणुनि धैर्या धरते । सहज सुहृद मृदु वचना वदते ॥१॥*
*। बाळ ! तुझी माता वैदेही । पिता राम सर्वस्वीं स्नेही ॥२॥*

अर्थ : (ही शोक करीत बसण्याची वेळ नाही). कुसमय आहे असे जाणून सुमित्रेने धीर धरला व ती सहज सुहृद असल्याने मधुर वाणीने म्हणाली.॥१॥ बाळ तुझी माता वैदेही आहे व सर्व प्रकारे स्नेह करणारे राम तुझे पिता आहेत.॥२॥

टीका. - चौ. १ - (१) **धैर्या धरते** - याने सिद्ध झाले की धीर सुटला होता, पण शोक करीत बसण्याची ही वेळ नाही असा विचार करून मन घट्ट केले तेव्हा बोलण्याची शक्ती आली. (क) **सहज सुहृद** - स्वभावतःच शुद्ध हृदय असलेली, स्वभावमित्र; नावासारखेच तिचे हृदय आहे. नाव सुमित्रा आहे. सुचविले की लक्ष्मणाला अनुकूल असलेलेच करणार व बोलणार आहे. पुत्रमोहात पडणार नाही. (ख) **मृदु वदते** - पापिण साधी डाव हे शब्द कठोर, कठीण आहेत. आता वाणी एकदम मृदु झाली ! येथे सुमित्रेची मनोनिग्रह व इंद्रिय निग्रह शक्ति चांगलीच दिसून आली.

चौ. २ - (१) **बाळ तुझी माता वैदेही** - 'रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम्' (वा.रा.) असे सुमित्रेने सौमित्रीस सांगितले आहे, येथेही साधारणपणे तोच अर्थ असला तरी भाव गांभीर्य, मार्दव आणि मर्यादापालन यांत पुष्कळ फरक आहे. मातेचा अधिकार पित्यापेक्षा मोठा म्हणून मानसांत मातेचा उल्लेख प्रथम केला. वा.रा. तसा नाही. वा.रा. सुमित्रेने पतीच्या नावाचा उच्चार केला. त्यात स्त्रीधर्म मर्यादा भंग घडला; मानसांत हा दोष नाही. 'बाळ तुझी माता वैदेही' व 'मांविद्धि जनकात्मजाम्' जनकात्मजा मी आहे असे समज.' यांतील कशात मृदुता व माधुर्य आहे? व कोणते अधिक ग्राह्य वाटते? वा.रा. वचनांत ममत्व मिसळलेले आहे. तसे मानसांत नाही. येथे सुमित्रा म्हणते तुझी माता वैदेही आहे. मी तुझी माता आता नाही. यांत ममत्वाचा लेश नाही. भाव हा की तू मला विचारण्यास येण्याची जरूरच नव्हती. (क) पिता राम सर्वस्वीं

स्नेही - दशरथांचे पितृत्व उडविले. राम जसा सर्व प्रकारे स्नेह करतील तसा स्नेह तू घरी राहिलास तरी तुझ्या पित्याला करतांच येणार नाही. जीवाचे माता-पिता परम स्नेही असले तरी 'माता पिता स्वार्थरत तेही' 'हेतु रहित जगिं जुग उपकारी । तुम्हिं (= राम) तुमचे सेवक, असुरारी !' (७।४७।४-५) जे निःस्वार्थी स्नेही असतील तेच सर्व प्रकारे स्नेह करू शकतात. सुमित्रा सुचवित आहे की राम परमात्मा आहेत. **(ख) वैदेही** - ती विदेहाचीच कन्या ! तिचे स्वतःच्या देहादिकांवर मुळीच प्रेम नाही; म्हणजे तीसुद्धा निःस्वार्थी आहे. ही इतकी भावरम्यता वा.रा. वचनांत आहे काय? वा.रा. सुमित्रेने रडत रडत व लक्ष्मणाच्या मस्तकाचे अवघ्राण करून निरोप दिला आहे. येथील सुमित्रा पहा :

*हिं.* *। अवध तहाँ जहँ राम निवासू । तहँइँ दिवसु जहँ भानु प्रकासू ॥३॥*
*। जौं पै सीय रामु बन जाहीं । अवध तुम्हार काजु कछु नाहीं ॥४॥*
*। गुर पितु मातु बंधु सुर साई । सेइअहिं सकल प्रान की नाईं ॥५॥*
*म.* *। अवध तिथें जिथं राम-निवास । तिथें दिवस जिथं रविप्रकाश ॥३॥*
*। सिता राम जर जाति वना ही । अयोध्येंत तव काम च नाहीं ॥४॥*
*। गुरु पितरी स्वामी सुर बांधव । प्राणांसम सब सेव्य चि वास्तव ॥५॥*

**अर्थ :** जिथे सूर्यप्रकाश असेल तिथे जसा दिवस असतो (च) तसाच रामनिवास जेथे असेल तीच अयोध्या (अवध) ॥३॥ सीतारामच जर वनांत जात आहेत तर अयोध्येत तुमचे कामच नाही.॥४॥ गुरु, पिता, माता, स्वामी, देव व बंधू यांची प्राणांसारखी सेवा करावी हे योग्य (वास्तव)च आहे. पण ॥५॥

**टीका. चौ. ३ - (१) अवध तिथें जिथं रामनिवास** - माता वैदेहि व पिता राम आहेत असे नुकतेच सांगितले. प्रेममूर्ति आईबाप जवळ नसता बालकाला स्वर्गात नेऊन ठेवला तरी तो सुखी होणार नाही. लक्ष्मण शिशू आहे हे सुमित्रासुद्धा सुचवीत आहे. आईबापांशिवाय बालकाला कुठेही भयानक रात्रच वाटणार. मातापिता जवळ असल्यावर बालकाला सदासर्वदा सुखरूपी प्रकाशच असतो. मानसांत सुखाला प्रकाश म्हटलेच आहे. (७।११८।२) सार हे की या अयोध्येत राहिल्याने आता तुला सुख होणार नाही. जिथे राम राहतील तेथेच तुझी अयोध्या आहे असे समज.

(क) **आधिदैविक अर्थ** - या चरणांत वन शब्द नाही व वास शब्द नसून निवास आहे. भाव हा की सीतारामांची वस्ती ज्या ठिकाणी, ज्या हृदयांत दीर्घकाळ सतत होईल तेथे ज्ञान-विज्ञानरूपी भानु आपोआप उगवेल व अज्ञान भ्रमसंदेह तम नष्ट होऊन सुखाचा स्वच्छ प्रकाश पडेल व ते स्थान, ते हृदय - अयोध्या होईल. तेथे अविद्या शूर्पणखा, अहंकार रावण, मोह कुंभकर्ण, काम इन्द्रजित इत्यादी कोणीही शत्रू युद्ध करू शकणार नाहीत. ते स्थान अवध्य होईल. (अवध = अनष्ट). 'तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता' (भ.गी.) (भास्वन् = भानु) तो जीव जन्म-मरण परंपरेतून मुक्त होईल. ५।४७।१-४ पहा. (ख) सुचविले की जन्मदाते आईबाप कर्म-जन्म बंधनांतून सुटका करू शकत नाहीत. त्यातून सुटावे असे वाटत असेल त्यांनी सीताराम सेवा नैसर्गिक एकान्तात राहून सतत केली पाहिजे. 'अयोध्यामटवीं विद्धि' (वा.रा. २।४०।९) येथील पहिल्या चरणाशी तुलना करून पहावी.

**चौ.४ - (१) अयोध्येत तव काम च नाहीं** - याचा व्यावहारिक सारांश वर येऊन गेला आहे. सुमित्रेला वाटले की लक्ष्मण अयोध्येत रामविरहित राहिला तर रामविरोध केलेला त्याला असह्य होईल व त्याची विवेकाची बैठक सुटेल आणि काय करील काही सांगता येणार नाही. शिवाय वनवासात नोकर-चाकर कोणी नसल्यामुळे रामसीता-सेवेचा भरपूर लाभ त्याला मिळेल. सहज तपश्चर्या घडेल व त्याच्या जन्माचे सार्थक होईल. (क) जर सीतारामनिवास हृदयात झाला तर मग त्या देहरूपी अयोध्येत जीवरूपी लक्ष्मणाला काही कार्यच रहात नाही. 'तस्य कार्यं न विद्यते' तो कृतकृत्य होतो.

**चौ. ५ - (१) गुरु पितरौ... प्राणांसम सेव्य** - गुरु (आचार्य = कुलगुरु, वडील माणसे) पिता-माता इत्यादींची सेवा प्राणांसारखे प्रिय मानून केली पाहिजे, हे जरी खरे असले. या चौपाईचा अर्थ पुढील चौपायांत पूर्ण होईल; म्हणून वर अर्थ करताना 'पण' शब्द घालून ठेवला आहे. कि.कां. २३।४-७ तुलना करून पहावी.

*हिं. । रामु प्रानप्रिय जीवन जी के । स्वारथ रहित सखा सबही के ॥६॥*

*। पूजनीय प्रिय परम जहाँ तें । सब मानिअहिं राम के नातें ॥७॥*

*। अस जियँ जानि संग बन जाहू । लेहु तात जग जीवन लाहू ॥८॥*

म. *। जीवन जीवा प्राणां प्रिय ही । सकल-सखा निस्वार्थि रामही ॥६॥*

*। पूजनीय जे प्रिय अति जितके । मान्य राम-नात्यानें तितके ॥७॥*

*। हें जाणुनि वनिं संगें जा हो ! । घेइ बाळ, जगि जीवन - लाहो ॥८॥*

**अर्थ** : जीवाचे जीवन, प्राणानांसुद्धा प्रिय व सर्वांचे निस्वार्थी सखा रामच आहेत.॥६॥ जगात जितके म्हणून पूजनीय वाटतात व जे कोणी अति प्रिय वाटतात ते सर्व रामाच्या संबंधानेच मान्य आहेत.॥७॥ हे जाणून तू रामाबरोबर वनांत जा कसा (जा हो !) आणि बाळ या जगात जीवनलाभ घे (जन्म सुफल कर, कृतकृत्य हो).॥८॥

**टीका. चौ.** ६-७ - (१) मागील चौपाईत सांगितले की गुरुपितामाता इत्यादी प्राणांसम सेव्य आहेत. येथे सांगतात 'प्राणां प्रिय राम ही' आणि जीवाला जीवन दाते रामच आहेत. प्राणांचे प्राणत्व रामामुळेच आहे. 'पुत्र परम तूं प्रिय सर्वांचा । प्राणां प्राणहि जीव जिवांचा' (५६।७) असे कौसल्या म्हणाली आहे. 'हे प्रिय सर्वां, जितके प्राणी' (१।२१६।७) विश्वामित्र म्हणाले. तेच सुमित्रा येथे अधिक विस्ताराने सांगते. (वरील दोन्ही वचनांची गू.चं. पहावी). भाव हा आहे की अन्तर्यामी रूपाने राम सर्वांच्या हृदयांत निवास करीत आहेत. प्राणांचे प्रेरक व जीवांचे प्रकाशक तेच आहेत. राम मूळ आहेत. गुरु (कुलगुरु) पितामाता, स्वामी, सुहृद, सुर, बांधव इ. सर्व या मूळाच्या आश्रयाने वाढणाऱ्या तरु, शाखा, पाने इत्यादी आहेत. मूळाला पाणी घातले म्हणजे वृक्षांचे अंगोपांग प्रसन्न, पुष्पित फलित होते. त्याचप्रमाणे रामसेवादिकांत इतर सर्वांच्या सेवेचा सहजच अन्तर्भाव होतो.

(२) **मान्य रामनात्याने तितके** - गुरु, पिता, माता आदि तोपर्यंतच पूज्य व मान्य वाटतात की जोपर्यंत हृदयस्थ राम त्या जीवाला प्रकाश व प्राणांना प्रेरणा देत असतो. हा प्रकाश, ही प्रेरणा बंद होताक्षणीच ते सर्व देह अपूज्य, अपवित्र होतात. तो देह = शव जेथे पडले असेल ते स्थान अपवित्र, ते कुल अपवित्र होते काही काळ. म्हणून म्हटले की जे कोणी पूजनीय व परमप्रिय वाटत असतील ते रामनात्यानेच पूज्य, मान्य असतात. (क) सार हे सुचविते की- गुरुपितामाता

इ. ची सेवा करणे हा धर्म असला तरी रामसेवा हा परमधर्म असल्याने **परमधर्माच्या आड येणाऱ्या धर्माचा त्याग करणे कर्तव्यच आहे.** गुरुपितामाता इत्यादींची सेवा सोडून कसा जाऊ हे मनात सुद्धा आणू नकोस.

**चौ. ८ - (१) हें जाणुनि बनिं संगें जा हो... लाहो** - लाहो = लाभ. सुमित्रा वात्सल्याने व रामभक्तिमय अंतःकरणाने अगदी कळवळून, कळकळीने, काकुळतीत येऊन सांगत आहे. जीवरूपी लक्ष्मण व ब्रह्मरूपी राम तत्त्वतः सहज सखे आहेत. राम निःस्वार्थी, सुहृद, सखा, मित्र आहेत. परंतु **'ईश्वर अंश जीव अविनाशी । चेतन अमल सहज सुखराशी ॥ असा असून 'तो प्रभु, मायेला वश झाला । शुक मर्कट सम बंधनिं पडला.'** (७।११७।२-३) तेव्हापासून जीवाने जणू रामसंगति सोडूनच दिली व अविद्येच्या संगाने जीव दुःखी, दीन, परतंत्र, संसारी बनला. राम 'सकल-सखा निस्वार्थी रामही' 'राम सकल हृदयान्तर्यामी', 'सर्व एक तुम्हिं मजला स्वामी' इत्यादी भावनेने जेव्हा जीव रामसंग धरील तेव्हाच मानवी जीवनाची, जन्माची सफलता लाभते. तो कृतकृत्य होतो. गुरुपितामातादिकांच्या सेवेने प्रदीर्घ काळाने जे साधावयाचे ते वनात रामाबरोबर जाण्याने सहज, विना काही साधन, साध्य होणार आहे, म्हणून वनात जा.

**बि.ल.टे. (क)** येथे सुमित्रा जे जे सांगत आहे ते ते लक्ष्मणाने आधीच उत्तम प्रकारे केले आहे. पण सुमित्रेला हे माहीत नाही की लक्ष्मणाने ते केले आहे व रामरहस्य त्याला कळले आहे. तिला इतकेच कळाले आहे की लक्ष्मण रामाबरोबर वनांत जाणार आहे. (ख) लक्ष्मणाने हे सर्व परिपूर्ण केले आहे. राम परमात्मा आहेत हे जाणले आहे, तरी असे म्हणत नाही की तुम्ही सांगता ते सर्व मला माहीत आहे, मी केले आहे, म्हणून या उपदेशाची मला आवश्यकता नाही इ. याचे नाव निरंहकार वृत्ति, अकर्तृत्वभावनादार्ढ्य व निर्ममत्व !

*हिं.दो.*    *। भूरि भाग्य भाजन भयहु मोहि समेत बलि जाउँ ॥*
*॥ जौं तुम्हरें मन छाड़ि छलु कीन्ह राम पद ठाउँ ॥७४॥*

*म.दो.*    *। भूरि-भाग्य-भाजन बनसि मज सह, टळो पिडाहि ॥*
*॥ कीं तव मन करि रामपदिं ठाव छलादि विनाहि ॥७४॥*

**अर्थ :** (बाबा) माझ्यासह तूं अपार भाग्याचे पात्र बनलास ! सर्व इडापिडा

टळो ! कारण की तुझ्या मनाने छलकपटादी सोडून रामचरणी ठाव केला आहे. (हे मी जाणले) ॥७४॥

**टीका.** (१) लक्ष्मणाने आपले मन रामचरणी ठेवले आहे हे तिला पूर्वी माहीत नसता **आताच कसे कळले?** समाधान - वनांत जा म्हणून सांगताच त्याच्याकडे पाहिले तो उदासीनता मावळून मुख परम प्रसन्न दिसले. जो जो सुमित्रा उपदेश करू लागली तो तो प्रसन्नता वाढत असलेली दिसली. एक शब्दसुद्धा बोलला नाही. वैदेही व राम माता-पिता आहेत हे कानी पडतांच आनंदाला उकळ्या आलेल्या दिसल्या. 'वनांत जा' असे म्हटल्यावर मातृप्रेमाचा लवलेशसुद्धा उत्पन्न झालेला दिसला नाही. या व अशा अन्य लक्षणांवरून कळले. सुमित्रा फार व्यवहारदक्ष व प्रसंगावधानी आहे. **'गूढ प्रेमी सुमित्रा देवी'** चरित्र प्रस्तावनेत पहावे.

(२) **पिडा टळो (बलि जाउँ)** - इडा पिडा टळो असे म्हणून तिने आपली बोटे आपल्या कानशिलांवर मोडली. दृष्ट काढण्याची ही एक तिकडली पद्धती आहे. भाव हा की तुझ्या मार्गात (सेवेत) काही विघ्ने न येवोत. (क) पुत्राने रामपदनिरत होणे हे मातेच्या भाग्यात असले तरच घडणार; म्हणून म्हणाली की तुझ्यामुळे मीही अपार भाग्यवंत ठरले ! 'मज सह तूं भूरिभाग्य भाजन (पात्र) बनसि' लक्ष्मणाने आपले मन स्नेहरूपी रज्जूने रामपदी पक्के बांधले. हे अनंत, अपार भाग्याचे लक्षण आहे. **अशा व्यक्तीच्या योगे** 'कुलं पवित्रं **जननी कृतार्था** वसुंधरा पुण्यवती' **होते**. 'ऐक उमे कुळ धन्य ते जगत्पूज्य - सुपुनीत ॥ श्रीरघुवीर - परायण जिथं नर होइ विनीत' (७।१२७) **(ख) छलादि** - छल, कपट इत्यादी **'निर्मल मन जन तो मज पावे । मला कपट छल छिद्र न भावे'** (५।४४।५) असा रामप्रभूंचा स्वभाव आहे. 'छलादि'चा अर्थ पुढे स्पष्ट होत आहे. लक्ष्मण रामपदनिरत झाला याबद्दल सुमित्रेला धन्यता वाटत आहे.

*हिं.* *। पुत्रवती जुबती जग सोई । रघुपति भगतु जासु सुत होई ॥१॥*
*। नतरु बाँझ भलि बादि बिआनी । रामबिमुख सुत तें हित जानी ॥२॥*
*। तुम्हरेहिं भाग रामु बन जाहीं । दूसर हेतु तात कछु नाहीं ॥३॥*
*। सकल सुकृत कर बड़ फल एहू । रामसीय पद सहज सनेहू ॥४॥*

*म.* *। पुत्रवती युवती जगिं तीच किं । रघुपतिभक्त जिचा सुत होत किं ॥१॥*

*। न तरि वांझ बरि विते वृथा ते । रामविमुख सुत मानि हितातें ॥२॥*
*। राम जाति वनिं तुमचें भाग्य हि । ताता ! काहीं कारण नान्यहि ॥३॥*
*। सकल - सुकृत - फल हेंच महान हि । स्नेह रामसीतापदिं सहज हि ॥४॥*

**अर्थ :** या जगात तिलाच पुत्रवती युवती (स्त्री) म्हणावे की जिचा पुत्र रघुपतिभक्त होतो.॥१॥ नाही पेक्षा वांझ चांगली; (कारण) रामविमुख पुत्र आपल्या हिताला कारण होईल असे जिला वाटते ती (पशुप्रमाणे) व्यर्थ विते (व्याली असे म्हणणे योग्य).॥२॥ ताता (बाळा) ! तुमच्याच भाग्याने राम वनांत जात आहेत; दुसरे काही सुद्धा कारण (हेतु) नाही.॥३॥ सीतारामचंद्रांच्या पायी सहजच स्नेह (असणे) हेच सर्व सुकृतांचे महान फळ आहे.॥४॥

**टीका. चौ. १-२** (१) जिचा पुत्र रघुपतिभक्त होतो तीच पुत्रवती म्हणावी व जिचा पुत्र असा होत नाही ती पुत्रवती नव्हेच. **(क) रघुपति** शब्दाने सगुणसाकाराची भक्ति सुचविली. **(ख)** रघुपतिभक्तिविहीन पुत्र होण्यापेक्षा वांझ राहणे चांगले; कारण रघुपतिविमुख सुत पितरांना नरकात पाडण्यास कारण होतो. रघुपतिविमुखाला जी जन्म देते ती माणसाला नव्हे, पुच्छविषाणहीन पशूलाच जन्म देते. पशूची मादी व्यायली असे म्हणतात. प्रसूत झाली, बाळंतीण झाली असे म्हणत नाहीत. गाय, वाघीण व्यायली असे म्हणतात. पशूंची अपत्ये निदान आपल्या जननीजनकांस दुर्गति तरी देत नाहीत. कारण त्या केवळ भोगयोनि आहेत. 'भक्तिविण पशु कशासि जन्मला । सटवीने नेला कैसा नाही । (एकनाथ). १९०।७-८ निषादराजाचे वचन पहा.

(२) **ल. ठे.** - कवितावलीतील (उ.कां. पदे ३७-४५) ही नऊ पदे मनुष्य जीवन व्यर्थ केव्हा ठरते याचे फार सुंदर वर्णन करतात. जो जानकीनाथाचा होत नाही त्याचे जीवन व्यर्थ असे त्यांतील पालुपद आहे. थोडा नमुना - तिन्ह तें खर सूकर स्वान भले जड़ता बस ते न कहै कछु वै ॥ तुलसी ! जेहि रामसो नेह नहीं सो सही पसु पूंछ बिषान न द्वै । जननी कत भार मुई दस मास, भई किन बाँझ, गई किन च्वै ॥ जरि जाउ सो जीवनु जानकिनाथ ! जिऐ जगमें तुम्हरो बिनु व्है ॥पद ४०॥ तिन्ह तें = त्याहून, तेन कहै कछु वै = ते काहीही सांगत-बोलत नाहीत. तुलसीदास म्हणतात ज्याचा रामावर स्नेह नाही तो खरोखर शिंगे व शेपूट

नसलेला पशूच होय. त्याची जननी १० महिने फुकट भार वाहून का मेली? वांझ का नाही झाली? तिचा गर्भस्त्राव का झाला नाही? **जानकिनाथ! तुमचा झाल्याशिवाय जो जगात असतो त्याच्या जीवनाला आग लागो. 'रामचंद्र भजनाविण इच्छी पद निर्वाण । ज्ञानवंत अपि तो नर पशु, विण पुच्छ बिषाण'** (७।७८ रा.)

**चौ. ३-४ (१) राम जाति वनिं तुमचें भाग्य हि** - भाव हा कीं मुख्यतः तुझे आणि तुझ्यासारख्या दुसऱ्या भक्तांचे भाग्य उदयाला आले व येणार आहे म्हणूनच राम वनांत जात आहेत. दुसरे काही कारण खरोखर नाही. 'सीतारामां सवें वास वनिं । कोटि अमरपुर समान सुखखनि ।। होइ दैव उजु पुरतें जेव्हां । रामसमीप वास वनिं तेव्हां ।।... सुखा योग्य या जन न सब भाग्य कुठें ! म्हणतात. (२।२८०) रामसंगतीत वनांत राहण्यास भाग्य पूर्णपणे अनुकूल लागते. (क) दुसरा हेतु नाही असे सांगण्यात हेतु हा आहे की कैकयीला लक्ष्मणाने दोष देऊ नये; उलट भरतमातेच्या निमित्ताने माझे अनंत भाग्य उदयास आले असे मानावे किंवा माझ्या परम भाग्यानेच तिला अशी प्रेरणा दिली असे लक्ष्मणाने मानावे.

(२) 'सकल सुकृतफल राम स्नेह... राम स्नेह सर्व सुकृतांचे, पुण्याईचे सर्वोत्तम फळ कोणते ते येथे सांगितले. सहज स्नेह असल्याशिवाय वनवास प्रिय वाटणार नाही. 'सकल सुकृत फल' प्र.प्र. ११।६ पहा. भरपूर विस्तार तेथे केलेला आहे. रामसेवा करताना पथ्य काय ते सांगते. मागील दोह्यांतील 'छलादिविहीन' चा अर्थच स्पष्ट केला जात आहे.

*हिं. । रागु रोषु इरिषा मदु मोहु । जनि सपनेहुँ इन्ह के बस होहू ।।५।।*
*। सकल प्रकार बिकार बिहाई । मन क्रम बचन करेहु सेवकाई ।।६।।*
*। तुम्ह कहुँ बन सब भाँति सुपासू । सँग पितु मातु रामु सिय जासू ।।७।।*
*। जेहिं न रामु बन लहहिं कलेसू । सुत सोइ करेहु इहइ उपदेसू ।।८।।*

*म. । लोभ - मोह - मद ईर्षा - रोषां । स्वप्निंहि होउं नका वश दोषां ।।५।।*
*। दूर सर्वपरिं विकार ठेवा । मन तन वचनीं करणें सेवा ।।६।।*
*। तुम्हां सुलभ वनिं सकलाराम । माय-बाप-सह सीताराम ।।७।।*
*। राम वनीं पावति ना क्लेशहि । सुत तें करणें हा उपदेशहि ।।८।।*

**अर्थ :** लोभ (राग) मोह, मद, ईर्षा व रोष (क्रोध) या दोषांना स्वप्नांत

सुद्धा वश होऊ नका.॥५॥ सर्व परींनी विकारांना दूर ठेऊन मनाने, देहाने (कर्माने) व वाणीने सेवा करावी ॥६॥ सीता व राम हे आईबाप बरोबर (सह, सँग) असल्याने तुम्हाला वनात सर्व आराम (सुखसोई) सुलभ आहेत.॥७॥ पुत्रा ! राम वनांत क्लेश पावणार नाहीत ते करावे हाच (माझा) उपदेश आहे.॥८॥

**टीका. चौ. ५-६ (१)** -- सेवा कशी करावी याचा येथे सुंदर पण थोडक्यात उपदेश आहे. **(क) राग** = आसक्ति, लोभ, हे सर्व दोष, विकार, मानसरोग आहेत. ज्याचे मन रोगी आहे त्याने केलेल्या सेवेत रोगटपणा असणारच. कामक्रोधादि सर्व मनोविकार सेवेत विघ्न करणारे आहेत. हे जोपर्यंत मनात असतील तोपर्यंत सेवेत दोष असणारच. असे अनेक विकार आहेत. म्हणून पुढल्या (६) चौपाईत विकार शब्द पुन्हा घातलेला आहे. **(ख) 'मोहें** अंध न कृत कोणाला । कोण नाचवि न **काम** जयाला ॥ **क्रोध** न दाहि कुणा हृदयाला ॥ **लोभ** कुणाचें विटंबन न करी...' (७।७१पहा.) हे मुख्य मुख्य दोष व त्यांचे परिणाम आहेत.

**(२) दूर सर्वपरिं विकार ठेवा - सर्व परिं** = सर्व प्रकारे, - मन, कृति व वचन यांपैकी कोणांतही त्यांचा प्रवेश होऊ देऊ नका. राहिलेल्या सर्व विकारांचा अन्तर्भाव येथील विकार शब्दांत केलेला आहे. जेव्हा मनकृतिवाणी पूर्ण निर्विकार होतील तेव्हाच खरी सद्गुरु सेवा किंवा भगवत्सेवा घडू शकते आणि म्हणूनच अशा सेवकाला महादेव संन्याशापेक्षाही श्रेष्ठ मानतात. मग तो शास्त्र ज्ञानशून्य का असेना ! **'श्रुतिस्मृति अविज्ञाय केवलं गुरुसेवकाः ते वै संन्यासिनः प्रोक्ता इतरे वेषधारिणः ॥ (गु.गी. १०७) (क) मनाने सेवा** म्हणजे सेव्याचे ध्यान करणे, सेवेचा ध्यास लागणे, सेव्याला सुख कसे देता येईल याचे चिंतन करणे, सेव्याच्या गुणांचे चिंतन करणे व जशी मानस पूजा मनात केली जाते तशी मानससेवा करणे. **(ख) शरीराने सेवा** म्हणजे जेणे करून सेव्याच्या शरीराला सुख होईल व मनाला समाधान वाटेल अशी कृति करणे. पाणी भरणे, केर काढणे, वस्त्रे-पात्रे स्वच्छ धुणे, घासणे इत्यादी. (ग) वाणीने सेवा म्हणजे न विचारता न बोलणे, उलट उत्तर न देणे, बोलणे आवश्यकच असेल तर अनुज्ञा घेऊन विचारणे, सेव्याचे गुण, चरित्रगान करणे, मृदु, मधुर, सत्यप्रिय, मित भाषण करणे व मुखाने सेव्याचे नाम घेणे इ. कशी सेवा करावी या विषयी विस्तार अर्चन,

पादसेवन व दास्यभक्तीच्या समासात श्रीदासबोधात पहावा.

**चौ.७ - (१) सुलभ वनिं सकलाराम** - सकळ + आराम, रामचंद्रासारखा करुणासिंधु निःस्वार्थी स्नेही, सर्व समर्थ, दासवत्सल, आनंदनिधान पिता व सर्व क्लेशहारिणी, सर्व श्रेयस्करी सीता रामवल्लभा, माता जवळ असल्यावर कोणत्या सुखाची कमतरता पडणार ! '**आरामः कल्पवृक्षाणां विरामः सकलापदाम् । अभिरामस्त्रिलोकानां रामः**) (रामरक्षा) यात आराम = बगीचा, बाग. आता सेवेतील मुख्य सूत्र सांगते.

**चौ. ८ - (१) राम वनी पावति ना क्लेश हि तें करणें** - राम व सीता यांना कोणतेही, केव्हाही क्लेश, कष्ट होऊ देऊ नका. त्यांना सुख होईल व दुःख होणार नाही अशा प्रकारे वागावे व सेवा करावी, हे उपदेशाचे सार आहे.

**वि.ल.ठे. - श्रीमानसांतील सुमित्रेसारखे मातेचे चरित्र अन्य कोणत्याही ग्रंथांतच नव्हे, तर कोणत्याही देशांत किंवा भाषेत मिळणे अशक्य आहे**. परमभक्त, सर्वसुलक्षणसंपन्न' लावण्यसिंधु, प्रियतम ज्येष्ठ पुत्र १४ वर्षे वनात जाण्यास निघाला असता, यां समग्र प्रसंगांत अथपासून इतिपर्यंत सुमित्रेच्या मातृहृदयाला पुत्रविरहभावनेचासुद्धा स्पर्शही झाला नाही. तो जाण्यास निघाला असता हृदयाशीसुद्धा धरला नाही की मस्तकाचे अवघ्राण केले नाही. धन्य धन्य भक्तजननी ! आणि वज्रादपि कठोर व कोमलं कुसुमादपि अन्तःकरण !! अशा मातेचा पुत्र लक्ष्मणासारखा सर्वभक्तलक्षणसंपन्न, मातेच्या सवाई विरागी व निर्मोह, निर्मम न झाला तर दुसऱ्या कोणाचा होणार ! सुमित्रा मनाने, कर्माने लक्ष्मणास पुत्र मानीत नसली तरी वाणीने मानते, सुत ! असे संबोधिले आहे. पण लक्ष्मण वाणीने सुद्धा तिला आई मानीत नाही ! (क) कौसल्येची रामभक्ति व सुमित्रेची रामचरणरति यांची तुलना करणेच अनुचित आहे. एक परमेशाची माता व दुसरी जीवाची जननी ! यांची बरोबरी कशी होणार ! राम सुमित्रेचा निरोप घेण्यास गेले असते तर सुमित्रेची दशा कौसल्येपेक्षाही बिकट झाली असती, हे जाणूनच जणू राम सुमित्रेच्या दर्शनास गेले नाहीत. आता सुमित्रा रामानुजास आणखी काय सांगते पाहू :

*हिं.छं.* *। उपदेसु यहु जेहिं तात तुम्हरे राम सिय सुख पावहीं ।*
*॥ पितु मातु प्रिय परिवार पुर सुख सुरति बन बिसरावहीं ॥*
*। तुलसी प्रभुहि सिख देइ आयसु दीन्ह पुनि आसिष दई ॥*
*॥ रति होउ अबिरल अमल सिय रघुबीर पद नित नित नई ॥१॥*

*म.छं* *। उपदेश हा किं तुम्हां मुळें सुख राम सीतां पावती ।*
*॥ प्रिय मातु पितु परिवार पुर-सुख याद काननिं विसरती ॥*
*। तुलसी प्रभुसि उपदेश आज्ञा देइ आशीर्वाद हा - ।*
*॥ रति नित्य अविरल अमल सिय रघुवीर पदिं हो नव महा ॥१॥*

**अर्थ** - हा उपदेश आहे (थोडक्यांत) की तुमच्यामुळे राम व सीता यांना सुख होईल; आणि माता, पिता, प्रिय परिवार आणि अयोध्येतील सुख यांची आठवण (याद) त्यांनी विसरावी (त्यांना होणार नाही असे तुम्ही वागा). तुलसीदास म्हणतात की प्रभुला उपदेश देऊन आज्ञा (निरोप) दिली व हा आशीर्वाद दिला की सीतारघुवीरपदी तुमचे नित्य नवे निर्मल, महान व घनदाट प्रेम होवो (असो) ।।छंद।।.

**टीका**. - (१) मागील चौपाईत उपदेश दिला पण तो निषेध मुखाने दिला. क्लेश होणार नाहीत अशी सेवा करा असे सांगितले. पण क्लेश न होणे म्हणजे सुख होणे नव्हे. म्हणून येथे विधिमुखाने सांगते की तुमच्यामुळे म्हणजे तुम्ही मन-तन वाणीने केलेल्या सेवेमुळे व वागण्याने सीताराम सुखी होतील अशी सेवा करा व वागा. **(क)** पिता, माता इत्यादींची आठवण त्यांस झाली की क्लेश होणारच; म्हणून त्यांस असे सुख द्या की त्या सुखात मग्न राहिल्यामुळे त्यांना मातापिता वगैरे कोणाचीही व अयोध्येतील ऐश्वर्यादि सुखाची आठवणच होणार नाही. **(ख) आज्ञा दिली** = निरोप दिला. सांगितले की रामाबरोबर वनात जात आहांत ही परम भाग्याची गोष्ट आहे. जा बरं आता लवकर. सुख द्या व क्लेश होऊ देऊ नका हा उपदेश दिला व आशीर्वाद शेवटच्या चरणांत स्पष्ट आहे. सीतारामपदी प्रेम प्राप्त होवो हा मुख्य आशीर्वाद आहे. नित्य, नवे, अविरल, प्रगाढ, घनदाट, अमल = पवित्र व महान = मोठे, पुष्कळ 'सकलसुकृतफल हेंच महानहि । स्नेह रामसीता पदिं सहजहि' (चौ.४) असे सुमित्राच म्हणाली आहे. याच अर्थाचा निःसंदेह, व्यापक असा वरील आशीर्वाद

दिला. आता लक्ष्मण कसे जातील ते पहा :

*हिं.दो. । मातु चरन सिरु नाइ चले तुरत संकित हृदय ॥*
*॥ बागुर विषम तोराइ मनहुँ भाग मृगु भाग बस ॥७५॥*

*म.दो. । मातृचरणिं वंदून निघति शीघ्र साशंक मनिं ॥*
*॥ वागुर दृढ तोडून जणूं पळे मृग भाग्यवश ॥७५॥*

**अर्थ :** भाग्यवशात् दृढ वागुरा (वागुर - जाळे) तोडून जसे हरिणाने पळून जावे तसेच जणू काय, मातेला वंदन करून, साशंक मनाने शीघ्र निघाले - गेले.॥दो.७५॥

**टीका. - (१) बागुर = वागुरा,** जाळे. 'वागुरा मृगबन्धनी' (अमरे) पशुपक्षी पकडण्याचे एक प्रकारचे जाळे (जाल विशेषस्य, अ.व्या.सु.) जाळे तोडून बाहेर पडलेला मृग असे म्हटले. वागुर तुटून असे म्हटले नाही. मातेचा पुत्रस्नेहरूपी वाघरी प्रतिकूल आज्ञारूपी जाळ्यांत-वागुरेत, पकडील की काय अशी धास्ती प्रथम वाटली; पण त्या वाघऱ्याने (वाघरी = पारधी, वागुरा वापरणारा म्हणून वाघरी; ही एक जात महाराष्ट्रात आहे.) ते जाळे टाकलेच नाही; म्हणून तोडण्याचा प्रश्नच उरत नाही. वागुरा रघुवीराला तोडता आली नाही ती तोडून लक्ष्मण वेगाने निघाले हे खरे. **महोपनिषदांतीलच आधार** सापडला. **'नार्यो नरविहंगानां अंग-बंधन-वागुराः'** (३।४५) विवाहांत धर्मेच अर्थेच कामेच नाति चरिष्यामि अशी प्रतिज्ञा केली (करावीच लागते) की नर-पक्षी नारीरूपी वागुरेनें पकडला-बांधला जातोच. तसे लक्ष्मण पकडले गेले होतेच. पण **मातेची आज्ञा मिळाल्यावर उर्मिलेचा निरोप घेण्यास ते गेलेच नाहीत. म्हणजेच ती दृढ वागुरा तोडली. (ख) पळून जाण्याचे कारण** हेच की ती वागुरा आता गळ्यात पडू नये. उर्मिला चटकन् आली असती व तिने परवानगी दिली नसती तर जाणे फारच दुष्कर होते. ती येण्यापूर्वी राम प्रभूसमीप जाऊन पोचण्यासाठी जणू धावत-पळतच गेले. तरीसुद्धा वाटेतच गाठील की काय ही शंका आहेच; म्हणून म्हटले की **शंकित हृदय गेले. उर्मिलेकडे न जाणे म्हणजेच खरोखरच स्त्रीस्नेहबंधन = वागुरा तोडून टाकणे आहे.** (हा अर्थ मा.पी.मध्ये दोन टीकाकारांनी दिला आहे. उर्मिला आली नाही याचाच अर्थ वागुरा तोडून निघाले असा केला आहे ! पण यात लक्ष्मणाने वागुरा तोडली

असे ठरत नाही. शिवाय स्त्री-वागुरा यास आधारही दिलेला नाही.) 'स्त्रियंत्यक्त्वा जगत् त्यक्तं जगत् त्यक्त्वा सुखी भवेत्' (महोपनिषद ३।४८) लक्ष्मणाने उर्मिलेसारख्या स्त्रीचा त्याग केला म्हणजे जगाचाच त्याग घडला व तो आता सुखी होईल. (ग) शंकित हृदय = सभीत. भीतीचे एक कारण वर दिले आहे. दुसरे हे की मला लवकर जाता आले नाही; त्यामुळे लक्ष्मण येत नाही असे वाटून प्रभु वनात गेले तर नसतील?

**शंका :** या प्रसंगी उर्मिलेचे वर्णन कोणीच कसे केले नाही? (१) रामायण म्हणजे कादंबरी नव्हे की कहाणी नाही. पूर्वी घडलेला वृत्तांत आहे. जे घडलेच नाही ते इतिहासात कोणी झाला तरी कसे वर्णन करणार? **मैथिलीशरण गुप्तांनी** कादंबरीवजा **साकेत** (रामायण) लिहिले आहे. त्यात कादंबरीतील एक पात्र म्हणून उर्मिलेचे चरित्र पुष्कळ आहे. **(क)** उर्मिलेला लक्ष्मणाचे रामप्रेम माहीत असल्याने पतीच्या परमार्थाच्या आड ती आलीच नाही व आली असती तर लक्ष्मण स्वखुशीने परमार्थ प्राप्तीसाठी वनात जात असल्याने, सहधर्मचारिणी म्हणून जाण्याचा तिचा हक्कच नाही. कारण **'मोक्षे नातिचरिष्यामि' अशी प्रतिज्ञा केलेली नाही. 'आत्मार्थे पृथिवीं त्यजेत्'** 'यदहरेव विरजेत् तदहः एव परिव्रजेत्' (श्रुति). (ज्याच्या ठिकाणी पूर्ण वैराग्य उत्पन्न झाले असेल त्याने कोणाचीही परवानगी घेण्याची आवश्यकता नाही.) असा हक्क पुरुषाला आहे. (ख) राम परमार्थ प्राप्तीसाठी वनात जात नसून **धर्मपालनासाठी** (पुत्रधर्म पालनासाठी) **जात असल्याने** सहधर्मचारिणीच्या इच्छेविरुद्ध तिचा त्याग करणे अधर्म घडला असता. तसे लक्ष्मणाचे नाही. त्याने धर्म, अर्थ व काम यांच्याशी काडीमोड केली आहे व परमार्थासाठी जात आहे. हे व्यावहारिक दृष्टीने ठरले.

(२) **अध्यात्मपर अर्थ** - उर्मिला = जाग्रदवस्था (१।३२५ छं. ४ टी.प.) (प्रस्तावनेत अध्यात्मपर अर्थाचा नमुना पहावा). लक्ष्मण = विश्व विभु. इंद्रियांनी विषय ग्रहण करणे म्हणजे जाग्रदवस्था. ही अवस्था स्वतः जीवाच्या जवळ येऊ शकत नाही. इंद्रियांनी विषय ग्रहण केले नाही म्हणजे अवस्था आपोआपच दूर राहते. डोळे मिटले की रूपविषयग्रहण बंद झाले. जागे करून उठलाच नाही तर पाय या इंद्रियाने प्राप्त करण्याचे विषय आपोआप दूर राहतात. असेच

इतर इंद्रियांचे व मनाचे आहे. म्हणजे जाग्रदवस्था स्वतःजवळ येऊ शकत नाही हे ठरले. असे शक्य आहे म्हणूनच निर्विकल्पसमाधी साधता येते. जाग्रदवस्था जर अनिवार्यपणे स्वतःच येऊ शकली असती तर परमार्थाचा मार्गच बंद झाला असता ! म्हणून ऋषिप्रणीत कोणत्याही रामायणात उर्मिला लक्ष्मणाजवळ आल्याचे वर्णन नाही.

**ल.टे.** संपूर्ण रघुवंशातील व्यक्तींत उर्मिलेच्या एवढा कष्टतम त्याग कोणीही केला नाही. सीता रामसंगतीत सुखी; लक्ष्मण सीतारामसेवेत व संगतीत परमसुखी. राम सीतासंगतीत व लक्ष्मण सेवकसंगतीत सुखी. माण्डवीला पतिदर्शन व पतिसेवेचा लाभ मिळत होता. शत्रुघ्न घरीच राहिल्याने श्रुतकीर्तीला पतिविरह मुळीच नाही. पण उर्मिलेसारख्या सीतेच्या भगिनीला किती असह्य वेदना झाल्या असतील व तिने १४ वर्षे कशी काढली असतील याची कल्पना उर्मिलेशिवाय कोणासच करता येणार नाही. लक्ष्मणासारखा कोटिकामदेवनिंदक, सौंदर्याचा पुतळा; सर्व सुलक्षणांचे धाम असणारा पति टाकून गेला. जाताना मुखदर्शनसुद्धा नाही ! रामसीतादर्शन नाही. सर्व सासवा विधवा; व दोन बहिणींना मिळत आलेले पतिसौख्य पहात, ऐकत तिला १४ वर्षे काढावयाची आहेत ! पतीच्या इच्छेआड जावयाचे नाही. पतीचे हित साधावयाचे व पतीच्या सुखांस विघ्न करावयाचे नाही एवढ्याचसाठी हा अलौकिक, अनुपम त्याग व केवढा मनोनिग्रह व इंद्रिय निग्रह ! इतके सहन करताना पुन्हा पतिप्रेमात जराही न्यूनता नाही ! वज्रापेक्षा कठोर बनलेल्या पतीच्या चरणचिंतनांतच तिने काळ कंठला. अशी विलक्षण अद्वितीय महासती जगातील कोणत्या देशात, कोणत्या धर्मात झाली आहे काय? ज्या भारतीय वैदिक संस्कृतिने असा आदर्श निर्माण केला, त्याच भारतीयांत आज काय दिसते? 'हा कलिकाल कठिण उरगारी ।। पापपरायण सब नरनारी ! हेच ना? (७।९७।८).

*लक्ष्मण-सुमित्रा भेट प्रकरण समाप्त.*

## विपिन - गमन प्रकरण

हिं. *। गए लखनु जहँ जानकिनाथू । भे मन मुदित पाइ प्रिय साथू ॥१॥*
*। बंदि राम सिय चरन सुहाए । चले संग नृपमंदिर आए ॥२॥*
*। कहहिं परस्पर पुर नर नारी । भलि बनाइ बिधि बात बिगारी ॥३॥*
*। तन कृस मन दुखु बदन मलीने । बिकल मनहुँ माखी मधु छीने ॥४॥*

म. *। जानकिनाथ तिथे गत लक्ष्मण । प्रिय संगतिनें होति मुदित - मन ॥१॥*
*। रामसितापद सुंदर नमले । तयां सवें नृपमंदिरिं वळले ॥२॥*
*। वदति परस्पर पुर-नर-नारी । विधि हरि जुळवुनि सुयोग भारी ॥३॥*
*। कृशतनु दुःखी उदास वदनें । जणूं विकल माशा मध-हरणें ॥४॥*

**अर्थ :** जानकी व जानकीनाथ जेथे आहेत तेथे लक्ष्मण गेले; व प्रियाच्या संगतीने त्यांचे मन प्रसन्न-आनंदित झाले.॥१॥ राम व सीता यांच्या सुंदर चरणांना वंदन केले व त्यांच्या बरोबर नृपमंदिराकडे निघाले-चालले.॥२॥ (यांना जाताना पाहून) नगरांतील स्त्रिया व पुरुष आपसांत म्हणतात की दैवाने, चांगला जुळवून आणलेला सुयोग की हो नष्ट केला ! ॥३॥ सर्व लोक शरीराने कृश, मनाने दुःखी (झाले असून) त्यांची तोंडे अशी उदास (म्लान) झाली आहेत की जणू मध काढून नेल्यानंतरच्या मधमाशाच.॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) जानकिनाथ तिथें गत लक्ष्मण** - जानकीला प्रथम - पाहिली तेव्हा 'प्रभु वनांत गेले तर नाहीत?' ही वाटत असलेली धास्ती गेली. कारण जानकीला टाकून जानकीनाथ एकटे वनात जाणे शक्य नाही हे ठरले म्हणून मन आनंदित झाले. राम स्वतःच्या महालांतच आहेत व तेथेच रामलक्ष्मण संवाद झाला हे पूर्वी (७३।२) टीकेत दाखविले आहे. जानकीच्या महालात रघुनाथ आहेत हे सुचविण्यासाठी येथे जानकीनाथ शब्द वापरला आहे. दोघांचा एकच महाल आहे-होता. **(क)** आधी रामचंद्रांस व मग सीतेला वंदन केले म्हणून 'रामसिता' पद असा क्रम आहे. 'बाळ तुझी माता वैदेही !' या सांगण्याप्रमाणे करावयाचे असते तर आधी मातेला - सीतेला वंदन करणे जरूर होते. परंतु लक्ष्मणाने सर्व नाती आधीच रामचरणी जोडली असल्याने रामाला प्रथम वंदन

करणेच इष्ट होते. तेच परम रामभक्ताने केले. **रामभक्ताने नमनांत क्रम कसा ठेवावा हे येथे दाखविले.** सीतेला वंदन करण्याचा भरतादि सर्व बंधूंचा नियमच होता असे दिसते; कारण की भरत-शत्रुघ्नांनी चित्रकूटास गेल्यावर सीतेला नमन केले आहे. (२४२।३-४ पहा.) **'नाहं जानामि केयूरं नाहं जानामि कुंडले ॥ नूपुरे त्वभिजानामि नित्यं पादाभिवंदनात्'** या लक्ष्मण वचनावरूनही ठरते की लक्ष्मण नित्य नियमाने सीतेला वंदन करीत असत. नमनाने व प्रसन्न वदनाने लक्ष्मणाने सुचविले की आज्ञा घेऊन आलो आहे. **(ख) नृपमंदिरिं** = दशरथ जेथे आहेत त्या राजवाड्याकडे रामसीता यांच्या बरोबर चालले. दशरथ कैकयीच्या महालात क्रोधभवनात पडलेले असून त्या वाड्याला नृपमंदिर म्हटले. नृपरूपी राममंदिर तेथे आहे. दशरथांस रामाशिवाय इतर काही आठवत नाहीसे झाले आहे.

**चौ. ३ - (१) वदति परस्पर पुर नरनारी - भारी** – राम सीता व लक्ष्मण अनवाणी चालत जात आहेत व रामलक्ष्मणांच्या अंगावर नेहमीची विभूषणेही नाहीत हे पाहून व आता वनात जाणार, प्रत्यक्ष वियोगाचा प्रसंग जवळ आला, हे जाणून स्त्रिया व पुरुष कासावीस होऊन शोक करू लागले. कुठे चिरकाल अपेक्षित रामराज्याभिषेकाची केलेली सिद्धता व कुठे रामसीता व लक्ष्मण यांनी वनास जाणे ! ही परस्पर पूर्ण विरोधी दोन चित्रे लोकांच्या डोळ्यांपुढे नाचू लागली व दैवाला दोष देण्याशिवाय मार्ग उरला नाही.

**चौ. ४ - (१) कृशतनु दुःखी उदास वदनें** - राम अजून वनात गेले नाहीत तोच लोकांची कशी दशा झाली आहे हे सांगून राम गेल्यावर कशी दुर्दशा होईल याची कल्पना करण्यास सुचवीत आहेत. एवढ्यांतच सर्व लोकांचे देह सुकून गेले आहेत. हृदयांत दुःखशोकाच्या ज्वाळा पेटल्या आहेत व मुखांवर उदासीनता, विषण्णता आली आहे. लोकांची कायिक, मानसिक व वाचिक दशा उत्प्रेक्षेने वर्णन करतात - **(क) जणूं माशा विकल मध हरणें** - मधाचे मोहोळ एकाएकी काढून नेले म्हणजे आग्या मधमाशांची जशी दशा होते तशीच जणू सर्व लोकांची झाली आहे. **'पाहुनि पोळें किराति कुटिला । कसें मिळे कीं चिंति युक्तिला'** (१३।४) असे कुबडीच्या दुष्ट वासनेचे वर्णन केले आहे. तेथील टीका व कोष्टकी तुलना पहावी. तेथे सर्व लोकांना मधमाशा म्हणूनच सुचविले आहे. मधमाशा अपार

परिश्रम करून मधाचा संग्रह करून ठेवतात. त्याप्रमाणे सर्व लोक रामराज्याभिषेकमनोरथरूपी मधाचा संग्रह करीत; शंकरांस प्रार्थना करीत तो वाढवीत गेले. तो मध आता चाखण्यास तयार झाला असे स्पष्ट दिसू लागताच तो सर्व मध अकस्मात हिसकून चोरून नेला गेला. मोहोळ काढणाऱ्यावर मधमाशा चिडतात व काढणाराला दंश करण्यासाठी सैरावैरा धावत असतात; पण मध काढून नेणाऱ्या भिल्लीणीने असा कडेकोट बंदोबस्त केलेला असतो की माशा तिला चावू शकत नाहीत. त्या मधमाशांच्या सारखेच पुरवासी लोक कैकयी किरातिणीवर असे चिडले आहेत की बोलता सोय नाही. पण क्रोधाचा वचपा काढण्यास काही उपाय राहिलेला नाही. त्यामुळे काय करतात पहा –

*हिं.* *। कर मीजहिं सिरु धुनि पछिताहीं । जनु बिनु-पंख बिहग अकुलाहीं ॥५॥*
*। भइ बड़ि भीर भूप दरबारा । बरनि न जाइ बिषादु अपारा ॥६॥*
*। सचिवँ उठाइ राउ बैठारे । कहि प्रिय बचन रामु पगु धारे ॥७॥*
*। सिय समेत दोउ तनय निहारी । ब्याकुल भयउ भूमिपति भारी ॥८॥*

*म.* *। कर चोळिति शिर पिटती रडती । जणुं विण पंख विहग विव्हळती ॥५॥*
*। खूपच गर्दी राजद्वारीं । वर्णवे न तो विषाद भारी ॥६॥*
*। बसविति भूपा सचिव उठवुनी । आले राम असें प्रिय वदुनी ॥७॥*
*। सीते सह युग तनय निरखले । व्याकुळ भारि भूमिपति बनले ॥८॥*

**अर्थ** - लोक हात चोळीत आहेत, डोके पिटीत रडत असा आक्रोश करीत आहेत की जणू पंखहीन (केलेले) पक्षीच विव्हळत आहेत.॥५॥ राजद्वाराजवळ खूपच गर्दी झाली असून तेथील अत्यंत विषादाचे वर्णनच करता येत नाही.॥६॥ रामचंद्र आले आहेत असे प्रिय बोलून सचिवाने राजांस उठवून बसविले.॥७॥ सीतेसहित दोन्ही पुत्रांना निरखून पाहताच भूमिपति भारी व्याकुळ झाले.॥८॥

**टीका. - चौ. ५** - (१) क्रोध आला आहे. सर्व लोक कैकयीवर चिडले आहेत. त्वेष येतो आहे. पण वचपा घेता येत नाही. अशा वेळी हात चोळीत बसून तो क्रोध जिरवावा लागतो. कोणी दांत-ओठ खात हात चोळतात. वीर व रौद्र रस अगतिक झाले म्हणजे असे घडते. (क) **विण पंख विहग विव्हळती** - विहग् = आकाशात संचार करणारे पक्षी. खूप उंच भराऱ्या मारणाऱ्या घारीचे

पंखच तोडले गेले म्हणजे चोचीत, शरीरात व मनात पुष्कळ सामर्थ्य असून, प्राणांतिक वेदना सोशीत विव्हळत, आक्रोश करीत, जागच्या जागी पडून रहावे लागते. प्रजेची अशी दशा झाली; पण यात काही नवल नाही. **'राम राम मुखिं भूप विकळ, तो । जणुं विहंग विण पंख विवळतो.'** (३७।१) अशी दशरथांची दशा झाली होती. **(ख) पंख कोणते?** पंखांच्या जोरावर आकाशात संचार, विहार करीत विहंग विविध प्रकारचे सुख मिळवू शकतो. विहंगाला एकाच पंखाने उडता येत नाही; एक पंख असला नसला सारखाच. म्हणजे त्यांचे दोन पंख एकजीवच असतात. राम व जानकी हेच असे दोन पंख आहेत. लक्ष्मणाला पंख मानता येत नाही. कारण की **'कांचनसिंहासनिं सह सीते । बसतां राम किं होइ मनीं तें** ॥११।५०॥ यांत एका चरणांत सीता व दुसऱ्या चरणांत राम शब्द डाव्या-उजव्या पंखांसारखेच घातले आहेत. राज्याभिषेकाच्या मनोरथांत लक्ष्मणाचा संबंध चुकूनसुद्धा आलेला नाही लोकांच्या मनात.

**चौ. ६. (१) राजद्वारीं** - भूप दरबार = राजद्वार, या अर्थानेच १।२०६; २।२३ यांत दरबार शब्द वापरला आहे व ६।३८ मध्ये सभाद्वार = सभादरबारच आहे. टी. पहावी.

**चौ. ७-८ (१) आले राम असें प्रिय वदुनी** - यावरून ठरते की दशरथ मूर्छित नव्हते. मूर्छित होऊ नयेत अशी युक्ती योजूनच राम कौसल्येकडे गेले होते. ४६।४ टीका पहा. राम येणार या आशेवर जागृत होते. **(क) प्रिय वदुनी** - राम आले हे शब्द दशरथांच्या देहात, व वाणीत नवचैतन्य भरण्यास समर्थ होतील इतके ते दशरथांस प्रिय आहेत. कदाचित असाही समज होईल की वनवासातून परत आले. **(ख) सीते सह तनय निरखले** - नीट निरखून पाहिले पण वल्कले, जटा इ. काही दिसले नाही; तेव्हा भ्रमनिरास झाला व वस्तुस्थिती लक्षात आली की वनात जाताना नमस्कार करण्यास आले आहेत. तत्काळ भारी व्याकुळ झाले. **(ग) भूमिपति** - मी अपार भूमीचा पति = स्वामी असून माझ्या प्रियतम पुत्रांना आता १४ वर्षे अन्नाशिवाय काढावी लागणार ना ! काय हा दैवाचा खेळ ! इत्यादी विविध विचार व हृदयविदारक चित्रे डोळ्यांपुढे थैमान घालू लागली.

*हिं.दो. । सीय सहित सुत सुभग दोउ देखि देखि अकुलाइ ॥*
*॥ बारहिं बार सनेह बस राउ लेइ उर लाइ ॥७६॥*

*म.दो. । सीते सह सुत सुभग युग बघ बघुनी व्याकूळ ॥*
*॥ स्नेहविवश बहु वार त्यां हृदयिं धरिति राऊळ ॥७६॥*

**अर्थ** - सीतेसहित आपल्या दोन्ही सुंदर पुत्रांना पुन्हा पुन्हा पाहून दशरथ राजा (राऊळ) व्याकुळ होऊ लागले व स्नेहाला विशेष वश होऊन त्या तिघांना वारंवार हृदयाशी धरू लागले.॥दो.७६॥

**टीका.** - (१) **बघबघुनी** = पुनः पुन्हा पाहून. तिघांकडे एकदा पहावे, क्रमाने हृदयाशी धरावे व शोकविव्हळ व्हावे. पुन्हा तिघांकडे पहावे, हृदयाशी धरावे, शोकाकुळ व्हावे, असा क्रम सुरू झाला. राऊळ = राजा, भूपति. हे सौंदर्य, ही अतिसुकुमारता, हे शीलसिंधु, गुणसागर या माझ्या अभागी नेत्रांना पुन्हा कसले दिसतात ! इ. विचार करावा व हृदयाशी धरावे अशी विचित्र दशा राजाची झाली आहे; पण तोंडातून ब्र काढण्याची सोय नाही ! वाघीण जवळच आहे !

*हिं. । सकइ न बोलि बिकल नरनाहू । सोक जनित उर दारुन दाहू ॥१॥*
*। नाइ सीसु पद अति अनुरागा । उठि रघुबीर बिदा तब मागा ॥२॥*
*। पितु असीस आयसु मोहि दीजै । हरष समय बिसमउ कत कीजै ॥३॥*
*। तात किएँ प्रिय प्रेम प्रमादू । जसु जग जाइ होइ अपबादू ॥४॥*

*म. । बोलुं न शकवे नृप विव्हळती । शोकजनित दाहें हृदिं जळती ॥१॥*
*। अति अनुरागें पदिं शिर नमती । आज्ञा रघुविर उठुनि मागती ॥२॥*
*। तात आशिषा आज्ञा दीजे । हर्ष समयिं कां विषाद कीजे ॥३॥*
*। प्रिय-प्रेमवश घडे प्रमादू । तैं यशनाश जगीं अपवादू ॥४॥*

**अर्थ** : दशरथ राजांस बोलवत नाही; (सारखं) विव्हळत आहेत आणि शोकाने उत्पन्न झालेल्या दाहाने हृदय जळत आहे.॥१॥ (तेव्हा) वडिलांच्या पायांवर अति अनुरागाने डोके ठेवले व उठून रघुवीराने निरोप (आज्ञा) मागितला.॥२॥ (म्हणाले की) बाबा ! मला आशीर्वाद देऊन आज्ञा द्यावी. हर्षाच्या प्रसंगी विषाद का बरे करता (करावा).॥३॥ बाबा ! प्रेमास्पद (प्रिय)

माणसाच्या प्रेमाला वश झाल्याने प्रमाद घडतो; आणि यशाचा नाश व जगात निंदा होते.॥४॥

**टीका.चौ. (१) बोलुं न शकवे** - बोलण्याची इच्छा आहे पण शक्ति नाही; आणि वनात जा असे सांगण्यास धीर होत नाही. हे शब्द उच्चारण्याचा जो जो प्रयत्न करतात तो तो व्याकुळता वाढत आहे. हृदयदाह एवढ्याचमुळे की स्त्रीवश होऊन, तिच्यावर विश्वास ठेवला, म्हणून माझ्यावर हा प्रसंग ओढवला ! ज्या तोंडाने काल म्हटले की राज्य देतो त्याच तोंडाने निरपराधी रामाला वनात जा असे कसे सांगू ! रघुवीराने पाहिले की आज्ञा देतीलसे दिसत नाही. व्याकुळता वाढत आहे. तेव्हा आता आपणच पूर्वी सुचविल्याप्रमाणे (४६।४) वंदन करून जाणेच योग्य आहे.

**चौ. २ - (१) अति अनुरागें पदिं शिर नमती** - गुरुजनांना वंदन करणे ते प्रेमाने केले पाहिजे. राम तर अति प्रेमाने पायांवर मस्तक ठेवीत आहे. पितृवचन पालन करून 'पुत्र' नांव सार्थक करण्याची सुसंधी मिळाली आहे व जाऊ नकोस असे वडिलांनी सांगितले नाही. **(क) रघुबिर =** रघुवीर; येथे मुख्यतः विद्यावीरता, धर्मवीरता, त्यागवीरता, ऋजुतावीरता व कृपावीरता दिसून येतात. माता पिता इ. सर्वांना सोडून जाताना जरासुद्धा खेद झाला नाही **ही विद्यावीरता**; पित्याचे वचन पाळण्यासाठी वनात जात आहे **ही धर्मवीरता;** साम्राज्य लक्ष्मीचा आनंदाने त्याग करून खडतर वनवास पत्करला **ही त्यागवीरता.** कैकयीने कपटाने घात केला तरी त्याचा उच्चारही न करता स्वतः अगदी सरळ हृदयाने वागले **ही ऋजुतावीरता आहे;** आणि या सर्वांच्या मुळाशी गोब्राह्मण संत इत्यादींवर कृपा करण्याची इच्छा आहे म्हणून **कृपावीरता दिसली.**

**चौ. ३ - (१) तात ! आशिषा आज्ञा दीजे** - आशीर्वाद मागण्याची पाळी आली ! यावरून ठरले की रघुवीराने नमस्कार केला तरी दशरथांनी आशीर्वाद दिला नाही. आशीर्वाद देणे म्हणजे या वेळी वनांत जा असे सांगण्यासारखे आहे. शिवाय शोकविव्हल झाल्यामुळे बोलवत नाही हे कारण आहेच. **(क) आशीर्वाद मागण्याची जरुर काय?** असे आधुनिक स्वशिक्षितांना वाटण्याचा संभव आहे. मातापिता इत्यादींनी प्रेमाने दिलेल्या आशीर्वादात काय सामर्थ्य असते हे

ज्यांना कळत नाही त्यांना वरच्यासारखा प्रश्न उत्पन्न होणारच. राम स्वतःच म्हणाले, 'माते दे आज्ञा मुदिता मनिं । मग मुद मंगल जातां काननिं ॥५३।७. 'पथिं वनिं मंगल कुशल आमचें । कृपा - अनुग्रह - पुण्यें तुमचे ॥८॥ 'तुमचे कृपेने तात काननी जात सुख पावेन मी' (१५१ छं.) **कृपानुग्रह** = आशीर्वाद. **(ख) हर्षसमयी कां विषाद की जे** - मुळांतील बिसमउ = विस्मय = खेद, विषाद असा अर्थ आहे. सत्याचे पालन करण्याचा सुयोग आला आहे म्हणून ही वेळ हर्ष मानण्याची आहे. या विषयी पूर्वी टीकेत विस्तार केला आहे. (२८।५-६ पहा) **'न सत्येन समोधर्मः' धर्मपालन करण्याची वेळ म्हणजे हर्षाची वेळ व अधर्माचरणाची वेळ म्हणजे दुःखाचा प्रसंग हा सिद्धान्त** येथे सुचविला.

**चौ. ४ - (१) प्रियप्रेमवश घडे प्रमादू** - दशरथांस राम प्राणांपेक्षा प्रिय आहेत; त्या प्रेमाला वश होऊन ते वनवासाची आज्ञा देत नाहीत, हा प्रमाद घडत आहे. कैकयीला वर देऊन प्रतिज्ञाबद्ध झाल्याने अशी आज्ञा देणे हे कर्तव्य आहे. कर्तव्यच्युत होणे हा प्रमाद दोष आहे. **प्रमाद** = अविवेकाने केलेले कृत्य. (अविकृष्ट कृत्यस्य अ.व्या.सु.) (क) प्रमाद घडण्यास - स्वार्थ, भय, क्रोध, इत्यादी अनेक विकार कारण असू शकतात. हे सर्व विकार निंद्य आहेत. प्रियावर प्रेम करणे निंद्य नाही; ते इष्टच आहे. पण त्या प्रेमाला वश होऊन कार्याकार्य, धर्माधर्म विचार सुटतो तेव्हा **प्रमाद घडतो व असे घडणे निंद्य, यशोहानिकारक आहे. प्रियप्रेम धर्मानुकूल कार्य करीत असेल तोपर्यंतच ते इष्ट मानावे.** पण निधर्मी राज्यात हे कसे होणार?

*हिं.* *। सुनि सनेह बस उठि नरनाहाँ । बैठारे रघुपति गहि बाहाँ ॥५॥*
*। सुनहु तात तुम्ह कहुँ मुनि कहहीं । रामु चराचर नायक अहहीं ॥६॥*
*। सुभ अरु असुभ करम अनुहारी । ईसु देइ फलु हृदयँ बिचारी ॥७॥*
*। करइ जो करम पाव फल सोई । निगम नीति असि कह सबु कोई ॥८॥*

*म.* *। स्नेहें, श्रवुनि उठुनि, नरनाहू । बसविति धरुनी रघुपति-बाहू ॥५॥*
*। ऐका तात ! तुम्हां मुनि म्हणती । राम चराचर नायक असती ॥६॥*
*। शुभ या अशुभ कर्म - अनुसारें । ईश देइ फल हृदय - विचारें ॥७॥*
*। कर्म करी जो त्या फळ मिळती । निगम नीति अशि सगळे वदती ॥८॥*

**अर्थ :** (रघुवीराचे म्हणणे) ऐकून, स्नेहाने उठून नरनाथाने रघुपतींचा दंड (बाहु) धरून त्यांना खाली बसविले.।।५।। (आणि म्हणाले की) हे पहा तात ! राम चराचर नायक आहेत असे मुनि तुमच्याविषयी (तुम्हाला) म्हणतात.।।६।। शुभ वा अशुभ कर्माला अनुसरून, हृदयाचा विचार करून, ईश फल देतो ।।७।। (आणि) जो कर्म करतो तोच त्याची फळे भोगतो (त्यालाच मिळतात) असे वेद, नीति व सर्वच म्हणतात.।।८।।

**टीका. - चौ. ५ - (१) श्रवुनि उठुनि स्नेहें नरनाहू बसविति** - दशरथ बसलेले आहेत व राम त्यांच्या आशीर्वादाची व आज्ञेची वाट पहात उभे आहेत. हर्षसमयी विषाद का करता व 'प्रियप्रेमवश घडे प्रमादू' वगैरे जे राम म्हणाले त्यामुळे व ऐश्वर्यभाव एकाएकी जागृत झाल्याने तर दशरथांच्या प्रेमाला उत्साह चढला. शक्ती नव्हती तरी चटकन उभे राहिले. चराचर नायकाला उभा ठेऊन आपण बसलो बरे नाही अशी ऊर्मी उठली.

**चौ. ६ - (१) ऐका तात !... असती** - या चौपाईतील भाव हा आहे की तुम्ही सर्व सृष्टीचे नियंते, परमात्मा आहात. तेव्हा मी तुम्हांस आशीर्वाद व आज्ञा देणे योग्य नाही. (क) मुनि म्हणती - वसिष्ठ मुनींनी हे रहस्य दशरथांस दोन वेळा सांगितले आहे. एकदा विश्वमित्रांबरोबर रामलक्ष्मणांस पाठविण्याच्या वेळी (१।२०८।८) **तैं वसिष्ठ विविधा समजावति । नृपसंदेह विनाशा पावति ।' आणि पुन्हा 'श्रुणु नृप ज्यास विमुख पस्तावति । यद्‌भजनाविण ताप न टळती ।। झाला तुमचा सुत तो स्वामी । राम पुनीत प्रेम अनुगामी'** (२।४।७-८)

**चौ. ७-८ (१) ईश देइ फल** - कर्मफलाचा दाता ईश्वर आहे; **'कठिण कर्मगति जाणि विधाता । जो शुभ अशुभ कर्मफल - दाता'** भाव हा की जो ईश्वर सर्वांना कर्माचे चांगले-वाईट फळ देतो तो स्वतः कर्मफळभोक्ता कसा असेल? तसे मानल्यास त्याला कर्मफळ देणारा दुसरा कोणी ईश्वर, त्याला देणारा तिसरा या प्रमाणें अनवस्था प्रसंग येईल. ईश्वर कर्म करीत नाही म्हणून त्याला कर्मफलभोग नाही. तुम्ही ईश्वर आहात, मग वनात का जाता? **'कर्म शुभाशुभ तुम्हां न बाधी' (महा स्वतंत्र, न कोणि शिरावर'** (१।१३७।४,१)

**(२) कर्म करी जो त्या फळ मिळती** - भाव हा की तुम्ही ईश आहात; तुम्ही

कोणतेच शुभ वा अशुभ कर्म करीत नाही व तुम्हाला शुभाशुभ कर्म भोगावे लागत नाही. मी पापकर्म केले त्याचे फळ मलाच मिळावयास पाहिजे होते; ते मला न मिळता तुम्हाला मिळत आहे. हे वेदमताविरुद्ध, नीतिमताविरुद्ध व सर्व लोकमताविरुद्ध का घडत आहे? वेदांच्या कर्मविपाक सिद्धांताचा मान रहावा, वेदवाणी मिथ्या ठरू नये असे तुम्हांस वाटत असेल तर तुम्ही वनात जाऊ नका. मी वनात जातो व माझ्या कर्माचे फळ भोगतो. एवढे सांगून सुद्धा राम काही बोलत नाहीत असे पाहून आणखी थोडे स्पष्टच सांगतात :

***हिं.दो.*** *। औरु करै अपराध कोउ और पाव फल भोगु ॥*
*॥ अति बिचित्र भगवंत गति को जग जानै जोगु ॥७७॥*

***म.दो.*** *। कोणि एक अपराध करि भोगी दुजा फळास ॥*
*॥ अति विचित्र भगवंत-गति जगीं कळे कोणास ॥७७॥*

**अर्थ :** कोणीतरी एकाने अपराध करावा व (त्याचे) फळ (शिक्षा) दुसऱ्या कोणी तरी भोगावे (जे नीतीला सुद्धा संमत नाही) हे कसे? (त्यावर राम म्हणतात) भगवंताची गति अति विचित्र ती या जगात कोणास कळणार? (कोणालाही कळणे शक्य नाही)।।७७।।

**टीका.** (१) एकाने कर्म करावे दुसऱ्याने त्याचे बरे-वाईट फळ भोगावे ही गोष्ट ईशनिर्मित, वेदोक्त, कर्मविषयक सिद्धान्तात बसत नाही व राजनीति शास्त्रातही नाही. येथे 'कर्म' न म्हणता 'अपराध' = गुन्हा हा शब्द घालून राजनीति शास्त्राकडे बोट दाखविले आहे. चोरीचा अपराध 'क' ने करावा व 'क्ष'ला शिक्षा दिली जावी असे आपल्या राजनीति शास्त्रास तरी मान्य आहे का? चोराला सोडून संन्याशाला सुळी द्यावा हा अन्याय आहे. भरतजननीला न विचारता राज्याभिषेकाचा बेत केला हा अपराध माझा आहे; व त्या बद्दलची शिक्षा तुम्हाला भोगावी लागत आहे हे कसे? हा अन्याय नाही का? या प्रश्नांना उत्तर न देणे म्हणजे दशरथांचा अपमान करणे आहे व ऐश्वर्य तर प्रगट करावयाचे नाही अशा स्थितीत राम मोठे मार्मिक उत्तर देतात :

(२) **अति विचित्र भगवंतगति जगीं कळे कोणास** – रघुपतींच्या म्हणण्याचा भाव हा आहे की ज्या वेळी व्यवहारात कर्ता एक व त्याच्या फळाचा भोक्ता

दुसरा असे धर्म व नीतिविरुद्ध घडत असलेले दिसले तेथे त्याच्या मुळाशी असा काही कर्माचा विचित्र संबंध असतो की तो जीवांना कळणे शक्य नसते. कर्माची गूढ गति भगवान जाणतात. 'कठिण कर्मगति जाणि विधाता । जो शुभ अशुभ कर्मफल दाता । व भगवंताची गति तर कोणालाच कळणे शक्य नाही. 'कर्मप्रधान विश्वा राखित । जो करि जसें तसें फळ चाखित ॥' (२१९।४) आज जे फळ मिळत आहे ते कोणत्या व कधी केलेल्या कर्माचे आहे हे ईश्वराशिवाय कोणाला कळणे अशक्य आहे. एकटा ईश ते जाणतो. (क) दशरथ रघुनाथास ईश्वर मानीत असले तरी ईशत्व प्रगट करण्याची इच्छा नसल्याने, पुत्रभावाने, जीवभावानेच राम बोलत आहेत. भगवानसुद्धा काही अतिविचित्र कारणांस्तव काही कर्मभोग भोगल्याचे नाट्य करीत असतात. **'अंगिकारुनी माझ्या शापा । सोशिति राम भारि बहु तापां'** (३।४१।६) असे नारदांनी म्हटले आहे. रामास घरी ठेवण्यासाठी दशरथांनी वरील चौपायांत वर्णित काही अजब युक्त्या योजल्या. पण रामचंद्रांनी दिलेल्या उत्तराने त्या निष्फळ ठरल्या. 'कर्मणो गहना गतिः' हा सिद्धान्त अटळ आहे.

***हिं.*** ***। रायँ राम राखन हित लागी । बहुत उपाय किए छलु त्यागी ॥१॥***
***। लखी राम रुख रहत न जाने । धरम धुरंधर धीर सयाने ॥२॥***
***। तब नृप सीय लाइ उर लीन्ही । अति हित बहुत भाँति सिख दीन्ही ॥३॥***

***म.*** ***। घरिं रामा राखाया राया । त्यजुनी छल बहु करी उपायां ॥१॥***
***। नाहिं रहात, रामकल जाणे । धर्म - धुरंधर धीर शहाणे ॥२॥***
***। मग नृप सीते हृदयीं घेई । प्रेमें बहु उपदेशा देई ॥३॥***

**अर्थ :** रामाला घरी ठेऊन घेण्यासाठी राजाने छल सोडून पुष्कळ उपाय केले.॥१॥ पण रामाच्या कलावरून जाणले की ते धर्मधुरंधर धीर व शहाणे असल्याने रहात नाहीत.॥२॥ तेव्हा राजाने सीतेस हृदयाशी धरली व फार प्रेमाने बहुत उपदेश केला.॥३॥

**टीका. चौ. १ - (१) रामा घरिं राखाया बहुत उपाय राया करी** - राजाने त्यासाठी प्रथम कैकयीला हात जोडून नाना प्रकारे विनंत्या केल्या. नंतर शंकरांस प्रार्थनारूपी उपाय केले. मग सूर्याने उगवू नये म्हणून सूर्याला व रात्रीने उजाडू नये म्हणून रात्रीला प्रार्थना हे उपाय मनात केले. मागील चौपायांत कर्मविपाक

सिद्धान्ताच्या बळावर उपाय केला पण तो अस्पष्टपणे गूढार्थाने केला. येथे या उपाय वर्णनाचा उपसंहार करीत आहेत. हे सर्व व्यर्थ गेले तेव्हा **त्यजुनी छल** म्हणजे मनात, गूढार्थाने सांगणे इत्यादी सोडून कैकयीची पर्वा न करता उघड उघड रीतीनेसुद्धा सांगून पाहिले की स्त्रीजित कामार्त झालेल्या माझ्या वचनांना काही किंमत नाही. 'आर्त कधीं न विचारें वदतो'. म्हातारपणी बुद्धिभ्रंश झालेल्या माझ्या वचनांना न जुमानता घरी राहणेच योग्य. कैकयीला मी आज वर दिले ते माझा हक्क नसता अन्यायाने दिले. कारण मी तुला कालच वचनाने राज्य दिले आहे. कालपासूनच राज्य तुझे झाले. राज्यापहार करणाऱ्या मला तू कैदेत टाक व तुझे राज्य तू घे. कुलपरंपरा व मनुमहाराजांचा नियम मी मोडला म्हणून मला कैदेत टाक इत्यादी प्रकारांनी सांगून पाहिले. (वा.रा. सर्ग ३४)

**चौ. २ - (१) नाहिं रहात रामकल जाणे** - रामचंद्रांचा राहण्याचा कल दिसला नाही. गंभीर मुद्रेत जरासुद्धा फरक नाही. हो म्हणत नाहीत. इत्यादी लक्षणांवरून जाणले. वा.रा. रघुवीराने स्पष्टच सांगितले आहे की मी एक रात्रच काय एक क्षणसुद्धा आता अयोध्येत राहणे शक्य नाही. माझा निश्चय कशानेही बदलणार नाही. सर्ग ३४ वा सर्वच वाचून पाहण्यासारखा आहे. **(क) मानसांतील राम अधिक विनयी व संकोचशील** असल्याने काही न बोलताच त्यांनी आपली मनीषा व्यक्त केली. पितृवचनाची परिपूर्ति करणे हा पुत्राचा धर्म आहे हे ते जाणतात म्हणून **शाहणे** म्हटले. पुत्रधर्माचे पालन करण्यासाठी राज्यत्याग व वनवास मान्य केला म्हणून **धर्मधुरंधर** म्हटले; परंतु असले संकट, असले दुःख आनंदाने निर्विकार राहून स्वीकारण्यास अत्यंत सात्विक धैर्य लागते म्हणून धीर म्हटले.

**चौ. ३ - (१) सीते बहु उपदेशा देई** - राम नाही राहात तर नाही, निदान सीता राहिली तरी प्राणांना आधार होईल म्हणून व ती लहान वयाची, कोमल, वनवास दुःख सहन होणार नाही इ. जाणून तिची समजूत घालण्याचा प्रयत्न आता करतात. **अतिहित** = अति प्रेमाने.

***हिं.*** ***। कहि बन के दुख दुसह सुनाए । सासु ससुर पितु सुख समुझाए ॥४॥***
***। सिय मनु राम चरन अनुरागा । घरु न सुगमु बनु बिषमु न लागा ॥५॥***
***। औरउ सबहिं सीय समुझाई । कहि कहि बिपिन बिपति अधिकाई ॥६॥***

*। सचिव नारि गुर नारि सयानी । सहित सनेह कहहिं मृदु बानी ॥७॥*
*। तुम्ह कहुँ तौ न दीन्ह बनबासू । करहु जो कहहिं ससुर गुर आसू ॥८॥*
म. *। बहु वन-दुखें दुःसह सांगति । सासु-सासरा-पितृसुख वानति ॥४॥*
*। रामचरणिं अनुरक्त सितामन । शुभ न गमे गृह विष मन कानन ॥५॥*
*। इतर सकल सीते समजाविति । विपिन-विपत्ती विशेष वानिति ॥६॥*
*। सचिव-नारी गुरुनारि शहाणी । स्नेहानें सांगति मृदुवाणीं ॥७॥*
*। वनगमनाज्ञा तुम्हांस तों ना । श्वशुर-सासु-गुरु-वचना माना ॥८॥*

**अर्थ** - (दशरथांनी) वनांतील बहुत दुःसह दुःखे पुष्कळ सांगितली आणि सासू-सासरा (सासरचे) आणि पिता (माहेरचे) यांच्या येथील पुष्कळ सुख वर्णन केले.॥४॥ (परंतु) सीतेचे मन रामचरणी अनुरक्त असल्यामुळे तिला घर चांगले वाटत नाही व वन कठीण (विषम) वाटले नाही.॥५॥ (तिथे असलेल्या) इतर सर्वांनीही वनांतील विपत्तींचे विशेष वर्णन करून सीतेला समजाविली (प्रयत्न केला) ॥६॥ सचिवाची पत्नी आणि ज्ञानी गुरुपत्नी (अरुंधती) यांनी स्नेहाने गोड शब्दांत सांगितले की.॥७॥ तुम्हाला काही वनात जाण्याची आज्ञा झालेली नाही. (तुम्हाला वनवास दिलेला नाही) तेव्हा तुम्ही सासरा, सासू व गुरु (वडील माणसे) सांगत आहेत ते माना (ऐका) ॥८॥

**टीका. चौ. ४-५** (१) वनातील दुःखांचे वर्णन ऐकून भय वाटावे आणि सासरचे व माहेरचे सुख आठवून त्याचा लोभ उत्पन्न व्हावा या हेतूने या विरोधी गोष्टींचे तुलनेने वर्णन केले, पण त्याचा उपयोग होणे अगदी अशक्य हे रामसीता संवादावरून सहज कळते. (क) **रामचरणिं अनुरक्त सितामन** - सीतेच्या मनाला रामचरणांजवळ राहण्यातच सप्त स्वर्गातील सर्व सुख आहे असे राम-सीता संवादांत सिद्ध झाले आहे. तिला राम विरहित सप्त स्वर्ग नर्कासमान वाटतात. (दो.६४) व **'प्रभु ! सुख सकल तुम्हां सह असतां'** (६५।८) असे जी म्हणाली आहे तिला सासरच्या-माहेरच्या सुखाची किंमत ती काय !

**चौ. ६-८** (१) **इतर सकल सीते समजाविति** - ही रंगभूमी कैकयीचा महाल आहे. येथे सचिव सुमंत आहे. कारण त्यानेच दशरथांस उठवून बसविले आहे. गुरु वसिष्ठ येथे नाहीत. कारण त्यांचा निरोप घेण्यास आता राम जाणार आहेत.

कौसल्या असण्याचे आता कारण नाही. इतर पुरुष कोणी असणे शक्य नाही. म्हणून सुमित्रा व इतर राण्या व सुमंत्र आणि राण्यांच्या प्रिय सखी या शिवाय कोणी असणे शक्य नाही. (वा.रा. प्रमाणे वसिष्ट येथे आहेत). (क) राजाने वनदुःखाचे वर्णन केले पण तेवढ्याने परिणाम झाला नाही म्हणून या सर्वांनी विशेष विस्तारपूर्वक वर्णन केले.

(२) '**गुरुनारि शहाणी** - दाखविले की गुरुवसिष्ठ ज्ञानी असून, सर्व जाणत असून, रामावतार नाटकांत नाट्य करतात. तसेच अरुंधतीने केले. आतापर्यंत जो महत्त्वाचा मुद्दा कोणी पुढे केला नव्हता तो सचिव नारी व अरुंधती यांनी पुढे आणला. दाखविले की सुमंत्र जसा चतुर व प्रसंगावधानी आहे तशीच त्याची पत्नीही आहे. (क) त्या म्हणाल्या रघुनाथांस पिता व माता यांनी वनवास दिला असल्यामुळे ते जात आहेत हे योग्यच आहे. तुम्हाला काही कोणीही वनवास दिलेला नाही. म्हणून तुम्ही जाण्याची आवश्यकता नाही. आणि सासरा व सासू आणि इतर वडील माणसांनी तुम्हांस घरी राहण्यास सांगितले आहे. म्हणून त्यांच्या सांगण्याप्रमाणे वागावे, वनात जाऊ नये हेच योग्य आहे. (ख) गुरु = सुमंत्र मानणेच मानसाधारे योग्य आहे. कारण राम सुमंत्रास पित्यासमान मानतात. ३९।६ पहा. तुम्हिं तर पितृसम अतिहित मातें ! तात ! विनवितो जुळुनि करांतें' (९६।१) असे राम सुमंत्रास म्हणाले आहेत. सीतासुद्धा त्यांस पित्यासमान व श्वशुरासमान मानते. 'श्वशुर-पित्यांसम तुम्हिं हितकारी । प्रत्युत्तरणें अनुचित भारी' (९७।८) गुरुवसिष्ठ येथे नाहीत हे आता लवकर दिसेल.

*हिं.दो.* *। सिख सीतलि हित मधुर मृदु सुनि सीतहि न सोहानि ॥*
*। सरदचंद चंदिनि लगत जनु चकई अकुलानि ॥७८॥*

*म.दो.* *। शिकवण शीतल मधुर मृदु हित, न रुचे सीतेस ॥*
*॥ शरच्चंद्र-कर लागतां जणु कोकीला क्लेश ॥७८॥*

**अर्थ** - शीतल, मधुर, मृदु व प्रेमळ (हित) शिकवण सीतेला आवडली नाही; (उलट) शरद ऋतूतील चंद्राचे किरण (चांदणे) लागताच जणू कोकीसारखे क्लेश झाले (व्याकुळ झाली) ।।दो.७८।।

**टीका. - (१) शिकवण शीतल मधुर मृदु हित** - येथील हित : प्रेम (प्रेमळ);

हा शब्द चौ. ३ (हिंदी) मध्ये याच अर्थाने आहे. राजाचा उपदेश अति प्रेमळ आहे. (चौ.३). सचिव नारी व गुरुनारी यांचा स्नेहाने - प्रेमाने - केलेला व मृदु आहे. मधुर व शीतल सर्वांचाच आहे. (क) चंद्रकिरणांचा स्पर्श होताच कोकी = चक्रवाकी प्रियवियोगाने व्याकुळ होते व तिला क्लेश होतात. तसेच जणू सीतेला झाले. या उपमानाचा उपयोग सीतेविषयीच अनेक ठिकाणी केला आहे. (६४।२ टी. पहा).

*हिं.* *। सीय सकुच बस उतरु न देई । सो सुनि तमकि उठी कैकेई ॥१॥*
*। मुनि पट भूषन भाजन आनी । आगें धरि बोली मृदु बानी ॥२॥*
*। नृपहि प्रानप्रिय तुम्ह रघुबीरा । सील सनेह न छाड़िहि भीरा ॥३॥*
*। सुकृत सुजसु परलोकु नसाऊ । तुम्हहि जान बन कहिहि न काऊ ॥४॥*

*म.* *। सिता न दे संकोचें उत्तर । रुष्ट उठे तैं कैकइ सत्वर ॥१॥*
*। मुनिपट - भूषण - भाजन आणी । ठेउनि पुढें वदे मृदुवाणीं ॥२॥*
*। नृपा प्राण - प्रिय तुम्हि रघुवीरु । शील स्नेह न सोडिति भीरु ॥३॥*
*। सुकृत सुयश परलोक हि भंगति । तुम्हां न तरि वनिं जा कधिं सांगति ॥४॥*

**अर्थ :** सीतेने संकोचाने उत्तर दिले नाही, तेव्हा कैकयी रोषाने त्वरेने उठली.॥१॥ मुनिवस्त्रे (वल्कले) मुनिभूषणे आणि मुनिपात्रे तिने आणली आणि ती पुढे ठेवून मृदु वाणीने म्हणाली की ॥२॥ रघुवीर ! तुम्ही राजांना प्राणांसारखे प्रिय आहात व ते कातर (भीरु) बनले असल्याने शील व स्नेह सोडू शकणार नाहीत.॥३॥ सुकृत, सुयश आणि परलोक यांचाही नाश झाला तरी वनात जा असे तुम्हाला कधीही सांगणार नाहीत.॥४॥

**टीका. चौ.** (१) दशरथांनी रामास सांगितल्यावर त्यांनी उत्तर दिले नाही. नंतर सर्वांनीच सीतेला सांगितले की घरी रहा. रामचंद्रांनी संकोचाने उत्तर दिले नाही. तसेच सीतेनेही दिले नाही. यामुळे कैकयीला वाटले की बहुधा कोणीच वनात जात नाहीत. यामुळे ती संतापली व त्वेषाने उठून गेली.

**चौ.** २ (१) वल्कले, रुद्राक्षाच्या माळा, गोपीचंदन, भस्म, मृत्तिका, कमंडलु, मृगचर्मे इ. मुनिव्रताला व मुनिवेषाला लागणारे जिन्नस पुढे आणून ठेवले. सीतेला वनवास तिने मागितला नव्हता हे खरे. पण ती (म्हणजे कौसल्येचे एक सुखाचे

स्थान) अनायासे स्वतःच वनात जाण्यास तयार झाली असता सगळ्यांनी तिचे कान भरले; याचा तिला राग आला. तिघांना पुरेल व उपयोगी पडेल अशी व इतकी सर्व तयारी पुढे आणून ठेवली आणि सुचविले की (क) मुनिवेष माझ्या देखतच करून गेले पाहिजे. (हेतु कौसल्येला जास्तीत जास्त दुःख देणे हा आहे.) (ख) रामलक्ष्मणांनी भरताच्या राज्यातील दुसरी काहीही संपत्ती बरोबर नेऊ नये. (ग) राम व सीता यांना सुवर्ण सिंहासनावर बसलेली पाहून व लक्ष्मण रामाचा दिवाण झालेला पाहून नयनानंद लुटण्याची ज्यांची ज्यांची इच्छा होती त्यांनी तिघांना मुनिवेषात पाहून आपल्या डोळ्यांचे पारणे फेडून घ्यावे.

**चौ. ३-४** - वनात जा असे राजा रामास सांगत नाही. राम अजून वनात जात नाहीत. कैकयी क्रूद्ध तर झाली आहे; पण रामाला हुकूम देण्याचा तिचा अधिकार नाही. तरी ती काही कमी बुद्धिमान व युक्तिबाज थोडीच आहे काय? अगदी गोड शब्दांनी असे मुद्देसूद बोलते की राम स्वतःच वनात जातील. (१) **रघुवीरु = रघुवीर**; तुम्ही रघुवीर आहात हे लक्षात ठेवा. राजे भीरु = भित्रे झाले आहेत. पण तुम्ही रघुवंशांतील अलौकिक वीर आहात. तुम्हाला जा म्हणून सांगावे तर स्नेहाचा नाश होतो. स्नेह सोडावा लागतो. जाऊ नका म्हणावे तर शीलाचा त्याग करावा लागतो. राजांची इच्छा स्नेह किंवा शील काहीच सोडण्याची नाही. म्हणून काहीच बोलत नाहीत. दो. ४० मध्ये जवळ जवळ असेच सांगितले आहे. (गू.चं.प.).

(२) **सुकृत सुयश परलोकहि भंगति** - सांगति - दशरथांनी शंकरांस प्रार्थना करताना जे मनात म्हटले तेच कैकयीने येथे सांगितले आहे. '**अपयश मिळो सुयश जगिं जावो । मिळो नर्क वा स्वर्ग न पावों ॥ रामा नेत्रां आड न नेणें**' (४५।१-२). कैकयीचा भाव हा की तुम्हीच आता वनात न गेलात तर राजांनी आजपर्यंत केलेले सर्व पुण्य, मिळवलेली सर्व कीर्ती व प्रतिष्ठा यांचा नाश तर होणारच आणि मिथ्या प्रतिज्ञ म्हणून अपकीर्ती होईल; आणि त्यामुळे परलोक प्राप्ति होणार नाही. बरे वाटेल ते झाले तरी वनात जा असे आपल्या तोंडाने ते तुम्हाला कधीही सांगणार नाहीत. यातून कोणते योग्य ते ठरवा असे आता सांगेल.

हिं. । अस विचारि सोइ करहु जो भावा । राम जननि सिख सुनि सुखु पावा ॥५॥
। भूपहि बचन बान सम लागे । करहिं न प्रान प्रयान अभागे ॥६॥
। लोग बिकल मुरुछित नरनाहू । काह करिअ कछु सूझ न काहू ॥७॥
। रामु तुरत मुनिबेषु बनाई । चले जनक जननिहि सिरु नाई ॥८॥
म. । करा विचारें रुचे तुम्हां तें । जननी-वचनें सुख रामातें ॥५॥
। भूपा वचन बाण सम लागे । प्राण निघून न जाति अभागे ॥६॥
। लोक विकल मूर्छित नरराणा । करणें काय सुचे कोणा ना ॥७॥
। त्वरित राम मुनिवेषा करुनी । निघति जनकजननिस शिर नमुनी ॥८॥

**अर्थ :** (कैकयी म्हणाली की मी सांगितले त्याचा) विचार करून तुम्हास रुचेल ते करा. जननीच्या भाषणाने (ते ऐकून रामास सुख झाले.)॥५॥ कैकयीचे भाषण भूपास बाणांसारखे लागले (व मनात म्हणाले की) हे अभागी प्राण निघून का जात नाहीत.॥६॥ सर्व लोक व्याकुळ झाले आहेत. नरनाथ दशरथ मूर्छित पडले आहेत व काय करावे हे कोणास सुचत नाहीसे झाले आहे.॥७॥ रामचंद्रांनी त्वरेने मुनिवेष केला आणि जनक व जननी कैकयी यांना मस्तकाने नमन करून ते निघाले.॥८॥

**टीका. चौ. ५ (१) रु.डे.** - कैकयी अजून नृप, राजा, असेच शब्द वापरीत आहे. पति, तुमचे पिता इत्यादी वापरीत नाहीच. कारण ती नाती ती विसरली आहे. **(क) तुम्हां रुचे तें विचारें करा** - भाव हा आहे की राजांच्या सुकृतादिकांचा विनाश होऊ देणे किंवा संरक्षण करणे आता तुमच्या इच्छेवर आहे. काय रुचेल ते करा. अमुकच करा असा माझा आग्रह नाही. **(क) जननीवचने रामातें सुख (झालें)** - इच्छेप्रमाणे करण्याची मातेची आज्ञा मिळाली आहे. आता वडिलांच्या तोंडची आज्ञा न मिळाली तरी काही हरकत नाही असे ठरले म्हणून सुख झाले.

**चौ. ६ - (१) भूपा वचन बाण सम** - राम सहज आनंदनिधान असल्याने त्यांस सुख झाले पण तेच कैकयीचे वचन राजाला अत्यंत प्रतिकूल असल्याने बाणांसारखे बोचले. **(क) प्राण अभागे** म्हणण्याचे कारण हेच की राम नेत्रांसमोर असता निघून जात नाही. शेवटी रामविरहानेच ते जाणार असे वाटले. **राम नेत्रांसमोर असता प्राण जाणे हे परम भाग्याचे लक्षण आहे** हे सुचविले. **हे** भाग्य

जटायूच्या व वालीच्या प्राणांना लाभले आहे. (४।१।छंद पहा.) **'रामवियोगें मार न मजला'** असे कैकयीला राजाने पूर्वीच विनविले आहे.

**चौ. ७-८ (१) लोक विकल** - राजद्वाराजवळ जी बेफाम गर्दी झाली आहे, तेथील लोकांची दशा सांगितली. जो तो हाय हाय ! करीत विव्हळत आहे. आणि हा आक्रोश रामकैकयी वगैरेंना ऐकू येत आहे, म्हणून लोकांच्या व्याकुळतेचा उल्लेख येथे केला. **(क) त्वरेने मुनिवेष धारण** करण्यात हेतु हा आहे की दशरथ त्या वेषांत पाहतील तर शोकाने कदाचित त्यांचे प्राण जाण्याची विशेष शक्यता वाटली. तसे झाले तर वनात जाणे शक्य होणार नाही. १३/१४ दिवस तरी रहावे लागेल व तितक्यात भरत आले की ते जाऊ देणार नाहीत; म्हणून राजा मूर्च्छित असताच घाईघाईने मुनिवेष करून निघाले. **(ख)** जनक जननिस शिर नमुनी - राजा मूर्छित असल्याने नुसते मस्तक लववून नमन केले व कैकयीच्या पायांवर डोके ठेऊन नमस्कार केला असे मानणे भाग आहे.

**सूचना - 'बसविति भूपा सचिव उठवुनी'** (७६।७) असा उल्लेख राम या वेळी दशरथांकडे आल्यानंतर केला आहे. म्हणजे सुमंत्र रामलक्ष्मणांबरोबरच आले असे ठरले. पुढे **'मूर्छा विगत नृपति मग जागति । सुमंत्रास बोलवुनि सांगति'** (८१।५) या प्रमाणे राजाने सुमंत्रास बोलावून घेतले आहे. म्हणून येथे असे मानणे भाग आहे की रामसीतालक्ष्मण यांच्या पाठोपाठ सुमंत्र गेले. सुमंत्राचे रामावर परम प्रेम आहे हे पुढे दिसणार आहे. **(क)** मुनिवेष कोणी कोणी केला ते आता स्पष्ट सांगतात :

***हिं.दो.*** *। सजि बन साजु समाजु सबु बनिता बंधु समेत ।*
*॥ बंदि बिप्र गुरुचरन प्रभु चले करि सबहि अचेत ॥७९॥*

***म.दो.*** *। बनिता - बंधु समेत बन साज सजुनि सामान ॥*
*॥ नमुनि विप्र गुरुपदां प्रभु निघति हरुनि जनभान ॥७९॥*

**अर्थ** : स्त्री व बंधुसहित वनाचा साज (वेष) व सर्व सामान सजून विप्र व गुरु यांच्या पायांना नमन करून व सर्वांचे देहभान हरण करून प्रभु निघाले-चालले.।।दो.७९।।

**टीका. (१) बनिता बंधु समेत बन साज सजुनि** - मागल्या चौपाईत रामचंद्रांनी

मुनिवेष केला असे सांगितले म्हणून येथे सुचविले की तिघांनीही तेथे कैकयीच्या देखतच मुनिवेष = मुनिसाज केला. सीतेने मुनिवेष केला असल्याचे आणखी सबळ पुरावे मानसांतच आहेत. **'बिसतां सीता तापस बेषीं । पित्या प्रेम परितोष बिशेषीं'** (२८७।१) **'बघुनि जानकिस तापसबेषीं'** (२८६।२) **'सीतेसह राजति रघुराव । बल्कल बसन जटिल तनु शामाहि । जणुं मुनिवेष करुनि रति काम हि'** (२३९।६-७) या अगदी स्पष्ट उल्लेखांवरून निःसंदेहपणे ठरले की सीतेने पूर्णपणे मुनिवनितांचा वेष केला आहे. राम व सीता यांच्या मुनिवेषांत विशेष फरक म्हणजे सीतेच्या अंगावर तिचे काही दागिने आहेत. माहेरच्या वस्तूंवर व स्त्रीधनावर इतर कोणाची मालकी नसते. मुनिवनिता अलंकार वापरीत असत. रामचंद्रांस 'तापसवेष विशेष उदासी' हे वैशिष्ट्य पालन करावयाचे आहे. (क) सामान काय काय घेतले याचे वर्णन वा.रा. सर्ग ३१ व ४० मध्ये आहे. पण वनात जाताना जे वर्णन आहे त्यात तलवारीचा उल्लेख मुळीच नाही. धनुष्यबाण व भाते यांचे वर्णनच अनेक ठिकाणी आहे. (ख) निघति - निघाल्याचा उल्लेख एकदा मागल्या चौपाईत केला आहे; म्हणून भावार्थ हा की जनक जननीस कोप भवनात नमन केले व तेथून निघाले व राजद्वारापाशी जेथे खूप गर्दी झाली आहे तेथे आले. तेथे विप्रांना व वामदेवादि गुरुजनांना वंदन करून आता तेथून निघाले. या तिघांना अशा वेषांत वनात जाताना पाहून सर्व लोक बेशुद्ध झाल्यासारखे झाले. देहभान राहिले नाही !

*हिं.* *। निकसि बसिष्ठ द्वार भए ठाढ़े । देखे लोग बिरह दव दाढ़े ॥१॥*
*। कहि प्रिय बचन सकल समुझाए । बिप्र बृंद रघुबीर बोलाए ॥२॥*
*। गुर सन कहि बरषासन दीन्हे । आदर दान बिनय बस कीन्हे ॥३॥*

*म.* *। निघुनि बसिष्ठद्वारिं थांबले । लोक बिरह-दव-दग्ध पाहिले ॥१॥*
*। प्रिय वचनीं सकलां समजाविति । विप्रगणां रघुवीर आणविति ॥२॥*
*। गुरुकरिं वर्षासनें देवविति । आदर-दान-विनय-वश बनविति ॥३॥*

**अर्थ :** (राजद्वारांतून) निघून वसिष्ठ गुरुंच्या दाराशी (नगराबाहेर) येऊन थांबले; तेथे दिसले की सर्व लोक विरह दावाग्नीने होरपळून गेले आहेत.॥१॥ प्रिय वचने बोलून सर्वांची समजूत घातली; व रघुवीराने विप्रांच्या समुदायांना

बोलावून घेतले.॥२॥ गुरुंच्याकडून त्यांना वर्षासने देवविली आणि आदर, दान व विनयाने सर्वांना वश केले.॥३॥

**टीका. चौ. १ - (१) वसिष्ठद्वारिं थांबले** - वसिष्ठांचा आश्रम नगराच्या बाहेर होता. राजद्वारांतून जे निघाले ते मधे कुठेही न थांबता वसिष्ठांच्या आश्रमाच्या द्वारापाशी येऊन थांबले. नगरत्याग केला तेव्हा थांबले. येथेसुद्धा वसिष्ठांच्या आश्रमात प्रवेश न करता दाराशीच उभे राहिले. वसिष्ठांच्या द्वाराशी येईपर्यंत प्रभूला जणू लोक कुठे दिसलेच नाहीत. नासाग्र दृष्टी ठेवून चालत आले. तेथे आल्यावर सभोवार दृष्टी टाकली. लोकही प्रभूच्या मागे पुढे धावत-पळत आले. (भानावर आल्यावर) असे दुसऱ्या चरणाने ठरले. वसिष्ठ रघुवीरास येऊन भेटले, त्यांना वंदन केले इत्यादी सर्व अध्याहृत ठेवले आहे.

**चौ. २-३ (१) विप्रगणां आणविति** - अयोध्येतील निरनिराळ्या ठिकाणच्या सर्व ब्राह्मणांना बोलावून आणविले. जमलेल्या गर्दीत व मागे ब्राह्मणही आलेले असणारच. प्रभु ब्रह्मण्य देव आहेत. सर्व ब्राह्मणांना संतुष्ट करून त्यांचे प्रेमाचे सहज आशीर्वाद घेऊन जावे ही शास्त्रानुकूल इच्छा आहे. **(क) वर्षासन =** वर्षासन (वर्ष + अशन) एक वर्षात लागणारे अन्नवस्त्र वगैरेला पुरेल एवढी प्रतिवार्षिक नेमणूक. ब्राह्मणांना उदरनिर्वाहाची चिंता असली म्हणजे तपश्चर्या, वेदाध्ययन, अध्यापन, यज्ञयागादि कर्मे, इत्यादींचा लोप होतो. ब्राह्मणांच्या उदरनिर्वाहाची व पालनपोषणाची जबाबदारी विशेषतः राजावर असते. शिवाय स्वसंपादित द्रव्य नुसते घरात ठेऊन काय उपयोग? 'अहं प्रदातुमिच्छामि यदिदं मामकं धनम् ॥ ब्राह्मणेभ्यस्तपस्विभ्यस्तया सह परंतप ॥ (वा.रा. २।३१।३५) 'धनं हि यद्यन्मम विप्रकारणात् ॥ भवत्सु सम्यक्प्रतिपादितेन ॥ मयार्जितं चैव यशस्करं भवेत्' (३२।४२) वा. रामायणात शेवटी दशरथांकडे जाण्यापूर्वीच दिले आहे. 'वित्तविश्राणनम्' हा सर्ग पहावा. येथे मानसांत वसिष्ठांस सांगून देण्याची व्यवस्था करीत आहेत; म्हणजे या दानांचे श्रेय घेण्याचीसुद्धा इच्छा नाही. विप्र संतुष्ट रहावेत व त्यांना उदरभरणाची चिंता असू नये इतकाच हेतु आहे. **(ख) आदर दान विनयवश केले - वश बळविति =** वश केले; म्हणण्याचा भाव हा आहे की त्यांनी राजा दशरथ, कैकयी किंवा भरत इत्यादी कोणावर

रुष्ट होऊन त्यांस शाप देऊ नयेत इतके संतुष्ट केले. येथे दाखविले की **दान देणे ते आदराने, विनयाने घेणाऱ्यांस प्रार्थना करून सन्मानाने दिले पाहिजे.** (भ.गी. १७।२०-२२ पाहावे). या प्रमाणे विप्रवृंदानां संतुष्ट करून आता याचक-सेवकादिकांस संतुष्ट करतील.

*हिं.* *। जाचक दान मान संतोषे । मीत पुनीत प्रेम पारितोषे ॥४॥*
*। दासी दास बोलाइ बहोरी । गुरहि सौंपि बोले कर जोरी ॥५॥*
*। सब कै सार सँभार गोसाईं । करबि जनक जननी की नाईं ॥६॥*

*म.* *। याचक दान-मान-संतोषित । प्रेमें पूत मित्र पारितोषित ॥४॥*
*। दासि दास बोलावुनि नंतर । सोंपुनि गुरुसि वदति जोडुनि कर ॥५॥*
*। गोस्वामी ! सकलां सांभाळा । प्रेमें जनकजननिसम पाळा ॥६॥*

**अर्थ :** दानाने व सन्मानाने याचकांस संतोषित केले; व पवित्र (पूत) प्रेमाने मित्रांना परितुष्ट केले.॥४॥ नंतर आपल्या दासदासींना बोलावून घेऊन त्यांना गुरुंच्या हाती सोपवून, गुरुजींना हात जोडून विनविले की - ॥५॥ गोस्वामी ! या सर्वांचे पालनपोषण, सांभाळ जनकजननींप्रमाणे करावा.॥६॥

**टीका. चौ. ४ -** (१) मागध, सूत, बंदि, गुणगायक व इतर याचकांना सुद्धा ते संतुष्ट होतील इतके धनधान्य वस्त्रादिक सन्मानाने दिले. मित्र काही घेणार नाहीत हे जाणून निःस्वार्थी, शुद्ध प्रेमाने त्यांची समजूत घालून सर्व प्रकारे त्यांस संतुष्ट केले. **प्रेमात स्वार्थ-कपटादिक मळ नसतील तरच ते प्रेम पवित्र.**

**चौ. ५-६** (१) दासदासींना जवळ बोलावून घेण्याने आदर व्यक्त झाला. या दासदासीत जानकीच्या माहेरून आलेल्या दासी व दास; कौसल्येच्या बरोबर आलेला सेवक वर्ग व आपले स्वतःचे सर्व सेवक यांचा अंतर्भाव होतो. 'सर्वां प्रिय सेवक ही नीती । दासांवर मम अधिका प्रीती' (७।१६।८) असे प्रभुवचन आहे. **(क)** वसिष्ठांना सोपविण्यात हेतु हा की वसिष्ठांचे आश्रित आहेत असे कळल्यावर कैकयी यांना छळणार नाही व वसिष्ठ सर्व समर्थ असल्याने ते सर्वांचे पालन पोषण योग्य प्रकारे करतील. **(ख) जनकजननीप्रमाणे सांभाळा** असे सांगितले, यावरून ठरले की राम व सीता सेवकांवर आईबापांपेक्षा जास्त प्रेम करीत असत; म्हणून इतक्या कळकळीने व्यवस्था लावली.

हिं. *। बारहिं बार जोरि जुग पानी । कहत रामु सब सन मृदु बानी ॥७॥*
*। सोइ सब भाँति मोर हितकारी । जेहि तें रहै भुआल सुखारी ॥८॥*
हिं.दो. *। मातु सकल मोरे बिरह जेहिं न होहिं दुख दीन ।*
*॥ सोइ उपाउ तुम्ह करेहु सब पुर जन परम प्रबीन ॥८०॥*
म. *। वारंवार जुळुनि युग पाणी । सर्वां राम वदति मृदु वाणीं ॥७॥*
*। सर्वपरीं ते मम हितकारी । जे भूपां देती सुख भारी ॥८॥*
दो. *। मम विरहें माता सकल होति न दुःखें दीन ।*
*॥ तोचि उपाय करा सकल पुरजन महा प्रबीण ॥८०॥*

**अर्थ :** रामचंद्रांनी वारंवार हात (पाणी) जोडून सर्वांना मृदु वाणीने सांगितले की.॥७॥ जे कोणी महाराजांना फार सुखी ठेवण्याचा प्रयत्न करतील ते माझे सर्व प्रकारे हितकर्ते होत.॥८॥ माझ्या सर्व माता माझ्या विरहाने, दुःखाने दीन होणार नाहीत असा उपाय तुम्ही अत्यंत प्रवीण पुरजनांनी सर्वांनी करावा.॥दो.८०॥

**टीका. चौ.** ७-८ (१) दशरथांबद्दल रघुनाथांस फार चिंता वाटत आहे; म्हणून हात जोडून जोडून वारंवार विनवीत आहेत की भूपतींना सुखी ठेवण्याचा प्रयत्न करतील ते माझे खरे हितकर्ते होत. भाव हा आहे की माझ्या वनवासाबद्दल राजांना मुळीच दोष देऊ नका. उलट विविध प्रकारे त्यांची समजूत घालून त्यांचे मन इतर विषयांत रमविण्याचा प्रयत्न करा. म्हणजे ते माझ्या विरहाचे दुःख विसरतील व सुखी होतील. **(क) भुआल** = भूपाल = भूप. भूप सुखी असले तरच तुम्हाला व पृथ्वीलाही सुख होईल. ते सुखी असले तरच भूमीचे व तुमचे सर्वांचे पालन करू शकतील, पण तुम्हीच जर असे शोकाकुल होऊन विरहाने झुरत राहिलात तर भूपतींची समजूत घालणे व त्यांस सुख देणे कसे बरे घडेल? ही विनंती मुख्यतः सचिव मंडळ व वामदेवादि मुनिमंडळींना उद्देशूनच असणार. कारण साधारण प्रजाजन दशरथांचे विरहदुःख दूर करून त्यांस सुखी कसे करणार !

**दो. (१) माता सकल** - यांत प्रभु कैकयीचाही अन्तर्भाव करीत आहेत. ते जाणतात की मिळालेल्या यशाने आज जरी आनंदाचे शिखर गाठले असे तिला वाटत असले तरी थोड्याच दिवसांत इतर मातांपेक्षा तीच दुःखाच्या खोल खाईत

कोसळणार आहे. (क) सर्व मातांचे तुम्हा सर्वांवर पुत्रवत प्रेम आहे. माझ्या विरहाने त्या आधीच अत्यंत दुःखी असता तुम्ही सर्व पुरजन असे दीन दुःखी राहिलात तर मातांच्या दुःखांत आणखी भर टाकल्यासारखे नाही का होणार? (ख) मातांचे दुःख वाढविणे म्हणजे अप्रत्यक्षपणे मलाच दुःखात ढकलणे आहे की नाही याचा तुम्ही विचार करा. तुम्ही सर्व व्यवहार, धर्म, नीती इत्यादीत प्रवीण आहात. (ग) कैकयी जननीलासुद्धा विरहशोकाच्या भरात दोष देऊ नका. माझ्या त्या अति प्रिय जननीला दोष देणे, दुःख देणे म्हणजे मी करीत आहे ते तुम्हांस मान्य नाही असे ठरेल. ही विनंती स्त्रिया व पुरुष आणि दासदासी यांना सर्वांना आहे. या प्रमाणे सर्व धनदौलत देऊन टाकली. सर्व निरवानिरव केली. आता वसिष्ठांना वंदन करून प्रयाण करतील.

*हिं. । एहि बिधि राम सबहि समुझावा । गुरु पद पदुम हरषि सिरु नावा ॥१॥*
*। गनपति गौरि गिरीसु मनाई । चले असीस पाइ रघुराई ॥२॥*
*। राम चलत अति भयउ बिषादू । सुनि न जाइ पुर आरत नादू ॥३॥*
*। कुसगुन लंक अवध अति सोकू । हरष बिषाद बिबस सुर लोकू ॥४॥*

*म. । असें राम सकलां समजाविति । गुरु-पद-पादि्मं हर्षि शिर नमविति ॥१॥*
*। प्रार्थुनि गणपति - गौरि - गिरिशां । निघती रघुपति मिळत आशिषा ॥२॥*
*। राम निघत अति विषाद झाला । आर्त-नाद दुःसह कानाला ॥३॥*
*। कुशकुन लंकें, पुरिं अति शोकहि । हर्ष - विषाद - विवश सुरलोकहि ॥४॥*

**अर्थ :** या प्रमाणे रामचंद्रांनी सर्वांची समजूत घातली आणि गुरुपद कमलांवर हर्षाने मस्तक नमविले.॥१॥ गणपति, गौरी (पार्वती) व गिरीश (शंकर) यांना प्रार्थनादी करून आशीर्वाद मिळाल्यावर रघुपति (रघुराज) निघाले. चालू लागले.॥२॥ राम निघताच (नगरांत) अत्यंत विषाद भरला व त्या वेळचा आर्तनाद कानांना दुःसह झाला.॥३॥ (प्रयाणाच्या वेळी) लंकेत अपशकुन झाले. अयोध्यापुरीत अति शोक भरला व (सर्व) देवलोक हर्ष व विषाद (खेद, शोक) यांना विशेष वश झाले.॥४॥

**टीका. - चौ. १-२ (१) असे सकलां समजाविति** - 'प्रियवचनीं सकलां समजाविति' (८१।२) असा उपक्रम करून येथे या चरणांत उपसंहार केला. **(क) हर्षि शिर नमविति - हर्ष** = उत्साह; प्रयाणाच्या वेळी होणारा हर्ष कार्यसिद्धि

सूचक उत्तम शुभशकुन आहे. **'हर्षविषाद रहित रघुराव'** (१२।३) असले तरी अवतार कार्यारंभी व भक्तांवर कृपा करण्यात हर्ष होतो. या दोन कार्यासाठीच जात असल्याने हर्ष झाला. गुरुंनी गमनास विरोध केला नाही हे एक कारण आहेच. **(क)** प्रवासांत विघ्न येऊ नये म्हणून विघ्नहराचे गणपतीचे, गौर वर्णी सीता बरोबर आहे म्हणून गौरीचे; आणि गिरि-वनांतून प्रवास करावयाचा आहे म्हणून गिरीश कैलासपति, शंकरांचे स्मरण करून प्रार्थना केली. शिवाय शंकर रघुवीरांची व रघुकुलाची उपास्य देवता आहे म्हणूनही स्मरणादी केले. **(ग) निघती मिळत आशिषा** - वसिष्ठांना वंदन केल्यानंतर आशीर्वाद मिळाल्याचा उल्लेख न करता देवतास्मरणादि केल्यानंतर आशीर्वाद मिळाल्याचे सांगितले व सुचविले की त्या देवतांनी व वसिष्ठांनी आशीर्वाद दिले. वसिष्ठांचा आशीर्वाद प्रत्यक्ष मिळाला व देवतांचे अप्रत्यक्ष मिळाले पण रघुपतींना ते कळले.

**चौ. ३-४ (१) राम निघत अति विषाद झाला** - राम वनात जाणार हे प्रथम कळल्यापासून अयोध्येत क्षणोक्षणी विषाद-शोक वाढत आले आहेत. पण तो विषाद वियोगाच्या बातमीने वगैरे झाला. तो केवळ वचनवियोग होता. आता प्रत्यक्ष वियोग घडत असता अति विषाद झाला हे स्वाभाविक आहे. 'राम सहज आनंदनिधान' सोडून निघून जाताना आनंदाच्या विरुद्ध विकार, शोक, विषाद अत्यंत होईल यात नवल काय? देहरूपी अयोध्येतून चैतन्यरूपी राम निघून जातो त्या वेळी अति विषाद पसरतोच; शोक, रडारड, विलाप, प्रलाप इत्यादींचा पूर, महापूर येतोच. **(क)** आर्तनाद दुःसह कानांना - लोक मोठ्यामोठ्याने, हेल काढीत, आक्रोश करू लागले. लाखो शोकार्ति लोकांच्या विलापांचा तो आवाज कानांना सहन होईना. रामचंद्रांनी अयोध्येचा त्याग कसा केला याचे फारच सुंदर वर्णन **कवितावलीत** अयोध्याकांड पदे १-२ यांत आहे. त्याचे सार : राघू जसा जुने पंख टाकून नव्या फुटलेल्या पंखांनी विशेष शोभतो तसेच नृपवेष व राजभूषणे यांचा त्याग करून मुनिवेष धारण केलेले राम शोभू लागले. प्रवासी रस्त्यांतील वृक्षांचा जसा सहज त्याग करतो तसा अयोध्येचा त्याग केला. मार्गात भेटणाऱ्या वाटसरूंचा प्रवासी जसा त्याग करतो तसा नातेवाईकांचा केला. एखाद्या प्रवाशाने प्रवासात एखाद्या मोठ्या नगराचा जसा

त्याग करावा तसे पित्याचे समृद्ध साम्राज्य सोडून दिले. आलेला पाहुणा जसा घर व नगर सोडताना दुःखी होत नाही तसे राम अयोध्येतून गेले.

(२) **कुशकुन लंकें** - या प्रयाणांतील मुख्य हेतु रावणवध असल्याने प्रभूंनी प्रयाण केले. त्याच वेळी लंकेत अपशकून होऊ लागले. या अपशकुनांचे फळ १३।१४ वर्षांनी लंकेत दिसू लागणार आहे हे लक्षात असावे. (क) **हर्षविषाद - विवश सुरलोक** - सुरलोक = स्वर्गादि सर्व देव लोक. लंकेतील अपशकुनांनी देवांना, विश्वास उत्पन्न झाला की रावणवध होणार; म्हणून त्यांना विशेष हर्ष झाला. अयोध्येतील लोकांचा शोक जाणून व आर्तनाद ऐकून देवांना विषाद वाटला. आपल्या स्वतःच्या सुखासाठी आपण अयोध्येतील सर्व सज्जनांना व आमची पूजा, सेवा करणारांना शोक सागरात लोटले याचेही दुःख झाले.

*हिं. । गइ मुरुछा तब भूपति जागे । बोलि सुमंत्रु कहन अस लागे ॥५॥*
*। रामु चले बन प्रान न जाहीं । केहि सुख लागि रहत तन माहीं ॥६॥*
*। एहि तें कवन ब्यथा बलवाना । जो दुख पाइ तजहिं तनु प्राना ॥७॥*
*। पुनि धरि धीर कहइ नरनाहू । लै रथु संग सखा तुम्ह जाहू ॥८॥*

*म. । मूर्छा विगत नृपति मग जागति । सुमंत्रास बोलावुनि सांगति ॥५॥*
*। जाति राम वनिं प्राण न जाती । तनुमधिं कोण्या सुखा रहाती ॥६॥*
*। व्यथा बलवती याहुन कोणति । प्राण तनुस ज्या दुःखें सोडति ॥७॥*
*। धीर धरूनि मग वदले नरपति । सखे ! सरथ जा सवें शीघ्र अति ॥८॥*

**अर्थ** - (रघुवीराने प्रयाण केल्यावर) मग मूर्छा उडाली व राजे जागे झाले (तेव्हा) सुमंत्रास बोलावून (घेऊन) म्हणाले की.॥५॥ राम वनात जात आहेत तरीसुद्धा (माझे) प्राण जात नाहीत; या क्षुद्र देहांत कोणत्या सुखासाठी राहिले आहेत (कोणास ठाऊक) ! ॥६॥ यापेक्षा अधिक बलवान कोणती व्यथा (पीडा) असेल की ज्या दुःखाने प्राण तनुला सोडून जातील ! ॥७॥ मग धीर धरून नरपति (दशरथ) म्हणाले की मित्रा ! रथ घेऊन त्वरेने बरोबर जा (पाहूं.)॥८॥

**टीका : चौ. ५-६ (१) मूर्छा विगत** - कैकयीने मुनिपटभूषणादि आणून रामापुढे ठेवल्यावर थोड्या वेळाने 'लोक विकल मूर्छित नरराणा' असे झाले होते. ती मूर्छा रघुवीर नगराच्या बाहेर चालू लागल्यावर उडाली. (क) **जाति राम**

**बर्नि प्राण न जाती** - राम वनांत जाण्यास येथून चालू लागताच प्राण या देहांतून निघून जाण्यास पाहिजे होते; पण का गेले नाहीत ते कळत नाही. येथे प्राण = जीव असा अर्थ घेणे जरूर आहे. प्राणो हृन् मारुते... जीवेऽनिले..' (मेदिनी). कारण सुख दुःखादी भोक्ता जीव आहे; प्राण नाहीत. झोपेत प्राण आपले कार्य करीत असता, अंगावरून साप गेला तरी त्यास भय, दुःख वाटत नाही. (ख) **'तदपि अधिक सुखसागर राम'** निघून गेल्यावर या जीवाला कोणत्या सुखाची आशा लागली आहे कोणास ठाऊक. 'सुखरूप चि रघुवंशमणि मंगल मोदनिधान' रामापेक्षा अधिक दुसरे सुख जगात नाही. तनु = अल्प, क्षुद्र तुच्छ देह. रामाला या देहाच्या संगतीत राहणे रुचले नाही. त्या अर्थी हा देह क्षुद्र आहे.

**चौ. ७ (१) व्यथा बलवती याहुन कोणति** - जीवाला असह्य दुःख होऊ लागले व सुखलेशाची सुद्धा आशा उरली नाही म्हणजे तो देहाला सोडून जातो. रामवियोगासारखे दुःख जगात नाही. या अशा दुःखाने सुद्धा जीव गेला नाही; तेव्हा आता कोणते दुःख झाले म्हणजे जाणार आहे? या सर्व विचारांचे सार हे आहे की **राम परत येण्याची आशा अल्पशी का असेना, पण जीवाला वाटत आहे म्हणून तो या देहाला सोडून जात नाही.** या आशेच्या अंधुक किरणानुसार आता सुमंत्राला आज्ञा देतात.

**चौ. ८ - (१) मग धीर धरुनि नरपति वदले** - प्राण निघून का गेले नाहीत इत्यादी - विचारांनी दशरथ फार व्याकुळ झाले आहेत; धीर सुटला आहे, तरी मन कसे तरी घट्ट केले व बुडत्यास काडीचा आधार या म्हणीप्रमाणे रथ घेऊन त्वरेने जाण्याची आज्ञा सुमंत्रास दिली. जाऊन काय करावयाचे ते आता सांगतात :

*हिं.दो. । सुठि सुकुमार कुमार दोउ जनकसुता सुकुमारि ॥*
*॥ रथ चढ़ाइ देखराइ बनु फिरेहु गएँ दिन चारि ॥८१॥*

*म.दो. । अति सुकुमार कुमार युग जनकसुता सुकुमार ॥*
*॥ रथिं बसवुनि वन दावुनी आणा वासरिं चार ॥८१॥*

**अर्थ :** दोन्ही कुमार अति सुकुमार आहेत आणि जनकसुता सुकुमार आहे, (म्हणून) त्यांना रथांत बसवून वन दाखवून चार दिवसांनी (परत) घेऊन या ।।दो.८१॥

**टीका. :** दशरथांस सीतेपेक्षा रामलक्ष्मण अधिक कोमल वाटतात हे येथे

स्पष्ट झाले. जनकसुता म्हणण्यात भाव हा आहे की ती जनकांसारख्यांची मुलगी आहे, कोमल आहे, वयाने लहान आहे आणि तिला अनवाणी चालत वनात पाठविलेली ऐकली म्हणजे जनक राजा मला काय म्हणतील? पायी अनवाणी चालत जाण्यासारखे काटक शरीर कोणाचेच नाही. त्यांना पायी प्रवास करताच येणार नाही. (क) **वन दाखवून परत आणा** - भाव हा की जोपर्यंत अरण्य पाहिले नाही तोपर्यंत वनात राहू असे वाटणे साहजिक आहे. पण वनाची भीषणता डोळ्यांनी पाहिली व भयंकर गर्जना कानांनी ऐकल्या की वनात जाण्याची इच्छा जिरेल जागच्या जागी व मग सांगितलेत म्हणजे होतील कबूल. (ख) **बासरिं चार** - वासर = दिवस. चार दिवसांत = थोड्याच दिवसांत; फार दिवस लावू नका मात्र.

**हिं.** *। जौं नहिं फिरहिं धीर दोउ भाई । सत्यसंध दृढ़व्रत रघुराई ॥१॥*
*। तौ तुम्ह बिनय करेहु कर जोरी । फेरिअ प्रभु मिथिलेस-किसोरी ॥२॥*
*। जब सिय कानन देखि डेराई । कहेहु मोरि सिख अवसरु पाई ॥३॥*

**म.** *। धीर बंधु युग जर ना परतति । सत्यसंध रघुराज दृढव्रति ॥१॥*
*। सांगा कर जोडुन मम बिनतिसि । प्रभु धाडा मिथिलेश किशोरिसि ॥२॥*
*। सीता भीत बवा वन बघतां । सांगा निरोप अवसर मिळतां ॥३॥*

**अर्थ :** धैर्यशाली, सत्यसंध, दृढव्रती, रघुराज, दोघे बंधू, जर परतले नाहीत॥१॥ तर हात जोडून माझी विनंती (प्रार्थना) सांगा की प्रभु ! मिथिलेशकुमारीला (तरि) परत पाठवावी.॥२॥ अरण्य पाहून जेव्हा सीता घाबरून जाईल तेव्हा योग्य संधी पाहून माझा निरोप (शिकवण-उपदेश = सिख) सांगा की - ॥३॥

**टीका. - चौ. १** - (१) अरण्य दाखवून परत आणा असे प्रेमवश होऊन सांगितले. पण विचार आला मनात की आजच्यापेक्षा चार वर्षांनी लहान असता ज्यांनी ताडका, सुबाहु, मारीच व त्यांचे राक्षस यांचा सहज फडशा उडविला ते कसले भितात काननाला ! हे धीर या शब्दाने सुचविले. (क) **सत्यसंध** - सत्यप्रतिज्ञ. ज्यांची प्रतिज्ञा कधी खोटी होत नाही असे. १४ वर्षे वनात राहण्याची प्रतिज्ञा करून गेलेले चार दिवसांनी कसले येतात? (ख) **दृढव्रति** - दृढ असे व्रत धारण करणारे. भाव हा की मुनिव्रत धारण करण्याची प्रतिज्ञा केली आहे; तेव्हा वनात

गेल्यावर रथाचा तरी उपयोग करतात की नाही कोणास ठाऊक ! शिवाय ते रघुराज आहेत. हे सर्वगुण रघुवंशी राजांच्या ठिकाणी सहज असतात. रघुराज असल्यामुळे अधर्म करणार नाही. पित्राज्ञा पालनधर्माचा त्याग करणार नाहीत.

**चौ. २-३ (१) प्रभु थाडा मिथिलेश किशोरिसि** - ते सीतेचे प्रभू = स्वामी आहेत. त्यांनी जा सांगितले तर सीता त्यांची आज्ञा मोडणार नाही. **(क) मिथिलेशकिशोरी** - भाव हा की जानकी काही भिल्ल कोळी कन्या नाही. ती मिथिलेच्या राजांची अल्पवयी मुलगी आहे. मिथिलेश तुम्हाला व आम्हाला काय म्हणतील? त्यांना किती दुःख होईल? वृद्ध रघुवंशी राजाने कशी जाऊ दिली? असे आम्हाला म्हणतील आणि तुम्हाला म्हणतील की रघुवीर विषयरसविमुख होऊन वनांत गेले असता बरोबर बायको कशाला? इ. **(ख) सीता भीत यदा वन बघत्तां** - काननांतील दुःखे पुष्कळांनी पुष्कळ वर्णन करून सांगितली तिला; तेव्हा जरी भीती वाटली नाही तरी प्रत्यक्ष अरण्य पाहिले म्हणजे जाईल घाबरून. अशी घाबरली तरी ती स्वतः परत जाते असे म्हणणार नाही. अशी योग्य संधी पाहून सांगा माझा निरोप तिला –

हिं. *। सासु ससुर अस कहेउ सँदेसू । पुत्रि फिरिअ बन बहुत कलेसू ॥४॥*
*। पितुगृह कबहुँ कबहुँ ससुरारी । रहेहु जहाँ रुचि होइ तुम्हारी ॥५॥*
*। एहि बिधि करेहु उपाय कदंबा । फिरइ त होइ प्रान अवलंबा ॥६॥*
*। नाहिं त मोर मरनु परिनामा । कछु न बसाइ भएँ बिधि बामा ॥७॥*
*। अस कहि मुरुछि परा महि राऊ । राम लखन सिय आनि देखाऊ ॥८॥*

म. *। श्वशुर सासु संदेश किं धाडति । मुली परत ये क्लेश वनीं अति ॥४॥*
*। माहेरीं कधिं कधीं हि सासरिं । रुचे तुम्हांला तिथें रहा तरि ॥५॥*
*। यापरिं करा उपायां नाना । ये तर अवलंबन या प्राणां ॥६॥*
*। ना तर शेवट मरण मला ही । जैं बिधि वाम, न निजवश काहीं ॥७॥*
*। आणुनि दावि राम सिय लक्ष्मण । वदुनि पडति मूर्छित नृप तत्क्षण ॥८॥*

**अर्थ :** मुली ! सासूसासऱ्यांनी असा निरोप सांगितला आहे की (अयोध्येस) परत ये; वनांत अत्यंत क्लेश आहेत (बरं !) ॥४॥ (परत आल्यावर) इच्छा असेल त्याप्रमाणे कधी माहेरी रहा, कधी सासरी रहा.॥५॥ (सुमंत्रा !) या

प्रमाणे नाना उपाय करून पहा; परत आली (सीता) तर या माझ्या प्राणांना आधार (अवलंबन) होईल.॥६॥ नाहीतर शेवट हाच येणार की मला मरण येणारच. दैव फिरले की आपल्या स्वाधीन काही रहात नाही.॥७॥ राम सीता (सिय) आणि लक्ष्मण यांना आणून दाखव (मित्रा !) असे म्हणून तत्क्षणी राजा मूर्छित होऊन (जमिनीवर) पडले.॥८॥

**टीका. चौ. ४ - (१) श्वशुर सासु संदेश** - राजा कैकयीच्या महालात कोपगृहात आहेत. तेथे ते सुमंत्राला सांगतात की सासूसासऱ्यांचा संदेश म्हणून सांगा. कैकयीने किंवा कौसल्येने असे सांगितले नसता राजा सासूचे नाव पुढे करीत आहेत यात चूक नाही. हा संदेश सुमंत्रास सांगत असता तेथे कौसल्या किंवा सुमित्रा नाहीत असे म्हणण्यास आधार नाही. राम वनात गेल्यावर दशरथांची काय दशा झाली आहे हे पाहण्यास कौसल्या आली असणारच व नसली तेथे तरी सीता परत यावी अशी कौसल्येची व सर्व राण्यांची (एक सोडून) इच्छा असणारच हे दशरथांस माहीत आहे. सीतेला हा संदेश खोटा वाटण्यासारखा नाही. कारण कौसल्येने अशी इच्छा प्रदर्शित केलीच आहे. (६०।७ पहा).

**चौ. ५ - (१) माहेरीं कथिं सासरीं रहा** - माहेराचा उल्लेख प्रथम केला; कारण पतिविरहात स्त्रियांना माहेरी राहणे अधिक बरे वाटते. माहेरी किंवा सासरी किती दिवस राहणे हेसुद्धा तुमच्या इच्छेवरच अवलंबून राहील. सार हे की तुम्हाला पराधीनपणाचा त्रास होणार नाही.

**चौ. ६-७ (१) यापरिं करा उपायां नाना** - मी सांगितले तेच व तेवढेच उपाय करा असा अर्थ समजू नका. तुम्हाला सुचतील व योग्य वाटतील ते पाहिजे तेवढे उपाय करा पण सीतेला परत घेऊन या. मी सीतेला पुष्कळ सांगितले पण उपयोग झाला नाही. माझा प्रतिकूल काळ आहे; म्हणून तुम्हाला धाडतो. **(क) ये तर अवलंबन या प्राणां** - भाव हा की सीतासुद्धा आली नाही तर माझे प्राण राहणार नाहीत हे जाणून उपाय करा. येथे दशरथांचा असा हेतु दिसतो की 'तुम्ही आला नाहीत तर अयोध्यापतीचे प्राण राहणार नाहीत' असे सुमंत्राने सांगावे. जो संदेश सुमंत्राने पुढे सांगितला आहे त्यात हा भाव स्पष्टच आहे. **'न तर पूर्ण अवलंब विहीना । मज जगवे न जलविण मीना'** (९६।८) असा

दशरथांचा संदेश सांगितला आहे. पण सीतेने स्पष्ट उत्तर दिले आहे की **'आर्यपुत्रपदकमलविण नातीं वृथा जगांत'** (९७).

**चौ.** ८ - (१) रामलक्ष्मण व सीता यांना आणून दाखवा असे म्हटले खरे पण कोणी येण्याची आशा फारशी वाटेना त्यामुळे मूर्छा आली.

*हिं.दो.* *। पाइ रजायसु नाइ सिरु रथु अति बेग बनाइ ॥*
*॥ गयउ जहाँ बाहेर नगर सीय, सहित दोउ भाइ ॥८२॥*

*म.दो.* *। आज्ञा मिळतां नमुनि शिर रथ सुवेग सजतात ॥*
*॥ सीतेसह युग बंधु जिथं बहिर्नगर, जातात ॥८२॥*

**अर्थ** : राजाची आज्ञा मिळताच मस्तक नमवून (सुमंत्र गेले व) अति वेगवान रथ सजविला व नगराबाहेर जेथे सीतेसह रामलक्ष्मण होते तेथे सुमंत्र (रथ घेऊन) गेले.॥८२॥

**टीका.** : दशरथांनी आज्ञा दिल्याबरोबर मस्तक नमवून सुमंत्र तेथून निघाले आणि दशरथ मूर्छित पडले, असे मानणे भाग आहे. रथशाळेत जाऊन तेथे रथ सजविला व तेथून रथ घेऊन त्वरेने गेले. त्वरा दाखविण्यासाठी अध्याहार पुष्कळ करून ठेवला ! सुवेग = सु = अति, वेग असलेला. हा रामरथ असावा असे घोड्यांच्या पुढील वर्णनावरून ठरते.

*हिं.* *। तब सुमंत्र नृप बचन सुनाए । करि बिनती रथ रामु चढ़ाए ॥१॥*
*। चढ़ि रथ सीय सहित दोउ भाई । चले हृदयँ अवधहि सिरु नाई ॥२॥*
*। चलत राम लखि अवध अनाथा । बिकल लोग सब लागे साथा ॥३॥*
*। कृपासिंधु बहुबिधि समुझावहिं । फिरहिं प्रेमबस पुनि फिरि आवहिं ॥४॥*

*म.* *। मग सुमंत्र नृप-वचन सांगुनी । रथिं चढविति रामास विनवुनी ॥१॥*
*। बसुनि सितेसह रथिं दो भ्राते । निघति नमुनि मनिं अयोध्येस ते ॥२॥*
*। जात राम, पुरि अनाथ पाहति - । लोक विकल सब मागें धावति ॥३॥*
*। कृपासिंधु बहुपरिं समजावति । फिरती प्रेमें परतुनि धावति ॥४॥*

**अर्थ** : मग सुमंत्राने राजाची आज्ञा रामास सांगितली व विनंती करून त्यास रथांत बसण्यास सांगितले. (बसविति).॥१॥ सीते सहित दोघे भाऊ रथांत बसले व अयोध्येला मनात नमन करून ते निघाले. (रथ चालू लागला.) ॥२॥

राम जाताच, अयोध्या अनाथ झालेली पाहून लोक व्याकुळ झाले व (रथाच्या) मागोमाग धावू लागले.।।३।। कृपासिंधु रामांनी त्यांची नाना परींनी समजूत घातली तेव्हा लोक परत फिरले; पण (पुन्हा) प्रेमाने परतून (मागे) धावू लागले.।।४।।

**टीका. - चौ. १ (१) नृपवचन सांगुनी** - राजाची आज्ञा एवढ्याचसाठी सांगितली की त्या शिवाय राम रथांत बसणार नाहीत असे वाटले. **चढविति** = चढविले; पण येथे चढण्यास सांगितले असा अर्थ करणे जरूर आहे. कारण पुढील चौपाईत चढल्याचा उल्लेख पुन्हा आहे. **(क)** रथांत आधी सीता बसली असे पुढील चौपाईत सीतेचा उल्लेख प्रथम केला असल्याने ठरते. दो. ८५ मध्ये हिंदीत रामलक्ष्मण सीता असा क्रम असला तरी तो उपसंहारांतील उल्लेख आहे. नावेत बसताना **'प्रिये चढवुनी चढले रघुपति'** (१५१।३) व नंतर लक्ष्मण बसल्याचा उल्लेख आहे. वा.रा. ४०।१३-१६ मध्ये सुद्धा आधी सीता मग राम व मग लक्ष्मण रथांत बसल्याचा उल्लेख आहे. अ.रा. ५।४३-४४ मध्ये तोच क्रम आहे. दो. ८५ (हिंदी) मधील क्रम वृत्तरचनेसाठी आहे असे मानणेच भाग आहे.

**चौ. २ - (१) बसुनि रथिं, निघति नमुनि मनिं अयोध्येस** - अयोध्येला मनात नमस्कार केला. वा.रा. प्रत्यक्ष नमस्कार केलेचा उल्लेख असला तरी तो अयोध्येतून निघताना नसून दुसऱ्या दिवशी केलेला आहे (सर्ग ५०।१-३ पहा) **(क)** येथे मनात नमस्कार न करता प्रगट केला असता तर लोकांस वाटले असते की अयोध्येचा त्याग करताना रघुवीरास वाईट वाटले व यामुळे लोकांना अधिक दुःख झाले असते. वनवासातून पर येताना पुष्पक विमानांतून अयोध्येला प्रगट नमस्कार केला आहे. (६।१२०।-).

**चौ. ३ - (१) पुरि अनाथ पाहति लोक** - राम अयोध्येला सोडून जाताच लोकांना अयोध्या अ-नाथ दिसू लागली. अयोध्यानाथ राम आहेत हे सुचविले.

**चौ. ४ - (१) कृपासिंधु बहुपरिं समजावति - कृपासिंधु** - लोक पाठीमागे धावत येत आहेत असे पाहून रथ अति वेगाने हाकण्यास सांगितला असता तर लोकांचा त्रास सहज चुकविता आला असता; पण असे रघुनाथाने केले नाही; कारण ते कृपासिंधु आहेत. उलट रथ अगदी सावकाश चालवून, लोक अगदी जवळ आल्यावर त्यांची नाना प्रकारांनी समजूत घातली. त्याचा चांगला परिणाम

होऊन लोक परत फिरले. पण ती भयाण, उदास, अनाथ, अयोध्या दिसतांच पुन्हा प्रेमाचा उमाळा लोकांना आला; तेव्हा पुन्हा मागे परतून रथाच्या मागे धावत सुटले. लोक आधीच कृश झालेले व त्यांना परिश्रम होत आहेत हे कृपासिंधुंनी जाणले व पुन्हा समजूत घालू लागले. (क) बंधूंनो ! राजाज्ञेप्रमाणे तुम्हाला बरोबर नेता येणार नाही; कारण की मग तो वनवास ठरणार नाही. महाराजा आहेतच. त्यांचे दुःख कमी झाले म्हणजे ते तुमचे पूर्ववत प्रेमाने पालन करतील. भरतसुद्धा तुमचे बंधूप्रमाणे पालन करून सर्व प्रकारचे सुख देण्यास झटतील. मी वडिलांचे वचन पूर्ण करण्यासाठी जात आहे. मी तुमचा त्याग नाही केला ! मी तुमचा आहे व तुम्ही माझे आहात. विनाकारण क्लेश सोशीत आहात व ते पाहून मला दुःख होत आहे. तरी आता कृपा करून नगरात जा व पहिल्यासारखे संसार करू लागा. इ. प्रकारे समजूत घालण्याचा प्रयत्न केला.

**ल.टे.** - वा.रा. रामांनी असे कळवळ्याने व प्रेमाने सांगितले नाही. ते राम माता-पिता वगैरेंचा निरोप घेताना स्वतःच शोकाकुल झाले आहेत ! नेत्रांत अश्रूही आले आहेत. (क) लोक अयोध्येकडे वळून पुन्हा का फिरतात याचे आणखी कारण आता सांगतात :

***हिं.*** ***। लागति अवध भयावनि भारी । मान्हुँ कालराति अँधिआरी ॥५॥***
***। घोर जंतु सम पुर नर नारी । डरपहिं एकहि एक निहारी ॥६॥***
***। घर मसान परिजन जनु भूता । सुत हित मीत मनहुँ यमदूता ॥७॥***
***। बागन्ह बिटप बेलि कुम्हिलाहीं । सरित सरोवर देखि न जाहीं ॥८॥***

***म.*** ***। दिसे अयोध्या भीषण भारी । काळरात्र कीं जणुं अंधारी ॥५॥***
***। घोर जंतु राम पुर-नर-नारी । बघुनि परस्पर भितात भारी ॥६॥***
***। जणुं भूतें परिजन मसाण घर । मित्र सुहृद सुत जणुं यमकिंकर ॥७॥***
***। बागांमधिं तरु बेलि कोमजति । नदी तलाव न मुळीं पाहवति ॥८॥***

**अर्थ :** अयोध्या अशी भारी भयानक दिसू लागली की जणू अंधारी काळरात्रच ॥५॥ नगरांतील स्त्रिया व पुरुष घोर जंतूंसमान दिसू लागले व एकमेकांस पाहून फार भिऊ लागले.॥६॥ कुटुंबातील माणसे भुतांसारखी व घरे स्मशानासारखी भासू लागली; आणि मित्र, सुहृत, सुत, यमदूतांप्रमाणे (यम

किंकर) दिसू लागले.॥७॥ बागांमध्ये वृक्ष व लता कोमेजून गेल्या व नद्या तलांवाकडे पाहवत नाहीसे झाले.॥८॥

**टीका.** - (१) या पुढील चौपायांत करुणा रसांतून भयानक, रौद्र व बीभत्स रसांची उत्पत्ति मोठ्या खुबीने दाखविली आहे. या काण्डारंभी रामराज्याभिषेकाच्या निमित्ताने प्रथम शृंगार रसाचे वर्णन केले आहे. नंतर करुणा रसाचे स्रोत एकाएकी वाहू लागले आहेत. निषादराज व भरतागमन निमित्त आणि लक्ष्मण-भरतागमन समाचार या संबंधाने वीररसाचा उद्रेक भरपूर झाला आहे. कैकयी-कुबडी संवादांत आरंभी हास्यरस झळकला आहे व दशरथ-कैकयी संवादात आरंभी शृंगार व हास्यरस भरपूर आहेत. येथे भयानक व रौद्ररस आहेत. भूत पिशाच्चे बीभत्सही असतातच. लक्ष्मण गीतेत शांतरस आहे व भक्तिरस तर आता वाहू लागेल. अयोध्याकांड करुणा रसप्रधान व भक्तिरसमय असले तरी स्वतंत्र सोपान असल्यामुळे **बाकी रस** यांत **भरून ठेवले आहेत.** वर थोडेसेच नमुने दिले आहेत. **या कांडांतील करुणारस शृंगाररसांतून निघालेला नसून भक्तिरसांतून निघालेला आहे.**

**चौ. ५** - (१) **दिसे अयोध्या भीषण भारी** - या भयाणपणाचा उगम कैकयीच्या वाड्यापासून झाला. 'राजभवनिं मग सुमंत्र शिरले । दिसत भयाण जात घाबरले ॥ बघवे ना, जणुं गिळुं ये धावत । विपद विषाद वास जणुं भासत ॥३८।३-४॥ त्या वेळी वनवासाचा निश्चय केवळ शब्दांनी झाला होता. प्रत्यक्ष घडला नव्हता व सुमंत्रास माहीत नव्हता; म्हणून 'भारी भीषण' भासला नाही. **शब्दांचा उपयोग करण्यात किती दक्षता ही** ! लोक अयोध्येकडे थोडे जाऊन पुन्हा परत वळले याचे कारण भारीभीषण अयोध्या जणू काय लोकांना खाण्यासच धावू लागली. नुसते तिच्याकडे पाहिले तरी थरकाप सुटू लागला. (क) **काळरात्र अंधारी** - कालरात्रि हे नाव अनेक रात्रींना दिलेले आहे. 'कालो मृत्यौ महाकाले समये यम कृष्णयोः' काल = मृत्यू, यम यांची रात्र; प्रलयरात्र, दिवाळीच्या अमावस्येची रात्र, मनुष्याच्या सत्तराव्या वर्षाच्या, सातव्या महिन्यांतील सातवी रात्र काल रात्र = मृत्यूची रात्र समजली जाते. या रात्रीत मृत्यूचे भय पुढे उभे असते. तशी अयोध्या काळरात्रीसारखी दिसत आहे. आत शिरलो की मृत्यू ग्रासणार असे लोकांस वाटू लागले. त्यांतही गडद-अंधारी रात्र फारच भयानक भासते. पळून जाणे सुद्धा

फार कठीण असते. येथे उत्प्रेक्षेने सुचविले की अयोध्या खरोखरच काळ रात्र नसून तशी भासली. अयोध्यावासी लोकांपैकी कोणालाही अयोध्येच्या निमित्ताने मृत्यू येणार नाही. सीतेच्या निमित्ताने निशाचर वंशाचा विनाशच व्हावयाचा असल्याने तेथे उत्प्रेक्षा नाही. **'कालरात्रि निशिचरवंशाप्रति । त्या सीतेवर करां प्रीति अति'** (५।४ व ८) **ज्या देहरूपी अयोध्येतून चैतन्यरूपी - परम प्रकाशरूपी - राम निघून जातात तेथे मृत्युरूपी रात्रीचा गडद अंधार नसतो काय?**

**चौ. ६ - (१) घोर जंतुसम पुरनरनारी - भारी - जंतु** = प्राणी, जो जन्माला आला तो. 'प्राणी' तु चेतनो जन्मी जन्तु जन्तु शरीरिणः' (अमरे) **घोर जंतु = घोर प्राणी**. हे कोणते? नरनारी हेच घोर जंतु असे म्हटले. नगरांतील नरनारी घरात राहणारी असतात. पुढे घरांतील माणसांना भुते-पिशाच्चे म्हटलेच आहे. व्याघ्रसिंह सर्पादि घोरजंतूच, आणि राक्षसही घोर जंतूच. पण वाघ, वाघांना, सिंह सिंहांना पाहून भितात असे नाही. आता मानसांतीलच आधार पाहू = - 'जैं मांडि तो पाखंड । तै प्रगट **जंतू चंड ॥ वेताळ भूत पिशाच** । करिं सज्य धनु नाराच ॥ **योगीणि** धृत करवाल । करिं अन्य मनुज कपाल ॥ कृत सद्य-शोणित-पान । बहु नृत्य करती गान ॥ धर मार घोषति घोर । चौफेर निःस्वन थोर ॥ जैं येति मुख वासून (६।१०१।१-३). हे वर्णन पुरनरनारींना अधिक जुळणारे आहे की व्याघ्र सिंहादीक याचा विचार करावा. वेताळ भूतपिशाच यांच्या हातात धनुष्यबाण आहेत. ते पुरुष होत व योगिणी स्त्रिया आहेत. वेताळ पुरुषपिशाच आहेच. ही पिशाचे, भुते जसा आरडाओरडा करीत आहेत तसे अयोध्येतील लोक आक्रोश करीत आहेत. कोणी तांबूल भक्षण केलेले असतील ते रक्तपान केलेल्या सारखे दिसणार, हातात कळशा, घागरी असतील ती मुंडकी दिसू लागणार; जांभया देत, रडत किंचाळत धावत असतील ते. त्या मुख वासून खायला येत आहेत असे वाटणार. येथे **'घोरजंतु'** शब्द आहेत तर वरील अवतरणांत **'चंड जंतु'** शब्द साम्यदर्शक आहेत ! तुलसी काव्यकला कशी आहे याचे हे आणखी एक उदाहरण आहे !

**चौ. ७ - (१) जणुं भूतें परिजन मसाण घर** - घोरजंतु - भूतपिशाचादि हे वर ठरले. प्रत्येक घर स्मशान झाले की अयोध्या महास्मशान झालेच. परिजन = घरातील मंडळी. ही भूतपिशाचांसारखी भासू लागली. भूतपिशाचांचे हित

करणारे यमदूत असतात. घरातील मंडळींचे हित करणारे आईबाप इ. सुहृद व पुत्र, मित्र असतात म्हणून त्यांस यमकिंकर = यमदूत म्हटले. (क) येथपर्यंत नगर, नगरनिवासी, घरे व गृहनिवासी यांच्या दुर्दशेचे वर्णन केले. आता इतर स्थावर जंगम जीवांच्या दुर्दशेचे वर्णन करतात.

**चौ.** ८ - (१) वृक्ष पुरुषवर्ग, लता, वेली स्त्रीवर्ग, नदी स्त्रीवर्ग, तलाव पुरुष वर्ग. बागांतील लता-वृक्षांवर सुद्धा रामवियोगाचा इतका परिणाम झाला की बागा सुकून गेल्यासारख्या दिसल्या. मलूल, अप्रसन्न, खिन्न दिसू लागल्या. नदी, तलाव सुद्धा विषादयुक्त दिसू लागले. नगराकडे जाताना प्रथम वृक्षलताच दिसणे स्वाभाविक असल्याने त्यांचे वर्णन खगमृगांच्या आधी केले.

***हिं.दो.*** *। हय गय कोटिन्ह केलि मृग पुरपसु चातक मोर ॥*
*॥ पिक रथांग सुक सारिका सारस हंस चकोर ॥८३॥*

***म.दो.*** *। हय गज अगणित केलिमृग पुरपशु चातक मोर ॥*
*॥ पिक रथांग शुक सारिका सारस हंस चकोर ॥८३॥*

**अर्थ** : घोडे, हत्ती असंख्य क्रीडामृग; पुरपशु, चातक, मोर, कोकिळा, चक्रवाक, पोपट, साळुंक्या, करकोचे वगैरे हंस व चकोर (या सर्वांची दशा पुढील चौपाईत सांगतील).॥८३॥

**टीका.** - **केलिमृग** = क्रीडेसाठी पाळलेले पशु = हरणे, सांबरे, चितळ, भेकरे, रोही इत्यादी हरिणांच्या विविध जाती. **पुरपशु** = ग्रामपशु = कुत्री, मांजरे, ग्रामसूकर (डुकरे) इ. रथांग = चक्रवाक. **सारिका** = साळुंक्या, **सारस** = करकोचे, बगळे जलाशयांजवळ राहणारे पक्षी. (क) पूर्वार्धात मुख्यतः पशूंचा उल्लेख केला व उत्तरार्धात पक्ष्यांचा. हत्ती घोड्यांपेक्षा मोठे असून दुरून आधी दिसण्यासारखे असता त्यांचा उल्लेख पाठीमागून का? हत्तींना वाटेल तेथे बांधता येत नसल्यामुळे ते हत्तीखान्यातच असणार.

***हिं.*** *। राम बियोग बिकल सब ठाढ़े । जहँ तहँ मनहुँ चित्र लिखि काढ़े ॥१॥*
*। नगरु सफल बनु गहबर भारी । खग मृग बिपुल सकल नर नारी ॥२॥*
*। बिधि कैकई किरातिनि किन्ही । जेहिं दव दुसह दसहुँ दिसि दीन्ही ॥३॥*
*। सहि न सके रघुबर बिरहागी । चले लोग सब ब्याकुल भागी ॥४॥*

म. *। रामवियोग - विकल सब तिष्ठति । जिथं तिथं चित्रलिखित जणुं वाटति ॥१॥*
*। नगर सफल वन गव्हर भारी । खग मृग विपुल सकल नर नारी ॥२॥*
*। विधि करि किरातिनी कैकइला । दव दुःसह दश दिशीं लाविला ॥३॥*
*। सहुं न शकति रघुवर - विरहानळ । लोक सकल पळुं लागति विव्हळ ॥४॥*

**अर्थ** - ते सर्व पशुपक्षी रामवियोगाने व्याकुळ होऊन जेथल्या तेथे असे (स्थिर, तटस्थ) राहिले आहेत की जणू चित्रांतल्या सारखेच दिसत आहेत.॥१॥ अयोध्यानगर फळांनी लगडलेले घनदाट (गव्हर) वन आहे; व नरनारी त्यांतील बिपुल पशुपक्षी आहेत.॥२॥ दैवाने कैकयीला भिल्लीण केली आणि तिने दाही दिशांना दुःसह वणवा (दव - दावानल) लावला.॥३॥ त्यांना रामविरहरूपी आग (अनळ) असह्य झाली व सगळे लोक व्याकुळ होऊन पळत सुटले.॥४॥

**टीका. चौ. १** - (१) जानकी जनकपुरीतून निघाली तेव्हा पोपट व मैना आक्रोश करतात की **'कुठें वैदेही'** (१।३३८।२) पण रामवियोगाने पशुपक्षी इतके व्याकुळ झाले की तोंडातून शब्द निघेना, की हालचाल करता येईना. जे ज्या स्थितीत होते त्याच स्थितीत अगदी तटस्थ, निर्जीव झाल्यासारखे, चित्रांतल्या पशुपक्ष्यांसारखे दिसू लागले. **'झाले व्याकुळ खग मृग या परिं । कशि वदवेल किं मनुज दशा तरि'** (१।३३८।३). (क) मलूलपणा आला म्हणजे जडांना स्थावरांना चेतनता आली आणि पशुपक्षी चर, जंगम असून ते स्थावरांसारखे, जडांसारखे झाले. 'चेतनास जो जड करी जडा करी चैतन्य' (७।११९ म). **हे वचन यथार्थ करून दाखविले.**

**चौ. २-४** (१) पूर्वी नगरीला उत्प्रेक्षेने काळरात्रि म्हटले. येथे रूपकाने नगराला घनदाट अरण्य म्हटले. उत्प्रेक्षा म्हणजे केवळ काल्पनिक स्थिति - भावना असते. रूपक प्रत्यक्ष वस्तुस्थिती निदर्शन करते; म्हणून म्हटले **'नगर सफल वन -'** अयोध्येची दशा अरण्यासारखी झाली. अयोध्या हे एक घनदाट अरण्य बनले व राम जेथे जाऊन राहणार ते स्थान, ते वन शंभर अयोध्यांसारखे होणार ! सुमित्रेच्या वचनाचे स्मरण असावे. **ल.ठे.** अयोध्येला वनपणा आला आहे व पुष्कळ काळ असाच राहणार आहे हे विसरल्यास उ.कां. ६ छंद, यांतील उत्प्रेक्षेचा अर्थ नीट लावता येणार नाही. त्या ठिकाणी '२।८४।२' असा उल्लेख करून ठेवावा म्हणजे चटकन स्मरण होईल. या रूपकाची टीका कोष्टक रूपाने तुलना करून लिहिणेच चांगले.

## नगर सफलवन - किरातिनी कैकई

| अयोध्या नगर | वन |
|---|---|
| १. धर्म, अर्थ, काम, मोक्ष व रामभक्ति ही फळे सर्वत्र लगडली आहेत. | १ नाना प्रकारच्या फळांनी भरलेले |
| २. नगरांत घरे वगैरे घनदाट | २ वृक्षादिक घनदाट (गव्हर) |
| ३. स्त्रीपुरुषवस्ती पुष्कळ | ३ पशुपक्षी पुष्कळ |
| ४. कैकयी (भिल्लिणीने) रामविरह वणवा लावला. | ४ भिल्लीण वणवा लावते. |
| ५. तिला दैवाने, विधीने किरातीण केली. | ५ भिल्लीणीचा जन्म प्रारब्धानेच मिळतो. |
| ६. लोभाने मत्सराने व स्वार्थाने वणवा लावला. | ६ लोभाने व स्वार्थानेच लावते. |
| ७. विरहानळाची आग असह्य | ७ दावानल असह्य. |
| ८. रघुविरह आग | ८ प्रत्यक्ष अग्नि. |
| ९. वृद्ध राजाचे सरळ, स्नेही हृदय हा जुना कापूस; दोन वर म्हणजे गार व चकमक; अग्नि सिद्ध | ९ सावरीचा जुना कापूस, गारचमकीने पेटवून अग्नि सिद्ध |
| १०. लोक पळून जाण्याचा प्रयत्न करतात पण दाही दिशांना आग ! प्रयत्न फुकट जाणार | १० पशुपक्षी व्याकुळ होऊन पळण्याचा प्रयत्न करतात; पण व्यर्थ. |

(क) **दशदिंशि दुःसह दव** - 'दाहिदिशांस' म्हणण्यात गूढ भाव आहे. पक्षी उर्ध्व दिशेने पळून जाण्याचा प्रयत्न करतात पण आगीच्या ज्वाळा वरही असल्याने सुटका होत नाही; पण निदान मरून तरी सुटका होते - पण अयोध्यावासी लोकांना हा वणवा ठारही मारीत नाही व त्यामुळे 'ऊर्ध्व गच्छन्ति सत्त्वस्थाः' (भ.गी.) या प्रमाणे उर्ध्वगतीने स्वर्गात जाऊन देव शरीर पावून गुप्तरूपाने

रामसमीप राहणेही अशक्य झाले आहे. स्वर्गातील देव रामसेवेसाठी प्रवर्षणगिरीवर राहिले आहेत. 'मधुकरखगमृगतनु सुर धरती । सिद्ध मुनी, प्रभु सेवा करती' (४।१३।४) असे करणेही अशक्य झाले. (ख) खालच्या दिशेस भूमीत शिरावे तर भूमि ठाव देत नाही. 'महि न ठाव विधि मृत्यु न देई' (ग) दोन दिशांचा विचार झाला. शेष पूर्व आग्नेय दक्षिण इ. आठ दिशा राहिल्या. अयोध्येच्या बाहेर कोठल्याही दिशेला जाऊन राहिले लोक तरी रामविरहानल त्यांना भाजीत राहणारच. रामसमीप राहण्यास मिळेल तेव्हाच हा विझेल म्हणजेच राम अयोध्येत परत आल्याशिवाय लोकांचे विरहदुःख नष्ट होणार नाही हे सुचविले.

हिं. *। सबहिं बिचारु कीन्ह मन माहीं । राम लखन सिय बिनु सुख नाहीं ॥५॥*
*। जहाँ राम तहँ सबुइ समाजू । बिनु रघुबीर अवध नहिं काजू ॥६॥*
*। चले साथ अस मंत्रु दृढ़ाई । सुर दुर्लभ सुख सदन बिहाई ॥७॥*
*। राम चरन पंकज, प्रिय जिन्हही । बिषय भोग बस करहिं कि तिन्हही ॥८॥*

म. *। सकल विचार करिति सुख नाहीं । विना राम लक्ष्मण सीता ही ॥५॥*
*। जिथें राम तिथं सब सुखसाधन । विण रघुवीर अयोध्यें काम न ॥६॥*
*। जाति सवें हा निश्चय ठरवुनि । सुरदुर्लभ-सुख-सदनां सोडुनि ॥७॥*
*। रामचरण-पंकजें प्रिय जयां । विषयभोग कीं करिति वश तयां ॥८॥*

**अर्थ :** सर्व लोक विचार करू लागले की रामलक्ष्मण व सीता यांच्या शिवाय सुख नाहीच.॥५॥ जिथे राम असतील तिथे सर्व सुख-साधन आहे; म्हणून रघुवीरावाचून अयोध्येत काही काम नाही.॥६॥ असा निश्चय ठरवून देवांनासुद्धा दुर्लभ असे सुख व सुखमय सदने टाकून सर्व लोक बरोबर जाण्यास निघाले.॥७॥ ज्यांना रामचरणपंकजे प्रिय - आहेत त्यांना का विषयभोग वश करतील? (हे घडणे शक्यच नाही) ॥८॥

**टीका. चौ. ५-६ (१) विना रामलक्ष्मण सीता सुख नाहीं** - सुमित्रेने लक्ष्मणांस असेच सांगितले आहे. **'सिता राम जर जाति वना ही । अयोध्येंत तव काम च नाहीं'** (७४।४) हे लोक त्याचे कारण सांगतात की रामलक्ष्मण सीता यांच्या शिवाय सुख नाही. जिथे राम तिथे सर्व सुख व जिथे राम नाहीत तिथे सुख नाही असे अन्वय व्यतिरेकाने ठरविले. **'दुःखि तुम्हांविण सुखी तुम्हांसव'** (२९१।३)

**'जळो कर्म, सुख, धर्म हि साधन । जिथें राम- पदपंकज भाव न'** (२९१।१) असे वसिष्ठ म्हणतात. **'त्यजुनि तुम्हां ज्यां रुचे गृह तात तयां विधि वाम'** (२९०). (क) **ज्ञान** (राम) **विराग** (लक्ष्मण) व **भक्ति** (जानकी) **जिथे असतील तिथे सर्व सुख असणार व यांचा निवास जेथे नाही तेथे सुखाचा अभाव असणार.**

**चौ.** ७-८ (१) वरच्या सारखा निर्णय होऊन दृढ निश्चय झाल्यावर साम्राज्याचे ऐश्वर्य किंवा स्वर्गसुखापेक्षा अधिक श्रेष्ठ सुख असले तरी ते कसे रुचणार? अयोध्येतील सुख सुरांना दुर्लभ आहे हे पूर्वीच वर्णिले आहे. **'पाहुनि नव नव सुख सुर ईर्षती । जन्म अयोध्यें विधिसी मागति ॥** (१।३६।२) एवढे दुर्लभ सुख सोडून वनांत जाण्यास का निघाले ते ऐका :

(२) ज्यांना रामचरणपंकज प्रिय वाटतात त्यांना विषयभोग वश करू शकत नाहीत हा सिद्धान्त श्रोते, वक्ते व वाचक यांच्यापुढे आत्मनिरीक्षणासाठी ठेवला गेला आहे. आपले मन विषयांना वश होते की नाही हे ज्याचे त्याने अंतरांत नीट तपासून पहावे म्हणजे सहज कळेल. **या वचनाचा उपयोग दुसऱ्यांची परीक्षा करण्यासाठी होणार नाही.** घर सोडून कोण निघाले पहा :

*हिं.दो.* ***। बालक वृद्ध बिहाइ गृह लगे लोग सब साथ ।***
***॥ तमसा तीर निवास किय प्रथम दिवस रघुनाथ ॥८४॥***

*म.दो.* ***। बाल वृद्ध टाकुनि गृहां जाति लोक सब साथ***
***॥ करिति वास तमसा तटीं प्रथम दिवसिं रघुनाथ ॥८४॥***

**अर्थ :** लहान मुले व म्हातारी माणसे यांना घरात टाकून सर्व लोक (रथाच्या) मागोमाग गेले व बालवृद्ध घरे टाकून गेले. (म्हणून) रघुनाथांनी पहिल्या दिवशी तमसा नदीच्या तीरावर मुक्काम (वस्ती) केला.।।दो.८४।।

**टीका.** - (१) बिहाइ = सोडून, टाकून. गृह - या शब्दाला विभक्ति प्रत्यय नसल्याने बिहाइ गृह = घर सोडून किंवा घरात टाकून असे दोन अर्थ होतात. तसे टाकुनि गृहां = घरांत टाकून किंवा घरांस टाकून असे दोन अर्थ मराठीत होतात. 'ततः सबालवृद्धा सा पुरी परम पीडिता । राममेवाभिदुद्राव धर्मार्तः सलिलं यथा (वा.रा. २।४०।२०) या प्रमाणे बालवृद्ध स्त्री, पुरुषादि सर्वच लोक गेल्याचे वा.रा. सांगते. काही रामायणांत बालवृद्धांना घरी टाकून बाकीचे

लोक गेल्याचा उल्लेख असेल; म्हणून कवींनी दोन्ही मतांचा संग्रह केला आहे. (क) बालवृद्धांस टाकून गेले म्हणण्यात जाणारांचे निर्मत्वव व अधीरता दिसतात; व बाळ वृद्ध त्यांच्या मागून घरे टाकून गेले म्हणण्यात त्यांचे प्रेम व निर्ममत्व दिसते. **हे दोन्ही अर्थ घेणे योग्य आहे.**

(२) आपल्या प्रिय प्रजेला अशा रीतीने अनाथांसारखी रथाच्या मागे धावत येताना पाहून रघुनाथांस त्यांची दया आली. म्हणून रथ वेगाने न चालविता सावकाश चालविला. त्यामुळे संध्याकाळपर्यंत तमसा नदीपर्यंतच जाता आले. वा.रा.सुद्धा पहिली वस्ती तमसातीरावरच झाली आहे. (२।४६)

(३) तमसा नदी - ही लहानशी नदी अयोध्येच्या दक्षिणेवर ६।७ कोसांवर आहे. हिलाच पुढे **मड़हा, टोंअ** वगैरे नावे आहेत. ही दूरवर जाऊन **गंगेला मिळते.** भरतकुण्डापासून दोन कोसांवर **ताड़डीह** गांव आहे. तेथे **रामचौरा नावाचा घाट** या नदीला आहे. तेथे प्रथम निवास झाला असे कोणी म्हणतात. कोणी म्हणतात **चकिया गावाजवळ** निवास केला होता. (मा.पी.वरून) तमसातीर्थ भरतकुंड रेल्वेस्टेशनपासून एक कोसावर आहे. भरतकुण्ड रेल्वेस्टेशन = नन्दिग्राम असे कोणी म्हणतात. **या काण्डाच्या परिशिष्टांत 'रामवनवास-चित्रकूटगमन' मार्ग लेख पहावा.** (क) या दिवशी रात्री जलाहारच केला असा उल्लेख पुढे सुमंत्राने (१५०।) केला आहे. येथे कंद फलमूलादि मिळण्यासारखी असून जलपानच केल्याचा उल्लेख वा.रा. २।४६।१० आहे.

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय ८ वा समाप्त.***



# अध्याय ९ वा

हिं. *। रघुपति राजा प्रेमबस देखी । सदय हृदयँ दुखु भयउ बिसेषी ॥१॥*
*। करुनामय रघुनाथ गोसाँई । बेगि पाइअहिं पीर पराई ॥२॥*
*। कहि सप्रेम मृदु बचन सुहाए । बहु बिधि राम लोग समुझाए ॥३॥*
*। किए धरम उपदेस घनेरे । लोग प्रेमबस फिरहिं न फेरे ॥४॥*

म. *। प्रजा प्रेमवश रघुपति पाहति । सदय हृदयिं अति दुःखा पावति ॥१॥*
*। करुणामय रघुनाथ हृषिकपति । शीघ्र परावी पीडा पावति ॥२॥*
*। प्रेमळ मृदु सुंदर बोलोनी । लोकां राम बहुत सांगोनी ॥३॥*
*। बहुत धर्म - उपदेशा करती । प्रेमी जन फिरवितां न फिरती ॥४॥*

**अर्थ :** प्रजा प्रेमवश झाली आहे असे रघुपतींना दिसले व ते दयाळू असल्याने त्यांना हृदयात अति दुःख झाले.॥१॥ रघुनाथ जितेंद्रिय (हृषिकपति) असले तरी करुणामय असल्यामुळे त्यांना दुसऱ्यांचे दुःख (पीडा-पीर) लवकर होते (दुसऱ्यांच्या दुःखाने चटकन दुःखी होतात).॥२॥ (मग) प्रेमळ, मृदु व सुन्दर बोलून रामचंद्रांनी लोकांना पुष्कळ सांगून.॥३॥ पुष्कळ धर्मोपदेश केला; पण प्रेमी (प्रेमवश झालेले) लोक फिरवितां फिरेनात.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) प्रजा प्रेमवश रघुपति पाहति** - देह कृश झालेले, उदासमुख असे असून सुरदुर्लभसुखसदने सोडून रथाच्या मागोमाग धावत आले; यांतच प्रेम दिसून आले. (क) रघुपति - रघुवंशी राजे असल्याने प्रजेला दुःख देणे बरे वाटेना व सर्वस्वाचा त्याग करून अति प्रेमाने पाठोपाठ धावत आलेल्यांचा त्यागही करवेना; कारण ते परमात्मा आहेत. सदय = दयालु आहेत. त्यामुळे भक्तांचे दुःख पाहून हृदयांत अति दुःखी झाले; पण बाहेर दाखविले नाही. **'उमे योग जप दान तप नाना व्रत मख नेम । रामकृपाप्रद ना तशीं निर्मळ जैसे प्रेम'** (६।११७).

**चौ. २ - (१) हृषिकपति** = इंद्रियांचे स्वामी; इतरांच्या मनात काय आहे हे त्यांस सहज कळते. लोकांचे प्रेम खरे आहे हे जाणले. त्यांची स्वतःची इंद्रिये त्यांच्या ताब्यात असून म्हणजे ते जितेंद्रिय असूनसुद्धा दुसऱ्यांचे (भक्तांचे) दुःख

पाहून त्यांस अति दुःख झाले; पण बाहेर दिसू दिले नाही. करुणामय असल्याने दुसऱ्यांच्या दुःखाने तेव्हाच दुःखी (होतात). होणे हा रघुनाथाचा स्वभाव आहे. **हे संतलक्षणच आहे. 'दुःखि दुःख बघतां सुखि सुख पर'** (७।३८।१) हे रघुनाथांनीच सांगितले आहे.

**चौ. ३ - ४** (१) प्रथम अयोध्येतील सुख व वनवासातील अत्यंत दुःख वगैरे सांगून भरताचा सुस्वभाव वर्णन करून ते तुमचे उत्तम प्रकारे पालन करतील वगैरे सांगितले. तेवढ्याने भागत नाही असे पाहून धर्मोपदेश केला. तो कसा असेल याची कल्पना ९५।२ पासून ९५।७, दो. ९५; व ९६।१ यांवरून येईल. तसेच हेही सांगितले की तुम्हाला वनात नेण्याने मला व्रतभंग रूपी अधर्म करावा लागेल म्हणून ते शक्य नाही. राजा व राण्या यांना शोकाकुल, अति दुःखद, चिंताजनक परिस्थितीत टाकून प्रजेने राजधानी सोडून जाणे हा प्रजेचा धर्म नाही इ. (क) परंतु हा उपदेश रुजण्याइतकी स्थिरता लोकांच्या हृदयभूमीत नाही व हे उपदेशरूपी बीज तेथे पडताच विरहाग्नीने भाजून निघाले व लोकांना वाटू लागले की ॥ जळो कर्म, सुख, धर्म सुशोभन । जिथे रामपदपंकजलाभ न ॥ त्यामुळे कृपा करून आता परत फिरा असे रामचंद्रांनी अनेक वेळा सांगून सुद्धा लोक परत फिरेनात. येथे विचार करावा की लक्ष्मण व सीता यांचे रामप्रेम व अयोध्येतील नरनारीचे रामप्रेम यांत काही फरक आहे का? गोपींच्या कृष्णप्रेमाशी याची तुलना करून पहावी. अयोध्यावासी जनांचे रामप्रेम सीता, लक्ष्मण व गोपी यांच्यापेक्षा अधिक श्रेष्ठ असेच म्हणावे लागेल. सीता धर्मपत्नी, सहधर्मचारिणीच; तेव्हा तिने त्याग केला सर्व सुखाचा यात काही आश्चर्य नाही. 'रामा स्मरतां त्यजति जन तृणसम विषयविलास । जगज्जननि रामप्रिया स्थान न आश्चर्यास' (१४० ।). लक्ष्मणाने केलेला त्याग सीता व भरत इत्यादींच्या त्यागापेक्षा मोठा असला तरी भाऊ हा नात्याचा संबंध आहेच. गोपींनी त्याग केला तो काम वासनेने केला. 'गोप्यः कामात्' (भाग) म्हणून या अयोध्यावासी लोकांच्या त्यागापेक्षा हीन ठरतो व अनुकरणीय नाही. अयोध्येतील लोकांनी केलेला त्याग निष्काम, निर्हेतुक आहे हे मान्य करावेच लागणार.

हिं. *। सीलु सनेहु छाड़ि नहिं जाई । असमंजस बस भे रघुराई ॥५॥*
*। लोग सोक श्रम बस गए सोई । कछुक देवमायाँ मति मोई ॥६॥*
*। जबहिं जाम जुग जामिनि बीती । राम सचिव सन कहेउ सप्रीती ॥७॥*
*। खोज मारि रथ हांकहु ताता । आन उपायँ बनिहि नहिं बाता ॥८॥*

म. *। शीला स्नेहा ये न सोडतां । अडचणींत रघुराजा पडतां ॥५॥*
*। श्रमवश लोक शोकवश निद्रित । सुरमायें कांहींसे मोहित ॥६॥*
*। यामिनि-याम सदा युग टळले । प्रेमें राम सुमंत्रा वदले ॥७॥*
*। रथा हाकणें ठेउनि माग न । सुटण्या दुसरा उपाय तात न ॥८॥*

**अर्थ :** शीलाचा त्याग करता येत नाही व स्नेहही सोडता येत नाही (अशा) अडचणींत रघुराज (रघुराई) पडले असतां.॥५॥ श्रमांमुळे व शोकामुळे लोकांना (गाढ) झोप लागली; व देवमायेने त्यांस थोडेसे मोहित केले.॥६॥ रात्रीचे दोन प्रहर उलटून गेल्यावर राम प्रेमाने सुमंत्रास (सचिवास) म्हणाले की ॥७॥ तात ! रथाचा माग न ठेवता (आता) रथ हाकणे जरूर आहे; यांतून सुटण्यास दुसरा काही उपाय नाही.॥८॥

**टीका. चौ. ५-६ (१) शीला स्नेहा ये न सोडतां -** लोकांची वनात बरोबर येण्याची इच्छा आहे. ती पूर्ण करावी तर प्रतिज्ञाभंग होऊन शीलाला कलंक लागतो. लोकांना तसेच रडत, ओरडत ठेवून वायुवेगाने रथ न्यावा तर निर्दयपणा करावा लागतो, स्नेह सोडावा लागतो. पण प्रजेचे प्रेम पाहिल्यामुळे तसे करवत नाही. अशा अडचणीत रघुराज सापडले. रघुराज असल्याने ही अडचण भासली. 'कोण रघुविरा सम संसारा । शीला स्नेहा निभावणारा' (२४।४) **(क) लोक श्रमवश शोकवश निद्रित -** आधीच शोकाने कृश झालेले, सकाळपासून अन्नपाण्याचा लेश नाही आणि १२/१४ मैल रथाच्या मागे धावत आलेले; यामुळे थकवा किती आला असेल याची कल्पना तुम्हा आम्हास करता येणे शक्य नाही. 'श्रान्त भूप अति निद्रा आली' (१।१७०।२) फार थकून गेलेल्या माणसास तेव्हाच गाढ झोप लागते. त्यांतही देवमायेने असे मोहित केले की सूर्योदयापर्यंत कोणी जागेच होऊ नयेत.

(२) **वा.रा. -** या मंडळीत म्हातारपणामुळे मान गटगटा हालणारे अगदी जखखड वृद्ध ब्राह्मणसुद्धा आहेत. **'ते द्विजा विविधं वृद्धा ज्ञानेनवयसौजसा ।**

**वयःप्रकम्पशिरसः'** (२।४५।८) हे लोक सूर्योदय होऊन गेल्यावर बऱ्याच वेळाने जागे झाले आहेत. मात्र देवमायेने मोहिल्याचा उल्लेख नाही. लोकांस झोपलेले टाकूनच राम गेले आहेत; पण सूर्योदयानंतर. तेथे राम लक्ष्मणास म्हणाले आहेत की माझ्यामुळे अयोध्यावासी लोकांनी नुसत्या जमिनीवर झाडांखाली झोपणे पुन्हा घडता उपयोगी नाही. कारण की राजपुत्रांनी प्रजेला त्यांच्या दुःखापासून सोडवावी; पण आपल्यामुळे प्रजेला दुःखी करू नये. (२।४६।२२-२३) **हाच हेतु येथे रघुराज शब्दाने ध्वनित केलेला आहे.**

**चौ.** ७-८ (१) दोन प्रहर रात्र उलटून गेल्यावर **प्रेमें राम सुमंत्रा वदले** - सुमंत्राला राम पित्यासारखे मानतात हे येथे 'तात' शब्दाने दाखविले आहेच. शिवाय प्रजेच्या प्रेमामुळे पुढील गोष्ट करावी लागत आहे. (क) **रथा हाकणें माग न ठेउनि - माग** = पुढे निघून गेलेल्यांची मागे राहिलेली चिन्हे-खुणा. रथाचा माग म्हणजे चाकांच्या चाकोऱ्या व घोड्यांच्या नालांच्या खुणा. या खुणा सुस्थितीत राहिल्या तर त्या खुणांच्या अनुरोधाने त्या मार्गाने लोक आल्याशिवाय राहणार नाहीत हे जाणून सुमंत्रास सांगितले की कोणत्या दिशेस व कोणत्या मार्गाने आपण गेलो याचा मागमूस लागणार नाही अशा रीतीने रथ हाकणे जरूर आहे; त्याशिवाय या संकटांतून सुटण्यास दुसरा उपाय नाही.

*हिं.दो. । राम लखन सिय जान चढ़ि संभु चरन सिरु नाइ ॥*
*॥ सचिवँ चलायउ तुरत रथु इत उत खोज दुराइ ॥८५॥*

*म.दो. । सिताराम लक्ष्मण रथीं शंभुस नमिति चढून ॥*
*॥ सचिव शीघ्र रथ चालवी माग न मुळिं ठेऊन ॥८५॥*

**अर्थ** : सीता राम व लक्ष्मण यांनी रथांत चढून शंभूस नमन केले व सचिवाने रथाचा माग मुळीच न ठेवता त्वरेने रथ चालविला - हाकला ।।दो.८५।।

**टीका.** (१) मुळांतील राम लखन सिय हा क्रम वृत्ताच्या सोईसाठी आहे. (८३।१-२) गू.चं.प.) मराठीतील क्रम चढण्याचा आहे. प्रथम सीता मग राम व शेवटी लक्ष्मण चढले. (क) **सर्वांनी शंभूंस नमन केले.** अयोध्येतून निघताना गणपति, गौरी व गिरीशांनां प्रार्थना करून निघाले होते. येथे शंभूंना वंदन केले. ज्यांच्या योगाने शं-कल्याण भवति, होते ते शंभु. अपरात्री अंधारात प्रवास

करावयाचा आहे. अनेक नद्या व वने ओलांडावयाची आहेत. कल्याण झाले पाहिजे म्हणून शंभुनमन केले. पूर्वीच्या उल्लेखांनुसार गणपति व गौरी यांनाही केले असे मानणे योग्य आहे. **(ख) माग न मुळि ठेऊन** - वा.रा. म्हटले आहे की लोकांना मोह पाडण्यासाठी प्रथम उत्तरेस (उलट दिशेला) रथ नेऊन मग माग सापडणार नाही अशा रीतीने हाकलण्यास सांगितले आहे व त्या प्रमाणे केले आहे. उत्तरेस प्रथम गेल्याने प्रयाण मंगलकारक होईल असे शकुन दिसल्यामुळे तमसा ओलांडल्यावर प्रथम उत्तराभिमुख गेले. **'उदूमुखं तंतु चकार सः । प्रयाण मांगल्यनिमित्त दर्शनात्' माग कसा राहूं दिला नाही.** या विषयी विविध कल्पना करता येण्यासारख्या आहेत. I रथ एका दिशेस लांब नेऊन तेथून वर्तुळाकार गतीने पुन्हा परत पहिल्या चाकोरीत येऊन मिळणे; पुन्हा निराळ्या दिशेने तसेच करून पाहिल्याच चाकोरीत आणणे; या प्रमाणे दोन-चार वेळा केले म्हणजे माग काढणारे २/४ वेळा हिंडून हिंडून पुन्हा पूर्व ठिकाणीच आले की शोध घेणे, कंटाळून सोडून देतात. II किंवा रथाच्या मागल्या बाजूस बाभळीच्या वगैरे काठ्या जमिनीवर लोळत राहतील अशा दोराला बांधून रथ चालविला म्हणजे चाकोऱ्या व घोड्यांच्या टापांच्या खुणा पुसल्या जातात; व कोणीतरी काठ्या ओढीत नेल्या आहेत असा भ्रम उत्पन्न होतो. III नाल उलटे मारून दिशा भ्रम केला जातो किंवा नाल न मारता काही वेळ चालवून मग एखाद्या घोड्यालाच नाल मारून वगैरे अनेक प्रकारांनी माग भुलविता येतो. सुमंत्राने काय केले ते आता कोण निश्चित सांगणार ! आता काय होते पाहू –

*हिं.* *। जागे सकल लोग भएँ भोरू । गे रघुनाथ भयउ अति सोरू ॥१॥*
*। रथ कर खोज कतहुँ नहिं पावहिं । राम राम कहि चहु दिसि धावहिं ॥२॥*
*। मनहुँ बारिनिधि बूड़ जहाजू । भयउ बिकल बड़ बनिक समाजू ॥३॥*
*। एकहि एक देहिं उपदेसू । तजे राम हम जानि कलेसू ॥४॥*

*म.* *। जागृत सगळे लोक सकाळां । गत रघुनाथ ओरडा झाला ॥१॥*
*। रथमागास न कोठें पावति । राम राम ! हा ! चहुंदिशिं धावति ॥२॥*
*। जणुं जलधींत जहाज बुडालें । वणिज लोक विव्हळ अति झाले ॥३॥*
*। करिति एकमेकां उपदेशा । रामें त्यक्त जाणुनी क्लेशां ॥४॥*

**अर्थ :** सकाळ होताच सगळे लोक जागे झाले व 'रघुनाथ गेले' असा ओरडा, गोंगाट सुरू झाला.॥१॥ राम ! हा राम ! असे ओरडत चारी दिशांना धावपळ करीत आहेत; पण रथाचा माग कोठेच लागेना.॥२॥ सागरांत जहाज बुडून व्यापारी लोक जसे व्याकुळ व्हावेत तसेच जणू सर्व लोक अति व्याकुळ झाले.॥३॥ (मग) ते एकमेकांस उपदेश करू लागले की आपल्याला क्लेश होतील हे जाणून रामचंद्रांनी आपला त्याग केला.॥४॥

**टीका. - चौ. १-२-(१) गत रघुनाथ** - 'करुणामय रघुनाथ हृषिकपति । शीघ्र परावी पीडा पावति' (८५।२) हा हेतु दाखविण्यासाठीच येथे रघुनाथ शब्द वापरला आहे. **ओरडा** - हलकल्लोळ कसा उडाला याचे वर्णन वा. रा. सर्ग ४७ मध्ये आहे. त्याचे सार येथे ८५।२ मध्ये आहे. (क) रथाचा माग काढीत हा राम ! हा रघुनाथ ! हाय हाय ! इत्यादी प्रकारे ओरडत हजारो लोक धावू लागल्यावर रथाचा माग असता तरी सापडला नसता. चारी दिशांस धावले. यावरून चारी दिशांना रथाची चिन्हे दिसत होती. त्या चाकोरीप्रमाणे जावे तो पुन्हा पहिल्या जागेवर ! असे होऊ लागले व त्यामुळे लोक निराश झाले. राम कोठे गेले हे समजणेसुद्धा अशक्य झाले ! आता दर्शन कुठले ! असे वाटले व लोक हताश होऊन धीर सुटला, व्याकुळ झाले.

**चौ. ३ - (१) जणुं जलधींत जहाज बुडालें** - रामविरह सागरांत लोकांच्या धैर्याचे जहाज बुडाले. (धीर सुटला). त्यामुळे पार जाणे तर अशक्यच झाले. पण गटंगळ्या खात बुडणार असे वाटू लागले. त्यामुळे अत्यंत व्याकुळ झाले. 'रामवियोग पयोधि अपार किं ।' पांथिक बसले सगळे प्रियजन ॥ धीर धरां तर पावूं पारा । ना तर बुडूं सहित परिवारा ॥१५४।५-७॥

**चौ. ४ -** (१) राम, आनंदसिंधु सुखराशी, सुखधाम असून असे टाकून का गेले. याचा विचार करू लागले लोक तेव्हा ठरले की आपल्या प्रिय प्रजेला क्लेश होईल हे जाणून टाकून गेले. निष्ठुरपणाने नाही त्याग केला; असे एकमेकांस सांगू लागले. वा. रा. सर्ग ४७ मध्ये या लोकांनी केलेले रामगुणवर्णन फारच सुंदर आहे.

हिं. *। निंदही आपु सराहहिं मीना । धिग जीवन रघुबीर बिहीना ॥५॥*
*। जौं पै प्रिय बियोग बिधि दीना । तौ कस मरनु न मागें दीन्हा ॥६॥*
*। एहि बिधि करत प्रलाप कलापा । आए अवध भरे परितापा ॥७॥*
*। बिषम बियोगु न जाइ बखाना । अवधि आस सब राखहिं प्राना ॥८॥*

म. *। निंदिति अपणां स्तविती मीनां । धिग् जगणें रघुवीर विहीनां ॥५॥*
*। प्रिय वियोग विधिनें जर निर्मित । मरण मागतां कां नहि अर्पित ॥६॥*
*। करतां अशा प्रलाप - कलापां । येति अयोध्यें अति परितापां ॥७॥*
*। विषम वियोग दशा वदवे ना । राखिति अवधी-आशे प्राणां ॥८॥*

**अर्थ** : सर्व लोक स्वतःची निंदा व मीनांची प्रशंसा करू लागले; की रघुवीरविहीन राहिलेल्या आमच्या जगण्याला धिक्कार असो.॥५॥ ब्रह्मदेवाने जर प्रियवियोग निर्माण केला तर आता मागितल्याबरोबर मरण का देत नाही.॥६॥ या प्रमाणे पुष्कळ प्रलाप करीत अत्यंत परितप्त होऊन लोक अयोध्येत परत आले.॥७॥ त्यांच्या त्या कठीण (विषय) वियोग दशेचे वर्णन करणे शक्य नाही. (पण) १४ वर्षाच्या मुदतीच्या आशेवर सर्वांनी आपले प्राण ठेवले आहेत.॥८॥

**टीका. : चौ. ५-६ (१) निंदिति अपणां...विहीनां** - जे सर्व सुखसागर; कृपासिंधु-निस्वार्थ प्रेम करणारे राम, ते आम्हाला टाकून गेले. त्या अर्थी आमचे प्रेमच रामावर कमी आहे. आमचे प्रेम खरे असते तर आमचे प्राण राहिले नसते. पाण्यापासून वियोग झाला की प्राण सोडणाऱ्या माशांचे पाण्यावर जेवढे प्रेम आहे तेवढे सुद्धा आमचे नाही. कोणत्या सुखासाठी आता जीव देहामध्ये रहात आहे काही समजत नाही. **(क) प्रियवियोग विधिनें अर्पित** - ब्रह्मदेवाने अशी मायलेकरांची ताडातोड का केली? यांत त्या चतुराननाची चतुरता ती काय? बरे ताडातोड केली तर केली; मग आम्ही आता मरण मागत असतां कां देत नाही? का मरण देण्यातसुद्धा त्याच्या पदराला काही खार लागतो? **'जणुं जलचरगण पाणी आटत'** (५१।६) असे या लोकांविषयी जे पूर्वी म्हटले ते खरे करून दाखविले. मीनांशिवाय इतर जलचर प्राणी पाणी आटून गेले तरी मरत नाहीत.

**चौ. ७-८ (१) प्रलाप** = असंबद्ध भाषण, बडबड, **कलाप** = समूह. अशा प्रकारे एक ना दोन. आपल्या भाग्याला, आपल्याला, ब्रह्मदेवाला, दैवाला नानापरीने

दोष ठेवीत व सीता आणि लक्ष्मणरूपी मीनांच्या भाग्याची व प्रेमाची प्रशंसा करीत परतले. विरह दाह हृदयाला व सर्वांगाला भाजीत आहे व तोंडाने शोकवियोग-प्रलाप काढीत आहेत. **(क) विषमवियोग - कठोर, दुःसह वियोग, दुःख, दाह, दैन्य इ. 'श्वास घेति जळती विषम ज्वरिं । रामाविण जीवनं आशा तरि' (७१।५ टीप) (ख) राखिति अवधी आशे प्राणां** - १४ वर्षे गेली म्हणजे राम येतील ही आशा आहे. ही नसती तर मात्र लोक मेले असते. 'जल अवधी प्रीय परिजन मीन' (५७।२) असे कौसल्या मातेने आधीच जाणले आहे. हे लोक इतर कसल्याही सुखाच्या आशेने जगले नाहीत.

***हिं.दो.*** ***। राम दरस हित नेम व्रत लगे करन नर नारि ॥***

***॥ मनहुँ कोक कोकी कमल दीन बिहीन तमारि ॥८६॥***

***म.दो.*** ***। रामदर्शना व्रतादिक करुं लागति नरनारि ॥***

***॥ जणूं कोक कोकी कमल दीन विहीन तमारि ॥८६॥***

**अर्थ** - सर्व स्त्रिया व पुरुष (सर्व लोक) राम दर्शनासाठी व्रत नेम इत्यादींचे पालन करू लागले व असे दीन झाले की जणू भास्कराशिवाय चक्रवाक, चक्रवाकी व कमलेच.।।दो.८६।।

**टीका.** - (१) येथे **व्रत** शब्दाने मुख्यतः ब्रह्मचर्य व्रत मोठ्या खुबीने सुचविले आहे. कोक व कोकी यांचा रात्री वियोग होतो. म्हणजेच त्यांना ब्रह्मचर्य पाळावे लागते. अयोध्या जणू काल रात्री अंधारी आहे असे जे म्हटले पूर्वी, तीच उत्प्रेक्षा चालू आहे. तमारि = तम + अरि; तम व तमस् हे दोन्ही संस्कृत शब्द आहेत (अ.व्या.सु.) अयोध्या तमोमय अमावस्येची रात्र आहे. राम तमारि निघून गेले आहेत. जिथे भानु तिथे प्रकाश, दिवस असतोच. राम अयोध्येत येईपर्यंत वियोगशोक दुःख क्लेशरूपी तम अयोध्येतून जात नाही. कोक, कोकी शब्दांनी गृहस्थाश्रमी लोकांचा उल्लेख केला व कमल शब्दाने ज्ञानी, विरक्त, त्यागी, संन्यासी, मुनि, वानप्रस्थ यांचा उल्लेख केला. कमळांप्रमाणे विषय जलांत असूनही अलिप्त राहणारे ते जीवन्मुक्त ते सुद्धा सुकून गेले. येथे नुसत्या कोकांचा उल्लेख असता तर 'मुनि' हा अर्थ घेता आला असता; पण कोककोकींचा = चक्रवाकमिथुनांचा, उल्लेख असल्याने गृहस्थाश्रमी ज्ञानीभक्तांचा उल्लेख केला

आहे. रघुनाथ रथाने तमसापार गेल्यानंतर कथासरितेचा ओघ अयोध्येपर्यंत आला. लोकांना १२।१४ मैल चालून अयोध्येत येण्यास जेवढा वेळ लागला त्यापेक्षा १/२ प्रहर अधिक वेळात रामरथ शृंगवेर पुरापर्यंत जाऊन पोचला. आता कथा सरितेचा प्रवाह पुन्हा तिकडे वळेल. कविता सरितेची गति कुटिल असते हे पूर्वीच (१।१० छंद) सांगितले आहे.

*हिं. । सीता सचिव सहित दोउ भाई । सृंगबेरपुर पहुँचे जाई ॥१॥*
*। उतरे राम देवसरि देखी । कीन्ह दंडवत हरषु बिसेषी ॥२॥*
*। लखन सचिव सियँ किए प्रनामा । सबहि सहित सुखु पायउ रामा ॥३॥*

*म. । सिता सचिव सह लक्ष्मण रघुपति । शृंगवेरपुर समीप पोचति ॥१॥*
*। उतरति राम देवसरि देखत । हर्षति अति करतात दण्डवत ॥२॥*
*। लक्ष्मण मंत्री; सीता प्रणमत । सर्वा सहित राम सुख पावत ॥३॥*

**अर्थ :** सीता व सचिव यांसहित लक्ष्मण व राम शृंगवेरपुराजवळ येऊन पोचले.॥१॥ देवनदी-गंगा-दृष्टीस पडताच राम रथांतून उतरले; व अति हर्षित होऊन त्यांनी गंगेला दण्डवत-नमस्कार (घातला) केला - ॥२॥ व लक्ष्मण व सचिव यांनीही (उतरून) केला. सीतेने प्रणाम केला व सर्वासहित रामचंद्रांना सुख झाले.॥३॥

**टीका. चौ. १ -** (१) शृंगवेरपुर - याला तिकडे **सिंगरौर म्हणतात.** तुलसीदासकाळी सुद्धा सिंगरौर, सिंग्रौर हेच नाव प्रचलित होते. हे गाव तमसेपासून सुमारे ४६ कोसांवर आहे. **'भरतकुंड'**पासून रेल्वेने **प्रतापगढ** ५२ मैल व तेथून सिंग्रौर ४० मैल आहे. हे गाव अलाहाबाद जिल्ह्यात आहे. येथे **रामचौरा नावाचे स्थान आहे.** येथे रामचंद्रांनी वस्ती केली होती. एक घाट आहे. त्याला **रामसंध्या घाट असे म्हणतात.** सिंग्रौर प्रयागपासून २२ मैलांवर आहे. (मा.पी.) **(क) शृंगवेर** = आद्रक, आले; शिंगासारखे वरे, शरीर ज्याचे असते ते, ज्याच्यापासून सुंठ करतात ते किंवा शृंगवेरे - देहे यस्य, शिंग आहे देहावर ज्याच्या = शृंगर्षि, शृंगी ऋषि. यांच्या तपश्चर्येचे स्थान म्हणूनही शृंगवेरपुर हे नाव पडले असावे. येथे अद्यापही दोन विशाल शिसवींची (शिंशपा) झाडे दाखविली जातात. **(ख)** तमसा ओलांडून गेल्यावर शृंगवेरपुराच्या वाटेत प्रथम वेदश्रुति, नंतर गोमती व

नंतर स्पंदिका या तीन नद्या ओलांडाव्या लागल्या आहेत. (वा.रा. ४९।१०-१२) मानसांतील भरतयात्रेत तमसा, गोमती, सई (नदी) व शृंगवेरपुर असा क्रम आहे. यावरून वा.रा स्पंदिका = सई असे ठरले. तमसा व गोमती यांच्या मध्ये कोणती नदी कुठे ओलांडावी लागते हे ठरल्यास मानसांतील रामवनवास यात्रेचा मार्ग निश्चित करता येईल. **ल.ठे.** - येथून पुढे रामचंद्रांबरोबर प्रवासात फलाहारादि करण्यात असणाऱ्या व्यक्तींचा नामनिर्देश जाणून-बुजून केलेला दिसतो. याचा शबरी भेटवर्णनात संबंध आहे.

**चौ. २ - (१) उतरति राम देवसरि देखत** - प्रवासांत असता ज्या ठिकाणी आल्यावर तीर्थाचे, क्षेत्राचे दर्शन होईल तेथे वाहनांतून उतरून, त्या तीर्थाला, क्षेत्राला वंदन केले पाहिजे हा धर्ममार्ग स्वतःच्या चरित्राने येथे दाखविला. जनकराजांना चित्रकूट जेथून दिसला तेथे ते उतरले आहेत - 'गिरिवर बघति जनकपति जेव्हां । नमन करुनि रथ सोडिति तेव्हां' (२७५।२) 'राम' शब्दच सांगतो की देवनदीचे दर्शन होताच रघुपतीस आनंद झाला.

**चौ. ३ - (१)** राम उतरल्याचे सांगितले; पण लक्ष्मण सीता, व सचिव उतरल्याचे कुठे सांगितले नाही. यावरून असे मानावयाचे काय की बाकी कोणी रथांतून उतरलेच नाहीत? तसे मानणे मूर्खपणा ठरेल. सचिव रथ हाकणारा असल्याने त्याने सर्वांच्या शेवटी उतरणेच भाग आहे. येथे **लक्ष्मण सचिव व सीता असा क्रम वंदनाच्या पद्धतीमुळे ठेवावा लागला आहे.** राम उतरल्यावर लक्ष्मण उतरले, मग सीता उतरली व शेवटी सुमंत्र उतरले असे मानणेच व्यवहाराला धरून आहे. **चढताना सीता प्रथम, उतरताना सीता शेवटी. (क) लक्ष्मण मंत्री; सीता प्रणमत** - रामचंद्रांनी दंडवत, प्रणाम केला. पण बाकीच्या तिघांनी साधा प्रणाम केला असा सरळ अर्थ हिंदी चौपाईचा होतो. म्हणजे लक्ष्मणाने दण्डवत - प्रणाम केला नाही असे ठरते. पण असे मानणे म्हणजे लक्ष्मणाच्या रामसेवकत्वाला व चरित्राला कलंक लावणे आहे. प्रणाम शब्दाचा संबंध फक्त सीतेशी आहे; म्हणून मराठीत मंत्री; शब्दानंतर अर्धविराम घालून अनर्थकारक अर्थ करण्यास जागा ठेवलेली नाही. लक्ष्मण व सचिव यांचा संबंध मागल्या चौपाईशी आहे. 'हर्षति अति करतात दण्डवत लक्ष्मण मंत्री;' असा संदर्भ घेतला

म्हणजे सीतेचे वैशिष्ट्य सांगून बाकीच्यांचे साम्य दाखविले जाते. रघुपतींनी गंगेला साष्टांग नमस्कार घातलेला 'रघुपतिसेवक' लक्ष्मणाने पाहिल्यावर लक्ष्मण तसाच नमस्कार न करता नुसता, हात जोडून नमस्कार करतील हे वाचकांस शक्य वाटते काय? पूज्यांना नमन करताना राम प्रथम नमन करतात व त्याप्रमाणेच लक्ष्मण नंतर करतात हे विशेषतः विश्वामित्र - दशरथ भेटीच्या वेळी जनकपुरीत स्पष्ट झाले आहे.

(२) **सर्वांसहित राम सुख पावत** - सर्वांना सुख झाले असे सरळ म्हटले असते तर काय बिघडले असते? रामचंद्रांना सुख झाले म्हणून सर्वांना सुख झाले व सर्वांना सुख झाले म्हणून रघुनाथांस झाले. **जशि सीता लक्ष्मण सुख लभती । तेंच करिति रघुनाथ बोलती ॥... 'बघुनि बंधु सीता व्याकुळती । जेविं तनुस छाया अनुसरती,** (१४१।१,६) ठळक अक्षरांतील दोन वचनांचे सारच येथे दिसले.

*हिं.* ***। गंग सकल मुद मंगल मूला । सब सुख करनि हरनि सब सूला ॥४॥***
***। कहि कहि कोटिक कथा प्रसंगा । रामु बिलोकहिं गंग तरंगा ॥५॥***
***। सचिवहि अनुजहि प्रियहि सुनाई । बिबुध नदी महिमा अधिकाई ॥६॥***
*म.* ***। गंगा सब मुद-मंगल-मूला । सब सुखकरणि हरणि सब शूलां ॥४॥***
***। सांगत विविधा कथा प्रसंगां । राम विलोकिति गांग तरंगां ॥५॥***
***। सचिवा अनुजा प्रियेसि सांगति । विबुध नदी-महती अधिका अति ॥६॥***

**अर्थ :** गंगा सर्व मोदाचे व मंगलांचे मूळ असून सर्व सुखकारक व सर्व शूल निवारक आहे.॥४॥ विविध कथा प्रसंगांचे वर्णन करीत राम गंगेच्या (गांग) तरंगांकडे बघत आहेत.॥५॥ सचिवाला, लक्ष्मणाला (अनुजास) व प्रियेला (सीतेला) देवनदीची अति अधिक (विशेष) महती रामांनी वर्णन करून सांगितली.॥६॥

**टीका. चौ. ४-६** (१) मंगलमूल हे विशेषण मानसांत अनेकांना वापरले आहे. पण **मुद-मंगलमूल** हे विशेषण फक्त सत्संगति, मातेची आज्ञा व आशीर्वाद, गंगा, रामकथा, नाम, राम, गुरुपादरज व चित्रकूटचा सर्व समाज यांनाच वापरलेला आहे. पदांत तु.दासांनी (वि.प.) गंगेचे माहात्म्य विस्तारपूर्वक सांगितले

आहे. पदे १७-२० पहावे. (क) गंगा आनंद, मंगलमूल, सुखदायक, दुःखविनाशक कशी आहे या विषयी विविध कथा सांगत राम गंगेची शोभा अवलोकन करीत आहेत. या प्रमाणे अनेक कथा सांगून सचिव, बंधु व सीता यांना देवनदी गंगेचे महत्त्व इतर सर्व नद्यांपेक्षा विशेष अधिक कसे आहे सांगितले. (ख) तीर्थयात्रेतील आणखी एक मर्यादा येथे दाखविली - **वाहनांतून उतरून यथाधिकार वंदन केल्यानंतर जवळ जाऊन त्या तीर्थाचे दर्शन व नंतर महात्म्य श्रवण करावे व नंतर स्नान वगैरे तीर्थविधि करावा. तोच आता सुचवितील.**

*हिं.* ***। मज्जनु कीन्ह पंथ श्रम गयऊ । सुचि जल पिअत मुदित मन भयऊ ॥७॥***
***। सुमिरत जाहि मिटइ श्रम भारू । तेहि श्रम यह लौकिक ब्यवहारू ॥८॥***

*दो.* ***। सुद्ध सच्चिदानंदमय कंद भानुकुल केतु ॥***
***॥ चरित करत नर अनुहरत संसृति सागर सेतु ॥८७॥***

*म.* ***। करतां स्नान पथश्रम हरले । शुचि जल पितां मुदें मन भरलें ॥७॥***
***॥ स्मरतां ज्यांस सरे श्रमभारहि । त्यां श्रम लौकिक हा व्यवहार हि ॥८॥***

*दो.* ***। शुद्ध सच्चिदानंदमय कंद भानुकुलकेतु ॥***
***॥ मनुजसदृश करिती चरित संसृतिसागरसेतु ॥८७॥***

**अर्थ :** (नंतर) स्नान केले तेव्हा प्रवासाने आलेला थकवा गेला; व पवित्र जलाचे पान केल्यावर मन आनंदाने भरले.॥७॥ ज्यांचे स्मरण केल्याने श्रमांचा सर्वभारच सरतो (जन्ममरण परंपरेचे श्रम सरतात) त्यांना श्रम झाले, हा केवळ लौकिक व्यवहार आहे.॥८॥ शुद्ध (गुणमायातीत), सत्, चित्, आनंदमय, कं (सुख) देणारे (द), सूर्यकुळ कीर्तीची ध्वजारूप, (राम) मनुष्यासारखे चरित्र (आचरण) करीत आहेत; (पण) ते संसारसागरावरील सेतु (पुला) सारखे आहे.॥दो.८७॥

**टीका. चौ. ७ - (१) करतां स्नान पथश्रम हरले** - गार पाण्याने बुडी मारून स्नान केले की शारीरिक थकवा तेव्हाच जातो व हुरूप येतो. याचे कारण आपाद मस्तक रुधिराभिसरण झपाट्याने होते. **मात्र प्रवासाने आलेला घाम साफ जिरून वाढलेली उष्णता कमी होईपर्यंत गार पाण्यात स्नान करू नये** असे आरोग्यशास्त्र सांगते. गंगेविषयीच्या कथा व तिचा महिमा सांगेपर्यंत या दोन्ही

गोष्टी साधल्या, एकपंथ दो काज असे सहज झाले. **(क) पथश्रम** - ९० मैलांचा प्रवास, वैशाखाच्या महिन्यात रथाने एका टप्प्यात करून तिसऱ्या प्रहरी येऊन पोचले. यामुळे **प्रवासाचे श्रम सगळ्यांनाच झाले होते.** इतरांनी स्नान व जलपान केले हे निराळे सांगण्याची आवश्यकता नसल्याने तो उल्लेख केलेला नाही. **(ख) शुचिजल पितां मुदें मन भरलें** - स्नानाने शरीर पवित्र, शुद्ध व गंगास्नानाने सर्व पापहरण होत असल्याने अंतरंग शुद्ध झाले. नंतर त्या पवित्र जलाचे पान केले. स्नान केल्यावर मग पाणी घ्यावे; आधी पारोशाने पाणीसुद्धा पिऊ नये हे येथे पुन्हा दाखविले. स्नानाने श्रमपरिहार व जलपानाने सुख, आनंद झाल्याचे दाखविले. पूर्वी व पुढे हे अनेक ठिकाणी दाखविले आहे. 'स्नान-पान श्रमपरिहार-सुख' प्र.प्र. १६।६ पहावे.

**चौ. ८ - (१) त्यां श्रम?** येथे कवि श्रोत्या वक्त्यांच्या मदतीस हजर आहेत. श्रम झाले, श्रमपरिहार झाला इ. मानवदेह धर्म दिसल्यामुळे राम मनुष्य आहेत असा भ्रम होण्याचा संभव जाणून जागृतीची घंटा वाजवितात की ज्यांच्या स्मरणाने जन्ममरणाचे व कर्मभोग चक्रावर फिरत राहण्याचे सर्व श्रम कायमचे नष्ट होतात त्या भगवंताला श्रम कुठले व श्रमपरिहारादि गोष्टी कोठल्या. लोकांनी व्यवहार कसे करावे याचे धडे घालून देण्यासाठी हे सर्व लोकव्यवहार नाट्य करावे लागते. 'धर्ममार्ग चरित्रेण' (रा.पू.) 'सोंगा योग्य किं नटें नाचणें' (१२७।८). **स्वतःच्या आचरणाचा जितका अनुकूल परिणाम इतरांवर होतो तितका उपदेशाचा परिणाम होत नाही.** असे नरचरित्र कां करतात व रघुनाथ तत्त्वतः कसे आहेत हे या काण्डांत पुन्हा एकदा स्पष्ट सांगतात.

**दो. (१) शुद्ध** - षड्विकार, गुण, अवस्था, भेद, परिच्छेद, ऊर्मी इत्यादी दोष नाहीत, म्हणजेच माया व मायाकार्य यांच्या अतीत असलेले. भाव हा की त्यांच्या ठिकाणी पापपुण्यादी कधीच नसते; पण नरचरित्र करून दाखवीत आहेत. **(क) सच्चिदानंदमय** - सत्, चित् व आनंद हे ब्रह्माचे स्वरूप लक्षण मानतात. रघुपतींचा देह अष्टधा प्रकृतीचा नसून तो केवळ सच्चिदानंदमय आहे. 'चिदानंदमय आपली काया। विगत विकार...' (१२७।५) असे वाल्मीकी प्रभूंनाच सांगतात तेथे गू.चं. पहावी. **(ख) कंद** = कं = सुख, कंऽजल (ए.को.७)

सुखरुपी जल देणारे मेघ. '**सान्द्रानन्दपयोद** सौभगतनुं' (अर.मं.२) वन्दे **कन्दावदातं**' (६।मं.श्लो.१) कंकण जसे सुवर्णमय, तरंग जसे जलमय तसाच रामदेह सच्चिदानंदमय आहे. सच्चिदानंद = ब्रह्म काही करीत नाही. तसेच राम मनुज चरित करीत असलेले दिसले तरी ते काही करीत नाहीत. मग नरचरित्र कां करतात? **(ग)** संसृतिसागरसेतु निर्माण करण्यासाठी करतात. रामजन्माचा - अवताराचा - जो हेतु सांगितला तोच या काण्डांतील चरित्राचा येथे सांगितला. '... निज राखी श्रुतिसेतु ।। जगिं विस्तारिति विमल यश रामजन्मि हा हेतु' (१।१२१) **तें यश गाति भक्त भव तरती**' सागरावर सेतुपूल बांधला गेला तर एक मुंगीसुद्धा त्या पुलावर चढून सहज पार जाईल. त्याप्रमाणे राम जे चरित्र करीत आहेत ते भवसागरातील पुलासारखे आहे.

***हिं.*** *। यह सुधि गुहँ निषाद जब पाई । मुदित लिए प्रिय बंधु बोलाई ॥१॥*
*। लिए फलमूल भेंट भरि भारा । मिलन चलेउ हियँ हरषु अपारा ॥२॥*
*। करि दंडवत भेंट धरि आगें । प्रभुहि बिलोकत अति अनुरागें ॥३॥*

***म.*** *। कळतां वृत्त निषाद गुहाला । मुदित बोलवी प्रिय सुहृदांला ॥१॥*
*। फल मूलादि भेट घे फार हि । निघे भेटुं हृदिं हर्ष अपारहि ॥२॥*
*। भेट समर्पुनि करी दण्डवत । प्रेमें प्रभुसि राहि अति निरखत ॥३॥*

**अर्थ :** हा समाचार गुह नावाच्या निषादाला कळला; तेव्हा त्याने आपली प्रिय मंडळी व सुहृद यांना बोलावून घेतले.॥१॥ फलमूलादि बरीच भेट (बरोबर) घेतली आणि भेटण्यासाठी निघाला तेव्हा त्याला अपारच हर्ष झाला.॥२॥ भेट समर्पण करून (पुढे ठेऊन) त्याने दण्डवत नमस्कार केला व अति प्रेमाने प्रभूकडे बघतच राहिला.॥३॥

**टीका. : चौ. १ (१) गुह** हा निषादांचा - कोळ्यांचा राजा - 'तत्र राजा गुहो नाम रामस्यात्मसमः सखा ।। निषादजात्यो बलवान्... (वा.रा. २।५०।३३-३५ पहा.) यावरून स्पष्टपणे कळते की गुह रामाचा अत्यंत प्रिय सखा पूर्वीच होता. **(क)** सम्राट पुत्राला भेटण्यास जाणे असल्याने मित्र, बांधव, प्रियजन, अमात्य इत्यादींना घेऊन भेटीस जाणे योग्यच आहे. जी बातमी त्यास मिळाली ती इतकीच मिळालेली दिसते की दशरथनंदन रघुनाथ भार्या-बंधु सचिवांसह

दिव्य रथांत बसून आले व सर्वांनी गंगास्नानही केले. पण वस्त्रे मुनींच्या सारखी नेसलेले दिसले. त्याला वाटले असेल की काही व्रतानिमित्त गंगास्नानाला आल्या असतील स्वाऱ्या म्हणून त्याने भेट घेतली ती विचारपूर्वक घेतली.

**चौ. २ - (१) फलमूलादि भेट नेली - बा.रा.** भोजनादि विविध पदार्थ, घोड्यांसाठी गवत व चंदी इत्यादी सर्व नेल्याचं वर्णन आहे. याने मात्र फलमूलकंद इत्यादी मुनिजनांचे आहाराचे पदार्थच नेले बरोबर. भरतास भेटण्यास जाताना मात्र मासे, पशु इत्यादी विविध भेट नेली आहे. 'जसा देव तस समुचित पूजन' (२१३|७) **(क) हृदिं हर्ष अपार -** परम हर्ष झाला निघताना. माझ्या नीच जातीच्या राज्यात सम्राटपुत्र सपत्नीक आले ! असे वाटून अपार हर्ष झाला. 'इष्टं मित्रं प्रियां भार्या' पुत्रं चैव कनिष्ठकम् रिक्तपाणिर्नपश्येत राजानं देवतां गुरुम्' यांना भेटण्यास जाताना रिक्त हस्ते जाऊ नये. काहीतरी योग्य भेट घेऊन जावे असा नियम आहे. ज्यांना भेटण्यास जावयाचे, ज्यांच्या दर्शनास जावयाचे, त्यांच्या व त्यांच्या परिस्थितीस योग्य अशीच भेट न्यावी. उदा. संन्याशाच्या दर्शनास जाताना पैसे, बाजारातील पेढे, बर्फी, लाडू, चिवडा इत्यादी नेणे योग्य नाही. 'यतीनां कांचनम् दद्यात् तांबूलं ब्रह्मचारिणाम् । चोराणामभयं दद्यात् दाताऽपि नरकं व्रजेत् ।। संन्याशांस पैसे देणारा नरकांत पडतो.

**चौ. ३ (१) भेट समर्पुनि करी दण्डवत -** योग्य भेट पुढे ठेवावी व गुरु, संत, देव, संन्यासी (विष्णोः चरं रूपम्) इत्यादीनां (स्त्रियांशिवाय) सर्वांनीच दण्डवत नमस्कार करावा. नंतर गुरु, संत व देव असतील तर त्यांची मूर्ती नेत्रांत भरून ठेवण्याचा प्रयत्न करावा. असा भेटीचा दर्शनाचा विधि येथे दाखविला. गुह अति प्रेमाने टक लाऊन बघत स्तब्ध राहिला. विश्वामित्र, जनक, परशुराम अशांची सुद्धा प्रथम दर्शनात अशीच दशा झाली आहे. **(क)** दंडवत - करण्यापूर्वी गुहाने जात, नाव वगैरे येथे सांगितले नाही व वसिष्ठ व भरत यांच्या दर्शनास गेला तेव्हा नाव, गाव, जात सांगून दंडवत नमस्कार व जोहार केला आहे. यावरून ठरते की रघुनाथ व गुहनिषाद यांचा चांगला पूर्व परिचय होता.

***हिं.*** *। सहज सनेह बिबस रघुराई । पूँछी कुसल निकट बैठाई ।।४।।*
*। नाथ कुसल पदपंकज देखें । भयउँ भाग्यभाजन जन लेखें ।।५।।*

*म. । सहज - स्नेह - विवश रघुराजहि । बसवुनि निकट विचारिति कुशलहि ॥४॥*
*। नाथ ! कुशल पदपंकज दिसतां । असें भाग्यभाजन जन गणतां ॥५॥*

**अर्थ** : रघुराज सहज स्नेहालाच विशेष वश (विवश) होतात; (म्हणूनच) त्याला आपल्या जवळ बसविला व कुशलही विचारले.॥४॥ (गुह म्हणाला) नाथ ! आपल्या चरण कमलांचे दर्शन झाले म्हणजे कुशल आहे (हे ठरले) व आपला एक दास (जन) म्हणून माझी गणना झाली त्या अर्थी मी भाग्याचे पात्र झालो आहे.॥५॥

**टीका. चौ. ४.** - (१) **रघुराज विवश** - राजे लोक कोणाला वश होत नसतात. 'भूप सुसेवित वश न गणावे' (३।३७।८) तथापि रघुराज स्नेहाला वश होतात व सहज स्नेहाला स्वाभाविक स्नेहाला, तर विशेषच वश (= विवश) होतात. गुह अद्याप हे जाणत नाही की राम भगवान परमात्मा आहेत तरीसुद्धा त्याचे प्रेम पुष्कळच दिसले. येथे सुचविले की गुहाचे प्रेम सहज आहे म्हणून त्याला रघुराज विवश झाले व तो अस्पृश्य जातीचा असून त्याला कडकडून भेटले; आणि त्याला आपल्या जवळ बसवून नात्याच्या माणसास किंवा मित्रास कुशल विचारतात तसे कुशल विचारले. ल.ठे. येथे असे दिसते की राम गुहाला भेटले नाहीत; पण या वेळी भेटल्याचा उल्लेख पुढे गुह-भरत भेटवर्णनात केला आहे. **या तर रामें हृदयिं कवळिला कुल समेत जगपावन केला** (१९४।६) असे देवांनी गुहावर पुष्पवृष्टी करून त्याची प्रशंसा केली त्यात म्हटले आहे (१९४।२-१९५।२ पर्यंत पहा). दण्डवत केल्यावर त्या व्यक्तीला उठवून हृदयाशी धरून मग बसवून कुशल विचारण्याची पद्धती प्रेमी व्यक्तींच्या संबंधात मानसांत दिसून येते. भरताच्या बरोबर चित्रकूटास गेल्यावर राम पुन्हा गुहाला भेटले आहेत. **भेटून जवळ बसविल्याचे परम भाग्य प्रथम गुहाला लाभले आहे.** नारदांइतके निषाद राजाचे भाग्य आहे. (३।४१।१०-११ पहा.) जवळ बसण्याचे भाग्य सुग्रीव सखा असूनही त्यास लाभले नाही. अधिक विस्तार **'भेटणें - हृदयाशीं धरणें'** प्र. प्र. १३।१० पहा.

**चौ. ५** - (१) **नाथ कुशल पदपंकज दिसतां** - राम परमात्मा आहेत हे गुह अद्याप जाणत नाही. म्हणून **'तोंवरि जीवा कुशल नहिं स्वप्निं मना विश्राम । जों न राम भजतो त्यजुनि शोकधाम जो काम'** (५।४६।) इत्यादी वचने येथे तुलनेस

घेता येत नाहीत. येथे कुशल = पुण्य, सुकृत हा अर्थच घेणे भाग आहे. भाव हा की माझे काहीतरी पुण्य होते म्हणून आपल्या चरण कमलांचे दर्शन झाले नाही तर मला येथे आपले दर्शन होणे अशक्य ! **'पर्याप्तिक्षेमपुण्येषु कुशलम्'** (अमरें) (क) **असें भाग्यभाजन जन म्हणतां** - भाग्यभाजन केव्हा होतो व सहजस्नेह म्हणजे काय हे सुमित्रेच्या वचनांवरून स्पष्ट कळते. **'भूरिभाग्य भाजन बनसि... की तव मन करि रामपदिं ठाव छलादि बिनाहि'** (७४) **रामपदीं दृढतापूर्वक मन रमणे व त्यांत छल कपटादि विकार मुळीच नसणे म्हणजे सहज स्नेह** व असा स्नेह ज्याचा असेल तो भूरिभाग्यभाजन - निषादराज भाग्यभाजन आहे आणि लक्ष्मण भूरिभाग्यभाजन आहे; कारण राम परमात्मा आहेत हे जाणून लक्ष्मण प्रेम करतात; पण निषादराज अजून हे मर्म जाणत नाही व राम मनुष्य आहेत असेच समजत आहे; पण प्रेम लक्ष्मणासारखेच आहे. रामरहस्य त्याला आता लवकरच लक्ष्मण मुखाने कळले म्हणजे दोघांची पूर्ण समता होईल. जनक राजांस सुद्धा भाग्यभाजनच म्हटले आहे. 'भाग्यभाजन जनक, जन जय बोलती' (१।३२४ छं. २).

**पुरवणी :** (२) शंकरांच्या कृपेशिवाय, त्यांच्या भजनाशिवाय रामचरणी सहज स्नेह, सहज रामभक्ति प्राप्त होत नाही. १।१३८।७; व ७।४५। पहा. मग निषाद राजाला ही कशी प्राप्त झाली? याचे उत्तर शिवपुराणात महाशिवरात्रि माहात्म्यात मिळाले. हा गुह पूर्वजन्मी पशुपक्षिघातक कुटुम्बवत्सल दुष्ट भिल्ल होता. एकदा शिवरात्रीच्या दिवशी काहीच शिकार न मिळाल्यामुळे सहज उपास घडला. संध्याकाळी एका बेलाच्या झाडावर चढून पाणवठ्याच्या मार्गावर शिकारीच्या आशेने पाणी व धनुष्यबाण घेऊन बसला. प्रत्येक यामात धनुष्य ओढताना बेलाची पाने व पाणी खाली असलेल्या शिवलिंगावर पडले. त्यामुळे यामपूजा नकळत घडली. शंकर प्रसन्न होऊन त्याला दर्शन दिले व वर दिले की तू निषाद राजा होशील व तुला रामभक्तिची प्राप्ती होईल वगैरे. ही पूर्वजन्मकथा मानसमणि जुलाई १९६० अंकात प्रकाशित झाली आहे.

*हिं. । देव धरनि धन धामु तुम्हारा । मैं जनु नीचु सहित परिवारा ॥६॥*
*। कृपा करिअ पुर धारिअ पाऊ । थापिअ जनु सबु लोगु सिहाऊ ॥७॥*
*। कहेहु सत्य सबु सखा सुजाना । मोहि दीन्ह पितु आयसु आना ॥८॥*

म. *। देव ! आपलें धरणि धाम धन । परिवारासह मी हि नीच जन ॥६॥*
*। कृपा करुनि पद पुरास लावा । या महती जनिं धन्य म्हणावा ॥७॥*
*। सत्य वदसि बा सख्या सुजाणा । ताताज्ञा परि मजला आना ॥८॥*

**अर्थ :** देवा ! ही धरणी (राज्य) घर धन वगैरे सर्व आपले आहे व माझ्या परिवारासह मीही आपला एक नीच दास (जन) आहे.॥६॥ कृपा करून पुराला आपण आपले पाय लावावेत व मला मोठेपणा द्यावा की जेणे करून लोकांनी मला धन्य म्हणावा.॥७॥ सुजाण सख्या तू म्हणालास ते सर्व खरे आहे; पण मला वडिलांची आज्ञा अगदी निराळी आहे.॥८॥

**टीका. : चौ. ६** (१) या चौपाईत गुह आत्मसमर्पण करीत आहे. प्रथम चरणांत जड आत्मनिवेदन आहे व दुसऱ्या चरणांत चंचल आत्मनिवेदन आहे. आपले तितके सर्व देवाचे हे जड आत्मनिवेदन व मी देवाचा; स्वतःस समर्पण करणे, हे चंचल आत्मनिवेदन. (दा.बो.) 'नाथ तवाहं' (षट्पदी स्तोत्र). भाव हा की हे माझे राज्य आपले आहे, आपणच ते चालवावे. मी परिवारासह आपला दास असल्याने आपली अगदी नीच (हलकी) सेवा असेल ती करीन. (वा.रा. २।५०।३८-३९ पहा.)

**चौ. ७ - (१) कृपा करुनि पद पुरास लावा** - 'आगच्छ रामो नगरं पावनं कुरु मे गृहय' (अ.रा. २।५।६६) असे गुहाने म्हटले आहे; पण यांत आप्पलपोटेपणाच दिसतो. मानसांतील गुह सांगतो की आमच्या पुरात पदार्पण करून सर्व पुरच पावन करा. कृपा करून म्हणण्याचे कारण इतकेच की अयोध्येसारखे ऐश्वर्य आमच्या गावात कोठले? पण जे आहे ते सर्व आपलेच आहे. **'सुर साधु इच्छिति भाव, सिंधुस तोष देत जलांतली'** (१।३३६ छंद) संध्याकाळ होत आली तरी आपल्या सारख्या महाराजांनी येथे नदीकाठी, उघड्यावर राहणे बरे नाही. त्याने मला दुःख होईल व लोकांत कमीपणा येईल. माझ्याजवळ असलेल्या आपल्या राज्यगृहधनादिकांचा उपयोग केव्हा होणार? **(क) या महति जनिं धन्य म्हणावा** - वर दाखविल्याप्रमाणे विनवूनसुद्धा प्रभु हो म्हणत नाहीत असे पाहून म्हणतो की आपल्या सुखासाठी नाहीतर नाही पण माझ्यासाठी, आपल्या नीच दासाला मोठेपणा देण्यासाठी तरी माझ्या नीचाच्या घरी रात्र काढावी. **'महती दासां सदा देतसां'** (३।१३।१३) हा आपला स्वभाव

मला माहीत आहे. आपण आलात तर सहज मला मोठेपणा मिळेल लोकांमध्ये व म्हणतील की, 'नीच गुहाचें धन्य भाग्य की चक्रवर्तिसुत गृहिं गेले'

**वि.ल.ठे.** (१) गुहाच्या येथपर्यंतच्या आचरणात शरणागतीची सर्व (६) लक्षणे दिसतात. **(क) अनुकूलस्य संकल्पः** - कंदमूलफलादि घेऊन जाणे हेच या वेळी अगदी अनुकूल वर्तन घडले. शिवाय 'प्रेमचि केवळ रामा प्यारें' ते गुहाजवळ सहज दिसले. **(ख) प्रतिकूलस्य वर्जनम्** - प्रभूंना प्रतिकूल वाटणारे न करणे **'मजसि कपट छल छिद्र न भावे'** गुहाच्या ठिकाणी छलकपटादि मुळीच दिसले नाही. **(ग) रक्षिष्यतीति विश्वासः** - आपल्या पायांच्या कृपेने माझे कुशल आहे असे म्हणाला; याने रक्षण करतील हा दृढ विश्वास प्रगट झालाच. **(घ) गोप्तृत्ववरणं तथा** राम त्याला सखा म्हणाले यांत रक्षणाची जबाबदारी स्वीकारली गेलीच. **(ङ) आत्मनिक्षेप** - आत्मसमर्पण स्पष्टच आहे. **(च) कार्पण्यम्** - मी नीच दास आहे हे म्हणणे कार्पण्याचे, दीनतेचे द्योतकच आहे. अशी षड्विधा शरणागति गुहाच्या ठिकाणी सहज दिसली. ठळक अक्षरांतील पदे क्रमाने वाचली म्हणजे तो एक श्लोकच आहे.

**चौ. ८ - (१) सत्य वदसि बा सख्या सुजाणा** - तू बोललास ते केवळ लोकाचार म्हणून नसून अंतःकरणपूर्वक बोललास. मित्राला साजेसेच बोललास. मित्राच्या घरी न बोलावतासुद्धा जाण्यास हरकत नाही. **'मित्र पिता, प्रभु, गुरु सदनां ही । जावें जरि आमंत्रण नाहीं'** (१।६२।५) मग एवढ्या प्रेमाने, कळकळीने, आदराने विनंती केल्यावर मी तसे करणे कर्तव्यच होते व प्रेमाने ते केलेही असते; पण काय करणार ! माझा नाईलाज आहे. वडिलांची आज्ञा तसे करू देत नाही. (क) रामसखा बनण्याचा पहिला मान मानसांत निषादराज गुहाला मिळाला; नंतर सुग्रीवाला व नंतर बिभीषणाला. पण या तिघांत पूर्ण निष्काम, अमानी, निरहंकारी व स्वतःस रामसेवक समजून त्याप्रमाणे अंतःकरणपूर्वक प्रेमाने सेवा करणारा भक्तराज गुह निषादराजच ! **'रामसखा निषादराज'** व **'कपि राजा सुग्रीव'** ही प्र. प्र. १४।६-७ पहावीत.

*हिं.दो.* *। बरष चारि दस बासु बन मुनि ब्रत बेष अहारु ।*
*॥ ग्राम बासु नहिं उचित सुनि गुहहि भयउ दुःखु भारु ॥८८॥*

*म.दो. । वर्ष चार दशा वास बनिं मुनिचें व्रत आहार ॥*
*॥ ग्राम वास अनुचित, गुहा ऐकुनि दुःख अपार ॥८८॥*

**अर्थ :** चौदा वर्षे वनांत वास आणि मुनींच्या व्रतांचे व आहारादिकांचे पालन करावयाचे आहे; त्यामुळे गावात (सुद्धा) वस्ती करणे उचित नाही. हे ऐकून गुहाला अपार दुःख झाले.।।दो.८८।।

**टीका. - (१) चार दश - वा.रा. -** १४ वर्षांचा उल्लेख वृत्ताच्या सोईप्रमाणे निरनिराळ्या प्रकारे केला आहे. चतुर्दश, नवपंच, दशवर्षाणि त्रीणि चैकम् (१०, ३, १) इत्यादी. मानसांत चार दश हा उल्लेखच बहुतेक ठिकाणी आहे व एकदाच दशचार (४।१२।५) आहे. चार दश म्हणण्यातील हेतु दो. ५३ च्या टीकेत पहावा. **(क) गुहाने पुर म्हटले असता राम ग्राम का म्हणतात?** सुग्रीवाला सांगताना 'पुर' म्हटले आहे. (४।१२।५) बिभीषणाला सांगताना 'नगर' म्हटले आहे (६।१०६।४) लोकसंख्याभेदाने हे भिन्न शब्द वापरले असे म्हणावे तर अयोध्या व मिथिला यांना पुर, पुरी, नगर, नगरी हे शब्द अनेक वेळा वापरले आहेत. पुर १।११४।९; २०४।५; २१२।५; २१३।४. इत्यादी. पुरी = १।१६।१; १।३५।३; जनकपुरी कोष पाहतां 'पूः स्त्री पुरी नगर्यो वा पत्तनं पुर भेदनम् । स्थानीयं निगमः' (अमरे, सप्त नगरस्य अ.व्या.सु.) हे सात शब्द नगर अर्थाचेच आहेत. ग्राम = 'समौ संवसथग्रामौ (अमरे) ग्रामः संवसथे वृन्दे (विश्व). शृंगवेरपुराला खेडेगांव ठरविण्याची भगवंताची इच्छा आहे असा भाव येथे काढणे योग्य नाही. ग्राम = खेडेगांव असा अर्थ घेणे उचित नाही. ग्राम = पुष्कळ लोकांची वस्ती जेथे असेल ते स्थान = संवसथ याचा तोच अर्थ आहे. ग्राम = वृन्द समूह - प्रापंचिक लोकांचा समूह जेथे रहात असेल ते स्थान. हा अर्थ व्यापक व निरपवाद ठरतो. **भाव हा आहे की तुझ्या पुरांतच काय एखाद्या लहानशा गावातसुद्धा राहता येत नाही.** संन्यास धर्म विवेचनात म्हटले आहे : **'एको भिक्षुर्यथोक्तःस्यात् द्वावेव मिथुनं स्मृतम् ॥ त्रयो ग्रामः समाख्यात ऊर्ध्वं तु नगरायते'** (नार.प. ३।५६) तीन संन्यासी, त्यागी एकत्र राहिले की तो ग्राम झाला. ग्राम होऊ नये म्हणून रघुवीराने गुहाला दोन दिवसांपेक्षा जास्त आपल्याबरोबर राहू दिला नाही. बहुजननिवास = ग्राम; संस्कृतांत तीन किंवा अधिक = बहु = ग्राम, समूह.

*हिं. । राम लखन सिय रूप निहारी । कहहिं सप्रेम ग्राम नर नारी ॥१॥*
*। ते पितु मातु कहहु सखि कैसे । जिन्ह पठए बन बालक ऐसे ॥२॥*
*। एक कहहिं भल भूपति कीन्हा । लोयन लाहु हमहि बिधि दीन्हा ॥३॥*
*म. । रामसिता-लक्ष्मण छबि बघती । प्रेमें ग्राम नारिनर वदती - ॥१॥*
*। माय बाप ते वद सखि कैसे । जे धाडिति वनिं बालक ऐसे ॥२॥*
*। कोणि म्हणति कृत भलें नृप भला । लोचन लाभ किं विधिनें विधला ॥३॥*

**अर्थ** : रामलक्ष्मण व सीता यांचे रूप पाहून शृंगवेरपुरीतील नरनारी प्रेमाने आपसांत म्हणतात की - ॥१॥ ज्यांनी अशा बालकांना वनात पाठविले ते आईबाप, सखे ! आहेत तरी कसे ! ॥२॥ कोणी म्हणतात राजा भला आहे आणि त्याने चांगलेच केले; विधीनेच आपल्याला लोचनलाभ दिला.॥३॥

**टीका**. - शृंगवेरपुरातील लोकांस ही बातमी मिळताच स्त्रिया व पुरुषमंडळी गंगा तीरावर दर्शनासाठी टोळ्या टोळ्यांनी येऊन परत जाऊ लागली हे सर्व अध्याहृत ठेवले आहे. हे वर्णन पुढे वनांतून जाताना व चित्रकूटास पोचल्यावर असे, अनेक ठिकाणी क्रमशः सविस्तर करावयाचे आहे. सर्वत्र दिसून येणारी सामान्य भावना तेवढीच येथे पुढील चौपायांत दिग्दर्शित केली आहे.

**चौ. १** - (१) राम लक्ष्मण व सीता यांना ज्यांनी ज्यांनी पाहिले त्या सर्वांना त्यांच्या विषयी वात्सल्य प्रेम उत्पन्न झालेले (शूर्पणखा अपवाद) खरदूषणांपर्यंत दिसेल. **या चौपाईमधील पूर्वार्ध १११।८ व ११४।३ मध्ये अक्षरशः पुन्हा आहे.**

**चौ. २ - (१) ही चौपाई अगदी जशीच्या तशीच (१११।७) पुढे आहे.** जेथे जातील तेथील वनवासी लोकांना (हो !) प्रथम असेच वाटते की अशा बालकांना अरण्यात पाठविणारांना आईबाप म्हणावे तरी कसे? त्यांची हृदये कशाची घडली असतील कोणास ठाऊक ! इत्यादी प्रकारे कोणी आईबापांना दोष देतात तर कोणी म्हणतात राजाराणींनी चांगले केले नाही ! एकूण, पाहणारी सर्व मंडळी (वनांतील, गावंढळ लोक ! प्रयागचे नाहीत हो !) प्रथम राजाराणी यांना दोषी ठरवितात; व हे मनुष्य स्वभावानुसारच घडते; पण ज्यांना वाईटातून चांगले काय निपजले हा विचार करण्याची संवय आहे ते लोक राजाराणींना दोष देत नाहीत. जे चांगले निपजले त्यांच्याकडे लक्ष देऊन ते उलट राजाचे आभारच मानतात हे पुढे दिसेल.

**उपदेश** : माणसाने दुसऱ्यांचे दोष पहात न बसता घडलेल्या अपरिहार्य वाईट गोष्टींतून चांगले काय निष्पन्न झाले तेवढेच पाहण्याचा प्रयत्न करणे शहाणपणाचे व स्वहिताचे लक्षण आहे. कोळीभिल्लांसारख्या अशिक्षित, गुन्हेगार, रानटी जातीत सुद्धा असे लोक असतात. आजही सापडतील; पण अशांची संख्या हल्लींच्या अशिक्षितांत कमीच व सुशिक्षितांत तर फारच कमी !

**चौ.३ - (१) नृप भला, कृत भलें** - 'राजाने यांना वनात पाठविले म्हणून *आपल्याला* यांचे अलौकिक रूप पाहण्याचा अलभ्य लाभ झाला. नाहीतर आपल्याला यांचे दर्शन झालेच नसते. पुरुष कदाचित गेले असते तरी सीतेचे दर्शन त्यांना तेथेही नसतेच झाले. म्हणून सार हे की ब्रह्मदेवाने आपल्यावर मोठी कृपा केली की त्याने राजाला अशी बुद्धी दिली.' हे विचारही वनांतून जाताना जागोजागी दिसून येतात. **(क)** येथे राजाला मूळ कारण न ठरविता विधीलाच मूळ कारण मानले आहे व त्यामुळे या लोकांनी राजाला निर्दोषी ठरविला आहे. **(ख) लोचनलाभ दिधला** - रामलक्ष्मण व सीता यांचे दर्शन होणे हाच खरा नेत्रांचा लाभ. नेत्रांची सफलता यांतच आहे. 'जोगीजन अगम दरस पावो पौंवरनि' (गीता. २।३०) गीतावली अयो.कां. पद ३०।२२ व ३४।४ अवश्य वाचनीय आहेत. मधुर मधुर भावपूर्ण आहेत. 'दिसले भरलोचन हरि भवमोचन हाच लाभ शंकर रुचला' (१।२११ छंद ३) गौतमनारी म्हणाली.

**हिं.** *। तब निषादपति उर अनुमाना । तरु सिंसुपा मनोहर जाना ॥४॥*
*। लै रघुनाथहि ठाउँ देखावा । कहेउ राम सब भाँति सुहावा ॥५॥*
*। पुरजन करि जोहारु घर आए । रघुबर संध्या करन सिधाए ॥६॥*

**म.** *। तैं निषादपति मनिं अनुमानें । तरु शिंशपा मनोहर जाणे ॥४॥*
*। ने रघुनाथा दाखवि ठावा । म्हणती राम छान अति वा ! वा ! ॥५॥*
*। पुरजन जोहारुनि घरिं आले । रघुवर संध्येलागिं निघाले ॥६॥*

**अर्थ** : तेव्हा (रघुनाथ पुरात येत नाहीत असे ठरल्यावर) निषादपतीने मनात अनुमान केले व शिंशपा वृक्ष (शिसवीचे झाड) मनोहर आहे असे वाटले-जाणले ।।४।। रघुनाथांस (तेथे) नेऊन (ते) ठिकाण (ठाव) दाखविले; तेव्हा राम म्हणाले वा ! वा ! छान आहे.।।५।। पुरजन जोहार करून परत घरी आले

व रघुवर (सायं) संध्या करण्यासाठी (गंगेवर) निघून गेले.॥६॥

**टीका.** - **चौ.** ४ - (१) तैं = तेव्हां = रघुनाथ पुरात येत नाहीत व गंगा किनाऱ्यालाच रात्री राहणार असे ठरले तेव्हा. (क) **तरु शिंशपा - शिसवीचे झाड** हे चांगले मोठे वृक्ष असतात. चैत्रवैशाखांत यांना पुष्कळ फुले येतात व ती फार सुवासिक असतात. गंगेच्या काठी हे आहेत की नाहीत हे या लेखकास स्वानुभवाने सांगता येत नाही; पण यमुनेच्या काठी पुष्कळ आहेत. शृंगवेरपुराजवळ त्या वृक्षांचे दोन वंशज हल्ली आहेत असे म्हणतात. कोकणांतील (दक्षिण आणि उत्तर) जंगलांत शिसवीची झाडे पुष्कळ आहेत. शिसवाचे लाकूड काळे असून फार जड असते. देवांचे देव्हारे, पाट, जड लाटणी-मुसळे वगैरे याची करतात. इमारतीच्या कामात यांचा फारसा उपयोग होत नाही. (ख) **तरु शिंशपा मनोहर जाणे** - उत्तम छाया, मनोहर सुगंध व पवित्र वृक्ष म्हणून मनोहर म्हटले.

**चौ. ५ - (१) ने रघुनाथा दाखवि ठावां** - स्वतःस जरी ती जागा व तो वृक्ष योग्य वाटला तरी तो निषादपतीच व राम रघुपति. त्यांना झोपावयाचे असल्याने सेवक या नात्याने स्वामीस जागा दाखविणे कर्तव्यच होते. शिंशपावृक्षच निषादपतीने अनुमानाने पसंत केला. कारण **'शुचि सुविचित्र सुभोगमय सुमन सुगंधि सुवास ॥ मंजु मंच मणिदीप जिथं वाण न कांहिं सुखास'** (१०) असे रघुनाथाचे शयनागार असल्याचे निषादपतीला माहीत आहे. यांतील गंगेच्या तीरावर व स्वच्छ जागी म्हणून **शुचि;** विविध वर्णांची इतर वृक्षांची पाने-फुले-फळे मिळून **सुविचित्र, सुगंधी सुमने** व त्यांचा मधुर **सुवास** या गोष्टी सहज प्राप्त होतील हे ठरविले. शुक्ल पक्षांतील षष्ठीची रात्र असल्याने १२ घटकापर्यंत **चंद्ररूपी** एक मोठा **मणिदीप** आणि ग्रहतारकारुपी **असंख्य मणिदीप** आकाशात लावले जाणार हे जाणले. रघुनाथांस नित्य मिळणाऱ्या सुखसाधनांपैकी जास्तीत जास्त जिथे मिळतील असे ठिकाण ठरविले. मंजुमंच व सुभोगमय शय्या अप्राप्त आहेत त्याला त्याचा इलाज नाही; तथापि जी शेज रचणार आहे ती शक्य तितकी सुंदर व मृदु करण्याचा यशस्वी प्रयत्न निषादपती करणार आहे. अनुकूलस्य संकल्पः व प्रतिकूलस्य वर्जनम् मनाने व कृतीने केले.

(२) **म्हणती राम छान अति वा ! वा !** पहिल्या चरणात रघुनाथ शब्द असून

या चरणांत **राम शब्द असल्याने साहित्यिक म्हणतील की हा पुनरुक्ति दोष आहे.** परंतु असे कोण म्हणतील हे या दोन शब्दांवरूनच कळेल. ज्यांनी रघुनाथाला निषादपतीप्रमाणें षड्विधा शरणागतीने आपला नाथ केला नाही त्यांच्या बोलण्यात काय राम असणार ! राम सहज आनंदनिधान 'आनंदसिंधु सुखराशी' असून निषादपतीची योजकता पाहून त्यांस आनंद झाला व त्याची प्रशंसा करून त्याच्या चित्तास रमविले. सेवकाने स्वामीला - नाथाला - सुखविण्यासाठी एखादी योजना आखली व ती स्वामींना पसंत पडून स्वामी आनंदित झालेले सेवकाने पाहिले म्हणजे त्या सेवकास किती आनंद होतो हे रघुनाथविमुख साहित्यसेवकांस कसे कळणार?

**चौ. ६ - (१) रघुवर संध्येलागिं निघाले** - राम असे परमात्मा आहेत तरी 'रघुवर' रघुकुल श्रेष्ठ असल्याचे ते कधी विसरत नाहीत. रघुवंशी राजे धर्मनिष्ठ असतात. ते उपनीत क्षत्रिय असल्याने यथाकाल यथाविधि संध्योपासना करणे हा त्यांचा धर्म आहे. 'अहरहः संध्यामुपासीत' अशी आज्ञा आहे व 'सायंसंध्या बहिर्जले' असा नियम आहे म्हणून संध्या करण्यास गंगेवर गेले. १।२२६।१ व १।२३७।६ यांत रघुवर सायंसंध्येकरता नगराबाहेर गेल्याचे उल्लेख आहेत. वरील चौपायांच्या टीकेत विस्तार पहावा.

**शंका - पुरजन जोहारुनि घरिं आले.** यांत पुरजन घरी गेले असे म्हणणे अधिक योग्य ठरले असते. म्हणजे कवि गंगातटी शिंशपा वृक्षाजवळ आहेत असे ठरले असते. पुरजन आले असे म्हणण्यास वक्ता त्यांच्या पूर्वीच पुरामध्ये असणे जरूर आहे. अशा प्रेमळ भक्ताचे पुर पहावे म्हणून कवि त्या पुरात गेले होते. (दो. ८८ नंतर) पुरांत कोणी नाही असे दिसले तेव्हा कवि परत निघाले तोच पुरजन पूर्वी वर्णिल्यासारखी चर्चा करीत येत असलेले दिसले. म्हणून म्हटले की घरी आले.

*हिं. । गुहँ सँवारि साँथरी डसाई । कुस किसलमय मृदुल सुहाई ॥७॥*
*। सुचि फलमूल मधुर मृदु जानी । दोना भरि भरि राखेसि पानी ॥८॥*

*म. । करि तयार गुह शयना, सुंदर - । कुशकिसलयमय मृदुल मनोहर ॥७॥*
*। शुचि फलमूल मधुर मृदु जाणुनि - । द्रोणीं भरुनि ठेवि जल आणुनि ॥८॥*

**अर्थ** : (रघुवर संध्येला गेलेले असता) गुहाने कुश व झाडांची नवीन, सुंदर, कोवळी पालवी पसरून मऊ मऊ मनोहर अंथरूण तयार करून ठेवले.॥७॥

पवित्र फळे व मुळे मधुर व मृदु आहेत असे पाहून (जाणून) - ओळखून अनेक द्रोणांत भरून ठेवली व द्रोणांत गंगाजल भरून ठेवले.॥८॥

**टीका. चौ. ७ - (१) कुश** - दशविध दर्भातील एक उत्तम जात आहे. हे सर्व दर्भात विशेष पवित्र व आरोग्यवर्धक आहेत. पंचगव्यात कुशोदक साहवे घालावे लागते. आसनाला जसे आधी जमिनीवर कुशासन (त्यावर मृगचर्म व त्यावर कंबलासन किंवा धूतवस्त्राची घडी, चैलाजिन कुशोत्तरम्) घालतात. त्याप्रमाणेच गुहाने प्रथम जमीन साफ झाडून, सारवून आधी तेथे कुश पसरले. खूप जाड थर दिला. त्यावर मधे मधे निरनिराळ्या रंगांचे गवत, पेंढा पिवळा, गव्हाच्या पात्या पांढऱ्या, रोसा नावाचे सुगंधी तांबूस रंगाचे गवत, वाळा इत्यादिकांच्या मध्ये झाडांची विविध वर्णांची कोवळी पालवी बसविली व अशा रीतीने चांगले हातभर उंच व दोन माणसांस सुखाने, मोकळेपणाने झोपता येईल असे लांबरुंद, मऊ मऊ, गालीच्यासारखे सुंदर, मनोहर दिसणारे अंथरूण, तृणपर्ण शयन (तृणापर्णशय्या) तयार केले. ते बाजूंनी खाली ढासळू नये म्हणून चारी बाजूंनी गंगामृतिकेचा ओटा ही केला असेलच. मऊमऊ कृष्णांजिनात पेंढा व गव्हाच्या पात्यांचा भुसा भरून उशा तयार करून ठेवल्या असतील, असे अंथरूण तयार करून पहावे म्हणजे परांच्या गाद्यांवर लोळणारा असला तरी उन्हाळ्यात, पाहिल्या बरोबर त्यालाही वाटेल की घटकाभर यावर झोपावे. कुश, वाळा, भाताचा पेंढा, गोधूमपत्र, (गव्हाचा पाला) यांची गणना दशविध दर्भातच आहे. रोसा गवतसुद्धा पवित्र आहे. हे सर्व जिन्नस व वृक्षांची पालवी वगैरे गंगेच्या पवित्र झुळकांनी व तिच्या पवित्र ओलाव्यावर वाढल्याने परम पवित्र असल्याने यांत मुनिव्रताचा भंग करणारे काही नाही. 'क्षीरफेन मृदु' बनविता आली नाही तरी उत्तम गालिच्यापेक्षा मऊ व निसर्गजनित सौंदर्याने नटविलेली अशी पथारी (साँथरी) तृणपर्णशय्या तयार करण्यात **गुहाने आपली बुद्धि, कला, प्रेम व प्रयत्न यांची पराकाष्ठा करून सीतारामचंद्रांना परिस्थितीनुसार यावत् शक्य जास्तीत जास्त सुख होईल असे केले. सुग्रीव बिभीषणांनी असे केलेले दिसत नाही.** तिघांनाही रघुनाथ 'सखा'च मानतात. रामसेवेत असता गुह आपणांस राजा न मानता नीच दास मानतो. सुग्रीवबिभीषण आपणांस रामसेवक म्हणत असले तरी ते आपला राजेपणा विसरलेले नाहीत. मानसन्मानाची इच्छा

सुग्रीवाला बिभीषणापेक्षा जास्त आहे. इ. भेद यथास्थान दाखविले आहेत.

**चौ. ८ - (१) शुचि फलमूल - शुचि** = शास्त्राने निषिद्ध न मानलेली, कांदा, गाजर, मुळा, ताडगोळे, कलिंगड, पोपया इ. कंदमूलफळे निषिद्ध - अपवित्र आहेत. गळून पडलेली, कीड न लागलेली, पक्ष्यांनी न टोचलेली अशी व शास्त्रानुकूल होती म्हणून शुचि, पवित्र. **(क) मधुर मृदु जाणुनि** - मधुर आहेत की नाहीत हे त्या त्या फळांच्या सुगंधावरून व रंगरूपावरून माहीतगारांना कळते. मृदु एवढ्याचसाठी की सुरीने कापून खावयाची नसल्याने दातांनी फोडून स्वामींना त्रास होऊ नये. वैशाखांत शुक्ल पक्षांत तिकडे आंबे व जांभळे पिकलेली असण्याची शक्यता फार कमी. पेरू, करवंदे, रामफळे, काकड्या, टरबुजे, लीची व इतर वनफळे असू शकतील. रताळी व काही जंगली कंद असू शकतील. भाजून खाण्यासारखे कंद आज उपयोगी नाहीत. **(ख) द्रोण भरून भरून फळे ठेवली** - चैत्र वैशाखात पळसाची पाने विपुल असतात. मोठी पाने मिळाली तर पाऊण शेर पाणी सहज राहील एवढाले द्रोण सहज होतात. दोन पानांचा द्रोण चार किंवा दोन टाक्यांचा केला तर थेंबभरसुद्धा पाणी गळत नाही. निषाद अस्पृश्य जातीचा असल्याने त्याच्या हातचे पाणी राम कसे पितील असे वाटून 'पाणी'च्या जागी 'आनी' = आणून असा पाठभेद निर्माण केलेला आढळतो. त्याने पाणी भरून जवळ ठेवले इतक्याच वरून राम ते प्यायले असे म्हणता येत नाही. कारण स्नान केल्यानंतर राम पाणी प्यायले आहेत व संध्या करून परत येताना गंगाजल पिऊन आलेच असतील व आपापले कमंडलू तिघांनी भरून आणले असतीलच. कदाचित ते पाणी तसेच राहिलेही असेल. उत्तर हिंदुस्थानात न्हावी, कुंभार, गवळी यांच्या हातचे विहिरीचे पाणीसुद्धा चांगले ब्राह्मणही पितात हे प्रत्यक्ष पाहिलेले आहे या डोळ्यांनी ! मग गंगाजळाविषयी काय म्हणावे? निषाद = कोळी नावेचा धंदा करणारे, ही जात निदान ४०।५० वर्षांपूर्वीपासून तरी अस्पृश्य मानली जात नाही.

***हिं.दो.*** *। सिय सुमंत्र भ्राता सहित कंदमूल फल खाइ ॥*

*॥ सयन कीन्ह रघुबंसमनि पाय पलोटत भाइ ॥८९॥*

म.दो. *। सिता सचिव-बंधूसहित खाति मूल फल कंद ॥*
*॥ रघुकुलमणि निजती चरण दाबि बंधु सुखकंद ॥८९॥*

**अर्थ** : सीता, सचिव (सुमंत्र) व बंधु (लक्ष्मण) यांच्यासहीत रघुकुलमणि रामचंद्रांनी कंदमूळफळे खाल्ली व रघुकुलमणि (त्या आंथरूणावर) झोपले व बंधु लक्ष्मण रामचंद्रांचे सुखमूल (सुखकंद) चरण (पाय) चेपीत बसला.।।दो.८९।।

**टीका. - वि.ल.ठे.** - या दोह्यांत चार-पाच गोष्टी विशेष लक्षात ठेवण्यासारख्या आहेत. १. कंदमूलफळे चौघांनी खाल्ली. २. सीता झोपल्याचा उल्लेख नाही. ३. सुमंत्र झोपल्याचा उल्लेख नाही. ४. हात धुतल्याचा, तोंड धुतल्याचा उल्लेख नाही आणि ५. पाणी पिण्याचा उल्लेख नाही. यांचा विचार क्रमशः करू.

(१) **कंदमूळफळें खाल्लीं** - गुहाने 'शुचिफलमूल' आणून ठेवली. तेथे कंद आणून ठेवल्याचा उल्लेख नाही. ज्या अर्थी खाण्यात कंद आहेत त्या अर्थी गुहाने आणून ठेवले होते हे सिद्ध झाले. वृत्ताच्या सोईसाठी तेथे कंदाचा उल्लेख करता आला नाही तो येथे केला. हे जसे येथे घडले तसेच पण याच्या उलट अनेक ठिकाणी घडले आहे. (क) **कंदमूलफल अंकुर सुंदर । दे आणुनि मुनि जणूं अमृत वर ॥ सीता, लक्ष्मण, जन, सह शुभ अति । अति रुचिं राम मूल फल भक्षति'** (१०७।२-३) हे भरद्वाजाश्रमात घडले. खाण्यात दोन वस्तूंचा उल्लेख करता आला नाही. खाणारांचा उल्लेख महत्त्वाचा व दोह्याचे काम चौपाईत केले त्यामुळे असे करावे लागले. शृंगवेरपुरात जसे रघुनाथाने कंद निर्माण केले असे गणता येत नाही तसेच येथे भरद्वाजश्रमात दोन प्रकारचे पदार्थ खाल्ले नाहीत असे म्हणवत नाही. तसे म्हणणे विसंगत, अव्यवहार्य व शिष्टाचार विरुद्ध व रघुनाथाच्या शीलाला कलंकित करणारे ठरेल. असाच प्रकार वाल्मीकि आश्रमात आहे. वनात राहणाऱ्या निषादांना कंद व मूल हा भेद माहीत नव्हता म्हणणे म्हणजे जलचरांना पाण्यात पोहता येत नाही असे म्हणण्यासारखेच आहे व मानसांतील उल्लेखांकडे डोळेझांक करणे आहे. कारण **'कोळि किरात भिल्ल वनवासी । मधुशुचि सुंदर स्वादु सुधासी ॥ भरुनी पर्णपुटीं बहुसुंदर । कंद, मूल, फल, जुड्या अंकुर ॥ देतिं विनति नति सकलां करुनी । स्वाद नाम गुण भेद सांगुनी'** (२५०।१-३) यावरून ठरले की अयोध्यावासी लोकांना या बाबतीत

जे ज्ञान नाही ते या वनवासी भिल्ल कोळ्यांना उत्तम आहे. (ख) मुळात सीता, सुमंत्र व भ्राता असा क्रम आहे. पण त्यावरून म्हणता येत नाही की या क्रमाने खाण्यास आरंभ केला व रघुवंशमणींनी शेवटी प्रारंभ केला. असे म्हटल्यास सेवक धर्माचा लक्ष्मणाने व सतीधर्माचा सीतेने भंग केला असे ठरेल. असा अनर्थ केला जाऊ नये म्हणून 'सहित' शब्द कवींनी मुद्दाम घातला आहे; अन्यथा त्याची जरूर नव्हती. सर्वांनीच एकाच वेळी, बरोबरच, - खाण्यास प्रारंभ केला. मराठीतील क्रमाविषयी असेच समजावे.

(२) **सीता झोपल्याचा उल्लेख नाही** - दोह्यांत नसला तरी पुढे आहे. (९१।३ व ७ चौ. पहावी.) रघुवंशमणि पथारीवर आडवे झाल्यावर सीता शेजारी झोपली असे त्या चौपायांवरून ठरते.

(३) **सुमंत्र झोपल्याचा उल्लेख नाही** - पुढे लक्ष्मणाने सचिवांस निजण्याविषयी विनंति केली आहे. (९०।१) पण तेथेही सुमंत्र निजल्याचा उल्लेख नाही; म्हणून सुमंत्र निजले नाहीत असे मानणे भाग आहे व हेच मत पुढील कथेत स्पष्ट दिसणार आहे.

(४) **हात, तोंड धुतल्याचा उल्लेख नाही** - हा उल्लेख रामवनवास वर्णनात फलाहारानंतर कुठेच नाही. पण जेवण, खाणे झाल्यावर तोंड धुण्याची पद्धति सर्व हिंदूत अजूनसुद्धा आहे. तो शिष्टाचारच आहे म्हणून उल्लेख नाही. बालकाण्डात जेथे भोजनाचे विस्तृत वर्णन आहे तेथे दोन वेळा हा उल्लेख केलेला आहे. (१।३२९।८ व १।३५५।२ पहा) परंतु १।२१७ मध्ये भोजनाचा उल्लेख असून आंचवल्याचा उल्लेख नाही तसाच येथे नाही.

(५) **पाणी पिण्याचा उल्लेख नाही** - याविषयी चौ. ८ च्या टीकेत (ख) पहा. परंतु मानसांतील शिवविवाहातील व्याहीभोजन, रघुवीर विवाहातील व्याहीभोजन, अयोध्येतील वराती आल्यानंतरचे रात्रीचे भोजन इत्यादी ठिकाणीसुद्धा पाणी पिण्याचा उल्लेख कुठेच नाही. मात्र स्नान, जलपान व फलाहार केल्याचे उल्लेख काही ठिकाणी आहेत. भरद्वाज, वाल्मीकि, अत्रि, शबरी यांच्या कोणाच्याही आश्रमांत पाणी आणून ठेवल्याचाही उल्लेख नाही. यावरून असे म्हणता येईल की **'भोजनान्ते पिबं वारि' या नियमाचे पालन त्या वेळी सर्व लोक**

**करीत असत व गुहाने पाणी आणून ठेवले ते आंचवण्यासाठी ठेवले.**

(६) **बंधु सुखकंद चरण दाबि** - रामचंद्रांची चरणसेवा नित्य नियमाने, कितीही रात्र झाली झोपण्यास तरी, करणे हा लक्ष्मणाचा नियम होता. (१।३५६।६ टी.प.) 'चेपि चरण लक्ष्मण हृदिं लावुनि । प्रेमें, सभय, परमसुख पावुनि' (१।१२६।७-८ वचन) येथील दोह्याचा पूरक आहे. सुखकंद शब्द मुळात नाही पण वरील लक्ष्मणाच्या पादसेवनभक्तीचे वर्णन करणाऱ्या दोह्यांत 'परमसुख पावुनि' आहे, त्याचे सार 'सुखकंद' शब्दाने येथे दाखविले. सुखकंद = सुखाचे मूळ व सुख-कन्द = सुखरूपीजल देणारे. (क) असा रामचरणसेवेचा लाभ भरतशत्रुघ्नांस फारच क्वचित मिळाला आहे. महद्‌भाग्य असेल त्यांनाच मिळणार ! लक्ष्मणाला हा लाभ आता सतत १४ वर्षे मिळणार आहे. 'राम जाति वनिं तुमचें भाग्यहि' (७५।३) असे सुमित्रा म्हणाली ते यामुळेच.

**ल.ठे. - वा.रा.** गुह हा पूर्वीपासूनच 'आत्मसमः सखा' असूनसुद्धा रघुनाथाने त्याने आणलेल्या भेटीतील कोणताही पदार्थ खाल्ला नाही. मी प्रतिग्रह घेऊ शकत नाही असे कारण सांगितले आहे. (२।५०।४४-४५) **'जलमेवाददे भोज्यं लक्ष्मणेना ऽऽहृतं स्वयम्'** लक्ष्मणाने राम व सीता यांचे पाय धुतल्याचा उल्लेख आहे. पाय चेपल्याचा उल्लेख नाही. नंतर लक्ष्मण जागत बसला आहे व गुह लक्ष्मणाशी बोलत बसला आहे; पण त्यांच्या भाषणाचा विषय मानसातील विषयाहून अगदीच निराळा आहे. 'गुहलक्ष्मण जागरणम्' सर्ग ५१ पहा.

*हिं.* *। उठे लखनु प्रभु सोवत जानी । कहि सचिवहि सोवन मृदु बानी ॥१॥*
*। कछुक दूरि सजि बान सरासन । जागन लगे बैठि बीरासन ॥२॥*
*। गुहँ बोलाइ पाहरु प्रतीती । ठावँ ठावँ राखे अति प्रीती ॥३॥*
*। आपु लखन पहिं बैठेउ जाई । कटि भाथी सर चाप चढ़ाई ॥४॥*

*म.* *। अनुज उठे कळता 'प्रभु निजले' । 'निजा' वचनिं मृदु सचिवा वदले ॥१॥*
*। जरा दूर शर सज्ज शरासनिं । जागत राहि बसुनि वीरासनिं ॥२॥*
*। गुह रक्षक विश्वासू आणी । प्रेमें अति, बहु ठेवि ठिकाणीं ॥३॥*
*। स्वयें लक्ष्मणा समीप बसला । कटिं भाती शर चापिं चढविला ॥४॥*

**अर्थ :** प्रभूंना झोप लागली असे कळताच (जाणून) लक्ष्मण उठले व मृदु

वचनांनी सचिवास म्हणाले की आपण आता निजावे.॥१॥ (मग) जरा दूर सज्ज धनुष्यावर बाण लावून वीरासन घालून जागत राहिले (बसले) ॥२॥ गुहाने विश्वासू पहारेकरी (रक्षक) आणले व अति प्रेमाने पुष्कळ ठिकाणी (ठिकठिकाणी) त्यांना ठेवले.॥३॥ आपण स्वतः कमरेला भाती (लहान भाता) बांधून व धनुष्यावर बाण लावून लक्ष्मणाजवळ येऊन बसला.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) अनुज उठे कळतां प्रभु निजले** - या एका चरणाने अनेक भाव सुचविले आहेत. I सीतारामांना आज नेहमीपेक्षा लवकर झोप लागली. II जनकपुरीत व अयोध्येतसुद्धा इतकी लवकर झोप लागत नसे. **'कितिदां प्रभु म्हणती निज बाळा !'** (१।२२६।७) हे जनकपुरीतले उदाहरण आहे. त्या दिवशी तर रामलक्ष्मण फारच दमलेले होते व मध्यरात्रही उलटून गेली होती. 'कितिदां बंधूंना आज्ञापित । ते मग निज निज शेजे निद्रित' (१।३५६।६) हे अयोध्येतले आहे. III आज त्रैलोक्य पावनी गंगेच्या तीरावर परम प्रेमाने तयार केलेल्या अति कोमल व मनोहर तृणपर्णशय्येवर, शिसवाच्या झाडाखाली, नैसर्गिक सुमनसुगंधित शीतल मंद गंधवह वहात असता, अनंत मणिमुक्तविभूषित नीलांबर छताखाली शीतल आल्हाददायक इंदुमणिदीप टांगलेला असल्याने पडल्याबरोबर झोप लागली. त्यामुळे 'बाळा नीज आतां' असे पुनःपुन्हा सांगण्याची वेळ आली नाही. IV **राम सीता यांचे चित्त आज अगदी निश्चिंत व प्रसन्न आहे हे सिद्ध झाले.**

(२) **'निजा' वचनिं मृदु सचिवा वदले** - सचिव सुमंत्र अजून निजले नाहीत. कसे निजणार ! ती तृणपर्णशय्या व तो नदीकिनारा, ते उघड्या हवेत झाडाखाली झोपणे ! ती रतिकंदर्पदर्पविमर्दक परम कोमल शरीरे पाहून त्यांच्या चित्तांत चिंतेची चिता धगधगली असेल व केव्हा उजाडेल व केव्हा यांना अयोध्येत घेऊन जाईन असे झाले असेल ! **(क)** गुहाने लक्ष्मण व सुमंत्र यांच्यासाठी त्यांच्या योग्यतेप्रमाणे शय्या तयार करून ठेवल्याच असतील. वा.रा. २।५१ मध्ये लक्ष्मणासाठी तृणपर्णशय्या निराळी तयार करून ठेवल्याचे वर्णन आहे. **(ख) मृदुवचनीं** - अगदी खालच्या आवाजात हळू बोलून सांगितले. उपदेश - मिळतो की मोठी माणसे झोपलेली असता तेथे किंवा आपसात कोणाशी बोलण्याची वेळच आली तर अगदी हळू बोलावे. सुमंत्र जागत बसल्याचा उल्लेख येथे

नाही पण पुढे टीकेत प्रकट झाले आहे की सुमंत्रास झोप लागली नव्हती तर गुह-लक्ष्मण संवाद त्यांच्या कानी पडला असला पाहिजे.

**चौ. २ - (१) वीरासन** - डावे पाऊल जमिनीवर ठेऊन उकीडवे बसून उजव्या पायाची मांडी मोडून गुडघा पुढे जमिनीवर टेकून त्या पायाच्या खोटेवर टेकून बसणे. धनुर्धरांना हे वीरासन उपयोगी पडते. तलवार बहादूरांना याच्या उलट उपयुक्त होते. उत्तम गवईसुद्धा वीरासनावर बसून गातात. याने उत्साह जास्त राहतो व चटकन उठता येते. **(क) वा.रा.** गुहाने लक्ष्मणास झोपण्याविषयी विनंती केली आहे. त्यावर लक्ष्मणाने दिलेले उत्तर पाहण्यासारखे आहे. 'कथं दशरथौ भूमौ शयने सह सीतया ।। शक्या निद्रा मया – जीवितं वा सुखानि वा.' (२।५१।१) पुढील सर्वच श्लोक वाचनीय आहेत पण १६ पर्यंतचे तरी जरूर पहावे. रामचंद्र सीतेसह जमिनीवर झोपलेले असेतो मला निद्रा येईल तरी कशी व ते जीवित व विविध सुखे तरी काय कामाची ! राम वनात आल्या कारणाने अयोध्येत काय काय प्रसंग ओढवले असतील त्याची कल्पना लक्ष्मणाने गुहास पुढील श्लोकांत दिली आहे.

**चौ. ३-४ (१) गुह रक्षक विश्वासू आणी** - विश्वासू - डुलक्या न खाता सावध राहून पहारा देतील असे. येथे काही दाट अरण्य नव्हते की सभोवती पाहरेकरी ठेवणे आवश्यक वाटेल. पण प्रीतीची रीत ही ऐशी आहे. अति प्रीतीमुळे रामसेवा म्हणून ठेवले व त्यांनाही रामसेवेचा लाभ दिला. (क) भाती = भाथी = लहान भाता. जसे लोटा-लोटी, तबक-तबकडी इ. शब्द मराठीत आहेत तसे भाथा = मोठा भाता व भाथी = लहान भाता हे हिंदीत आहेत. पण मराठीत भाता याच्या जोडीचा भाथीसारखा शब्द नाही म्हणून भाती हा शब्द बनवावा लागला. भाता शब्दाने 'भाथी' चा अर्थ व्यक्त होऊ शकत नाही. **(ख)** गुहाच्या वीरांजवळ धनुष्येसुद्धा क्षत्रियांच्या सारखी मोठाली नाहीत. धनुकल्या आहेत हे पुढे दो. १९१ मध्ये दिसेल. लक्ष्मणमुखाने रामयशश्रवण करण्यास सापडेल या हेतूने गुह लक्ष्मणाजवळ बसला आहे.

●●●

## श्रीरामवन-गमनान्तर्गत लक्ष्मण-गीता प्रकरण (९१।५-९४।१)

पुढील ९०।५ चौपाईपासून ९४।१ पर्यंतचा भाग 'लक्ष्मणगीता' नावाने ओळखला जातो. या ३७ ओळींच्या प्रकरणांत चार योग किंवा विभाग आहेत. ९०।६-९२।२=१८ ओळींत **'निषादविषाद'** योग आहे. हे नाव उत्तर हिंदुस्थानात कोणी दिलेले नाही. हे नवीन आहे. ९२।३ ही एक ओळ - चौपाई **'श्री लक्ष्मण उवाच'** सारखी आहे. ९२।४ मध्ये **कर्मयोग** आहे. पुढे १० ओळींत **ज्ञानवैराग्ययोग** आहे व शेवटच्या सात ओळींत **भक्तियोग** आहे.

## निषाद-विषाद योग (९०।५ - ९२।२)

हिं. *। सोवत प्रभुहि निहारि निषादू । भयउ प्रेम बस हृदयँ बिषादू ॥५॥*
*। तनु पुलकित जलु लोचन बहई । बचन सप्रेम लखन सन कहई ॥६॥*
*। भूपति भवन सुभायँ सुहावा । सुरपति सदनु न पटतर पावा ॥७॥*
*। मनिमय रचित चारु चौबारे । जनु रतिपति निज हाथ सँवारे ॥८॥*

म. *। प्रभुला निद्रित बघुनि निषादहि । बने प्रेमवश हृदयिं विषादहि ॥५॥*
*। वपु पुलके जल लोचनिं वाहे । प्रेमें लक्ष्मणास म्हणताहे ॥६॥*
*। भूप-भवन तों सहज सुशोभन । समता पावे सुरेन्द्र सद्म न ॥७॥*
*। रचित रत्नमणि रुचिर बंगले । जणूं स्वकरिं रतिपतिनें सजले ॥८॥*

**अर्थ :** प्रभूला (तृणपर्ण शय्येवर) झोपलेले पाहून निषाद प्रेमवश झाला व (हि) हृदयांत विषाद वाटला.॥५॥ शरीर रोमांचित झाले व डोळ्यांतून अश्रू वाहू लागले व तो प्रेमाने लक्ष्मणास सांगू लागला - कीं ॥६॥ भूपतींचा महाल तर इतका सहज सुंदर आहे की देवेन्द्राचा प्रासाद सुद्धा त्याची बरोबरी करू शकणार नाही.॥७॥ रत्नमणि रचित बंगले इतके सुंदर आहेत की जणू रति पतीने (मदनाने) स्वतः आपल्या हातानी शृंगारले आहेत.॥८॥

**टीका. चौ. १-२ (१) ल.ठे.** निषाद राजाने केलेल्या पुढील सर्व वर्णनावरून असे निश्चितपणे म्हणता येते की गुहाने अयोध्येतील दशरथांचे महाल व रघुनाथाचे शयनागार वगैरे चांगले अवलोकन केले असले पाहिजे. राम व सीता यांना त्या

वृक्षाखाली तृणपर्णशय्येवर त्या स्थितीत झोपलेले पाहून त्याला अयोध्येतील त्यांच्या ऐश्वर्यसुखाची आठवण झाली. हे चित्र व ते चित्र त्याच्या दृष्टीपुढे नाचू लागले. हे दृश्यच असे आहे की कोणालाही पाषाणहृदयी माणसाससुद्धा पाहून दुःख झाले असते. (क) हा जातीने निषाद, क्रूर, जीवगणघाती, कठोर असून यालासुद्धा विषाद वाटला हे सूचित करण्यासाठी गुह वा त्याच्या नावाचा उल्लेख न करता स्वभावनिदर्शक, जातिवाचक 'निषाद' शब्द येथे वापरला. (ख) येथे उपक्रम निषादाच्या विषादाने केला असून ९२।२ मध्ये उपसंहार 'होइ भारि विषाद हि' असा केला आहे. म्हणून या प्रकरणास निषादविषादयोग (जसा गीतेचा प्रथमाध्याय अर्जुनविषाद योग) हे नाव यथार्थ असल्याचे मान्य होईल. (ग) रोमांच व अश्रू हे सात्त्विक भाव प्रगट झाले.

**चौ. ३-४ - (१) भूपभवन =** पृथ्वीपती चक्रवर्ती महाराजा असल्याने त्यांच्या प्रासादातील ऐश्वर्य व सुखसोयी पृथ्वीवर इतरत्र मिळणे अशक्य हे कोणीही सांगू शकेल. पण देवराजा जो इंद्र त्याच्या अमरावती नगरीतील वैजयन्त प्रासादातसुद्धा याची बरोबरी करणारे ऐश्वर्य व सुख नाही ! येथे राजमहालातील सौंदर्य, ऐश्वर्यादींचे सामान्य वर्णन केले. पुढे राम ज्या प्रासादात झोपत असत त्याचे वर्णन आहे. (क) या दोन चौपायांतील सार हे की दशरथांसारख्या सम्राटाच्या ऐश्वर्यात वाढलेले व मदनाच्या सदनासारख्या ऐश्वर्यमय व परमसुंदर प्रासादांत राहण्याची ज्यांना सवय ते आज वनात झाडाखाली पडले आहेत.

*हिं.दो. । सुचि सुबिचित्र सुभोगमय सुमन सुगंध सुबास ॥*
*॥ पलँग मंजु मनिदीप जहँ सब बिधि सकल सुपास ॥९०॥*

*म.दो. । शुचि सुविचित्र सुभोगमय सुमन सुगंधि सुवास ॥*
*॥ मंजु मंच मणिदीप जिथं वाण न काहिं सुखास ॥९०॥*

**अर्थ** - जे (रामधाम) पवित्र सुंदर चित्रविचित्र, उत्तमोत्तम भोग्य पदार्थांनी भरलेले असते; जेथे सुगंधी (सुवासिक) फुले व अत्तरादिकांचा सुवास असतो, सुंदर पलंग व मणिदीप असतात व जेथे कोणत्याही प्रकारच्या सुखाला वाण (कमतरता) नाही.।।दो.९०।। (हे वाक्य पुढल्या दुसऱ्या चौपाईत पूर्ण होईल.)

**टीका. - (१) शुचि = पवित्र घराचे पावित्र्य** त्यांत राहणाऱ्या व्यक्तींच्या

धर्माचरणावर, विचारांवर, उपासना व तपश्चर्या इत्यादिकांवर अवलंबून असते. स्वच्छता, नीटनेटकेपणा इत्यादींचा अन्तर्भाव सौंदर्यात होतो. जेथे धर्माचरण करणारी एकही व्यक्ती कधी पाऊल टाकीत नाही व सर्व माणसे अहिंसा, सत्य, अस्तेयादि मानव धर्माचे कायावाचामनाने पालन करतात त्या दशरथांच्या व रघुनाथांच्या सदनांचे पावित्र्य कोण वर्णन करणार? **(क) सुविचित्र** - सुंदर व चित्रविचित्र निरनिराळ्या रत्नांनी, मोत्यांनी व सोन्याने जेथे विविध सौंदर्य निर्माण केले आहे असे. **सुभोग** - अयोध्येतील विविध भोग 'पाहुनि नव नव सुख सुर ईर्षति । जन्म अयोध्यें विधिसी मागति' (१।३६०।२). 'ऋद्धि सिद्धि सुख संपत् शोभन ॥... जमुनि राहिले नृपघरिं तनुघर' (१।३४५।२-३) असे जेथे आहे तेथे उत्तमोत्तम विविध भोगांना तोटा काय? **(ख)** 'शुचि'ने मानसिक सुख, सुविचित्र - नेत्र सुख, सुमन सुगंधि = स्पर्श सुख, सुवास - घ्राणसौख्य व सुभोगांत बाकीच्या सर्व इंद्रियांच्या सुखाचा समावेश होतो. **(ग)** उत्तरार्धात शयनागाराचे सौख्य वर्णिले आहे. त्यांत पूर्वार्धातील 'सुमन सुगंधि सुवास' याचा अन्तर्भाव होतो. आता शयनगृहातील इतर वस्तूंचे वर्णन करतात.

*हिं.* ***। बिबिध बसन उपधान तुराईं । छीर फेन मृदु बिसद सुहाईं ॥१॥***
***। तहँ सिय रामु सयन निसि करहीं । निज छबि रति मनोज मदु हरहीं ॥२॥***
***। ते सिय रामु साथरीं सोए । श्रमित बसन बिनु जाहिं न जोए ॥३॥***

*म.* ***। गाद्या गिरद्या विविध वसन वर । क्षीरफेन-मृदु विशद मनोहर ॥१॥***
***। सीता राम रोज तिथं निजती । निज छविं रतिमनोज-मद हरती ॥२॥***
***। सिता राम ते तृण शयनावरी । श्रांत वसनविण बघवत ना तरि ॥३॥***

**अर्थ :** (त्या पलंगावर) विविध प्रकारची वस्त्रे, प्रावरणे, उशा, गिर्दा, गाद्या असून त्या दुधाच्या फेसासारख्या कोमल, उज्ज्वल व मनोहर असतात.॥१॥ तेथे रोज (रात्री) सीताराम शयन करतात व आपल्या रूपाने रति व मदन (मनोज) यांचा गर्व (मद) हरण करतात.॥२॥ तेच सीताराम आज तृणपर्ण शय्येवर थकलेले, भागलेले, वस्त्रांवाचून झोपले आहेत ! त्यामुळे (तरी) त्यांच्याकडे पाहवत सुद्धा नाही.॥३॥

**टीका.** - तेथे अमरावतीला लाजविणारी अयोध्या तर येथे वन; तेथे वैजयन्त

प्रासादाला मान खाली घालवयास लावणारा राजमहाल तर येथे उघडी जागा. तेथे विश्वविमोहक विश्रामगृह तर येथे शिसवाची झाडे; तेथे रत्नखचित पलंग तर येथे वृक्षाखालची जमीन. तेथे चित्रविचित्र छत तर येथे वृक्षांची छाया; तेथे क्षीरफेन मृदु गाद्या-गिरद्या तर येथे कुशगवत व झाडाच्या पानांची शय्या. तेथे उंच सुखद पांघरुणे व वस्त्रे तर येथे नेसलेल्या वल्कलांशिवाय वस्त्र नाही ! अशा सर्वस्वी अगदी प्रतिकूल स्थितीत झोपणे निषादांच्या राजालासुद्धा अति दुःखद झाले असते. तशा स्थितीत राम-सीता यांनी झोपावे व ते पाहण्याची पाळी निषादराजासारख्या परमप्रेमी भक्तावर यावी ! आली. तेव्हा त्याला वाटू लागले की हे हृदयविदारक दृश्य या डोळ्यांनी न पाहणे चांगले, कारण ते दृश्य पाहण्याने हृदयाचे पाणी पाणी होते.

(२) **क्षीरफेन मृदु** - गाद्यागिर्द्याउशांना क्षीरफेनाची उपमा दिली आहे. यापेक्षा अधिक सुंदर उपमा मृदुत्वाला देताच येणार नाही. **'सुभग सुरभि-पय-फेन समाना । कोमल रुचिर चादरी नाना'** (१।३५६।२) १।३५६।१-५ या चौपायांशी तुलना करून त्या येथे भरतीस घ्याव्या. कोणाचे क्षीर हे वरील अवतरणात 'सुरभिपय' = गाईचे दूध याने स्पष्ट केले आहे. या उपमेने परम कोमलता, पावित्र्य, शुभ्रपणा, निर्मलता इ. सुचवतात.

**ल.ठे.** - निषादासारख्याला ते दृश्य नुसते पाहण्याने हृदयविदारक दुःख झाले. पण सीता-रामांना घरच्यापेक्षासुद्धा लवकर, सुखाची शान्त झोप लागली आहे ! ज्यांचे सौंदर्य व मार्दव पाहून खरदूषणांसारख्या राक्षसांचे हृदय द्रवले त्या रामचंद्रांस झोप लागली हे नवल आहेच पण अति सुकुमार मिथिलेश किशोरीला सहज झोप लागली हे परम आश्चर्य आहे. **अलौकिकांचे सर्वच अलौकिक ! पुढे सीतेच्या पूर्वीच्या सुखादिकांचे वर्णन आहे.**

***हिं.*** *। मातु पिता परिजन पुरबासी । सखा सुसील दास अरु दासी ॥४॥*
*। जोगवहिं जिन्हहि प्रान की नाई । महि सोवत तेइ राम गोसाईं ॥५॥*
*। पिता जनक जग बिदित प्रभाऊ । ससुर सुरेस सखा रघुराऊ ॥६॥*
*। रामचंदु पति सो बैदेही । सोवत महि बिधि बाम न केही ॥७॥*
*। सिय रघुबीर कि कानन जोगू । करम प्रधान सत्य कह लोगू ॥८॥*

म. *। माय बाप पुरजन पुरवासी । सखे सुशील सुदास सुदासी ॥४॥*
*। जपती ज्यानां प्राणां परते । स्वामि राम निजले भूवर ते ॥५॥*
*। पिता जनक विश्रुतप्रभाव हि । श्वशुर सुरेशसखा रघुराव हि ॥६॥*
*। रामचंद्र पति ती वैदेहि । सुप्त महिं, न विधि वाम कुणा ही ॥७॥*
*। सीता रघुवीर किं जोगीं वन । कर्म - प्रधान वदति सत्य जन ॥८॥*

**अर्थ** - माता, पिता, परिजन, पुरवासी, सुशील सखे, उत्तम दास व उत्तम दासी ॥४॥ ज्यांना प्राणांपलीकडे जपत असत ते स्वामी राम (आज) जमिनीवर झोपले आहेत.॥५॥ ज्यांचा प्रभाव लोकविश्रुत (जगप्रसिद्ध) आहे ते जनकराजा जिचे वडील (पिता) आहेत. इंद्राचे मित्र रघुराज (दशरथ) जिचा सासरा आहे.॥६॥ व रामचंद्र पति आहेत ती वैदेही भुईवर झोपली आहे ! (तेव्हा) दैव (विधि) कोणावर उलटत नाही?॥७॥ सीता रघुवीर काय वनाला योग्य (जोगी) आहेत काय? कर्म प्रधान आहे असे लोक म्हणतात तेच खरे!!॥८॥

**टीका. चौ. ४-५ (१) जपती ज्यांना प्राणांपरते** - प्राणांपरते = प्राणां पलीकडे. **'कोसल पुरवासी नर नारि वृद्ध आबाल ॥ प्रिय सर्वां प्राणांहुनिहि वाटति राम कृपाल'**[१] (१।२०४) **असे जे पूर्वी म्हटले त्याची सत्यता येथे निषादराजमुखाने दाखविली. (क) सुशील सखे - दुःख-गिरी निज रजसम जाणत । मित्रदुःखरज सुमेरु वाटत'** (४।७।३) अशी सहज बुद्धि ज्यांची आहे, असते, असे रामसखे आहेत. त्या रामचंद्रांवर आज दुःखाचा डोंगर कोसळला आहे ! निषादराजाला राहून राहून जर काही झोंबत असेल तर प्रभूंनी जमिनीवर झोपणे झोंबत आहे. म्हणून या गोष्टीचा वारंवार उल्लेख तो करीत आहे. रघुनाथाचे पूर्वीचे सुख आणि मित्र व पुरवासी प्राणांपेक्षा जास्त जपतात हे गुहाने पूर्वी प्रत्यक्ष पाहिले असले पाहिजे; नाहीतर त्याला हा उल्लेख व क्षीरफेनमृदु शय्येचा उल्लेख करता आला नसता. तो वारंवार मधून मधून अयोध्येत जात येत असला पाहिजे व रघुनाथाचा पूर्वीच सखा असला पाहिजे असे ठरते. उत्तर काण्डातील एक वचन या अनुमानाला चांगले पोषक आहे. **'सखे ! बंधु मम तुम्हि सम भरतही । येत जात जा नगरीं सततही'** (७।२०।३) असे रघुनाथाने विनविले आहे. अशी विनंती सुग्रीवादि कोणास केली नाही. (टी.प.)

**चौ. ६-७** (१) सीतेच्या माहेरचे व सासरचे ऐश्वर्य थोडक्यात वर्णन करून पुन्हा तोच प्रश्न व तेच दुःख की भुईवर निजण्याचा प्रसंग अशा सीतेवर यावा ना ! **(क) रामचंद - चंद शब्द संस्कृत आहे. 'शरद चंद निशि'** (६४।२) च्या टीकेत वैशिष्ट्य पहावे. रामचंद्राने विरहानलाचा ताप सीतेला होऊ दिला नाही म्हणून ते तिला राम-चंद झाले. (रकार = अग्नि जळून गेला). कधी जरासुद्धा दुःख ताप न देणारे झाले म्हणूनच एखाद्या देहभावविरहित परम विरागी, परम ज्ञानी, योगिनी सारखी वैदेही भूमीवरसुद्धा स्वस्थ झोपली आहे हा कवींच्या मनातील गूढभाव आहे. **(ख) 'न विधि वाम कुणा ही** - गुहाने निष्कर्ष काढला की अशांवरसुद्धा दैव उलटले मग इतरांची कथा ती काय? दुर्दैवाच्या फेऱ्यांतून अजिबात सुटलेला व सुटणारा कोण असेल कोणास ठाऊक? **'वाम विधिची कठिण करणी'** (२०१ छं) असे निषादराजच म्हणाला आहे भरतास.

**चौ. ८ - (१) सीता रघुवीर किं जोगी वन !** अशी जी सीता व सहा प्रकारची वीरता ज्यांच्या ठिकाणी पूर्ण आहे असे रघुवीर, ही दोघेही पूर्ण निष्पाप असता त्यांच्यावर असे संकट का कोसळावे? सीता रघुवीर वनवासास योग्य नसता अशी पाळी का यावी? याचा विचार करता शेवटी सिद्धान्तावर यावे लागले. **(क) कर्म प्रधान हेंच खरें - 'कर्मप्रधान विश्वा राखित । जो करि जसें तसें फळ चाखित'** (२१९।४). गुहाच्या या वचनांवरून ठरले की तो रघुनाथास मनुष्य, राजपुत्रच मानीत आहे. वरीलप्रमाणे विचार केला पण या राम दुःखाचे समाधानकारक कारण सापडले असे त्यास वाटले नाही व विचार करता करता एक भला भक्कम आधार सापडला. त्याचा उच्चार तो आता करील व आपल्या प्रियमित्रांच्या हृदयात असलेला अंधार (राम मनुष्य आहेत हे अज्ञान) दूर करण्याच्या इच्छेने हृदयनिवासी कृपासागर प्रभु लक्ष्मणाला निमित्त करून उपदेश करतील.

***हिं.दो.*** *। कैकयनंदिनि मंदमति कठिन कुटिल पनु कीन्ह ॥*
*॥ जेहिं रघुनन्दन जानकिहि सुख अवसर दुख दीन्ह ॥९१॥*

***म.दो.*** *। कैकयनंदिनि मंदधी करि कटु कुटिलपणास ॥*
*॥ दे रघुनंदन-जानकिस सुखसमयीं दुःखास ॥९१॥*

**अर्थ** : कैकयराजाला आनंद देणाऱ्या मंदबुद्धि कैकयीने कठीण (कटु) कुटिलपणा व रघुकुलास आनंद देणाऱ्या रघुनाथांस व जानकीला सुखाच्या वेळी दुःख दिले.॥दो.९१॥

**टीका.** (१) गुहाच्या या वचनांवरून ठरते की रामराज्य रसभंग कैकयीने कुटिलपणाने केला वगैरे सर्व हकीगत त्याला कळली आहे व ती रघुवर संध्या करण्यास गेल्यानंतर कळली आहे. राम येण्याच्या आधीच कळली असती तर माझ्या पुरात चला असे म्हणाला नसता व इतक्या अल्पावकाशात ती बातमी शृंगवेरपुरास येणे शक्यच नाही. रघुनाथाने विशेष काही न सांगता पित्याच्या आज्ञेने वनवास, मुनिव्रतादि इतकेच सांगितले. लक्ष्मणाने केलेल्या पुढील उपदेशावरून ठरते की त्याने कैकयीला कुटिल, मंदमति इ. म्हटले असणे शक्य नाही. शिवाय लक्ष्मण-गुह यांस एकमेकांशी बोलण्यास यापूर्वी सवडच मिळालेली नाही. लक्ष्मण रामसंगतीतच होते. तेव्हा नक्की ठरते की सीतेसह **रामलक्ष्मण संध्या करण्यास गेल्यावर** गुह शय्या तयार करीत असता त्याने सुमंत्रास विचारले की दशरथ महाराजांनी अशी आज्ञा देण्याचे कारण काय? तेव्हा **सुमंत्राने सर्व हकीगत सांगितली.** सुमंत्राने कैकयीला कुचाळी करणारी मानली आहेच.

(२) **कैकयनन्दिनि** = कैकयनन्दिनी = कैकयी... कैकयी रघुकुळातील राणी असून रघुकुळाला आनंद देणारे वर्तन न करता, भरताला राज्य मिळवून देण्याच्या निमित्ताने ती कैकय कुळाला व कैकय राजाला आनंद देणारी ठरली. कन्या उभयकुलानन्ददायिनी झाली पाहिजे. पण कैकयी तशी झाली नाही. **(क) कटु** = कठीण, दुःखद, मत्सर, तीक्ष्ण, अकार्य. 'रसे कटुः कट्वकार्ये (कटु + **अकार्ये**) त्रिषु **मत्सर तीक्ष्णयोः**' (अमरे) भाव हा की मत्सराने तीक्ष्ण अकार्य तिने केले. नुसता वनवास दिला असता तर ते तीक्ष्ण अकार्य ठरले नसते. एखाद्या वनात सुंदर राजवाडा बांधून सुखाने राहिले असते. पण मुनिव्रत, वेष, आहार व विशेष उदासीन या अटीच तीक्ष्ण आहेत. त्यामुळेच सीतारामांना जमिनीवर झोपावे लागत आहे. वस्त्रे, शय्या वापरता येत नाहीत व कटु दुःख-कष्ट भोगावे लागत आहेत. हे सर्व अकार्य तिने कुटिलपणाने-कपटाने महाराजांचा विश्वासघात करून साधले.

(३) **रघुनन्दन जानकीस** – रघुनन्दन = रघुवंशाला आनंद देणारे - कैकयी रघुवंशातलीच. तिलाही सतत आनंद देत असत. असे असून त्यांना दुःख दिले म्हणजे तिने कृतघ्नपणाच केला. **(क) जानकी** = चिदानंदलहरीच, तिच्याकडून कोणालाच ताप, दुःख, पीडा इ. होणे शक्य नाही. तिलासुद्धा जानकी आनंद देत असेच. म्हणजे जानकीशीही कृतघ्न बनली. आणि विशेष म्हणजे **(ख) दे सुखसमयीं दुःखास** - सीता व राम यांचे वय वनवासास जाण्याचे नाही. राज्याभिषेकाची तयारीसुद्धा झाली होती. अशा परमसुखप्राप्तीच्या वेळीच दुःख दिले, हे तर अत्यंत गर्ह्य, विघ्नसंतोषीपणाचे आहे. सुखसमयी अचानकपणे येणारे महद्दुःख अति असह्य व हृदयविदारक होते. **येथे निषादाने शेवटी एकट्या कैकयीलाच दोषी ठरविली.** दशरथांस दोष मुळीच दिला नाही.

*हिं.* ***। भइ दिनकर कुल बिटप कुठारी । कुमति कीन्ह सब बिस्व दुखारी ॥१॥***
***। भयउ बिषादु निषादही भारी । राम सीय महि सयन निहारी ॥२॥***
***। बोले लखन मधुर मृदु बानी । ग्यान बिराग भगति रस सानी ॥३॥***

*म.* ***। रवि कुल - विटप - कुठारी झाली । कुमति विश्व सब दुःखी घाली ॥१॥***
***। होइ निषादा भारि विषाद हि । सिताराम पाहुनि निद्रित महिं ॥२॥***
***। लक्ष्मण वदति मधुर मृदु वाणी । ज्ञानविराग-भक्तिरस-खाणी ॥३॥***

**अर्थ :** कुबुद्धी (कैकयी) सूर्यकुलरूपी वृक्षाला कुऱ्हाड झाली व सगळे विश्व तिने दुःखात लोटले.॥१॥ सीतारामचंद्रांना जमिनीवर निजलेले पाहून (याप्रमाणे) निषादाला सुद्धा (हि) भारी विषाद झाला.॥२॥ (तेव्हा) ज्ञान वैराग्य व भक्तिरस यांची खाण असलेली मधुर, मृदु वाणी लक्ष्मण बोलले.॥३॥

**टीका. चौ. १ - (१) रविकुलविटपकुठारी - 'तूं दिनकरकुल** कुठार बन ना' (३४।६) असे दशरथांनी तिला विनविले आहे. 'शाखे बसुनी बुंधा छाटी । सुखीं शोक थाटा बहु थाटी' (४७।५ टी.प.) असे अयोध्यावासी लोक म्हणाले आहेत. 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' अशी ही कुमती बनली. **(क)** कैकयी कपटी कुटिल रामविरोधी असल्याने निषादाने सुद्धा तिचे नाव उच्चारले नाही. येथे कुमति म्हणाला, पूर्व कैकयनन्दिनि म्हणाला. **(ख)** रघुनन्दन जानकीला दुःख दिले हे प्रथम सांगून, रघुकुळाचा विनाश व विश्वाला दुःख देणे यांचे कारण

बनली हे सांगितले. भाव हा की रघुनंदन जानकीला दुःख देणे म्हणजे रघुवंशाला मरणप्राय दुःख देणे व अखिल विश्वाला फार दुःखी करणे आहे. देवांना दुःख झाल्याचे वर्णन पूर्वीच केले आहे. (८१।४).

**चौ. २** - (१) **होइ निषादा भारि विषाद हि** - येथे निषादविषाद योगाचा उपसंहार केला. ९०।५ मध्ये उपक्रम केला आहे. विषाद आरंभी थोडा होता पण आता भारी झाला.

**चौ. ३** - (१) निषादराजाने कैकयीला दोषी ठरविली हे लक्ष्मणांस पसंत पडले नाही. कैकयीला वृथा दोष दिला असे रामानुजास वाटले व आता ज्ञानवैराग्य भक्तिरसाने भरलेला उपदेश करू लागतात. **पण हे लक्ष्मण स्वभावविरुद्ध घडले** कसे ते पहा : (१) पुढील उपदेश निषादराजाला केल्यानंतर लक्ष्मण भरताला दोष देऊनच थांबले नाहीत, तर भरताला रामअरि समजून सर्व सैन्यसुद्धा व स्वतःच्या सहोदरासकट ठार मारण्याची शपथपूर्वक प्रतिज्ञा करून बसले. (क) सुमंताच्या देखत दशरथांस किंवा कैकयीस इतके अनुचित बोलले की रघुनाथाने त्यांस दटावले व सुमंत्रास शपथ घालावी लागली की लक्ष्मणाचे अनुचित बोलणे कोणाला सांगू नका. (ख) वनवासांतून परत आल्यावर कैकयीला भेटत असतानाही मनातला क्षोभ गेला नव्हता. मग येथे निषादराजाला केलेला उपदेश 'परोपदेशे पांडित्यं' समजावयाचा की काय? नव्हे, असे नाही. येथे लक्ष्मणाला निमित्त करून आपल्या परम भक्ताच्या हृदयातील मोह व परदोषदर्शनदृष्टि यांचा निरास करण्याचे कार्य प्रेरक हृदी रघुवंशविभूषण करीत आहेत. 'बोलविता धनी वेगळाचि' लोमशाच्या मुखाने जसे भुशुंडीला शंकरांनी रामायण सांगितले तसाच पुढील उपदेश लक्ष्मणाच्या मुखाने प्रभूच आपल्या प्रियतम मित्राला करीत आहेत. अरण्यकांडांत लक्ष्मणाने जिज्ञासू म्हणून माया, ज्ञान, वैराग्य, भक्ति इ. विषयी प्रश्न विचारले आहेत, ही गोष्टसुद्धा वरील विधानाला पोषक अशीच आहे. पुढील चौपाईत कर्मविपाक सिद्धान्त सांगून नंतर ज्ञानवैराग्य योग व भक्तियोग यांचा उपदेश आहे.

***हिं.*** ***। काहु न कोउ सुख दुख कर दाता । निज कृत करम भोग सबु भ्राता ॥४॥***
***। जोग बियोग भोग भल मंदा । हित अनहित मध्यम भ्रम फंदा ॥५॥***

*। जनमु मरनु जहँ लगि जग जालू । संपति बिपति करम अरु कालू ॥६॥*
*। धरनि धाम धनु पुर परिवारु । सरगु नरकु जहँ लगि ब्यवहारु ॥७॥*
*। देखिअ सुनिअ गुनिअ मन माहीं । मोह मूल परमारथु नाहीं ॥८॥*

म. *। कोणि कुणा सुख दुःख न दाता । निजकृत कर्मभोग ते भ्राता ॥४॥*
*। योग वियोग शोभ शुभ मंद हि । शत्रु मित्र मधले भ्रम - बंधहि ॥५॥*
*। जन्म मरण जोंवर जग जालहि । संपद् विपत् कर्म नी काल हि ॥६॥*
*। धरणी धाम धन पुर परिवार हि । स्वर्ग नर्क जितका व्यवहार हि ॥७॥*
*। श्राव्य, दृश्य मन्तव्य हि कांहीं । मोहमूल परमार्थे नाहीं ॥८॥*

**अर्थ :** कोणी कोणाला सुखाचा किंवा दुःखांचा दाता नाही (देत नाही) बंधू ! (सुख किंवा दुःख होते) ते आपण (स्वतः) केलेल्या कर्माचेच भोग असतात.॥४॥ संयोग (योग = एकत्र येणे, असणे), वियोग, चांगले (शुभ) किंवा वाईट (मंद) भोग, शत्रु मित्र किंवा उदासीन (मधले-मध्यम), हे सर्व भ्रमरूपी बंध पाश आहेत.॥५॥ जन्ममरण आणि जगाचा जितका पसारा (जाळे) आहे तो; संपत्ति, विपत्ति, कर्म आणि काळ,॥६॥ आणि जमीनजुमला (राज्य) घर, पैसा (वित्त) नगर, परिवार आणि स्वर्ग-नर्क आणि (फार काय) जितका सर्व व्यवहार आहे.॥ जे ऐकले जाते, पाहिले जाते किंवा मनाने ज्याचा विचार केला जातो त्या सर्वांचे मूळ मोह आहे. (ते मोहमूलक आहे). परमार्थाने हे काही नाहीच (यांना पारमार्थिक सत्ता नाही).

**टीका. चौ. ४ (१) कोणी कुणा सुख दुःख न दाता - 'सुखस्य दुःखस्य न कोऽपि** हेतु परो ददातीति कुबुद्धिरेषा ॥ अहं करोमीति वृथाभिमानः स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः' (अ.रा. २।६।५) या श्लोकाचे सारच या चौपाईत भरले आहे. कोणी कोणाला सुख किंवा दुःख देत नाही. केलेल्या कर्माचे फळच कर्त्याला मिळत असते. शुभ-पुण्य-कर्माचे फळ सुख मिळते व अशुभ-पाप-कर्माचे फळ दुःख मिळते. कर्म स्वतः जड असले तरी कर्मफलदाता ईश्वर आहे. 'शुभ वा अशुभ **कर्म - अनुसारें । ईश देई फळ** हृदय - विचारें ॥ **कर्म करी जो त्या फळ मिळती** । निगम नीति अशि सगळे वदती' (७७।७-८) कर्माचे फळ कर्त्याच्या पदरात टाकण्यासाठी कर्मफलदाता ईश्वर कोणाला तरी निमित्त करीत असतो.

जो कोणी जीव (प्राणी) निमित्त बनलेला दिसतो त्याने सुख किंवा दुःख दिले असे अविचारी, अज्ञानी लोक समजतात. कैकयनन्दिनीने रामजानकी, रघुवंश व सर्व विश्व यांना दुःख दिले असे गुह म्हणाला त्यावर हे सिद्धान्तभूत सहेतूक उत्तर आहे. भाव हा की कैकयीला दोष देणे हा अविचार आहे, ही कुबुद्धी आहे. कैकयी कुबुद्धी नाही. (क) **भ्राता** - येथे एका निषादाला भ्राता म्हटले व विनम्रतेची, प्रेमाची सीमा गाठली. गुह रामसखा आहे म्हणून लक्ष्मणाचा बंधु ठरलाच. **वडील भावाचा जो मित्र त्याला धाकट्या भावाने भाऊ (भ्राता) मानावा** हे सुचविले. भावाला किंवा कोणालाही उपदेश करताना 'तू मूर्ख आहेस, तुला काही कळत नाही' इत्यादी प्रकारे **श्रोत्याचा पण पाणउतारा करू नये.** उलट प्रेमाने तो आपला एक भाऊ आहे असे मानून बोलावे हे येथे दाखविले आहे. प्रत्येक सोपानात अशी उदाहरणे आहेत. (ख) या चौपाईतील कर्मभोग सिद्धान्त नित्य विचाराने हृदयांत चांगला ठसल्यास द्वेष, मत्सर, परदोषदर्शन, परनिंदा, वैर इत्यादी अति आत्मघातकी मानसरोगांचा विनाश सहज होईल व **कुटुंबात व समाजात समाधान व स्वास्थ्य जास्त वाढेल.**

(२) **या चौपाईत कर्मविपाकसिद्धान्त थोडक्यात सांगितला.** परंतु हा सिद्धान्त ज्ञानमार्गातील केवळ एक पायरी आहे. ज्ञानमार्गाच्या दृष्टीने कर्मसुद्धा सुखदुःखदायक नाही. मनच सुखदुःखदायक आहे. **'नाऽयं जनो मे सुखदुःखहेतुर्न देवतात्मा ग्रहकर्मकालाः ॥ मनः परं कारणमावदानी संसारचक्रं परिवर्तयेयत्'** (भाग ११।२३। भिक्षुगीत) हाच अन्तिम सिद्धान्त आहे. **'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः'** (श्रुति) **त्याप्रमाणेच ॥ मन एव मनुष्याणां कारणं सुखदुःखयोः ॥** याची प्रत्यक्ष प्रतीति रामसीता व निषाद यांच्यातच येथे मिळते. जे भूमिशयन पाहणे गुहास अति दुःखद वाटत आहे, ते सीतारघुवीरांस अयोध्येतील शयनागारापेक्षा अधिक सुखद ठरले व त्यांस लेशमात्र दुःख झाले नाही. जो रामवनवास सर्वांना दुःखद वाटत आहे तोच कैकयीला काही दिवस परमसुखद वाटणार आहे. यावरून ठरले की भूमीशयन किंवा रामवनवास सुखाचेही कारण नाही व दुःखाचेही कारण नाही. निषादाने 'कर्मप्रधान' हा निष्कर्ष काढूनसुद्धा कैकयीला दोषी ठरविले म्हणून येथे कर्मसिद्धान्त म्हणजेच कर्मयोग प्रथम सांगावा

लागला. पण एवढ्याने सुखदुःखातीत निर्मळ आत्यंतिक सुखाची प्राप्ति होणार नाही म्हणून ज्ञानवैराग्यभक्ति यांची प्राप्ती करून घेणे आवश्यक आहे व हे करणे मनुष्याच्या स्वाधीन आहे म्हणून पुढील १० ओळींत ज्ञानवैराग्य सांगतात.

**चौ. ५ - (१) योग वियोग भोग शुभ मंदहि** - भ्रमबंधहि - **योग** = संयोग एकत्र राहणे. अयोध्येतील सुखमय शयनागाराशी इतके दिवस सीतारामांचा संयोग होता आता त्याचा वियोग होऊन भूमिशयनादिकांशी संयोग झाला आहे व हे निषादाच्या दुःखाचे कारण आहे; पण सीतारामांना त्यात दुःख वाटत नाही. **शुभ** = चांगले, अनुकूल व **मंद** = वाईट, प्रतिकूल भोग. 'सीता रघुवीर किं जोगीं वन' या निषादवचनाचे हे उत्तर आहे. चांगले-वाईट, योग्य-अयोग्य, अनुकूल वा प्रतिकूल या गोष्टी भोगांच्या ठिकाणी नाहीत. म्हणूनच एकाला जो भोग - जो विषय चांगला वाटतो तो दुसऱ्यास दुःखद, वाईट वाटतो. एकाला बिडी ओढणे सुखद वाटते तर दुसऱ्याला विडीचा नुसता धूरसुद्धा दुःखद वाटतो. असेच इतर सर्व भोगांचे आहे. यावरून ठरले की भोग = विषय चांगले किंवा वाईट नसून तसे वाटणे हा केवळ मनाचा **भ्रम** = मोह आहे व हा भ्रमच **बंध** = बंधन आहे. बंधन दुःखद वाटते. **'मोह सकळ रोगांचे मूळहि'** हा भ्रमच चांगलेवाईट, सुखद दुःखद ठरविती. पण भ्रमाने ठरविलेले सत्य असतेच असे नाही.

(२) **शत्रुमित्र मधले भ्रम-बंधहि** - **मधले** = शत्रु नाही व मित्रही नाही असे उदासीन. 'शत्रुमित्र सुखदुखें जगतीं । मायाकृत परमार्थे नसतीं' (४।७।१८) 'न कश्चित् कस्यचिन्मित्रं न कश्चित् कस्यचिद्रिपुः ।। कारणेन हि जायन्ते मित्राणि रिपवस्तथा ।।' शत्रुमित्रादि भावना मनाने ठरविल्या जातात. कल्पित आहेत. जन्मतः कोणी मनुष्य कोणाचा शत्रू नाही व मित्रही नाही. कल्पनाजनित असल्याने हे सर्व भ्रम आहेत. भ्रम, मोह इ. सर्व मायाकार्ये आहेत. मिथ्या आहेत. त्यांस पारमार्थिक अस्तित्व = सत्ता नाही. प्रातिभासिक अस्तित्व स्वप्नासारखे आहे. **(क)** गुहाला राम मित्र वाटत आहेत व मित्राला दुःख देणारी कैकेयी शत्रु वाटत आहे. त्यावर रामानुजाचे हे उत्तर आहे. 'दे सुखसमयीं दुःखास' 'रविकुलविटप कुठारी झाली' या आक्षेपांचे खंडण केले आहे. **फंदा** = बंधन, बंध - मोहच बंध आहे, पाश आहे, दुःखद आहे. येथपर्यंत वर्णिलेल्या सर्व

भावना भ्रम आहे असे म्हणून 'जग मिथ्या' या सिद्धान्ताचा सहज उपक्रम केला आहे. ब्रह्म, जीव व जग यांचा परस्पर संबंध व स्वरूप स्वानुभवाने जाणणे म्हणजेच ज्ञान. आता पुढील याच ओळीत जग मिथ्या आहे हा सिद्धान्त स्पष्टपणे सांगतात.

**चौ. ६ - (१) जन्ममरण जोंवर जगजाल हि... काल हि** - जगाला जाळे म्हटले. या जाळ्याचा विस्तार मातृगर्भात जन्माला आल्यापासून मरणापर्यंत स्पष्टच दिसतो; पण इतकाच याचा विस्तार नाही. श्राव्य, दृश्य, मन्तव्य पर्यंत आहे. सुखाच्या आशेने जीव या जाळ्यात शिरून दुःखी होतो. 'ईश्वर-अंश जीव अविनाशी । चेतन अमल सहज सुखराशी ॥ 'तो प्रभु, (असून) मायेला वश झाला । शुकमर्कट सम बंधनिं पडला ॥' (७।११७।२।३) (यापुढील ज्ञानदीपकातील सर्व भाग सटीक पहावा) हे जाळे मायेने पसरले आहे. म्हणून पुढे (चौ.८) म्हणतात की हे सर्व मायाकृत आहे. 'गो गोचर जोंवरिं मन जातें । समजा सकल बंधु । माया ते' (३।१५।३) याचाच विस्तार येथे या व पुढील चौपायांत केला आहे.

(२) **संपद् विपत् कर्म नी काल हि** - मायाकृत आहेत, पारमार्थिक नाहीत (चौ.८.) संपत्ती किंवा विपत्ती इत्यादी काहीही त्रिकालाबाधित (तिन्ही काळी सतत सारखे टिकणारे) नाही. नश्वर आहे. कर्मसुद्धा अशाश्वत आहे म्हणून मिथ्या आहे. काळसुद्धा सत्य नाही. सापेक्ष आहे. २/४ मिनिटांच्या स्वप्नांत कितीतरी वर्षे गेल्याचा अनुभव येतो. ज्याला वर्तमान काळ म्हणतो तोसुद्धा सत्य नाही. पाण्यावर काढलेली रेघ नष्ट होण्यास जेवढा काळ लागतो तेवढासुद्धा वर्तमान काळ असू शकत नाही.

**चौ. ७ - (१) धरणिधाम... व्यवहारहि** - या सर्व गोष्टी नष्ट होताना व पुन्हा उत्पन्न होताना प्रत्यक्ष दिसतात. तरी त्या सत्य आहेत असे वाटते. याचेच नाव भ्रम, विपरीत ज्ञान; याचे मूळ असते अज्ञान. 'स्वर्गहि अल्प अंतिं दुखदाई' (७।४४।१) स्वर्गसुख जसे नश्वर तसे नर्क दुःखही नश्वरच. 'जन्ममरण सुखदुःखें भोगहि । विरह लाभ हानी प्रिय - योगही ॥ स्वामी ! कालकर्मवश घडती । बलपूर्वक जशिं रात्रदिवस तीं ॥ सुखिं हर्षति जड दुःखीं रडती । धीर मनीं

उभयां सम गणती' (१५०।५-७) असे सुमंत्राने दशरथांस सांगितले आहे. यांत वरील ४ चौपायांचेच सारसर्वस्व आहे. यावरून ठरते की लक्ष्मणाने केलेला उपदेश सुमंत्राने ऐकला असला पाहिजे. पुढे आणखी आधार आहेत.

**चौ. ८ - (१) श्राव्य, दृश्य, मन्तव्य - मोहमूल परमार्थे नाही.** येथे जग मिथ्या या सिद्धान्ताचा उपसंहार करतात. श्राव्य = ऐकण्यासारखे, ऐकले जाणारे; दृश्य = पाहिले जाणारे; मन्तव्य = मनाने कल्पना, विचार करण्यासारखे; म्हणजे जे इंद्रियांचे विषय व मनाचे विषय आहेत ते सर्व मायाकृत आहेत. मोहमूल असणारे आहेत. म्हणजेच माया आहे. 'गो गोचर जोंवरिं मन जातें । समजा सकल बंधु ! माया ते' (३।१५।३) गो-गोचर = इंद्रियगोचर = इंद्रियांचे विषय; व जोवर, जेथपर्यन्त मन जाते, मनाची धाव जेथपर्यंत जाऊ शकते ती सर्व माया आहे असे प्रभूंनी पुढे लक्ष्मणासच सांगितले आहे. (क) परमार्थे नाही - परमार्थतः जग सत्य नाही; म्हणजेच मिथ्या आहे. 'ब्रह्म राम परमार्थ' आहे असे पुढे सांगतील. जगाच्या मिथ्यात्वाला आता दोन दृष्टान्त देतात.

*हिं.दो. । सपनें होइ भिखारि नृप रंकु नाकपति होइ ॥*
*॥ जागें लाभु न हानि कछु तिमि प्रपंच जियँ जोइ ॥९२॥*

*म.दो. । स्वप्नीं होइ भिकारि नृप होइ रंक नाकेश ॥*
*॥ जागत लाभ न हानि लव तसा प्रपंच अशेष ॥९२॥*

**अर्थ :** स्वप्नात भिकारी राजा झाला किंवा स्वर्गाचा राजा इंद्र रंक बनला तरी जागा झाल्यावर (भिकाऱ्याला) काही लाभ नाही व (इन्द्राला) काही हानि नाही, तसाच हा सर्व प्रपंच (जग) आहे. (असे जाणावे, समजावे).।।दो.९२।।

**टीका. -** (१) नृप भिकारी होई व रंक नाकेश होई असा अर्थ घेण्याकडे प्रवृत्तिं होण्याचा संभव आहे; पण त्यामुळे उत्तरार्धातील क्रमाशी विसंगति निर्माण होते व यथासंख्य अलंकाराची हानी होते. जग मिथ्या-माया-भ्रम आहे असे जे पूर्वी सांगितले त्याला येथे लाभ - हानि (सुख दुःख) युक्त दृष्टान्त दिला. स्वप्नातला राजेपणा व स्वप्नातला रंकपणा जागे झाल्यावर मिथ्या, भ्रमच ठरतात तसेच हे सर्व जग स्वप्नासारखे आहे. स्वप्नातील सुख-दुःखादि सर्व गोष्टी स्वप्नात सत्य वाटत असल्या तरी जागृतीत त्या सर्व मिथ्या ठरतात. त्या प्रमाणेच या

जगातील लाभहानि, सुखदुःख इ. सर्व मिथ्या असून सत्य वाटतात. **'संसारः स्वप्नतुल्योहि रागद्वेषादिसंकुलः ॥ स्वकाले सत्यवद्भाति प्रबोधे सत्यसत् भवेत्' (आ.बो.) 'उमे सांगतो तुज अनुभव मम । सत् हरिभजन जगत् स्वप्नासम' (३।३९।५) स्वप्नदुःखादींचा नाश जागृती आल्याशिवाय होत नाही. तसाच व्यवहारातील - प्रपंचातील दुःख क्लेशांचा नाश जीव जागा झाल्याशिवाय होत नाही. म्हणून आता रात्र, स्वप्न व जागा कोण झाला इत्यादींचे प्रतिपादन क्रम प्राप्त झाले.**

***हिं.*** ***। अस बिचारि नहिं किजिअ रोसू । काहुहि बादि न देईअ दोसू ॥१॥***
***। मोह निसाँ सब सोवनिहारा । देखिअ सपन अनेक प्रकारा ॥२॥***

***म.*** ***। अशा विचारें रोष नसावा । वृथा दोष कोणा ना द्यावा ॥१॥***
***। सर्वहि मोहनिशें निजणारे । दिसती स्वप्नें किती प्रकारें ॥२॥***

**अर्थ** : या प्रमाणे विचार करून (कोणावर) रागावू नये व वृथा दोष कोणालाही देऊ नये.॥१॥ सर्वच लोक मोहरूपी रात्रीत निजणारे आहेत; व कितीतरी प्रकारची स्वप्ने त्यांना दिसत असतात (पाहतात, पडतात).॥२॥

**टीका. चौ. १ - (१) अशा विचारें रोष नसावा** - निषादराजाने कैकयीला मंदमति, कुटिल, रविकुलकुठारी वगैरे शब्दानी दोष दिला. हे शब्द कठोर आहेत. कठोर भाषण हे क्रोधाचे मुख्य बळ आहे. 'क्रोधा बल परुषाक्षरें' (३।३८ म.). म्हणून लक्ष्मणाने जाणले की रामसखा प्रथम कैकयीवर रागावला, म्हणून अविचाराने त्याने कैकयीला दोष दिला. म्हणून सांगतात की 'कोणी कोणाला सुखदुःख देत नाहीत आणि ज्यांना सुखदुःख इ. म्हणतात ती व सर्व जग मिथ्या आहे असा विचार केला की रोष वगैरे विकार उत्पन्न होणार नाहीत व कोणालाही कोणत्याही कारणास्तव दोष देण्याची इच्छा उत्पन्न होणार नाही; कारण कोणालाही, सकारण का असेना दोष देणे व्यर्थ आहे.' वर 'कोणि कुणा सुख दुःख न दाता' पासून जे सांगितले त्या प्रमाणे वारंवार, क्षणोक्षणी, विचार करावा म्हणजे हे साधेल. दोष देणे, दोष पाहणे, त्यांची चर्चा करणे हाच दोष आहे असे प्रभुमुखवचन मानसांत व श्रीभागवतात पण आहे. **'तात ऐक मायाकृत गुण नी दोष अनेक । गुण हा, उभय न पाहणें, बघणें त्यां अविवेक' (७।४१) 'गुणदोषदृशिर्दोषो गुणस्तूभयवर्जनम्' (भाग.)**

**सूचना** - शत्रुत्वभावना, परदोषचर्चा व परनिंदा यांचा त्याग का करावा व कशा रीतीने करावा या विषयी व्यावहारिक, आधिदैविक व आध्यात्मिक दृष्टीने चर्चा 'साधक बोधसिंधु' (बिंदु १) या अगदी छोट्या पुस्तकात छापलेली आहे.

**चौ. २ - (१) मोहनिशा** - अज्ञान रूपी रात्र, सर्वांच्याच (अपवाद सोडून) मागेपुढे सतत, सर्वत्र आहे. **'अविवेचिया रात्रिमधें तूं निद्रा मोहाची घेशी । मी, माझें, हें विश्व सत्य, ही स्वप्नें नानाविध बघसी'** (वेदा.भूपाळी) अविद्या मूळ कारण आणि अज्ञान हे तिचेच एक निराळे रूप आहे. आपण कोण व देव कोण हे स्वानुभवाने न जाणणे हे अज्ञान होय. अज्ञान म्हणजेच निशा-रात्र-तम. ज्ञान = प्रकाश, दिवस. स्वप्न = भ्रम, विपरीत ज्ञान. मी, माझे तू, तुमचे व हे जग सत्य आहे असे वाटणे हे मुख्य स्वप्न आहे. यांतूनच सुख-दुःख, लाभहानि, जन्ममरण, मातापत्नी, लहानमोठा इत्यादी अनंत स्वप्ने निर्माण होतात. आत्मस्वरूपाहून भिन्न असे जे काही असेल ते सर्व स्वप्न आहे. **जीव 'ईश्वर-अंश अविनाशी । चेतन अमल सहज सुखराशी'** असून मरणाला भितो. सुखस्वरूप असून सुख मिळविण्याचा प्रयत्न करतो व दुःखी होतो. स्वतः सच्चिदानंदस्वरूप असून देहाला मी म्हणतो व देहाच्या संबंधांना माझे म्हणतो. याचेच नाव स्वप्न = विपरीत ज्ञान. जे जसे आहे तसे न जाणता भलतेच, विपरीत जाणणे = विपरीत ज्ञान. जागा कोण झाला ते आता सांगतात :

*हिं. । एहिं जगजामिनी जागहिं जोगी । परमारथी प्रपंच बियोगी ॥३॥*
*। जानिअ तबहिं जीव जग जागा । जब सब बिषय बिलास बिरागा ॥४॥*
*म. । या जगयामिनिं जागति योगी । परमार्थि जे प्रपंच वियोगी ॥३॥*
*। जाणा तैंच जीव जगिं जागा । पावे विषय - विलासीं विरागा ॥४॥*

**अर्थ :** या जगरूपी यामिनीत (रात्रीत) प्रपंचवियोगी झालेले जे परमार्थी योगी असतात तेच जागे असतात.॥३॥ ज्या वेळी (सर्व) विषयविलासांत वैराग्य उत्पन्न होईल त्या वेळीच जगरूपी रात्रीत जीव जागा झाला असे जाणावे.॥४॥

**टीका. - चौ. ३ - (१)** पूर्वी (चौ.२) मोहनिशा असे म्हटले व येथे 'जगयामिनी' म्हटले. यामिनी = रात्र, निशा = रात्र. मोहनिशा = जग यामिनी; म्हणून मोह = जग हे सुचविले. यामिनीला त्रियामा म्हणतात. सूर्यास्तानंतरचा

अर्धा प्रहर व सूर्योदयापूर्वीचा अर्धा प्रहर यांचा समावेश रात्रीत होत नाही. या जगरूपी रात्रीत त्रियाम = तीन याम (प्रहर) कोणते? रात्रीच्या तीन प्रहरांपैकी पहिल्या प्रहरात सहसा स्वप्ने पडत नाहीत. स्वप्ने पडण्याचा मुख्य काळ म्हणजे रात्रीचे शेवटचे दोन प्रहर. धर्म, अर्थ व काम हे त्रियाम होत. धर्माचरण करणाराला मोहनिशेतील स्वप्ने पडत नाहीशी होतात. **'विरतिस धर्म योग दे ज्ञाना । ज्ञान मोक्ष दे-'** (३।१६।१) म्हणजेच धर्मशील जीव क्रमशः योगी होतो. अर्थ व काम या रात्रीच्या दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरांतच मी, माझे वगैरे स्वप्न पडतात व दुःखी होतो. निषादाने धर्माचा विचार केला असता तर कैकयीला दोष द्यावासा वाटला नसता; परंतु त्याने ऐश्वर्य, सत्ता, सुखोपभोग व काम या विचारांना प्राधान्य दिले म्हणून कैकयीला दोष दिला म्हणजेच मोहनिशेत स्वप्ने पडली. एकदा मोहनिशा व लगेच जगयामिनी हे शब्द घालून किती मोठा सिद्धान्तभूत अर्थ ध्वनित करून ठेवला आहे व तो मानसांतील वचनांशी कसा सुसंगत आहे हे दिसले म्हणजे तुलसीदासांची शब्द कला अतुल - सी आहे असेच म्हणावेसे वाटते.

(२) जागे कोण असतात? याचे उत्तर 'योगी' या शब्दाने दिले. योगी जागे असतात. योगी कोण? याचे उत्तर 'प्रपंचवियोगी परमार्थी' या तीन शब्दांनी दिले. परमार्थाचा लाभ ज्याने केला तो परमार्थी (धनाचा लाभ ज्याने केला आहे तो धनी) परमार्थ = **परमतत्त्व 'परम तत्त्व जणुं पावे योगी'** (१।३५०।६) परमार्थ प्राप्त केलेला तो योगी व परमतत्त्व म्हणजे परमार्थ इतके ठरले. परमार्थ = ब्रह्म, निर्गुणनिराकार ब्रह्म हे पुढे (चौ.७) स्पष्ट होईल. परम तत्त्व पावे तो योगी, आणि परमार्थाचा लाभ ज्याला झाला तो योगी, म्हणून परमार्थ = परम तत्त्व हे मानसाधारे ठरेल. पण असा परमार्थी केव्हा होतो? याचे उत्तर 'प्रपंच वियोगी' या दोन शब्दांनी दिले आहे. म्हणजेच प्रपंच-वियोग झाल्याशिवाय कोणी परमार्थी होऊ शकत नाही. जोपर्यंत प्रपंचाशी योग असतो तोपर्यंत परमार्थाशी = ब्रह्माशी वियोग असतो. प्रपंच वियोग केला म्हणजे ब्रह्मवियोग नाहीसा होऊन ब्रह्मयोग होतो तेव्हा योगी होतो. ब्रह्म सत्य, प्रपंच = जग मिथ्या.

**(३) प्रपंच म्हणजे काय व त्याचा वियोग कसा करावयाचा?** परमतत्त्व जे

ब्रह्म त्याच्या शिवाय इतर जे काही तो प्रपंच. याचेच वर्णन 'योग वियोग भोग मंदहि'पासून 'मोहमूल परमार्थे नाहीं' येथपर्यंत केले गेले आहे. (९२।५ पासून ९२ पर्यंत) प्रपंच म्हणजे माया व मायाकार्य. (क) या सर्वांचा वियोग योगाभ्यासाने करणे शक्य आहे. **'योग दे ज्ञाना.' 'लया जाय जग जया जाणतां** । स्वप्नांचा भ्रम जसा जागतां' (१।११२।२) परमार्थ प्राप्त करणे = परमार्थ जाणणे; परमतत्त्व स्वानुभवाने जाणणे, परमतत्त्वाचा (ब्रह्माचा) अपरोक्ष साक्षात्कार होणे, हा साक्षात्कार अतन्निरसनाने = जे ब्रह्म नाही त्याचा (अन्तत्) निरास, वियोग केल्याने होतो. अपरोक्ष साक्षात्कार म्हणजे जीवब्रह्मैक्य, जीव व ब्रह्म यांचे तादात्म्य होणे = योग. **'योगः समाधिः;'** (पा.यो.) **समाधिः समताऽवस्था जीवात्मपरमात्मनोः'** (श्रुति) हा योग कसा साधावा याचे सुंदर विस्तृत विवेचन उ.कां. ज्ञानदीप प्रकरणांत आहे व परमार्थ = ब्रह्म, ज्यामध्ये विज्ञानी मुनि सदा मग्न असतात त्याचे तात्त्विक स्वरूप बा.कां. दो ११३-११९ मध्ये वर्णिले आहे. अपरोक्ष साक्षात्कार = व्यतिरेक ज्ञान व परम वैराग्याची प्राप्ती अंततोगत्वा एकरूप आहेत. इतके विवेचन येथे पुरेल. ज्ञान, विराग, माया इत्यादींचे विवेचन अर.कां.राम गीतेत आणखी केले आहे.

**चौ. ४ - (१) जाणा तैंचि जीव जगिं जागा... विरागा** – कित्येक वेळा शब्द ज्ञानाने जागा झाल्याचा भास-भ्रम होतो - मी मुक्त, मी ज्ञानी, मी योगी असे वाटू लागते. योगी न होता, योगी झालो, असे वाटू लागले की अनंत कल्पे गेली तरी तो योगी होणार नाही. मी निरोगी आहे असा भ्रम झालेल्याचा रोग कधी बरा होत नाही; म्हणून जागा झाल्याचे लक्षण सांगतात. विषयविलासांविषयी पूर्ण वैराग्य उत्पन्न झाले म्हणजे समजावे की जीव जागा झाला. गुण दोषसुद्धा विषयच आहेत. त्यांच्याबद्दल विराग उत्पन्न झाला पाहिजे. 'विधीप्रपंच गुणागुण मिश्रित' (१।६।४) प्रपंच वियोगी = योगी होण्यास गुण दोषांचाही वियोग झाला पाहिजे. कोणाचेही गुणदोष दिसणे बंद झाले पाहिजे. वैराग्य + गुणदोषवियोग = पूर्ण जागृति. (१।२२।१ टी.प.) **'म्हणति तात तो परम विरागी । तृणसम सिद्धी त्रिगुणां त्यागी'** (३।१५।८) याची गू. चं. पहावी. पुढील चौपाईच्या प्रथम चरणांत ज्ञानवैराग्ययोगाचा उपसंहार करून दुसऱ्या चरणांत भक्तियोगाचा उपक्रम करतात.

हिं. *। होइ बिबेकु मोह भ्रम भागा । तब रघुनाथ चरन अनुरागा ॥५॥*
*। सखा परम परमारथ एहू । मन क्रम बचन राम पद नेहू ॥६॥*
म. *। ज्ञान होइ मोहभ्रम - भंग हि । तैं रघुनाथ चरणिं अनुराग हि ॥५॥*
*। हाच परम परमार्थ सखे ! हो ! ! रामपदीं मनतनुवाक्-स्नेहो ॥६॥*

**अर्थ** : अशा प्रकारे ज्ञान (आत्मज्ञान) होते व मोह आणि भ्रमसुद्धा नाश पावतो; तेव्हा मग रघुनाथचरणी अनुरागही उत्पन्न होऊ शकतो.॥५॥ मित्रा ! मनाने कर्माने व वाणीने रघुनाथचरणी स्नेह करणे हाच परम परमार्थ हो ! ॥६॥

**टीका. चौ.** ५ (१) मागे सांगितल्याप्रमाणे जागा होणे = वैराग्ययुक्त होणे. ज्ञान झाले की अज्ञानरुपी मोह व विपरीत ज्ञानरूपी भ्रम यांचाही नाश होतो. **'ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितत्मानः । तेषामादित्यवत् ज्ञानं प्रकाशयति तत्परम्'** (भ.गी.) **ज्ञानानेच** अज्ञान = मोह, नाश होतो म्हणून मुळांतील 'विवेक' चा अर्थ ज्ञान = गुणातीतता = व्यतिरेक ज्ञान. मानसांतसुद्धा ज्ञानानेच मोहनाश वर्णिला आहे. 'यज्ज्ञानार्के भवनिशि नासे' (२७७।१) म्हणून मराठीत ज्ञान शब्द घातला. (क) आत्मज्ञान झाल्यावर मग रघुनाथचरणी अनुराग = **प्रेमभक्ति उत्पन्न होऊ शकते**. होऊ शकते असे म्हणण्याचे कारण हेच की सर्व ज्ञान्यानां प्रेमभक्ति मिळतेच असे नाही. **'श्रुतिगीता रघुनाथभक्ति ते । रामकृपें कुणि एका मिळते ॥** ७।१२६।८; **'जशि मम भक्ति एक कुणि जोडी'** (४।१६।१०) असे प्रभु रघुनाथच म्हणाले आहेत. ज्ञान - **'करुनि कष्ट जरि मिळे कुणाला । भक्तिहीन तो प्रिय नहिं मजला'** (४।४५।४) हेही श्रीरघुनाथ वचनच आहे. याने निःसंदेहपणे **ठरले की ज्ञानी भक्तिहीन असू शकतो. 'सकल सुफल हरिभक्ति सुशोभन । संतकृपेविण कुणाहि लाभ न'** (७।१२०।१८) असे भुशंडी म्हणाले. **'हें समजुनि मुनि जे विज्ञानी । याचिति भक्ति सकल सुखदानी'** (७।११६।८) अशी आणखी २०।२५ वचने तरी मानसांत आहेत. 'ज्ञान झाले की रघुनाथचरणानुराग होतो' असा अर्थ करणे मानसविरोधी ठरते की नाही व अतिव्याप्ति दोष होतो की नाही हे यांवरून वाचकांनीच ठरवावे. असा दोष घडू नये **म्हणून कवींनी या चरणांत क्रियापद अध्याहृत ठेवले आहे**. (मा.पी.प.!)

(२) **रघुनाथ चरण** शब्दानी सगुण साकाराचाच म्हणजे दशरथनंदन रामाचाच

बोध होतो. 'राम' शब्दाचा अर्थ निर्गुण निराकार ब्रह्म होऊ शकतो व तोच पुढे (चौ.७) सांगावयाचा आहे. पुढील चौपाईत 'रामपद' असे याच हेतूने म्हटले आहे. निर्गुणनिराकार ब्रह्माला व सगुणनिराकार परमेश्वराला पद, चरण इ. अवयव नाहीत. **(क) 'शमयमनियमचि फुलें ज्ञान फल । हरिपद रति रस वेद वदे कल' (१।३७।१४) 'ज्ञानविमलजलिं करी स्नान जैं । रामभक्ति उरिं करी स्थान तैं'** (७।१२२।११) या प्रमाणे या सिद्धान्ताचा बालकांडांत उपक्रम करून उत्तर काण्डात अनेक जणांनी उपसंहार रूपाने हाच सिद्धांत सांगितला आहे. येथे लक्ष्मणगीतेत व प्रत्येक काण्डात अभ्यासरूपाने सांगितला आहे. आत्मज्ञान झाल्याशिवाय प्रेमभक्ति मिळू शकत नाही. सर्वांनाच मिळते असे नाही. रामकृपेने किंवा संतकृपेने क्वचित कोणास मिळते हे आतापर्यंतच्या मानसवचनांच्या आधारे ठरले.

**चौ. ६ (१) हाच परम परमार्थ** की मनाने, कर्माने व वाणीने रामपदी स्नेह करणे. **अनुराग = त्रिविध स्नेह**; हे येथे स्पष्ट दाखविले. **ज्ञानप्राप्ति, ब्रह्मप्राप्ति = परमार्थ आणि रामपदीं अनुराग = परम परमार्थ; हा भेद चांगला लक्षात ठेवल्यास मानसांतील वचनांचा भावार्थ चांगला कळेल. अन्यथा काही ठिकाणी घोटाळा होईल. (क) त्रिविध स्नेहाचीं उदाहरणें** (I) **मनानें स्नेह** - 'मम गुण गातां तनू पुलकते । गद्‌गद् गिरा नयनिं जल गळतें' (१।१६।११) स्तंभ रोमांचादि सात्विक भाव उत्पन्न होणे. राम रूपगुणादिकांचे चिंतन, मनन व रूपाचे ध्यान इ. करणे II **शरीराने प्रेम** - राममंदिरादिकांत, शरीराने हलकी सेवा करणे, गुरुसंत यांची सेवा रामभावनेने करणे, रामतीर्थास पायी चालत जाणे इत्यादी. III **वाचिक स्नेह** - भगवत्कथा, गुण, नाम, धाम यांचे प्रेमाने वर्णन करणे, प्रार्थना व स्तुती करणे, नामसंकीर्तन करणे इ. लक्ष्मणाच्या ठिकाणी ही सर्व लक्षणे आहेत हे आधीच टीकेत दाखविले आहे. त्रिविध भजनाचे विस्तृत वर्णन पुढे १२८।४-१३१ मध्ये आहेच. आता निर्गुणनिराकार ब्रह्म = राम = परमार्थ हे सांगतील.

***हिं. । राम ब्रह्म परमारथ रूपा । अविगत अलख अनादि अनूपा ॥७॥***
***। सकल बिकार रहित गत भेदा । कहि नित नेति निरूपहिं बेदा ॥८॥***

***म. । ब्रह्म राम परमार्थरूप ही । व्यक्त न, अनुपम नादि अलक्ष्यहि ॥७॥***
***। भेदातीत नित्य अविकारी । नेति नेति जें वेद पुकारी ॥८॥***

**अर्थ** - राम हेच परमार्थरूप ब्रह्म होत; ते अव्यक्त (अविगत) अनुपम आदिरहित (अनादि = न + आदि - नादि), अलक्ष्य, भेदरहित (भेदातीत) विकाररहित व नित्य असून वेद त्यांचे नेति नेति (न इति) असे वर्णन करतात.।।७-८।।

**टीका.** (१) परम परमार्थ म्हणजे रामभक्ति हे मागील चौपायांत सांगितल्यानंतर येथे विशिष्ट विशेषणे देऊन राम = ब्रह्म = परमार्थ असे सांगण्यात हेतु आहे. रामभक्ति म्हणजे परमपरमार्थ हे सांगण्याने रामस्वरूपाचे तात्त्विक ज्ञान होणार नाही व राम = मनुष्य, एक राजपुत्र ही भावना नष्ट होणार नाही हे जाणून रामस्वरूपाचे वर्णन करीत आहेत. येथे हे दाखविले आहे की राम (रघुनाथ) सुखदुःख, जन्ममरणजराव्याधि, वृद्धि, क्षय, कर्म, अकर्म, विकर्म इत्यादी सर्व-विरहित आहेत. त्यांना कर्म नाही म्हणून कर्मफळ, सुखदुःखात्मक भोग, त्यांना नाही. ज्ञानविज्ञान, बंधमोक्ष इ. जे काही पूर्वी वर्णन केले ते जीवांच्या विषयी आहे. राम जीव नसून ब्रह्म आहेत. म्हणून ते या सर्वापलीकडे आहेत. त्यांना कोण सुख देणार व दुःख देणार? येथे निर्गुणनिराकार ब्रह्माचे निरूपण केले आहे. येथील सर्व विशेषणे पूर्वी १।५०, १।११६।२, ८, १।१८६ इत्यादी अनेक ठिकाणी आलेली आहेत. तेथे टीकेत विस्तार पहावा.

(२) **व्यक्त न = अव्यक्त.** इंद्रियांना अगोचर. **अलक्ष्य** (अलख) मनानेसुद्धा जे जाणता येत नाही. - **नादि** = अनादि, ज्याला आदि अंत मध्ये नाही. **अनुपम** = उपमारहित. **भेदातीत** = ज्याच्या ठिकाणी सजातीय, विजातीय व स्वगत भेद नाहीत ते. माया व मायाजनित कोणताच विकार नाही. ते कसे आहे हे वेदांनासुद्धा सांगता येत नाही म्हणून इति (**नेति**) न इति - असे नाही, असे नाही, असे निषेध रूपानेच त्याचे वर्णन वेद करतात. असे जे ब्रह्म तेच रामाचे तात्त्विक रूप आहे. राम हे परम तत्त्व आहेत. यावर पूर्वी सतीला आल्या तशा शंका निषादास येऊ नयेत म्हणून सांगतात.

***हिं.दो.*** *। भगत भूमि भुसुर सुरभि सुरहित लागि कृपाल ॥*
*। करत चरित धरि मनुज तनु सुनत मिटहिं जगजाल ॥१३॥*

*म.दो. । भक्त भूमि भूसुर सुरभि सुरहित राम कृपाल ॥*
*। नरतनुधर करिती चरित श्रवण नुरवि जगजाल ॥१३॥*

**टीका.** - भक्त, भूमि, ब्राह्मण, गाई व देव यांच्या हितासाठी कृपालु राम मनुष्य शरीर धारण करून लीलाचरित्र करतात व त्यांच्या श्रवणाने जगरूपी जाळे उरत नाही.॥१३॥

**टीका.** - निर्गुण निराकार ब्रह्म, राम, सगुण साकार का होतात हे प्रत्येक काण्डात सांगितले आहे. येथे भक्तांचा उल्लेख प्रथम करून सुचविले की प्रभु मुख्यतः भक्तांच्यासाठीच अवतार घेतात. **'संत समान तुम्हां प्रिय मातें । प्रार्थुनि इतरिं न धरुं देहातें'** (५।४८।८) असे प्रभूंनी बिभीषणास सांगितले आहे. **प्रस्तावनेत 'अवतारहेतु कथन' प्र. १।३ पहावे.** त्यांत सर्व महत्त्वाची अवतरणे दिली आहेत. भक्तहित, संतहित करणे हा अवतार घेण्यात मुख्य हेतु असतो. बाकीची सर्व कारणे गौण आहेत. (क) **करिती चरित, श्रवण नुरवि जगजाल** - स्वायंभू मनु राजाला, भगवान अवतार घेण्यापूर्वी म्हणाले - **'तात धरुनि देहा अंशासह । करिन चरित भक्तांस सुखावह ॥ जें सुभाग्य नर सादर ऐकुनि । तरतिल भव ममता मद टाकुनि ॥** (१।१५२।२-३) **'तें यश गाति भक्त भव तरती । भक्तहिता तनु कृपाब्धि धरती'** (१।१२२।१) श्रीमद्‌भागवतात असेच उल्लेख आहेत. भाग १०।८७।१६; १०।३३।३७ पहा. जगरूपी जाळे त्या भक्ताच्या बाबतीत उरत नाही. म्हणजेच तो भवसागर तरतो; जन्ममरणपरंपरेतून सुटतो. दो. ८७ व १।२३ पहा. आता पुढील चौपाईत या उपदेशाचा उपसंहार करतात :

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय १ वा समाप्त***



## अध्याय १० वा

*हिं.* ***। सखा समुझि अस परिहरि मोहू । सिय रघुबीर चरन रत होहू ॥१॥***
*म.* ***। सखे मोह अस समजुनि सोडा । रति रघुवीर-सिता-पदिं जोडा ॥१॥***

**अर्थ :** मित्रा ! असे समजून मोह सोडा. आणि सीतारघुवीरचरणी प्रेमभक्ति मिळवा.॥१॥

**टीका. (१) अस समजुनि** - असे समजून, जाणून. राम मनुष्य नसून सच्चिदानंदकंद सर्वविकाररहित भगवान परमात्मा आहेत. त्यांस कर्मबंधन नसून ते सर्व सुखदुःखातीत आहेत. भक्तांच्या उद्धाराचे सुलभ, संसृतिसागरसेतु सारखे, साधन निर्माण करण्यासाठी नरावतार घेऊन स्वेच्छेनेच चरित्रलीला नरनाट्य-करीत आहेत हे नीट ध्यानात घ्या. राम मनुष्य आहेत इत्यादी मानणे व कोणास दोष देणे हा मोह आहे तो सोडा. **(क) मोह सोडा** - सुचविले की योग्य प्रयत्न केल्यास मोह सोडता येतो. निषादराज रघुनाथाला सम्राटपुत्रच समजून प्रेम करीत होता. त्यामुळे त्याला भारी विषाद झाला. अर्जुनाचे आरंभी असेच होते. निषाद जो प्रेमवश झाला तो राम परमात्मा आहे हे जाणून झाला नव्हता. **(ख)** पूर्वी जो मोहनाश सांगितला तो जगत्सत्यवादी भ्रमांविषयी सांगितला. परंतु तो मोह गेल्यावरसुद्धा श्रीरामकृष्णादी अवतारांनाही स्वप्नभ्रम समजणे हा मोह शिल्लक राहू शकतो किंवा उत्पन्न होऊ शकतो. राम म्हणजे केवळ अष्टधाप्रकृति जनित दशरथनंदनच समजणे व सीता केवळ मिथिलेश कुमारी समजणे हा मोह असेपर्यंत पूर्ण सुखसमाधान व भक्ति मिळणे शक्य नाही. तोपर्यंत रामप्रेम असले तरी दुःख शोकादि विकारांची शिकार बनावे लागणारच. भरद्वाज व सती मोह आणि गरुड व काकभुशुंडी मोह ही दोन दोन उदाहरणे उपक्रम व उपसंहार यांत दिलेली आहेतच. असा मोह दशरथांच्या ठिकाणी राहिला म्हणून त्यांस मेल्यावरसुद्धा स्वर्गात राहूनही दुःख शोकांनी सोडले नाही व हा मोह रावणवधानंतर रघुवीराने आपल्या कृपावलोकनाने दूर करताच ते पूर्ण सुखी व परमभक्तिमान झाले. (६।११२।१ पासून पुढे पहा.) 'निर्गुण रूप सुलभ अति सगुण न जाणे कोणि । सुगम अगम चरितां श्रवुनि जाती मुनिहि भुलोनि'

(७।७३) असला रामरूपाविषयींचा मोह लक्ष्मणाला कधी झाला नाही.

श्रीलक्ष्मणगीता टीका येथे समाप्त झाली. आता राम उठतील :

*हिं.* ***। कहत राम गुन भा भिनुसारा । जागे जगमंगल सुखदारा ॥२॥***
***। सकल सौच करि राम नहावा । सुचि सुजान बट छीर मगावा ॥३॥***
***। अनुज सहित सिर जटा बनाए । देखि सुमंत्र नयन जल छाए ॥४॥***

*म.* ***। होय पहाट राम-गुण गातां । जागे जगमंगल सुख - दाता ॥२॥***
***। शौचां स्नाना राम आटपति । शुचि सुजाण वटदुग्ध मागवति ॥३॥***
***। अनुजा सहित जटा शिरिं वळल्या । सचिवनेत्रिं जलधारा गळल्या ॥४॥***

**अर्थ** - लक्ष्मण रामगुणगान करीत असताच पहाट झाली आणि जगाचे मंगल करणारे व जगाला सुख देणारे (राम) जागे झाले.॥२॥ सर्व शौच व स्नानादि करून शुचि व सुजाण रामचंद्रांनी वडाचा चीक (वटक्षीर = वट छीर - वट दुग्ध) मागविला.॥३॥ नंतर (त्या चिकाने) अनुजाच्या सहित आपल्या केसांच्या जटा वळल्या (तयार केल्या). (हे पाहून) सचिवाच्या-सुमंत्राच्या नेत्रांतून जलधारा गळू लागल्या.॥४॥

**टीका. चौ. २ (१) होय पहाट** - (भिनुसार, भिनसार = पहाट) राम पाहटेस उठत असतच. 'उषःकालि रघुनायक उठती' (१।२०५।७), (१।२२६, ३५८।५ पहा). **(क) रामगुण गातां** - निषादाला उपदेश केल्यावर लक्ष्मण रामगुणवर्णन करीत राहिले. येथे सुचविले की लक्ष्मण रात्री पाहऱ्यावर जागत असता रामगुणचिंतनादि करीत असत. **रात्री जागरण करणारांनी व पाहरेकऱ्यांनी हरिगुणनाम यशगान करीत जागावे हे येथे सुचविले. (ख) सुखदारा** - या शब्दाच्या अर्थाविषयी टीकाकारांत मतभेद आहेत. यमकासाठी दातार शब्दातील ताचा लोप केला असे मानणे योग्य आहे. सुख आहे दारा = पत्नी ज्यांची असा अर्थ होऊ शकेल पण हा अर्थ प्रकरणार्थाशी सुसंगत नाही. दार (दारा) शब्दाची व्युत्पत्ति आज (१।२।५८) रोजी पाहता 'दारयन्ति भातृन् इति दाराः' (अ.व्या.सु.) असा अर्थ सापडला. सुखं दारयति इति सुखदारः असा अर्थ घेता येईल व सुमंत्राच्या सुखाचे दारण - विदारण होतच आहे ! पण हा अर्थ क्लिष्ट आहे. वाच्यार्थ सरळ घेण्यासारखा असता तर हा गूढार्थ ग्रहण करता आला असता. राम का

जागे झाले हे येथे सांगावयाचे आहे. जगाचे मंगल-कल्याण करण्यासाठी व जगाला सुख देण्यासाठी जागे झाले. 'रामजन्म जगमंगल-हेतू' (२५४।४) ज्या हेतूसाठी अवतार (जन्म) घेतला तो हेतु सिद्ध करण्यासाठी जागे झाले. अर्थाचा बखेडा नको म्हणूनच की काय एका पोथीत 'मंगल दातारा' असा पाठभेदच केला आहे !

**चौ. ३ - (१) शौचां करती** - सर्व प्रकारचे शौच केले. 'शौचां करिती स्नाना जाउनि) (१।२२७।९) च्या टीकेत विस्तार पहावा. **(क) स्नान केले** या उल्लेखाने पूर्वापार उल्लेखांनुसार स्नानादिक प्रातः काळचे नित्यकर्म केले असा अर्थ घेणे जरूर आहे. 'शौचां करिती स्नाना जाउनि । मुनिपदिं नमिती स्वकर्म सारुनि' (१।२२७।१) व येथे शौचां स्नाना राम आटपति' यांतील खुणेच्या अगदी समान शब्दांनी स्नानानंतरची क्रिया **'स्वकर्म सारुनि'** येथे अध्याहृत घ्यावयाची आहे. असा अध्याहार मानसांत शब्दांच्या, चरणांच्या किंवा चौपायांच्या पुनरुक्तीने अनेक ठिकाणी सुचवून विस्तार वाचविला आहे. **प्र.प्र. ८।१३ पहा.** **(ख) शुचि** = पवित्र - राम सहज शुचि आहेत पण 'धर्ममार्ग चरित्रेण' दाखविण्यासाठी शौचस्नानादि सर्व केले व पवित्र झाले. असे आणखी उल्लेख, पुष्कळ आहेत. १।३५८ पहा. **'करुनि शौच सब सहज शुचि, पावन सरिता स्नान । नित्यकर्म कृत - सुजाण.'** त्यागी, विरागी, ज्ञानी, विज्ञानी म्हणविणारांनी यथेष्टाचरण न करता शास्त्रमर्यादांचे पालन करून लोकसंग्रहाला मदत करावी हे दाखविले. **(ग) वट दुग्ध** - वडाचा चीक मुनिवेषाची पूर्तता करून सुमंत्राला सूचना देण्यासाठी मागविला. **सुजाण** - सुमंत्र का आले आहेत हे जाणले आहे. पण मी परत येत नाही अशी तोंडाने सांगण्याची पाळी येऊ नये म्हणून कृतीनेच हे सांगण्याचे ठरविले व वडाचा चीक मागविला. येथे सुशील, संकोची, स्वभाव, विनय व व्यवहारदक्षता व करुणा या गोष्टी प्रामुख्याने दिसतात. गुहाने चीक आणल्याचा उल्लेख वा.रा. ५२।६८ मध्ये आहे.

**चौ. ४ - (१) अनुजा सहित जटा वळल्या** - केसांच्या मुळांपासून थोडे थोडे केस (एकेक लहानशी बट) घेऊन वडाचा चीक त्यांना लावून पीळ दिला की एक लहानशी जटा तयार होते. अशा रीतीने डोक्यावरील सर्व केसांच्या जटा

बनविल्या. लक्ष्मणाच्या जटा त्याने वळल्या. अशा रीतीने जटा तयार केल्या म्हणजे केसांत पाणी शिरत नाही, उवा पडत नाहीत व विंचरण्याची आवश्यकता रहात नाही. **ब्रह्मचारी व वानप्रस्थ यांनी केसांना तेल लावणे, विंचरणे इत्यादी केशभूषा करणे निषिद्ध आहे.** अशा जटा बनविणे पवित्र आहे म्हणून ते केले. मुनींच्या जटा अशाच बनविलेल्या असत.

**शंका** - (१) अयोध्येतून निघाल्याला दोन दिवसच झाले असता **जटा तयार करण्याइतके लांब केस कसे वाढले?** ही शंका धनसिंह भदौरिआ, कानपूर जवळील एक सुशिक्षित मानसाभ्यासीने पत्राने विचारली होती. चार वर्षांपूर्वीच विश्वामित्रांबरोबर रामलक्ष्मण गेले असता त्यांना पाहून जनक राजांना शंका आली की हे मुनिकुमार असावेत. यावरून सिद्ध झाले की त्या वेळीच लांब लांब केस होते. भरतसुद्धा लवकरच जटा बनविणार आहेत. यावरून ठरते की सर्वच भावांचे केस लांब लांब वाढलेले होते. क्षौर (हजामत) करीत नसत असेही यावरून ठरले. **(क) सुमंत्रादेखत जटा बनवून** त्याला अति दुःखी करून **काय मिळविले?** एक हेतु वर दाखविला आहे. दुसरा महत्त्वाचा हेतु हा - रघुवीराने पूर्ण मुनिवेष धारण केले व ते मुनिव्रताचे व आहारादिकांचे काटेकोर पालन करू लागले हे भरत जननीला प्रत्यक्ष पुराव्याने कळावे व तिच्या मनातील संशय जाऊन तिला समाधान वाटावे. (वा.रा. ५२।६१-६२ पहावे) वा.रा.लक्ष्मणाच्या जटा रघुनाथाने आपल्या हातांनी बनविल्या आहेत; पण ते तसे म्हणण्यास येथे सबळ पुरावा या अल्पबुद्धीला दिसत नाही. सहित = बरोबर.

(२) **सचिवनेत्रिं जलधारा गळल्या** - रामलक्ष्मणांनी वडाच्या चिकाने जटा वळलेल्या पाहणे हृदयविदारकच ! ज्या केसांना सुवासिक तेले, अत्तरे लागावयाची त्यांना वडाचा चीक ! शिवाय रघुनाथ परत येत नाहीत अशी खात्रीच झाली. ज्यांना सुवर्णसिंहासनावर बसलेले पाहून डोळ्यांचे पारणे फेडावयाचे होते त्यांनाच स्वतः हातांनी जटा वळवताना पाहणे कोणाच्या डोळ्यांत पाणी आणणार नाही? मी आलो कशाला व पाहतो काय? इत्यादी अनेक प्रश्नांनी हृदयांत शोकानल वाढविला.

*हिं. । हृदयँ दाह अति बदन मलीना । कह कर जोरि बचन अति दीना ॥५॥*
*। नाथ कहेउ अस कोसलनाथा । लै रथु जाहु राम कें साथा ॥६॥*
*। बनु देखाइ सुरसरि अन्हवाई । आनेहु फेरि बेगि दोउ भाई ॥७॥*
*। लखनु रामु सिय आनेहु फेरी । संसय सकल सँकोच निबेरी ॥८॥*
*म. । हृदयिं दाह अति उदास वदनें । वदति जुळुनि कर सुदीन वचनें ॥५॥*
*। नाथ ! म्हणाले कोशलनाथ किं । जा रथ घेउनि सह रघुनाथ किं ॥६॥*
*। दाखवूनि वन गंगे स्नपवुनि । उभय बंधुनां आणा परतुनि ॥७॥*
*। लक्ष्मण रामा सीते आणा । हरुनी संशय - संकोचानां ॥८॥*

**अर्थ :** सुमंत्राच्या हृदयांत अति दाह झाला व मुख अति उदास (खिन्न) झाले. (पण) हात जोडून अति दीन वाणीने म्हणाला की - ॥५॥ नाथ ! मला कोसलनाथ म्हणाले की रथ घेऊन रघुनाथाबरोबर जा.॥६॥ वन दाखवून, गंगेचे स्नान घालून दोघा भावांना परत घेऊन या.॥७॥ लक्ष्मण, राम व सीता यांना (त्यांचे) सर्व संशय व संकोच दूर करून परत आणा.॥८॥

**टीका. चौ. ५ (१) हृदयिं दाह अति** - हे मानसिक दुःख, अति उदास वदने हे कायिक दुःख व 'अति दीन वचनें वदति' हे वाचिक दुःख प्रगट झाले. अति दाह, अति उदास व अति दीन म्हणण्यात भाव हा की जमिनीवर, तृणपर्णशय्येवर, उघड्यावर व पांघरुणाशिवाय झोपलेले पाहूनच दाह; उदासीनता व दीनता उत्पन्न झाली होती; पण जटा बनविताना पाहून तिन्ही गोष्टी अति झाल्या. **(क) जुळुनि कर** - या पूर्वी रघुनाथांस राजाची आज्ञा सांगताना सुमंत्राने हात जोडले नव्हते. 'निरखुनि मुख राजाज्ञा सांगुनि' (३९।७) 'मग सुमंत्र नृपवचन सांगुनी । रथिं चढविति रामास विनवुनी' (८३।१) राजाज्ञा सांगण्याचे हे दोनच प्रसंग पूर्वी आहेत. तेथे हात जोडले नाहीत; पण येथे जोडले. हा लक्ष्मणाचा उपदेश श्रवण केल्याचा परिणाम आहे असे ठरते. कारण राम सुमंत्राला पित्यासमान आदर देत आले आहेत, असे असून हात जोडले.

**चौ. ६-७ (१) कोशलनाथ** म्हणण्यात भाव हा की दशरथ राजा जरी नगरात असले तरी रघुनाथाशिवाय अयोध्येत कुशल नांदणे शक्य नाही. स्वतः कोशलनाथच रघुनाथाशिवाय अनाथ व अकुशल आहेत. पुढे सुमंत्र म्हणतोच

की 'कृपा करुनि तें करणें ताता । कीं न अयोध्या होइ अनाथा' (९५।१) (क) राजाचा नुसता निरोप न सांगता राजाज्ञाच सांगण्यात हेतु इतकाच आहे की राजाज्ञा कशी मोडावी या विचाराने परतले तर परततील. रथांत बसण्याचे वेळी राजाज्ञा सांगताच बसले. तसेच परतले तर पहावे या हेतूने राजाज्ञा सांगितली.

(२) **दाखवूनि वन गंगे स्नपवुनि** - भाव हा की वनवासाची आज्ञा राजांनी अशी अगदी सौम्य केली आहे. गंगेच्या पलीकडे सुद्धा जाण्याची आवश्यकता नाही. इतके करण्यास जो काही वेळ लागेल तितकाच वनवास करावयाचा ही राजाज्ञाच आहे. (क) **गंगे स्नपवुनि** - गंगेत स्नान घालून - लहान मुलांना वडील माणसे नदीत नेतात व त्यांना आंघोळ घालतात. मुलांनाच स्वतः स्नान करून देत नाहीत. दशरथराजांना रामलक्ष्मण किती लहान वाटत असतील याची कल्पना यावरून करावी. राजाज्ञेप्रमाणे वन पाहणे झाले. गंगास्नान दोन वेळा झाले आता आज्ञेतील एक भाग राहिला. (ख) **उभय बंधुंना आणा परतुनि** - राजानेच दोन वेळा अशीच आज्ञा दिली असल्याने सचिवाने दोन वेळा तशीच सांगितली. (दो.८१ व ८२।८ पहा) मधल्या सात ओळींतील आज्ञा सांगण्याची अद्याप आवश्यकता नाही. म्हणून ती गुलदस्तात ठेवली आहे.

**चौ. ८ (१) लक्ष्मण रामा सीते आणा** - यांत ८२।८ या चौपाईचाच सारांश असला तरी नीतिनिपुण सचिव असे भासवीत आहे की महाराजांनी अशी आज्ञा वारंवार दिली आहे. (क) **हरुनी संशय संकोचांनां** - अशी आज्ञा राजाने दिलेली नाही असे कोणी म्हणतील पण ते म्हणणे भ्रमच ठरेल. 'यापरिं करा उपायां नाना' (८२।६) अशी आज्ञा आहे. राजाने न सांगितलेले वाटेल ते विविध उपाय योजण्याची आज्ञा या वचनात आहेच. (ख) **संशय** हा की १४ वर्षे वनवास ही आज्ञा पाळावी की वन पाहून गंगास्नान करून परतावे ही पाळावी? असा संशय वाटण्याचे कारण नाही. १४ वर्षे वनवासाची आज्ञा राजांनी आपल्या मुखाने दिली नाही व महाराज मूर्छित असताच आपण निघून आलात. मूर्छेतून जागे होताच ही दुसरी आज्ञा महाराजांनी आपल्या मुखाने वारंवार दिली आहे त्या अर्थी तिचेच महत्त्व जास्त; म्हणून हिचेच पालन करणे योग्य. (ग) **संकोच** - १४ वर्षे वनवासात काढण्याचे मातेला कबूल करून व सर्वांना तसे सांगून

**आलो व** आता ३/४ दिवसांतच नगरांत जावे तरी कसे? असा संकोच **वाटण्याचेही** कारण नाही. परशुरामाने पित्याची आज्ञा मानून मातेला ठार मारतानासुद्धा संकोच बाळगला नाही. आपणास तर इतके कठीण व कठोर कार्य करावयाचे नाही. शिवाय आपण जटा तयार केल्या आहेत त्या आपल्या वनवासाच्या खऱ्या खऱ्या इच्छेची साक्षच आहेत आणि **'सर्व धर्मि पित्राज्ञा श्रेष्ठचि'** (५५।८) असे असल्याने ही स्वमुखाने त्यांनी दिलेली आज्ञा पालन करणेच अधिक योग्य आहे असे कोणीही म्हणतील. आता सुमंत्र उपसंहार करतात.

***हिं.दो.*** *। नृप अस कहेउ गोसाइँ जस कहइ करौं बलि सोइ ॥*
***॥ करि बिनती पायन्ह परेउ दीन्ह बाल जिमि रोइ ॥९४॥***

***म.दो.*** *। हे नृप वदले, स्वामि जे म्हणतिल करीन तेवि ।*
***॥ विनवुनि पायीं पडुनि रडुं लागे बालक जेविं ॥९४॥***

**अर्थ :** राजांनी असे सांगितले आहे, आता (गो.) स्वामी, आपण जसे सांगाल तसेच मी करीन. मी हा देह आपणांवरून ओवाळून टाकतो; अशी विनंति करून तो (सुमंत्र) रघुवराच्या पायाशीं पडून लहान मुलासारखा हुंदके देऊन रडू लागला.।।दो. ९४।।

**टीका. दो.** - 'नाथ ! म्हणाले कोशलनाथ किं' असा उपक्रम करून हे नृप वदले' याने राजाज्ञा निवेदन करण्याचा उपसंहार केला. (क) 'स्वामि जे म्हणतिल' याने सूचित केले की आपले जे मत असेल ते विनासंकोच सांगावे. संकोचाने गप्प राहू नये 'चुप रघुनाथ बसति संकोची' (२।२७०।३) असा रघुनाथाचा संकोचशील स्वभाव आहे हे सुमंत्र जाणतात. (ख) 'विनवुनि पायीं पडुनि रडुं लागे बालक जेविं ।' वरील भाषणात सुमंत्रास आपली स्वतःची भावना प्रकट करण्याची संधी मिळाली नाही, 'स्वामि जे म्हणतिल ते करीन' याचा अर्थ असाही होऊ शकतो की राजाज्ञा ऐकविणे हे माझे कर्तव्य होते ते मी केले आहे ! त्याचा परिणाम काही का होईना त्याच्याशी मला काय करायचे आहे; मी तर आहे फक्त राजाचा सेवक ! अशी भावना होऊ नये म्हणून प्रेम विवश होऊन पायांवर पडून लहान मुलाप्रमाणे हुंदके देऊन रडू लागला आणि आपल्या हृदयातील भावना या प्रकारे व्यक्त केली. भाव हा की मी तर दीन असहाय्य बालकासारखा

आहे. परत येणे न येणे आपल्या इच्छेवर अवलंबून आहे. मी हट्ट तर करू शकत नाही. 'परत घेऊन या.' अशी आज्ञा राजांनी मला दिली आहे. आतापर्यंत सर्व आयुष्यांत मी राजाज्ञेचा अनादर कधीही केला नाही. ती गोष्ट करण्याची म्हणजेच राजाज्ञा भंग करण्याची पाळी माझ्यावर येऊ नये यासाठी जे आवश्यक ते करणे केवळ आपल्या हाती आहे. राजाज्ञेचा भंग झाल्यावर तसेच आपल्या चरणांच्या दर्शनावाचून वंचित झाल्यावर जिवंत राहण्यात काहीच अर्थ नाही. पण माझा काहीच इलाज चालत नाही. तेव्हा मी काय करू? मी तर दीन, असहाय, अगतिक बनलो आहे. प्रेमळ मातेचे हृदय द्रवित व्हावे व तिने आपणांस वश व्हावे म्हणून बालकापाशी केवळ एकच उपाय असतो तो म्हणजे हमसाहमशी रडणे ! जसे 'ब्राह्मणांना बलं क्रोधः शस्त्रं हि क्षत्रियं बलम् । धनं हि वैश्य शूद्राणां बालानां रोदनं बलम् ।' (पा. स्मृति) माता आणि अबोध बालक यांचा जसा संबंध असतो तसाच श्रीराम व त्यांचे अनन्यगतिक बालक सुतसम दास अमानी यांचा संबंध असतो. पण या बळाचा या वेळी काहीही उपयोग होणार नाही हे सुमंत्रानी ही जाणले आहेच आणि म्हणूनच रडू लागले !

**ल.ठे.** येथील सुमंत्राच्या उक्ति आणि कृतिवरून लक्ष्मणाने केलेला दिव्य उपदेश सुमंत्राच्या कानांवर पडून हृदयापर्यंत पोहोचून तेथे कोरला गेला आहे हे स्पष्ट कळून येत आहे. रामस्वरूपाचे रहस्य त्याने जाणले आहे. पुढील चौपाईवरून या गोष्टीस पुष्टि मिळत आहे. आता कृपा करण्याविषयी विनंति करून या कथनाचा, विनंतिचा उपसंहार करीत आहेत.

*हिं.* *तात कृपा करि कीजिअ सोई । जातें अवध अनाथ न होई ॥१॥*
*मंत्रिहि राम उठाइ प्रबोधा । तात धरम मतु तुम्ह सब सोधा ॥२॥*
*सिबि दधीचि हरिचंद नरेसा । सहे धरम हित कोटि कलेसा ॥३॥*
*रंति देव बलि भूप सुजाना । धरमु धरेउ सहि संकट नाना ॥४॥*

*म.* *कृपा करुनि करणें ते ताता । कीं न अयोध्या होइ अनाथा ॥१॥*
*राम सुमंत्रा उठवुनि बोधित । तात धर्ममत तुम्हिं सब शोधित ॥२॥*
*शिबि दधीचि हरिचंद नरेश । धर्मास्तव किति सहती क्लेश ॥३॥*
*रंतिदेव बलि सुज्ञ भूपती । सहुनि कष्ट किति धर्म राखती ॥४॥*

**अर्थ :** हे तात ! जेणे करून अयोध्या अनाथ होणार नाही असेच आपण कृपा करून करा.॥१॥ श्रीरामांनी सुमंत्रास उंठवून त्याची उत्तम प्रकारे समजूत घातली. (ते म्हणाले) हे तात ! तुम्ही सर्व धर्मसिद्धांतांना उत्तम प्रकारे जाणतां.॥२॥ राजा शिबि, महर्षी दधीचि आणि राजा हरिश्चंद्र यांनी धर्मासाठी कोट्यावधि (अनंत) कष्ट सहन केले.॥३॥ सुजाण राजा रंतिदेव आणि दैत्यराज बलि यांनीही अनेक कष्ट सोसून धर्माचे संरक्षण केले.॥४॥

**टीका. - चौ. १ - 'कृपा करुनि करणें... होइ अनाथा'** राम सुमंत्रांना पित्यासमान मानतात तरीही सुमंत्र पायांवर पडून रडत रडत कृपेची याचना करीत आहेत यावरून सिद्ध होते की लक्ष्मण-गीता ऐकून त्यांनी रामावताराचे रहस्य उत्तम प्रकारे जाणले आहे. (क) **'कीं न अयोध्या होइ अनाथा** - दशरथांना 'कोशलनाथ' = अयोध्यानाथ म्हणून आणि ते अयोध्येत हयात असूनही हे वचन म्हणून सुचविले की आपण परत आला नाहीत तर महाराज जिवंत राहणार नाहीत. पण ही भावी घटना श्रीराम तर प्रथमपासूनच जाणत होते. (४६।३, ५७।३ याच्या टीकेत स्पष्ट केले आहे.) म्हणून या युक्तिचा काही उपयोग होणार नाही.

**चौ. २-४** (१) 'तात' या संबोधनाने सिद्ध होत आहे की अजूनही राम सुमंत्रास पित्यासमानच मानीत आहेत. (क) **'धर्मम्त तुम्हि सब शोधित** - भाव हा कीं तुम्ही धर्माचे सिद्धान्त आणि धर्मपालनाचे महत्त्व उत्तम प्रकारे जाणता म्हणून या दृष्टीने मी आपणास काही सांगतो. (ख) शिबि, दधीचि, बली आणि हरिश्चंद्र यांच्या कथा पूर्वीच टीकेत (३०।७ आणि ४८।५ येथे दिल्या गेल्या आहेत.) (ग) **रंति देव राजा** - हे आकाशवृत्तिने म्हणजे अयाचित वृत्तिने राहात असत. संग्रह न करणे आणि अतिथिस विन्मुख न धाडणे या व्रतांचे पालन करीत असत. अन्नवस्त्रादिकासाठी काहीही कामधंदा करीत नसत. एकदा तर लागोपाठ अडतीस दिवस त्यांचे अन्नपाण्यावाचून गेले. ते एकटे नव्हते; त्यांची पत्नी व पुत्रही त्यांच्याबरोबर राहात असत. एकोणचाळीसावे दिवशी अन्नपाणी मिळाले. तिघेही भोजनास सुरुवात करणार तोच एक अतिथि आला. त्यास अन्नपाणी देऊन संतुष्ट केले व उरलेले खाण्यास तिघे आरंभ करणार तोच एक शूद्र अतिथि आला आणखी एक अतिथि कुत्र्यास घेऊन आला. याप्रमाणे

अन्न तर काही शिल्लक राहिलेच नाही पण पाणीही फक्त एका माणसाचीच तहान भागेल एवढेच राहिले होते. पण तेवढ्यात एक चांडाल आला आणि त्याने पाणी मागितले तेव्हा राजाने तेही दिले. राजा सर्वत्र भगवंतास पाहात होता व त्याच भावनेने सर्वांस प्रणाम करीत असे. त्रिदेवांनीच त्याची परीक्षा घेण्यासाठी अतिथींचे रूप धारण केले होते. ते प्रकट झाले आणि राजा, राणी आणि त्यांच्या पुत्राने त्यांच्या समक्षच देहत्याग केला. (भाग ९/२१) रंतिदेव पुरुवंशांतील दुष्यन्तपुत्र भरत याच्या वंशातील एक राजा होता.

(२) शिबि आदि सर्व उदाहरणे सहेतुक आहेत - जसे राजा शिबिसारखे मला आपल्या शरीराचे मांस तोडून तोडून तर कुणाला द्यावयाचे नाही. वनवासात महर्षि दधीचिप्रमाणे आपल्या शरीराचा त्याग करून हाडे तर कुणाला द्यावयाची नाहीत किंवा राजा हरिश्चंद्राप्रमाणे स्त्री आणि पुत्रास विकून मला कुणाचा दासही व्हावयाचे नाही किंवा राजा रंतिदेवाप्रमाणे अन्नपाण्याशिवाय दिवस घालवायचे नाहीत अथवा राजा बलिप्रमाणे ब्राह्मणास सारे राज्य आणि सर्वस्व दान देऊन पातालांतही राहावयाचे नाही. यासारखी कुठलीच आपत्ति वा कष्ट सहन करावयास न लागता विनाश्रम धर्माचे पालन केले जाणार आहे.

हिं. *धरमु न दूसर सत्य समाना । आगम निगम पुरान बखाना ॥५॥*
*मैं सोइ धरमु सुलभ करि पावा । तजें तिहूँ पुर अपजसु छावा ॥६॥*
*संभावित कहुँ अपजस लाहू । मरन कोटिसम दारुन दाहू ॥७॥*
*तुम्ह सन तात बहुत का कहउँ । दिएँ उतरु फिरि पातकु लहउँ ॥८॥*

म. *धर्म न दुसरा जगी सत्यासम । वानिति वेद पुराणें आगम ॥५॥*
*झाला सुलभ धर्म मज तो कीं । त्यजत अयश पसरे त्रयलोकीं ॥६॥*
*संभावितास अपयश लाहो । मरण कोटिसम दारुण वाहो ॥७॥*
*तुम्हां तात बहु काय सांगू बरं । पाप - लाभ देतां प्रत्युत्तर ॥८॥*

**अर्थ** : सत्यासारखा दुसरा धर्म नाही, असे वेदपुराणे व तंत्रादि शास्त्रे वर्णन करतात.॥५॥ तो धर्म मला सुलभ झाला असून (आहे) त्याचा त्याग केल्यास तिन्ही लोकांत अपयश पसरेल की ! ॥६॥ संभाविताला अपयश मिळणे कोटि मरणांसारखे दारुण दाहकारक आहे.॥७॥ तात ! मी तुम्हाला फार काय

सांगावे बरे ! प्रत्युत्तर दिल्याने पाप पदरात पडेल (मला पाप लागेल)॥८॥

**टीका. चौ. ५ (१) धर्म न दुसरा जगिं सत्यासम - 'न सत्येन समो धर्मो न सत्येन समं तपः'** श्रीरामचंद्रांनी जाबालीच्या वचनांस उत्तर देताना (वा.रा. २।१०९) सत्याचे फार सुन्दर वर्णन केले आहे. **'धर्मःसत्यं परं लोके, मूलं सर्वस्यचोच्यते । सत्यमेवेश्वरो लोके सत्ये पद्मा प्रतिष्ठिता ॥ सत्यमूलानि सर्वाणि सत्यान्नास्ति परं पदम् ॥ दत्तमिष्टं हुतं चैव तप्तानिच तपांसिच ॥ वेदाः सत्यप्रतिष्ठानास्तस्मात् सत्यपरो भवेत् ॥१२-१४॥** सत्य हाच श्रेष्ठ धर्म आहे, सत्यच सर्वांचे मूळ आहे. सत्यच ईश्वर आहे. सत्यावरच लक्ष्मी अधिष्ठित आहे. सर्वच गोष्टींचे मूळ सत्य आहे. सत्याहून दुसरे श्रेष्ठ पद नाही. दान, पूजा, होम, तप व वेदसुद्धा सत्यावर प्रतिष्ठित आहेत म्हणून सत्यपरायण व्हावे.

**चौ. ६ - (१) झाला सुलभ धर्म मज तो -** पित्याचे वचन सत्य करणे हा पुत्राचा धर्म आहे व त्याचे पालन करण्यासाठी मी प्रतिज्ञा करून निघालो व त्या प्रतिज्ञेचे पालन करणे सुलभ आहे, म्हणजे सत्यरूपी सर्वश्रेष्ठ धर्म मला सहज लाभला आहे. त्यात कष्ट, आपत्ती काही नाहीत हे शिबि दधीची वगैरे पाच उदाहरणांनी आधी सुचविले आहे. फक्त १४ वर्षे मुनिव्रत वेष, आहार व विशिष्ट उदासीन वृत्तीने राहणे आहे. हे न केल्यास मात्र तिन्ही लोकांत अकीर्ति होईल. कारण पितृवचन न पाळणे हे मोठे पाप आणि स्वतः केलेली प्रतिज्ञा मोडणे हे असत्यरूपी घोर पाप घडेल.

**चौ. ७ - (१) संभावितास अपयश लाहो...दाहो- 'संभावितस्य चाकीर्ति - र्मरणादतिरिच्यते'** (भ.गी. २।३४). यावर ही चौपाई हे भाष्य आहे जणू. संभावित = प्रतिष्ठित, प्रसिद्ध, कीर्तिमान. अप्रसिद्ध मनुष्याची अकीर्ति झाली तरी त्याला विशेष दुःख नाही. काळ्या घोंगडीला काळा डाग कितीही मोठा पडला तरी तो दिसतसुद्धा नाही. पण पांढऱ्या स्वच्छ मलमलीवर एक काळा तुषार उडाला तरी तो चटकन डोळ्यांत भरतो. दधीचि ऋषींनी धर्माचे पालन केल्यामुळे एकदाच मरावे लागले; पण मी सत्यधर्माचा त्याग केला तर जीवनातील प्रत्येक क्षण मरणापेक्षा अधिक दुःख दाहदायक होईल.

**चौ. ८ - (१) तुम्हां तात बहु काय सांगुं** - भाव हा की तुम्ही धर्म रहस्य जाणणारे आहात; म्हणून तुम्हाला जास्त सांगण्याची आवश्यकता नाही व सांगणे उद्धटपणा ठरेल. **(क) पापलाभ देता प्रत्युत्तर** - आपण ज्ञानवृद्ध, वयोवृद्ध असून वडिलांच्या सारखे आहात; व वडिलांची आज्ञा सांगितलीत असे असता त्या आज्ञेप्रमाणे न करता उलट उत्तर देणे हे पाप आहे. आपण म्हणालात की 'म्हणाल ते करीन' पण मी आपणांस कसे काय सांगू? भाव हा की तुम्हीच काय ते ठरवावे. **'गुरु पितृ मातृ स्वामि हित वचनें । मुदित मनें शुभ जाणुनि करणें ॥ उचित किं अनुचित करत विचारा । धर्म नाश, शिरिं पातकभारा'** (१७७।३-४)

*हिं.दो.* ***। पितु पद गहि कहि कोटि नति बिनय करब कर जोरि ॥***
***॥ चिंता कवनिहु बात कै तात करिअ जनि मोरि ॥९५॥***

*म.दो.* ***। पितृपद धरूनी कोटि नति सांगा जोडुनि हात ॥***
***॥ चिंता कसलीही जरा करू नका मम तात ॥९५॥***

**अर्थ :** वडिलांचे पाय (माझ्यातर्फे) धरून माझे कोटि नमस्कार सांगा व हात जोडून सांगा (विनवावे) तात ! माझी कसलीही जरासुद्धा चिंता करू नका.।।दो.९५।।

**टीका. - (१) माझीं कसलीही चिंता करू नये** इतकी विनंती पित्याला करावयाची आहे तर किती वेळा पाय धरणे व किती वेळा नमस्कार (नति) ! याचे कारण संकोची स्वभाव. मी अयोध्येत परत येत नाही हे शब्द तोंडातून काढले नाहीतच ! पण हा जो संदेश पाठविला त्याचा अर्थ तोच आहे. तथापि अत्यंत नम्रपणा, भिडस्तपणा इ. गुण झळकतात. मी येत नाही असे उत्तर दिले असते तर त्यांत उद्धटपणा व उलट उत्तर (प्रत्युत्तर) देणे हे दोष घडले असते.

**(२) वा.रा.स. १०८ मध्ये** - जाबालींनी नास्तिकमत प्रतिपादन करून रघुनाथास समजावण्याचा प्रयत्न केला आहे. त्यावर रघुवीराने निर्भीडपणे चांगल्या सणसणीत शब्दांत जाबालींची हजेरी घेतली आहे तो संपूर्ण सर्ग १०९ वा. मुद्दाम वाचून पहावा. सर्ग १०८ मधील जाबालींच्या नास्तिक मतांचा प्रचार आज बहुतेक लोकांत कसा सहज झालेला आहे हेही पहावे. सर्ग १०९ मधील रामवचनांचा विचार मात्र कोणी करीत नाहीत ! कालाय तस्मै नमः !

हिं. *। तुम्ह पुनि पितु सम अति हित मोरें। बिनती करउँ तात कर जोरें ॥१॥*
*। सब बिधि सोइ करतब्य तुम्हारें। दुख न पाव पितु सोच हमारें ॥२॥*
*। सुनि रघुनाथ सचिव संबादू। भयउ सपरिजन बिकल निषादू ॥३॥*

म. *। तुम्हिं तर पितुसम अति हित मातें। तात विनवितो जुळुनि करांते ॥१॥*
*। तें कर्तव्य सर्वपरिं तुमचें। पित्या होइ शुच-दुःख न अमचें ॥२॥*
*। हा रघुनाथ सचिव संवादू। श्रवुनि सपरिजन विकल निषादू ॥३॥*

**अर्थ :** तुम्ही तर पित्यासारखेच माझे अति हितकर्ते आहात. म्हणून तात! मी हात जोडून विनवितो की.॥१॥ जेणे करून आमच्या पित्यास आमच्या शोकाने दुःख होणार नाही ते करणे हे तुमचे सर्व प्रकारे कर्तव्य आहे.॥२॥ हा रघुनाथ व सचिव यांचा संवाद ऐकून परिजनांसह निषादराज व्याकुळ झाला.॥३॥

**टीका. चौ. १-२ (१) अति हित** = अति हितकर्ते. इतरांचे वडील हितकर्ते असतात. पण माझे वडील अति हितकर्ते आहेत. कारण की त्यांनी मला श्रेष्ठ धर्माचे पालन करण्याची सुसंधी दिली. आपण पित्यासारखेच हितकर्ते आहात व माझे अतिहित आता इतकेच आहे की आमच्या वडिलांस आमच्या शोकामुळे दुःख होऊ न देणे. (क) **सर्वपरिं कर्तव्य** - सर्व प्रकारे कर्तव्य. माझे अति हितकर्ते म्हणून, माझ्यावर पुत्रवत प्रेम करणारे म्हणून, पित्याचे अति प्रिय सचिव म्हणून, प्रजेचे अत्यंत विश्वासपात्र म्हणून, गुरु महाराजांनी आदरणीय म्हणून भरतांनी सन्मान्य म्हणून व अयोध्यावासी म्हणून. (ख) ल.ठे. - **पित्या होइ शुच दुःख न अमचे'** यांत अमचे हे अनेक वचन आहे; व मागल्या चौपाईत माते (मोरे) हे एकवचन आहे. अमचे = 'आमच्या' अर्थ घेतला की आमच्या पित्यास = रामलक्ष्मणांच्या पित्यास असा अर्थ होतो व 'अमचे' चा संबंध 'शुचदुःख'कडे घेतला की रामलक्ष्मण व सीता यांच्या विरहशोकामुळे दुःख असा अर्थ होतो. दोन्ही घ्यावयाचे आहेत. लक्ष्मणाचे चित्त क्षुब्ध होऊन, पित्त खवळून, आता जे काही कटू भाषण करणार आहेत त्याला **'आमचे पित्या' हे शब्द प्रेरक झाले आहेत. कटु वचने कोणाविषयी बोलले असतील व काय बोलले असतील या विषयी अनुमान करण्यास हे दोन शब्द पुरेसे आहेत.** आमचे दुःख हे शब्दसुद्धा कटु भाषणास आधारभूत आहेतच.

(२) **शंका** - पुढे अयोध्येत गेल्यावर सुमंत्राने माता, गुरु, परिजन, पुरजन व भरत यांना रामचंद्रांचा म्हणून जो संदेश सांगितला आहे. (१५१-१५२।६) तो येथे रघुनाथांनी सांगितलेला नाही व पुढेही नाही. मग कसा सांगितला? रामचंद्रांनी येथे सांगितले की तुम्ही माझे अति हितकर्ते आहात, जर सुमंत्राने रामचंद्रांचा म्हणून माता वगैरेंना संदेश सांगितला नसता तर त्या सर्वांना वाटले असते की आम्हाला राम विसरले म्हणून काही संदेश पाठविला नाही. असे होऊ देणे म्हणजे रामहिताची हानि करणे ठरते की नाही? ठरतेच ठरते, म्हणून सुमंत्राने संदेशांचा उल्लेख केला.

**चौ. ३ - (१) सपरिजन बिकल निषादू** - सुमंत्राने रामचरणांवर लोळण घेणे, बालकाप्रमाणे रडू लागणे; अति दीन वाणीने बोलणे आणि रघुनाथाचा निश्चय व त्या बरोबरच सर्वांविषयीचे शुद्ध प्रेम पाहून कोणीही सहृदय माणूस व्याकुळ झाल्याशिवाय राहणे शक्यच नाही. मग निषादराजासारखा रामभक्त, रामावतार रहस्य समजल्यावर, व्याकुळ झाला यात काहीच नवल नाही. (क) **सपरिजन** शब्दाने सांगितले की गुहाचा सर्व परिवार उजाडल्यानंतर रामदर्शनासाठी आला. पुरवासीही आले असणारच. हे सर्वच प्रेमळ आहेत हेही त्यांच्या व्याकुळ होण्याने सिद्ध झाले.

***हिं.*** ***। पुनि कछु लखन कहि कटु बानी ॥ प्रभु बरजे बड अनुचित जानी ॥४॥***
***। सकुचि राम निज सपथ देवाई । लखन सँदेसु कहिअ जनि जाई ॥५॥***

***म.*** ***। वचन कांहिं कटु लक्ष्मण वदती । प्रभु अति अनुचित गणुनि वर्जती ॥४॥***
***। संकोचुनि शपथ निज घालुनि । अनुज निरोप न वदणें जाउनि ॥५॥***

**अर्थ** : (मग) लक्ष्मण काही कटु वचने बोलले; असे बोलणे अति अनुचित आहे असे समजून (गणुनि-जाणुनि) रामचंद्रांनी पुढे बोलण्यास मनाई केली.॥४॥ राम ओशाळे झाले व आपली शपथ घालून (त्यांनी सचिवास सांगितले की) लक्ष्मणाचा निरोप जाऊन (गेल्यावर) सांगू नये (बरं.) ॥५॥

**टीका. - ल.ठे.** - या दोन ओळी व १५२।७-८ या दोन ओळी म्हणजे श्री तुलसींच्या अतुलशा काव्यकला प्रतिभेचा एक सुंदर नमुना आहे. इतिहासाचा अपलाप तर करायचा नाही, जे घडले ते तर सांगावयाचे, परंतु रामजनकाची, रामानुजाने

केलेली निंदा लेखणीने लिहावयाची नाही आणि दशरथांस ऐकून दुःख होईल असे तर लिहावयाचे नाही. या सर्व गोष्टी उत्तम प्रकारे साधल्या आहेत. भक्तिमार्गाच्या दृष्टीने अलौकिक अशी भावना लक्ष्मणाने केलेल्या पितृनिंदेच्या बुडाशी असली तरी लक्ष्मणाच्या भक्तीचा आदर्श मिरविण्याची लायकी कोटी लोकांत एकाचीही असणे अशक्य; पण त्याने केलेल्या पितृनिंदेचे अनुकरण करणारे कलियुगांत शेकडा २०।२५ तरी सहज असणार व हे प्रमाण कालसत्तेने अधिक वाढण्याची शक्यताच जास्त. म्हणून सामान्य नीतीच्या आदर्शाचा विनाश करणारी पितृनिंदा मानसासारख्या परमपवित्र परमोच्च आदर्शभूत ग्रंथांत लिहिणे उचित वाटले नाही.

(२) **पित्या आमचे** या शब्दांनी लक्ष्मणाच्या अनन्य एकनिष्ठ भक्तिभावनेला धक्काच दिला. **'मज गुरु माता पिता न ठावे'** अशी ज्यांची मनकृतिवचने अति दृढ निष्ठा त्यांना दशरथ पिता आहे हे स्वप्नीही माहीत नाही. ज्यांना रामचंद्रच मातापिता इ. सर्वस्व वाटतात व ज्यांच्या जननीने पण हेच सांगितले की **'बाळ तुझी माता वैदेही । पिता राम सर्वस्वी स्नेही'** ते लक्ष्मण दशरथांस पिता म्हणून अक्षरशः मानीत नाहीत. रामरूपी माता पित्यास ज्यांनी अकल्पित, अति भयंकर दुःखात लोटले, ज्यांनी त्यांच्या न्याय्य हक्कांचा अपराध नसता अन्यायाने अपहार केला, त्या दशरथ कैकयी राजाराणीचा मुलाहिजा मातृपितृभक्त पुत्राने न राखला तर त्यात नवल काय? **मातापित्तरांस निष्कारण दुःख देणाराला दंड करण्यासाठी ज्याचे रक्त उसळत नाही तो पुत्र तरी कसला?** या घटकेपर्यंत दाबून ठेवलेल्या क्रोधाने उसळी मारली. यांत परममातृपितृ भक्त लक्ष्मणाचे काय चुकले? **मातापित्यांचा कोणीही केलेला साधा अपमान ज्यास जालीम विषासारखा वाटणार नाही व जो स्वस्थ बसेल तो पुत्र नसून एक समाजकंटक कीटक आहे** असेच म्हटले पाहिजे. (क) **लक्ष्मणाची ही भावना अलौकिक, अपवादरूप आहे.** राम दशरथांस पिता व कैकयीला माता - जननी मानतात. त्यामुळे लक्ष्मण जे काही कटु, कठोर बोलले ते सर्वसाधारण समाजाच्या व रामाच्या दृष्टीने अनुचित ठरते हेही तितकेच खरे आहे. लक्ष्मण कोणाला उद्देशून बोलले हे पूर्व संदर्भाने फार खोल विचाराने जरी क्वचित कोणास निश्चित करता आले, तरी कवींनी येथे किंवा १५२।७-८ मध्येही ते गुप्तच ठेवले आहे. म्हणून हे बोलणे

दशरथाविषयीच होते असे सुद्धा म्हणता येत नाही. ते कैकयीबद्दलही असू शकेल. कैकयीविरुद्ध मानल्यास त्यांची तीव्रता पुष्कळच कमी होते. हे लक्ष्मणाचे भाषण म्हणजे नुसता कोणाविषयी तरी अपवाद नसून कोणाला तरी संदेश, निरोप होता हे पुढील चौपाईतील 'संदेस', 'निरोप' शब्दाने स्पष्ट होते.

**सूचना : वा.रा.** लक्ष्मण या प्रसंगी काही बोलले नाहीत; पण येथे मानसांत काय बोलले असतील हे जाणण्याची ज्यांना अनावर इच्छा असेल त्यांनी वा.रा. २।२१, २३ हे सर्ग पहावेत. अ.रा.सुद्धा नमुना आहेच. जी गोष्ट सांगू नये म्हणून प्रभूंनी शपथ घातली व जिचा उल्लेख कवींनी मोठ्या युक्तीने टाळला. ते टीकेत लिहिण्यास लेखणी धजत नाही, हेच खरे आहे. **(क)** कोणी म्हणतात की येथील रामाज्ञेचा भंग सुमंत्राने पुढे (१५२।७-८) केला आहे. या आक्षेपाचा समाचार तेथील टीकेत घेतलेला दिसेलच.

**चौ. ५ - (१) संकोचुनी - या एका शब्दात सज्जनांचा स्वभाव व व्यवहार यांचे** सुंदर चित्र रेखाटले आहे. लक्ष्मण रामानुज आहेत. धाकट्या भावाने मोठ्या भावाच्या देखत किंवा पश्चात काही अनुचित गोष्ट केली तर मोठ्या भावास किंवा ते करणाराच्या वडील नातेवाईकांस लज्जेने मान खाली घालावी लागते. कारण तो आपलाच कमीपणा आहे असे सज्जनांस वाटते.

(२) **उपदेश** - आपल्या आचरणाने आपल्या नातेवाईकांस वा इष्ट मित्रांस कमीपणा येईल, त्यांस शरमावे लागेल, मान खाली घालावी लागेल असे वर्तन आपण करू नये.

(३) **लक्ष्मणाचा संदेश** - निरोप अयोध्येत गेल्यावर कोणासच सांगू नये असे म्हणण्याचे कारण इतकेच की आधीच अत्यंत दुःखी असलेल्या दशरथांच्या दुःखावर डागण्या दिल्यासारखे होईल. रामबंधु रामासारखा नाही असे लोकांस वाटेल व लोक लक्ष्मणांस नावे ठेवतील. रामलक्ष्मण परत येत नाहीत हे याप्रमाणे निश्चित झाल्यावर राजाज्ञेतील उरलेले कार्य करण्याचा प्रयत्न आता सुमंत्र करतात.

***हिं.*** *। कह सुमंत्र पुनि भूप सँदेसू । सहि न सकिहि सिय बिपिन कलेसू ॥६॥*
*। जेहि बिधि अवध आव फिरि सीया । सोइ रघुबरहि तुम्हहि करनीया ॥७॥*
*। नतरु निपट अवलंब बिहीना । मैं न जिअब जिमि जल बिनु मीना ॥८॥*

*म. । नृप - संदेश सचिव मग सांगति । वनीं क्लेश सीते न साहवति ॥६॥*
*। सीतेनें घरिं परतुन यावें । असें तुम्हीं रघुवरा करावें ॥७॥*
*। न तर पूर्ण अवलंब - विहीना । मज जगवे न जलाविण मीना ॥८॥*

**अर्थ :** सुमंत्र-सचिव मग पुन्हा नृपसंदेश सांगू लागला. सीतेच्याने वनात क्लेश सोसवणार नाहीत.॥६॥ (म्हणून) रघुवरा तुम्ही असा उपाय करणे जरूर आहे की जेणे करून सीता घरी परत येईल.॥७॥ नाही तर पूर्ण निराधार झालेल्या मला, जलविहीन माशासारखेच जगता येणार नाही.॥८॥

**टीका. चौ. ६ - (१) मग नृपसंदेश सांगति** - राजाचा संदेशच असा होता की तो एकदम सांगणे अयोग्य होते. 'धीर बंधु युग जर ना परतति । सत्यसंध रघुराज दृढव्रति' हे जेव्हा निश्चित ठरले तेव्हा मग 'सांगा कर जोडुनि मग विनतिसि । प्रभु धाडा मिथिलेश किशोरिसि' (८२।२) पासून बाकीचा संदेश सांगण्याची हीच योग्य वेळ होती. 'सीता भीत यदा बन बघतां' हे घडले नाही. (क) **'कर जोडुनि विनंती'** सांगितली असती तर पित्याने हात जोडल्याचे ऐकून रघुनाथास दुःख झाले असते हे जाणून 'कर जोडुनि विनतिसि' न सांगता 'नृपसंदेश' सांगितला. 'श्वशुर सासु संदेश धाडति । पुत्रि परत ये क्लेश वनीं अति' असा संदेश सीतेला संबोधून न सांगता सुमंत्राने रघुवरासच सार सांगितले.

**चौ. ७-८ (१) रघुवर** - तुम्हीं रघुकुलश्रेष्ठ (रघुवर) आहात म्हणून रघुवंशाचे ब्रीद कायम राखण्यासाठी तुम्ही न आलात तरी सीता घरी परत न आल्यास रघुवंशाची काय दुर्दशा होईल याचा विचार तुम्ही करावा. सार हे आहे की सीतेला घरी परतण्याची आज्ञा देणे हाच मुख्य उपाय आहे व तो तुमच्या स्वाधीन आहे; तो तुम्ही करावा. (क) **पूर्ण अवलंब विहीन** - रामलक्ष्मण नाहीत म्हणजे मुख्य आधार (अवलंब) नाही. सीताही नाही असे ठरले की पूर्ण निराधारपणा आलाच. ८२।६-७ टीका पहा.

*हिं.दो. । मइकें ससुरें सकल सुख जबहिं जहाँ मनु मान ॥*
*॥ तहँ तब रहिहि सुखेन सिय जब लगि बिपति बिहान ॥९६॥*

*म.दो. । सुख सासरिं माहेरिं सब, जसें जिथें मन मानि ॥*
*॥ सीता राहि सुखेन तशि जोंवर विपत्ति-हानि ॥९६॥*

**अर्थ** : सासरी व माहेरी सर्व प्रकारचे सुख आहे; जिथे सीतेचे मन मानील तेथे तसे (तेवढे दिवस) सीतेने विपत्तिहानि होईपर्यंत सुखाने रहावे.।।दो.९६।।

**टीका.** (१) सीता आली तर जीवाला आधार होईल असे सांगितले (चौ.८) त्यातून असा अर्थ निघतो की १४ वर्षे सीतेने सासरीच राहिले पाहिजे. माहेरी गेली की निराधार होणार असे सीतेला वाटू नये म्हणून या दोह्याची आवश्यकता उत्पन्न झाली. (क) **'माहेरीं कधि कधींहि सासरिं । रुचे तुम्हांला तिथें रहा तरि'** (८२।५) ची टीका पहावी. याचेच येथे रूपांतर आहे. (ख) **जोंवर विपत्तिहानि** - रामवनवास ही विपत्ति आहे; तिचा नाश होईपर्यंतच असे करावे लागेल. राम वनांतून परत आल्यावर मग सासूसासऱ्यांच्या जवळ राहण्याची जरुरी नाही. आता भूपसंदेशाचा उपसंहार करतात.

*हिं.* *। बिनती भूप कीन्ह जेहि भाँती । आरति प्रीति न सो कहि जाती ॥१॥*
*। पितु सँदेसु सुनि कृपानिधाना । सियहि दीन्ह सिख कोटि बिधाना ॥२॥*
*। सासु ससुर गुर प्रिय परिवारु । फिरहु त सब कर मिटै खभारु ॥३॥*
*। सुनि पति बचन कहति बैदेही । सुनहु प्रानपति परम सनेही ॥४॥*

*म.* *। विनति नृपें केली ज्या रीतीं । वदवे ना ती आर्ती प्रीती ॥१॥*
*। श्रवुनि कृपानिधि पितृसंदेशा । सीते करिति बहुत उपदेशा ॥२॥*
*। श्वशुर सासु गुरु नी प्रिय परिजन । कष्ट, जाल तर होति निवारण ॥३॥*
*। वदे श्रवुनि पतिवच वैदेही । पहा प्राणपति परमस्नेही ॥४॥*

**अर्थ** : राजांनी ज्या प्रकारे विनंती केली तो प्रकार व त्या वेळची त्यांची आर्ति (दु:ख, कष्ट, पीडा) व प्रीती सांगता येणे शक्य नाही.।।१।। वडिलांचा संदेश ऐकून कृपानिधि रघुवीरांनी सीतेला बहुत प्रकारे उपदेश केला.।।२।। (व म्हणाले की) जर परत जाल तर सासू, सासरा, गुरु (वडील माणसे) प्रियजन व प्रिय परिवार यांचे कष्ट निवारण होतील.।।३।। पतीचे वचन (भाषण) ऐकून वैदेही म्हणाली की परमस्नेही प्राणपति ! हे पहा की (ऐकावे) ।।४।।

**टीका. चौ. (१) विनति नृपें केली** - पूर्वी नृपसंदेश (आज्ञा) सांगितली. येथे सुचविले की राजांनी नाना प्रकारे विनंतीसुद्धा केली. ती किती कळवळून, व्याकुळ होऊन व किती प्रेमाने केली याचे वर्णन कोणासही करता येणार नाही; कारण

तशी आर्त दशा व तसे प्रेम आहे कोणाचे ! पित्याने पुत्रास विनंती करणे हे विपरीत आहे पण 'आर्त कधी न विचारें वदतों' त्याला काय करणार !

चौ. २ - (१) **सीते करिति बहुत उपदेशा** - उपदेश शब्दाने सुचविले की आज्ञा दिली नाही. सीता परत जाणार नाही हे अयोध्येतील अनुभवावरून रघुनाथास माहीत आहे. पण पितृसंदेशानुसार प्रयत्न करणे पुत्राचे कर्तव्य जाणून पुष्कळ प्रकारे पूर्वीसारखाच उपदेश केला. पुनरुक्ति नको म्हणून येथे त्याचे प्रत्यक्ष वर्णन केले नाही. विशेष काय सांगितले ते पुढील चौपाईत आहे. (क) **कृपानिधि** - सीतेला आज्ञा दिली नाही ही तिच्यावर कृपा केली व उपदेश केला तो वडिलांच्या संदेशाने वगैरे हृदयाला द्रव फुटला म्हणून त्या कळवळ्याने केला.

चौ.३ - (१) **श्वशुर सासु - कष्ट निवारण** - येथे जर तर वापरून जाणे न जाणे सीतेच्या इच्छेवर सोपविले. वनवासातील क्लेश सहन होणार नाहीत म्हणून सर्वांना फार चिंता लागली आहे व अति दुःख होत आहे व विरहशोक सर्वांना असह्य झाला आहे. तुम्ही गेल्याने हे सर्व दुःख व कष्ट सहज निवारण होतील.

चौ.४ - (१) **वैदेही** - हा पहिला चरण कवींची उक्ति आहे. 'वनीं क्लेश सीते न साहवति' या म्हणण्यात काही अर्थ नाही. कारण ती वैदेही आहे. देहसुख-भोग-आसक्ति तिच्या ठिकाणी मुळीच नाही. आणि राम परमस्नेही असल्यामुळे त्यांच्या संगतीत ती वाटेल ते सोसू शकेल. वैदेही शब्दातील आणखी भाव ६१३ च्या टीकेत 'वैदेही' पहा. (क) **प्राणपति** - ६४।७ च्या टीकेत पहा आणि स्नेही ६४।३ च्या टीकेत पाहणे. येथे परम स्नेही म्हणण्यात भाव हा की सासूसासरा वगैरे इतर सर्व स्नेही आहेत पण प्राणपति परमस्नेही आहेत. 'परमस्नेही' चा त्याग करून 'स्नेही' माणसांकडे कोणास कसे जाववेल? 'माता पिता सखा प्रिय बंधू' (६।५।१) पासून 'शरद विमल विधुवदन निरखतां' (६।५।८) पर्यंतच्या आठ चौपायाचे सार येथे 'प्राणपति परमस्नेही' या शब्दांत आहे.

*हिं. । प्रभु करुनामय परम बिबेकी । तनु तजि रहति छाँह किमि छेंकी ॥५॥*
*। प्रभा जाइ कहँ भानु बिहाई । कहँ चंद्रिका चंदु तजि जाई ॥६॥*
*। पतिहि प्रेममय बिनय सुनाई । कहति सचिव सन गिरा सुहाई ॥७॥*
*। तुम्ही पितु ससुर सरिस हितकारी । उतरु देउं फिरि अनुचित भारी ॥८॥*

म. ***। प्रभु करुणामय परम विवेकी । छाया देहा त्यजुनि वसे की? ॥५॥***
***। प्रभा जाइ कुठं भानुस सांडुनि । कुठें चंद्रिका चंद्रा टाकुनि ॥६॥***
***। विनवुनि पतिला प्रेममय असें । सचिवा सुंदर वचन वदतसे ॥७॥***
***। श्वशुर - पित्यांसम तुम्हि हितकारी । प्रत्युत्तरणें अनुचित भारी ॥८॥***

**अर्थ :** आपण प्रभु आहात, करुणामय आहात व परम विवेकी आहात (म्हणून म्हणते की) देहाला सोडून छाया कधीं (दूर-निराळी-छेंकी) राहते का?॥५॥ भानूला सोडून प्रभा कुठे जाणार व चंद्राला सोडून चंद्रिका (चंद्रप्रभा) कुठे जाणार?॥६॥ याप्रमाणे पतीला प्रेममय विनंती करून (सीता) सचिवाला सुंदर शब्दांत सांगते - कीं ॥७॥ तुम्ही सासऱ्यांसारखे व वडिलांसारखे हितकर्ते आहात (म्हणून) उलट उत्तर (प्रत्युत्तर) देणे अनुचित आहे.॥८॥

**टीका. चौ. ५ - (१) छाया देहा त्यजुनि वसे कीं? -** देह = पुरुष, छाया स्त्री (तनु, हिंदीत पुरुष) छाया कधीं देहाचा त्याग करू शकत नाही व देह छायेचा त्याग करू शकत नाही. देह व छाया यांचा जसा स्वाभाविक अविनाभाव संबंध आहे तसाच आपला व माझा आहे. आपण अयोध्येस चलत असलात तर मला चल म्हणून सांगण्याची आवश्यकता नाही आणि आपण जात नसलात तर मी जाणे माझ्या हाती नाही. या दृष्टांतात एक दोष आहे. विषुवदिनी मध्यान्ही छायामुळीच नसते व रात्री अंधारात देह असला तरी छाया नसते. म्हणून पुढील दोन दृष्टांत दिलेले आहेत. **(क) प्रभु करुणामय परम विवेकी -** आपण माझे प्रभु - स्वामी असून करुणामय असल्यामुळे 'जा घरीं' अशी आज्ञा दिली नाहीत व अयोध्येतील सर्वांची करुणा आली म्हणून मला उपदेश करून सूचना दिली तैही योग्यच झाले.

**चौ. ६ - (१) भानु** तापदायक व **चंद्र** आल्हाददायक, तापहारक असतो. भानूच्या उष्णतेने प्रभा संतप्त झाली तरी त्याचा त्याग ती करीत नाही. तिला करता येत नाही. तशीच चंद्रिका चंद्रामुळे शीतल, सुखमय, प्रसन्न बनली तरी चंद्राबरोबरच असावयाची. सार हे की दुःख असो की सुख असो; संपत्ति असो की विपत्ति असो पतीला सोडून जाणे पत्नीचा धर्म नाही. **(क) भानु व प्रभा, चंद्र व चंद्रिका** निसर्गतःच अभिन्न आहेत. त्यांना कोणी अलग करू शकत

नाही. दिसण्यात दोन पण तत्त्वतः एक आहेत. तसेच आपले व माझे आहे. 'गिरा अर्थ, जलवीचि सम म्हणती भिन्न न भिन्न' (१।१८ पहा.)

**चौ. ७-८** (१) **'पतिला प्रेममय'** आणि सचिवाला 'शोभन-सुंदर **बिनंती'** असा भेद करत सुचविले की पतिशिवाय इतर कोणावर प्रेम नाही. सुन्दर = आदरणीय, चित्ताला द्रव फोडणारे. (**क**) 'तुम्हि तर पितृसम अतिहित (कर्ते)' असे राम सचिवांस म्हणाले. सीता म्हणते **'तुम्हीं श्वशुरपित्यांसम हितकारी'** अति हितकारी न म्हणण्याचे कारण हेच की स्त्रीचा अतिहितकर्ता फक्त पति असतो. इतर कोणी नाही. किती सावधगिरी ! 'पापलाभ देतां प्रत्युत्तर' असे राम म्हणाले. सीता म्हणते प्रत्युत्तरणे अनुचित भारी' रघुनाथाने दो. ९५ मध्ये जसे सांगितले तसेच सीता दो. ९८ मध्ये सांगणार आहे. राम-देहाचे अनुकरण, सीता-छायेने अगदी बरोबर केले की नाही हे पाहावे. 'छायेवानुगता सती' अगदी भाषणातसुद्धा हे दिसले. वा.रा. २।३९/१९-३२ आणि ५।२१।१५-१८ अवश्य पहावे.

***हिं.दो.*** *। आरति बस सनमुख भइउँ बिलगु न मानब तात ॥*
*॥ आरजसुत पदकमल बिनु बादि जहाँ लगि नात ॥९७॥*

***म.दो.*** *। झाल्यें सन्मुख आर्तिवश अनुचित गणा न तात ॥*
*॥ आर्यपुत्र-पद-कमलविण नातीं व्यर्थ जगांत ॥९७॥*

**अर्थ :** मी दुःखी, आर्त झाल्याने आपल्या समोर येऊन सांगावे लागत आहे. पण आपण अनुचित मानू नये. आर्य पुत्र पदकमलाशिवाय (मला) जगातील सर्व नाती व्यर्थ आहेत.॥९७॥

**टीका.** (१) **झाल्यें सन्मुख** - आपल्या समोर पडद्याशिवाय येणे व उत्तर देणे या गोष्टी मर्यादाभंग करणाऱ्या आहेत खऱ्या. पण परिस्थितीच अशी बिकट आहे त्याला मी तरी काय करणार ! मला एकटीला घरी येण्यास सांगितले व त्यामुळे मी फार दुःखी-कष्टी झाले आहे. मी आर्त बनले आहे. 'आर्तदोषगुण गणति न साधू । क्षमा ! देत उत्तर, अपराधू, (१७७।८) असे भरतानेही म्हटले आहे. तोच भाव सीतेचा आहे. (**क**) **आर्यपुत्र** - संस्कृत भाषेत पतिविषयी कोणाजवळ किंवा पतीजवळ चारचौघां समक्ष बोलताना 'आर्यपुत्र' शब्दाने पतीचा उल्लेख करण्याची पद्धति होती. (**ख**) नातीं व्यर्थ जगांत - पतिसांन्निध्य असेल

तरच इतर सर्व नात्यांची व स्नेहांची उपयुक्तता आहे. पतिविरहित स्त्रीला जगातील इतर नात्यांचा काही उपयोग नाही. ती तिला निरुपयोगी आहेत. दो. ६४ पासून ६५।८ पर्यंतच्या भागाचे हे सार आहे.

*हिं.* *। पितु बैभव बिलास मैं डीठा । नृप मनि मुकुट मिलित पदपीठा ॥१॥*
*। सुखनिधान अस पितु गृह मोरें । पिय बिहीन मन भाव न भोरें ॥२॥*
*। ससुर चक्कवइ कोसलराऊ । भुवन चारि दस प्रगट प्रभाऊ ॥३॥*
*। आगें होइ जेहि सुरपति लेई । अरध सिंघासन आसनु देई ॥४॥*
*। ससुरु एतादृस अवध निवासू । प्रिय परिवारु मातु सम सासू ॥५॥*
*। बिनु रघुपति पद पदुम परागा । मोहि केउ सपनेहुँ सुखद न लागा ॥६॥*

*म.* *। मज पितृवैभव विलास दिसले । नृपकिरीट पदपीठिं लागले ॥१॥*
*। सुखनिधान मम तातगृह असें । चुकुनि न मनिं पतिहीन रुचतसें ॥२॥*
*। सम्राट श्वशुर हि कोसलराव । भुवनिं चतुर्दश प्रगट प्रभाव ॥३॥*
*। पुढे येउनी सुरपति नेती । आसन सिंहासनार्ध देती ॥४॥*
*। असे श्वशुर कोसला निवासू । प्रिय परिवार मातृसम सासू ॥५॥*
*। विण रघुपति-पद-पद्‌म-परागहि । स्वप्निंहि कुणि मज सुखद गमे नहि ॥६॥*

**अर्थ :** ज्यांच्या पदपीठाला (पाय ठेवण्याचे आसन किंवा खडावा) राजांचे मुकुट स्पर्श करतात अशा पित्याचे ऐश्वर्य व भोगविलास मी अनुभविले (पाहिले आहेत)॥१॥ माझ्या पित्याचे घर असे सुखनिधान असून पतीशिवाय ते मला चुकूनसुद्धा रुचत नाही.॥२॥ सासरे तर कोसलाधीश चक्रवर्ती महाराज असून त्यांचा प्रभाव चतुर्दश (चौदा) भुवनांत प्रगट आहे.॥३॥ सुरपति-इंद्र त्यांना सामोरे येऊन घेऊन जातात व स्वतःचे अर्धसिंहासन आसन देतात (अर्ध्या सिंहासनावर बसवितात.)॥४॥ असे सासरे आहेत. अयोध्या निवासस्थान आहे. सर्व परिवाराला मी प्रिय आहे; आणि आईसारख्या सासवा आहेत.॥५॥ परंतु रघुपति चरणकमलरजावाचून यांतील कोणी (व काहीही) मला स्वप्नात सुद्धा सुखदायक वाटत नाही.॥६॥

**टीका. चौ. १-२** (१) कधी माहेरी व कधी सासरी रहात जावे व विपत्तीची १४ वर्षे सुखात घालवावी. वनदुःखक्लेश सोसवणार नाहीत असा जो श्वशुरसंदेश

सांगितला गेला त्याला उद्देशून या सहा व पुढील दोन चौपाया आहेत. या दोन चौपायांत माहेरच्या वैभव सुखाचे वर्णन असून पुढील तीन चौपायांत सासरच्या ऐश्वर्यादींचे व सुखाचे वर्णन आहे आणि साहव्या चौपाईत निष्कर्ष सांगितला की हे काहीसुद्धा मला एकटीला सुखद वाटत नाही. **(क) पदपीठ** - सिंहासनावर किंवा खुर्चीवर बसल्यावर पाय लोंबकळत राहतात. ते टेकून ठेवण्यासाठी केलेले आसन ते पदपीठ हा अर्थ येथे मुख्य आहे. पदपीठ शब्द मानसांत खडावा या अर्थानेही वापरलेला आहे. 'प्रभुपदपीठ-शासना घेउनि' (३२४।१) यालाच दो. ३२३ मध्ये 'प्रभुपादुका' म्हटले आहे. **(ख) नृपकिरीट पदपीठिं लागले** - सिंहासन उंच असल्यामुळे राजे लोक जनकराजांस वंदन करतात. त्यांच्या पायांवर डोके ठेवतात, तेव्हा त्यांचे रत्नजडित मुकुट पाय ठेवलेल्या पदपीठास लागतात. जनकराजा उपस्थित नसतील तेव्हा पदपीठावर ठेवलेल्या त्यांच्या सुवर्णपादुकांना राजे लोक वंदन करतात. असे ऐश्वर्य जेथे आहे व असा मानसन्मान मिळतो ते माहेर पतीशिवाय चुकूनसुद्धा गोड वाटत नाही हे येथे सांगितले.

**चौ. ३-६** (२) सासरची माणसे नेहमी सुनेवर प्रेम करणारी असतात असे नाही; म्हणून त्याच्या प्रेमाचे वर्णन सासरच्या वर्णनात करावे लागले. पतीविना माहेरी राहणे जसे ओशाळगतीचे व दुःखद तसेच सासरी. सार हे की पतिवाचून कुठे त्रैलोक्यातही सुख नसून दुःखच वाटणार. आता पुढील दोन चौपायांत सांगतील की पति संगतीत सदासर्वत्र सर्व सुख आहे, दुःख नाही. दो. ६६ च्या चौपायांचे सार पुढील दोन चौपायांत आहे.

***हिं.*** *। अगम पंथ बन भूमि पहारा । करि केहरि सर सरित अपारा ॥७॥*
*॥ कोल किरात कुरंग बिहंगा । मोहि सब सुखद प्रानप्रति संगा ॥८॥*

***म.*** *। दुर्गम पथ वन भूमि महीधर । करि केसरि अपार सरिता सर ॥७॥*
*। कोळि किरात कुरंग विहंगहि । मला प्राणपति सह सब सुखदहि ॥८॥*

**अर्थ** : दुर्गम रस्ते, दुर्गम वन, (कठीण) भूमि व दुर्गम पर्वत (महीधर, पहार = पहाड), हत्ती, सिंह, (अपार =) पार जाण्यास फार कठीण अशा नद्या व तलाव ॥७॥ तसेच कोळी, भिल्ल वगैरे (क्रूर, चोर, दुःखद लोक) हरणे व पक्षी इ. सर्व प्राणपति बरोबर असता मला सर्व सुखदायकच वाटतात.॥८॥

**टीका.** - पतिविरहित राहण्यात सप्त स्वर्ग ही नर्कासमान व पतिसह राहण्यात नर्कही सप्त स्वर्गासमान असे व्यतिरेक व अन्वय पद्धतीने सीतेने सांगितले. सर्वच पतिव्रता स्त्रियांची अशी भावना असते. येथे पतिप्रेमाचा व पतिव्रताधर्माचा परमोच्च आदर्श मोठ्या, मधुर, प्रेमळ, सरळ व विनम्र भाषेत पुढे ठेवला आहे. (क) जसा रघुनाथाने दशरथांस निरोप - संदेश धाडला तसा सीता सासूसासऱ्यांस सांगण्यासाठी आता सांगते.

***हिं.दो. । सासु ससुर सन मोरि हुँति बिनय करबि परि पायँ ॥***
***॥ मोर सोचु जनि करिअ कछु मैं बन सुखी सुभायँ ॥९८॥***
***हिं. । प्राननाथ प्रिय देवर साथा । बीर धुरीन धरें धनु भाथा ॥१॥***
***। नहिं मग श्रमु भ्रमु दुख मन मोरें । मोहि लगि सोच करिअ जनि भोरें ॥२॥***
***म.दो. । श्वशुर-सासु-पद धरुनि मम अशी विनति सांगावि ॥***
***॥ चिंता मम न करावि मुळिं मी वनिं सुखी स्वभाविं ॥९८॥***
***म. । प्राणनाथ - संगें प्रिय देवर । वीर धुरीण तूण कार्मुकधर ॥१॥***
***। दुःख न मजला भ्रम न पथश्रम । चिंता चुकुन न करा जरा मम ॥२॥***

**अर्थ** - (माझ्या वतीने) सासू सासऱ्यांचे पाय धरून माझी विनंती सांगावी की माझी मुळीच चिंता करू नये, मी स्वभावताच वनात सुखी आहे.॥दो.९८॥ वीरांत अग्रगण्य व धनुष्य तूणीर धारण करणारे प्रिय प्राणनाथ व भावोजी (दीर-देवर) बरोबर असल्यामुळे - ॥१॥ मला कसलेही दुःख नाही, की चित्तांत भ्रम नाही की प्रवासाचे श्रम नाहीत; म्हणून माझ्याविषयी कधी चुकूनसुद्धा कोणी जराही चिंता करू नये.॥२॥

**टीका. दो. - (१) सूचना** - मुळात सर्वत्र सासुसासरा असा क्रम बहुधा आहे. पण अनुवादात काही ठिकाणी जोडाक्षरामुळे वृत्ताच्या सोईसाठी श्वशुर सासु असा क्रम ठेवावा लागला आहे. (क) रघुनाथाने असा निरोप फक्त पित्यालाच धाडला - दिला. तदनुसार सीतेने फक्त सासूलाच पाठविणे योग्य होते. पण सासऱ्यांचा संदेश मिळाल्याने व ते अधिक शोक, चिंताव्याकुळ असल्यामुळे त्यांस पाठविणे आवश्यक ठरले. जसा रघुनाथाने संदेश दिला तसाच हुबेहुब सीता सासूसासऱ्यांना सांगत आहे. देह व छाया हा संबंध पुन्हा यथार्थ करून

दाखविला. (ख) **सुखी स्वभावि** - भाव हा की सुख मिळविण्यासाठी मला काहीच प्रयत्न करावा लागत नाही. संपूर्ण सुख, जगातील सर्व सुखाचे मूळ, सहजच मजजवळ आहे. राम हेच स्वाभाविक सुख, सुखनिधान आहे.

**चौ. १-२** (१) चिंता करू नये असा संदेश दोह्यांत सांगितला; तरी त्यांस वाटणारच की वनात घोर निशाचर, पशुपक्षी वगैरे खूप आहेत. त्यामुळे चिंता लागणार नाही असे कसे होईल. अशी शंका घेतली जाईल म्हणून पुन्हा सांगते की अक्षय्य भाते व प्रचंड कोदंड धारण करणारे, विश्वविजय यश मिळविणारे, महाधनुर्धर वीराग्रणी पुढे मागे संरक्षण करणार असल्याने मला कसलेही भय नाही. मग चिंतेचे कारण तरी काय?

*हिं. । सुनि सुमंत्रु सिय सीतलि बानी । भयउ बिकल जिमि फनि मनि हानी ॥३॥*
*। नयन सूझ नहिं सुनइ न काना । कहि न सकइ कछु अति अकुलाना ॥४॥*
*। राम प्रबोधु कीन्ह बहु भाँती । तदपि होति नहिं सीतलि छाती ॥५॥*
*। जतन अनेक साथ हित कीन्हे । उचित उतर रघुनंदन दीन्हे ॥६॥*

*म. । श्रवुनि सचिव सिय-शीतल-वाणी । होइ विकल जणुं फणि मणि-हानीं ॥३॥*
*। कान न ऐकति नेत्रिं दिसेना । व्याकुळ अति वाणिस ववे ना ॥४॥*
*। राम बहुविधा प्रबोध करिती । होइ न छाती शीतल तरि ती ॥५॥*
*। नेण्या कृत बहु यत्न बरोबर । रघुनंदन देती उचितोत्तर ॥६॥*

**अर्थ** : मणिहानी झाल्यावर फणी (नाग) जसा व्याकुळ होतो तसाच जणू सचिव सुमंत्र, सीतेची शीतल वाणी ऐकल्याने व्याकुळ झाला.॥३॥ त्याला कानांनी ऐकू येईना. डोळ्यांनी काही दिसेना आणि वाणीला काही बोलता येईना असा अति व्याकुळ झाला.॥४॥ तेव्हा रामचंद्रांनी नाना प्रकारे समजूत घातली तरी ती (सुमंत्राची) छाती शीतल होईना.॥५॥ (रघुपतीस) बरोबर नेण्यासाठी (सचिवाने) पुष्कळ यत्न केले; पण रघुनंदन रामचंद्रांनी उचित उत्तर दिले.॥६॥

**टीका. चौ. ३-४** (१) **श्रवुनि शीतल वाणी** व्याकुळ झाल्याचे उल्लेख - २९।४ **दशरथ कैकयी वचनाने**; ५४।२ **कौसल्या रामवचनाने**; ६४।२ **सीता रामवचनाने**; ७१।८ **लक्ष्मण रामवचनाने** आणि येथे **सुमंत्र सीतावचनाने** ते शीतल असून व्याकुळ झाला. सिय = सीता. (क) **फणि मणिहानीं** - मणि सांडल्यावर भुजंग जसा

व्याकुळ होतो तसा सुमंत्र व्याकुळ झाला. मणिविण फणी आणि जलविण मीन अशा दोन दशा दशरथांच्या सांगितल्या आहेत. सुमंत्राची व दशरथांची समता या उत्प्रेक्षेने दाखविली आणि 'ताता सम अतिहित' कर्ते असे जे राम म्हणाले व **श्वसुरासम हितकर असे सीता म्हणाली** त्याची सार्थकता झालेली दाखविली. परंतु हेही सुचविले की रामसीता विरहाने सुमंत्राला मरणप्राय दुःख झाले तरी दशरथांप्रमाणे रामसीतावियोगाने = विरहाने क्षणभंगुर तनूचा त्याग करणे त्याच्या भाग्यात नाही. तो दीन दुःखी, निस्तेज, उत्साहहीन होऊन जिवंत राहणार !

(२) रामचंद्रांना रघुकुलमणि, रघुवंशमणि म्हटले असले तरी सुमंत्र रामसंवादांत किंवा त्यानंतर येथपर्यंत म्हटलेले नाही. राम येत नाहीत असे नक्की ठरल्यावर सुमंत इतका व्याकुळ झाला नाही जितका सीता येत नाही हे ठरल्याने येथे झाला. म्हणून **मणि = जानकी** असे मानणे उचित आहे. राम परतण्याची आशा दशरथ व सुमंत्र या दोघांनाही फारशी वाटत नव्हती; पण सीता परतेल व दशरथांचे प्राण वाचतील व मातांचे दुःख कमी होईल असे सुमंत्रास वाटत होतं. पण आता पूर्ण निराशा झाली. त्यामुळे अति व्याकुळ झाला. **(क) कान न ऐकति नेत्रिं दिसेना - वाणिस वदवे ना** - डोळे कोण, कान कोण व वाणी कोण हे मानसाधारे पाहू - सुमंत्रास रघुनाथाने पित्यासम मानला आहे. **'आदर देति पित्या सम मानुनि'** (३९।६) या प्रसंगांतही हात जोडले आहेत आणि 'तातासम अतिहित' कर्ते वगैरे म्हटले आहे. 'रामभरत दोन्ही किं ममाक्षी' (३१।६) असे रामपिता म्हणाले आहेत. म्हणून ठरले की राम हे सुमंत्राचे नेत्र; ते वनात जाणार. परत येत नाहीत असे ठरताच डोळे गेल्यासारखे होऊन दिसेना. **लक्ष्मणास कान** मानणे योग्य कारण ते कान जसे नेहमी नेत्रांच्या जवळ असतात तसे लक्ष्मण नेहमी रामसमीप असतात. **वाणी = सीता** हे बालमंगलाचरण श्लोक १ च्या टीकेत साधार, मानसाधारांसह सिद्ध झाले आहे. सीताहि येत नाही असे ठरले त्याबरोबर सुमंत्राची वाणीच जणू वनात निघून गेली; म्हणून बोलतां येईना. **ल.ठे.** अयोध्येत गेल्यावर दशरथांचे दर्शन घेऊन त्यांस सगळे निरोप-संदेश सांगितल्यावर सुमंत्र सचिव एकाएकी बेपत्ता झाल्यासारखेच दिसतात. राम वनांतून परत येईपर्यंत सुमंत्राचे नावसुद्धा कुठे दिसत नाही !

**चौ. ५ - (१) राम बहुविधा प्रबोध करिति** - **'राम सुमंत्रा उठवुनि बोधित** (९५।२) असा प्रबोध एकदा केला; पण त्या वेळी सुमंत्र अति व्याकुळ झाले नव्हते. आता पूर्ण निराशा झाल्यामुळे अति व्याकुळ झाले आहेत. म्हणून बहुविधा प्रबोध करावा लागला. समन्वयाची सावधानता किती बाळगली आहे ! प्रबोध = उपदेश असा अर्थ करणे उचित नाही. कारण रघुनाथ, सुमंत्रास पित्यासारखे मानून वागतात. म्हणून सांत्वन करणे, समजावणे असाच अर्थ घेणे भाग आहे. **(क) बहुविधा प्रबोध** - वडिलांचे गुणवर्णन करून सांगितले असेल की त्यांनी कमावलेल्या चतुर्दशभुवन व्यापक विमल कीर्तीला कलंक न लागेल असे करणे हा माझा मुख्य धर्म आहे. भरत सुशील व समर्थ आहेत ते सर्वांचा प्रेमाने सांभाळ करतील.

आपण धर्मनीतिनिपुण आहात तेव्हा या संकटांत मी कोणाच्या तोंडाकडे पहावे ! माझी व महाराजांची लाज राखण्यासाठी आपण थोडा काळ दुःख सहन करावे. भरतांस शीघ्र बोलावून आणून राज्यावर बसवावे आणि भरतजननीची इच्छा व नृपवचन यांची पूर्ति करावी. सुकृत हानि न होता रघुकुल कीर्ति वाढेल म्हणून मी अंगिकारलेल्या व्रतांत आपण साह्य करावे इ. इ. **(ख) होइ न छाती शीतल** - रघुवीराचे म्हणणे सर्वस्वी योग्य व अभिनंदनीय असले तरी सीताराम वियोगदावानलाने हृदयांत जो भडका उडाला आहे तो कमी कसा होणार ! पुन्हा प्रयत्न करून पहातात आता.

**चौ. ६ - (१) बरोबर नेण्या (साठी) बहु यत्न कृत** - (केले, सुमंत्राने) अयोध्येत परत यावे म्हणून जी कारणे सांगितली आणि शेवटी परत येणे शक्य नसेल तर मला आपल्या बरोबर वनात घेऊन चला वगैरे जे सांगितले त्यांचे वर्णन वा.रा. २।५२।१६-४९ या श्लोकांत आहे. त्याचे सार :

१. आपण तिघांनी वनात राहणे सर्वांनाच अति दुःखद आहे व पापिणी कैकयीच्या तंत्राने वागण्याचा प्रसंग आम्हा सर्वांवर ओढवणार. २. आपल्यावाचून अयोध्या महा स्मशानवत झाली आहे. तेथे मी एकटा परत जाऊ तरी कसा ३. तुम्हाला रथांत बसवून निघालो तेव्हाच सर्व नगरी किती व्याकुळ झाली ते आपण पाहिलेच. मग रिकामा रथ घेऊन गेल्यावर त्या नगरीचे विदारण

केल्यासारखेच होईल. ४. देवी कौसल्येला मी सांगू काय, की रामचंद्रांस मामाच्या घरी पोचवून आलो ! पण असत्य माझ्या तोंडातून कसे बाहेर पडेल? आणि वनांत सोडून आलो हे सत्य पण अति अप्रिय कसे बोलवेल? ५. अशा दशेत मी अयोध्येत जाऊ शकणार नाही म्हणून मला बरोबर घेऊन चला. ६. मी काकुळतीस येऊन याचना करीत असता माझा त्याग केलातच तर मी या रथासुद्धा अग्निप्रवेश करीन. ७. हे घोडेसुद्धा तुमची सेवा करून परम गति प्राप्त करून घेतील. ८. तुमच्या संगतीत राहून मी तुमची सेवा करीन. त्याच्यापुढे मला अयोध्या व देवलोकसुद्धा तुच्छ वाटतात. ९. वनवास समाप्त झाल्यावर मी आपणांस याच रथाने घेऊन जाईन. तोपर्यंत तुमच्याशिवाय मला अयोध्येत प्रवेश करता येणार नाही.

**(क) उचितोत्तर रघुनंदन देती** - याचे वर्णन ६१-६४ या चार श्लोकांत आहे. १. तुम्ही स्वामिनिष्ठ असून माझ्यावर तुमची भक्ति आहे हे मी जाणतो तरी तुम्हांस का पाठवितो ते ऐका. २. तुम्ही गेल्याने माझ्या धाकट्या आईची खात्री होईल की राम वनात गेला. ३. मी वनांत गेल्याचे कळल्याने ती संतुष्ट होईल व राजा मिथ्यावादी आहेत असे तिला वाटणार नाही. ४. मुख्य उद्देश हा आहे की भरताने चालविलेले समृद्ध राज्य धाकट्या मातेला पाहण्यास सापडावे. ५. माझ्या प्रेमासाठी व राजाचे प्रिय करण्यासाठी तुम्ही रिकामा रथ घेऊन राजधानीत जावे.

**(२) वा.रा. सुमंत्र वचनांतील मी रथासुद्धा अग्नि प्रवेश करीन वगैरे मानसांतील सुमंत्र बोलणे शक्य नाही.** बाकीचे सर्व मुद्दे मानसांत ग्राह्य आहेत. **(क) वा.रा. रामचंद्र वचने** सर्वच येथे घेण्यासारखी आहेत व शिवाय **रघुनंदन म्हणाले** असतील की, १. तुम्हाला गंगेपर्यंतच रथ घेऊन जाण्याची राजाज्ञा होती. तिचे पालन करणे शक्यच होते म्हणून ते केले. २. दुसरी आज्ञा आम्हाला चार दिवसांनी परत घेऊन जाण्याविषयी आहे. पण पित्राज्ञाभंग व प्रतिज्ञाभंग करून अयोध्येत जीवमान असणाऱ्या थोड्या लोकांचे १४ वर्षांचे दुःख निवारण करण्यासाठी गेलो तर रघुकुलांतीलच नव्हे तर रविकुळांतील सर्व पूर्वज मला काय म्हणतील? त्यांना किती दुःख होईल? ते सर्व मला कुलकलंक म्हणतील; म्हणून थोड्यांच्या

अल्पकालीन् दुःखाचा विचार न करता पुष्कळांना व दशरथांच्या सर्व पूर्वजांना आनंद होईल असे मी केले तरच मी रघुनन्दन ! आता कवि सांगतात :

*हिं. । मेटि जाइ नहिं राम रजाई । कठिन करम गति कछु न बसाई ॥७॥*
*। राम लखन सिय पद सिरु नाई । फिरेउ बनिक जिमि मूर गवाँई ॥८॥*

*म. । रामाज्ञा कुणि मोडु न शकती । कठिण कर्मगति नसे स्ववश ती ॥७॥*
*। सानुज राम - सिता - पदिं नमुनी । फिरे वणिज इव मूळ गमवुनी ॥८॥*

**अर्थ** - रामाज्ञेचे उल्लंघन कोणी (च) करू शकत नाहीत आणि कर्मगति कठीण आहे व ती कोणाच्याही स्वाधीन नाही. (तिच्यापुढे इलाज चालत नाही.)॥७॥ रामलक्ष्मण व सीता यांच्या पायांना वंदन करून, सुमंत्र मुद्दल (मूळ-मूर) गमावून बसलेल्या व्यापाऱ्याप्रमाणे परत फिरला.॥८॥

**टीका. - चौ. ७ (१) रामाज्ञा कुणि मोडुं न शकती** - रामाची आज्ञाच काय, रामाची इच्छासुद्धा कोणी मोडू शकत नाही. **'राम करूं इच्छिति तें घडतें। कोणि नसे जो करी उलट तें' 'रामेच्छा अनुलंघ्य' प्र.प्र. १३।३ पहा. (क) कठिण कर्मगति नसे स्ववश ती** - भाव हा की रामाला सोडून, प्रत्यक्ष भगवंताची संगति सोडून सुमंत्राला इच्छेविरुद्ध अत्यंत दुःखी-कष्टी होऊन परत जावे लागत आहे. त्या अर्थी त्याचे प्रारब्धच - कर्मगतीच त्याला दुःख भोगावयास लावीत आहे ! **'जैं विधि वाम, न निजवश काहीं'** (८२।७).

**चौ.** ८-(१) राम, लक्ष्मण व सीता यांच्या पायांना सुमंत्राने वंदन केले. याने निःसंदेह सिद्ध होते की लक्ष्मणाने निषाद राजाला केलेला उपदेश सुमंत्राने ऐकला व त्यामुळे सुमंत्राच्या ठिकाणी ऐश्वर्यभाव-रामपरमात्मा आहेत ही भावना-जागृत आहे. दो. ९४ व ९५।१ टी. पहावी. (क) **वणिज इव मूळ गमवुनी - मूळ = मुद्दल.** नफा न होता व्यापाऱ्याला परत जावे लागले तरीसुद्धा, दुःख, लज्जा, वृथा कष्ट केल्याचा पश्चात्ताप व लोकलज्जा यांचा लाभ होतो. पण व्याजही नाही, नफाही नाही आणि उलट सर्व भांडवल - मुद्दलच जर गमावले तर मरणप्राय दुःख होते. लोकांनी केलेला उपहास, स्वजातीत अपमान, दारिद्र्यभीती, धैर्यनाश, निराशा, पश्चात्ताप इत्यादी पदरात घ्यावी लागतात. कोणाला तोंड दाखवू नये असे वाटते. सुमंत्राची अशीच दुर्दशा झाली आहे हे पुढे १४४।३ पासून १४६

पर्यंतच्या भागात स्पष्ट दिसते. **(ख) रामलक्ष्मणसीता हे भांडवल आहे.** तिघांना परत नेणे म्हणजे भांडवल व नेण्यामुळे वाटणारी धन्यता, कृतज्ञता, सुयश, राजा जिवंत राहणे व सर्व सुखी होणे हा दुप्पट फायदा मिळणार होता. सीता परत आली असती तर अर्धे भांडवल व बहुतेक सर्व फायदा पदरात पडला असता. पण आता भांडवलही गेले व फायदा तर नाहीच. सीतेलाच मूळ = मुद्दल-भांडवल मानणे हे म्हणजे राजाज्ञेतील मर्म न कळणे आहे. **'आणुनि दावि राम सिय लक्ष्मण'** हे राजाने संदेश व आज्ञा देताना उच्चारलेले शेवटचे वाक्य आहे. (८२।८) तिघांना घेऊन जाणे हा उत्तम पक्ष आणि सीतेलाच नेणे गौणपक्ष होता. आता सुमंत्र त्या ठिकाणाहून रथ घेऊन जातो.

***हिं.दो.*** *। रथु हाँकेउ हय राम तन हेरि हेरि हिहिनाहिं ॥*
*॥ देखि निषाद बिषादबस धुनहि सीस पछिताहिं ॥९९॥*
***हिं.*** *। जासु बियोग बिकल पसु ऐसें । प्रजा मातु पितु जिइहहिं कैसें ॥१॥*
*। बरबस राम सुमंत्रु पठाए । सुरसरि तीर आपु तब आए ॥२॥*
***म.दो.*** *। रथ हाकी हय हेषती रामा बघुन बघून ॥*
*॥ बघुनि निषाद विषण्ण शिर पिटिती पस्तावून ॥९९॥*
***म.*** *। यद्विरहें पशु विव्हळ ऐसे । प्रजा माय पितृ जगतिल कैसे ॥१॥*
*॥ सचिवा राम जबरिनें धाडति । आपण मग सुरसरि तटिं पावति ॥२॥*

**अर्थ :** (सुमंत्राने) रथ हाकला तेव्हा (रथाचे) घोडे रामाकडे पुनः पुन्हा पाहून खिंकाळू लागले. (हेषणें = खिंकाळणे) हे पाहून (सर्व) निषाद विषण्ण (विषादवश) झाले व पश्चात्तापाने आपले कपाळ बडवून घेऊ लागले.।।दो.९९।। (ते निषाद व कवि म्हणतात) ज्यांच्या विरहाने पशू (सुद्धा) असे व्याकुळ झाले त्यांच्या विरहाने प्रजा, माता व पिता जगतील तरी कसे ! ॥१॥ रामचंद्रांनी सुमंत्र सचिवाला जबरीने (त्यांची मुळीच इच्छा नसता) परत धाडला व आपण देवनदीच्या तीरावर आले.।।२।।

**टीका. दो. - (१) हेषति = खिंकाळतात. (क) बघुन बघून -** एकदां मागे मान वळवून पहावे व खिंकाळावे. पुन्हा हाकले म्हणजे थोडे चालावे कसे तरी; पुन्हा वळून पाहून खिंकाळावे असा क्रम सुरू झाला. घोडे जणू रामास व सुमंत्रास

सांगत आहेत की आम्हाला येथून नेऊ नका. याच घोड्यांच्या विरहव्यथेचे वर्णन १४२।८ व १४२ मध्ये आहे. 'बघुनि दक्षिणे हय खिंकाळति । पंखांविण जणुं विहग विव्हळति ॥८॥ तृण न खाति ना पिती जळ ढाळिति लोचनवारि । पाहुनि रघुविर वाजि सब व्याकुळ निषाद भारि ॥१४२॥ १४३।५-८ सुद्धा पहा. **(ख) निषाद विषण्ण** - हा एकटा गुह नसून तेथे जमलेली सर्व निषाद मंडळी असा अर्थ आहे. धुनहिं (पिटिती) 'पछिताहिं' ही अनेकवचनी रूपे आहेत. या सर्व निषादांचा उल्लेख पूर्वी 'हा रघुनाथ-सचिव संवाद । श्रवुनि सपरिजन विकल निषादू' (९६।३) असा केला आहे. त्या वेळी डोकं, कपाळ बडवून घेण्याइतका विषाद झाला नव्हता.

**चौ. १-२ (१) बा.रा.** प्रमाणे सीता, राम व लक्ष्मण नावेत बसून नाव चालू होईपर्यंत सुमंत्र जवळ गंगाकिनाऱ्यालाच होता. येथे रथ हाकून सुमंत्र निघाल्याचे वर्णन असले तरी सुमंत्र शृंगवेरपुराहून आज, या वेळी गेलेला नाही. आणि त्याने लांबून सीताराम लक्ष्मण नावेत बसल्याचे पाहिले आहे; आणि तो पुढे मूर्च्छित झाला असावा कारण निषाद राजा चौथ्या दिवशी परत येईपर्यंत सुमंत्र शृंगवेरपुराजवळच होता. हे पुढे 'प्रभुस पोचवुनि निषाद फिरला । येतां सचिवासह रथ दिसला' (१४२।५) या उल्लेखाने सिद्ध झाले आहे. अधिक स्पष्ट खुलासा योग्य स्थळी टीकेत दिसेल. **(क) आपण सुरसरि तटिं पावति'** - गंगेच्या पलीकडे जाऊन वनवासास प्रारंभ करण्यासाठी राम सीतालक्ष्मणांसह गंगेच्या किनाऱ्याजवळ आले. यावरून नक्की ठरले की राम वनात जाणार. येथे **रामवनगमन प्रकरण संपूर्ण झाले**. आता पुढे फार रसाळ **'नाविक अनुराग' प्रकरण आहे.**

**वि.ल.ठे.** - अयोध्याकाण्डात आतापर्यंत कपट, कुटिलता, कठोरपणा, मत्सर, दंभ, असत्य इत्यादींनी निर्माण केलेली करुणा रसाची दलदलच ओलांडीत यावे लागले. त्यांतही रामवियोग दावानलाची दाही दिशांनी प्रचंड आग ! भक्तिप्रेमरसाचे जोराचे झरे मधे मधे सारखे येऊन मिळाले असले तरी सर्वत्र शोक, दुःख, विलाप, प्रलापकलाप, व्याकुळता इत्यादींचीच छाया पसरलेली होती; त्यामुळे वाचकांचे मन बरेच खिन्न व शोकविरह संतप्त असेल.

आता हे नाविक - अनुराग प्रकरण मात्र हास्य व प्रेमभक्तिरसांची सुरसरिताच आहे. वाचकांचा खेद, शोक, संताप एका क्षणात या परम पावन प्रवाहात वाहून जातील; व वाचक परमानंदपीयूषांचे घोट घेऊन तृप्त व प्रसन्न होतील. भरतीला कवितावलीतील गोड, गोड, रसाळ पदेही टीकेत आहेत. 'देव भावाचा भुकेला' याचे उत्तम उदाहरण या प्रकरणांत आहे. पण श्रीरघुनाथ स्वभावाचे मर्म संतमुखाने कळून त्यावर मेरुपर्वतासारखा अचल विश्वास बसला असला तरच असा भाव प्रगट व्हावयाचा.

या प्रकरणानंतर शृंगार-भक्तिरस-प्रधान रमणीय प्रकरण १०९।७-१२४ पर्यंत पथवासी लोकांच्या भावना; नंतर रघुवीर-वाल्मीकि संवाद फार सुंदर व भक्तिरसप्रधान तात्त्विक आहे. (१२५-१३२ पर्यंत) आणि नंतर चित्रकूट निवास व चित्रकूट वर्णन १४२ पर्यंत गोड आहे.



## नाविक - अनुराग प्रकरण (१००।३।१०२)

हिं. *। मागी नाव न केवटु आना । कहइ तुम्हार मरमु मैं जाना ॥३*
*। चरन कमल-रज कहुँ सबु कहई । मानुष करनि मूरि कछु अहई ॥४॥*
*। छुअत सिला भइ नारि सुहाई । पाहन तें न काठ कठिनाई ॥५॥*
*। तरनिउ मुनि घरिनी होइ जाई । बाट परइ मोरि नाव उडाई ॥६॥*

म. *। मागति नाव, न नाविक आणित । म्हणे मर्म मज तुमचें माहित ॥३॥*
*। चरण-कमल-रज जन वदताहे । मानुषकरणि कांहिं मुळि आहे ॥४॥*
*। स्पर्शत होइ शिला स्त्री सुंदर । काष्ठ न दगडाहुनि कठिण तर ॥५॥*
*। तरणि हि मुनि - गृहिणी च होय कीं । नाव उडे मग काय सोय कीं ॥६॥*

**अर्थ** : (गंगातीरावर गेल्यावर प्रभूंनी) होडी आणण्यास सांगितली (होडी मागितली); पण तो नावाडी होडी आणीना; तो म्हणाला की मला तुमचे मर्म माहीत आहे.॥३॥ लोक (जन) म्हणतात की तुमच्या चरणकमलांची धूळ म्हणजे मनुष्य बनविणारी काहीतरी जडीबुटी (मुळी) आहे.॥४॥ तिचा स्पर्श झाल्याबरोबर शिलेची सुंदर नारी झाली ! (बरं) लाकूड तर दगडापेक्षा काही जास्त कठीण नाही.॥५॥ माझी होडीसुद्धा मुनि गृहिणी (मुनिस्त्री) च होईल. माझी होडी उडून जाईल नी मग माझ्या पोटापाण्याची सोय काय?॥६॥

**टीका**. केवट = नावाडी - हा केवट निषादराज रामसखा गुह नव्हे : १. कोणी टीकाकार म्हणतात की निषादराज म्हणजेच हा नावाडी. पण असा भ्रम उत्पन्न होण्यास मानसांत जागा नाही. '**उभीं उतरुनी सुरसरि रेतीं । सिताराम गुह अनुज समेतीं ॥ नाविक उतरुनि वंदि पदांला** ॥ (१०२।१-२) होडींतून उतरताना गुह उतरल्यावर मग लक्ष्मण उतरले नंतर नावाडी (केवट) उतरून त्याने वंदन केले आहे. गुह प्रभूच्या बरोबर पुढे वनात गेला आहे; पण नावाड्याला विमलभक्ति वर देऊन तेथेच आधी कृतार्थ केला आहे. नावाडीच प्रभुबरोबर गेला असे म्हटले तर येथे तो म्हणतो की उदरभरणाचे दुसरे साधन नाही व वनवासांतून परत फिरून जाताना जो प्रसाद द्याल तो मी घेईन. आता मला काही नको. या गोष्टी निषादराजाच्या बाबतीत शक्य नाहीत. होडीच्या धंद्याशिवाय मला

उदरभरणाचे दुसरे साधन नाही. होडीच्यामुळेच मी परिवाराचे पोषण करतो असे गुह - निषादांचा राजा, ज्याच्या जवळ बरेच सैन्य आहे, तो कसे म्हणेल? होडीवरच ज्याच्या परिवाराचे पोषण होते व कवितावलीप्रमाणे ज्याचे पुत्र लहान लहान आहेत तो १४ वर्षे रघुवीरांबरोबर जाण्याची भाषा कशी बोलेल? **अ.रा.** प्रभूंनी निषादराजालाच होडी आणण्यास सांगितले आहे व त्यानेच पाय धुतले आहेत हे खरे असले तरी तो आधार येथे घेणे वर दाखविल्याप्रमाणे मानसविरोधी आहे. आनंदरामायणांत नावाड्याची अशीच कथा आहे पण ती येथे शृंगवेरपुरात नसून विश्वामित्राश्रमांतून जनकपुरीत जाताना गंगा ओलांडावी लागते तेथे आहे. टीकेत त्या त्या ठिकाणी स्पष्ट केले आहे की **हा नावाडी - निषादराज गुह नव्हे.**

**चौ. ३ - (१) मर्म मज तुमचें माहित -** निषादराजाने रात्री जे विश्वासू पाहरेकरी ठायी ठायी ठेवले होते त्यात हा नावाडी जवळपासच असला पाहिजे व त्याने रामानुजाने केलेला उपदेश ऐकला असला पाहिजे; म्हणून म्हणाला की तुमचे मर्म मला माहीत आहे. तो उपदेश ऐकल्यावर रामभक्ति कशी प्राप्त करून घ्यावी या विषयी त्याने मनाशी जो विचार ठरविला तोच या संवादांत प्रत्यक्ष दिसत आहे. (क) सुमंत्रासारख्या एकनिष्ठ भक्ताला जबरीने परत पाठवावा लागल्यामुळे भक्त दुःखाने भगवान विषण्ण आहेत असे दिसताच नावाड्याने विचार केला की अशा मनःस्थितीत प्रभु सहज कृपा करणार नाहीत. बालकाप्रमाणे वेडेवाकडे बोलून भगवंतास प्रथम प्रसन्न करावे म्हणजे मग कृपा करतील. ही वेळ बालकाप्रमाणे हट्टी बनण्यास चांगली आहे व **'भक्तिपक्षिं हट शठता नाहीं'** (७।४६।८) आणि **'बोल बोबडे बोलति । मातापिता मुदितमन ऐकति ।'** न रागावता प्रसन्न होतात; म्हणून त्याने हा सरळ, सोपा व सद्य फलदायी मार्ग अवलंबिला. (ख) राम **'बिधिहरिशंभुस नाचविणारे'** असून रघुपतीचे **'मर्म न कळतें त्यांसहि'** (१२७।१-२) असे वाल्मीकी म्हणत असता हा एक नावेचा धंदा करणारा नावाडी म्हणतो की, 'तुमचे मर्म मज माहीत' आहे. याचे कारण येथे प्रथमच दाखविले आहे. **प्रभूचे मर्म कोणीतरी सांगितल्याशिवाय कळत नाही; म्हणून लक्ष्मणमुखाने कळले असे मानणे भाग आहे.**

**चौ. ४-५** (१) अहल्योद्धाराची कथा चार वर्षांपूर्वी घडली असल्याने ती शृंगवेरपुरापर्यंत प्रसिद्धी पावली असल्यास नवल नाही. घडल्यानंतर २/३ दिवसांतच

ती बातमी जनकपुरीत सर्वतोमुखी झाली आहे. गंगेच्या पात्रात खाली-वर होड्यांनी ये-जा चालत असे; (आजही चालते) त्यामुळे नावाड्यांना ही बातमी कळणे अगदीच सोपे होते. (क) नावाड्याला आपला हेतु साधावयाचा असल्याने तो असे म्हणत नाही की चरण रजस्पर्शाने दगडाची स्त्री बनून उद्धरून गेली. तो म्हणतो की या चरणरजात असे काही अद्भुत जडीबुटीचे चूर्ण निर्माण होते; ज्या ज्या दगडाला या चरणांच्या रजाचा स्पर्श होईल तो तो दगड अदृश्य होतो व सुंदर मुनिनारी, मुनिस्त्री त्याचे जागी निर्माण होते व जाते निघून कोणातरी मुनीकडे. कवितावलीत एक सुंदर हास्यरस प्रधान पद आहे. (खाली टिंब दिलेली अक्षरे अगदी ऱ्हस्व वाचावी) = बिंधिके बासि उदासो तपी ब्रतधारी महा, बिनु नारि दुखारे। गौतमतीय तरी तुलसी सों कथा सुनि भे मुनिबृंद सुखारे। व्है है सिला सब चंद्रमुखीं परसें पद मंजुल कंज तिहारे। कीन्हि भली रघुनायकजू ! करुना करि कानन को पगु धारे ॥ (२।२८) **अर्थ :** विंध्य पर्वताच्या हद्दीत राहणारे महाव्रतधारी, उदासी व तपस्वी लोक स्त्री न मिळाल्यामुळे दुःखी होते, चरणरजाच्या स्पर्शाने गौतमनारी तरली ही बातमी त्यांस कळतांच ते सर्व हर्षित झाले की आता वनातून जाताना त्यांच्या चरणकमल स्पर्शाने सर्व पाषाणांच्या चंद्रमुखी (सुंदर) स्त्रिया बनतील (मग आपल्याला स्त्रीविहिन रहावे लागणार नाही) तुलसीदास म्हणतात की, हे ! रघुनायकजी ! आपण वनात आलात ही फार कृपा केलीत !

**चौ. ५-६ (१) काष्ठ तर न दगडाहुनी कठिण** - जेथे पदरजस्पर्शाने दगडाची शिळेची स्त्री झाली, तेथे लाकडाच्या होडीची एखादी मुनिस्त्री अगदी सहज होईल. लाकूड तर दगडापेक्षा फार हलके व होडीतर पाणी खाऊन खाऊन अगदीच हलकी झालेली; तिची मुनिस्त्री झाली तर मोठा बिकट प्रसंगच ओढवणार ! मुनिस्त्री असल्याने तिला जवळ बाळगता येणार नाही. त्यातून माझी बायको आहे व पुष्कळ कच्चीबच्ची आहेत आणि त्यांचं पुरं करतानाच नाकी नऊ येत आहेत ! मी वेदबाह्य वागणार नसल्याने मुनिनारीचा मला काही उपयोग नाही. नावेची स्त्री झाली की नाव नाहीशी होणार व उपजीविकेचे सर्व साधनच नष्ट होणार; यामुळे तुम्हाला नावेतून नेणे फार धोक्याचे व उपाशी मरण्याचे साधनच ठरते. कारण :

*हिं. । एहिं प्रतिपालउँ सबु परिबारु । नहिं जानउँ कछु और कबारु ॥७॥*
*। जौं प्रभु पार अवसि गा चहहू । मोहि पद पदुम पखारन कहहू ॥८॥*
*म. । परिवारा सब हिनें पाळतो । काबाड न मुळि अन्य जाणतो ॥७॥*
*। जाणें असलें प्रभो पार जर । सांगा मज पदपद्म धुण्यातर ॥८॥*

**अर्थ** : माझ्या सर्व परिवाराचे पालनपोषण मी या होडीनेच (होडीच्या आधारावर) करतो व दुसरे काबाडकष्ट (उद्योगधंदे) मला करता येत नाहीत.॥७॥ (म्हणून थोडक्यात सांगतो की) प्रभु ! आपल्याला जर (माझ्या होडीतून) पलीकडे जायचे असेल तर मला आपले पाय धुण्यास सांगा.॥८॥

**टीका. - चौ.** ७ चा अर्थ कवितावलीतील एका पदाने अगदी स्पष्ट होतो. (या पदातील एक सोडून एक अक्षर दीर्घ वाचीत जावे, ते ऱ्हस्व असले तरी दीर्घ वाचावे व पुढले दीर्घ असले तरी अगदी ऱ्हस्व वाचावे.) २।८ : पात भुरी सहरी सकल सुत बारे बारे । केवट की जाति कछु बेद ना पढाइहौं ॥२॥ सबु परिबारु मेरो याहि लागि राजा जू । हौं दीन बित्त हीन कैसें दूसरी गढाइहौं ॥ तूलसीके ईस राम रौंवरेसों साची कहौ । बिना पग धोए नाथ नाव ना चढाइहौं ॥ **अर्थ** - घरात पत्रावळीभर माशांशिवाय दुसरे काही नाही आणि सर्व मुलगे तर लहान लहान आहेत. राजाजी ! माझा सर्व परिवार या होडीवरच जगतो आणि मी आहे दीन वित्तहीन. नवी दुसरी नाव कशी व कुठून तयार करू? म्हणून म्हणतो की पाय धुतल्याशिवाय होडीत बसविणार नाही. याच्या मागल्या (७ **व्या) पदाचा सारांश** - महाराज हा आपल्या पायांचा दोष नाही. पायधुळीचा हा अद्‌भुत प्रभाव आहे. लाकडाची होडी दगडापेक्षा कोमल आणि त्यांत पाणी खाऊन खाऊन फारच कोमल झाली आहे. म्हणून आपले पावन पाय धुऊन मग आपणांस नावेत उचलून ठेवीन. आपली काय आज्ञा असेल ती सांगा.

**पद** - माझ्या होडीतूनच जा असा माझा आग्रह नाही. होडीतून नसेल जायचे व उताराने नदीतून पायी चालत जायचे असेल तर काही हरकत नाही. या घाटापासून थोड्या अंतरावर कंबरभर पाण्यातून पलीकडे जाता येते. मी स्वतः आपल्याला त्या उताराने घेऊन जातो. पण पाय धुऊन नावेत चढव असे तुम्ही सांगत, नसाल तर मी नावेतून नेणार नाही. **मग वाटल्यास आपण मला ठार मारले**

**तरी चालेल.** या शेवटच्या वाक्यातील भाव निराळ्या प्रकारे छंदांत आहेच.

**चौ. ८ चा** अर्थ वरील पद ६ व ७ मध्ये सविस्तर आहेच. दुसरा धंदा करता येत नाही; कारण की कधी शिकलो नाही व आता शिकणे शक्य नाही. नवीन होडी घे म्हणाल तर मी दरिद्री व फुकट कोणाची फुटकी कवडी घ्यायची नाही असा नेम आहे. मुलगा काही धंदा करून सर्वांचे पालन करील म्हणाल तर पुष्कळ मुलगे असून अगदीच लहान लहान आहेत. तुमचे पाय न धुता तुम्हाला होडीत बसवणे म्हणजे बायकोपोरांसहँ उपाशीच मरावे लागेल. तुम्हाला जरूर असली तर अशी स्पष्ट आज्ञा द्या की 'माझे पाय धू आणि आम्हाला पार घेऊन जा.' असे सांगितले तरच होडीने जाता येईल व मी नेईन पलीकडे. पुन्हा बजाऊन सांगतो की -

***हिं.छं.*** *। पद कमल धोइ चढ़ाइ नाव न नाथ उतराई चेहौं ।*
*।। मोहि राम राउरि आन दसरथ सपथ सब साँची कहौं ।।*
*। बरु तीर मारहुँ लखनु पै जब लगि न पायै पखारि हौं ।।*
*।। तब लगि न तुलसीदास - नाथ कृपाल पारु उतारि हौं ।।१।।*

***म.छं.*** *। पद-कमल धुउनी नाविं चढविन नाथ उतराई-विणें ।*
*।। मज राम आपलि आण दशरथ शपथ सत्य चि बोलणें ।।*
*। जरि तीर लक्ष्मण मारिही जों धुइन अपले पाय ना ।*
*।। तोंवरि तुलसी-दास-नाथ कृपालु नेइन पार ना ।।१।।*

**अर्थ :** नाथ ! मी आपले पाय धुऊन (मगच) होडीत नेऊन बसवीन; व होडीचे भाडे (उतराई) मी घेणार नाही. पण राम ! मी आपली आण व दशरथांची शपथ घेऊन सत्यच सांगतो की जोपर्यंत मी आपले पाय धुतले नाहीत तोपर्यंत जरी लक्ष्मणाने मला बाण मारला तरीसुद्धा हे कृपालु तुलसीदास - नाथ ! मी आपल्याला पार घेऊन जाणार नाही.।। (छंद)

**टीका. :** नावाड्याचा भाव हा आहे की, आपली इच्छा नावेतून जाण्याची दिसत नाही. म्हणून तर पाय धुण्याची आज्ञा अजून देत नाही. तुम्हाला पलीकडे नेण्याचे भाडे मला नको आहे. मी (उतराई) घेणार नाही तुमच्याजवळून. (क) **नाविं चढविन** - उचलून नेऊन नावेत ठेवीन; कारण पाय धुतल्यावर धूळ पायाला

लागली की होडीची नारी होणार ! **(ख) उतराई** = उताराचे पैसे न घेण्याचे कारण हेच की मी गंगापार घेऊन जाणारा नावाडी आहे आणि कोणी सुज्ञ म्हणतात की तुम्ही भवसागरपार नेणारे नावाडी आहात. नावाडी नावाड्या जवळून, न्हावी न्हाव्या जवळून, शिंपी शिंप्या जवळून मजुरी, शिलाईचे पैसे घेत नाहीत. पाय धुणार ते मोबदला म्हणून नव्हे; माझ्या नावेचा विनाश होऊ नये म्हणून धुणार ! भवसागर पार नेण्याबद्दल आपण काही मोबदला घेता की नाही हे मला माहीत नाही व कळण्याची जरूर नाही. आम्ही अस्सल जातिवंत नावाडी आपसांत मोबदला घेत नाही. मी आपला विनोदाने सांगत आहे असे आपल्याला वाटत असेल तर (चरण दुसरा) मी तुमची शपथ व तुमच्या (बापाची) दशरथांची शपथ घेऊन सत्य सांगतो की पाय धुतल्याशिवाय मी आपल्या होडीला तुम्हाला पाय नाही लाऊ देणार !

**चरण ३ रा** (१) या शपथा ऐकताच लक्ष्मणाचे डोळे लाल झाले. भुवया चढल्या व नावाड्यास वाटले की लक्ष्मण बाण मारण्याची तयारी करीत आहेत. म्हणून म्हणाला की **'जरि तीर लक्ष्मण मारिही'** भाव हा की मी मेल्यावर बायकापोरांचे त्यांच्या दैवाने काय व्हायचे असेल ते होईल; पण कुडीत प्राण असेपर्यंत ही नाव सुरक्षित ठेऊन कुटुंबाचे पालनपोषण करण्याचे माझे कर्तव्य मी करणार. **(क)** शपथांमध्ये ग्राम्य भाषा टाळण्यासाठी 'बापाची शपथ' असे न म्हणता कवींनी 'दशरथ शपथ' शब्द वापरले. पण भाव वर दिला आहे तोच आहे. दोघांच्या शपथा घेण्यात भाव हा आहे की दशरथ राजा सत्यसंध असल्याने त्यांनी आपल्यासारख्या प्राणप्रिय पुत्राचा त्याग केला व आपण स्वतः सत्यसंध असल्यामुळे राज्याचा व सर्व राज्योपभोगांचा त्याग केलात त्याप्रमाणे मी आपला दोघांचाही दास असल्याने सत्यसंध आहे. जे एकदा बोलली तो बोलली; त्यात बदल होणार नाही. ल.ठे. हा १०० वा (२५×४) दोहा म्हणून येथे छंद घातला व भक्तिरसाचा परिपोष केला. आता छंदानंतर सोरठा हे कोमल वृत्त येणार हे ठरलेलेच आहे. कारण येथे भक्तिरसातील कोमल वात्सल्य भावना व वात्सल्यरसातील हास्य प्रदर्शित करावयाचे आहे.

***हिं.सो.*** *। सुनि केवट के बैन प्रेम लपेटे अटपटे ॥*

*॥ बिहसे करुनाऐन चितइ जानकी लखन तन ॥१००॥*

*म.सो. । नाविक - वच जैं कानिं प्रेमळ वेडें वाकडें ॥*
*॥ विहसति करुणाखाणि बघुनि बंधु जानकिकडे ॥१००॥*

**अर्थ** : नावाड्याचे वेडेवाकडे (पण) प्रेमळ बोलणे जेव्हा ऐकले (कानी पडले) तेव्हा लक्ष्मण व जानकी यांच्याकडे पाहून करुणेची खाण (करुणानिधान) मोठ्याने हसले.।।दो.१००।।

**टीका.** : नावाड्याचे ते अलौकिक प्रेम व बालकासारखी विचित्र भाषा ऐकुन प्रभु फार प्रसन्न झाले, म्हणून त्यांस विशेष हसू आले. त्याचे भाषण ऐकून कोणालाही हसू आले असते. पण लक्ष्मण तर रुष्ट झालेले दिसले आणि जानकी = चिदानंदलहरीच असून तिलाही प्रसन्नता आलेली दिसली नाही. या प्रेमी भक्ताची अलौकिक प्रीति पाहून त्यांनीही हसावे आणि प्रसन्न व्हावे म्हणून त्यांच्याकडे पाहून मोठ्याने खदखदा हसले. त्यांच्याकडे पाहण्याने सुचविले की मला असे भाबडे, प्रेमळ बालकभक्त फार आवडतात. तुम्हाला का आवडू नयेत? असला भक्त मिळणे दुर्लभ, आश्चर्यजनकच असते. (क) भक्ताच्या हृदयातील अलौकिक प्रेम पाहिले की भगवंतास हसू येते किंवा मायेला प्रेरणा वगैरे द्यावयाची असते तेव्हा येते. 'श्रीरामाचे हास्य व परिणाम' प्र.प्र. १३।१४ पहा. 'प्रभुमनिं राहि न चूक कृतीची । स्मरती शतदां स्थिती हृदींची' (१।२९।५). प्रभूंनी त्याच्या वेड्यावाकड्या बोलांकडे न पाहता त्याच्या तनमन वचनांतील प्रेमरस तेवढा पाहिला. (ख) करुणाखाणि - करुणाऐन (करुणायन) शब्दाने सुचविले की प्रभूला त्याची करुणा आली, त्याच्या म्हणण्याप्रमाणे आता करणार.

*हिं. । कृपासिंधु बोले मुसुकाई । सोइ करु जेहिं तव नाव न जाई ॥१॥*
*। बेगि आनु जल पाय पखारु । होत बिलंबु उतारहि पारू ॥२॥*
*। जासु नाम सुमिरत एक बारा । उतरहिं नर भवसिंधु अपारा ॥३॥*
*। सोइ कृपालु केवटहि निहोरा । जेहिं जगु किए तिहुँ पगहु ते थोरा ॥४॥*

*म. । कृपासिंधु वदले स्मित करुनी । तें कर नाव किं जाइ न उडुनी ॥१॥*
*। आण जला धू शीघ्र पदांला । पार ने किं बहु उशीर झाला ॥२॥*
*। एकवार यन्नामा स्मरती । नर अपार भवसागर तरती ॥३॥*
*। विनविति कोळ्या करुणाकर ते । ज्यांच्या त्रिपदां विश्व न पुरतें ॥४॥*

**अर्थ :** कृपासिंधु स्मित करून म्हणाले की तुझी नाव उडून जाणार नाही ते कर की.॥१॥ जल आण व लवकर पाय धू व एकदा आम्हाला (लवकर) पार (पलीकडे) घेऊन जा की; उशीर बराच झाला आहे.॥२॥ ज्यांच्या नावाचे एकदा स्मरण केले असता मनुष्य अपार भवसागर तरून जातात.॥३॥ व ज्यांच्या तीन पावलांना सर्व विश्व अपुरे पडले ते करुणाकर एका कोळ्याला, नावाड्याला प्रार्थना करते झाले ! (त्यांनी प्रार्थना केली).॥४॥

**टीका. चौ. १ - (१) कृपासिंधु** - कृपेचे - करुणेचे - सागर. ज्या भावाने सोरठ्यांत करुणा खाणि शब्द वापरला तोच भाव येथे आहे. कवींना प्रभूच्या कृपालुशीलतेची कृतज्ञतापूर्वक वारंवार स्मृति होऊन आश्चर्य वाटत आहे व सुचविले आहे की अशा विचित्र बोलणारावर सुद्धा प्रभु अपार सागरासारखी कृपा करीत आहेत. **(क) स्मित करुनी** - स्मित करण्यातील मुख्य हेतु गंगेला मोहित करून तिच्या ठिकाणी उत्पन्न झालेला ऐश्वर्य भाव दाबून टाकण्यासाठी मायेला प्रेरणा देणे हा आहे. आपले जन्मस्थान जाणून गंगेने वाट देऊ नये व नावाड्याची इच्छा पूर्ण करता यावी म्हणून मायेला प्रेरणा दिली. रामचंद्रांना आपले स्वामी जाणून सरिता वगैरेंनी वाट दिल्याचे वर्णन अरण्यकाण्डात आहे. **'सरिता वन गिरि घाटहि अवघड । पति जाणुनि देतात वाट धड'** (३।७।४) तसे येथे होऊ नये म्हणून हा उपाय योजला.

(२) **तें कर नाव किं जाइ न उडुनी** - जे केल्याने तुझी नाव (होडी) उडून जाणार नाही ते कर असे सांगितले. यांत पाय धू व पार घेऊन जा असे स्पष्ट सांगितले नाही. नावाड्याने तर रामदशरथ शपथपूर्वक प्रतिज्ञा केली आहे की 'जाणे असले प्रभो पार जर । सांगा पदपद्मांस धुण्या तर' (१००।८) परंतु प्रभूंनी तसे सांगितले नाही. नावाडी सत्यप्रतिज्ञ, निश्चयाचा महामेरु आहे. ज्याला पार जावयाचे असेल त्याने पार घेऊन जाणाराने घातलेल्या अटी, मोठेपणा, ऐश्वर्य, सत्ता इत्यादी सर्व विसरून पालन करून **'शरण ते प्रपन्नोऽस्मित्राहि मां भवसागरात्' असे सद्गुरूंना स्पष्ट सांगितल्याशिवाय भागत नाही.** गुळगुळीत, घरसोडीचे, आपला मोठेपणा न विसरणारे बोलून भागत नाही, हे येथे दाखविले आहे. भगवंतांच्या म्हणण्याचा भाव हा आहे की तुझी नाव नष्ट होऊ नये

म्हणून पाय धू. याचा अर्थ असा होतो की तुझे नुकसान होऊ नये म्हणून मी तुला पाय धुण्याची सवलत देतो; म्हणजेच तुझ्यावर कृपा करतो. नावाड्याला वाटले की माझ्यावर उपकार करण्यासाठी हे असे म्हणाले. ज्याला शरण जावयाचे त्याच्या हितासाठी मी अमुक करतो असे वाटणे ही शरणागति नव्हे. मला पार जाता यावे म्हणून माझ्यावर कृपा करा व मला लवकर पार न्या असे स्पष्ट सांगण्याची इच्छा जोपर्यंत अंतःकरणपूर्वक होत नाही **तोपर्यंत शरणागतीला प्रारंभच होत नाही.** नावाडी म्हणतो की, तुम्हाला पार जाण्याची इच्छा असेल आणि नावेतून जाणे असेल तर तुमच्या सुखासाठी तुम्ही मला सांगा. जरूर कोणाला? तुम्हाला की मला? नाहीतर कंबरभर पाण्यातून वाट आहे तिने मी तुम्हाला घेऊन जातो, असा नावाड्याचा भाव आहे. सीता बरोबर असल्याने नावेतून जाणे भाग आहे म्हणून आता **शरणागताप्रमाणे** प्रार्थना करतात :

**चौ. २ :** यांत अगदी स्पष्ट सांगितले की आम्हाला होडीतूनच जाणे आहे; तेव्हा आमच्यासाठी माझे पाय धू व एकदा लवकर पार ने कसा, किती उशीर झाला हा ! नावाडी मनात म्हणाला असेल की आता कसे वाटेवर आले ! उशीर केलात तुम्ही. आता मी आपल्या इच्छेप्रमाणे पाय धुणार; वेळ लागला तर मी काय करणार ! यावर कवी प्रेमाची महती सांगण्याच्या निमित्ताने म्हणतात :

**चौ. ३-४** (१) एका चौपाईत नामाचे महत्त्व सांगितले. भाव हा की **'नाम घेत सुकतो भवसागर । सुजन बिचार करा मनिं नागर ।'** (१।२५।४) **'पापिहि ज्याचे नामा स्मरती । अति अपार भवसागर तरती'** (४।२९।३) प्रभूंनी मनात आणले असते तर गंगेला शुष्क करून टाकण्यास किती वेळ लागला असता? बाणाने सागर शुष्क केल्याचा उल्लेख पद्मपुराणात आहेच. पण नावाड्याचे हार्दिक अद्भुत प्रेम पाहिल्याने **ऐश्वर्यभावाने त्याच्यावर कृपा करण्यासाठी व माधुर्य भावाने शरणागतीची मर्यादा दाखविण्यासाठी एका नावाड्याला प्रार्थना केली ! (क) ज्यांच्या त्रिपदां विश्व न पुरतें** - हा बलि बंधनाच्या निमित्ताने घेतलेल्या वामनावतारातील उल्लेख आहे. एक पाय एवढा वाढला की त्याने सर्व पृथ्वी व्यापून टाकली. दुसरे पाऊल स्वर्गात टाकले व ते इतके वाढले की ब्रह्म लोकांपर्यंतचे सर्व लोक व्यापले. तिसरे पाऊल ठेवण्यास जागाच उरली नाही.

म्हणून म्हटले की ज्यांना तीन पावलांना विश्व पुरले नाही, त्यांना गंगानदी ओलांडून पलीकडे जाण्यासाठी नावाड्याला प्रार्थना करण्याची जरूरच नव्हती. पण त्याच्या प्रेमाला वश झाल्यामुळे त्याच्यावर अपार कृपा करण्यासाठी विनंती केली. **'भक्ति अवशा वश करी'** (३।२६ छंद) हे वचन यथार्थ करून दाखविले. या काण्डात ऐश्वर्य भाव प्रगट करावयाचा नसल्याने व माधुर्य लीला विशिष्ट हेतूने करीत असल्यामुळे प्रार्थना करणे भाग पडले.

**(ख) उशीर बहु झाला** - प्रातःकर्म उरकल्यावर वडाचा चीक मागविला. मग जटा तयार केल्या. मग सुमंत्राशी संवाद, सीतेचे भाषण इ. झाले. या वेळी एक प्रहर दिवस सहज गेला असेल. उन्हाळ्याचे दिवस, अति सुकुमारी सीता बरोबर आहे; व तिचा पहिलाच पायी प्रवासाचा दिवस असल्यामुळे उन्हाच्या वेळी जास्त चालवणार नाही म्हणून म्हणाले 'उशीर बहु झाला.' गंगेच्या पलीकडे शक्य तितक्या लवकर जाऊन पोचण्यात सुमंत्राचा प्रश्नही कारण आहेच. सुमंत्र अयोध्येकडे गेलेला नसून जवळच मूर्छित पडला आहे हे प्रभूंनी जाणले आहे. प्रभूंनी नावाड्यास केलेली प्रार्थना सुरनदीवर कसा परिणाम करते पहा -

*हिं.* ***। पद नख निरखि देवसरि हरषी । सुनि प्रभुबचन मोहँ मति करषी ॥५॥***
***। केवट राम रजायसु पावा । पानि कठवता भरि लइ आवा ॥६॥***
***। अति आनंद उमगि अनुरागा । चरन सरोज पखारन लागा ॥७॥***
***। बरषि सुमन सुर सकल सिहाहीं । एहि सम पुण्यपुंज कोउ नाहीं ॥८॥***

*म.* ***। पदनख निरखुनि सुरसरि हर्षित । प्रभुवचनें मोहें मति कर्षित ॥५॥***
***। नाविक रामाज्ञेला पाउनि । काष्ठटभर ये पाणी घेउनि ॥६॥***
***। अति मोदें उसळत अनुरागें । प्रक्षाळूं पदसरोज लागे ॥७॥***
***। स्तविती वर्षुनि सुम सुर सगळे । पुण्यपुंज कुणि असा नाढळे ॥८॥***

**अर्थ :** प्रभूच्या पायांच्या नखांना पाहून देवनदी गंगेला हर्ष झाला (होता); पण प्रभु वचनाने तिच्या बुद्धीला मोहाने ओढून घेतली (ग्रासली भगवान नाहीत असा मोह झाला).॥५॥ रामाची आज्ञा मिळताच नावाडी काथवट भरून पाणी घेऊन आला.॥६॥ अति आनंदाने व उसळणाऱ्या अनुरागाने पदकमले प्रक्षाळू लागला.॥७॥ पुष्पवर्षाव करून सगळे देव स्तुती करू लागले की

याच्यासारखा पुण्यराशी कोणी नाही.॥८॥

**टीका. चौ. ५ (१) पदनख निरखुनि सुरसरि हर्षित** - रामप्रभु गंगेजवळ येताच तिनें ओळखले की हे माझे जनक आहेत. प्रभूच्या चरणापासून गंगेची उत्पत्ति झाली आहे. पित्याच्या दर्शनाने हर्ष झाला. प्रभु ज्या दिवशी आले व स्नानासाठी व संध्येसाठी गंगेच्या जवळ गेले त्याच वेळी हे घडले. तेव्हापासून तिला हर्ष = उत्साह वाटत होता की आता पितृसेवेचा लाभ नक्की मिळणार. प्रभु जाण्यास निघतील तेव्हा वाट देण्याचे मनोरथ ती करीत राहिली होती. **(क)** परंतु नावाड्याला केलेली प्रार्थना ऐकताच तिच्या बुद्धीत भ्रम उत्पन्न झाला की हे भगवान नाहीत. आता मार्ग देण्यात काही अर्थ नाही. भगवान असते तर एखाद्या दीन-दुबळ्या पुरुषाप्रमाणे कोळ्याला कशाला विनवणी केली असती. हा मोह प्रभूंनी स्मिताच्या निमित्ताने प्रेरणा दिलेल्या प्रभु मायेनेच उत्पन्न केला. स्मिताने ऐश्वर्यभाव दाबून टाकल्याची उदाहरणे प्रस्तावनेतील लेखात पहावी. १।१९१ छं.३. १।२१६।७-८ टी. पहावी. गंगेच्या पलीकडे गेल्यावर प्रभु आपल्या मायेचे आवरण काढून घेतील तेव्हा गंगा ऐश्वर्य भावाने सीतेची प्रशंसा करील.

**चौ. - (१) रामाज्ञेला पाउनि** - रामाज्ञा दुसऱ्या चौपाईत वर्णिली. मध्ये तीन चौपायांत निराळेच वर्णन करून येथे पाणी आणल्याचा उल्लेख केला. सुचविले की तीन चौपाया उच्चारण्यास जेवढा वेळ लागेल तेवढ्या वेळात नावाडी पाणी घेऊन आला. **(क) काष्ठट = काथवट,** लाकडाचे परातीसारखे पात्र. दोन बाजूस उचलण्यासाठी कान असतात. मराठे वगैरे मंडळी भाकरीचे पीठ भिजविण्यास, मळण्यास हे वापरतात. काथवटात पाणी आणण्यात हेतु इतकाच की, पायाची धूळ, पाय धुताना त्याला लागल्यावर त्याची मुनिनारी होते की नाही हे सहज कळेल. भगवच्चरण हातात सापडावे व चरणामृत पान करण्यास सापडावे म्हणून जो बहाणा एकदा केला तो शेवटपर्यंत निभावीत आहे.

**चौ. ७ - (१) अति मोदें उसळत अनुरागें - - लागे** - पाय हातात धरून प्रक्षालन करू लागताच त्याला अत्यंत आनंद झाला व हृदयांत गुप्त ठेवलेले प्रेम (अनुराग) तर जोराजोराने उसळ्या मारू लागले. भाव हा की वारंवार रोमांच उठू लागले. नेत्रांतून अश्रू वाहू लागले वगैरे सात्त्विक भाव एकापाठीमागून एक वारंवार

प्रगट झाले. 'निरखुनि वर, दंपति अनुरागति । पूत पदा प्रक्षाळूं लागती । 'प्रक्षालती पदपंकजां प्रेमें वपू पुलकावती' (१।३२४ छंद १). जनकराजा व सुनयना अनुरागाने पादप्रक्षालन करू लागताच अंगावर रोमांच उठले. या नावाड्याचे प्रेम तर उसळ्या मारीत आहे ! जनकसुनयनांच्यापेक्षा या नावाड्याचे प्रेम अधिक आहे हे ठरले. जनकसुनयनांचा जावयाचे पाय धुण्याचा हक्कच होता. हा जातीने निषाद, अस्पृश्य, 'लोकिं वेदिं जो नीच सर्वपरिं । छापास्पर्शे स्नान वदति तरि' (१९४।३) असा मानून महादेवादि देवांनासुद्धा दुर्लभ असा परम सुभाग्य योग याला मिळाल्यावर किती आनंद झाला असेल त्याची कल्पना इतरांना येणे शक्य नाही.

(२) **पदसरोज** - जनकाने पाय धुतले तेव्हा तेथे सरोज शब्द प्रगट नाही. 'प्रक्षालती पदपंकजां...' सरोज = सरांत - तलावात जन्मलेले. **हे सरोज कोणत्या सरांत उगवले? 'जे पदसरोज मनोज अरि-उर-सरिं सदैव विराजती । जे स्मरत सकृतहि विमलता मनिं सकल कलिमल भंगती । मकरंद ज्यांचा शंभु शिरिं शुचितावधी सुर वर्णती ।... ते क्षालिती पद भाग्य भाजन जनक, जन जय बोलती'** (१।३२४ छं. १,२) **शंकरांच्या ह्रदयरूपी सरांत उगवलेली ही सरोजे ! वरील अवतरणातील सर्व भाव सरोज शब्दाने येथे सुचविले. (क) प्रक्षाळू लागे** - सावकाशपणे, घाई न करता पाय धुऊ लागला. एक रजःकण चुकूनसुद्धा शिल्लक राहणार नाही अशा रीतीने धुऊ लागला. एखादा कण चुकून राहिला व होडीची नारी झाली तर मग काय करणार ! **(ख)** येथे **पायांना** पूत, पावन = **पवित्र म्हटले नाही.** ३२४।८ मध्ये 'पूत पदां प्रक्षाळूं लागती' आहे. **असे कां?** नावाड्याची बाह्य भावना कायम आहे हे यामुळे दाखविले. तो पद पावन आहेत म्हणून धूत नसून रज राहू नये म्हणून धूत आहे. रज = मळ. तो काढून टाकून पाय निर्मल करण्यासाठी तो धूत आहे. वाचक म्हणतील स्वामींनी काही तरी कल्पनेची भरारी मारली झाले ! पण ही भरारी साधार आहे. **'पादाम्बुजे ते विमलं हि कृत्वा पश्चात्परं तीरमहं नयामि ॥ नो चेत् तरी सद्युवती मलेन स्याच्चे द्विभो विद्धि कुटुम्बहानिः'** (अ.रा. १।६।४) हा अध्यात्म रामायणातील भाव पूत-पावन इ. शब्द गाळून येथे ध्वनित केला.

**चौ. ८ - (१) येथे देवांनी पुष्पवृष्टी** करून त्याच्या भाग्याची निस्वार्थ बुद्धीने प्रशंसा केली. जनकराजांनी पाय धुतले त्या वेळी तेथे जमलेल्या लोकांनी त्यांस

भाग्यभाजन म्हणून त्यांचा जयजयकार केला. पण पादप्रक्षालनाचे वेळी देवांनी पुष्पवृष्टी केली नाही व प्रशंसाही केली नाही. कन्यादान उरकल्यावर पुष्पवृष्टि केली आहे. याच्या सारखा पुण्यपुंज कोणी नाही असे जे म्हणाले तो स्तुतीचा नुसता नमुना आहे. **(क) शंका** - शबरी भिल्लीण अस्पृश्यच; तिने सुद्धा भगवंताचे पाय धुतले आहेत. अत्रि व अगस्ति यांनी पूजा केली आहे. म्हणजे पाय धुतलेच, असे असता याच्या सारखा पुण्यपुंज कोणी नाही असे कसे म्हटले? **समाधान** - शबरीने संत सेवा केली होती व गुरुचा आशीर्वाद होता आणि जीव हिंसा ती करीत नव्हती. भरद्वाजादि मुनि तर विश्वविदित तपस्वीच, त्यांना हा लाभ मिळाला यात विशेष काही नाही. या नावाड्याने भजन, पूजन, संतसेवा, तपस्या इ. काहीच साधन केले नसता व रोज शेकडो जीवांची (मत्स्यांची) हत्या करणारा असता, याला अशा प्रकारे हा परम दुर्लभ लाभ अति सुलभ झाला. त्या अर्थी याने पूर्वजन्मात अपार पुण्यसंग्रह केला असला पाहिजे. हा नावाडी पूर्व जन्मी कोण होता या विषयी ग्रंथाधार या अल्पश्रुत लेखकास नाहीच मिळाला. पण बहुश्रुत हिंदी टीकाकारांनीही दिलेला नाही. **तथापि** मानस गुरु श्री बाबा गंगादासजी एकदा म्हणाले की, 'पूर्वजन्मी हा क्षीरसागरात राहणारा एक बेडूक होता. त्याने श्री शेषशायी नारायणाचे दर्शन अनेक वेळा घेतले होते. पण शेष व लक्ष्मी (लक्ष्मण व सीता) यांनी त्यांस भगवंताच्या चरणांना स्पर्श करू दिला नाही. त्या वेळी त्याची प्रीती पाहून भगवंतानी त्यास वर दिला की रामावतारात गंगेच्या तीरावर तुझी इच्छा मी पूर्ण करीन. **आनंद** रामायणांत ही अद्भुत लीला येथेच गंगेच्या तीरावर घडली आहे. अ.रा. असेच वर्णन आहे; पण ते जनकपुरीच्या मार्गात गंगाकिनाऱ्यालाच आहे यावरून वरील दंतकथा खरी मानण्यास हरकत दिसत नाही. श्रीबाबा गंगादास शब्दपंडित नव्हते किंवा ग्रंथावलोकन फारसे केले होते असे नाही. त्यांना वरील कथा गुरुपरंपरेनेच कळलेली. ल.ठे. प्री. गौडजींच्या यादीतील **चांद्ररामायणाच्या विषयसूचीत 'केवट की पूर्वजन्म कथा' हा एक विषय आहे**. (प्रस्तावनेत पहा).

***हिं.दो.*** ***। पद पखारि जलु पान करि आपु सहित परिवार ॥***

***॥ पितर पारु करि प्रभुहि पुनि मुदित गयउ लेइ पार ॥१०१॥***

म.दो. *। क्षालुनि पद, जल पान करि स्वयें सहित परिवार ॥*
*॥ तारुनि पितरां प्रभुस मग नेई प्रमुदित पार ॥१०१॥*

**अर्थ** : पाय धुऊन ते जल (चरणामृत) परिवारासह स्वतः पिऊन, पितरांना तारून मग मोठ्या आनंदाने प्रभूंना पार (परतीराला) घेऊन गेला.।।दो.१०१।।

**टीका.** - (१) **जलपान करि** - प्रभूंनी त्यास सांगितले की **'जल** आण' त्याने आणले **'पाणी'** व त्या पाण्याने प्रभूचे पाय धुतले तेव्हा त्याच्या दृष्टीने ते **झाले 'जल' म्हणून** त्याने पान केले. जल = पाणी असा अर्थ सर्वसाधारण असला तरी किंचित भेद आहे. प्रभूच्या वचनात गंगाजल हाच अर्थ आहे. पण त्याने गंगाजल न आणता गंगेचे पाणी आणले. 'त्याने प्रयागहून गंगेचे पाणी आणले' असे म्हणतात की 'गंगा' आणली 'गंगाजल' आणले असे म्हणतात? गंगेचे पाणी आणले असे म्हणत नाहीत. कारण पाणी : पानीय = पिण्यास योग्य. जलति, अपवारयति इति जलम्; जल अपवारणे; मल, पाप, तृषा इ. दूर सारणारे ते जल. भाव हा की गंगाकाठी राहणाऱ्या या निषादांना गंगाजलाचे महत्त्व वाटत नाही; कारण 'अतिपरिचयादवज्ञा' 'अति परिचय खोटा मान राहात नाही' ते शौचास सुद्धा तेच वापरतात ! म्हणून त्याने पाणी म्हटले; पण त्या पाण्याने प्रभूंचे पाय धुतल्यावर त्याला ते जल वाटले. ते पवित्र वाटले. हा भावभेद या शब्दभेदाने दाखविला आहे. कवितावलीत सुद्धा हा शब्दभेद केलेला आहे. **(क) सहित परिवार** शब्दांनी सुचविले की त्याचा सर्व परिवार, कुटुंब तेथे हजर होते. या शब्दांनी कवितावलीतील (२।१०) **या** पदाचा संदर्भ सुचविला आहे. त्या पदाचा सारांश देणेच योग्य - नावाड्याने आपल्या बायका पोरांना बोलावून आणली. त्यांनी सर्वांनी प्रभुचरणास वंदन केले व प्रभूच्या सभोवती कडे करून ती सर्व मंडळी बसली. छोटासा काथ्वट भरून त्याने गंगेचे **पाणी** आणले; **'आनि पानि गंगाजूको'** व पाय धुऊन ते पुनीत **बारि** (= जल) तो वारंवार प्यायला; देवांनी पुष्पवृष्टी, जयजयकार केला इ. वारि = निवारण करणारे = जल. जलाला अमृतही म्हणतात. 'पयः कीलालम् अमृतम्' (अमरे) **(ख) तारुनि पितरां** - त्या चरणामृताने पितरांचे तर्पण केले, ते त्यांच्या त्यांच्या नावाने त्यांना दिले. **हे शबरी किंवा कोणी मुनी यांनी केले नाही.** सहकुटुंब सहपरिवार, सह सर्व पितृगण स्वतः आपण या भवसागरांतून तरला व

नंतर प्रभूंना गंगानदीवरून तारून घेऊन गेला ! शुद्ध प्रगाढ प्रेमाचा प्रभाव पाहण्यासारखा आहे ! **'भक्ति अवशा वश करी'** व 'बालकसुत सम दास अमानी' 'राम सदा सेवकरुचि राखिति' यांचे हे श्रेष्ठतम उदाहरण आहे.

*हिं.* *। उतरि ठाढ़ भए सुरसरि रेता । सीय रामु गुह लखन समेता ॥१॥*
*। केवट उतरि दंडवत कीन्हा । प्रभुहि सकुच एहि नहिं कछु दीन्हा ॥२॥*
*। पिय हिय की सिय जाननिहारी । मनि मुदरी मन मुदित उतारी ॥३॥*
*। कहेउ कृपाल लेहि उतराई । केवट चरन गहे अकुलाई ॥४॥*

*म.* *। उभीं उतरुनी सुरसरि रेतीं । सिता राम गुह अनुज समेतीं ॥१॥*
*। नाविक उतरुनि करी दंडवत । दिलें न याला प्रभु संकोचित ॥२॥*
*। सीता पतिमन सुजाणणारी । मणिमुद्रिका काढि मुद भारी ॥३॥*
*। घे उतराई कृपाल वदले । विकल नाविकें चरणां धरले ॥४॥*

**अर्थ :** सीता व राम गुह व लक्ष्मणासमेत (होडीतून) उतरून सुरसरितेच्या रेतीत उभी राहिली.॥१॥ (नंतर) नावाडी (होडीतून) उतरला व त्याने दंडवत नमस्कार केला, (तेव्हा) याला आपण काही दिले नाही असे वाटून प्रभु संकोचित (ओशाळे) झाले.॥२॥ (प्रिय) पतीच्या मनातील भाव उत्तम प्रकारे जाणणाऱ्या सीतेने (आपल्या हातातील) रत्नाची मुद्रिका (अंगठी) मोठ्या आनंदाने काढली ॥३॥ कृपालु (राम) नावाड्याला म्हणाले की उतराई घे; (तेव्हा) नावाडी व्याकुळ झाला व त्याने प्रभूंचे पाय धरले॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) रेतीं -** रेतींत, पुळणीत. सीता, राम, गुह व लक्ष्मण या क्रमाने मंडळी नावेतून रेतीत उतरली. चढताना क्रम कोणता होता तो या प्रकरणात सांगितला नाही. पण नावाड्याने आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे प्रभूंना उचलून नेऊन नावेत बसविले असे मानणे भागच आहे. पुढे सुमंत्राने सांगितले असले की **'प्रिये चढवुनी चढले रघुपति ॥ लक्ष्मण कार्मुकिं बाण लावुनी । चढले प्रभु आदेश पावुनी'** (१५१।३-४) तरी सुमंत्राचे ते वचन अक्षरशः ग्राह्य धरता येत नाही. याचे कारण टीकेत पहावे. ज्या क्रमाने होडीत बसले त्याच क्रमाने उतरले असे मानणे योग्य आहे. होडीवाला एकच असला म्हणजे तो शेवटी चढतो होडीत व उतरतोही शेवटी. गुहाने तेथे प्रभूंना नमस्कार केलेला नाही.

**चौ. २ - (१) नाविक उतरुनि करी दंडवत** - वरील चौपाईत गुह हे निषाद राजाचे नाव स्पष्ट सांगितले असून शिवाय हा नावाडी - केवट निराळा आहे हे या चौपाईवरून निःसंशय ठरले. ज्याने पाय धुतले तोच हा नावाडी आहे. आपले नाव प्रगट केले जाऊ नये अशी त्याची इच्छा असावी म्हणून त्याचे नाव कुठेच नाही. **(क) दिले न याला, प्रभु संकोचित** - त्याने उचलून नेऊन होडीत ठेवले, नदी पलीकडे होडीतून नेले व दंडवत नमस्कार केला. याबद्दल त्याला राजपुत्राच्या योग्यतेनुसार बक्षिस देणे जरूर होते. पण रघुनाथाजवळ देण्यास काहीच द्रव्य नाही यामुळे **प्रभु असून ओशाळले.** मोठ्या लोकांना होडीतून नेताना होडीवाले असेच करतात. साहेबांना उचलून नेऊन होडीतून कोरड्या जागी ठेवतात व मुजरा करतात किंवा हात जोडून नमस्कार करतात. मग साहेब आपल्या मोठेपणाला शोभेल असे बक्षिस त्यांस देतात. तसे रघुनाथांस करता आले नाही म्हणून ओशाळले. ही माधुर्य भावातील लीला आहे. येथे रामचंद्रांच्या कोमल, संकोचशील व उदार हृदयाचा एक नमुना दिसला.

**चौ.३ - (१) सीता पतिमन सुजाणणारी - भारी** - 'पतिकल बघुन पाळ आज्ञा बरं' (१।३३४।५) या मातेच्या शिकवणुकीचे पालन केल्याचे एक अति महत्त्वाचे उदाहरण येथे दिले. मुद्रिका = जिच्यावर कोणाचे तरी नाव कोरलेले असते अशी अंगठी. पतीने न मागता आपल्या हातातील रत्नजडीत सीलाची (राम नामांकित) आंगठी एका नावाड्याला देण्यासाठी हातातून काढणे आणि विशेष आनंदाने काढणे ही गोष्ट सोपी नाही. पतीचा संकोच दूर करण्यासाठी आणि आपल्या पतीला नावाड्याच्या उपकारांतून - ऋणांतून सोडविण्यासाठी पतिव्रता सीतेने हे केले. यांत काही विशेष केले असे मात्र नाही. स्त्रीधन असले तरी त्याचा उपयोग पतीच्या अडचणीच्या वेळी करणे योग्यच आहे. पण हे फार क्वचित घडते. बरोबर वनात आल्याचे थोडेसे सार्थक झाले. अल्पशी पतिसेवा करता आली असे वाटल्यामुळे फार आनंद झाला अंगठी काढताना **ल.ठे. वा.रा.** गुहाला शृंगवेरपुरासच निरोप देऊन परत लावला आहे व ज्या नाविकांनी रामलक्ष्मण सीता यांस होडीतून नेले, त्यांस काही दिल्याचा किंवा **देण्यास तयार झाल्याचा उल्लेख** नाही.

**चौ. ४ - (१) घे उतराई कृपाल वदले... धरले - कृपाल** शब्दाने सुचविले की - त्याच्यावर सहज कृपा करून काहीतरी अलभ्य असे त्यास देणार ! **उतराई** = होडीतून पलीकडे नेण्याचे भाडे - मोबदला (**क**) **ल.ठे.** १०० छंद पासून या चौपाईपर्यंत कृपाल किंवा त्या अर्थाचा शब्द एकंदर **पाच वेळा वापरला आहे.** दीनदयाळ व कृपायतन पुढे या दोह्यापर्यंत आहेत. दुसरी गोष्ट म्हणजे या नावाड्याचे प्रेम पाहिल्यापासून प्रभु त्याला एकवचनानेच संबोधित आले आहेत. 'करु' १०१।१; 'आनु १०१।२, 'लेहि' 'घे' या चौपाईत बालक भक्तांचे अनन्य अलौकिक प्रेम पाहून ज्या ज्या वेळी राम प्रसन्न झाले आहेत त्या त्या वेळीच फक्त असे एकवचनी प्रयोग केले आहेत. **संपूर्ण संवादांत बहुवचनाने मुळीच न संबोधिल्याची आणखी उदाहरणे सुतीक्ष्ण व शबरीच. विस्तार 'श्रीराम आणि एकवचनाचा उपयोग'** प्र.प्र. १३।१२ मध्ये पहावा. गुहाला बहुवचनाने संबोधिले आहे. 'कहेहु' (८८।८) ९५।८, ९६।१,२,५ (**ख**) **बिकल नाविकें चरणां धरले** - उतराई घेणार नाही अशी त्याने प्रतिज्ञा केलेली असता (१०० छंद) प्रभु त्यास उतराई देत आहेत असे पाहताच, त्यास वाटले की प्रभु मला एवढ्यावरच समजावू पहात आहेत. आपली भक्ती देण्याची इच्छा दिसत नाही म्हणून तो व्याकुळ झाला. **पाय धरण्यात भाव** हा की हे पाय मला द्या, माझ्या हृदयात सतत ठेवा; मला दुसरे काही नको. आता स्पष्टपणे सांगतो की -

*हिं.* *। नाथ आजु मैं काह न पावा । मिटे दोष दुख दारिद दावा ॥५॥*
*। बहुत काले मैं कीन्ही मजूरी । आजु दीन्ह बिधि बनि भलि भूरी ॥६॥*
*। अब कछु नाथ न चाहिअ मोरें । दीनदयाल अनुग्रह तोरें ॥७॥*
*। फिरती बार मोहि जो देवा । सो प्रसादु मैं सिर धरि लेवा ॥८॥*

*म.* *। नाथ ! आज मज काय न लाभत । दोष दुःख दारिद्र्य-दाव गत ॥५॥*
*। केली मी बहु काळ मजूरी । आज देइ विधि भलि भरपूरीं ॥६॥*
*। नको अतां प्रभु काहीं मजला । तुझ्या अनुग्रहिं दीनदयाळा ॥७॥*
*। याल परत येतां जे कांहीं । तो प्रसाद मी धरिन शिरांही ॥८॥*

**अर्थ** - नाथ ! आज मला कोणता लाभ नाही झाला? (सर्व काही लाभले). दोष, दुःख व दारिद्र्य-रूपी दावानल गेला (नष्ट झाला - गत) ॥५॥ मी पुष्कळ

काळ मजुरी (कष्ट, मेहनत) केली व आज विधात्याने मला एकदमच चांगली भरपूर (मजुरी-मोबदला-वेतन) दिली.॥६॥ प्रभु ! दीनदयाल ! तुझ्या अनुग्रहाने (कृपेने) मला आता कांऽहिसुद्धा नको.॥७॥ (वनवासातून) परत येताना जे काही मला द्याल ते मी प्रसाद म्हणून मस्तकी धारण करीन.॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) नाथ आज मज... दाव गत -** भाव हा की आज मला सर्व काही मिळाले; काही मिळणे-मिळविणे बाकी राहिले नाही. या नावाड्याच्या म्हणण्याचा अर्थ पुढे भरद्वाजांच्या वचनांनीच स्पष्ट झाला आहे. **'आज सुफल तपतीर्थे त्यागहि । आज सुफल जपयोग विरागही । सुफल सकल शुभ साधन साज । राम तुम्हां अवलोकत आज ॥ लाभसीम सुखसीम न दुसरी । दर्शनिं तुमचा आस सब पुरी'** (१०७।५-७) भरद्वाजांनी पूजा वगैरे केल्यावर हे म्हटले आहे. पूजेत पाय धुण्याचा अंतर्भाव होतो. त्याच्या म्हणण्याचा भाव हा आहे की हजारो वर्षे तपयोगादि कठोर साधने करून मुनींना ज्याने कृतकृत्यता, साधन सुफलता व जन्म सुफलता वाटते ते आपले तिघांचे दर्शन मला काही साधन न करता, सहज झाले असता मागावयाचे, मिळवावयाचे काय राहिले ! सर्व काही मिळाले. शिवाय **(क) दोष दुःख दारिद्र्य दाव गत -** कामक्रोधलोभमोहादि सर्व **दोष**, पापे यांचा संहार झाला. जन्म मरणरूपी **दुःख** नष्ट झाले व अज्ञान (मोह) दारिद्र्याचा वणवा कायमचा विझला. 'निकट मोहदारिद्र्य येत ना' (७।१२०।४); 'मायाकृत गुण दोष ७।५७।२ सर्व' 'दुःसह दुःख जन्मतां मरतां' (७।१०९।७) याचा अर्थ हा की परमतत्त्वाची, परमार्थाची प्राप्ती झाली. **'प्रविशत दुःख दाव ना राहे । जणुं योगी परमार्था लाहे ॥२३१।३॥'**

**चौ. ६ (१) केली मी बहु काळ मजूरी -** मजूरी = मजुराचे काम; कष्ट, मेहनत हा एक अर्थ आणि मजुराचे वेतन, कष्टांचा मोबदला हा दुसरा अर्थ. या जन्मात या नावाड्याने परमार्थासाठी कष्ट केलेले नाहीत म्हणून पूर्वी अनेक जन्म कष्ट, साधन केले तेच येथे समजणे योग्य आहे. 'नाना जन्मि कर्म कृत नाना । योग याग जप तप मख दानां ॥ सर्व कर्म मी करून पाहिले । सुख आतासम कधिं न जाहलें ॥ (७।९६।७-९). याला आज जी भरपूर मजूरी मिळाली ती या जन्मातील कष्टांची नसून पूर्वीच्या अनंत जन्मांची आहे व ती

एकदम, अपेक्षेपेक्षाही जास्त मिळाली, कारण पाय धुण्यास सापडले.

**चौ. ७ - (१) तुझ्या अनुग्रहिं दीनदयाला ! - तुझ्या - तोरें** - बालकाप्रमाणे एकवचनाचा प्रयोग प्रभूविषयी केला. निषादराजाने असे एकवचन मुळीच वापरले नाही. भाव हा की मला काहीसुद्धा नको असे जे वाटते आणि सर्व मिळाल्याचा जो अनुभव मला आला तो प्रभु केवळ तुझ्या अनुग्रहानेच. मी दीन आहे हे जाणून देवा ! तुला माझी दया आली आणि माझ्यावर खूप कृपा केलीस म्हणून हे झाले. माझी कुठली पात्रता? 'हे दिलेत हेच अपार दिलेत; म्हणून **'नको आता प्रभु काही मजला'** मी आज काहीसुद्धा असले घेणार नाही. आपणास संकोच वाटण्याचे कारण नाही व बाकी असले काहीही दिलेत तरी ते नश्वरच.

**चौ. ८ - (१) द्याल परत येतां जें काहीं - शिरांही** - उतराई घेणार नाही ही प्रतिज्ञा कायम आहे; तुम्ही जे अपार दिलेत त्यातून मी उतराई होणे शक्य नाही. मग नावेतून आणल्याची उतराई कशी घेऊ? मी तुम्हाला गंगापार आणले आणि तुम्ही मला भवसागर पार आणलात? तथापि परत येताना जे काही द्याल ते आपला प्रसाद म्हणून शिरसावंदन करून घेईन. आपण तिन्ही मूर्ती वनांतून कुशल परत येईपर्यंत माझ्या मनाला प्रसन्नता वाटणे शक्य नसल्याने प्रसाद म्हणून सुद्धा आज काही घेणार नाही. (या चार चौपायांवरील मा.पी.प.!) प्रभु घे, घे म्हणत असता दास जेव्हा काहीच घेत नाही तेव्हा भगवंतावर त्याच्या ऋणाचे मोठे ओझे होते तेव्हा प्रभू काय देतात पहा :

*हिं.दो. । बहुत कीन्ह प्रभु लखन सियँ नहिं कछु केवटु, लेइ ॥*
*॥ बिदा कीन्ह करुनायतन भगति बिमल बर देइ ॥१०२॥*

*म.दो. । प्रभुलक्ष्मण सीता बहू कथिति न नाविक घेत ॥*
*॥ देति निरोप कृपायतन भक्ति विमल वर देत ॥१०२॥*

**अर्थ :** प्रभु, लक्ष्मण व सीता यांनी पुष्कळ सांगून (आग्रह करून) पाहिले, पण नावाडी काही घेत नाही (असे ठरले) तेव्हा कृपानिधीने त्याला विमल भक्तिरूपी वर दिला व निरोप दिला.॥दो.१०२॥

**टीका.** - 'दीयमानं न गृह्णन्ति बिना मत्सेवनं जनाः' (भाग) नावाडी काही घेत नाही व प्रसादसुद्धा १४ वर्षानंतर घेणार; म्हणजे १४ वर्षे त्याच्या उपकारांचे

ओझे शिरावर बाळगावे लागणार असे जाणून प्रभूंनी त्याला विमल भक्ति वर दिला. **अन्य भरंवसा आणि सगुणरूपाविषयी मोह हे भक्तीतले मल आहेत.** हे ज्या भक्तीत कधी उत्पन्न होत नाहीत ती विमलभक्ति. हाच खरा प्रसाद होय. 'प्रसादस्तु प्रसन्नता' **'अविरल भक्ति विशुद्ध तव जी श्रुति पुराण गाति ॥ शोधिति मुनि योगीश कुणा प्रभू प्रसादें प्राप्ति ॥ ७।८४ रा. ॥ 'श्रुति-गीता रघुनाथ भक्ति ते । राम कृपें कुणि एका मिळते'** (७।१२६।६) **रामकृपेवाचून अशी विमलभक्ति मिळत नाही. 'मुनि-दुर्लभ हरिभक्ति नर पावति विना प्रयास ॥ जे ही कथा निरंतर ऐकति युत विश्वास'** (७।१२६) या नावाड्याने मानसांतीलच कर्मज्ञानवैराग्य भक्ति कथा लक्ष्मण मुखाने ऐकली असली पाहिजे असे जे अनुमान पूर्वी (१००।३) टीकेत काढले आहे त्याचे समर्थन येथे होते.

**ल.टे.** या नाविकाला प्रभूंनी निरोप दिला असे येथे स्पष्ट सांगितले आहे. निषादराज गुहाला पुढे बरोबर नेला आहे. म्हणून **गुह व हा नावाडी एक नव्हेत हे येथे पुन्हा ठरले.** (क) प्रभूंनी पहिली वस्ती तमसातटी केली व दुसरी येथे शृंगवेरपुराजवळ गंगातटी झाली, हे आपण पाहिले. आता तिसऱ्या दिवशी वनवासास प्रारंभ होणार :

***नाविक - अनुराग - प्रकरण समाप्त.***

●●●

## 'बास पार सुरनदी प्रयागा' प्रकरण (१०३।१-१०९।६)

*हिं. ।तब मज्जन करि रघुकुलनाथा । पूजि पारथिव नायउ माथा ॥१॥*
*। सिय सुरसरिहि कहेउ कर जोरी । मातु मनोरथ पुरउबि मोरी ॥२॥*
*। पति देवर सँग कुसल बहोरी । आइ करौं जेहिं पूजा तोरी ॥३॥*
*। सुनि सिय बिनय प्रेम रस सानी । भइ तब बिमल बारि बर बानी ॥४॥*

*म. । करुनी रघुकुलनाथ मज्जना । पार्थिव पुजुनि करिती नमना ॥१॥*
*। कर जोडुनि मग सीता विनवी - । गंगे माइ ! मनोरथ पुरवी ॥२॥*
*। पति - दीरांसह येतां मागें । कुशल, करिन कीं तव पूजा गे ॥३॥*
*। प्रेमळ सीता - विनती ऐकली । विमल जलीं वर वाणि जाहली ॥४॥*

**अर्थ** - रघुकुलनाथांनी स्नान केले व पार्थिव पूजन करून (शंकरांस) नमन केले.॥१॥ मग सीतेने दोन्ही हात जोडून गंगेला प्रार्थना केली की माते गंगे ! माझा मनोरथ पूर्ण कर - ॥२॥ पति व दीर यांच्यासह कुशल परत आले की मी तुझी पूजा करीन.॥३॥ सीतेने केलेली प्रेमळ (प्रेमरसमिश्र) विनंती ऐकली व निर्मल जलांत श्रेष्ठ वाणी झाली.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) पार्थिव पुजुनि** - शिव पार्थिव पूजा केली; पूजन पूर्ण झाल्यावर, शंकरांस, त्या पार्थिव लिंगास नमस्कार केला. या पूजेला पार्थिव पूजा म्हणतात. पार्थिव = पृथ्वी तत्त्वाचे (माती, सुवर्ण, रौप्य, ताम्र इ. धातु व घृत, नवनीत इ. पदार्थांचे) केलेले जे शिवलिंग त्याची पूजा = पार्थिव पूजा. **(क) रघुकुलनाथ** - हा शब्द येथे हेच सांगतो की रघुकुलाचे इष्ट देव शिवच होते. हे मानसाधारे उत्तम प्रकारे सिद्ध झाले आहे. प्र.प्र. १७।२ **'रघुकुल इष्ट देव शिव' पहा. व 'मानसांत रामशिव अभेद' प्र. प्र. ९।१० पहा.**

(२) **पार्थिव पूजा** - कोणकोणत्या पदार्थांचे पार्थिव (लिंग) तयार करीत असतात या विषयी विस्तार शि.पु. ज्ञान संहितेत आहे. कौसल्या पार्थिवांश्चक्रे ऋषऽऽदिष्टा स्वयं सती । रामश्चैव तथा नित्यं पार्थिवान् समपूजयत् ॥ तद्वंशेच समुत्पन्नांरसेते शिवमपूजयन् ॥ (शि.पु.ज्ञा.सं. अ ६२।११-१२) **(क) पार्थिवपूजाफल** - आयुष्यमान् बलवान श्रीमान् पुत्रवान् धनवान् सुखी ॥ वरमिष्टं

लभेल्लिङ्ग पार्थिवं यः समर्चयेत् ॥ तस्मात्तु पार्थिवं लिंगज्ञेयं सर्वार्थसाधकम्' स्वतः शिवपार्थिवपूजन नित्य नियमाने करून अल्पायासांनी महान फल प्राप्त करून देणारे साधन स्वतःच्या उदहारणाने लोकांपुढे ठेवले आहे. **(ख) विधि-पार्थिव पूजन कोणालाही करता येण्यासारखे आहे.** स्वच्छ, मऊ, माती, अक्षता, बेलाचे त्रिदल व जल या चार गोष्टी असल्या म्हणजे भागते. हरायनमः या मंत्राने माती आणणे; महेश्वराय नमः या मंत्राने ती भिजवून मळणे व लिंग तयार करणे; शूलपाणये नमः या मंत्राने स्थापन; पिनाकपाणये नमः या मंत्राने आवाहन, पशुपतयेनमः याने स्नान, शिवाय नमः याने पूजन व यजमानाय नमः याने विसर्जन करावे. मात्र हे व्रत आहे. स्नान करून अखंड चालविणे जरूर आहे. चातुमार्सात याचे विशेष महत्त्व आहे. या मंत्रात प्रणव, षडक्षरादि नसल्यामुळे स्त्रीशूद्रांसही उपयुक्त.

**चौ. २-३ (१) सीता विनवी गंगे - वा.रा.** सर्ग ५२ मध्ये पुष्कळ विस्तृत वर्णन आहे पण ते येथे घेण्यासारखे नाही. रामचंद्रांनी होडीत बसल्यावर यथाविधि आचमन करून आपल्या हितासाठी जप सुरू केला. गंगेच्या मध्यभागी नाव गेल्यावर, होडीतच असता सीतेने गंगेला प्रार्थना व खूप मोठा नवस केला आहे. येथील कथा निराळी आहे. काय नवस केला व पूजन कसे करीन याचा स्पष्ट उल्लेख मानसांत येथे किंवा पुढेही नाही. 'तैं सीता पूजी सुरनदी । विविधा करि वंदन मग पदीं' (६।१२१।८) हे पूजन राज्यप्राप्तीच्या आधी अयोध्येत परत जाण्यापूर्वी केले असल्याने त्यात गोदान, ब्राह्मण भोजन इ. वा.रा. मधील नवसाच्या गोष्टी असणे शक्य नाही. (मा.पी.प !)

**चौ. ४ - (१) विमल जलीं बर आणि जाहली -** आकाशात जशी आकाशवाणी होते तशी गंगाजलात वर देणारी वाणी झाली. हिला जरी वारिवाणी किंवा जलवाणी म्हटले तरी ही अशरीरिणी वाणी, आकाशवाणी सारखीच झाली. शब्दगुण आकाशाचा आहे. म्हणून हीसुद्धा एक प्रकारची आकाशवाणीच आहे. जलांतून शब्द बाहेर पडले इतकेच. पुढील तीन चौपायांत जलवाणीने सीतेची प्रशंसा केली आहे आणि दोह्यांत आशीर्वाद व वर दिला आहे. चौथ्या चौपाईत आशीर्वाद देण्याचे कारण गंगेने सांगितले आहे.

हिं. *। सुनु रघुबीर प्रिया बैदेही । तव प्रभाव जग बिदित न केही ॥५॥*
*। लोकप होहिं बिलोकत तोरें । तोहि सेवहिं सब सिधि कर जोरें ॥६॥*
*। तुम्ह जो हमहि बड़ि बिनय सुनाई । कृपा कीन्हि मोहि दिन्हि बड़ाई ॥७॥*
*। तदपि देबि मैं देबि असीसा । सफल होन हित निज बागीसा ॥८॥*

म. *। श्रृणु रघुवीर - प्रिया वैदेही । कोण न महिमा तव जाणेही? ॥५॥*
*। लोकप होति विलोकनि तव नर । तुज सेविति सव सिद्धि बद्धकर ॥६॥*
*। तुम्हिं आम्हां जें बहुत विनविलें । कृपा करुनि मज महत्त्व दिधलें ॥७॥*
*। तदपि देवि मी आशिस वेतें । सफल व्हावया निज वाचेतें ॥८॥*

**अर्थ :** रघुवीर प्रिया वैदेहि ऐक ! तुझा प्रभाव - महिमा जगात कोणाला नाही माहीत? (सर्व जाणतात) ॥५॥ तुझ्या (कृपादृष्टीच्या) अवलोकनाने मानव लोकपाल बनतात व सर्व सिद्धी हात जोडून तुझी सेवा करीत असतात.॥६॥ तुम्ही आम्हाला जी मोठी विनंती केलीत ती माझ्यावर कृपा करून मला मोठेपणा देण्यासाठीच केलीत.॥७॥ तथापि माझी वाणी सफल व्हावी म्हणून हे देवि ! मी आशीर्वाद देते की - ॥८॥

**टीका. चौ. ५ - (१) रघुवीर प्रिया** - रघुवीराची प्रिय पत्नी. सहा प्रकारची संपूर्ण वीरता ज्यांच्या ठिकाणी आहे असे रघुनाथ आहेत. त्यांना कोणापासून भय कसलं व ते कुशल येतील यात नवल काय? युद्धवीर, दयावीर, दान (त्याग) वीर, विद्यावीर, धर्मवीर व ऋजुतावीर रघुनाथ तुमचे प्रिय पति आहेत व त्यांना तुम्ही फार प्रिय आहात तेव्हा ते तुमचे व आपल्या प्रिय अनुजाचे सर्व प्रकारे संरक्षण करण्यास समर्थ आहेत. त्यामुळे तुम्हाला व लक्ष्मणालाही कसलेच भय नाही. तिघांनी कुशल परत यावे या सीतेच्या मनोरथाविषयी हे सुचविले. (क) **वैदेही** = विदेह जे ब्रह्म त्याच्यापासून झालेली, जी आदिशक्ति मूल प्रकृति, ती तुम्ही आहात, तेव्हा तुमचे संरक्षण व कुशल करण्यास माझ्या आशीर्वादाचीच काय, कोणाची व कशाचीही अपेक्षा तुम्हाला नाही. 'आदिशक्ति जी निर्मि जगा या । ती मी मम अवतरेल माया' (१।१५२।४) 'जिचे अंश उपजति गुणखाणी । अगणित उमा रमा ब्रह्माची ॥ भुकुटि विलासिं जिचे जग होती । रामबामदिशिं सीता हो ! ती' (१।१४८।३-४) असा तुमचा महिमा =

प्रभाव आहे हे कोण जाणत नाही? मलाही माहीत आहे.

**चौ. ६-७ (१) लोकप होति बिलोकनिं तव नर** - लोकप = लोकपाल. बिलोकन = पाहणे, दृष्टि. तुमच्या कृपादृष्टीने मनुष्य लोकपाल होतात तेथे माझ्या कृपेची किंमत ती काय? महासिद्धींसुद्धा सर्व सिद्धी तुमच्या दासी असता तुम्हाला स्वसंरक्षणासाठी इतरांच्या कृपेची आवश्यकता नाही. (क) **मज महत्त्व दिधले** - या (७ व्या) चौपाईत हे दाखविले की **'महती दासां सदा देतसां'** हे रामाच्या बाबतीत जसे सत्य आहे तसे **सीतेच्या बाबतीत तितकेच खरे आहे.**

**चौ. ८ - (१) तदपि देवि मी आशिस देते** - भाव हा की तुम्ही सर्व समर्थ परमात्मा-परमेश्वरी असल्याने कुशल परत येणार हे आधीच ठरलेले आहे. असे असता माधुर्य भावाने तुम्ही विनंती केलीत. तिचा अव्हेर करता येत नाही म्हणून मी त्याच भावनेने आशीर्वाद देते व तुम्ही फुकटचा मोठेपणा माझ्या पदरात टाकू पाहता तो स्वीकारणे माझे कर्तव्य आहे. त्यामुळे माझे शब्द सत्य ठरल्याचा मोठेपणा मला मिळणार आहे. **ल.ठे.** - गंगेच्या भाषणात सीतेविषयी व स्वतःविषयी कधी एकवचन आहे तर कधी बहुवचन आहे. याचे कारण चित्तवृत्ती द्विधा झाली आहे. ज्या वेळी सीता = जगज्जननी या भावनेने गंगा बोलते त्या वेळी दोघींबद्दल एकवचन वापरते व ज्या वेळी सीता = दशरथांची सून या भावनेने बोलते त्या वेळी दोघींबद्दल बहुवचन वापरते.

***हिं.दो.*** *। प्राननाथ देवर सहित कुराल कोसला आइ ॥*
*॥ पूजिहि सब मन कामना सुजसु रहिहि जग छाइ ॥१०३॥*

***म.दो.*** *। प्राणनाथ दीरासहित कुशल कोसले याल ॥*
*॥ पुरतिल सब मनकामना सुयश जगीं पसराल ॥१०३॥*

**अर्थ** : प्राणपति व दीर यांच्यासह तुम्ही सुखरूपपणे अयोध्येस याल. तुमच्या मनातील सर्व कामना (इच्छा) पूर्ण होतील व तुम्ही आपले सुयश सर्व जगात पसराल. (तुमचे सुयश पसरेल) ।।दो.१०३।।

**टीका. - (१) प्राणनाथ** - प्राणांचे स्वामी. भाव हा की तेच तुमचे रक्षण करतील. शूर्पणखा भयापासून केले. अग्नीत गुप्त राहण्यास सांगून रावणभयापासून केले. खरदूषण युद्धप्रसंगी लक्ष्मणाबरोबर गुप्त ठिकाणी पाठवून केले. (क) **सब**

**मनकामना** - सीतेने एकच मनोरथ प्रदर्शित केला असता येथे सब = सर्व म्हटले. जे काही इतर हेतु मनात धरून वनवासास जात आहात व जे आज प्रगट करण्यासारखे नाहीत ते सर्व हेतु सिद्ध होतील व त्यामुळेच जगात कीर्ती पसरेल.

*हिं.* *। गंग बचन सुनि मंगलमूला । मुदित सीय सुरसरि अनुकूला ॥१॥*
*। तब प्रभु गुहहि कहेउ घर जाहू । सुनत सूख मुखु भा उर दाहू ॥२॥*
*। दीन बचन गुह कह कर जोरी । बिनय सुनहु रघुकुलमनि मोरी ॥३॥*

*म.* *। श्रवुनि गांगवच मंगलमूल हि । सीते मुद गंगा अनुकूल हि ॥१॥*
*। प्रभु मग म्हणति गुहा, घरिं जावें । सुकलें मुख उर दाहा पावे ॥२॥*
*। वदे दीन गुह जोडुनि हातां । श्रुणु रघुकुलमणि विनंति आता ॥३॥*

**अर्थ :** गंगेचे मंगलमूल भाषण ऐकून व गंगा (सुरनदी) प्रसन्न झाली आहे हे जाणून सीतेला आनंद (मुद) झाला.॥१॥ मग प्रभु गुहाला म्हणाले की आता तुम्ही घरी जावे. (हे ऐकताच) त्याचे मुख सुकून गेले व हृदयात दाह होऊ लागला.॥२॥ हात जोडून दीन वाणीने गुह म्हणाला की रघुकुलशिरोमणी ! आता माझी विनंती ऐकावी.॥३॥

**टीका. - चौ. १ (१) गांगवच =** गंगेचे वचन, म्हणजे तिने दिलेला आशीर्वाद. त्यात पतीचे अयोध्येस कुशल परत येणे ही गोष्ट सीतेला मुख्यतः मंगलकारक आहे. या वचनांत सर्व कामनांची पूर्ति असल्याने सर्व प्रकारच्या मंगलांचे मूल हे वचन आहे. **(क) सीते मुद -** अशा प्रकारच्या जलवाणीने मिळालेला आशीर्वाद ऐकून अशा परिस्थितीत कोणालाही आनंद होणारच; कारण **देवतांचे आशीर्वाद सत्य असतात.** ते जर खोटे ठरले तर त्या वचनांचा गूढार्थ आपल्याला कळला नाही असे समजावे किंवा ते आशीर्वाद देवतादिकांचे नसून अविद्या मायेने जीवांना मोहित करण्यासाठी पसरलेले ते जाळे आहे असे समजावे. '**हा गौरि आशीर्वाद परिसुनि हर्ष सखिंसह पावली**' (छंद) '**बघुनि गौरि अनुकूल हर्ष सिते मनिं कसा वदूं**' (१।२३६।) **असा हर्ष सखिंसह पावली' (छंद) 'बघुनी गौरि अनुकूल हर्ष सिते मनिं कसा वदुं**' (१।२३६।) असा हर्ष सीतेलाच पूर्वी झाला आहे. '**श्रवुनि हर्ष हृदिं पुलक तनुं वेणिवचन अनुकूल**' (२०५।) असा हर्ष भरतास झाला आहे.

**चौ. २ - (१)** घरी जावे असे प्रभूंनी सांगताच **'सुकलें मुख, उर दाहा पावे'** अशी दशा निषादराज गुहाची झाली. गुह लक्ष्मणाचा शिष्य आहे. दोघांमध्ये पूर्ण साम्य असल्याचे पुढे अनेकांच्या प्रतीतीस आले आहे; पण कवि येथे प्रथम दाखवितात. **'रहा तात या नीति विचारीं । ऐकुनि, लक्ष्मण विव्हळ भारी ॥ सुकवी शीतल वचन तयाला'** (७१।७-८) गुहाचे मुख सुकलेच आहे व उर दाहा पावे म्हणजे विव्हळ झाला आहेच.

**चौ. ३ - (१) रघुकुलमणि** = रघुकुल शिरोमणि = रघुकुलश्रेष्ठ. गुहाच्या मनातील भाव हा आहे की आपण सर्वैश्वर्यपरिपूर्ण अशा रघुकुलाला प्राणांसम असल्यामुळे फणी मण्याला जपतो तसे **'मायबाप परिजन पुरवासी । सखे सुशील सुदास सुदासी ॥ जपती अपणां (ज्यानां) प्राणां परते'** (९१।४-५) मुळांतील 'ज्यानां' बद्दल 'अपणां' वापरले की हे पूर्वीचे गुहाचे वचन येथे लागू पडते. गुह म्हणतो आपल्याला वनातील प्रवासाची सवय नाही. पर्णकुटी बांधणे, कंदमूल फलादि आणणे, तृणपर्णादि गोळा करून आणून अंथरूण तयार करणे इ. कष्ट आपल्या सुकोमल तनूला सोसणार नाहीत. मी आपल्या बरोबर राहून असली सर्व सेवा यथाशक्ति करीत जाईन. त्याच्या मनात १४ वर्षे रघुनाथांबरोबर, वनात सेवेसाठी राहण्याची लालसा आहे. तो आता थोडक्यात सांगेलच :

*हिं. । नाथ साथ रहि पंथु देखाई । करि दिन चारि चरन सेवकाई ॥४॥*
*। जेहिं बन जाइ रहब रघुराई । परनकुटी मैं करबि सुहाई ॥५॥*
*। तब मोहि कहँ जसि देब रजाई । सोइ करिहउँ रघुबीर दोहाई ॥६॥*
*। सहज सनेह राम लखि तासू । संग लीन्ह गुह हृदयँ हुलासू ॥७॥*
*। पुनि गुहँ ग्याति बोलि सब लीन्हे । करि परितोषु बिदा तब कीन्हे ॥८॥*

*म. । नाथ ! साथ राहिन पथ दाविन । करिन चरण-सेवा हि चार दिन ॥४॥*
*। ज्या बनिं जाऊनि राहति रघुपति । पर्णकुटी मी करिन चारु अति ॥५॥*
*। तैं कथितिल रघुवीर मज जसें । आण आपली करिन-मी तसें ॥६॥*
*। राम बघुनि तत्स्नेह सहज तो । नेति सवें अति होइ मुदित तो ॥७॥*
*। गुहें ज्ञातिजन सकल बाहिले । परितोषुनि त्यां परत धाडिले ॥८॥*

**अर्थ** : नाथ ! मी आपल्या बरोबर (साथ) राहून आपणांस वाट दाखवीन व चार दिवस (काही काळ) आपल्या पायांची सेवाही करीन ॥४॥ मग रघुपति (रघुराज) ज्या वनांत जाऊन राहतील तेथे मी सुंदर पर्णकुटी बांधीन.॥५॥ तेव्हा मग रघुवीर मला जसे सांगतील त्याप्रमाणे मी करीन हे मी आपली शपथ घेऊन सांगतो.॥६॥ रामचंद्रांनी त्याचा तो सहज स्नेह पाहिला व त्याला बरोबर घेतला (बरे आहे, चला असे म्हणाले), तेव्हा त्याला फार आनंद झाला (उल्हास वाटला).॥७॥ गुहाने आपल्या सर्व ज्ञातिबांधवांना बोलावून त्यांचा पारितोष करून त्यांना परत धाडले.॥८॥

**टीका. - चौ. ४-५ (१) चार दिन** = काही दिवस, काही काळ. परंतु त्याला चार दिवस सुद्धा राहू दिला नाही. दोन दिवसच सेवा करण्यास सापडली. तिसऱ्या दिवशीच त्यास परत धाडला आहे हे पुढे दिसेलच. अ.रा. चौदा वर्षे बरोबर राहीन असे सांगून गुहाने धमकी दिली आहे की 'अनुज्ञा देहि राजेन्द्र नोचेत् प्राणांस्त्यजाम्यहम्' (२।६।२४) मला परवानगी न दिल्यास प्राणत्याग करीन. याचा परिणाम मात्र असा झाला की मुळीच बरोबर जाता आले नाही. **(क) मानसांतील गुह** अधिक शहाणा व भक्तिपथप्रवीण आहे. रघुराज सत्याग्रहाच्या धमक्यांना वश होत नाहीत. **'सहजस्नेह-विवश रघुराजहि'** (८८।४) हे त्याला माहीत आहे. १४ वर्षे राहण्याची इच्छा असली तरी 'त्यजति अर्ध बुध सर्व जात तों' (२५६।२). काही दिवस गेल्यावर परत जा म्हणून सांगतील तेव्हा पुन्हा प्रेमाने विनविल्यावर आणखी परवानगी मिळेलही असे मनाशी ठरवून 'चार दिन' म्हणाला. चार दिवस, दोनचार दिवस हा वाक्प्रचार. या अर्थाचा आहे. **(ख) पर्णकुटी मी करिन चारु अति** - आपल्या सारख्यांना सुंदर असून सुखद अशी पर्णकुटी पाहिजे. तशी आपल्याला बांधता येणार नाही. आम्ही वनातच राहणारे असल्याने मी ते सहज करू शकेन.

**चौ. ६ - (१) आण आपली करिन मी तसें** - शपथ घेण्याने हे सुचविले की मग मी हट्ट, आग्रह न करता आपल्या सांगण्याप्रमाणे करीन, असे म्हणाला पण परत येण्याची भाषा मात्र उच्चारली नाही. अजून आशा वाटते आहे की सापडेल कदाचित जास्त काळ सेवा करण्यास. (क) ल. ठे. गुहाने रघुकुलमणि,

रघुपति (रघुराई) रघुवीर अशा महाराजैश्वर्यसूचक नावांचाच उल्लेख केला आहे. **'राम' शब्दाचा** (आनंदनिधान, आनंदसिंधु = राम) **उपयोग त्याने केला नाही.** त्याला पाहिजे असलेला आनंद मिळणार नाही हे सुचविले. **(ख)** दुसरी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे **कृपाल, कृपानिधि** इ. शब्द **या चौपायांत मुळीच नाही.** सुचविले की जास्त काळ बरोबर राहू देण्याची कृपा केली जाणार नाही.

**चौ. ७ - (१) राम बघुनि तत्स्नेह सहज तो. 'सहजस्नेह-बिवश रघुराजहि** (८८।४) हा रामस्वभाव असल्यामुळे त्याच्या सहज स्नेहाला विशेष वश झाले व 'चला बरोबर' असे म्हणाले. त्याला काही दिवस तरी सेवेचा आनंद मिळणार. **(क) अति होइ मुदित तो** - गुह निषाद राजा असून, रामचंद्रांनी त्याच्यावर काहीच उपकार केले नसून रामसेवा करण्यात त्यास सहज परम आनंद वाटत आहे. सुग्रीव बिभीषण रामसखे असून, रघुवीराने त्यांस रंकांचे राव केले असून त्यांच्या ठिकाणी हा सेवाभाव नाही.

**चौ. ८ - (१) गुहे ज्ञातिजन... परितोषुनि परत धाडिले** - गुहाच्या मनात २/४ दिवसच राहण्याचा विचार असता तर सगळ्या ज्ञातिबांधवांस मुद्दाम बोलावून त्यांचा सर्व प्रकारे परितोष करणे जरूर नव्हते. चौदा वर्षे वनवास करण्याच्या हेतूने रघुनाथ अयोध्येतून निघाले तेव्हा **'सर्वां करुनि सकल परितोषण ॥ जात वना–'** (१६६।१-२) असा सर्वांचा परितोष केला व निघाले. यावरून ठरते की १४ वर्षे रामसेवेत वनात राहण्याचा बेत मनात करूनच गुहाने सर्वांस निरोप दिला. **(क)** पहिल्या चरणावरून ठरते की रघुनाथाने निरोप व भक्तिवर दिल्यावर नावाडी शृंगवेरपुरात परत आला. पण गुह आला नाही असे पाहून त्याचे सर्व कुटुंब, इष्ट मित्र बांधव होड्यांत बसून परतीराला आले. त्यांना जवळ बोलावून समजूत घालून, राज्याची व्यवस्था नीट सोपवून परत पाठविले.

***हिं.दो.*** ***। तब गनपति सिव सुमिरि प्रभु नाइ सुरसरिहि माथ ॥***
***॥ सखा अनुज सिय सहित बन गवनु कीन्ह रघुनाथ ॥१०४॥***

***म.दो*** ***। स्मरुनी प्रभु गणपति-शिवां गंगे नमुनि शिरास ॥***
***॥ सखा अनुज सीते सहित गत रघुनाथ वनास ॥१०४॥***

**अर्थ** - मग प्रभु रघुनाथांनी गणपति व शिव यांचे स्मरण केले. गंगेला

मस्तक लववून नमस्कार केला आणि सखा (गुह) अनुज (लक्ष्मण) व सीता यांच्यासह वनात गेले.।।दो.१०४।।

**टीका. (१) सखा अनुज सीते सहित** - हे शब्द मागील चरणांशी संबद्ध घेणे योग्य आहे. रघुनाथाने गंगेला नमस्कार केलेला पाहून या तिघांनी केला. **(क)** अनुज सखा सीते सहित असे म्हटले असते तर अनुप्रास अधिक सुंदर झाला असता; पण लक्ष्मणाला अग्रेसर केला असे ठरले असते. प्रभु या सख्याला लक्ष्मणापेक्षा अधिक मान देतात हे येथे दाखविले आहे. येथे गुह, सखा वाटाड्या म्हणून सर्वांच्या पुढे आणि राम सीता व लक्ष्मण असा क्रम चालताना मानणे भाग आहे. कारण राम, सीता, लक्ष्मण असाच वनप्रवासांत क्रम असल्याचे पुढे दोन ठिकाणी सांगितले आहे. २।१२३।२; ३।७।३

***हिं.*** ***। तेहि दिन भयउ बिटप तर बासू । लखन सखाँ सब कीन्ह सुपासू ।।१।।***
***। प्रात प्रातकृत करि रघुराई । तीरथराजु दीख प्रभु जाई ।।२।।***
***। सचिव सत्य श्रद्धा प्रिय नारी । माधव सरिस मीतु हितकारी ।।३।।***
***। चारि पदारथ भरा भँडारू । पुन्य प्रदेश देस अति चारू ।।४।।***

***म.*** ***। त्या दिनिं होइ विटपतळिं वसती । लक्ष्मण सखा सोइ सब करती ।।१।।***
***। प्रातःकृत्यां रघुपति उरकुनि । तीर्थराज बघती प्रभु जाउनि ।।२।।***
***। श्रद्धा स्त्री प्रिय, सत्य सचिव वर । मित्र माधवा समान हितकर ।।३।।***
***। चारि पदार्थ - पूर्ण भंडारू । पुण्यप्रदेश देश सुचारू ।।४।।***

**अर्थ :** त्या दिवशी (तिसऱ्या रात्री) झाडाखालीच वस्ती केली; लक्ष्मण व सखा यांनी सर्व सोई केल्या.।।१।। (उठल्यावर प्रातःकाळी) प्रातःकालचे सर्व कर्म रघुपतींनी उरकले व प्रभूंनी जाऊन तीर्थराजाचे दर्शन घेतले.।।२।। तीर्थराजाची श्रद्धा ही प्रिय पत्नी आहे, सत्य हा सचिव आहे. वेणीमाधवासारखा हितकर्ता मित्र आहे.।।३।। अर्थ, धर्म, काम व मोक्ष या चार पदार्थांनी भंडार (खजिना) पूर्ण भरला आहे व तेथील पुण्य प्रदेश हाच त्या राजाचा देश आहे.।।४।।

**टीका. - चौ. १ (१) त्या दिनिं होइ विटपतळिं वसती** - ज्या दिवशी शृंगवेरपुराजवळून निघून गंगा ओलांडून पायी प्रवासास प्रारंभ केला त्या दिवशी, एका झाडाखाली रात्री वस्ती केली. पहिली रात्र तमसा तीरावर, दुसरी

शृंगवेरपुराजवळ गंगातीरी व ही तिसरी वस्ती (तिसरी रात्र) होय. हा तिसरा मुक्काम कोरई घाटापासून तीन कोस दक्षिणेस **चेरवा ग्राम** आहे; तेथे एक तलाव आहे त्याच्याजवळ केला. या तलावाला हल्ली **राम-जूठा** ताल म्हणतात. येथून प्रयाग २० मैल आहे. अयोध्याकाण्ड परिशिष्ट २ पहावे. **(क) सब सोई - कंदमूल** - फलादि आणणे कुशकिसलय गोळा करून सुंदर पथारी तयार करणे व रात्री पाहऱ्यावर जागत बसणे या गोष्टी लक्ष्मण व सखा निषाद राज यांनी केल्या. सायंसंध्या इ. वर्णन शृंगवेरपुरास केले तसेच येथे समजावयाचे आहे.

**चौ. २ - (१) प्रातःकृत्य** = शौच, स्नान, संध्या, पार्थिव पूजनादि सर्व प्रातःकाळचे कर्म उरकून चालू लागले व तीर्थराज प्रयागास जाऊन पोहोचले.

**चौ. ३-४ (१) श्रद्धा स्त्री प्रिय** - या दोन चौपायांतील रूपकांत हा भाव मुख्य आहे की **ज्यांच्याजवळ श्रद्धा, सत्य व हरिभक्ति** (माधवमैत्री) **नसतील त्यांना तीर्थराजाच्या दर्शनाने** किंवा सेवनाने - सेवेने धर्मार्थकाममोक्षरूपी संपत्ती पैकी तीर्थराजाच्या खजिन्यातून **काही सुद्धा लाभ होणार नाही.** 'प्रतिग्रहादुपावृत्तः संतुष्टो नियतः शुचिः । अहंकारनिवृत्तश्च सतीर्थफलमश्नुते ॥ अकोपनश्च राजेन्द्र सत्यवादी दृढव्रतः । आत्मोपमश्च भूतेषु स तीर्थफलश्नुते ॥ (प.पु.स्व.खं. ४९।१०-११) असे श्रीकृष्णवचन आहे. भंडारू = खजिना (क) सर्व तीर्थांचा राजा म्हणून प्रयागास तीर्थराज म्हणतात. प्रयागतीर्थ राजा आहे म्हणून राजाचे रूपक केले. राजा म्हटले की राणी, मंत्री, मित्र, खजिना, देश, राजधानी, सैन्य इत्यादी सर्व अंगोपांगांची आवश्यकता असतेच. **त्रिसुपर्णात** सुद्धा श्रद्धेला पत्नी म्हटले आहे. '**श्रद्धा पत्नी,** शरीरम् इग्मम् उरः वेदिः' **उपनिषदांत** संन्यास धर्मवर्णनांतसुद्धा श्रद्धेला यतीची स्त्री म्हटले आहे. 'न त्यजेत् चद् यतिः मुक्तो यो माधुकरमातरम् ॥ वैराग्य जनकं **श्रद्धाकलत्रं** ज्ञाननन्दनम्' (मैत्रेय्युप, २।२३). 'श्रद्धेवीण धर्म कधिं न घडे' (७।१०।४) 'सत्यमूल सब सुकृत शोभती' (२।२८।६) 'विण हरिभक्ति वृथा जप योग'.

(२) **माधव** = वेणीमाधव, प्रयागांतील मुख्य देव. मा + धव = लक्ष्मीपति जिथे मित्र आहे तेथे धनधान्यादि ऐश्वर्याला काय तोटा. 'सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति' (भ.गी. ५।२९) सुहृद = मित्र, भगवान रात्रींचेच

मित्र आहेत पण त्यांना कोणी मित्र मानीत नाहीत. त्यांच्याशी मैत्रीने वागत नाहीत म्हणून सुखशान्ती मिळत नाही. (क) **चारि पदार्थ** = चारी पुरुषार्थ. अर्थ, धर्म, काम व मोक्ष यांना मानसांत फळेही म्हटले आहे. **पुण्यप्रदेश** = प्रयाग क्षेत्र. राजा असला की कोणता तरी देश त्याच्या ताब्यात पाहिजे. त्यात जो अति सुंदर देश, भाग असतो तेथे राजाचे सिंहासन असते; म्हणून आता आणखी वर्णन करतात :

*हिं.* *। छेत्रु अगम गढु गाद सुहावा । सपनेहुँ नहिं प्रतिपच्छिन्ह पावा ॥५॥*
*। सेन सकल तीरथ बर बीरा । कलुष अनीक दलन रन धीरा ॥६॥*
*। संगमु सिंहासन सुठि सोहा । छत्रु अखयबट्ठ मुनि मन मोहा ॥७॥*
*। चवँर जमुन अरु अंग तरंगा । देखि होहिं दुख दारिद भंगा ॥८॥*

*म.* *। क्षेत्र दुर्ग गड गाढ सुशोभन । प्रतिपक्षी स्वप्नीहिं पावति न ॥५॥*
*। तीर्थ सकल सेना वरवीरहि । कलुष-अनीक-दलन रणधीर हि ॥६॥*
*। संगम सिंहासन अति शोभन । अक्षयवट छत्र हि मुनिमोहन ॥७॥*
*। चामर यामुन-गांग-तरंग । बघत दुःख दारिद्र्याचा भंग ॥८॥*

**अर्थ** : प्रयाग क्षेत्र (हाच) सुंदर मजबूत (गाढ) व दुर्गम (दुर्ग) असा किल्ला (गड) आहे व तो प्रतिपक्षी (शत्रू) स्वप्नातसुद्धा प्राप्त करू शकत नाहीत.॥५॥ सर्व तीर्थे हीच उत्तम वीरांची सेना आहे व ते वीर पापरूपी सैन्याचा धुव्वा उडविण्यात रणधीर आहेत.॥६॥ संगम (त्रिवेणी संगम) हेच अति पवित्र व सुंदर सिंहासन आहे. अक्षयवट हे छत्र असून ते मुनिमनमोहक आहे.॥७॥ यमुनेचे व गंगेचे तरंग याच चवऱ्या (झुलत) आहेत व त्यांना पाहताच दुःख व दारिद्र्य यांचा नाश होतो.॥८॥

**टीका.** - (१) **क्षेत्र** = प्रयागक्षेत्र - ही जणू राजधानी आहे. दुर्ग = दुर्गम = अगम. प्रवेश करण्यास दुष्कर. प्रतिपक्षी = शत्रू कलिराजा, अधर्म राजा, इत्यादी. यांना हा दुर्गम व अभेद्य (गाढ) किल्ला सर करता येत नाही. कारण, तीर्थराजाचे सैन्य (म्हणजे सर्व तीर्थे) फार मोठे प्रतापी शूर, रणधीर उत्तम वीरांचे आहे. कलिराजाचे, अधर्म राजाचे सैन्य म्हणजे कलुष-अनीक - पापांची सेना. यांचा विनाश करण्यास तीर्थ राजाची सेना फार समर्थ व सदा जागरूक

असते. प्रयागात तीस कोटी तीर्थे वास करतात व तेथीलच हंस प्रपसन, कम्बल, अश्वतर वगैरे काही कमी प्रतापी नाहीत. पृथ्वीवरील सर्व तीर्थे प्रयागात वास करतात वगैरे वर्णन पद्म पु. स्वर्ग खंडात विस्तृत आहे. (क) राजा असला की सिंहासन, छत्रचामरे पाहिजेतच. त्रिवेणी संगम हेच तीर्थराजाचे सिंहासन आहे. अक्षयवट हे तीर्थराजाचे छत्र आहे. प्रलयाच्या वेळीही याचा विनाश होत नाही. मार्कंडेयासारखे चिरंजीवी मुनिसुद्धा या छत्राला पाहून मोहित होतात व शेवटी याचाच आश्रय करून जलप्रलयात वाचतात. (ख) त्रिवेणी संगमावरील गंगेचे व यमुनेचे तरंग बघत राहिल्यास मनुष्य सर्व दुःख, दारिद्र्य, चिंता इ. विसरून आनंदाने डोलत राहतो हे सत्य आहे. या तीर्थराजाची सेवा कोण करतात ते आता सांगतात.

*हिं.दो. । सेवहिं सुकृती साधु सुचि पावहिं सब मन काम ॥*
*॥ बंदी बेद पुरान गन कहहिं बिमल गुन ग्राम ॥१०५॥*
*म.दो. । सेविति सुकृती साधु शुचि पावति सब मन काम ॥*
*॥ बंदी वेदपुराण-गण गाती सुगुणग्राम ॥१०५॥*

**अर्थ :** पुण्यात्मे, साधु व पवित्र लोक (या तीर्थराजाची) सेवा करतात व त्यांच्या मनातील सर्व कामना पूर्ण होतात. वेदपुराणांचा समूह हे भाट असून ते तीर्थराजाच्या शुद्ध (निर्मल) गुणसमूहाचे वर्णन करतात.॥दो.१०५॥

**टीका.** - (१) महाराजांचे दर्शन सुद्धा फारच थोड्यांस होते; मग त्यांची सेवा करण्याचे भाग्य फारच थोड्यांस लाभणार; म्हणून सेवकांत पुण्यात्मे = पुण्यपुरुष, संतसाधु व पवित्र हृदयाचे लोकच येथे सांगितले. तीर्थराजाची सेवा म्हणजे काय हे येथे सांगितले नाही. पायी, अनवाणी चालत जाणे, त्याचे महात्म्य श्रवण करणे, तेथे राहणे, विधिपूर्वक स्नान, श्राद्धादि करणे, विप्र देव, तीर्थ इत्यादीचे पूजन करणे म्हणजेच तीर्थराजाची सेवा करणे होय. हे सुकृती साधुशुचि कोण हे चौ. ३-४ च्या टीकेत सांगितले आहे व पद्म-पु. श्लोक आणि मानसावतरण तेथे दिली आहेत. आता या वर्णनाचा उपसंहार करून तीर्थराजसेवा रघुराज कशी करतात ते सांगतील.

हिं. । को कहि सकइ प्रयाग प्रभाऊ । कलुष पुंज कुंजर मृगराऊ ॥१॥
। अस तीरथपति देखि सुहावा । सुख सागर रघुबर सुखु पावा ॥२॥
। कहि सिय लखनहि सखहि सुनाई । श्रीमुख तीरथराज बड़ाई ॥३॥
। करि प्रनामु देखत बन बागा । कहत महातम अति अनुरागा ॥४॥
। एहि बिधि आइ बिलोकी बेनी । सुमिरत सकल सुमंगल देनी ॥५॥

म. । वदवे कुणा प्रयाग प्रभाव । कलुष-पुंज-कुंजर मृगराव ॥१॥
। असा तीर्थपति पाहुनि सुंदर । सुख पावति रघुवर सुखसागर ॥२॥
। सीते अनुजा गुहास सांगति । स्वमुखें तीर्थराज महिमा अति ॥३॥
। प्रणमुनि बघत बघत मन बागां । वदति महात्म्या अति अनुरागां ॥४॥
। असे येउनी त्रिवेणि पाहति । स्मरतां सकल सुमंगलदा अति ॥५॥

**अर्थ :** पापसमूहरुपी हत्तींना मृगराज - सिंहाप्रमाणे असणाऱ्या प्रयागाचा प्रभाव कोण वदूं शकेल? (कोणी नाही) ॥१॥ असा सुंदर तीर्थपति पाहून सुखसागर रघुवरास सुख झाले.॥२॥ स्वतःच्या मुखाने (श्रीमुखाने) तीर्थराजाचा महा महिमा सीतेला, अनुजाला व गुहाला सांगितला.॥३॥ (तीर्थराजाला) प्रणाम करून वन व बागा बघत बघत अत्यंत अनुरागाने महात्म्य वर्णन केले.॥४॥ अशा प्रकारे येऊन त्रिवेणीचे दर्शन घेतले; तिचे स्मरण केले असता ती सर्व प्रकारचे अति सुमंगल देणारी आहे.॥५॥

**टीका. - चौ. १ - (१) कलुष-पुंज-कुंजर-मृगराव - 'कलुषअनीक दलन रणधीर'** आहे तीर्थराजाची सेना. तेथे तीर्थराजाला सिंह व पापपुंजांना कुंजर म्हटले. एकटा सिंह हत्तींच्या अनेक कळपांचा फडशा उडवितो तसा प्रयागराजा एकटाच सर्व पापांचा विनाश करतो; तथापि प्रयागाचा प्रभाव अपार अनंत आहे. तो पूर्णपणे कोणालाच सांगता येणार नाही.

**चौ. २ - (१) असा तीर्थपति पाहुनि सुंदर - 'तीर्थराज बघती प्रभु जाउनि'** (१०५।२) असा उपक्रम केला. तीर्थराज कसा दिसला याचे वर्णन मागल्या चौपाईपर्यंत केले व येथे तीर्थराज दर्शनाचा उपसंहार करीत आहेत. (क) सुखसागराला सुद्धा सुख झाले. पौर्णिमेचा चंद्र उगवला म्हणजे महासागरातील जलाची वृद्धी होत नसली तरी महासागराला मोठी भरती येते तसे येथे झाले.

हा वाच्यार्थ, आधिभौतिक अर्थ आहे. आधिदैविक अर्थ हा आहे की जसे सागराचे जल कधी कमी अधिक होत नाही, तसेच राम हे सर्वदा सुखसागर आहेत. प्रयाग दर्शनाने त्यांस सुख नाही की मगध दर्शनाने दुःख नाही; पण 'सोंगा योग्य किं नटें नाचणें' आवश्यक असते; म्हणून सुख झाले असे दिसले. **'चारी शील-रूप गुण-धामहि । तदपि अधिक सुखसागर रामहि'** (१।१९८।६).

**चौ. ३-५** (१) येथे सुचविले की एखाद्या तीर्थक्षेत्राचे दर्शन घेतल्यावर त्या तीर्थक्षेत्राचे महात्म्य श्रवण, कथन करावे व नंतर त्यांत वर्णिल्याप्रमाणे यथाशक्ति तीर्थविधी करावा. येथे कोणी ऋषिमुनि भेटले नाहीत म्हणून वन व बागा बघत जात असता श्रीमुखाने प्रयाग महात्म्य सांगत त्रिवेणीपर्यंत आले.

*हिं.* ***। मुदित नहाइ कीन्हि सिव सेवा । पूजि जथाबिधि तीरथ देवा ॥६॥***
***। तब प्रभु भरद्वाज पहिं आए । करत दण्डवत मुनि उर लाए ॥७॥***
***। मुनि मन मोद न कछु कहि जाई । ब्रह्मानंद रासि जनु पाई ॥८॥***

*म.* ***। मोदें स्नान करुनि शिवपूजन । केलें सविधि तीर्थ-देवार्चन ॥६॥***
***। प्रभू भरद्वाजाप्रति येती । करत दण्डवत मुनि उरिं धरिती ॥७॥***
***। मुनि-मनिं मोद, न जरा सांगवत । ब्रह्मानंद - राशि जणुं पावत ॥८॥***

**अर्थ** - आनंदाने त्रिवेणींत स्नान करून, मुदित हृदयाने शिव (पार्थिव) पूजन केले, व मग सर्व तीर्थदेवांचे यथाविधि पूजन केले.॥६॥ मग प्रभु भरद्वाजांकडे आले; व ते दण्डवत करीत असता मुनींनी त्यांस हृदयाशी धरले.॥७॥ मुनींच्या मनाला जो आनंद झाला त्याचे जरासुद्धा वर्णन करता येणे शक्य नाही; कारण त्यांना जणू ब्रह्मानंदाची रासच प्राप्त झाली-लाभली (सहज सापडली.)॥८॥

**टीका. चौ. ६ - (१) मोदें स्नान करुनि शिवपूजन** - हे दाखविले की तीर्थात प्रवेश करण्यापूर्वी त्या दिवशी स्नान वगैरे नित्यकर्म केले असले तरी त्या तीर्थात पुन्हा स्नान करून इष्ट देवतेचे पूजन नित्याप्रमाणेच आधी करावे. रामजूठा तलावात प्रातःकाळी स्नान करून प्रातःकाळचे नित्यकर्म उरकून निघाले होते. (१०५।२) **(क) केले सविधि तीर्थ देवार्चन' सविधि** = विधियुक्त, यथाविधि. आज देवता पूजनात स्वेच्छाचाराला प्राधान्य दिले जाते आहे; पण त्याचे परिणाम भोगावे लागतातच. **'प्रयागं माधवं सोमं भरद्वाजं च वासुकिम् ॥ वन्दे ऽक्षय वटं**

**शेषं प्रयागं तीर्थनायकम्'** यांत प्रयागातील मुख्य देवतांचा उल्लेख आहे. पुढील चौपाईपासून भरद्वाजभेट वर्णन सुरू होते व १०९।६ मध्ये समाप्त होते. तीस ओळींचे हे छोटेसे प्रकरण आहे.

**चौ. ७ - (१) प्रभू भरद्वाजाप्रति येती** - प्रभु असून स्वतः भरद्वाजांच्या दर्शनास गेले. येथे दाखविले की तीर्थात गेल्यावर स्नानादिक व तीर्थविधि उरकला की अत्यंत महत्त्वाचे कार्य म्हणजे संतसमागम. **'तीर्थे तीर्थे निर्मलं साधुवृन्दं वृन्दे वृन्दे तत्त्वचिंतानुवादः ॥ वादे वादे जायते, तत्त्वबोधो बोधे बोधे भासते चन्द्रचूडः** (शुकरंभा सं. ३) (क) भरद्वाजाश्रम व भरद्वाज मुनि यांविषयी १।४४।१-८ टीका पहावी. हे बृहस्पतीचे पुत्र, द्रोणाचार्यांचे पिता व वाल्मीकींचे शिष्य असून त्यांनी याज्ञवल्क्यांजवळ रामचरित्र श्रवण केले.

(२) **करत दण्डवत मुनिं उरिं धरिती** - भाव हा की राम दण्डवत करीत आहेत असे दिसताच मुनीने चटकन जाऊन त्यांस धरले व दण्डवत करू न देता त्यांस हृदयाशी धरून आलिंगन दिले. दण्डवत न करू देण्याचे कारण **प्रभु शब्दाने सुचविले**. राम प्रभु = परमात्मा आहेत हे मुनीने ओळखले म्हणून दण्डवत करू दिले नाही. म्हणजेच ऐश्वर्यभावना प्रगट होऊन क्रियाशील झाली. वाल्मिकीभेटीत **'रामें मुनिस दण्डवत नमलें । आशीर्वाद विप्रवर बदले** ॥१२५।१॥ राम परमात्मा आहेत हे जाणूनसुद्धा माधुर्य भावाने वागत असल्याने दण्डवत करतानाच धरले नाहीत. आलिंगन दिले नाही व आशीर्वाद दिला. **भरद्वाजांची वृत्ति द्विधा होत आहे** हे पुढे वारंवार दिसेल. **कशी द्विधा झाली पहा** : प्रभु जाणून दण्डवत करू दिले नाही आणि ब्रह्मानंदराशी जाणून परमानंद झाला. नंतर 'देति अशीस मुनीश' यावरून ठरले की माधुर्य भाव प्रबळ झाला. दशरथनंदन राजपुत्र आहेत. त्या भावनेने आशीर्वाद दिला. 'प्रेमें पूरित केले पुजुनी' यांत पुन्हा ऐश्वर्य भाव प्रधान आहे. मार्ग दाखविण्यासाठी, प्रार्थनानुसार, बटुंना बरोबर धाडले यांत पुन्हा माधुर्यभाव प्रधान आहे. वाल्मीकींनी अथपासून इतिपर्यंत माधुर्य भावनेने सर्व व्यवहार केला आहे. भरद्वाजांनी रामास नाथ ! म्हणून संबोधिले आहे. वाल्मीकींनी 'राम तुम्हिं जगदीश' असे मर्म सांगूनसुद्धा नाथ ! प्रभु ! म्हटले नाही. विस्तार त्या प्रकरणात पहावा.

(३) **अत्रि मुनि** अथपासून इतिपर्यंत पूर्ण ऐश्वर्य भावनेने वागले आहेत. **'करत दण्डवत मुनि उरिं धरिसी'** (३, ३।६) असे अगदी भरद्वाजांप्रमाणे केले आहे. प्रभु परमात्मा आहेत हीच भावना प्रबल असल्याने आशीर्वाद दिला नाही. पूजन, प्रार्थना, स्तुती करून वर मागितला आहे. **(क) शरभंग** इतके प्रेममग्न झाले आहेत की नमस्कार करण्यासही विसरले, आशीर्वाद पूजा इ. काही नाही. प्रभूंनीही नमस्कार केला नाही. या प्रमाणेच तुलना करून पाहिल्यास सुतीक्ष्ण, अगस्ति त्यांचे गुरु, विश्वामित्र व वसिष्ठ या प्रत्येक मुनींच्या भावनेत व तदनुसार आचरणांत, रामचंद्राशी वागण्यात काही ना काही फरक आहेच.

**चौ. ८ - 'मुनिं मनिं मोद'... धावत** - मुनीला अपार अवर्णनीय आनंद झाला. ब्रह्म सर्वत्र समान, व्यापक आहे, म्हणून ब्रह्मानंदही सर्वव्यापकच असणार. तोच जणू एकत्र गोळा होऊन आज रामरूपाने समोर प्रगट झाला असे भरद्वाजांस वाटले. भाव हा की ब्रह्मानंदाच्या अनंत पट असा परमानंद झाला. **'चिदानंदमय अपली काया'** असे वाल्मीकी म्हणणारच आहेत. परमार्थ व परम परमार्थ; ब्रह्मानंद व परमानंद यांतील भेद पूर्वी अनेक वेळा स्पष्ट केला आहे (उदा. लक्ष्मणगीता पहावी) १।२१६।५ टीकेसह पहा. **'श्याम गौर सुन्दर हे भ्राते । आनंदा आनंदहि दाते'** (२।२१७।२)

*हिं.दो. । दीन्हि असीस मुनीस उर अति अनंदु अस जानि ॥*
*॥ लोचन गोचर सुकृत फल मनहुँ किए बिधि आनि ॥१०६*

*म.दो. । देति अशीस मुनीश, हर्दि अति मुद असं जाणून ॥*
*॥ लोचन - गोचर सुकृत - फल करि विधि जणुं आणून ॥१०६॥*

**अर्थ :** मुनिश्रेष्ठांनी आशीर्वाद दिला व आपल्या सर्व सुकृतांचे फळ आणून जणू विधात्याने दृष्टिगोचर केले (नेत्रांस दाखविले) असे जाणून त्यांना हृदयांत अति आनंद झाला.।।दो.१०६।।

**टीका. - (१) सुकृत फल लोचन-गोचर करि** - कर्माचे फळ सुख दुःखरूपी भोगांनी अनुभवास येते. सुख-दुःख स्वसंवेद्य असतात, म्हणून कर्माचे फळ सुद्धा दृश्य नसते, असे असून येथे कल्पना केली की तेच विधात्याने आणून दाखविले म्हणून उत्प्रेक्षा केली. **'सकल सुकृतफल रामस्नेहो'** असे इतरत्र म्हटले असता

येथे रामदर्शनालाच सकल सुकृत फल म्हटले. याचे कारण इतकेच की रामदर्शन झाल्यावर ते परमात्मा आहेत हे ओळखता येणे पूर्वसुकृतानेच घडते व असे ओळखता आल्यावर ज्याला पाहिजे त्याला रामस्नेह सहज मिळतो. हे मुनीशास माहीत आहे. (क) विधि = विधाता, ईश, ईश्वर असा अर्थ येथे आहे. **'शुभ वा अशुभ कर्म - अनुसारे । ईश देइ फल हृदय विचारें'** (७७।७) जनकराजा **म्हणतात जे 'व्यापी ब्रह्म अकळ अविनाशी । चिदानंद निर्गुण गुणराशी' 'नयन विषय मज होइ तें जें समस्त सुखमूल ॥ सकल लाभ जीवा जगीं ईश यदा अनुकूल'** (१।३४१।-) सकल सुकृत कोणते हे पुढे चौपायांतच स्पष्ट होत आहे.

*हिं. । कुसल प्रस्न करि आसन दीन्हे । पूजि प्रेम परिपूरन कीन्हे ॥१॥*
*। कंद मूल फल अंकुर नीके । दिए आनि मुनि मनहुँ अमी के ॥२॥*
*। सीय लखन जन सहित सुहाए । अति रुचि राम मूल फल खाए ॥३॥*
*। भए बिगतश्रम रामु सुखारे । भरद्वाज मृदु बचन उचारे ॥४॥*

*म. । आसन दिधलें कुशला पुसुनी । प्रेमें पूरित केले पुजुनी ॥१॥*
*। कंद मूल फल अंकुर सुंदर । दे आणुनि मुनि जणूं अमृत वर ॥२॥*
*। सीता - लक्ष्मण जन - सह शुभ अति । अति रुचिं राम मूल फल भक्षति ॥३॥*
*। राम गतश्रम सुखी जाहले । भरद्वाज मृदू वचन बोलले ॥४॥*

**अर्थ :** कुशल विचारून मुनीशाने आसन दिले व पूजन करून प्रेमाने परिपूर्ण केले.॥१॥ मुनीने सुंदर कंद मूल फले व अंकुर आणून दिले व ती सर्व जणूउत्तम अमृतच होती.॥२॥ सीता, लक्ष्मण व दास (जन, भक्त गुह) यांच्यासह रामानी अति पवित्र व अति रुचिकर मूल फले (वगैरे) अति रुचीने भक्षण केली.॥३॥ श्रमपरिहार होऊन राम सुखि झाले तेव्हा भरद्वाज मृदु वाणीने बोलू लागले.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) कुशला पुसुनी** - बरोबरीच्यांस किंवा लहानांस कुशल विचारतात. स्वतःपेक्षा मोठ्या (वयाने, अधिकाराने) माणसांस कुशल विचारीत नाहीत. मुनींनी कुशल विचारले, यावरून ठरते की या वेळी त्यांस राम दशरथनंदन, नृपपुत्रच वाटले. (१०६।७ टीप.) **(क) प्रेमें पूरित केलें पुजुनी** - राम पूर्णकाम आहेत पण ते प्रेमाचे भुकेले असल्यामुळे मुनीने अशा प्रेमाने पूजा केली की राम प्रेमाने परिपूर्ण झाले, परितुष्ट झाले. **'परिसुनि वचा प्रेम**

**परिपुष्ट । पूर्ण काम राम हि परितुष्ट'** (१।३४२।६) दाखविले की प्रभु रामचंद्र प्रेमानेच तुष्ट होतात. बाह्योपचार पूजा इत्यादी गौण आहेत.

**चौ. २-३ (१) कंदमूल फल अंकुर** - कंदमूल फले गुहानेसुद्धा आणून ठेवली होती. येथे अंकुर अधिक आहेत. **अंकुर** = मोड, कोंब; धान्य भिजत घातल्यावर किंवा बी जमिनीत लावल्यानंतर जे वर येतात ते मोड किंवा वनस्पतींचे कोंब. **(क)** भरद्वाजांचे शेकडो शिष्य होते पण आसने व कंदमूल फलादि भक्ष्य पदार्थ मुनीने स्वतः आपल्या हातांनी आणून दिले. यांत अत्यंत आदर तर दिसतोच; पण आणून देण्याची जी पद्धती, त्या वेळची शारीरिक व मानसिक स्थिति यांवरून प्रेमाची ओळख पटते. नैवेद्य समर्पण हा एक पूजेतील उपचारच आहे. पूजन परम प्रेमाने केले. भाव हा की कंदमूलफलादि नैवेद्य समर्पण करताना आज हृदय आनंदाने भरून वाहू लागले. नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागल्या. अंगावर रोमांच उभे राहिले व वाटले की आजपर्यंत ज्या भगवंताला नुसत्या भावनेने नैवेद्य समर्पण करीत होतो तोच परमात्मा आज साक्षात येऊन माझ्या गरीबाच्या हातचे 'पत्रं पुष्पं फलं तोयं' ग्रहण करणार ! हे सर्व पदार्थ जणू वर = उत्तम अमृतच आहेत. स्वर्गातील अमृत भक्षण करणारे देवसुद्धा मर्त्यच आहेत; पण जे कोणी शुद्ध प्रेमाने प्रभूचे असे पूजन करतात तेच खरे अमृत होय व त्यांनी समर्पण केलेला प्रत्येक पदार्थ प्रभूला अमृतरूपच वाटतो.

**(२) सीता लक्ष्मण-जन सह** - शृंगवेरपुरात **'सिता सचिव बंधू-सहित'** (८९) आणि वाल्मीकि-आश्रमात **'सीता अनुज राम फळ भक्षिति'**. (१२५।४) लक्ष्मणाचा उल्लेख येथे गुहाच्या पूर्वी केला. कारण लक्ष्मण त्याचे गुरु आहेत. पूर्वी सचिवाचा उल्लेख लक्ष्मणापूर्वी केला. कारण राम त्याला पित्यासमान मानतात. सीतेचा उल्लेख सर्वत्र आधी आहे. कारण ती लक्ष्मण गुहादिकांस पूज्य वंद्य आहे. **'राम भक्षति'** याने सुचविले की राम मुख्य आहेत. **(क) अति शुभ** = अति पवित्र व सुंदर (दो.८९ टी. पहा) अति रुचीने अमृतमय मूलफले खाल्ली असा उल्लेख असला तरी कंद व अंकुरांचा त्यांनी अव्हेर केला असा अर्थ घेणे अनर्थकारक आहे. (दो. ८९ टी.प.) पूर्व संदर्भ लक्षात घ्यावयाचा नाही असे ठरविल्यास शबरीने कंदमूलफळे प्रेमाने दिली नाहीत असे म्हणावे लागेल व ती 'सुरस अति' व ही

'अमी के' अमृताची आहेत; म्हणून ही शबरीने दिलेल्या फळांपेक्षा अधिक गोड व अधिक स्वादिष्ट आहेत असे म्हणावे लगेल. शबरीच्या फळांची वारंवार प्रशंसा केली तशी इतर कोणाच्याही का केली नाही याची चर्चा शबरी प्रकरणात (३।३४) केली आहे. **थोडक्यात कारण इतकेच की ती शबरी = भिल्लीण असून बालकसुतभक्त आहे व भरद्वाजादि मुनि प्रौढतनयभक्त आहेत. (ख) अति रुचि =** अति रुचिकर व अत्यंत रुचीने असे दोन्ही अर्थ येथे आहेत. अति रुचीने = अति आवडीने, प्रेमाने. शबरीची पण 'प्रेमें प्रभु तीं भक्षिती' असेच म्हटले आहे. शबरीच्या फळांची वारंवार प्रशंसा केली आहे तर भरद्वाजांच्या गुणांची प्रशंसा केली आहे. वनवास काळात राम जर कोणाच्या आश्रमात राहिले असतील तर फक्त भरद्वाजांच्या. एकदाच नव्हे दोनदा ! वनांत जाताना व लंकेतून परत येताना.

**चौ. ४ - (१) राम गतश्रम सुखी जाहले -** याचे दोन अर्थ होतात. 'सुखी राम गतश्रम झाले' हा एक अर्थ आणि राम गतश्रम झाल्यामुळे सुखी झाले हा दुसरा. जे सदासर्वदा पूर्णसुखी 'सुखधाम' (१।२९७।६) आहेत त्यांना श्रम कसले व श्रमपरिहारासाठी विश्रांति कशाला पाहिजे ! पण **'सोंगायोग्य किं नटें नाचणें जरूर असते'** ८७।८ पहा ! ल.ठे. आलेल्या अतिथि अभ्यागताशी कसे वागावे याची मर्यादा, शिष्टाचार पद्धति येथे दाखविली. आलेल्या अतिथी वगैरेंचे भोजन वगैरे उरकून त्यांच्या श्रमांचा परिहार - विश्रान्तीने झाला म्हणजे मग काय चर्चा वगैरे करावयाची असेल ती करावी. सकल सुकृत कोणते व त्याची सुफलता कशाने होते हे आता दाखवितात :

*हिं.* *। आजु सुफल तपु तीरथ त्यागू । आजु सुफल जप जोग बिरागू ॥५॥*
*। सफल सकल सुभ साधन साजू । राम तुम्हहि अवलोकत आजू ॥६॥*
*। लाभ अवधि सुख अवधि न दूजी । तुम्हरें दरस आस सब पूजी ॥७॥*
*। अब करि कृपा देहु बरु एहू । निजपद सरसिज सहज सनेहू ॥८॥*

*म.* *। आज सुफल तप तीर्थे त्यागहि । आज सुफल जप योग विरागहि ॥५॥*
*। सुफल सकल शुभ साधन - साज । राम तुम्हां अवलोकत आज ॥६॥*
*। लाभ-सीम सुखसीम न दुसरी । दर्शनिं तुमच्या आस सब पुरी ॥७॥*
*। अतां कृपेनें वर हा यावा । स्नेह सहज पद सरसिजिं व्हावा ॥८॥*

**अर्थ :** आज तपश्चर्या, तीर्थयात्रादि आणि त्याग सुफल झाला; आज सर्व जप-योग-विरागांची सुफलता झाली ॥५॥ आज सर्व प्रकारच्या साधनसंपत्तीला सुंदर फळ आले; (कारण) राम ! आज आपले (सीतारामलक्ष्मण) दर्शन घडले.॥६॥ लाभाची परमावधि व सुखाची सीमा याहून दुसरी नाही. तुमच्या दर्शनाने सर्व आशा पूर्ण झाल्या.॥७॥ (तरी) आता कृपा करून इतकाच वर द्यावा की आपल्या चरणकमलांच्या ठिकाणी (माझ्या हृदयांत) सहज (स्वाभाविक) स्नेह उत्पन्न व्हावा.॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) त्याग** - शरीराने विषयांचा त्याग, बाह्य त्याग आणि विराग, विरती, वैराग्य म्हणजे मनांत विषयांवर प्रेम नसणे = अन्तस्त्याग. गृहस्थांना बाह्य विषयत्याग पूर्णपणे करता येणार नाही; पण अन्तस्त्याग त्यांस साधू शकेल. अन्तस्त्यागी बहिर्भोगी लोकांपेक्षा अन्तर्बाह्यत्यागी लोकांचे महत्त्व जास्त आहे हे सती - विश्वरूप दर्शनांत दाखविले आहे. (१।५४) ६-७ टी.प. **(क) तीर्थ** - तीर्थक्षेत्र यात्रा, तीर्थसेवा वगैरे. **तप** = तपश्चर्या; बा.कां. २२।५; ३७।१०; ७३।१-५; १६३।१-३ च्या टीकेत तपाविषयी पुष्कळ लिहिले आहे. मन व इंद्रिये यांची एकाग्रता साधण्यासाठी, शरीरशुद्धीसाठी व ज्ञानासाठी जे जे साधन केले जाते ते सर्व तप या सदरात पडते. शारीरिक तितिक्षा साधण्यासाठी केलेले साधनसुद्धा तपच; तीर्थयात्रा (पायी) व बाह्य त्याग हे पण तपच आहे. **(ख) जप** शब्दाने उपासना सुचविली; भक्तिमार्ग, भजन सुचविले 'दृढ विश्वासें मंत्र-जाप मम । भजन पांचवे श्रुतिकथितोत्तम' (३।३६।१) 'विरतिस धर्म योग दे ज्ञाना' (३।१६।१) विराग व योग शब्दाने ज्ञान सुचविले.

**चौ. ६ - (१) सुफल सकल शुभ साधन - साज** - शुभसाधन साजामध्ये श्रद्धा, शम, दम, तितिक्षा, धर्माचरण, सत्संग, यमनियम इत्यादींचा अन्तर्भाव होतो. या साधनांनीच तप, उपासना व ज्ञान यांची सिद्धि होते. शमादिकांना संपत्ती म्हणतातच. **(क) राम तुम्हां अवलोकत आज** येथे 'राम तुम्हां' = रामलक्ष्मण आणि सीता यांना असाच अर्थ घेतला पाहिजे. पुढे भरद्वाजच म्हणतात, **'सकल साधनां सुफल सुशोभन । लक्ष्मण राम नि सीता दर्शन'** (२१०।४) येथे हिंदीत 'सफल सकल शुभ साधन साज' यांत 'सुफल'च पाहिजे कारण वरील अवतरणांत

हाच अर्थ असून त्यांत 'सुफल' आहे. 'सब साधन कर सुफल सुहावा' (हिंदी) पण अनुप्रासासाठी कोणीतरी 'सफल' पाठ निर्माण केलेला दिसतो. **(ख) 'तव पदपदुमीं प्रीति निरंतर । सकल साधना हें फल सुन्दर ।'** (७।४९।४) **असे वसिष्ठ म्हणतात.** सुन्दर = सुष्ठ, फळ = सुफल, भरद्वाज रामदर्शनाला सुंदर फल म्हणतात तेव्हा हा भेद का? भरद्वाज उत्तम प्रकारे जाणतात की **'जगिं दर्शन मम (रामाचें) अमोघ'** (५।४९।९) रामदर्शन अमोघ असते; इतर काही मागितले नाही की राम आपली निरंतर प्रीति = सहज प्रेम, सहज स्नेह देतात. रामदर्शन होणेच परम दुर्लभ आहे. ते झाले म्हणजे पाहिजे असेल ते सहज मिळते. **(ग) सुफल - 'शम यम नियमचि फुलें, ज्ञान फल'** (१।३७।१४) हे भरद्वाजाजवळ होतेच **'ते आत्मज्ञाना - । जाणति करिं आमलक समाना'** (१।३०।७) म्हणजे त्यांची सर्व साधने **स-फल झालेलीच होती;** पण ज्ञान रूपी फळांत रस नसेल तर ते सुफल 'सुन्दर फळ ठरत नाही.' **'हरिपदरति रस'** (३।३७।१४) म्हणजे **त्यांचे साधन सफल असले तरी सुफल झाले नव्हते;** तो रस आज रामकृपेने उत्पन्न होणार आहे हे जाणून सुफल म्हटले. पुढील चौपाईत सहज स्नेह मागितला आहे. किती अद्भुत समन्वय पद्धति आहे ! येथे भरद्वाजांचा दृढ आत्मविश्वासही दाखविला गेला.

**चौ. ७ - (१) लाभ-सीम सुखसीम न दुसरी' - सीम** = सीमा, सीम हा शुद्ध संस्कृत शब्द आहे. 'सीम सीमे स्त्रियामुभौ' (अमरे). 'लाभ किं जगिं हरि भक्ति समान' (७।११२।८) रामभक्ति, रामस्नेह, रामप्रेम मिळणे हाच परमोत्तम लाभ आहे व हेच परमावधीचे सुख आहे. असे काकभुशुंडीचे वचन आहे. ही भक्ति रामकृपेने रामदर्शनानंतर मिळते; न मागताही कधी मिळते; पण फार क्वचित. **मानसांत फक्त नावाड्यालाच मिळाली आहे.** बाकी सर्व बालक सुतसम भक्तांनी सुद्धा प्रभु प्रसन्न झाल्यावर, दर्शनानंतर मागितली आहे. तशीच भारद्वाज मागणार आहेत. **(क) दर्शनिं तुमच्या आस सब पुरी - तुमच्या** = राम लक्ष्मण सीता यांच्या. भाव हा की आता इतर कोणतीही आशा पूर्ण करावयाची राहिली नाही. मला इतर काहीही नको. दाखविले की 'मोक्षसकलसुखखाण', ऋद्धिसिद्धि, इ. कशाचीही व कोणाचीही आशा राहणार नाही. इतर कोणाचाही भरवंसा

वाटणार नाही. त्या वेळीच सहज, विमल, अखंड, अविरल, अनपायिनी प्रेमभक्ति रामकृपेने मिळते. आता तीच मागतात.

**चौ. ८ - (१) स्नेह सहज पदसरोजिं** - सहज = स्वाभाविक जलातील माशांचा जलावर सहज स्नेह असतो, तसा इतर जलचरांचा नसतो. जे सहज असते ते अखंड असते. मी पुरुष आहे असे चिंतन, स्मरण करावे न लागता पुरुषाला आपल्या पुरुषत्वाचा विसर कधी पडत नाही; कारण ती भावना सहज, स्वभावतःच असते. असा दृढ स्नेह उत्पन्न होणे म्हणजेच सहजस्नेह प्राप्त होणे. आजपर्यंत भरद्वाजांचा रामपदी स्नेह नव्हता असे नाही; पण तो सहज स्नेह आहे असे त्यांस वाटत नव्हते. तो नावाडी व निषादराज गुह यांचा स्नेह सहज होता व राम सहजस्नेहाला विवश होतात हे शृंगवेरपुरच्या चरित्रांत दिसले आहे. भक्तिमध्ये कुपथ्य कोणते व नित्य, शुद्ध, अविनाशी सुख केव्हा मिळेल याविषयी सिद्धान्त भरद्वाज मुखाने सांगतात :

*हिं.दो.* ***। करम बचन मन छाड़ि छलु जब लगि जनु न तुम्हार ॥***
***॥ तब लगि सुखु सपनेहुँ नहीं किएँ कोटि उपचार ॥१०७॥***

*म.दो.* ***। त्यजुनी तनुवाङ्मनें छल जोंवरि तुझा न दास ॥***
***॥ स्वप्निहि तोंवरि सुख नसे कोटि साधनें भास ॥१०७॥***

**अर्थ :** कर्माने, वाणीने व मनाने छल (अन्य भरवंसा) सोडून जोपर्यंत (जीव) तुमचा दास होत नाही तोपर्यंत कोटि साधने केली तरी तो केवळ भास (भ्रम) असून सुख स्वप्नातसुद्धा मिळणे शक्य नाही.।।दो.१०७।।

**टीका.** (१) छल म्हणजे काय या विषयी मतभेद होण्याचा व त्यायोगे बुद्धिभेद होण्याचा संभव आहे. मानस वचनांचा समन्वय करूनच 'छल' चा अर्थ निश्चित करणे भाग आहे. कोणी भक्तीत कामना म्हणजे छल, म्हणतील, कोणी मोक्षाची इच्छा म्हणजे छल म्हणतील, पण हे दोन्ही पक्ष मानसमत विरोधी आहेत. **'रामभक्त जगिं चतुः प्रकारीं । सुकृती अनघ उदारहि चारी'** (१।२२।६) आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी या चौघांनाही सुकृती, निष्पाप व उदार म्हटले आहे. हे चौघे चार पुरुषार्थपैकी कोणत्या तरी एकाची इच्छा करीत असतातच. छल, कपट हे पाप आहे व हे चौघे निष्पाप = अनघ आहेत; म्हणून **चार**

**पुरुषार्थांपैकी कशाचीही इच्छा, कामना असणे 'छल' नाही हे मानसाधारे निश्चित ठरले. 'ध्रुव सग्लानि जपुनि हरिनामा । पावे निश्चल अनुपम धामा** (१।२६।५) यावरून ठरले की ध्रुव आर्त व अर्थार्थी होता; तरी त्याला मानसांत शंकरांनीच हरिभक्त म्हटले आहे. **'ध्रुव हरिभक्त होइ...'** (१।१४२।३) तो सकाम होता व हरिभक्त होता व हरिभक्ताला **'सुखमय सदा तया सब आशा'** (= दिशा) असतातच; म्हणजे तो सुखीहि झाला. श्रीराम भुशुंडीला सांगतात = **'पुरुष नपूंसक नारि वा अग जग थोर किं सान ॥ सर्व भावि भजतो छल न प्रिय अति तो मज जाण** ॥७।८७ रा. आता प्रभूच 'छल'चा अर्थ स्पष्ट करतात : **'सत्य सांगु शुचि दास प्रिय खग ! मजला प्राणसम ॥ त्यजुनि भरवसा आस हें जाणुनि कर भजन मम'** ७।८७ म.॥ छल नसणे म्हणजे अन्यांचा भरवसा व अन्यांची व साधनादिकांची आशा नसणे हे मानसाधारेच ठरले. आणखी प्रभुवचन पहा : **'सहज सरलता मनिं न कुटिलता । यथालाभ संतुष्टचित्तता'** हे भक्तीचे लक्षण सांगून पुढल्याच चौपाईत कुटिलतेचे = छळाचे स्पष्टीकरण करतात. **'म्हणवि दास मम नरआशा करि । वदा कुठें विश्वास खरा तरि'** (७।४६।२-३). यांतही अन्यांची आशा करण्यासच छल, कुटिलता म्हटले आहे. यावरून ठरले की इतर कोणाचीही किंवा साधनादिकांची आशा धरणे, इतरांचा भरंवसा वाटणे म्हणजे छल, कुटिलता, कपट. छलाचा त्याग करणे म्हणजेच अनन्यगतिक होणे व अनन्यगतिक भगवंतास प्रिय असतात. **'कृपानिधाना परि हा बाणा । प्रिय तो ज्यातें गति ना आना'** (३।१०।८) **अनन्यगतिक होणे म्हणजेच छल नसणे.** छल = दंभ असाही अर्थ होतो. **'नाही दंभ, कपट वा माया । त्यांचे हृदयिं रहा रघुराया'** (२।१३०।२).

(२) सकामांना सुख कसे मिळेल असे कोणी म्हणतील; पण असे म्हणणे व वाटणे हा सुद्धा भ्रम आहे व रामस्वभाव ज्यांना कळला नाही तेच असे म्हणतील. 'भक्तां काहिंच अदेय नाहीं' (३।४२।५) असे प्रभुवचनच आहे. भक्ताची जी काही कामना असेल ती पूर्ण करून त्याच्या हृदयातील कामक्रोधलोभांचा विनाश करून त्याला ज्ञान देऊन भक्तिसुद्धा देतात; फक्त दास अनन्यगतिक आहे की नाही हे प्रभु पाहतात. एवढी एकनिष्ठा असली म्हणजे प्रभु बाकीच्या दोषगुणांकडे

बघत नाहीत. 'सकाम भक्ति व भक्तित निषिद्ध' प्र.प्र. १२।३ पहावे. त्यात अधिक विस्तार केला आहे. (क) रामोपासक असून संकट निवारणासाठी इतर गणपति, शनि, मंगळ इत्यादींना प्रार्थना करणे हा **वाणीने छल झाला,** त्यासाठी त्या त्या इतर देवतादिकांची व्रते करणे हा **शरीराने छल झाला.** व त्यांना मनात प्रार्थना ऐहिक लाभासाठी किंवा मोक्षासाठी वगैरे करणे हा **मानसिक** छल झाला. इतर देवदेवता, ग्रह, विप्र यांच्या जवळ फक्त आपल्या उपास्य देवतेची भक्ति मागावी; व आपली देवताच सर्व प्रकारे माझे रक्षण करील असा दृढ विश्वास असावा म्हणजे छल नाही असे ठरेल. (ख) भरद्वाजांनी केलेल्या या स्तुतीचा परिणाम काय झाला ते पुढील चौपायांत सांगतील. तत्पूर्वी या भरद्वाजकृत स्तुतीची नक्षत्र मंडळातील नक्षत्राशी तुलना करू :

## भरद्वाज स्तुति - पुनर्वसु नक्षत्र

बालकांडांत ब्रह्मदेव, कौसल्या, अहल्या, परशुराम, सीताजननी सुनयना व सीता-जनक जनकराजा यांनी केलेल्या स्तुति अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृग व आर्द्र ही सहा नक्षत्रे क्रमशः आहेत. या काण्डांत ही भरद्वाजस्तुति पुनर्वसु नक्षत्र व पुढील वाल्मीकीकृत स्तुति पुष्य नक्षत्र आहे. या काण्डात दोनच स्तुति आहेत. (१) **अनुक्रम साम्य** - ही सातवी स्तुति; सातवे नक्षत्र पुनर्वसु आहे. (२) **नाम साम्य** - नक्षत्राचे नांव पुनर्वसु आहे. पुनः वसु, वसु = धन '**मुनिधन** जन सर्वस्व, शंभु असु' (१।१९८।२) असे मुनिधन राम आहेतच. भरद्वाजांच्या हृदयात रामरूपी वसु = धन पूर्वी होतच. आज ते धन, वसु पुनः प्रत्यक्ष रूपाने प्राप्त झाले म्हणून भरद्वाज स्तुतीचे नाव पुनर्वसु हे सार्थ ठरले. वनवासाची समाप्ति करताना हे धन वसु **पुनः** भरद्वाजश्रमात, भरद्वाजांजवळ येणार आहे व एक रात्र राहणार आहे. वनवासास जाताना किंवा येताना हे वसु इतर कोणाही मुनीच्या आश्रमांत रात्री राहिले नाही. फक्त या भरद्वाजांजवळच दोन्ही वेळा रात्रभर राहिले आहे. (३) **तारे संख्या** - पुनर्वसु नक्षत्रांत चार तारे आहेत. तसे या स्तुतीत I तपतीर्थे त्याग = कर्म, II जप = उपासन, III विराग योग = ज्ञान IV भावभक्ति = प्रेम, भक्ति 'भावभक्ति आनंदें तृप्ती'

(२१८।८) या प्रमाणे कर्म, उपासना, ज्ञान व भक्ति (सहजस्नेह) हे चार तारे आहेत. (४) **आकारसाम्य - पुनर्वसु नक्षत्राचा आकार 'हर्म्य' सारखा = घरासारखा आहे.** 'तो मोठा तो सब **गुणगण घर** । ज्या मुनीश तुम्हिं देतां आदर' असे राम मुनींना म्हणाले. ज्यांनी आदर देण्याने दुसरी व्यक्ति गुणगणघर बनते **तो स्वतः गुणगणघर असलाच पाहिजे. कर्म, उपासना, ज्ञान व भक्ति (सहजस्नेह) यांनीच गुणगणघर बनता येते.** (५) **देवता साम्य** - पुनर्वसु नक्षत्रांची देवता देवमाता अदिति आहे. 'कश्यप**अदिति** । तिथें पितृमाता । दशरथ कौसल्या विख्याता ॥ (१।१२३।३) रामजन्म पुनर्वसु नक्षत्रावरच झाला आहे. **कौसल्या** - अदितिने अनुज्ञा दिली म्हणून रामधन वनवासी मुनींत प्रथम भरद्वाजांस मिळाले. (६) **फलश्रुति साम्य** - 'बीज सकल धर्मा व्रतनेमां' (१।३२।४) ही सातवी फलश्रुती आहे. 'त्यजुनी तनुवाङ्मनें छल' तपतीर्थे त्यागादि सर्वसाधन केले तरच त्याला ज्ञानफल येऊन रामलक्ष्मण दर्शनाने सहजस्नेह प्राप्त होऊन ते सुफल होईल. म्हणजे सर्व कर्म उपासनादि साधनांचे बीज छलविहीन = अनन्यगतिक, होणे हे आहे हे येथे स्पष्ट दाखविले आहे.

***श्रीमानसगूढार्थ चंद्रिका अयोध्याकाण्ड अध्याय १० वा समाप्त.***



## अध्याय ११ वा.

*हिं. । सुनि मुनि बचन रामु सकुचाने । भाव भगति आनंद अघाने ॥१॥*
*। तब रघुबर मुनि सुजसु सुहावा । कोटि भाँति कहि सबहि सुनावा ॥२॥*
*। सो बड़ सो सब गुन गन गेहू । जेहि मुनीस तुम्ह आदर देहू ॥३॥*
*। मुनि रघुबीर परसपर नवहीं । बचन अगोचर सुख अनुभवहीं ॥४॥*
*म. । श्रवुनि राम मुनिवच संकुचती । भावभक्ति आनंदें तृप्ती ॥१॥*
*। मग रघुवर मुनि-सुयश सुशोभन । बहुविध सकलां करिति निवेदन ॥२॥*
*। तो मोठा तो सबगुणगण-घर । ज्या मुनीश तुम्हि देतां आदर ॥३॥*
*। मुनि रघुवीर परस्पर नमती । वचनाऽगोचर सुख अनुभवती ॥४॥*

**अर्थ :** मुनीचे वचन (स्तुति) ऐकून राम संकोचित झाले; (पण) मुनीच्या भावभक्तीने व आनंदाने ते तृप्त झाले.॥१॥ मग रघुवराने मुनीचे सुंदर सुयश नाना प्रकारे सर्वांस निवेदन केले. (वर्णन करून सांगितले).॥२॥ (मुनीला म्हणाले की) मुनीश ! तुम्ही ज्याला आदर देता तो मोठा (ठरतो) व तो सर्व गुणसमूहांचे घर बनतो. (सकलसद्‌गुण संपन्न होतो).॥३॥ मुनि व रघुवीर एकमेकांना नमत (नम्रपणाने आदर देत) आहेत व वाणीला अगोचर असणाऱ्या सुखाचा अनुभव घेत आहेत.॥४॥

**टीका. चौ. - १ (१) राम संकुचती -** मुनीने रामचंद्रांची स्तुति इतर पुष्कळ मुनींच्या देखत केली. त्यामुळे माधुर्य भावनेने संकोच वाटला. **'स्वगुण कानिं पडतां संकोचति । अन्यगुणां परिसत बहु हर्षति'** (३।४६।१) हे संतांचे लक्षण प्रभूंनीच नारदांस सांगितले आहे. 'आधीं केलें मग सांगितलें' (दा.बो.) **'अमानी मानद'** हे संतलक्षण पुढे दिसेल. **(क) भावभक्ति -** भावयुक्तभक्ति. भगवन्ताशी कोणते तरी नाते जोडून त्या नात्याप्रमाणे प्रेम करणे, वागणे म्हणजे भावभक्ति. मुनि मुख्यतः दास्य भावाने - सेव्यसेवक भावाने वागले. जी काही सेवा, पूजा केली तिच्यात मुनि परमानंदमग्न दिसले. त्यामुळे राम तृप्त झाले. **'जो आनंदसिंधु सुखराशी । त्रिजगी पावे लवें सुखाशी'** (१।१९७।५) ते भरद्वाजांच्या भक्तीने व आनंदमय दशेने तृप्त झाले.

**चौ. २ - (१) रघुवर मुनिसुयश निवेदन करिति** - पूर्व चौपाईत राम शब्द वापरला. येथे रघुवर शब्दाने सुचविले की रघुकुलनंदनत्व सिद्ध व्हावे व मुनीशाने स्तुतीने प्रगट केलेली ऐश्वर्य भावना येथील श्रोत्यांच्या चित्तांत राहू नये म्हणून, आपले ऐश्वर्य लपविण्याच्या हेतूने मुनीच्या निर्मळ यशाचे खूप वर्णन केले. मात्र ते खरेखरेच केले.

**चौ. ३-४ (१) तो मोठा... देता आदर** - आपण स्वतः फार मोठे महात्मा असल्यामुळे आपण माझी पात्रता नसता मला मोठेपणा दिलात. आपल्यासारखे ज्याचा आदर सत्कार करतात तो मोठा समजला जातो. आता आपल्या कृपेने मी सर्व सद्गुण संपन्न ठरलो. हे भाषण ऐश्वर्य लपविण्यासाठी केले असले तरी सत्य आहे; मिथ्यास्तुति, तोंडपुजेपणा त्यात नाही. (क) रघुवीर व मुनि हे दोघेही फार मोठे आहेत; पण आपापला मोठेपणा विसरून एकमेकांस मोठेपणा देत आहेत. **'मानद सकलां स्वयें अमानी भरता ! प्राणां सम ते प्राणी'** (७।३८।४) येथे दाखविले की श्रोता वक्ता महान ज्ञानी व विनम्र असतात तेथे त्यांस अनिर्वचनीय (वाणीला अगोचर) असे सुख मिळते. हनुमान, बिभीषण, भुशुंडी - गरुड आणि याज्ञवल्क्य भरद्वाज यांना अशाच प्रकारचे अनिर्वचनीय सुख झाले आहे. हेच 'सुखमात्यन्तिकं यत् तत् बुद्धिग्राह्यम् अतीन्द्रियम्' (भ.गी.)

हिं. *। यह सुधि पाइ प्रयागनिवासी । बटु तापस मुनि सिद्ध उदासी ॥५॥*
*। भरद्वाज आश्रम सब आए । देखन दशरथ सुअन सुहाए ॥६॥*
*। राम प्रनाम कीन्ह सब काहू । मुदित भए लहि लोयन लाहू ॥७॥*
*। देहिं असीस परम सुखु, पाई । फिरें सराहत सुंदरताई ॥८॥*

म. *। कळत वृत्त हें प्रयागवासी । बटु तापस मुनि सिद्ध उदासी ॥५॥*
*। येति भरद्वाजाश्रमिं सादर । बघण्या, दशरथ सुतांस सुन्दर ॥६॥*
*। राम करिति नमना सर्वांना । मोद होइ जैं लाभ लोचनां ॥७॥*
*। आशीस देति परम सुख मिळतां । जाती वाखाणित सुंदरता ॥८॥*

**अर्थ :** (भरद्वाजाश्रमात) दशरथनन्दन रामलक्ष्मण आले आहेत हा समाचार कळताच प्रयागात राहणारे ब्रह्मचारी, तपस्वी, मुनि, सिद्ध आणि संन्यासी ॥५॥ हे सगळे दशरथांच्या सुंदर पुत्रांस पाहण्यासाठी भरद्वाजाश्रमात आले.॥६॥

रामचंद्रांनी सर्वांना नमस्कार केला. त्या सर्वांना नेत्रांचा लाभ मिळाला व आनंद झाला.।।७।। त्यांना परम सुख मिळाले व त्यांनी आशीर्वाद दिले व ते सुंदरतेची प्रशंसा करीत परत गेले.।।८।।

**टीका. चौ. ५-६ (१) प्रयागवासी** - प्रयाग गावात राहणारे म्हणजे गृहस्थाश्रमी लोक असा अर्थ घेणे जरूर आहे. अन्यथा गृहस्थाश्रमी आलेच नाहीत असे ठरेल; पण ते शक्य नाही. **बटु** = ब्रह्मचारी. हे ऋषिकुळात, ऋषींच्या-मुनींच्या आश्रमांत, गावाबाहेर राहणारे असत. **तापस** = तपस्वी = वानप्रस्थाश्रमी, **मुनि** = ज्ञानी, **सिद्ध** = सिद्धि प्राप्त झालेले आणि संन्यासी (उदासी) हे सर्व तपोवनात व गावाबाहेर नदी किनाऱ्याला रहात असतात (असत). **'कुठें कुठें नदितीरि उदासी । वसति बोधरत मुनि संन्यासी'** (७।२९।५) वानप्रस्थ वनात राहणारेच. या प्रमाणे प्रयागवासी हा एक वर्ग (गावात राहण्याऱ्यांचा) व दुसरा वर्ग गावात न राहणारांचा सांगितला. दुसऱ्या चरणांतील 'बटु तापस इ.' क्रम चढत्या श्रेष्ठतेच्या दृष्टीने आहे. **(क)** हे सगळे भरद्वाजाश्रमांत आले. **'बघण्या दशरथ सुतांस सुंदर'** या उल्लेखाने ठरते की यांना जो समाचार कळला त्यांत हे कळले की अत्यंत सुंदर असे दशरथांचे दोन मुलगे भरद्वाजाश्रमात आले आहेत. हेही कळले असले पाहिजे की भरद्वाजांनी त्यांची आदराने पूजा केली; कारण की त्या शिवाय मुनि, सिद्ध, संन्यासी, तपस्वी यांना येण्याची इच्छा होणे शक्य नाही. भरद्वाजाश्रमात शेकडो ब्रह्मचारी वगैरे राहत होते. त्यांपैकी अनेकांनी भराभर जाऊन आपल्या परिचयाच्या ब्रह्मचारी वगैरेंना ही इत्थंभूत बातमी सांगितली असली पाहिजे. ब्रह्मचारी व गृहस्थ यांना अलौकिक सौंदर्य पाहण्याची इच्छा झाली तर नवल नाही; पण सिद्ध व ज्ञानरत मुनिसंन्यासी यांनासुद्धा झाली हे नवल आहे. अशांना अशी इच्छा होण्यास भरद्वाजांचे उदाहरण कानी आले असले पाहिजे.

**चौ. ७-८ (१) राम सर्वांना नमना करिती** - जे नमस्कार करण्यास पात्र होते, वंद्य होते त्यांस नमस्कार केला असा अर्थ घेणे जरूर आहे. आलेल्या गृहस्थांत क्षत्रिय, वैश्यादि असतीलच व त्यात काही वयानेही लहान असतीलच. म्हणून वरील अर्थ घेणे जरूर आहे. त्या काळी वेषावरून वर्ण व आश्रम सहज ओळखता

येत असत. (क) **लाभ लोचनां** - ते अपार, अलौकिक सौंदर्य पाहून सर्वांना असे वाटते की आज आपल्या नेत्रांना अद्भूत, अलौकिक लाभ झाला. त्यामुळे त्यांना आनंद झाला. पण यापेक्षा अधिक भावना उत्पन्न झाल्या नाहीत. (ख) **आशीर्वाद देणे व फक्त सौंदर्याचीच प्रशंसा करीत जाणे** यावरून ठरते की राम परमात्मा आहेत हे कोणालाच कळले नाही, की कोणाच्या ठिकाणी प्रेमही उत्पन्न झाले नाही किंवा वात्सल्यही जागृत झाले नाही; कोणीही यांच्या कोमलपणाची व मुनिवेषाची चर्चा केली नाही. शृंगवेरपुरच्या कोळी-भिल्लांनासुद्धा प्रयागासारख्या तीर्थराजात राहणाऱ्या या सर्व मंडळीपेक्षा किती हळहळ वाटली, किती चर्चा त्यांनी आपसांत केली ! पुढे वाटेतील वनवासी खेडेगावच्या लोकांची दशा कशी झाली आहे पहा : 'रामा पाहत कुणि अनुरागें ! निरखत संगें जाऊ लागे ॥ कोणि नेत्रपथिं छबि हृदिं आणी । होइ शिथिल तन मन वर वाणीं' (११४।४-८) प्रयागासारख्या तीर्थराजात राहणारे सर्व वर्णांचे व आश्रमांचे पुरुष रामप्रेमहीन ठरले व वनात राहणाऱ्या हीन जातीच्या लोकांत रामभक्ति हृदयात घर करून राहिली ! हा हरिमायेचा प्रभाव ध्यानात ठेवण्यासारखा आहे. अशाच रीतीने रानटी नरनारींची अंतःकरणे व प्रयागातील या बटुतापस मुनिसिद्ध उदासी गृहस्थ यांची अन्तःकरणे यांची तुलना करून पहावी. रानटी लोकांचे हृदय तीर्थराज निवासी लोकांपेक्षा अत्यंत कोमल व पर दुःखाने दुःखी होणारे संतांसारखे कशाने झाले व प्रयागवासी मुनिसंन्यासी तपस्वी इ. ची हृदये पाषाणासारखी कठोर का? या गोष्टीचा तपास वाचकांना सहज लागण्यासारखा असल्याने येथे विस्तार केला नाही.

(२) आशीर्वाद देऊन हे सर्व सौंदर्यप्रेक्षक आपापल्या स्थानी परत गेले. रामलक्ष्मणांच्या सौंदर्याशिवाय या लोकांना इतर काहीच दिसले, अनुभवास आले नाही हेही आश्चर्यच ! 'सजल विलोचन पुलक शरीरां' (११४।४) अशी दशा कोणाचीच झाली नाही. 'रचुनि विरंचि तया सुख पावे । हे स्नेही ज्याचे सर्वस्वें' (१२२।७) असे कोणासच वाटले नाही. 'श्रवत कथित प्रभुगुण घरिं येती' (१३७।३) असेही येथे घडले नाही. अशी आणखी पुष्कळ तुलना वाचक करू शकतील. विस्तार भयास्तव नुसते दिग्दर्शन करणेच भाग पडले. वनात राहणाऱ्या कोळी भिल्लांना रामलक्ष्मणांच्या दर्शनाने आपला जन्म धन्य झाल्याचा अनुभव

आला आहे. वनात रहात असूनसुद्धा त्यांना राममहिमा अनुभवास आला आहे. अहल्योद्धारादि अद्‌भुत, अलौकिक चरित्रांचा समाचार शृंगवेरपुरासारख्या अरण्यातील भिल्ल कोळ्यांच्या गावात पोचला आहे तो प्रयागराजासारख्या सर्वोत्तम तीर्थक्षेत्रांत कळला नसेल हे शक्यच नाही. पण रामप्रतापाची, प्रभावाची चर्चा कोणी एकानेही केली नाही. सौंदर्य पाहण्यास आलेले !

**वि.ल.टे...** या वर्णनात स्त्रिया बघण्यास आल्याचा उल्लेख नाही व सीतेच्याविषयी उल्लेखसुद्धा नाही असे का? भरद्वाजाश्रमातील ब्रह्मचारी, तपस्वी इत्यादिकांकडून ही बातमी पसरली याला हा एक भरभक्कम पुरावा आहे. या आश्रमवासी वार्ताहरांनी सीतेच्या सौंदर्याचा उल्लेख बातमी सांगताना केला नसेल; कारण तसे करणे म्हणजे परस्त्रीरूप वर्णन करणे व ते निरखून पाहिले असे सिद्ध करणे ठरले असते. (क) भरद्वाजाश्रमात जाण्यास स्त्रियांना बंदी असली पाहिजे नाहीतर गृहस्थांच्या स्त्रिया सर्वांच्या आधी आल्या असत्या किंवा गृहस्थ परत गेल्यावर त्यांच्याकडून कळल्यावर तरी आल्या असत्याच. मार्गातील गावातल्या स्त्रिया कामधंदा सोडून धावत आल्याचे वर्णन पुढे सविस्तर आहे. शृंगवेरपुरातील स्त्रियासुद्धा दर्शनास आल्या होत्या !

***हिं.दो.*** *। राम कीन्ह बिश्राम निसि प्रात प्रयाग नहाइ ॥*
*॥ चले सहित सिय लखन जन मुदित मुनिहि सिरु नाइ ॥१०८॥*

***म.दो.*** *। राम करुनि विश्राम निशिं स्नान उदयिं तीर्थात ॥*
*॥ सिता बंधु जन सह मुदित नमुनि मुनिस निघतात ॥१०८॥*

**अर्थ :** रामचंद्रांनी रात्री विश्रांति घेतली व उजाडल्यावर (प्रातः काळी) प्रयागतीर्थात (त्रिवेणीत) स्नान (वगैरे) केले व भरद्वाज मुनींस आनंदाने नमन करून सीता, लक्ष्मण व सेवक गुह यांच्यासह आनंदाने जाण्यास तयार झाले (निघाले).॥दो.१०८॥

**टीका. - (१) करुनि विश्राम निशिं** - रात्री झोपले असे स्पष्ट म्हटले नाही. विश्रांति घेतली इतकेच म्हटले. याचे सविस्तर वर्णन पुढे भरद्वाजांनीच भरताजवळ केले आहे. **'सिता राम लक्ष्मण सुप्रीतीं । वर्णित तुम्हां रात्र सरली ती'** (२०८।४) यावरून नक्की ठरले की सीता रामलक्ष्मण, गुह आणि भरद्वाज मुनि आंथरुणावर

पडल्या पडल्या भरताचे वर्णन अति प्रेमाने करीत असताच सगळी रात्र निघून गेली. अर्थात झोप कोणालाच लागली नाही. विश्राम = विश्रान्ति. नुसते पडून राहणे या अर्थाने विश्राम शब्द पूर्वीच वापरला आहे. **'ऋषिसमेत रघुवंशमणि कृत भोजन विश्राम** ॥ (१।२१७) ही दुपारच्या भोजनानंतरची विश्रांति म्हणजे वामकुक्षी आहे. **(क) स्नान उदयिं तीर्थांत** - स्नान कुठे कसे केले याचे वर्णनही पुढे भरद्वाजांनी भरताजवळच केले आहे. **'स्नानीं मर्महि कळे प्रयागीं । मग्न होति तुमचे अनुरागीं'** (२०८।५) यावरून ठरले की प्रयागात म्हणजे त्रिवेणीत स्नान केले आणि भरद्वाज मुनि त्यांच्याबरोबर होते. श्यामल धवल तरंग पाहून भरतशत्रुघ्नांची आठवण झाली व स्नान करताच त्यांच्या प्रेमात मग्न झाले हे भरद्वाज मुनींना दिसले. भरद्वाजाश्रमातील मुनि **'सादर सब मज्जती त्रिवेणीं'** (१।४४।४) **(ख) मुदित नमुनि मुनिस निघतात** असे येथे म्हटले व पुढे पुन्हा म्हटले आहे. 'प्रणमुनि ऋषि आज्ञेस पावले । प्रमुदित मन रघुराज चालले' (१०९।६) यावरून ठरले की भरद्वाजाश्रमातून प्रयाण केले असा अर्थ येथे घेता येत नाही. जाण्यास तयार झाले असा अर्थ करणे भाग आहे; कारण की कोणत्या मार्गाने जावे हे पुढच्याच चौपाईत राम भरद्वाजांस विचारीत आहेत. प्रयाण करण्यासाठी निघतानाच मार्ग विचारणे व्यवहारास धरून आहे.

***हिं.*** ***। राम सप्रेम कहेउ मुनि पाहीं । नाथ कहिअ हम केहि मग जाहीं ॥१॥***

***। मुनि मन बिहसि राम सन कहहीं । सुगम सकल मग तुम्ह कहुँ अहहीं ॥२॥***

***म.*** ***। राम मुनिस वदले प्रेमाने । जावें नाथ ! कवण मार्गानें ॥१॥***

***॥ मुनि मनिं बिहसुनि रामा म्हणती । सुगम मार्ग सब तुम्हांस असती ॥२॥***

**अर्थ** : भरद्वाज मुनींना राम प्रेमाने म्हणाले की नाथ ! आम्ही कोणत्या मार्गाने जावे?॥१॥ (तेव्हा) मुनि मनात मोठ्याने हसून रामचंद्रांस म्हणाले की तुम्हाला सगळे मार्ग सुगम (सोपे) आहेत.॥२॥

**टीका. - चौ. १** - (१) राम ऐश्वर्य लपवून नरनाट्य करीत असल्याने जाण्यासाठी निघाले असता मार्ग विचारणे योग्यच आहे. पण मार्ग विचारताना किंवा त्यापूर्वी, कोठे जावयाचे आहे याचा उल्लेख करणे आवश्यक असते. त्या शिवाय कोणी मार्ग सांगू किंवा दाखवू शकत नाही. येथे वाटाडे झालेल्या बटूंनी

दाखविलेल्या मार्गाने जाऊन राम वाल्मीकि आश्रमात पोचले आहेत. यावरून ठरते की वाल्मीकी आश्रमास जाण्याचा मार्ग विचारला; किंवा यापूर्वी मुनींना सांगितले असावे, स्नानास नदीवर जाताना की आज आम्ही वाल्मीकींच्या दर्शनास जाणार आहोत. (क) कोठे रहावे हा प्रश्न मानसांत भरद्वाजांना विचारला नसून पुढे वाल्मीकींना विचारला आहे. वा.रा. भरद्वाजांना विचारला आहे.

**चौ. २ - (१) मुनि मनिं विहसुनि म्हणती** - राम माधुर्य भावाने विचारतात पण किंचित विनोदाने मुनि आधी ऐश्वर्य भावाने सांगत आहेत. मनात मोठ्याने हसण्यात भाव हा की स्वतः परमात्मा सर्वज्ञ सर्वदर्शी असून मला विचारीत आहेत ! येथे भरद्वाजांच्या मनात हसण्यात जो भाव आहे तोच अगस्तींनी उघड स्मित करून स्पष्ट बोलून दाखविला आहे. **'महती दासां सदा देतसां । म्हणुन मला रघुराज पुसतसां'** (३।१३।१४) **'प्रभुवच परिसुनि करिती स्मित मुनि'** (३।१३।४) असे अगस्ति हसले आहेत. वाल्मीकी पण हसले आहेत; **'पुन्हा हसुनि वाल्मीकी वदले'** (१२८।२). भरद्वाज सेव्यसेवक भावाने वागत असल्यामुळे मनात हसले इतकाच फरक. (क) **तुम्हास सब मार्ग सुगम असती** - 'अल्पज्ञ जीवांना अर्थ, धर्म, काम, मोक्ष किंवा भक्ति प्राप्त करण्याचे सर्वच मार्ग सुगम-सोपे नसतात. आपण सर्वज्ञ सर्वदर्शी सर्वान्तर्यामी आहात. आपणास मार्ग कोण सांगणार व कोण दाखविणार ! आपल्या कृपेनेच जीव कोणत्या तरी मार्गाने सुलभपणे जाऊ शकतो. मला मोठेपणा देण्यासाठी विचारलेत इतकेच. **दासांना महती देण्याची लीला येथून सुरू झाली.**

*हिं. । साथ लागि मुनि सिष्य बोलाए । सुनि मन मुदित पचासक आए ॥३॥*
*। सबन्हि राम पर प्रेम अपारा । सकल कहहिं मगु दीख हमारा ॥४॥*
*। मुनि बटु चारि संग तब दीन्हे । जिन्ह बहु जनम सुकृत सब कीन्हे ॥५॥*
*। करि प्रनामु रिषि आयसु पाई । प्रमुदित हृदयँ चले रघुराई ॥६॥*

*म. । सवें यावया शिष्य बाहले । श्रवुनि मुदित पन्नास ठाकले ॥३॥*
*। प्रेम अपार रामिं सर्वांसी । सकल वदति पथ विदित आम्हांसी ॥४॥*
*। मुनिनें सवें चार बटु दिधले । जिहिं बहु जन्मिं सुकृत सब केलें ॥५॥*
*। प्रणमुनि ऋषि-आज्ञेस पावले । प्रमुदित मन रघुराज चालले ॥६॥*

**अर्थ :** रामचंद्रांबरोबर देण्यासाठी भरद्वाजांनी शिष्यांस बोलावले; (आज्ञा) ऐकून (सुमारे) पन्नास शिष्य आनंदित होऊन आले.॥३॥ सर्वांचे रामावर अपार प्रेम आहे; व ते सर्व म्हणाले की रस्ता आम्हाला माहीत आहे (आम्ही पाहिला आहे)॥४॥ ज्यांनी (जिहिं) पुष्कळ जन्मात सर्व (प्रकारचे) सुकृत केले होते अशा चार बटूंना मुनीने बरोबर दिले.॥५॥ भरद्वाज मुनींना (ऋषींना) प्रणाम करून व त्यांची आज्ञा घेऊन रघुराज प्रमुदित मनाने चालू लागले.॥६॥

**टीका. - चौ. ३-४** (१) मार्ग कोणता असे विचारले असता मुनीने शिष्यांना बरोबर पाठविण्याचे ठरविले. आपण प्रभूंना मार्ग कसा सांगावा असे ऐश्वर्य भावाने वाटले; पण माधुर्य भावाने वाटले की बऱ्याच लांबचा मार्ग असल्याने नुसत्या खाणाखुणा सांगणे बरे नाही. **(क) शिष्य बाहले** - शिष्यांना बोलावले व सुमारे पन्नास शिष्य आनंदाने आले. बटु आले असे म्हटले नाही. तपस्वी, मुनि, सिद्ध सुद्धा आले असतील. बोलावताच ५०।६० आले यावरून भरद्वाजाश्रमात शेकडो शिष्य असले पाहिजेत. ऋषिकुल, गुरुकुल होते हे सुचविले. गुरुजींची काहीतरी महत्त्वाची सेवा करण्यास सापडणार असे वाटून सर्वांना आनंद झाला. याने दाखविले की सर्व शिष्य आज्ञाधारक व गुरुसेवेने धन्यता मानणारे होते. **(ख) सकल बदति पथ बिदित अम्हांसी** - यावरून 'वाल्मीकी आश्रमाचा रस्ता उत्तम प्रकारे कोणाला माहीत आहे', असे मुनीने विचारले तेव्हा सर्वांनी सांगितले असे मानणे भाग आहे. नाहीतर कुठे जाण्याचा रस्ता हे सर्व ५०-६० जणांस आधीच कळणे शक्य नाही. **(ग) या आलेल्या सर्व ५०-६० जणांचे रामावर अपार प्रेम आहे हे विसरून भागणार नाही.** शिष्यांच्या प्रेमाचे वर्णन करून गुरुंचे प्रेम किती होते याची कल्पना दिली.

**चौ. ५-६** (१) चार ब्रह्मचारी शिष्यांनाच रामप्रभूला मार्ग दाखविण्यासाठी बरोबर जाण्याचे भाग्य लाभले; याचे कारण पुढल्या चरणांत सांगितले आहे. कोणाच्याही बरोबर सात पावले चालत गेल्याने बंधुभाव उत्पन्न होतो; मग पुष्कळ दूर - कित्येक कोसपर्यंत वाट दाखविण्याने मित्रभाव, मित्राचे नाते सहज उत्पन्न होईल यांत नवल काय? ज्या प्रभूच्या कृपालेशाने पापी जीवसुद्धा भवसागर सहज तरतो त्या प्रभूला मार्ग दाखविणारांच्या भाग्याची प्रशंसा कोण व किती करणार !

असे भाग्य कशाने लाभले याचे उत्तर (क) **बहुजन्मि सुकृत सब केलें** - एकाच नव्हे अनंत जन्मांत यांनी सर्व प्रकारचे सुकृत = पुण्य = धर्माचरण केले होते त्याचे हे अपूर्व फळ त्यांना मिळत आहे; आणि गुरुकृपा, गुरुसेवेची लालसा हे तात्कालिक कारण आहे. (ख) **सुकृत केले** या शब्दांच्या आधारे 'ते राम प्रेमीं नव्हते' असा निष्कर्ष काढण्यासारखा अनर्थ दुसरा कोणताच नाही. 'सकल सुकृतफल रामीं स्नेहो ! ज्यांचे रामावर अपार प्रेम आहे असे येथेच सांगितले त्या ५०/६० जणांपैकीच अधिक पुण्यवान हे चौघे आहेत; असे असता ज्यांचे रामावर प्रेम नाही म्हणणारे दिवान्ध किंवा मेंदूचा विकार झालेले असले पाहिजेत. रामप्रभूच्या नुसते बरोबर जाण्यास सापडावे म्हणून सुतीक्ष्णासारख्या मुनीने किती चतुराई - किती युक्त्या-प्रयुक्त्या योजल्या आहेत ! (३।२१२-४ पहा).

(२) **चारच शिष्य का दिले?** कितीही दिले असते तरी तितकेच का हा प्रश्न विचारलाच असता ! याचे उत्तर देण्यात टीकाकारांनी २७ मजली मनोरे उभारले आहेत ! पण एका आधारभूत वचनाने ते सहज ढासळून पडतात - **'एकस्तपो द्विरध्यायी त्रिभिर्गीतं चतुष्पथः'** तपश्चर्या एकट्याने करावी, अध्ययनात दोन असावेत. गायनांत तीन असावेत. (ताल धरणारा, सूर धरणारा व गाणारा) **व पायी प्रवासात चारजण एकत्र असावेत.** जाताना रामलक्ष्मण, गुह बरोबर असले तरी बटु परत येतील तेव्हा ते नसणार. चौघे प्रवासी प्रेमांतले, विश्वासू, एकत्र प्रवास करीत असले म्हणजे प्रवास सुखाचा होतो. कोणालाही विशेष ओझे बाळगावे लागत नाही. जास्त असल्यास गोंधळ माजतो. यांना वाल्मीकी आश्रमापर्यंत जाऊन परत यावयाचे आहे. तो आश्रम सुमारे ५०।५५ मैल दूर आहे. येताना रात्री वस्ती वनातच करावी लागणार आहे. भरद्वाज मुनि कर्मनिष्ठ असल्याने कर्ममार्गाच्या नियमाचे पालन त्यांनी करणे व करविणे योग्यच आहे. शिवाय **यांत शिष्य वत्सलताही दिसून येते. (क) ऋषि-आज्ञेस पावले** - आतापर्यंत भरद्वाजांस 'मुनि' म्हटले व येथे हिंदीत 'करि प्रणाम मुनि आयसु पाई ।' म्हटले असते तर अनुप्रास अधिक रुचिर झाला असता, तरी मुनि न म्हणता 'ऋषि' म्हटले व दाखविले की हे चार बटु भरद्वाजांच्या ऋषि कुळांतले आहेत. (ख) **प्रमुदित मन** - वाल्मीकींचे दर्शन होणार या भावनेने प्रमोद झाला. (ग) **रघुराज**

**चालले** - सुचविले की रघुवंशी राजाला शोभेल असेच चरित्र करणार आहेत.

**ल.टे.** शृंगवेरपुर सोडल्यानंतरची दुसरी रात्र भरद्वाजाश्रमांत काढली म्हणजेच अयोध्येहून निघाल्यानंतरची चौथी रात्र गेली व पाचव्या दिवशी सकाळी भरद्वाजाश्रमातून निघाले. गुहाने रामसंगतीत दोन रात्री घालविल्या. यापुढे वाल्मीकी भेट प्रकरण सुरू होते.

***येथे प्रयागनिवास प्रकरण समाप्त झाले.***

●●●

## 'प्रभु - वाल्मीकी - मिलन' प्रकरण (१०९।७ - १३२)

*हिं.* *। ग्राम निकट जब निकसहि जाई । देखहिं दरसु नारि नर धाई ॥७॥*
*। होहिं सनाथ जनम फलु पाई । फिरहिं दुखित मन संग पठाई ॥८॥*

*हिं.दो.* *। बिदा किए बटु बिनय करि । फिरे पाइ मन काम ॥*
*॥ उतरि नहाए जमुन जल जो सरीर सम स्याम ॥१०९॥*

*म.* *। जाति यदा ते गावावरुनी । नर नारी छबि बघति धाउनी ॥७॥*
*। होति सनाथ जन्म फल पाउनि । दुःखी फिरति सवें मन धाडुनि ॥८॥*

*म.दो.* *। विनवुनि बटुंना फिरविले जाति पूर्ण-मनकाम ॥*
*॥ उतरुनि यमुना स्नान कृत जलिं शरीरशा श्याम ॥१०९॥*

**अर्थ :** (सीतेसह रामलक्ष्मण) एखाद्या गावाजवळून जाऊ लागले की तेथील स्त्रिया व पुरुष धावत येऊन त्या रूपाचे दर्शन घेऊ लागतात.॥७॥ (हे रामरूप पाहणारे हे सर्व लोक) जन्माचे फळ पावून सनाथ होऊ लागले; पण (राम पुढे निघून गेले म्हणजे) आपले मन त्यांच्या बरोबर धाडून लोक दुःखी-कष्टी होऊन परततात. (असे प्रत्येक गावी होऊ लागले.)॥८॥ रामचंद्रांनी विनंती करून बटूंना परत पाठविले व ते मनकामना पूर्ण होऊन परतले. नंतर यमुना नदी ओलांडून आपल्या शरीराप्रमाणे श्याम वर्ण असलेल्या यमुनेच्या जलांत (सर्वांनी) स्नान केले.॥दो.१०९॥

**टीका. ल.टे.** - भरद्वाजाश्रमांतून निघून राजरूपपुर आणि सराय आकिल वरून महिला घाटावर आले व तेथे यमुना ओलांडली. अंतर सुमारे २० मैल आहे. (अयो.कां., परिशिष्ट २ रे पहा.)

**चौ.** ७-८ (१) यमुना तीरस्थ गावांतील नरनारींच्या भावनादिकांचे सविस्तर वर्णन पुढे करावयाचे असल्याने व प्रभूंच्या मनात बटूंना शक्य तितके लवकर पाठविण्याची इच्छा असल्याने त्वरेने आले हे दर्शविण्यासाठी या २० मैलांच्या प्रवासाचे वर्णन अगदी संक्षेपाने केले आहे. (क) **नरनारी छबि बघति धाउनी** मुळात **'देखहिं दरसु'** असे शब्द आहेत त्यातील 'दरसु'चा अर्थ रूप असा करणे जरूर आहे; तोच 'छबि' शब्दाने स्पष्ट केला आहे. (ख) या नरनारींना राम

परमात्मा आहेत हे माहीत नसूनही **जन्मफळ** मिळाल्याचा अनुभव आला. यावरून ठरते की प्रभूंनी त्यांच्यावर कृपा केली. (ग) **होति सनाथ** - रामदर्शनाने रामप्रेम उत्पन्न होऊन कृतकृत्य होऊन सनाथ झाल्याचा अनुभव त्यांना अगदी अल्पावकाशात आला. (घ) **दुःखी फिरति सबे मन धाइनि** - या सर्व लोकांना वाटू लागले की या आपल्या नाथांच्या मागोमाग जावे; पण राम कोणाला बरोबर नेण्यास कबूल नाहीत; त्यांना घरी परत जावे लागले. त्यामुळे ग्राम नरनारींना फार दुःख होत आहे. पण शरीराने जाता आले नाही तरी हे सर्व लोक आपल्या मनाला रामचंद्रांबरोबर पाठवीत आहेत. पुढे दिसेल की यांचे मन प्रभू बरोबर गेले आहे. बरोबर आलेल्या परमभाग्यवंत, सकलसुकृतपुंज अशा त्या चार बटूंना परत फिरताना वाईट वाटले नाही ! हे आता दोह्यांतच दिसेल. प्रयागराजांतील परम पावन भरद्वाजाश्रमांतील बटूंची ही स्थिति !

**दोहा.** (१) बटूंना यमुनेपर्यंत बरोबर नेले. विनवावे लागले यावरून ठरते की मधूनच परतण्याची त्यांची इच्छा नव्हती. तथापि परत फिरताना त्यांना दुःख झाले नाही हे तितकेच खरे. (क) **जाति पूर्ण मनकाम** - वाल्मीकी आश्रमापर्यंत जाण्याची इच्छा पूर्ण झाली नाही. तरी ज्या हेतूने ते बरोबर आले तो हेतु - रामभक्तिची प्राप्ती होऊन, सिद्ध झाला. (ख) **उतरुनि यमुना स्नान कृत - गंगेशिवाय कोणतीही नदी ओलांडावयाची असेल तर परतीरास गेल्यानंतर स्नान** करावे असा नियम आहे. आणखी उदा. दो. १३२ पहा. सकाळी स्नान करून निघाले तरी यमुनापार गेल्यावर स्नान केले. यमुना कलिमलहरणी आहे. तीर्थ आहे, म्हणून स्नान केले. (ग) **शरीरशा श्याम** असे म्हटल्याने शरीर यमुनाजळापेक्षा किंचित अधिक श्याम व मनोहर आहे हे प्रतिमोपमेने सुचविले. **वा.रा.** - वर्णन आहे की तीरावरील वृक्षांच्या शाखा तोडून लक्ष्मणाने तराफा तयार केला व त्यावर बसून यमुनेच्या परतीराला गेले. येथे निषादराज गुह बरोबर असल्याने त्यानेच तराफा बनवून सर्वास पार नेले असे मानणे संयुक्तिक ठरेल.

***हिं.*** *। सुनत तीरबासी नर नारी । धाए निज निज काज बिसारी ॥१॥*
*। लखन राम सिय सुंदरताई । देखि करहिं निज भाग्य बड़ाई ॥२॥*
*। अति लालसा बसहिं मन माहीं । नाउँ गाउँ बूझत सकुचाहीं ॥३॥*

*। जे तिन्ह महुँ बयबिरिध सयाने । तिन्ह करि जुगुति रामु पहिचाने ॥४॥*
*। सकल कथा तिन्ह सबहि सुनाई । बनहि चले पितु आयसु पाई ॥५॥*
*। सुनि सबिषाद सकल पछिताहीं । रानी रायँ कीन्ह भल नाहीं ॥६॥*
म. *। तीरवासि नर नारी ऐकत । निज निज काजां विसरुनि धावत ॥१॥*
*। लक्ष्मण - राम - सिता सुंदरते । बघतां वानिति भाग्य-महत्ते ॥२॥*
*। वाटे अति लालसा मनासी । लाजति नांव गांव पुसण्यासी ॥३॥*
*। वयोवृद्ध त्यांमध्ये सुज्ञ जे । राम ओळखिति युक्ति करून ते ॥४॥*
*। वदति कथा सब ते सकलांसी । पित्राज्ञें चालले वनासी ॥५॥*
*। श्रवुनि विषादें सब पस्तावति । राणी राय न भलें आचरति ॥६॥*

**अर्थ** - (दोन परम सुंदर कुमार व एक परम सुंदर सुकुमारी येत आहेत ही बातमी) यमुनेच्या तीरावरील गांवच्या लोकांस कळतांच, कानी पडताच, सर्व स्त्रीपुरुष आपापले कामकाज विसरून धावत येऊ लागले.॥१॥ लक्ष्मण राम व सीता यांचे सौंदर्य पाहून सर्व आपल्या भाग्याची महती गाऊ लागले.॥२॥ नांव गांव वगैरे विचारण्याची अति प्रबल इच्छा (लालसा, हौस) मनात उत्पन्न झाली, पण विचारण्यास संकोच वाटू लागला.॥३॥ त्या लोकांत जे वयोवृद्ध व शाहणे (सूज्ञ, चतुर) होते त्यांनी युक्ति प्रयुक्ती करून रामचंद्रांस जाणले (ओळखले) ॥४॥ मग त्यांनी सर्व कथा बाकीच्या सर्वांना सांगितली (व म्हणाले की) पित्याच्या आज्ञेने (राम) वनात जात आहेत.॥५॥ हे ऐकून सर्व दुःखी होऊन पश्चात्ताप करू लागतात व म्हणतात की राणी व राजा यांनी हे चांगले नाही केले.॥६॥

**टीका. चौ. १ (१) तीरवासि नर नारी ऐकत** - यावरून ठरले की यमुनेपलीकडे गेल्यावर कोणत्या मार्गाने जावयाचे याची माहिति बटूंना परत पाठविताना विचारली असावी. प्रथम यमुनेच्या तीरातीराने चालले आहेत. निषादराज अजून बरोबर असून तो या भागांतील चांगला माहितगार आहे हे 'नाथ ! सवें राहिन पथ दाविन' (१०४।४) या त्याच्या वचनावरून स्पष्ट आहे; तथापि त्या चार बटूंना 'सकल सुकृत फल रामस्नेहो' देण्यासाठी व भरद्वाजांना मोठेपणा देण्यासाठी व आपले ऐश्वर्य लपविण्यासाठी सर्व नाटक केले. (क) **निज निज काजा विसरुनि धावतिं - येथे कामधंद्याचा - कार्याचा विसर सांगितला आहे. कामधंद्याचा त्याग**

**नव्हे. 'कार्य विसर' व कामत्याग' प्र. प्र. १२।२ पहा.**

**चौ. २ - (१) बघतां वानिति भाग्य-महत्ते - भाग्यमहत्ता** - वर्णनाचा नमुना बालकाण्डांत आहे. 'सुझे कवण सुकृत ज्या लागुनि । नयन-अतिथि कृत विधिनें आणुनि ।। मरणशील जशि सुधा पावतो । सुरतरु जन्मभुकेला लभतो ।। मिळे नारक्या हरिपद जैसें । यांचें दर्शन आम्हां तैसें' (१।३३५।४-६) मार्गस्थ ग्राम नरनारींच्या प्रेमाचे व भाग्याचे वर्णन मुद्दाम वाचण्यासारखे आहे. मुख्यतः गीतावली २२-२६ व २८-३० ही आठ पदे पहावी. पद १३ पासून ४२ पर्यंत तीस पदे वनमार्गवर्णनपर आहेत.

**चौ. ३-४ (१) राम ओळखति युक्ति करून ते** - युक्ति गुप्तपणे योजावी लागते व नेहमी गुप्त ठेवावी लागते. निषादराजाच्या जातीच्या वृद्धांनी काहीतरी बहाणा काढून गुहाला बाजूस घेऊन रामलक्ष्मणांबद्दल माहिती काढून घेतली तेव्हा कळली. केवळ सामुद्रिक चिन्हांवरून नाव, गाव व वनात का जात आहेत हे कळणे शक्य नाही, आणि या वनवासास राणी मूळ कारण आहे हेही कळणे शक्य नाही. ११२।३-५ पहा !

**चौ. ५-६** (१) वदति कथा सब - नाव, गाव वनात का जात आहेत, कोणी पाठविले वगैरे सर्व हकीगत गुहाशिवाय इतर कोणाकडून व इतर कोणत्याही मार्गाने कळणे येथे शक्य नाही. **(क) राणी राय** - यांत राणीचा उल्लेख प्रथम करण्यात राणीनेच हे सर्व केले व राजा तिच्या जाळ्यात सापडून वचनबद्ध झाला इ. भाव आहेत. **गीतावलीत** मार्गस्थ ग्रामवासी म्हणतात 'कैकेयी कुचालि करि कानन पठाए । बचन कुभागिनिके भूपहि क्यों भाए' इत्यादी पद ३९ व ४० मध्ये विस्तार पहावा.



## तापस प्रकरण (११०।७ - १११।६)

*हिं. । तेहि अवसर एक तापसु आवा । तेजपुंज लघुबयस सुहावा ॥७॥*
*। कबि अलखित गति बेषु बिरागी । मन क्रम बचन राम अनुरागी ॥८॥*
*हिं.दो. । सजल नयन तन पुलकि निज इष्टदेउ पहिचानि ।*
*॥ परेउ दंड जिमि धरनितल दसा न जाइ बखानि ॥११०॥*
*म. । त्या समयीं ये एक तपस्वी । सुंदर, लघु वय अति तेजस्वी ॥७॥*
*॥ कवि - अलक्ष्य - गति बेष विरागी । मन - कृति - वचनिं राम - अनुरागी ॥८॥*
*म.दो. । सजल नयन, तनुं पुलक, निज इष्टदेव जाणून ॥*
*॥ दशा न वदवे धरणितळिं पडला दंड बनून ॥११०॥*

**अर्थ** - त्याच वेळी एक तपस्वी आला. तो लहान वयाचा, सुंदर व अति तेजस्वी (तेजपुंज) होता.॥७॥ त्याची गति कवीलासुद्धा अलक्ष्य होती (तो कोण हे कवीलासुद्धा कळले नाही) बैराग्याचा वेष (विरक्त वेषांत) असून, मनाने, कर्मानि व वाणीने तो रामप्रेमी होता.॥८॥ (राम) आपले इष्टदेव आहेत हे जाणून (ओळखून) त्याचे नेत्र अश्रूंनी डबडबले, अंगावर रोमांच उभे राहिले व तो एखाद्या दंडासारखा धरणितळावर पडला; (दण्डवत प्रणाम केला) त्या वेळची त्याची दशा वर्णन करणे शक्य नाही.॥दो.११०॥

**टीका. - प्रास्ताविक** - या दोन चौपाया एक दोहा व पुढील दोह्यांतील सहा चौपाया या उपटसुंभासारख्या पूर्वापर कथेशी काहीच संबंध नसल्यासारख्या दिसतात, ही गोष्ट खरी आहे व मागील सहाव्या चौपाईतील कथा संदर्भ पुढील दोह्याच्या ७ व्या चौपाईस अगदी सूत्रबद्ध, सुसंगतपणे जोडलेला आहे. **'माय बाप ते वद सखि कैसे । जे धाडिति वनिं बालक ऐसे'** ही (१११।७) चौपाई 'राणीराय न भलें आचरति' (११०।६) याच्या पुढली आहे. यामुळे काही लोकांचे म्हणणे आहे की या आठ चौपाया व एक दोहा क्षेपक आहेत. तुलसीदासांनी लिहिलेल्या नाहीत व त्यांना मान्य नाहीत. पण हे विधान विचारवंत संशोधकांस मान्य होण्यासारखे नाही. कारण सर्व जुन्या पोथ्यांत हा भाग आहे. **हे प्रकरण नसलेली एकही पोथी नाही.** (क) या एका दोह्याने तु.दासांनी अयोध्याकाण्डाच्या

रचनेत ठरविलेल्या संकेताचा भंग झाला आहे. हा एक दोहा वाढल्यामुळे १२५ व्यांत छंद व सोरठा न येता १२६ व्यांत आला आहे. पुढे काण्डसमाप्तीपर्यंत पूर्वसंकेताचे पालन केले आहे. **यावरून ठरले की तु.दासांची मान्यता या दहा ओळींच्या प्रकरणाला आहे. मात्र या दहा ओळी तु.दासांनी लिहिलेल्या नाहीत हे मान्य करणे भाग आहे.**

## हा तापस (तपस्वी) कोण?

(१) या बाबतीत अनेक मते आहेत. कोणी अग्नि, कोणी चित्रकूट पर्वत, कोणी शंकर, हनुमान, वाल्मीकी, अगस्तिशिष्य, रामप्रेम तर कोणी गालवपुत्र आला असे म्हणतात व या ओळी गोस्वामी विरचित मानतात. गोस्वामींनी जर लिहिल्या असत्या तर या तापसाचे नाव लिहिण्यास काय हरकत होती? त्यामुळे कोणता अनर्थ ओढवला असता? व तु. दासांनीच या ओळी लिहिल्या असत्या तर संकेतभंग करून, पूर्वीचा क्रम मोडून, १२६ व्यांत छंद, सोरठा का लिहिले असते? वरील कल्पनांचे खंडन करण्यापूर्वी या बुद्धीस काय वाटते ते लिहिणे बरे.

(२) **कवि अलक्ष्यगति बेष बिरागी** - जेथे तापसभेट झाली ते ठिकाण तु.दासांच्या राजापूर गावापासून फार दूर नाही. राजापूर (तु. दास जन्मस्थान) यमुनेच्या तीरावरच आहे. यमुनातीर निवासी लोकांचे भाग्य वर्णन करताना तु.दासांसारख्या 'मनकृतिवचनिं राम अनुरागी' दीन **'बालक सुत सम दास अमानी'** भक्तास असे वाटणे साहजिकच आहे की मी जर त्या वेळी माझ्या गावी जन्मलेला असतो तर रामरूपामृत डोळे भरून पान करून कृतकृत्य झालो असतो व या कराल कलिकालात जन्मावे लागले नसते. 'राम सदा सेवक रुचि राखिति' या सुत्रानुसार, 'रानीरायँ कीन्ह भल नाहीं' हे लिहिताना गोसाईंच्या मनात वरील रुचि उत्पन्न होताच त्यांच्या हृदयात राम सीता लक्ष्मण व गुह यांचे दर्शन झाले व या दहा ओळींत वर्णिलेल्या सर्व गोष्टी घडल्या. तु.दासांच्या हातांतील लेखणी गळून पडून ११०।६ पर्यंतचे **कवि तुलसीदास विरागी बेषांत** (पण) **अलक्ष्य गतिने** (अलखित गति) **रामचंद्रास ओळखून दण्डवत धरणितलावर पडले**. या सर्व गोष्टी हृदयांत (अलक्षित) घडल्याने इतर कोणांस कळू शकल्या नाहीत. पण

श्रीरामभूपप्रिय शंकरांनी सर्व जाणले व त्यांनी या १० ओळी लिहून टाकल्या पोथीवर; असे मानणे जरूर आहे. गोसाईजी शंकरांना फार प्रिय होते व **'ते उमेश अनुकूलहि भजला । करिति कथा मुदमंगला मूला'** (१।१५।७) असे तु.दासांनीच लिहिले आहे. ही चौपाई अंतर्लापिका आहे. सुंदर, लघुवय, अति तेजस्वी वेषविरागी (असलेले) कविच हे होत; पण अलक्ष्यगति होते. अलक्ष्यगति कवि होते. या प्रमाणे **हा तापस कोण याचे उत्तर याच चौपाईत 'कवि' शब्दाने देऊन ठेवले आहे, म्हणून ही अन्तर्लापिका आहे.**

(३) प्रत्यक्ष देहधारी कोणी तपस्वी येऊन भेटला असता तर सभोवतालच्या लोकांस ही भेट दिसली असती व त्यांनी पुढल्या सातव्या चौपाईत या तपस्व्याच्या परम भाग्याचे वर्णन केले असते; व हा तपस्वी गेल्याचे वर्णन करण्यास कवींना काहीच हरकत नव्हती. या भावावेशांतून वृत्तीवर आल्यावर कवींनी सहाव्या चौपाईच्या पुढे लिहिण्यास प्रारंभ केला. **'रानी रायँ कीन्ह भल नाहीं'** (चौ.६) ही त्यांनी लिहिलेली ६ वी चौपाई आणि **'मुदित सुअसनु पाव जिमि भूखा'** (१११।६) ही सहावीच चौपाई त्यामुळे तु.दासांनी पुढील सातवी चौपाई **'ते पितु मातु कहहु सखि कैसे -'** (७) ही लिहिली. मागल्या दहा ओळी वाचून पाहिल्या असल्या तरी त्यांत असत्य काहीच नसल्याने व त्या कोणी लिहिल्या हे त्यांस सहज कळण्यासारखे असल्याने त्यांनी त्या मान्य करून आणखी जास्त-कमी काही न लिहिता मागील लोकांचे भाषण वर्णन करण्यासच त्यांनी प्रारंभ केला.

**(क)** श्रीयुत **जयरामदास दीन** - रामायणी, यानी 'मानसरहस्य' पुस्तकात (गी.प्रे.) या विषयी संयुक्तिक विचारसरणी मांडली आहे. फक्त **याच चौपाईत वरील प्रश्नाचे उत्तर कसे आहे हे त्यांनी दाखविले नाही.** या चौपाईतील विशेषणे तु.दासांस कशी लागू पडतात पाहू :

(४) तपस्वी, अति तेजस्वी, सुंदर, विरागी वेष, मनकृतिवचनिं राम अनुरागी व लघु वय ही मुख्य विशेषणे आहेत. यांतील 'लघुवय' हे एक कसे लागू पडते हे दाखविणेच जरूर आहे. बाकीची विशेषणे तु.दासांस लागू पडत नाहीत असे तुलसी काव्याभ्यासी कोणीही म्हणणार नाही. **'बालक सुत सम दास अमानी'** अमानी दास प्रभु रामचंद्रांस बालकसुतासारखे वाटतात असे राम प्रभूच म्हणाले

आहेत. (३।४३।८) तु.दास अमानीदास बालक वृत्तीचे नव्हते असे मानस व विनयपत्रिका अवलोकन करणारा कोण म्हणेल? **'सज्जन मम उद्धटता क्षमतिल। मन लाउनि शिशु शब्द ऐकतिल । बोल बोबडे बालक बोलति । माता पिता मुदितमन ऐकति ।'** (१।८।८-९) असे मानसारंभीच तु.दासांनी म्हटले आहे. ते स्वतःस महेश भवानीचे बालक समजतात **'गुरुपितुमाय महेश भवानी । प्रणमुं दीनबंधु दिनदानी'** (१।१५।३) श्रीयुत जयरामदासजींनी हे मानसाधार व १।१५।७ हा आधार दिला असता तर बरे झाले असते. **(क)** तु.दासांचे चित्र पाहिले म्हणजे व ज्यांना त्यांचा साक्षात्कार प्रत्यक्ष, जागृतीत उघड्या डोळ्यांनी झाला आहे ते निःसंदेहपणे सांगू शकतात की, तु.दास सुन्दर, गौरवर्णी, अति तेजस्वी व विरागीवेष धारण केलेले होते. **अन्य मतांचा विचार आता करू :**

(१) इतर कोणी असते तर त्यांचे नाव गुप्त ठेवण्याचे कारण नव्हते. **'रामकृपे गिरि कामद बनती' 'जनका पाहुणचार किं करि महि'** (२७९।१,५) इ. असे स्पष्ट उल्लेख केलेच आहेत. २. तीन माणसांनी प्रवास करू नये म्हणून (कारण की आता प्रभु निषादराजाला परत पाठविणार आहेत) व साक्षी राहण्यासाठी **अग्नि** आला असे कोणी म्हणतात, पण अत्रि आश्रमांतून पंचवटीपर्यंतचा प्रवास तिघांनीच केला आहे. तेथे अग्नि का नाही आला? व तिघांनीच प्रवास कसा केला? 'नगच्छेतु ब्राह्मणत्रयं' असा आहे नियम; तो इतर वर्णांना लागू नाही. शिवाय पुरुष दोनच आहेत, तीन नाहीत. (३) **चित्रकूट गिरी** सामोरे आला. मग पंचवटी व प्रवर्षण गिरि का आले नाहीत? व नाव लिहिल्याने कोणता अनर्थ होणार होता? शंकर असणेसुद्धा शक्य नाही. त्यांनी रामाला नमस्कार-दण्डवत् केला नसता व रामांनी करू दिला नसता. रघुनंदन रामाला नमस्कार करणे तर दूरच राहो; पण रामावतार समाप्तीनंतर प्रत्यक्ष परमात्मा राम समोर प्रगट झाले असता शंकरांनी साधा नमस्कारसुद्धा केला नाही. (१।७६।५ टी.पहा) शंकरांनी लक्ष्मणाच्या पाया पडणे मुळीच शक्य नाही. **(४) हनुमान** असणे अगदीच अशक्य. कारण की किष्किंधेजवळ त्यांस रामलक्ष्मण भेटले असता त्यांनी त्यांना ओळखले नाही. मग येथे कसे ओळखणार? (५) **वाल्मीकि** त्रिकालदर्शी असल्याने राम भेटीस येणार आहेत हे त्यांस कळले असता

व वाल्मीकी रामाशी ऐश्वर्य भावाने वागत असता स्वागत करण्यासाठी एक दिवस आधी कशाला येतात व लघु वयाचे मुद्दाम होऊन येण्याचे कारण काय? यापैकी कोणाचेही नाव लिहिण्यास व ते परत गेल्याचे वर्णन करण्यास काय हरकत होती? रामप्रेम साकार होऊन आले हे म्हणणे त्यांतलेच. (६) **अगस्ति शिष्य** अरण्यकाण्डांत भेटणार आहेत व अगस्ति शिष्यच कां? अगस्ति किंवा इतर कोणी ऋषि का नाही? व नाव लिहिण्यास काय हरकत होती? तसेच **गालवपुत्राचे** येथे वैशिष्ट्य काय? यांची नावे पुढे करावयाची तर इतर विंध्यवासी वाटेल त्या मुनीचे किंवा मुनिपुत्र पौत्रांचे नांवही पुढे करता येईल. याप्रमाणे इतर कल्पनांची वासलात लागली. तु.दास रामचरित्र लेखकच असल्याने ते गेल्याचे वर्णन नाही ते योग्यच आहे. याप्रमाणे या परम गूढ कोड्याचे स्पष्टीकरण यथामति केले गेले.

*हिं.* *। राम सप्रेम पुलकि उर लावा । परम रंक जनु पारस पावा ॥१॥*
*। मनहुँ प्रेमु परमारथु दोऊ । मिलत धरें तन कह सबु कोऊ ॥२॥*
*। बहुरि लखन पायन्ह सोइ लागा । लीन्ह उठाइ उमगि अनुरागा ॥३॥*
*। पुनि सिय चरन धूरि धरि सीसा । जननि जानि सिसु दीन्हि असीसा ॥४॥*
*। कीन्ह निषाद दण्डवत तेही । मिलेउ मुदित लखि राम सनेही ॥५॥*
*। पिअत नयन पुट रूपु पियूषा । मुदित सुअसनु पाइ जिमि भूखा ॥६॥*

*म.* *। प्रेमें राम धरिति उरिं पुलकत । परम रंक जणुं परीस पावत ॥१॥*
*। जणूं प्रेम परमार्थ उभयही । भेटति तनुधर म्हणति सर्वही ॥२॥*
*। मग लक्ष्मण-पायां तो पडला । प्रेमभरानें धरुनि उठवला ॥३॥*
*। मग सीतापदरज धरि शीर्षा । जननि गणुनि शिशु दे आशीषा ॥*
*। करि निषादपति तया दण्डवत । रामस्नेहि गणुनि, मुद भेटत ॥५॥*
*। पीत नेत्रपुटिं रूप-सुधेला । मुदित मिळत मिष्टान्न भुकेला ॥६॥*

**अर्थ** : परम रंकाला परिसाचा लाभ व्हावा त्या प्रमाणेच जणू राम प्रेमाने पुलकित होऊन त्यांनी त्यास हृदयाशी धरला.॥१॥ सर्व म्हणतील - म्हणाले - की जणू प्रेम आणि परमार्थ शरीरधारी होऊन एकमेकांस भेटले.॥२॥ नंतर तो लक्ष्मणाच्या पाया पडला. (तेव्हा) लक्ष्मणाला प्रेमाचे भरते आले व त्याला

उठविला.॥३॥ मग त्याने जननी समजून सीतेच्या पायांची धूळ मस्तकावर धारण केली व सीतेने त्यास शिशु समजून आशीर्वाद दिला.॥४॥ (मग) निषादराजाने त्याला दण्डवत केला तेव्हा रामस्नेही जाणून त्यास भेटत असता तापसाला आनंद झाला.॥५॥ तो तपस्वी नेत्ररूपी ओष्ठ-पुटांनी रूपामृताचे पान करीत असा आनंदित झाला की जसा भूक लागलेला मनुष्य मिष्टान्न मिळाल्याने आनंदित होतो.॥३॥

**टीका. चौ. १-२ (१) परम रंक जणु परीस पावत** - परम रंक कोण व परीस कोण? जन्मरंक जणु परीस पावे (१।३५०।७) असे राम जनकपुरीतून घरी आल्यावर कौसल्यादि मातांना झालेल्या आनंदाचे वर्णन करताना म्हटले आहे. येथे तीच उत्प्रेक्षा आहे. तेव्हा परमरंक = तो तपस्वी व परीस = राम असे मानसाधारेच ठरले. **'हर्षति निरखत राम-पदांका । जणूं लाभला परीस रंका'** (२।२३८।३), यांत रामचरणचिन्हांना परीस म्हटले, म्हणजे रामचंद्रांसच परीस म्हटले आहे व भरत जणू रंक आहेत. याच्या उलट **रामप्रेमालाही परीस म्हटले आहे.** 'तुम्हीं कीर्ति विधु अनुपम केला । **रामप्रेम जिथें मृग वसला ॥ तात वृथा ग्लानीं मनिं करतां । करिं परीस दारिद्र्या डरतां** ॥ (२१०।२-३). या प्रमाणे तो तपस्वी परीस व राम जणू परम रंक आहेत. हा दुसरा अर्थ दुसऱ्या चौपाईने अधिक स्पष्ट होतो. **(क) प्रेम परमार्थ उभयही भेटति तनुधर** - यांत प्रेम = तपस्वी व परमार्थ = राम. देहधारी झालेला परमार्थ = देहधारी झालेले ब्रह्म. 'ब्रह्म राम परमार्थरूप ही' (९३।७) देहधारी प्रेम म्हणजे हा तपस्वी रामप्रेम जणू देह धारण करून जमिनीवर पडले होते त्याला देहधारी परमार्थाने उचलून हृदयाशी धरले. जमिनीवर पडलेला परीस परम रंक जसा उचलून घेतो व हृदयाशी धरतो तसाच या तापसाला रामचंद्रांनी धरला. **'प्रेम लुठत महिं जणु आवरलें'** असे निषादराजाविषयी म्हटले आहे. याप्रमाणे **तपस्वी परमरंक व राम परीस हा एक अर्थ** झाला आणि **राम परम रंक आणि तपस्वी परीस हा दुसरा अर्थ झाला.** दोन्ही अर्थ घेणे योग्य आहे; कारण भगवंताला असला प्रेममूर्ति भक्त दुर्लभ व भक्ताला भगवंताचे दर्शन व त्यांनी प्रेमाने मिठी मारून भेटणे दुर्लभ. **(ख) म्हणति सर्व ही** - ही भेट जशी भावावेशातील व हृदयांतच झाली तसेच ते जमलेले सर्व लोकही अलक्ष्यगति कवीला भावावेशातच असे म्हणताना ऐकू

आले. भावावेशातच सीतेने दिलेला आशीर्वाद पुढे कळला. ऐकू आला आहे. दुसरा अर्थ - नावाड्याने पाय धुतल्यावर जशी देवांनी पुष्पवृष्टी करून त्याची प्रशंसा केली तसेच भावावेशातच शिवब्रह्मा, इंद्रचंद्रादि सर्व देवांनी या भेटीचे वर्णन केले. फक्त पुष्पवृष्टी केली नाही.

**चौ. ३-५ - (१)** लक्ष्मणाने **प्रेमभरानें धरुनि उठवला** - प्रभूंनी ज्याला प्रेमाने हृदयाशी धरून जणू काय आपल्या हृदयात लपवून ठेवला, त्याला आपल्या पायांवर, प्रभूच्या देखत पडलेला ठेवणे रामसेवामूर्ति लक्ष्मणास बरे वाटले नाही. परम भागवत जाणून परम प्रेमाने उचलला. **(क) जननि गणुनि** - जननी मानून या अर्थाने मागल्या चरणांत व 'जननि शिशु गणुनि आशीषा दे' असे सीतेकडे लागतात हे रज शिरीं धरणे व सीतेने आशीर्वाद देणे वगैरे सर्व भावावेशांतीलच आहे.

**(२) करि निषादपति तया दण्डवत - भेटत** - रामस्नेही, रामसखा, रामसेवक आहे हे जाणून तापसाने निषादाला हृदयाशी धरला. त्याच्या अस्पृश्यतेचा विचार त्याला शिवलासुद्धा नाही. रामभक्त कितीही हीन जातीचा असला तरी त्याला पाहताच रामभक्ताला आनंद झाला पाहिजे आणि त्याचा अनादर, तिरस्कार करता उपयोगी नाही. पण असला रामभक्त, ज्याला प्रभु रामचंद्रांनी हृदयाशी धरला असा कोट्यवधि उपासकांत एखादा मिळाला तर महा भाग्य ! नुसते रामनाम जपू लागला म्हणजे रामभक्त झाला असे नाही. **'धर्मशील सुविरागी ज्ञानी । जीवन्मुक्त ब्रह्मपर प्राणी ॥ यांहुनि तो दुर्लभ सुरराया । रामभक्तिरत गतमदमाया'** (७।५४।६-७).

**चौ. ६ - (१) पीत नेत्रपुटिं रूप सुधेला** - रामरूपाला सुधा - पीयूष - अमृत म्हटले. कोणी पुट = पात्र असे म्हणतील तर ते येथे विसंगत ठरेल. एकच पेय दोन पात्रांनी एकदम पीत नाहीत. नेत्र दोन आहेत. रसपान करण्यास पात्र लागतेच असे नाही. दोन ओठांनी रसपान करता येते. एका ओठानेही करता येत नाही. दोन ओठांचा उपयोग करावा लागतो. ओठांना तु.दासांनी पुट म्हटलेच आहे. **'पुट सूखि गए मधुराधर वै'** (कवि. २।११) **'स्रवत नाथ आनन शशीं कथा सुधा रघुवीर ॥ श्रवणपुटीं पिउनियां मन तृप्त नसे मति धीर'** (७।५२ म) श्रवण = कान, दोन असतात. कथा हा कानांचा विषय आहे; म्हणून श्रवणपुटांनी पान

म्हटले; रूप नेत्रांचा विषय असल्याने नेत्रपुट म्हटले इतकेच. राममुखाकडे अत्यंत प्रेमाने टक लाऊन पहात चित्रासारखा तटस्थ राहिला. जेवढा वेळ तुलसीदास या रूपामृत पानांत तटस्थ राहिले तेवढ्या वेळांत शंकरांनी या दहा ओळी मागील ६ व्या चौपाईच्या पुढे लिहिल्या. येथे तपस्वी प्रकरण संपले. तपस्वी परत गेल्याचे किंवा रघुनाथांबरोबर गेल्याचे वर्णन नाही. याचे कारण टीकेत दाखविले आहे. आता तीरवासी लोकांची कथा गोस्वामी सांगू लागतात :

*हिं.* *। ते पितु मातु कहहु सखि कैसे । जिन्ह पठए बन बालक ऐसे ॥७॥*
*। राम लखन सिय रूप निहारी । होहिं सनेह बिकल नर नारी ॥८॥*
*हिं.दो.* *। तब रघुबीर अनेक बिधि सखहि सिखावनु दीन्ह ॥*
*॥ राम रजायसु सीस धरि भवन गवनु तेइँ कीन्ह ॥१११॥*
*म.* *। माय बाप ते वद सखि कैसे । जे धाडिति वनिं बालक ऐसे ॥७॥*
*। राम सिता लक्ष्मण छबि बघती । स्नेह - विकल नर नारी बनती ॥८॥*
*म.दो.* *। मग रघुवीर अनेकविध शिकवण देति सख्यास ॥*
*॥ रामाज्ञा शिरिं धरुनि तो करि भवना गमनास ॥१११॥*

**अर्थ** : (स्त्रिया म्हणतात) सखी ! ज्यांनी अशा बालकांस वनांत धाडले ते आईबाप आहेत तरी कसे?॥७॥ रामलक्ष्मण व सीता यांचे रूप पाहून पुरुष व स्त्रिया स्नेहाने व्याकुळ होऊ लागतात.॥८॥ मग रघुवीराने आपला सखा निषादराज याला नाना प्रकारे शिकवण दिली (समजूत घातली व उपदेश केला); तेव्हा त्याने रामाज्ञा शिरसामान्य करून घरी जाण्यासाठी गमन केले.॥दो.१११॥

**टीका.** - यमुनातीरवासी ग्रामस्थांचे वर्णन ११०।६ पर्यंत केले व अकस्मात मध्येच तपस्वी प्रकरण आले. ते (१११।६) मागल्या चौपाईत संपले व आता मागील कथा पुन्हा चालू होते. **चौ. ७** - (१) **सखि** शब्दाने सुचविले की बोलणाऱ्या स्त्रिया आहेत. त्यांना वाटणारा विषाद त्या आपसात व्यक्त करीत आहेत. ही चौपाई अगदी अक्षरशः जशीच्या तशी पूर्वी ८९।२ आलेली आहे. ८९।२ व १११।७ ही द्विरुक्ति सुचविते की वाटेने जाताना जेथे जेथे गावातील स्त्रिया या तिघांस पाहतात तेथे तेथे प्रत्येक ठिकाणी स्त्रियांच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतात. पुढे प्रत्येक ठिकाणी या वचनाचा उल्लेख केलेला नसला तरी ही भावना

व्यक्त केली जाते असे जाणून तेथे ही चौपाई अध्याहृत घ्यावयाची आहे. ८९।२ च्या पुढील **'कोणि म्हणति कृत भलें नृप भला । लोचनलाभ किं विधिनें दिधला'** (८९।३) ही चौपाई येथे अध्याहृत घ्यावयाची आहे व येथील पुढील चौपाई ८९।२-३ नंतर अध्याहृत समजावयाची आहे. अनेक ठिकाणी अशी चौपायांची किंवा चरणांची द्विरुक्ति मानसांत असून प्रत्येक ठिकाणी ती हेतुपूर्वक आहे. **'चौपायांची वा चरणांची पुनरुक्ति'** प्र. प्र. ८।१३ पहावे त्यांत पाच प्रकारची उदाहरणे व हेतु स्पष्ट करून दाखविले आहेत. चरणाच्या पुनरुक्तीचे उदाहरण पुढील चौपाईतच आहे.

**चौ. ८ - (१) रामसिता लक्ष्मण - छवि बघती । स्नेह विकल नर नारी बनती ॥१११।८॥ रामसिता लक्ष्मण छवि बघती । प्रेमें ग्राम नारिनर वदती ॥८९।१॥ रामसितालक्ष्मण छबि बघती । मिळे नयन फळ सौख्य पावती'** (११४।३) या तीन ठिकाणी प्रथमचरणाची पुनरुक्ति झाली आहे व प्रत्येक ठिकाणी दुसरा चरण निराळा आहे. यांत हेतु हा आहे की या प्रत्येक ठिकाणी बाकीच्या दोन ठिकाणच्या मागील पुढील वर्णन सुसंगत असेल तितके अध्याहृत घ्यावयाचे आहे. उदा. प्रेमे ग्रामनारिनरवदती व 'मिळे नयन फळ सौख्य पावती' हा अध्याहार येथे करावयाचा आहे व जेथे जेथे राम सीता लक्ष्मण वनमार्गाने जातात तेथे तेथे हे चार चरण अध्याहृत घ्यावयाचे हे या त्रिरुक्तीने दाखविले आहे. तसेच ११४।३ च्या पुढील **'सजल बिलोचन पुलक शरीरां । सर्वहि मग्न बघत रघुवीरा (११४।४) पासून 'कोणि नेत्रपथि छबि हृदिं आणी । होइ शिथिल तन मन वर वाणी'** (११४।८) पर्यंतचा भाग ८९।१ व १११।८ (म्हणजे या ठिकाणी) गृहीत धरावयाचा आहे. **कमीत कमी पुनरुक्ति करून जास्तीत जास्त भावना, अर्थ, अनुभव इत्यादी प्रतिपादन करून विस्तार वाचविण्याची ही अजब काव्यकला युक्ति आहे. पुनरुक्तीची** (चरणांच्या व चौपायांच्या) **स्थळे खाली दिली आहेत.**

(१) १।८।१; ७।४४।४ (२) १।१०।२; १।११२।४ (३) १।१८।५; ७।१२२।१२ (४) १।६४।८; ३।९।१ (५) १।१४६।२; ७।३५।३ (६) १।२०२।२; ७।११४।१ (७) १।७३।४; १।१६३।३ (८) १।७७।२; २।२९३।३ (९) २।१।८; २।१४९।६ (१०) २।१९।२; २।२६४।४ (११) २।५५।-;

२।१४९।७ (१२) २।८०।८; २।१५२।२। (१३) २।१०६।७; ३।३।६ (१४) २।१०८।७; २।१३४।२। (१५) २।१०३।८; २।१३४।७ (१६) २।११०।२; २।११६।२ (१७) २।१२५।२; ३।३।७; (१८) २।१२३।१; ३।७।२ (१९) २।१२३।२; ३।७।३ (२०) २।१०३।६; २।१४०।८ (२१) २।१३९।१-२; २।२१७।१-२ (२२) २।१४९।७; २।१६५ (२३) ४।५।७; ४।७।११ (२४) ५।२३।१; ६।१।८ (२५) ६।१०।७; ६।१३।४ (२६) ६।७१।६; ६।१०३।९ (२७) ६।७१।८; ६।१०३।९ या २७ स्थळी व वर टीकेत दाखविलेल्या २।१११।७ व २।१११।८ मिळून २९ ठिकाणी पुनरुक्ति सापडली आहे. या शिवाय आणखी नसतील असे या मंदबुद्धीस खात्रीपूर्वक सांगता येत नाही. या सर्व ठिकाणच्या पुनरुक्ती सहेतुक आहेत. टीकेत हेतू स्पष्ट केलेले दिसतील.

**दो. - (१) रघुबीर अनेकबिध शिकवण देति सख्यास** - प्रभुसंगतीत राहून १४ वर्षे सेवा करावी अशी गुहाची फार फार इच्छा असल्याचे वनवास प्रारंभी पाहिले आहे. तो खुषीने जाण्यास तयार होणे शक्यच नव्हते म्हणून नाना प्रकारे समजावून उपदेश करावा लागला. **(क) रघुबीर** शब्दाने येथे मुख्यतः धर्मवीरता, कृपावीरता व त्यागवीरता सुचविली आहे. गुहासारखा एकनिष्ठ सेवक सहज मिळाला असता त्याचा त्याग केला ही त्यागवीरता स्पष्ट दिसली. तीन त्यागी पुरुषांनी एकत्र राहणे हा धर्म नाही वगैरे सांगितले असेल. तसेच गुह राजा असल्याने त्याने राज्य व राजधानी सोडून फार दिवस बाहेर राहणे हा धर्म नाही वगैरे सांगितले असेल यात **धर्मवीरता** आहे. 'विशेष उदासी' या धर्माचे स्वतः पालन करता यावे म्हणून गुहाला परत धाडला. परत येताना तुम्हास भेटल्याशिवाय पुढे जाणार नाही वगैरे सांगितले असेल व माझे स्मरण करीत धर्माचे व स्वप्रजेचे पालन करीत निर्भय रहा इ. सांगितले असेल. **ही कृपावीरता. (ख)** 'मग सांगति **रघुबीर** मज जसें । आण आपली करिन मी तसें' अशी रघुवीर शपथ गुहाने घेतली आहे. तरी त्या शपथेची आठवणही दिली असेल; कारण ती अट पुरी केली नाही. तरीपण गुह काही प्रार्थना, विनंती न करता आज्ञा शिरसावंद्य मानून घरी जाण्यास चालू लागला ! (ग) गुह या यमुना तीरावरील गावाजवळून जेव्हा निघाला तेव्हा निदान २/३ तरी वाजले असतील.

उजाडल्यावर त्रिवेणीला जाऊन स्नान करून परत येऊन मुनींचा निरोप घेऊन निघाले. यमुनेपर्यंत २० मैल चालत आले. नंतर यमुना ओलांडून स्नान झाल्यावर चालू लागले व काही मैल आल्यावर आता गुह जात आहे. **शृंगवेरपुराहून निघाल्यापासून तिसऱ्या दिवशी तिसऱ्या प्रहरी २।३ वाजता गुह परत निघाला हे नीट लक्षात ठेवावे. राम अयोध्येहून निघाल्यापासून हा पाचवा दिवस आहे;** हेही विसरू नये. रामलक्ष्मण व सीता यांच्यासह प्रयागावरून प्रवास करून येण्यास ॥२॥ दिवस तरी लागलेच. प्रयागावरून आडवळण पडते; राजापुरावरून मधला रस्ता जवळचा असल्याने त्या रस्त्याने गुह गेला असे मानले तरी त्यास घरी पोचण्यास एक दिवस तरी लागणारच. चांदणी रात्र असल्याने रात्रीही थोडा प्रवास केला असे मानले तरी दुसऱ्या दिवशी सकाळी ९।१० वाजेपर्यंत गुह घरी पोचेल म्हणजे **रामवनवासाच्या सहाव्या दिवशी तो शृंगवेरपुरास पोचेल, इतके सध्या लक्षात असावे.**

*हिं.* *। पुनि सियँ राम लखन कर जोरी । जमुनहि कीन्ह प्रनाम बहोरी ॥१॥*
*। चले ससीय मुदित दोउ भाई । रबितनुजा कइ करत बड़ाई ॥२॥*
*। पथिक अनेक मिलहिं मग जाता । कहहिं सप्रेम देखि दोउ भ्राता ॥३॥*
*। राज लखन सब अंग तुम्हारे । देखि सोचु अति हृदय हमारें ॥४॥*

*म.* *। सिता राम लक्ष्मण कर जुळती । पुन्हा नमन यमुनेला करती ॥१॥*
*। बंधु मुदित सीतेसह निघती । रवितनुजेची वर्णित महती ॥२॥*
*। पथिं जातां बहु पथिक भेटती । भावां बघुनी प्रेमें म्हणती ॥३॥*
*। राजचिन्ह सब अंगीं तुमचे । बघुनि दुःख अति हृदयिं आमचे ॥४॥*

**अर्थ :** गुह परत गेल्यावर सीताराम व लक्ष्मण यांनी पुन्हा यमुनेला प्रणाम केला.॥१॥ व सीतेसह दोघे बंधू आनंदाने (पुढे) चालू लागले. जाताना रविकन्या यमुनेचे माहात्म्य वर्णन करीत चालले आहेत.॥२॥ रस्त्याने जात असता त्यांना अनेक वाटसरू (पायी प्रवासी) भेटले व ते या दोन भावांना पाहून प्रेमाने म्हणाले की - ॥३॥ तुमच्या शरीरांवर सर्व राजचिन्हे आहेत, ती पाहून (तुम्ही कोणीतरी महाराजे आहात हे ओळखून) आमच्या हृदयाला फारच दुःख होत आहे.॥४॥

**टीका.** - **चौ. १-२** (१) **पुन्हां नमन यमुनेला करती** - यमुनास्नान करून निघाले तेव्हा यमुनेला नमस्कार करून निघाले असे या 'पुन्हा' शब्दाने सुचविले. आणखी हे सुचविले की आता यमुनातीरापासून दूर जाणार म्हणून हा शेवटी नमस्कार केला. **(क) बंधु मुदित सीतेसह निघती** - निषादराजाची समजूत घालण्यासाठी उभ्याउभ्याच जरा मधे थांबले असतील म्हणून चालू लागण्याचा उल्लेख केला. २०।२५ मैलांपेक्षा अधिक चाल सकाळपासून झाली तरी पुढे चालू लागताना सीता आनंदित आहे. **'हार न खाइन मार्गी चालत । 'घडि घडि चरण सरोजां पाहत'** (६७।१) असे जे सीता म्हणाली ते येथे यथार्थ करून दाखविले. **(ख) रबितनुजा** शब्दाने रामचंद्रांचा व यमुनेचा समान वंशसंबंध सुचविला. यमुना कलिमलहरणि मनोहर आहे. बृहत्सोत्र रत्नाकरांत वगैरे गंगेच्या खालोखाल यमुनास्तुतिपर अनेक स्तोत्रे आहेत.

**चौ. ३-४** (१) **पथिं जातां बहु पथिक भेटती** - यावरून ठरते की हा भाग त्या वेळीसुद्धा रहदारीचा होता. त्या प्रवाशांत काही चांगले सामुद्रिक ज्योतिषि होते. त्यांनी या दोघा भावांकडे निरखून पाहताच त्यांना सर्व राजचिन्हे दोघा भावांच्या अंगावर दिसली. सर्व राजलक्षणे सहसा कोणाच्याच अंगावर आढळत नाहीत, असे असता सर्वच आढळल्याने त्यांनी जाणले की हे कोणीतरी अलौकिक महाराजपुत्र असले पाहिजेत. अत्यंत सौंदर्यसंपन्न, अति कोमल, महाराजपुत्र असून पायी, अनवाणी, छत्री नाही, नोकर नाही, वैशाखाचा महिना, कडक उन्हाळा, उन्ह कडक पडलेले असून चालत जात आहेत असे पाहून त्यांस विशेष वाईट वाटणारच. राजकुमार आहेत हे ज्यांना कळले नाही किंवा ज्यांना हे मुनिकुमार वाटले त्यांना इतके वाईट वाटणे शक्य नाही. **(क) राजचिन्हें** - भरदार आरक्त मांसल पायांचे तळवे व त्यांवर खोटेच्या पुढल्या भागापासून मधल्या बोटापर्यंत अगदी सरळ, ऊर्ध्व, रेषा मातीत पडलेल्या पावलांच्या चिन्हात स्पष्ट दिसणे अगदी शक्य होते. सिंहासारखी कटि, कंबर; आजानुबाहू; उंच, भरदार रुंद (विशाल) छाती, वर्तुळाकार, सुंदर, सतेज मुख; उदरावर त्रिवली; शंखासारखा गळा, त्रिवली असलेला, लाल लाल ओठ, नेत्र अत्यंत तेजस्वी, लाली असलेले, विशाल; सुंदर मोठे पण लहान छिद्र असलेले कान; उघडलेल्या

छत्रीसारखा मस्तकाचा आकार, इत्यादी अनेक राजचिन्हे दिसली. वा.रा. ५।३५।१५-२० यांत शरीराच्या चिन्हांचे वर्णन आहे.

हिं. *। मारग चलहु पयादेहि पाएँ । ज्योतिषु झूठ हमारें भाएँ ॥५॥*
*। अगमु पंथु गिरि कानन भारी । तेहि महँ साथ नारि सुकुमारी ॥६॥*
*। करि केहरि बन जाइ न जोई । हम सँग चलहिं जो आयसु होई ॥७॥*
*। जाब जहाँ लगि तहँ पहुँचाई । फिरब बहोरि तुम्हहि सिरु नाई ॥८॥*

म. *। अनवाणी चालतां हि वाटें । आम्हां ज्योतिष खोटें वाटे ॥५॥*
*। पथ दुर्गम गिरि कानन भारी । त्यांत सवें नारी सुकुमारी ॥६॥*
*। करि केसरि वृक बघवेना वन । येउं सवें जर या अनुशासन ॥७॥*
*। जेथें जाणें तिथें पोचवुनि । येउं परत शिर तुम्हांस नमवुनि ॥८॥*

**अर्थ** - (सर्व सामुद्रिक राजचिन्हे तुमच्या अंगावर असून) तुम्ही अनवाणी पायी चालत वाटेने जात आहात (हे पाहून) आम्हास वाटते की सामुद्रिक ज्योतिष खोटे असले पाहिजे.॥५॥ मार्ग फार दुर्गम, डोंगर (मोठाले) व अरण्य घनदाट, आणि त्यांतही तुमच्याबरोबर अति सुकुमार स्त्री आहे.॥६॥ हत्ती, सिंह, लांडगे असल्याने वनाकडे बघवतसुद्धा नाही. (म्हणून) जर आपण अनुज्ञा - परवानगी - देत असाल तर आम्ही आपल्याबरोबर (वाटाडे, सोबत व संरक्षक म्हणून) येतो.॥७॥ तुम्हाला जिथे जाणे असेल तिथे (कुशल) पोचवू व तुम्हाला नमन करून (सेवकांप्रमाणे) आम्ही परत येऊ.॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) ज्योतिष खोटें वाटे** - भाव हा की तुमच्या अंगावरील सामुद्रिक चिन्हांवरून तुम्ही कोणीतरी मोठे महाराजाधिराज असणे जरूर होते; पण त्या ऐश्वर्याचे एकही चिन्ह तुमच्याजवळ दिसत नाही. अमूल्य वस्त्रे, भूषण, रथ, हत्ती, सैन्य, मुकुट, छत्र, शरीरसंरक्षक इ. काहीच नाही. पायांत काही नाही, अंगावर मुनिवस्त्रे आणि तापलेल्या धुळींतून चालत आहात. ही वस्तुस्थिती सामुद्रिक चिन्हांच्या अगदी उलट आहे. त्यामुळे ज्योतिष शास्त्रांतील वर्णनच खोटे असले पाहिजे असे आम्हाला वाटू लागले आहे.

**चौ. ६-७ (१) पथ दुर्गम - इत्यादि** - आधी रस्ता सापडणे कठीण, त्यांतही उंच उंच डोंगर चढायचे, उतरायचे आणि त्यांतही घनदाट किर्र अरण्य. असे

असून बरोबर अति सुकुमार स्त्री. तशांतही या अडचणीच्या घोर अरण्यात हत्ती, सिंह, लांडगे, वाघ, रानडुक्कर इत्यादी घोर प्राणी पुष्कळ आहेत. त्यामुळे हे अरण्य इतके भयानक आहे की तुम्हाला उघड्या डोळ्यांनी त्यांच्याकडे बघवणार नाही. यांना धनुर्बाणादी जणू दिसलेच नाही ! हा वात्सल्याचा प्रभाव !

**चौ.८ - (१) येउ परत शिर तुम्हांस नमवुनि** - आम्हाला तुमच्याबद्दल जी धास्ती वाटते ती राहू नये, आमचे दुःख थोडेतरी कमी व्हावे म्हणून तुम्हाला तुमच्या मुक्कामापर्यंत पोचविण्यास यावे असे आम्हाला फार वाटते. आम्हाला काही मोबदला नको; दिलात तरी आम्ही घेणार नाही. आपण स्वामी व आम्ही सेवक या भावनेनेच आम्ही बरोबर येऊ इच्छितो, अनुज्ञा द्यावी.

***हिं.दो.*** ***। एहि बिधि पूँछहिं प्रेमबस पुलक गात जलु नैन ॥***
***॥ कृपासिंधु फेरहिं तिन्हहि कहि बिनीत मृदु बैन ॥११२॥***

***म.दो.*** ***। प्रेमें विनवित असें, जल नेत्रिं, गात्र पुलकीत ॥***
***॥ कृपासिंधु त्यां फिरविती मृदु वचनें सुविनीत ॥११२॥***

**अर्थ** - (हे वाटसरु ज्योतिषी) या प्रमाणे विनवीत असता त्यांच्या नेत्रांतून अश्रू गळू लागले व देह रोमांचित झाले. कृपासिंधु रामचंद्रांनी मृदु व अति नम्र वचने बोलून त्यांस परत पाठविले (आपल्या बरोबर येऊ दिले नाहीत.)॥दो.११२॥

**टीका. - (१)** आपल्याला पोचवून हे परत जाणार म्हणजे यांना निष्कारण दुप्पट तरी कष्ट भोगावे लागणार; घरी पोचण्यास भलताच उशीर होणार व यांच्या घरची मंडळी चिंताग्रस्त होणार; असे वाटले म्हणून **कृपासिंधु** म्हटले. शिवाय त्यांची ती प्रेमदशा पाहून त्यांच्यावर कृपा केली व आपली दुर्लभ भक्ति त्यांस दिली. कारण त्यांना कशाचीही अपेक्षा नसून प्रेमाने हृदय भरलेले आहे व रामसेवा करण्याची लालसा आहे. परदुःखांने दुःखी होणे हे संतलक्षण आहे; व रामसेवेसाठी निःस्वार्थ बुद्धीने, घरादाराचा ओढा सोडून, देहकष्ट सोसण्यास तयार झाले आहेत. **अशांना राम कृपासिंधु बनले म्हणजेच भक्ति दिली.**

(२) **मृदु वचनें सुविनीत** - आपण लक्षणांनी अनुमान केलेत ते खरे आहे. ज्योतिष शास्त्र खरे आहे. आम्ही महाराजपुत्र, अस्सल क्षत्रिय कुळातले, धनुर्धारी आहोत. आम्हाला कसलेही भय नाही. मातापितरांच्या व विप्रांच्या कृपाशीर्वादाने

व पुण्याईने आम्ही सुखाने सहज इष्ट स्थळी जाऊ बरं ! आपण जरासुद्धा चिंता करू नका. आम्ही पितृवचनाची पूर्ति करण्यासाठी हर्षाने वनात जात आहोत व हे व्रत स्वीकारले आहे. आमच्या कुलरीतीप्रमाणे स्वतःच्या सुखासाठी ब्राह्मणांकडून सेवा घेणे अधर्म आहे. आम्हीच आपली सेवा करणे आमचे कर्तव्य आहे. नारी बरोबर असली तरी ती क्षत्रिय कुमारी, क्षत्रियाणी आहे व आम्ही दोघे धनुर्धर बंधू बरोबर असता तिला कोणाचे व कशाचे भय ! आपल्यासारख्या हरिभक्त विप्रांच्या कृपेने आम्ही निर्भय आहोत व हे रस्ते, अरण्य वगैरे आम्हा कोणालाही दुर्गम व भयानक वाटत नाहीत, इत्यादी प्रकारे सांगितले. आपल्या घरची मंडळी वाट पाहतील तरी आता आपण वेळ न मोडता घरी जाणे चांगले.

*हिं.* *। जे पुर गाँव बसहिं मग माहीं । तिन्हहि नाग सुर नगर सिहाहिं ॥१॥*
*। केहि सुकृतीं केहि घरीं बसाए । धन्य पुन्यमय परम सुहाए ॥२॥*
*। जहँ जहँ राम चरन चलि जाहीं । तिन्ह समान अमरावति नाहीं ॥३॥*
*। पुण्यपुंज मग निकट निबासी । तिन्हहि सराहहिं सुरपुर बासी ॥४॥*
*। जे भरि नयन बिलोकहिं रामहि । सीता लखन सहित घनस्यामहि ॥५॥*

*म.* *। जे पुर गांव पथीं त्या असती । त्यां अहि-सुर-पुर सेर्षा स्तवती ॥१॥*
*। सुकृति कवण घडिं बसवी पावन । धन्य पुण्यमय परम सुशोभन ॥२॥*
*। चालत राम जिथें पदिं जाती । त्यां समान अमरावति ना ती ॥३॥*
*। पुण्यपुंज पथ-निकट निवासी । तयां प्रशंसिति सुरपुरवासी ॥४॥*
*। डोळे भरून बघति जे रामा । सीता लक्ष्मण सह घनश्यामा ॥५॥*

**अर्थ -** जी खेडी व गावे (रामचंद्रांच्या) वाटेत आहेत त्यांची नाग (अहि) व देव (सुर) नगरे ईर्षापूर्वक स्तुती करू लागली - की - ॥१॥ कोणत्या पुण्यपुरुषाने व कोणत्या पावन मुहूर्तावर (घडिं) बसविली असतील (बरे) ! ही सर्व धन्य आहेत, पुण्यमय आहेत व फार शोभत आहेत.॥२॥ राम जिथे जिथे पायी चालत जात आहेत त्या स्थानांसारखी अमरावती (इंद्रपुरी) सुद्धा नाही.॥३॥ रामचंद्रांच्या मार्गाच्या जवळ राहणारे लोक पुण्यराशी आहेत (अशी) त्यांची प्रशंसा सुरपुरीत राहणारे लोकसुद्धा करतात (कारण की) हे लोक सीता व लक्ष्मण यांच्यासह घनश्याम रामास डोळे भरून पाहतात.॥२५॥

**टीका. चौ. १-३** (१) ज्या गावांच्या जवळून राम जात आहेत त्यांची महती कवि चेतनोक्तिद्वारा (personification) वर्णन करीत आहेत. **'जाति यदा ते गांवा बरुनी । नरनारी छवि बघति धाउनी ॥ होति सनाथ जन्मफल पाउनि । दुःखी फिरति सवें मन धाडुनि'** (१०९।७-८) वगैरे वर्णन व पुढे **'गांवोगांविं असा आनंदू । बघुनि भानुकुल कैरवचंदू'** (१२२।१) असे जें म्हटले आहे व १०९ पासून १२२ पर्यंत मार्गावरील आनंदाचे जे खंडशः वर्णन केले आहे त्याप्रमाणे सर्व गोष्टी प्रत्येक गावी घडू लागल्या. स्त्रियांनी सीतेला रामलक्ष्मणाविषयी नाजुक विनोदी प्रश्न विचारणे; तिने मोठ्या युक्तीने त्याचे सुंदर उत्तर देणे; हे वनात का आले, कोणी धाडले, स्वतःचे भाग्य, इत्यादीचे वर्णन वगैरे सर्व गोष्टी प्रत्येक गांवी घडल्या व घडणे स्वाभाविक आहे. परंतु तेच तेच वर्णन प्रत्येक ठिकाणी करण्याने रसहानि होते व ग्रंथ वाढतो; म्हणून पुरवून पुरवून भागशः वर्णन केले आहे. मागील व पुढे वर्णिलेल्या सर्व गोष्टी यमुनातीराजवळील गावांजवळ राम येताच प्रथम घडल्या म्हणून येथे मार्गावरील गावे व त्यात राहणारे लोक यांच्या भाग्याचे वर्णन पुढील आनंद वर्णन करण्यापूर्वी करीत आहेत. या पहिल्या तीन चौपायांत मार्गावरील गावांच्या भाग्याचे वर्णन आहे व पुढील दोन चौपायांत लोकांच्या भाग्याचे वर्णन आहे.

(२) **त्या अहि-सुर-पुर सेर्षा स्तवती - अहिपुर = नागनगरी - भोगावती व सुरपुर = देवनगरी अमरावती,** स्वर्गपुरी. भाव हा की स्वर्गापासून पाताळापर्यंत व पाताळापासून स्वर्गापर्यंत जेवढी सुंदर, ऐश्वर्यसंपन्न, सुखसमृद्ध मोठमोठी नगरे आहेत, त्यांना जे भाग्य लाभले नाही ते या दाट अरण्यातील खेडेगावांना लाभले; म्हणून अमरावती नगरी व भोगावती पुरी वगैरे सर्व नगरे या खेड्यांची ईर्षा करू लागली की आम्ही एवढी प्रसिद्ध असून आमच्या जवळून प्रभू जात नाहीत; प्रभूच्या अंगावरून येणारा पवनसुद्धा आम्हाला स्पर्श करून पावन करीत नाही. तरी या रानटी खेडेगावांनी असे कोणते पुण्य केले की आता सीता रामांच्या चरणरजाचा स्पर्श होत आहे? कोणते पुण्यात्मे यांना वसविण्यास गेले होते? व अशा कोणत्या शुभ-पावन मुहूर्तावर ही वसविली गेली की यांच्याजवळून प्रभु आज जात आहेत? भाव हा आहे की आमची वसाहत अति मोठ्या

पुण्यात्म्यांनी अति शुभ मुहूर्तावर केली असून आमच्या भाग्यात हे सुख का नाही व या रानटी गावच्या व रानटी लोकांच्या भाग्यात हे कुठून आले? अशा प्रकारे प्रशंसा तर करतातच; पण ईर्षाही करतात. पण या मोठ्या ऐश्वर्य संपन्नाना व प्रतिष्ठावंतांना कळत नाही की स्वतःजवळ ऐश्वर्याच्या व प्रतिष्ठेच्या प्रमाणात अहंकाराचा गड्डा (कॅन्सर) सुद्धा तितकाच मोठा आहे; म्हणून त्यांच्या भाग्यात हे सुख व हा परमानंद नाही. (क) दुसरे हे दाखविले की एखाद्या गावाची किंवा नगराची स्थापना, वसाहत ज्या मुहूर्तावर व ज्या कोणी केली असेल त्या प्रमाणे त्या गावांना व तेथील रहिवाशांना फळ मिळते. हे जितके खरे तितकेच देवतांच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठायुक्त अर्चा करण्याविषयी खरे आहे.

(३) **चालत राम जिथें पदिं जाती -** जिथें सगुणसाकार प्रभु आपल्या स्वतःच्या इच्छेने, आपले पाय लावतात ते स्थान अमरावती - इंद्रनगरीपेक्षाही श्रेष्ठ, फार भाग्यवान व अधिक सुखी समजावे. या प्रमाणे अमरावती व भोगावती वगैरे नगरे या खेडेगावांची महती वर्णितात.

**चौ. ४-५** (१) प्रभूच्या मार्गाजवळील गांवचे लोक धाम व कामकाज विसरून प्रभु दर्शनासाठी धावत जातात. रामरूपामृताचे पान करून, मन रामाबरोबर पाठवून, नेत्रसाफल्य व जन्म साफल्य पावतात; म्हणून देव लोकांतील देवसुद्धा त्यांची प्रशंसा करतात. **ल.ठे.** येथे हे दाखविले की दरिद्री, अडाणी, अशिक्षित, रानटी, गावंढळ असून ज्याला श्रीरामलक्ष्मण व सीता यांचे दर्शन घडेल व ज्याचे मन कामधंदा, घरदार, लोकलज्जा विसरून रामरत होईल तो ब्रह्मादि सर्व देवांनी प्रशंसा करण्यास पात्र आहे. प्रयाग सर्व तीर्थांचा राजा, मोठे नगर, पण भरद्वाज ऋषी व त्यांचे काही शिष्य यांच्याशिवाय बटु, तापस, मुनि, सिद्ध, संन्यासी व शहरातील गृहस्थ इ. कोणी या अरण्यवासी नीच जातींच्या लोकांसारखे रामप्रेमी, रामचरणरत आढळले का? असा फरक पडण्यातील मुख्य हेतु घनशाम या शब्दाने ध्वनित केला आहे. राम श्यामकृपाघन असल्याने अशा निरहंकारी, स्वभावतः प्रेमळ साध्याभोळ्या गांवढळ लोकांना भक्तिप्राप्त होईल यांत नवल काय ! 'कृपावारिधर राम खरारी' (६|७०|४) 'सान्द्रानन्द पयोद - सौभगतनुं' 'कन्दावदातम्' कन्दः जलद ।

*हिं. । जे सर सरित राम अवगाहहिं । तिन्हहि देव सर सरित सराहहिं ॥६॥*
*। जेहि तरु तर प्रभु बैठहिं जाई । करहिं कलपतरु तासु बड़ाई ॥७॥*
*। परसि राम पद पदुम परागा । मानति भूमि भूरि निज भागा ॥८॥*
*हिं.दो. । छाँह करहिं घन बिबुधगन बरषहिं सुमन सिहाहिं ॥*
*॥ देखत गिरि बन बिहग मृग राम चले मग जाहिं ॥११३॥*
*म. । ज्या सरिं सरितिं राम अवगाहति । तयां देव-सर-सरिता वानति ॥६॥*
*। प्रभु ज्या तरुतळिं जाऊनि बसती । तया कल्पतरु महान म्हणती ॥७॥*
*। रामपदांबुज - पराग लागत । भूमि भूरि निज भाग्या मानत ॥८॥*
*म.दो. । छाय करिति घन विबुध सुम वर्षोनी स्तवितात ॥*
*॥ निरखत गिरि वन विहग मृग मार्गी राम जातात ॥११३॥*

**अर्थ** - ज्या तलावात किंवा नद्यांत रामचंद्रांनी स्नान केले किंवा त्यात प्रवेश केला त्यांची देवांचे तलाव व देवसरिता प्रशंसा करू लागतात.॥६॥ प्रभु ज्या ज्या झाडांखाली बसतात त्यांना कल्पतरु (आपल्यापेक्षा) मोठे-श्रेष्ठ म्हणू लागले.॥७॥ रामचरण कमलांच्या परागांचा (धुळीचा) स्पर्श झाल्याने (ती ती) भूमी आपले भाग्य अत्यंत थोर आहे असे मानू लागली.॥८॥ मेघ छाया करू लागले; विबुध (देव) पुष्पवृष्टी करून प्रभूची स्तुती करू लागले; (पण तिकडे लक्ष न देता) राम पर्वत, पक्षी, पशू वगैरेंचे निरीक्षण करीत मार्गाने जात आहेत.॥दो.११३॥

**टीका. चौ.६-७ (१) देवसर = सरिता** - देवसर व देवसरिता या पृथ्वीवरील समजणे उचित नाही. गंगेमध्ये रामचंद्रांनी अनेक वेळा स्नान, पान, देवतापूजनादी केले आहे व या वनातील नद्यांपेक्षा तिचे भाग्य अधिक आहे. कारण की या वनांतील सरसरितांत, प्रत्येकांत स्नानादि सर्व क्रिया केल्या असणे शक्य नाही. कुठे रस्त्याने जाताना एखाद्या नदीतून चालत गेले असतील, कुठे चूळ भरली असेल व कुठे पाणी प्यायले असतील. स्नानाची वेळ सकाळी मुक्कामाच्या जागीच येणार व आज दोन वेळा (गंगा व यमुना) स्नान झाले आहे. पूर्वीच्या व पुढील संदर्भानेसुद्धा स्वर्गातील तलाव व सरिताच येथे समजणे योग्य आहे. अमरावती, सुरपुरवासी, कल्पतरु इ. सर्व स्वर्गातीलच आहेत. **(क) अवगाहति** - स्नान करतात,

प्रवेश करतात, पाय घालून पाणी किती खोल आहे ते पाहतात. त्यांतून चालत पलीकडे जातात. ज्यांच्या पायांच्या नखाच्या स्पर्शाने परम पावन झालेले जल गंगा झाली, त्यांनी आपले दोन्ही पाय, हात वगैरे ज्यांत बुडविले त्या या नद्या-तलावांच्या भाग्याची प्रशंसा स्वर्गातील तलाव-सरिता करतात.

(२) **तयां कल्पतरु महान म्हणतीं** - कल्पतरु स्वर्गात असतात; ते कधी प्रभूच्या सेवेचा लाभ घेऊ शकत नाहीत. पण या पृथ्वीतलावरील ज्या वृक्षांखाली रामसीता-लक्ष्मण जाऊन बसतात त्याचे भाग्य कल्पतरुपेक्षा फार मोठे ! त्यांनी आपल्या छायेने फुलांनी-फळांनी प्रभूची सेवा केली, प्रभूला विश्रांती मिळाली, सुगंध मिळाला इ. हे वृक्ष पूर्वजन्मी कोणीतरी महातपस्वी, संतच असले पाहिजेत इ. प्रकारे कल्पतरुंनी त्यांच्या भाग्याची प्रशंसा केली.

**चौ. ८ - (१) भूमि भूरि निज भाग्या मानत** - ज्यांच्या अल्पशा पादरजस्पर्शाने पापीण अहल्येचा उद्धार केला त्यांच्या पावलांचाच स्पर्श मला जागोजागी अनंत वेळा होत आहे. त्याअर्थी माझे भाग्य भूरि (पुष्कळ, प्रचुर; येथे) अपार, अमित आहे असे भूमिला वाटू लागले. धन्यता वाटली.

(२) वरील आठ चौपायांत दाखविले की ज्या जड अथवा चेतन वस्तूंचा संबंध सगुण साकार भगवंताशी येतो ते स्थान, ती व्यक्ति, चर वा अचर अति भाग्यवंत म्हटले पाहिजेत. **'पथिं जड चेतन जिव जगिं नाना । ज्यां बघती प्रभु दिसेल ज्यांना ॥ झाले परम पदा अधिकारी'** (२१७।१-२) । देव तर स्वार्थी आहेत !

**दो. -** (१) वैशाख महिना, कडकडीत, रखरखीत उन्हाळा, पायात काही नाही म्हणून **मेघ छाया करीत आहेत** व देव पुष्पवृष्टी करू लागले; पण मही मृदू झाली नाही. मार्ग प्रभूंना मंगलमूल झाला नाही. सुखद, सुंदर, मंद, सुगंधी, शीतल वारा वाहू लागला नाही. **'बघुनि दशा सुर वर्षति फूल । मही मृदुल पथ मंगलमूल ॥८॥ करित जाति छाया जलद, सुखद, वहत वर वास ॥ पथ न होइ रामा तसा जैसा भरता जात'** । (२१६) **'रामदास रामाहुनि मोठे'** हे भरताच्या बाबतीत दाखवावयाचे असल्याने भगवंताच्या इच्छेमुळेच हा फरक पडला.

(२) **निरखत गिरि वन विहग मृग राम मार्गि जातात** - देवांनी पुष्पवृष्टी

केली पण प्रभूंनी त्यांच्याकडे वर मान करून पाहिले नाही. **'देव सदा स्वार्थी...'** (६|११०|२) हे प्रभु जाणतात. राम गिरि, वन, पक्षी, पशु यांच्याकडे पाहू लागले. ज्यांच्याकडे प्रभूंनी पाहिले आणि ज्यांनी प्रभूंना पाहिले ते सर्व परमपदाचे (मोक्षाचे) अधिकारी झाले (२१७|२). **'धन्य धरणि पथ पर्वत कानन । जेथें कृत तुम्हिं नाथ ! पदार्पण ॥ धन्य विहग मृग काननचारी । सफल-जन्म तव-दर्शनिं सारीं'** (१३६|१-२) **(क)** पुढे जाताना जे जे गाव लागले तेथील घटनांचे वर्णन आता पुढील चौपाईपासून दो. १२२ पर्यंत करतात. **नऊ दोहे आहेत.**

*हिं. । सीता लखन सहित रघुराई । गाँव निकट जब निकसहिं जाई ॥१॥*
*। सुनि सब बाल वृद्ध नर नारी । चलहिं तुरत गृह काजु बिसारी ॥२॥*
*। राम लखन सिय रूप निहारी । पाइ नयन फलु होहिं सुखारी ॥३॥*
*। सजल बिलोचन पुलक सरीरा । सब भए मगन देखि दोउ बीरा ॥४॥*

*म. । लक्ष्मण सीते सहित रघुपती । जैं जैं गांवावरुनी जाती ॥१॥*
*। ऐकत बाल वृद्ध नारी नर । जाति काज गृह विसरुनि सत्वर ॥२॥*
*। राम - सिता - लक्ष्मण - छबि बघती । मिळे नयन फळ सौख्य पावती ॥३॥*
*। सजल विलोचन पुलक शरीरां । सर्वहि मग्न बघत युग वीरां ॥४॥*

**अर्थ** - सीता व लक्ष्मण यांसह रघुपति (रघुराज) ज्या ज्या वेळी एखाद्या गावाजवळून निघतात.॥१॥ त्या त्या वेळी ते कळताच (ऐकताच) बालकांपासून वृद्धांपर्यंत स्त्रिया व पुरुष आपापले घर व घरकाम विसरून (रामादी तिघांना पाहण्यासाठी) त्वरेने निघतात (जातात) ॥२॥ रामलक्ष्मण व सीता यांचे रूप निरखून पाहतात, त्यांना नेत्रफळ मिळते व ते सुखी होतात.॥३॥ नेत्र अश्रूंनी भरतात, अंगावर रोमांच उभे राहतात व सर्व या दोन वीरांना बघत प्रेममग्न होतात.॥४॥ (असे गावोगावी चालते).

**टीका. - चौ. १-२ (१) रघुपती (रघुराई)** - 'रघुकुलरीतिस कदा खंड ना । जावो प्राणहि **वचन-भंग ना'** (२८|४) या रघुकुलरीतीचे पालन करणे असल्याने गावांतून न जाता, गावाच्या जवळून बाजूने जातात. ग्रामांत प्रवेश करावयाचा नाही हे व्रत आहे. **(क) बाल वृद्ध** - मुलांना खेळ फार प्रिय असतो **'बालस्तावत्क्रीडाऽसक्तः'** परंतु त्या सुन्दर रूपांचे वर्णन कानी पडताच लहान मुले

सुद्धा पाहण्यासाठी धावत निघाली व 'वृद्धस्तावत् चिन्तामग्नः' असावयाचे आणि 'अंगं गलितं पलितं मुण्डं । दशन विहिनं जातं तुण्डं ॥ असे असले तरी । वृद्धा यान्ति गृहीत्वा दण्डं । चित्तं तत् - श्रुत - रूपासक्ते' असे जक्खड म्हातारे-म्हाताऱ्यासुद्धा त्या ऐकलेल्या रूपावर आसक्त होऊन काठी टेकीत टेकीत पण लगबगीने चालले; मग तरुण तरुणींचे व कुमार कुमारींचे काय विचारावे ! **(ख) गृह काज विसरुनि** - ११०।१ गू.चं.प.

**चौ.३-४ (१) राम-सिता लक्ष्मण-छवि बघती - पावती - १११।८ गू.चं.प. 'प्रेमें ग्राम नारि नर वदती ॥ माय बाप ते वद सखि कैसे । जे धाडिति वनिं बालक ऐसे ॥ आणि 'स्नेह विकल नरनारी बनती'** हे चरण येथे अध्याहृत घ्यावयाचे आहेत. तसेच 'जैं जैं गावावरूनी जाती' (चौ.१) हा चरण पूर्वी 'जाति यदा ते गांवा वरुनी' (१०९।७) असा आलेला आहे. या द्विरुक्तीने सुचविले की **'नरनारी छवि बघति धाउनी ॥ होति सनाथ-जन्मफल पावुनि । दुःखी फिरती सवें मन धाडुनि'** हे तीन चरण येथे अध्याहृत घ्यावयाचे आहेत. म्हणजेच स्पष्ट होते की बालवृद्ध लगबगीने त्यांच्या शक्ती प्रमाणे त्वरेने आले व बाकी नारीनर धावतच आले. **(क) सर्वहि मग्न बघत युग वीरां** - मात्र बाल असोत, वृद्ध असोत की तरुण-तरुणी, कुमार-कुमारी असोत रामलक्ष्मणांच्या दर्शनाने सर्वांची दशा सारखीच झाली. सर्वच रामप्रेममग्न झाले. सर्वांच्या ठिकाणी प्रेमाने सात्त्विक भाव उत्पन्न झाले. सर्वांना सुख झाले व नेत्रसाफल्य वाटले. जन्म साफल्य पूर्वीच्या चौपायांतून गृहीत आहेत. गीतावलीतील १५-२० ही सहा पदे मुद्दाम पहावी. तेथे प्रथम स्त्रियाच या दोन वीरांचे वर्णन करीत आहेत. या लोकांना कसा व किती आनंद झाला ते आता उत्प्रेक्षेने सांगतात :

*हिं.* *। बरनिं न जाइ दसा तिन्ह केरी । लहि जनु रंकन्ह सुरमनि ढेरी ॥५॥*
*। एकन्ह एक बोलि सिख देहीं । लोचन लाहु लेहु छन एहीं ॥६॥*
*। रामहि देखि एक अनुरागे । चितवत चले जाहिं सँग लागे ॥७॥*
*। एक नयन मग छबि उर आनी । होहिं सिथिल तन मन बर बानी ॥८॥*

*म.* *। दशा तयांची नाहिं वर्णवत । सुरमणिरास रंक जणुं पावत ॥५॥*
*। बाहुनि दे शिकवण कोणा कुणि । लोचन-लाभ लुटा जा या क्षणिं ॥६॥*

*। रामा बघत कुणी अनुरागति । निरखत संगें जाऊं लागति ॥७॥*

*। कोणि नेत्रपथिं छबि उरिं अणुनी । होति शिथिल तन-मन वर वचनीं ॥८॥*

**अर्थ** - त्यांची (प्रेम) दशा वर्णन करून सांगणे शक्य नाही; पण जणू काय रंकाना सुरमण्यांची (चिंतामणीची) रास सापडावी तसे त्यांस झाले.॥५॥ कोणी कोणाला बोलावून उपदेश करतात की जा, या क्षणी जा व नयनलाभ लुटा ॥६॥ कोणी रामाला पाहून त्यांच्याकडे निरखून बघत बघत त्यांच्या मागोमाग जाऊ लागतात.॥७॥ कोणी नयन मार्गाने रामचंद्रांना हृदयात आणून शरीराने, मनाने व श्रेष्ठ वाणीने शिथिल होतात. (शरीर, मन व चारी वाणी यांची कार्ये बंद पडतात).॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) गीतावलीत म्हटले आहे की 'दिनकरकुल-मनि निहारि, प्रेममग्न ग्राम नारि । परसपर कहै सखि ! अनुराग ताग पोऊ** ॥ (२।१६।३) सूर्यकुल शिरोमणि रामास पाहून ग्राम नारी प्रेममग्न झाल्या व एकमेकींस म्हणतात की सखी ! या मण्याला प्रेमरूपी सूत्रांत (दोऱ्यांत) ओवून घ्या. असे केवळ स्त्रियांचेच वर्णन आहे. पण येथे मागील चौपाईत 'सर्वहि मग्न' असे स्पष्ट म्हटले आहे म्हणून येथे सर्वांच्या बद्दलच वरील भावना घेणे भाग आहे. (क) सुरमणि = चिंतामणि, हा इंद्राजवळ एकच आहे असे म्हणतात व तो सर्व कामना परिपूर्ण करतो. त्या एकानेच इंद्राला फार आनंद होतो. मग अशा चिंतामणीचा जणू ढीगच असे राम दिसल्यावर, सापडल्यावर त्यांना जो आनंद झाला असेल त्याचे वर्णन त्यांना सुद्धा करता येणार नाही. मग इतर कोण करू शकेल? त्यांच्या शरीराची दशा व वेदांना सुद्धा अगम्य असा जो प्रेमरस, यांचे मी वर्णन कसे करणार ! त्यांचे मनरूपी वस्त्र प्रभूच्या रुचिर रूपरंगांत रंगून गेले आहे. (गीता. २।१७।३) 'तु.दास म्हणतो की त्या ग्रामनारी प्रेमाने अधीर झाल्याने देहभान विसरल्या व त्या वेळी कोणाला आपले स्वतःचे भानसुद्धा राहिले नाही.' (गीता. २।१८।४).

**चौ. ६-७ (१) लोचनलाभ लुटा जा या क्षणिं** - जे नारी नर जरा उशीरा आले त्यांस आधी येऊन ज्यांनी रामरूप पाहिले व आनंद लुटला ते पुरुष व स्त्रिया असे सांगतात. १२१।६-८ पहा. **(क) रामा बघत कोणी अनुरागति ।...**

लागति । येथे हिंदीत अनुरागे, लागे, चले ही पुल्लिंगी क्रियापदे आहेत म्हणून ही चौपाई फक्त पुरुषांविषयीच घेणे जरूर आहे. **स्त्रिया रामचंद्रांच्या पाठोपाठ गेल्या नाहीत** हे दाखवावयाचा हेतु आहे. (गीता. १६।१-२ व १७।३ पहा) गीतावलीत स्त्रिया मागोमाग गेल्याचे वर्णन नाही. मात्र भृंग, मृग विहंग प्रभूच्या मागोमाग बरोबर गेले आहेत.

**चौ.८ - (१) कोणि नेत्रपथि छबि उरिं अणुनी... वरवाणी** स्त्रियांनी बरोबर जाणे योग्य नाही. वृद्धांना जाण्याची शक्ती नाही व इतर जे सुविचारी होते त्यांनी विचार केला की नेहमी त्यांच्या बरोबर राहणे शक्य नाही. त्यापेक्षा जे रूप पाहिले आहे ते हृदयात चांगले स्थिर करून ठेवावे; म्हणून तेही बसले तिथेच आणि ही सर्व मंडळी रामरूप ध्यानात इतकी तदाकार झाली की शरीर तटस्थ झाले, मन आपले संकल्पविकल्पात्मक कार्य विसरले; व वरवाणी = श्रेष्ठ वाणी = परावाणी सुद्धा लय पावली, म्हणजेच ते सगळे समाधिमग्न झाले. 'मार्गिच अचल बनुनि मुनि बसले । देहिं पुलक फणसासम उठले' (३।१०।१५) अशी सुतीक्ष्णासारखी यांची दशा झाली.

*हिं.दो.* *। एक देखि बट छाँह भलि डासि मृदुल तृन पात ॥*
*॥ कहहिं गवाँइअ छिनुकु श्रमु गवनब अबहिं कि प्रात ॥११४॥*
*हिं.* *। एक कलस भरि आनहिं पानी । अँचइअ नाथ कहहिं मृदु बानी ॥१॥*
*म.दो.* *। एक बघुनि वटछाय भलि मृदु तृण पल्लव घालि ॥*
*॥ श्रम घडिभर हरणें म्हणे जाल अतां किं सकाळिं ॥११४॥*
*म.* *। एक कलशभर पाणी आणती भरणें चूळ नाथ । मृदु म्हणती ॥१॥*

**अर्थ** : कोणी वडाची सुंदर (दाट) छाया पाहून कोमल तृण पल्लव (तेथे) पसरून विनविले की घटकाभर विश्रांति तर घ्यावी; मग वाटल्यास आज जावे नाही तर सकाळी जाल.।।दो.११४।। कोणी कळशीभर पाणी आणून विनवितात की नाथ ! जरा चूळ तरी भरा 'हात-पाय धुऊन पाणी प्यावे'.।।१।।

**टीका**. - **दो.** (१) काही लोक रामचंद्रांच्या मागोमाग रूप बघत गेले, त्यांपैकी काहींनी विचार केला की हे धावते दर्शन आपल्या बालकांची व वृद्ध मातापितरांची वगैरे तृप्ति करू शकणार नाही. हे जर क्षणभर थांबले तर सर्वांना शांतपणे

मनमुराद रूपामृतपान करता येईल; म्हणून त्यांनी ही युक्ती योजली व थोडे धारिष्ट करून विनंती केली. एक = काही, कोणी थोडे. या प्रमाणे कोणी भक्तिभाव पावन अशा निर्मल वटतरु मंडपांत, मृदु तृणपल्लव निर्मित **सिंहासनच जणू मांडले** - घातले व सायुध सशक्तिक सपरिवार रामचंद्रांचे 'श्रम घडिभर हरणें' या मंत्राने आवाहन केले; तोच -

**चौ.** (१) कोणी मंगल कलशात पवित्र जल भरून आणून 'पाद्यं गृहाण देवेश' या मंत्राऐवजी 'भरणें चूळ नाथ !' **या प्रेमळ मंत्राचा उच्चार केला.** अरण्यात राहणाऱ्या भोळ्याभाबड्या लोकांच्या प्रेमभक्तीचा हा सोहळा पाहून प्रभूचे हृदय द्रवणारच. (क) प्रभूच्या मागोमाग आलेल्यांत स्त्रिया नाहीत; म्हणून पाणी पुरुषांनीच आणले असे मानणे जरूर आहे. 'मयाऽऽहृतेत तोयेन मुखं प्रक्षाल्यतां प्रभो' असा मंत्रच म्हटला जणू काय ! आम्ही मात्र बहुधा 'मयाऽऽहृतानि पूजार्थ पुष्पाणि प्रतिगृह्यताम्' म्हणताना धडधडीत असत्यच बोलतो. मयाऽऽहृतानि = मया आहृतानि = मी आणलेली ! पुष्कळ वेळा वस्तुस्थिती 'मया हृतानि मी चोरून आणलेली' अशीच असते ! 'भाव वश्य भगवान' 'भावापाशीं देव रे' या वचनांची प्रतीति आता पहा :

*हिं. । सुनि प्रिय बचन प्रीति अति देखी । राम कृपाल सुसील बिसेषी ॥२॥*
*। जानी श्रमित सीय मन माहीं । घरिक बिलंबु कीन्ह बट छाहीं ॥३॥*
*। मुदित नारि नर देखहिं सोभा। रूप अनूप नयन मनु लोभा ॥४॥*
*। एकटक सब सोहहि चहुँ ओरा । रामचंद्र मुख चंद चकोरा ॥५॥*

*म. । प्रीति बघुनि अति परिसुनि वाक् प्रिय । राम कृपालु सुशील हि अतिशय ॥२॥*
*। जाणुनि मनीं श्रमित सीतेसी । घडिभर थांबति वटछायेसी ॥३॥*
*। मुदित नारिनर देखति शोभे । अनुपम रूपिं नयन मन लोभे ॥४॥*
*। टकमक सब शोभति चौफेर हि । रामचंद्र-मुख-चंद चकोर हि ॥५॥*

**अर्थ :** त्यांची ती अति प्रीति पाहून व प्रिय (प्रेमळ) वाणी ऐकून अति कृपालु व अतिशय सुशील - ॥२॥ (रामचंद्रांनी) मनात जाणले की सीतेला श्रम (ही) झालेले आहेत व ते त्या वडाच्या छायेला घटकाभर थांबले-बसले.॥३॥ स्त्रिया व पुरुष आनंदित होऊन शोभा पाहू लागले व त्या अनुपम रूपावर

(त्यांचे) नेत्र व मन लुब्ध झाले.।।४।। ते सर्व लोक (प्रभूच्या) चारीही बाजूंनी टक लाऊन बघत असलेले शोभत आहेत. रामचंद्रांचे मुख चंद्र आहे व ते बघणारे चकोर आहेत ! ।।५।।

**टीका. चौ. २ - (१) प्रीति बघुनि अति -** प्रेमवश होऊन, घरदार, कामधंदा सोडून मागे धावत आले आणि प्रेमाने विनविले यांत अत्यंत प्रीति दिसून आली. **(क) प्रिय वाक् (वाणी) परिसुनि -** अत्यंत प्रेमांतल्या नातेवाईकाला लहान मुलांनी प्रेमाने आग्रह करावा तशा मृदु, मधुर, प्रेमळ शब्दांत त्या लोकांनी विनंती केलेली ऐकली. कृतीत प्रीति दिसली, वाणीत प्रीति दिसली व मनातली प्रीति जाणली. अशा प्रेमळ विनंतीचा अव्हेर करणे हे सज्जनांच्या शीलाला शोभण्यासारखे नसते. राम तर अत्यंत सुशील व अति कृपालु ! विनंति अमान्य करवेना. शिवाय या शब्दांचा संबंध पुढेही आहे. पण आधी **ल.ठे.** महिला घाटापासून **मऊ** व पुढे **रामनगर गावाजवळ एक मोठा तलाव आहे.** त्याच्याजवळ ही विश्रांति घेतली. याला हल्ली 'कुअँर दो ताल' म्हणतात. (अयो.कां.परिशिष्ट २ पहा). प्रयागपासून सुमारे ४० मैलांवर आहे.

**चौ. ३ - (१)** या अति प्रेमी लोकांनी प्रेमळ विनंती केल्याबरोबर प्रभूंनी ती मान्य केली नाही, असे पाहतांच जगज्जननी जानकीला त्यांची दया आली व तिने आपल्या चालण्याने व मुखचिन्हाने व्यक्त केले की मीही दमले आहे. रामचंद्रांनी या चिन्हांवरून जाणले मनात की सीता सुद्धा दमलेली दिसते. तिला विश्रांति देणे हे सुशील पतीचे कर्तव्य आहे. म्हणून लोकांवर कृपा करण्यासाठी व सीतेला विश्रांती देण्यासाठी थोडा वेळ थांबण्याचे ठरविले. कवितावलीत सुद्धा सीतेने निराळ्या युक्तीने रामचंद्रांस विश्रांति घेण्यास लावले आहे. 'जल को गए लक्खनु है लरिका' (पद १२) हे पद फारच गोड व भावपूर्ण आहे. मुद्दाम वाचून पहावे.

**चौ. ४-५ - (१)** राम त्या वडाच्या झाडाखाली बसलेले दिसतांच, दुरून त्यांच्याकडे पहात असलेली व इतर सर्व मंडळी भरकन तेथे जमली व रामचंद्रांच्या सभोवती गराडा घालून सर्व लोक उभे राहिले. त्या नावाड्याने पाय धुतले त्यावेळीसुद्धा त्याच्या घरच्या मंडळींनी प्रभूला वेढा दिला होता. शान्तपणाने,

स्थिर दृष्टीने आता दर्शन घेण्यास सापडणारा व आपल्या गावाजवळ राम थांबले असे वाटल्यामुळे सर्वांस आनंद झाला. अशा आनंदित अन्तःकरणाने रामशोभा पाहू लागताच मन त्या रूपावर लुब्ध होऊन निश्चळ झाले व नेत्र त्या रूपावर मधुपांप्रमाणे लुब्ध झाले, स्थिर झाले. पापण्यांची हालचाल बंद झाली.

(२) **रामचंद्र - चंद - चकोर - चकोर** चकोरी चंद्र मंडळावर लुब्ध होऊन त्याच्याकडे बघत राहतात तसेच सर्व पुरुष व स्त्रिया टक लाऊन राममुखचंद्राकडे बघत आहेत. सर्वांना राममुखचंद्र आपल्या दृष्टीसमोर दिसत आहे; जसा शेकडो चकोरांना आकाशातील एकच चंद्र सारखाच दिसतो. लोक चारी बाजूस उभे राहून बघत असल्याने निसर्गतः सर्वांना मुखमंडळ सारखे दिसणे शक्य नाही. कोणाला डोक्याच्या मानेकडील भाग दिसेल; कोणाला डाव्या कानाकडील मुखाचा भाग दिसेल, कोणाला उजव्या बाजूचे दिसेल व फक्त समोर उभे असतील त्यांनाच पूर्ण मुखमंडल दिसेल. परंतु येथे तसे न होता आठी दिशांस उभे असलेल्या लोकांना चकोराप्रमाणे पूर्ण मुखचंद्र आपल्या अगदी समोर दिसला. म्हणजे **भगवान** आपल्या ऐश्वर्य शक्तीने **सर्वतोमुख झाले. एका प्रकारचे विश्वरूपच दाखविले**. मानसांत ही अशी लीला अनेक ठिकाणी केली आहे. प्रस्तावनेत **'विश्वरूप दर्शन' प्र. १३।१५ पहावे.** (क) मुखचंद्र चकोर - चंद शब्द शुद्ध संस्कृत आहे. (अ.व्या.सु.) मुखचंद्र म्हटले असते तर वृत्ताच्या दृष्टीने काही दोष होत नव्हताच व अनुप्रासही सुंदर झाला असता. पण चंद्र शब्दांत 'र' आहे. त्यामुळे ते चंद्राप्रमाणे कदाचित तापद, विरहदाह उत्पन्न करणारे झाले असते. र अग्नि आहे; तो तापद व दाहक होऊ शकतो. चंद शब्दांत तो नाही 'चदि आल्हादने' भाव हा की या **कोणाच्याही ह्रदयात दुःख, शोक, संताप व विरहदाह कधी उत्पन्न होणार नाही अशी कृपा प्रभूंनी केली**. पूर्ण शीतलता, पूर्ण आल्हाद व समाधान देऊन परिपूर्ण काम सुखधाम बनविले. **त्यांच्या ह्रदयांत निवास केला**. (५।४७।१-२ पहा).

***हिं.*** *। तरुन तमाल बरन तनु सोहा । देखत कोटि मदन मनु मोहा ॥६॥*
*। दामिनि बरन लखन सुठि नीके । नख सिख सुभग भावते जी के ॥७॥*
*। मुनिपट कटिन्ह कसे तूनीरा । सोहहिं करकमलन्हि धनु तीरा ॥८॥*

हिं.दो. *। जटा मुकुट सीसनि - सुभग उर भुज नयन बिसाल ॥*
*॥ सरद परब बिधु बदन बर लसत स्वेद कन जाल ॥११५॥*
म. *। तरुण - तमालवर्ण तनु शोभत । देखत कोटि-मदन-मन मोहत ॥६॥*
*। दामिनिभा लक्ष्मण अति सुन्दर । नख-शिख सुभग मनातें रुचिकर ॥७॥*
*। मुनिपट कटिं कसले तूणीर हि । धृत कर-कमलिं रुचिर धनु तीर हि ॥८॥*
म.दो. *। जटा - मुकुट मस्तकिं सुभग उर - भुज, नयन विशाल ॥*
*॥ शरत्पर्व - विधु - वदनिं वर लसे स्वेदकण - जाल ॥११५॥*

**अर्थ** - तरुण तमाल वृक्षाच्या वर्णाचे शाम शरीर शोभायमान दिसत असून त्यास पाहून कोटि (अनंत) मदनांचे मन मोहित होते.॥६॥ सौदामीनीच्या - विजेच्या वर्णासारखे लक्ष्मण अति सुंदर असून नखशिखांत (सर्वांग) मनोहर असल्याने मनाला आवडतात.॥७॥ (दोघांनी) मुनि वस्त्रे परिधान केली असून कमरेला तूणीर-भाते-कसलेले आहेत व हातात सुंदर धनुष्य व बाण घेतले आहेत.॥८॥ (दोघांच्याही) मस्तकावर सुंदर जटामुकुट असून छाती, बाहू व नेत्र विशाल व सुंदर आहेत. शरद ऋतूतील पौर्णिमेच्या चंद्रासारखे (प्रत्येकाचे) मुख सुंदर असून त्यावर घामाच्या बिंदूंचे जाळे शोभत आहे.॥दो.११५॥

**टीका.** - या पाच ओळीत राम व लक्ष्मण यांच्या रूपाचे एकरूप वर्णन आहे. दोघांचा शरीरवर्णभेद चौ. ६ व ७ च्या पहिल्या चरणात सांगितला आहे. - सर्व वर्णन दोघांना सारखेच लागू आहे. (क) **तरुण तमाल** - तमाल वृक्ष उंच, सरळ वाढणारा, सदा पल्लवित पण काही श्याम वर्णाचे असतात. घननील व तमालनील यांत नीलता-श्यामता-साम्य असले तरी घन = मेघ शरीराच्या उंचीचा बोध न करता रुंदीचा-स्थूलतेचा बोध करणारा आहे. तमालाचा विस्तार उंचीच्या मानाने कमी असतो. सुचविले की ५ दिवसांच्या प्रवासाने रामशरीरात कृशता आली आहे. यापूर्वी बा. कां. २१९।१ मध्ये तमाल उपमान वापरले आहे पण तेथे 'तरुणतमाल' नाही. म्हणजेच (बाल) तमाल आहे. ३।१०।२३; ६।१०१।छं, ६।१०३ छंद यांत 'तमाल' उपमान वापरले आहे एवढेच नव्हे तर ६।१०१ छंदांत 'तुंग' तमाल आहे; म्हणजे कृशता वाढल्याचे दर्शविले आहे.

(२) **देखत-कोटि-मदन-मन मोहत** - हा चरण रामचंद्रांसच फक्त लागू आहे

असे कदाचित वाटेल; पण अगदी जवळचाच आधार पहा : **'कोटि मनोजां लाजविणारे । सुमुखि कोण हे तव, वद सारें'** (११७।१) असे याच गांवच्या युवती सीतेला दोघांविषयी आता लवकरच विचारणार आहेत. (मा.पी.प.!) 'वय किशोर सुषमा सदन श्याम गौर सुखधाम । ओंवाळा प्रत्यंगिं तरि कोटि कोटि शत काम' (१।२२०), १।२३३।६; १।२४३।१ पहा.

**चौ. ७ - (१) 'नखशिख सुभग...** हा चरण सुद्धा दोघांविषयीच आहे. **'नखशिख सुंदर बंधु दो शोभे सकल सुदेश'** (१।२१९) **'प्रात कुमर युग बघण्या बागे । वय किशोर सुंदर सर्वांगे'** (१।२२९।१).

**दो. (१) 'लसे स्वेद कणजाल -** दोघांच्याही मुखमंडलावर घामाचे तेजस्वी चमकदार बिंदू पसरलेले आहेत. त्यामुळे अधिक शोभत आहेत. 'श्रम सींकर सॉंवरि देह लसैं, मनो रासि महातम तारकसै' (कवि. २।१३) यांत रामाच्या सर्व शरीरावर श्रम घर्मबिंदु असल्याचे वर्णन आहे. येथे दोघांच्या मुखांवर आहेत असे म्हटले आहे. म्हणून येथे सुद्धा जे स्वेदकण वर्णिले आहेत ते श्रमांमुळेच आलेले आहेत. म्हणजे रामलक्ष्मणसुद्धा श्रान्त झाले आहेत हे दाखविले. आपण दमल्याची चिन्हे सीतेने का दाखविली याचा उलगडा या दोह्यांत व कवितावलीत सुद्धा चांगला होतो. आपण दमले असले तरी प्रभु विश्रांति घेणार नाहीत; पण मी दमले आहे असे दिसले की मला विश्रांति मिळावी म्हणून प्रभु थांबतील व त्यांस सहज विश्रांति मिळेल असा विचार सीतेने केला व ती युक्ती चांगलीच सफल झाली ! **याचे नाव पतिप्रेम व मर्यादापालन** ! ६७।४ पहा.

*हिं.* ***। बरनि न जाइ मनोहर जोरी । सोभा बहुत थोरि मति मोरी ।।१।।***
***। राम लखन सिय सुंदरताई । सब चितवहिं चित मन मति लाई ।।२।।***
***। थके नारि नर प्रेम पिआसे । मनहुँ मृगी मृग देखि दिआ से ।।३।।***

*म.* ***। ना वर्णवे मनोहर जोडी । शोभा बहुत बुद्धि मम थोडी ।।१।।***
***। लक्ष्मण - राम - सिता - सुंदरते । बघति चित्त-मन-मति लाउन ते ।।२।।***
***। प्रेम पिपासू थक्क नारि नर । जणूं मृगी मृग बघुनि दीप वर ।।३।।***

**अर्थ -** या (राम व लक्ष्मण) मनोहर जोडीचे वर्णन करवत नाही. कारण की शोभा अपार (बहुत) असून माझी बुद्धि अल्प (थोडी) आहे.।।१।। ते (सर्व

स्त्री पुरुष) राम-लक्ष्मण व सीता यांचे सौंदर्य चित्त, मन व बुद्धी लावून पहात आहेत.॥२॥ प्रेमाची तहान (पिपासा) लागलेली ही सर्व स्त्रीपुरुष मंडळी (रूप पाहता पाहता) अशी थक्क-तटस्थ झाली आहे की जणू मोठा दिवा पाहून मृगी आणि मृगच ! ॥३॥

**टीका. चौ. १ - ना वर्णवि** - या चौपाईत रामलक्ष्मणांच्या रूपवर्णनाचा उपसंहार करतात. मनोहर जोडी = मन चोरून घेणारी जोडी. या मनोहर शब्दाने पुढील चौपायांत दिसणाऱ्या परिणामाचे कारण सुचविले आहे.

**चौ. २ - (१) प्रथम 'रामचंद्रमुखचंदचकोर'** (११५।५) झाल्याचे सांगितले. मग रामलक्ष्मणांच्या रूपाचे वर्णन करून त्याचा परिणाम सांगितला. त्यामुळे असे वाटेल की सीतेच्या रूपाकडे कोणीच पाहिले नाही; म्हणून येथे सांगतात की तिघांकडे सर्वच स्त्रीपुरुष बघत आहेत. सीता जगज्जननी असल्यामुळे कवींनी तिच्या सौंदर्याचे विस्तृत वर्णन केले नाही; पण तिघांना एकाच पंक्तीत बसवून सुचविले की तिघेही अपार सौंदर्य संपन्न आहेत. सीता स्त्री असल्याने तिच्याकडे पुरुषांनी पाहिले नाही असे वाटण्यास जागा असू नये म्हणून पुढील चौपाईत तिघांकडे बघणारांचे वर्णन करण्यात 'नारि नर' असा स्पष्ट उल्लेख आहे. **(क) 'लक्ष्मण रामसिता सुंदरते'** हा चरण अगदी असाच पूर्वी आला आहे. **'लक्ष्मण राम सिता सुंदरते । बघतां वानिति भाग्य महत्ते'** (११०।२) या **द्विरुक्तीने सुचविले आहे की** येथील दुसरा चरण तेथे व तेथील दुसरा चरण येथे अध्याहृत घ्यावयाचा आहे. तसेच येथील पुढील चौपाई तेथे व तेथील **'वाटे अति लालसा मनासी । लाजति नांव गांव पुसण्यासी ॥११०।३॥** ही येथे अध्याहृत घ्यावयाची आहे.

**(२) बघति चित्तमन मति लाउन** - मनाने संकल्पविकल्प करण्याचे, बुद्धीने निश्चय करण्याचे व चित्ताने इतर विषयांचे चिंतन करण्याचे सोडले व चित्तमनबुद्धि रूपदर्शनात एकाग्र झाली आहेत. सर्व इंद्रियांच्या शक्ति नेत्रेंद्रियांत एकवटल्या आहेत व इतर सर्व देहेंद्रिय व्यापार बंद पडले आहेत. **'तात समासिं सांगुं समजाउनि । ऐका मतिमनचित्ता लाउनि'** (३।१५।१) याच्या टीकेत अधिक विस्तार पहावा. तेथे ऐकण्याविषयी आहे व येथे पाहण्याविषयी आहे इतका फरक लक्षात ठेवावा.

**चौ. ३ - (१) प्रेम पिपासू थक्क नारि नर** - प्रेमाची तहान तृप्तच होत नाही; त्या तिघांचे रूप म्हणजे मूर्तिमंत प्रेमच असे यांना वाटत आहे. त्यामुळे कितीही पाहिले त्यांच्याकडे तरी आणखी बघावे असेच वाटत आहे. (क) **थक्क नारिनर** - स्त्रिया व पुरुष त्या तिघांकडे मनमतिचित्त लाऊन बघता बघता, सर्व इंद्रिये निरुद्ध झाल्यामुळे, तटस्थ स्तब्ध झाले आहेत. (ख) **जणू मृगी मृग बघुनि दीप बर'** - रामलक्ष्मण व सीता जणू उत्तम दीप दीपिका आहेत. रामचंद्रांना दीप व सीतेला दीपशिखा पूर्वीच म्हटले आहे. 'जाई **रघुकुलदीपा** घेउनि' (२।३९।७) रामलक्ष्मणांच्या सौंदर्याचा परिणाम सारखा आहे, म्हणून लक्ष्मण पण दीप ठरलेच. **'छबिगृहिं दीपशिखा जणुं जळते'** (१।२३०।७) अशी सीता दीपिका आहे. दीपाच्या प्रकाशावर - रूपावर मोहित होऊन हरिणी व हरिण (मृगीमृग) तटस्थ होतात. नेत्र निश्चळ होतात व देहभान विसरून, आपण कोण कोठे आहोत याचे भानसुद्धा रहात नाही. अशीच स्थिति सर्व स्त्री-पुरुषांची येथे झाली व गावोगावी अशीच होते. 'रूपदीपिका निहारि मृगमृगी नरनारी, बिथके बिलोचन निमेखैं बिसराइकै' (गीता. १।८४।६) 'तुलसी बिलोकीकैं तिलक तीनि रहे नर नारि ज्यों चितेरे चित्रसार हैं' (कवि. २।१४) 'तुलसिदास प्रभु हरे सबन्हि के मन, तन रही न सँभार' (गीता २।२९।६) प्रभूंनी सर्वांचे मन चोरून घेतल्यामुळे त्यांना देहभान राहिले नाही. कवितावलीतील १३-२४ व गीतावलीतील १३-४२ ही सर्वच पदे मुद्दाम पाहण्यासारखी आहेत. कवितावलीतील २३ वे पद तरी मुद्दाम पहावेच. टीकेत किती देणार !

*हिं. । सीय समीप ग्रामतिय जाहीं । पूँछत अति सनेहँ सकुचाहीं ॥४॥*
*। बार बार सब लागहि पाएँ । कहहिं बचन मृदु सरल सुभाएँ ॥५॥*
*। राजकुमारि बिनय हम करहीं । तिय सुभायँ कछु पूँछत डरहीं ॥६॥*
*। स्वामिनि अबिनय छमबि हमारी । बिलगु न मानब जानि गवाँरी ॥७॥*

*म. । ग्राम नारि जाती सीतेप्रति । स्नेहें अति पुसण्या संकोचति ॥४॥*
*। घडि घडि सकल करिति पदिं नमना । सहज सरळ मृदु वदल्या वचना ॥५॥*
*। राजकुमारी ! विनंती करितों । स्त्रीस्वभाव, पुसण्या घाबरतों ॥६॥*
*। स्वामिनि ! सविनय तरी क्षमावा । ग्राम्य गणुनि ना रोष धरावा ॥७॥*

**अर्थ** : खेडे गावातील स्त्रिया सीतेच्या जवळ अत्यंत स्नेहाने जातात; पण अत्यंत स्नेहामुळे विचारण्यास संकोच वाटतो - लाजतात.॥४॥ (तेव्हा) त्या सगळ्या वारंवार सीतेच्या पायांना वंदन करून सहजच सरळ व मृदु (= नम्र) शब्दांनी म्हणतात.॥५॥ राजकुमारी ! आम्ही (काही) विनंती करणार आहोत पण स्त्रीस्वभाव असल्यामुळे विचारण्यास भीती वाटते.॥६॥ तरी हे स्वामिनी ! आमचा उद्धटपणा क्षमा करावा व आम्ही गावंढळ आहोत हे जाणून मनात रोष धरू नये.॥७॥

**टीका.** हे छोटेसे प्रकरण म्हणजे शृंगार, विनोद, नीतिमर्यादा, स्त्रीस्वभावलज्जा, शृंगाररसप्रियता, स्नेह इत्यादी अनेक गोष्टींचा **फारच सुंदर व मधुर असा एक नाट्य नमुना आहे**. या स्त्रिया आपल्याला गांवढळ (अडाणी) म्हणत आहेत पण आपल्या प्रश्नाचा उपक्रम किती नागरी पद्धतीने, लीनतेने व स्नेहाने केला आहे ! प्रश्न चार ओळींत आहे आणि त्याचा उपक्रम चार चौपायांत म्हणजे थोडा जास्तच विस्तृत आहे. सीतेने दिलेले उत्तर पांच चौपायांत आहे.

**चौ. ४ - (१) जाति सीतेप्रति - अति स्नेहें** - अति स्नेहाने जवळ गेल्या पण अति स्नेहामुळेच विचारण्याची लाज वाटू लागली. कारण ज्या पुरुषांविषयी सीतेला विचारावयाचे आहे, ते फार दूर नाहीत. सीता सम्राटाची सून. या गांवढळ, हीन जातीच्या, दरिद्री स्त्रिया ! शिवाय सीतेच्या अप्रतिम तेजामुळे त्या दिपून गेल्या व त्यामुळे बोलण्याचे धारिष्ट करवेना. राम सीतेचे कोण हे या स्त्रियांना माहीत नाही असे नाही; पण थोडा विनोद करण्याच्या निमित्ताने सीतेच्या तोंडचे चार शब्द ऐकावे, सीतेच्या अगदी जवळ जाऊन बसावे व तिचे प्रेम संपादन करावे असे स्त्रीस्वभावानुसार स्नेहामुळे वाटले. फार मोठ्यांची सून, फार मोठ्यांची बायको; आमच्याशी बोलेल की नाही, आमचा प्रश्न तिला रुचेल की नाही इ. शंका घेणे स्वाभाविक आहे. तथापि अति स्नेह स्वस्थ बसू देईना. कसा तरी धीर करून लांबलचक उपक्रम करून मग विचारतील.

**चौ. ५ - (१) घडिघडिं सकल करिति पदिं नमना** - वरच्यावर अनेक वेळा पाया पडल्या. यामुळे कोणाही सज्जनाला दया येणारच. 'नमस्कारें लीनता जोडे । नमस्कारें **विकल्प मोडे** । नमस्कारें **सख्य घडे** । नाना सत्पात्रासी' (दा.बो. ४।६।१४)

नमस्कारें **कृपा उंचबळे** । नमस्कारें **प्रसन्नता प्रबळे** ॥' 'नमस्कारें **अन्याय क्षमती**' ॥ सीतेच्या मनात काही विकल्प तर येणार नाही? अप्रसन्न तर होणार नाही? अन्याय केला असे तर वाटणार नाही? आमच्याशी मोकळ्या मनाने सखी प्रमाणे बोलेल की नाही? आमच्यावर कृपा करील का? या पांची शंका यांना होत्याच म्हणून वारंवार नमन करतात. या स्त्रिया दास्य भावाने वागत आहेत हे पुढील स्वामिनि शब्दाने ठरते.

**चौ. ६-७ (१) राजकुमारी** ! यावरून ठरते की सीतेविषयी यांना सर्व माहिती आहे. आपल्यासारख्या मोठ्या माणसांशी कसं बोलावं, कसं वागावं, काय विचारावं, काय विचारू नये हे आम्हाला जंगली बायांना समजत नाही; पण काही विनंती तर करावयाची आहे; म्हणून आम्ही आपल्या आधीच क्षमा मागतो की काही अपराध, अपाय घडला तर तो आमचा गावंढळ बायकांचा स्वभावदोष समजावा व क्षमा करावी. आपण आमच्या स्वामिनी आहात. दासींचा हा धीटपणा आहे; पण काय करणार, विचारल्याशिवाय राहवत नाही; म्हणून आमच्यावर रोष करू नये.

***हिं.*** *। राजकुअँर दोउ सहज सलोने । इन्ह ते लही दुति मरकत सोने ॥८॥*
***हिं.दो.*** *॥ स्यामल गौर किसोर बर सुंदर सुषमा ऐन*
*॥ सरद सर्बरीनाथ मुखु सरद सरोरुह नैन ॥११६॥*
***हिं.*** *। कोटि मनोज लजावनिहारे । सुमुखि कहहु को आहिं तुम्हारे ॥१॥*
***म.*** *। राजकुमर युग सहज सुशोभन । यद् द्युतिनें द्युति मरकत कांचन ॥८॥*
***म.दो.*** *। श्यामल गौर किशोर वर सुंदर सुषमाक्षेत्र ॥*
*॥ शरद-शर्वरीनाथ मुख शरत्सरोरुह नेत्र ॥११६॥*
***म.*** *। कोटि मनोजां लाजविणारे । सुमुखि कोण हे तव वद सारें ॥१॥*

**अर्थ** : दोघे राजकुमार सहज सुन्दर असून यांच्या कान्तीनेच मरकत व सोने यांची कान्ति आहे. (यांच्यापासूनच मरकत व सोने यांनी आपली कान्ति घेतली आहे.)॥८॥ सावळे व गोरे, उत्तम किशोर वयाचे, सुंदर व परम शोभेचे निवासस्थान, शरद ऋतूतील पुनवेच्या (पौर्णिमेच्या) चंद्रासारखे मुख, शरदांतील कमळांसारखे डोळे असलेले-॥दो.११६॥ व कोटि मनोजानां (मदनांना) लाजविणारे

हे (दोघे) तुमचे कोण आहेत हे सर्व हे सुमुखि ! आम्हांस सांगावे.॥१॥

**टीका. चौ. ८ व दोहा (१) सलोने - सुन्दर, सुशोभन. (क) यद् द्युतिने द्युति मरकत कांचन** - मरकत मण्यांत व सोन्यात जी नील व पीत कान्ति आहे ती यांच्या कान्तीपासूनच घेतलेली आहे. म्हणजे मरकत मण्यापेक्षा व सुवर्णापेक्षा हे दोघे अधिक तेजस्वी, नील, पीत वर्णाचे आहेत. **(ख) किशोर** - या स्त्रियांना हे दोघे किशोर वयाचेच म्हणजे १५ वर्षापेक्षा लहान वाटत आहेत. हे वात्सल्य प्रेमाचे लक्षण आहे. 'कैशोरम् आपञ्चदशात् । यौवनं तु ततः परम्' (भाग) **सुषमा** = परमा शोभा. (अमरे) **शर्वरी** = रात्र, **शर्वरीनाथ** = चंद्र (गीतावली २।९५ हे पद पहावे.)

**सूचना - येथे श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकाण्ड अध्याय ११ वा समाप्त झाला आहे.** तसेच नवाह पारायण चौथा विश्राम व मास पारायण १६ वा विश्राम या दोह्यानंतरच आहे. पण प्रश्न अर्धवट राहू नये म्हणून टीकेत पुढील अध्यायातील पहिली चौपाई येथे घेतली आहे.

**शंका** - प्रश्न अर्धवट टाकूनच नवाह विश्राम व मास विश्रामस्थळ का ठरविले असावे?

**समाधान** - पुढल्या दिवसाच्या पारायणास प्रारंभ होतांच पहिल्या चौपाईचा संदर्भ नीट ध्यानात येण्यासाठी, मागील प्रकरणाचे चिंतन, मनन व्हावे हा हेतू आहे. बहुतेक विश्राम स्थळांत असेच दिसून येते. कथासूत्र चित्तांत अखंड रहावे, मागल्या पारायणाशी पुढल्या पारायणाचा संबंध प्रारंभी जोडलेला रहावा, म्हणून ही युक्ति योजलेली दिसते.

(२) **कोटि मनोजां लाजविणारे** - यांतील मनोज शब्दांत गूढ रहस्य आहे. मनोज = मनात जन्मलेला, जन्मणारा = कामविकार. भाव हा की यांना पाहिल्याबरोबर आम्हा बायांच्या मनात कामवासना उत्पन्न झाली; पण यांची दृष्टी पडताच ती वासना लज्जेने मरून गेली व त्याच क्षणी आम्ही कामविजयी झालो. **(क) दुसरा भाव - मनोज** = संकल्प; यांची दृष्टी पडताच अनंत संकल्पांचा नाश झाला. मनोज शब्दांतील गूढार्थ जाणूनच सीतेने स्मित केले आहे. तिसरा भाव हा की यांच्या एका दृष्टिपातानेच आम्ही सगळ्या निष्काम झालो. हे श्यामवर्ण

कुमार तुमच्याकडे वारंवार प्रेमाने बघत असता तुमचे काय झाले असेल ! व असे असून तुम्ही यांच्या बरोबर वनात वणवण हिंडत का आलात? कवितावलीत स्त्रिया सीतेशी असाच सलगीचा विनोद करतात; पण त्यात फक्त सावळ्या कुमाराविषयीच प्रश्न आहे. (कवि २।२१ पहा). अधिक विस्ताराची जरूर नाही. तुलसीमानस फार सोवळे आहे व येथे रामलक्ष्मणांबद्दल प्रश्न आहे. आता सीता किती मर्यादेने, प्रेमाने व युक्तीने या ग्रामवधूंचे समाधान करते पहा :



# अध्याय १२ वा.

हिं. *। सुनि सनेहमय मंजुल बानी । सकुची सिय मन महुँ मुसुकानी ॥२॥*
*। तिन्हहि बिलोकि बिलोकति धरनी । दुहुँ सकोच सकुचति बरबरनी ॥३॥*
*। सकुचि सप्रेम बाल मृगनयनी । बोली मधुर बचन पिकबयनी ॥४॥*

म. *। प्रेमळ मंजुळ वचनां परिसत । मनिं सस्मित सीता संकोचत ॥२॥*
*। तयां विलोकुनि विलोकि धरणी । उभयीं संकोचित वरवर्णी ॥३॥*
*। प्रेमें लाजुनि मृग-शिशुनयनी । वदली मधुर वचन पिकवचनी ॥४॥*

**अर्थ** : (त्यांचे) ते प्रेमळ व मंजुळ (सुंदर) भाषण ऐकतांच सीतेला संकोच वाटला व तिने मनात स्मित केले.॥२॥ त्यांच्याकडे (रामलक्ष्मण व स्त्रियांकडे) पाहून ती जमिनीकडे पाहू लागली व ती वरवर्णिनी (वरवर्णी) दोन्ही बाजूंनी संकोचित झाली.॥३॥ हरिण पाडसासारखे डोळे असलेली सीता प्रेमाने व लाजत लाजत कोकिळेसारख्या मधुर वाणीने म्हणाली॥४॥-

**टीका. चौ. २-३ (१) प्रेमळ व मंजुळ वचना** - राजकुमारी, स्वामिनी ! म्हणणे, वारंवार पाया पडणे, स्वतःस गावंढळ म्हणून क्षमा मागणे इ. गोष्टींवरून व त्यांच्या भाषणावरून त्या स्त्रियांचे प्रेम सहज कळाले. **'स्नेह सुशीलें ये आकळतां । प्रीति वैर ना लपति लपवतां'** (२।१९३।१) **मंजुळ** - मंजुल = सुंदर, 'सुन्दरं रुचिरं... मनोज्ञं मंजु मंजुलम्' (अमरे) रामरूपाचे सुंदर, प्रेमभरित व सादर वर्णन त्यांत आहे व विनम्र आहे म्हणून सुंदर. **(क) मनिं सस्मित** - कारण इतकेच की आहेत तर खेडवळ, पण मोठ्या चतुर, युक्तिबाज, विनोदी व शृंगाररसप्रिय आहेत ! **संकोचत** - संकोच यामुळेच वाटला की पतिविषयी प्रश्न विचारला व तोंडावर 'सुमुखि' वगैरे शब्दांनी स्तुति केली. **'स्वगुण कानिं पडतां संकोचति'** (३।४६।१) रामसुद्धा असेच आहेत हे पूर्वीच दाखविले आहे.

(२) **तयां विलोकुनि विलोकि धरणी** - एकदा रामलक्ष्मणांकडे पाहिले व खाली जमिनीकडे पाहिले; नंतर त्या बायांकडे पाहिले व जमिनीकडे पाहिले. लाज, शोक, चिंता इ. विकारांत खाली जमिनीकडे पाहणे हा तर स्त्रियांचा स्वभावच आहे. पण पुरुषांना सुद्धा लाजेने खाली मान घालण्याची वेळ येतेच. ६।३४।१२, ६।३५।५ पहा.

(क) **उभयी संकोचित** - दोन्ही बाजूंनी संकोच वाटू लागला. पतीविषयी इतक्या मंडळींच्या देखत व पतीच्या समोर कसे सांगू हे पतीकडे पाहून लाजून त्यांच्याकडे पाहण्याने सुचविले. दुसऱ्या बाजूने संकोच हा की इतक्या प्रेमाने, विनम्र दासींप्रमाणे विचारीत असता न सांगणे रामपत्नीला शोभण्यासारखे नांही. (ख) **वरवर्णी** = उत्तम वर्ण - रूप असलेली हा सामान्य अर्थ आहे. **'शीते सुखोष्णसर्वांगी । ग्रीष्मे या सुखशीतला ॥ भर्तृभक्ता च या नारी सा भवेद् वरवर्णिनी.'** (रुद्र) मानसांत राजा जनकांनी सुनयनेला 'वरवर्णी' म्हटले आहे. (२८९।१) इतर कोणालाही मानसांत हा शब्द वापरलेला नाही. या शब्दाने सुचविले की सीता आपल्या वराचे - पतीचे - वर्णन करील व उत्तम प्रकारे करील.

**चौ. ४ - (१) मृगशिशुनयनी** - हरिण पाडसाचे नेत्र मृगमृगींपेक्षा अधिक सुंदर, चंचल व चपल असतात; काय करावे या बुचकळ्यांत पडून एकदा रामाकडे व एकदा त्या बायांकडे असे वारंवार भराभर बघत आहे. (क) **पिकवचनी** शब्दाने सुचविले की ऐकणाऱ्या सर्वांस आनंद होईल असेच बोलणार आहे.

***हिं. । सहज सुभाय सुभग तन गोरे । नामु लखनु लघु देवर मोरे ॥५॥***
***। बहुरि बदन बिधु अंचल ढाँकी । पिय तन चितइ भौंह करि बाँकी ॥६॥***
***। खंजन मंजु तिरीछे नयननि । निज पति कहेउ तिन्हहि सिय सयननि ॥७॥***
***। भई मुदित सब ग्राम बधूटीं । रंकन्ह राय रासि जनु लूटीं ॥८॥***
***म. । सहज सुशील गौर तनु सुंदर । लक्ष्मण नाम सान मम देवर ॥५॥***
***। वदन बिधुस मग पदरें झांकुनि । प्रिय पति निरखुनि भृकुटि वाकवुनि - ॥६॥***
***। खंजन-मंजुल वक्र-अपांगें । तयां खुणेनें निजपति सांगे ॥७॥***
***। मुदित गांवच्या अवघ्या युवती । रायराशि जणुं रंकचि लुटती ॥८॥***

**अर्थ :** स्वभावताच सुंदर शील असलेले व सुंदर गोरी तनु असलेले, ज्यांचे नाव लक्ष्मण आहे ते माझे धाकटे दीर आहेत.॥५॥ मग आपला मुखचंद्र पदराने झाकून भुवया तिरप्या करून प्रिय पतीकडे पाहून - ॥६॥ खंजन पक्ष्यासारख्या सुंदर नेत्रांच्या वक्र कटाक्षाने तिने त्यांस खुणेने सांगितले की हे माझे पति आहेत.॥७॥ त्या सगळ्या ग्रामतरुणी इतक्या आनंदित झाल्या की जणू रंकांना धन (= राय) राशीच लुटण्यास सापडल्या.॥८॥

**टीका. चौ.** ५-७ (१) हे दोघे तुमचे कोण लागतात हा आहे प्रश्न. दोघांपैकी गौरतनु सुंदर, नाम लक्ष्मण, माझे धाकटे दीर, एवढ्या निश्चित शब्दांनी एकाविषयी स्पष्ट सांगून टाकले. श्यामतनु कोण हे सांगावयाचे राहिले. रामचंद्रांकडे बघून, नुसता एक मुरका मारून, पदर तोंडाला लाऊन गालातल्या गालात हसत मान खाली घातली असती तरीसुद्धा या तरुण कौतुकी खेडवळ तरुणी मर्म समजल्या असत्या. येथे ही शब्दहीन भाषा व हावभाव ।। श्याम रुचिर तनु माझे प्रिय पति ।। इतके सहज सांगतील यांत नवल नाही. **ल.ठे.** - भारतीय पतिव्रता शिरोमणी स्त्रीच्या चरित्राचे हे चित्रण अत्युच्च काव्यकलेने सहज मनोहर झाले आहे. यावर विस्तृत टीका लिहिण्याने या निसर्ग मनोहर रमणीय चित्राची सहज मनोहरता दूषित होईल. हे नाट्यचित्र केवळ अनुभव घेऊन आनंद लुटण्यासाठीच आहे.

**चौ.** ८ - (१) **रायराशि जणुं रंकच लुटती** - राय = धन, वित्त; 'रै' या संस्कृत शब्दाचे रूपांतर आहे. सीतेचे हे हावभाव, प्रेमाने व सलज्ज वक्र नेत्रकटाक्षाने भुवया वाकवून रामाकडे पाहणे व एकदम लाजणे याने जो शृंगाररस सौंदर्यनिधि निर्माण झाला ती जणू काय रंकांना धनाची लयलूटच झाली ! असली अपार निरुपम लावण्यमय सुन्दरी नुसती दृष्टीस पडणेसुद्धा ज्यांना शक्य नाही त्यांना सीतेचे प्रेमळ, मधुर वचन व हा शृंगारसौंदर्यनिधि अनपेक्षित रीतीने सहज सापडला. सर्वांचे नेत्र आनंदाने प्रफुल्ल होऊन राम व सीता या जोडप्याचे लावण्य त्या लुटू लागल्या. कवितावली २।२२ मध्ये सावळेसे आहेत ते तुझे कोण? या प्रश्नाचे उत्तर सीतेने अशाच प्रकारे न बोलता दिले आहे; पण त्यापेक्षा मानसांतील हे वर्णन अधिक रमणीय आहे.

**शंका.** - भरद्वाजाश्रमापासून महिला घाटापर्यंत २० मैलांच्या प्रवासांतील, लोकांच्या भावनांचे वर्णन अवघ्या ३/४ ओळींत केले व यमुनातीरापासून वनवासी लोकांच्या दशेचे वर्णन १०९-१२३ दोहे ! इतके विस्तृत; कवितावलीत व गीतावलीत तर याहीपेक्षा विस्तृत का? वा.रा. आ.रा. अ.रा. अद्भुत रा. इत्यादींत हे मुळीच नाही. **मग हे गोस्वामींनी** आपल्या जन्मभूमीचे महत्त्व दाखविणे व मानसिक भेटीत आलेला परमानंदाचा पूर ओसरविणे यासाठी **केवळ काल्पनिक**

**केले की काय? का भागवतातील गोपींच्या प्रेमदशेवर ताण करून दाखविण्यासाठी लिहिले? समाधान** - यांतील पहिल्या दोन गोष्टींचा थोडासा परिणाम झाला नसेल असे म्हणवत नाही. पण तो अत्यंत गौण आहे. **हनुमन्नाटकांत व सौपद्य रामायणात यमुनातीरस्थ व वनवासी लोकांच्या रामप्रेमाचे व आपसांतील संवादांचे वर्णन आहे.** हनुमन्नाटकांतील या प्रकरणाची तुलना **प्रस्तावनेत 'मूळाहुनी सरस मानस अति'** प्र. ५।१२ मध्ये केलेली पहावी. सौपद्य रामायणातील विषयांची जंत्री प्र. प्र. ४।२ मध्ये दिली आहे.

*हिं.दो.* *। अति सप्रेम सिय पायँ परि बहुबिधि देहिं असीस ॥*
*॥ सदा सोहागिनि होहु तुम्ह जब लगि महि अहि सीस ॥११७॥*
*हिं.* *। पारबती सम पतिप्रिय होहू । देबि न हम पर छाड़ब छोहू ॥१॥*
*। पुनि पुनि बिनय करिअ कर जोरी । जौं एहि मारग फिरिअ बहोरी ॥२॥*
*। दरसनु देब जानि निज दासी । लखीं सीयँ सब प्रेम पिआसी ॥३॥*
*। मधुर बचन कहि कहि परितोषीं । जनु कुमुदिनीं कौमुदीं पोषीं ॥४॥*
*म.दो.* *। प्रेमें अति सीते नमुनि देति विविध आशीस ॥*
*॥ सदा सुवासिनि व्हा तुम्हीं जों धरि शेष महीस ॥११७॥*
*म.* *। पति - प्रिया पार्वतिसम व्हावें । प्रेम अम्हांवर उणें नसावें ॥१॥*
*॥ कर जोडुन बहु करुं विनवणी । पुन्हां भूषवा जर पथ चरणीं ॥२॥*
*। द्या दर्शन जाणुनि निज दासी । कळे सिते त्या प्रेम-पिपासी ॥३॥*
*। वचनिं मधुर मृदु बहु परितोषित । जणुं कौमुदि कुमुदिनींस पोषित ॥४॥*

**अर्थ** - अति प्रेमाने सीतेच्या पाया पडून त्यांनी विविध आशीर्वाद दिले की जोपर्यंत शेष पृथ्वीला धारण करील तोपर्यंत तुम्ही सदा सौभाग्यवती व्हा (तुमचे सौभाग्य अखंड राहो).॥दो.११७॥ देवी ! तुम्ही पार्वतीसारख्या पतीला प्रिय व्हा. (मात्र) आमच्यावरचे प्रेम कमी होऊ देऊ नका (हं) (सतत आमच्यावर कृपा असावी).॥१॥ आम्ही हात जोडून पुष्कळ (वारंवार) विनवणी करतो की जर हा मार्ग आपल्या पायांनी पुन्हा विभूषित केलात - ॥२॥ तर आम्ही आपल्या आवडत्या (प्रेमातल्या निज) दासी आहोत हे जाणून आम्हाला दर्शन द्या. सीतेला कळले की यांना प्रेमाची तहान लागली आहे.॥३॥ गोड गोड कोमल वचनांनी सीतेने त्यांना

सर्व प्रकारे संतुष्ट (परितोषित) केल्या व त्या अशा आनंदित झाल्या की जणू चंद्रिकेने (चांदण्याने) कुमुदिनींना प्रफुल्लित करून पुष्ट केल्या.॥४॥

**टीका. दोहा** - (१) पाया पडणे - **नमस्कार करणे** यांत दास्यभावना आहे. त्या आपणांस दासी म्हणतच आहेत. (पुढील चौ. ३) व आशीर्वाद देण्यात वात्सल्यभाव आहे. सम्राटाची सून म्हणून नमस्कार केला व हे दाम्पत्य चिरकाळ पृथ्वीवर राहावे या भावनेने, एक सौभाग्यवती स्त्री जाणून प्रेमाने आशीर्वाद दिले. **(क) विविध आशीस** - सदा सौभाग्यवती व्हा **एक आशीर्वाद** झाला. सदा म्हणजे मरेपर्यंत असा अर्थ होतो. उद्या मरण आले तरी 'सौभाग्यवती भव' हा आशीर्वाद खोटा ठरला असे म्हणता येणार नाही; म्हणून **दुसरा आशीर्वाद दिला** व काळाची मर्यादा कल्पान्तापर्यंत वाढविली. शेष कल्पान्तापर्यंत पृथ्वीला धारण करतो. या आशीर्वादाने पतिपत्नींना कल्पान्तापर्यंत आयुष्य असो असे सांगितले. **(ख)** कल्पान्तापर्यंत दोघेही जगली; पण पतीचे पत्नीवर प्रेम नसेल तर ते जीवन अनंत वेळा मरण्यापेक्षा दुःखद होईल म्हणून पुढील चौपाईत **तिसरा आशीर्वाद दिला की 'पतिप्रिया पार्वतिसम व्हावे'** या आशीर्वादात अक्षय सौभाग्याचा **चौथा आशीर्वाद आहे.** कारण पार्वती शिवाची नित्य शक्ति आहे, अविनाशी आहे. या प्रमाणे विविध शब्दांची सार्थकता सिद्ध झाली. पतिला प्रिय आणि पति जिला प्रिय असे दोन अर्थ आहेत म्हणून पांच झाले.

**चौ. १-३ (१) प्रेम आम्हावर उणें नसावें** - यांत पुन्हा सेव्यसेवकभाव बळावला व अत्यंत प्रेमाची माणसे एकमेकांस निरोप देताना जसे सांगतात तसे; पण अगदी अन्तःकरणपूर्वक सांगत आहेत. आमच्यावरील प्रेम कमी होऊ देऊ नका. म्हणजेच आम्हाला विसरू नका. आमची आठवण असो द्यावी की अशा वेड्यावाकड्या, उद्धट, अडाणी बाया भेटल्या होत्या. या मार्गाने पुन्हा परत गेलांत तर आम्हाला भेटल्याशिवाय जाऊ नका. आमची आठवण राहिली, प्रेम कमी झाले नाही, तर भेटल्याशिवाय तुम्ही जाणारच नाही. आम्ही तुम्हाला कधी विसरणे शक्यच नाही; पण 'बहूत भक्त तुम्हांला आम्हांला कोण पूसते' असे होणे शक्य आहे; म्हणून पुनःपुन्हा विनवितो की आम्हाला विसरू नका.

(२) **कळे सिते त्या प्रेमपिपासी** - या सगळ्यांना प्रेमाचीच तहान लागली

आहे; दुसरी काहीही कामना, तृष्णा, आशा यांच्या हृदयात नाही हे सीतेने जाणले. कशाचीही आशा न राहता जेव्हा सीताराम प्रेमाचीच तृषा लागते तेव्हा ती शमविण्यास वेळ लागत नाही. तेच येथे घडत आहे.

**चौ. ४ - (१) बचनिं मधुर मृदु बहु परितोषित** - सीता म्हणाली असेल की तुम्ही खेड्यात राहणाऱ्या असून नगरांतल्या स्त्रियांपेक्षा शहाण्या, चतुर आहात, तुम्ही आमचे खऱ्या प्रेमाने खूपच आदरातिथ्य केलेत व ते मी कसे विसरेन? तुम्ही मात्र आम्हाला विसरू नका हं ! जर आम्ही याच मार्गाने आलो तर तुम्हाला जरूर जरूर भेटेन बरं; आताच आले असते पण आम्हाला गावात जाता येत नाही. आमच्यावर प्रेम असू द्या इ.

(२) **जणु कौमुदि कुमुदिनींस पोषित** - कौमुदी - ज्योत्स्ना - चंद्रिका = चांदणे, चंद्रप्रकाश. राम चारु राकाशशी आहेत. '**शरदपर्व बिधुवदन**' (११५) सीता चंद्रिका आहे - 'प्रभा जाइ कुठं भानुस सोडुनि । कुठे चंद्रिका चंद्रा टाकुनि' (९७।६). चंद्रापासून जो आल्हाद वगैरे मिळतोसा वाटतो तो खरोखर चंद्रिकाच देते. आकाशात पौर्णिमेचा चंद्र असून जर पुष्कळ ढग असेल तर आल्हाद मिळत नाही. कारण चंद्रिका आमच्याकडे पहात नाही. यावरून ठरले की शरदातप अपहरण करून आल्हाद देणारी जशी चंद्रिकाच आहे तशीच सीता आहे. '**उद्भवस्थितिसंहारकारिणीं क्लेशहारिणीं सर्वश्रेयस्करीं सीतां आहे असे जे**' (१ मं. ५) म्हटले त्याची प्रतीति येथे दाखविली. चंद्रिका असते तेथे रात्र असतेच. 'राकारजनी भक्ति' (३।४२।) रजनी = रात्र आली की कुमुदिनी प्रफुल्ल होऊन पुष्ट होतात; त्याप्रमाणे सीतेने या सर्व स्त्रियांना रामभक्ति दिली व त्यांचे सर्व क्लेश हरण करून त्यांचे परम कल्याण = श्रेय केले. सीतारामप्रेम = भक्ति, व या सर्व स्त्रिया प्रेमपिपासु आहेत. भक्तिप्रेम कितीही मिळाले तरी अधिक मिळावे असेच नेहमी वाटते. ७।५३।१ पहा.

**ल.ठे.** रामत्रय निघून गेल्यावर या लोकांचे विरह, दुःखच तेवढे मानसांत वर्णिले आहे पण यांना प्राप्त झालेल्या प्रेमभक्तीची दृढता वर्णिली नाही. ती कवितावलीत थोडी व गीतावलीत विशेष वर्णिली आहे. गीतावली (रामायण) मानसपूर्व ग्रंथ असल्याने मानसांत जास्त वर्णन केले नाही. कवितावली (कवित्त

रामायण) मानसोत्तर ग्रंथ आहे. कवितावलीत २।२४, २।२५ आणि गीतावली २।२६, २।३८ व २।४० ही पदे पहावी.

*हिं. । तबहिं लखन रघुबर रुख जानी । पूँछेउ मगु लोगन्ह मृदु बानी ॥५॥*
*। सुनत नारि नर भए दुखारी । पुलकित गात बिलोचन बारी ॥६॥*
*। मिटा मोदु मन भए मलीने । बिधि निधि दीन्ह लेत जनु छीने ॥७॥*
*। समुझि करम गति धीरजु कीन्हा । सोधि सुगम मगु तिन्ह कहि दीन्हा ॥८॥*
*हिं.दो. । लखन जानकी सहित तब गवनु कीन्ह रघुनाथ ॥*
*॥ फेरे सब प्रिय बचन कहि लिए लाइ मन साथ ॥११८॥*
*म. । तैं रघुवरकल बघुनि लक्ष्मणें । पुसला पंथ जनां मृदु वचनें ॥५॥*
*। ऐकत दुःखी सब नर नारी । पुलकित वपू विलोचनिं वारी ॥६॥*
*। चित्त उदास मोद मनिं नुरला । जणुं दिधला निधि विधिनें हरला ॥७॥*
*। जाणुनि 'कर्म' धरुनि धीराला । सांगति ठरवुनि सुगम पथाला ॥८॥*
*म.दो. । लक्ष्मण जानकि सहित तै गमन करिति रघुनाथ ॥*
*॥ प्रिय वचनें फिरवुनि सकल मनां सवें नेतात ॥११८॥*

**अर्थ** - तेव्हा रघुवराच्या मनातील हेतु जाणून लक्ष्मणाने मृदु वाणीने लोकांना (वाल्मीकि आश्रमाचा) रस्ता विचारला.॥५॥ ऐकताच सर्व स्त्रीपुरुषांना दुःख झाले. त्यांच्या अंगावर (वपु) रोमांच उठले व डोळ्यांत पाणी आले.॥६॥ मनात आनंद मुळीच उरला नाही व चित्त असे उदास झाले की जणू दिलेली निधि (ठेवा, सुखाचा, आनंदाचा) विधीने हिरावून नेला.॥७॥ 'आपले कर्म' असे समजून त्यांनी धीर धरला व सुगम मार्ग कोणता ते (आपसात) ठरवून तो सांगितला (व दाखविण्यासाठी पुरुष निघाले.॥८॥ तेव्हा लक्ष्मण व जानकी यांच्यासह रघुनाथांनी गमन केले. प्रिय वचनांनी त्या सर्वांना परत वळवून त्यांच्या मनाला मात्र बरोबर घेऊन गेले.॥दो.११८॥

**टीका. चौ. ५ (१) रघुवर-कुल बघुनि लक्ष्मणें पंथ पुसला - आपल्या स्वामीच्या मनातील भाव, हेतु जाणून त्या प्रमाणे वागणे हे उत्तम सेवकाचे लक्षण आहे. रघुवर =** रघुकुलश्रेष्ठ. प्रयागाहून निघाले ते वाल्मीकी दर्शनाच्या हेतूने निघाले आहेत; म्हणून **वाल्मीकी आश्रमास जाण्याचा मार्ग विचारला.** यमुनातीरापासून

वाल्मीकी आश्रम चित्रकूटच्या सरळ रस्त्यावर नसावा म्हणूनच भरत वाल्मीकी आश्रमात न जाता परभारे चित्रकूटला गेले आहेत. रामनगरजवळील हे स्थान - **कुअँर दो ताल प्रयागपासून सुमारे ४० मैल आहे व येथून वाल्मीकी आश्रम ५/६ कोस आहे.**

**चौ. ६-८ (१) जणुं दिधला निधि विधिनें हरला** - राम, लक्ष्मण व सीता हे तीन निधि विधात्यानेच यांना अचानकपणे आणून दिले व आता तोच जणू काय बलात्काराने ते यांच्या जवळून घेऊन जात आहे. सर्वांची इच्छा अशी आहे की यांनी येथेच रहावे. दिले त्यानेच व नेणारा तोच ! म्हणूनच सुमित्रा म्हणते **'विधि गति अति विपरीत विचित्रा ॥ जो सुजि पाळी मग करि होळी ॥ बालकेलिसम विधिमति भोळी'** (२८२।१-२२) (क) **या लोकांना हे निधि वाटले पण 'श्याम गौर सुंदर दोघे अति । विश्वामित्र महानिधि पावति'** (१।२१९।३) याचे कारण 'प्रभु ब्रह्मण्यदेव मी जाणें' राम परमात्मा प्रभु आहेत हे विश्वामित्रांनी जाणले होते; पण या ग्रामीण लोकांस हे रहस्य माहीत नाही म्हणून महानिधि न म्हणता निधि म्हटले. **'केविं विदेहसुखा वर्णवें । जन्मदरिद्र जणूं निधि पावे'** (१।२८६।३) राम प्रभु आहेत हे परशुराम प्रसंगांत विदेहराजा विसरले होते म्हणून निधि म्हटले. किती सुंदर समन्वय !

(२) **जाणुनि कर्म** - हे वनात राहणारे हीन जातीचे लोक असूनसुद्धा विधात्यालाही **आता दोष देत नाहीत. रामभक्त दुसऱ्यांस दोष कसे देतील?** हे आपल्या कर्मालासुद्धा दोष देत नाहीत. मनात म्हणतात की आमच्या कर्मानेच यांना येथे आणले व कर्मच नेत आहे, तेव्हा विषाद करून काय उपयोग? **'सहज सरलता मनिं न कुटिलता । यथालाभ - संतुष्ट चित्तता'** (७।४६।२) हे श्रीरामप्रोक्त भक्ति-भक्त-लक्षण येथे दिसले. (क) **दाविति ठरवुनि सुगम पथाला**- सीता बरोबर आहे व हे धनुर्धर असले तरी अति कोमल आहेत हे जाणून कोणता मार्ग सोपा आहे याची चर्चा आपसांत करून सोपा मार्ग सांगितला.

**दो. - (१) प्रिय वचनें फिरवुनि सकल** - यावरून ठरते की पुरुषांनी सोपा मार्ग तर सांगितलाच पण तो दाखविण्याच्या निमित्ताने पुष्कळ लोक रघुनाथांबरोबर निघाले; पण त्यांची समजूत घालून त्यांस परत पाठविले. (क) **मना सवें नेतात**

- भाव हा की राम गेल्यापासून यांचे मन व्यवहारात व प्रपंचात राहिले नाही. ते सतत रामलक्ष्मण सीता यांचे ध्यान, त्यांच्या गुणांचे कथन, चिंतन, त्यांच्या चरित्राचे चिंतन, वर्णन यांतच रमू लागले. 'तच्चिन्तनं तत्कथनं अन्योन्यैः तत्प्रबोधनम्' असेच घडू लागले. (ख) **गमन करिति रघुनाथ - रघुनाथ** शब्दांतील भाव 'प्रमुदित मन रघुराज चालले' (१०९।६) यांतील 'रघुराज' च्या टीकेत पहावे. वाल्मीकींच्या जवळ केवळ माधुर्य भावानेच वागणार आहेत. राम निघून गेल्यावर काय होते पाहू :

***हिं.*** ***। फिरत नारि नर अति पछिताहीं । दैअहिं दोषु देंहिं मन माहीं ॥१॥***
***। सहित बिषाद परसपर कहहीं । बिधि करतब सब उलटे अहहिं ॥२॥***
***। निपट निरंकुस निठुर निसंकू । जेहिं ससि कीन्ह सरुज सकलंकू ॥३॥***
***। रूख कलपतरु सागर खारा । तेहिं पठए बन राजकुमारा ॥४॥***

***म.*** ***। नारी नर विव्हळ फिरतां अति । देती दोष मनीं दैवाप्रति ॥१॥***
***। सहित विषाद परस्पर वदती । विधिकृति सगळ्या उलट्या असती ॥२॥***
***। निष्ठुर निरंकूश निःशंकी - । अति, जो करि शशि सरुज कलंकी ॥३॥***
***। रूख कल्पतरु सागर खारा । तो पाठवि वनि राजकुमारा ॥४॥***

**अर्थ** - (घराकडे) परत फिरताना स्त्रिया व पुरुष अति व्याकुळ होतात; व मनात दैवाला दोष देऊ लागतात.॥१॥ खिन्न होऊन एकमेकांस म्हणतात की, विधीच्या सर्व कृती अगदी उलट्या असतात.॥२॥ तो निष्ठुर, निरंकुश (मनास वाटेल ते करणारा, कोणाचा दाब नसलेला) व निःशंक (शंका, भय इ. काही वाटत नाही.) आहे. कारण की त्याने चंद्राला रोगी व कलंकयुक्त केला.॥३॥ कल्पतरुला रूख केला व सागराला खारा बनविला; व त्यानेच या दोन राजकुमारांना वनात पाठविले.॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) पछिताहीं =** पश्चाताप करतात, असा शब्दार्थ असला तरी तो येथे योग्य नाही. स्वतः केलेल्या दोषादिकांबद्दल पाठीमागून जे वाईट वाटणे त्याचे नाव पश्चाताप करणे तसे येथे नाही. रामसीता वनात चालत जात आहेत याबद्दल यांना दुःख होत आहे. म्हणून येथे व्याकुळ होणे, विव्हळणे असा अर्थ घेणेच योग्य आहे. (क) **देती दोष मनीं दैवाप्रति** - रामवियोगाने

अति दुःखी होऊन स्वतःच्या दैवास - प्रारब्धास दोष देत आहेत व तोसुद्धा मनात. ही यांची व्याकुळता प्रभुवियोगाने उत्पन्न झालेली असल्याने भूषणास्पद आहे. या निमित्ताने आता तच्चिंतनं तत्कथनं इ. सहज घडत आहे. रामास वनवास घडल्याबद्दल विदेही जनकांससुद्धा अति दुःख झालेले दिसेल.

(२) **बिधिकृती सगळ्या उलट्या असती** - या चौपाईपासून विधीला दोष देण्यास प्रारंभ झाला, पण तो स्वतःच्या दुःखांविषयी नसून रामचंद्रांस वनात पाठविले म्हणून दोष देत आहेत. विधिकृति कशी असते या विषयी सुमित्रेचे वचन (२८२।१-२) १११।७-८ च्या टीकेत दिले आहे. नाव विधि आहे, पण करतो मात्र अविधि. सगळेच उलटे करतो. का करतो याचे कारण पुढील चौपाईत देऊन विपरीत कृतीची उदाहरणे देतात व मग मुख्य मुद्दा सांगतात.

**चौ. ३. (१) निष्ठुर** - दयामाया काही नसलेला, अगदी कठोर, निर्दय असला पाहिजे. कारण या राजकुमारांना व राजकुमारीला वनात अनवाणी चालत जाताना पाहून आम्हाला, क्रूर, निर्दय, जंगली लोकांनासुद्धा दुःख होते व दया येते, पण त्याला काहीच वाटत नाही. **(क) निरंकुश** - कोणी शास्ता त्याला नाही असे वाटते; नाहीतर वाटेल त्याला, वाटेल तसे याने वागविले नसते. सीतारामलक्ष्मण काय वनात जाण्यास योग्य आहेत? डोळ्यांत ठेवल्याने सुद्धा त्यांना कष्ट होत असतील ! **(ख) निःशंकी** - निःशंक, निलाजरा - जनलज्जा, मनलज्जा, लोकापवादभय इ. त्याला काही नाही, म्हणून तर चंद्राला **सरुज** = रोगी, क्षयी केला व गुरु-अपमान दोष - कलंक - लावला. शशी सौंदर्यसंपन्न, शीतलता, आल्हाद देणारा, तापहारक इ. गुणांनी विभूषित आहे. पण त्याच्या ठिकाणी वरील दोनच नव्हे १६ दोष आहेत. राम निर्दोष शशी आहेत व लक्ष्मणही तसेच आहेत. १।१६।५ व १।२३२ पहा. शशीत १६ दोष ३।२८।६ टी.प.

**चौ. ४ - (१) रूख कल्पतरु - रूख** = वृक्ष. कल्पिलेले देण्याची शक्ती ज्याला दिली त्याला त्याने वृक्ष करून ठेवला ! स्थावर केला, बोलत-चालत नाही. सौंदर्य नाही ! असे करणे त्या विधीला कसे बरे वाटले? राम कल्पतरु असून निर्दोष आहेत तर त्यांना वनवास दिला ! **(क) सागर खारा** एवढा थोरला अगाध जलाशय, कधी कमी अधिक न होणारा तर त्याला खारा करून ठेवला !

काठाजवळ राहणाऱ्यांना सुद्धा पिण्यास पाणी निरुपयोगी करून ठेवले. हा एकच नाही तर असे अनेक दोष त्याने सागरांत निर्माण करून ठेवले आहेत. राम पूर्ण निर्दोष, गुणसागर, कृपासागर, रूपसागर, सौंदर्यसागर इत्यादी आहेत तर त्यांना वनात पाठविले. त्या विधीने प्रत्येक चांगल्या गोष्टीत काहीना काहीतरी मोठा दोष निर्माण करून ठेवला आहे. 'विधीप्रपंच गुणागुण मिश्रित' (१|६|४) राम राजकुमार विधिकृतीला अपवाद आहेत; म्हणूनच **(ख) तो पाठवि वनिं राजकुमारां** - आपण निर्माण केलेल्या विश्वाच्या विरुद्ध यांचा सहज स्वभाव आहे; म्हणूनच यांचा काहीसुद्धा अपराध नसता विधीने यांना वनांत धाडले असले पाहिजेत. कारण त्याला कोणी विचारता नाही, कोणी शास्ता नाही, दया नाही व लज्जा नाही. येथे गूढ असलेला वरील भावच पुढे स्पष्ट सांगितला जात आहे. चंद्र कल्पतरु, व सागर हे परोपकारी असून विधीने त्यांच्याशी निर्दयपणा केला हे येथे दाखविले. या राजकुमारांशी कसा निर्दयपणा केला हे आता पुढील चौपायांत सांगतील -

*हिं.* *। जौं पै इन्हहि दीन्हं बनबासू । कीन्ह बादि बिधि भोग बिलासू ॥५॥*
*। ए बिचरहिं बन बिनु पदत्राना । रचे बादि बिधि बाहन नाना ॥६॥*
*। ए महि परहिं डासि कुस पाता । सुभग सेज कत सृजत बिधाता ॥७॥*
*। तरुबर बास इन्हहि बिधि दीन्हा । धवलधाम रचि रचि श्रमु कीन्हा ॥८॥*

*म.* *। यांस धाडले जर वनवासा । वृथा निर्मि विधि भोगविलासां ॥५॥*
*। पथिं जाणें अनवाणी यांना । रचि विरंचि जगिं वृथा चि यानां ॥६॥*
*। हे महिं पडती कुशपर्णावर । सुभग शेज विधि निर्मी का तर ॥७॥*
*। तरुतळिं वास यांस जर दिधला । धवलधाम रचरचुनी श्रमला ॥८॥*

**अर्थ** - या राजकुमारांना ज्या अर्थी वनात धाडले त्या अर्थी ब्रह्मदेवाने विविध भोगविलास व्यर्थ निर्माण केले (असे म्हणावे लागते).॥५॥ यांना जर रस्त्यानं अनवाणी चालत जावे लागत आहे तर विरंचीने या जगात नाना प्रकारच्या यानांची, वाहनांची रचना केली तरी कशाला? व्यर्थच केली ! ॥६॥ गवत व पालापाचोळा घालून यांस जमिनीवर पडावे लागत आहे तर मग विधीने सुंदर शय्या का निर्माण केल्या?॥७॥ यांना जर वृक्षाखाली वस्ती करावयास लावले

तर मग मोठमोठ्या अनेक चुनगच्ची हवेल्या रचून त्याने (वृथा) श्रमच केले (म्हणावयाचे) ॥८॥.

**टीका.** (१) १२०।१ पर्यंतच्या पुढील सर्व वर्णनांत भाव हा आहे की उत्तमोत्तम वस्तूंचे भोग उत्तमोत्तम व्यक्तींनाच मिळणे जरूर व योग्य आहे. लहान बालकाला लहानसा गुळाचा खडा न देता गाढवाला गुळाची ढेप खाऊ घालणे हा जसा महामूर्खपणा व त्या गुळाचा दुरुपयोग, तसेच ब्रह्मदेवाने जगातील सर्व भोगविलासांचे केले आहे. यांच्यासारखे पुरुषोत्तम जगात दुसरे नाहीत. दशरथ महाराजांचे व अयोध्येचे ऐश्वर्य व सुख पाहून इंद्राला सुद्धा लोभ सुटतो ! अशा अनुपम ऐश्वर्यात व सर्व प्रकारच्या भोगवैभवांत, डोळ्यांतील बाहुल्यांप्रमाणे जपून सर्वांनी प्राणांपलीकडे वाढविलेल्या या राजकुमारांना जर ब्रह्मदेवाने वनवास दिला तर मग जगातील सर्व भोगविलास निर्माण केले कशाला? हा मुख्य मुद्दा आहे. पुढे काही भोगांचे वर्णन केले आहे. (क) पादत्राण, वाहने, याने वगैरे सुखाने विहार करण्याची साधने (ख) गाद्या, गिर्द्या, प्रावरणे वगैरे सुखाने झोप घेण्याची साधने. (ग) जेथे सुखाने निर्भयपणे राहता येते असे सर्व सुखसोईंनी परिपूर्ण असलेले राजमहाल (घ) शरीराचे संरक्षण, लज्जारक्षण करून सुख देणारी वस्त्रे, कपडे, भूषणे (ड) उत्तम स्वादिष्ट सुखानंददायक, आरोग्यसंवर्धक, भक्ष्यभोज्यादि पेयादि विविध पदार्थ इत्यादी सर्व गोष्टींपासून ब्रह्मदेवाने या पुरुषोत्तमांना वंचित केले व कधी ही सवय, अभ्यास नसलेली प्रत्येक विरुद्ध गोष्ट यांना करावी लागत आहे. याप्रमाणे विधीच्या विपरीत करणीचे नमुने या चार ओळींत व पुढील तीन ओळींत दाखविले आहेत.

***हिं.दो*** *। जौं ए मुनि पट धर जटिल सुंदर सुठि सुकुमार ॥*
*॥ बिबिध भाँति भूषण बसन बादि किए करतार ॥११९॥*

***हिं.*** *। जौं ए कंद मूल फल खाहीं । बादि सुधादि असन जग माहीं ॥१॥*

***म.दो.*** *। हे जर मुनिपटधर जटिल सुंदर अति सुकुमार ॥*
*॥ नानाविध भूषण वसन सृजी वृथा विधि फार ॥११९॥*

***म.*** *। कंद मूळ फळ हे जर खाती । खाद्य सुधादि जगांत वृथा तीं ॥१॥*

**अर्थ** - हे अति सुंदर व अति सुकुमार असून यांना जर मुनि वस्त्रे वापरावी

लागत आहेत तर ब्रह्मदेवाने (जगत्कर्त्यांने) नाना प्रकारची विपुल वस्त्रे व भूषणे विनाकारणच (वृथा) (कां) निर्माण केली?।।दो.११९।। यांना जर कंदमूळफळें खावी लागत आहेत तर मग विधात्याने नाना प्रकारचे खाद्य पदार्थ व अमृतादि पेय पदार्थ व्यर्थच निर्माण केले.।।१।।

**टीका.** - ज्यांच्या मस्तकावर दिव्य रत्नकिरीट - छत्रादि शोभावयाची त्यांच्या - डोक्यावर जटाभार ! अत्यंत सुंदर व परम कोमल तनूच्या या राजकुमारांना तलम, मऊ, अति सुंदर वस्त्रे व नानाविध अलंकार पाहिजेत; पण यांना दिली वल्कले व अंगावर सोन्याचे सुत सुद्धा नाही ! कैकयी कुमति, दुष्ट असून तिला हे सर्व सुख दिले असे हे म्हणत नाहीत. रामभक्त परदोष चर्चा करीत नाहीत. मग ब्रह्मदेवाला दोष का देत आहेत? स्वतःच्या सुखदुःखास्तव हे दोष देणे नसून, राम दुःखामुळे आहे. हे प्रेमभक्तीचे एक लक्षण आहे. हे लोक रामदुःखाने आर्त आहेत. **असे दुःख होऊन जे ब्रह्मदेवाला सहज दोष देतील त्यांची पायधुळ ब्रह्मदेव आपल्या मस्तकी धारण करू इच्छितील.** ल.ठे. - या लोकांच्या अनुपम भाग्याची प्रशंसा करून देवांनी त्यांच्यावर पुष्पवृष्टी केल्याचे वर्णन गीतावली पद ३०, ३२ यांत पहावे. **'बरषि सुमन सुर हरषि हरषि कहैं अनायास भवनिधि नीच नीके तरि गे'** (गीता. ३२।४) सुमन वृष्टि करून देव वारंवार हर्षित होऊन म्हणतात की 'हे नीच लोक असून अनायासे उत्तम प्रकारे भवसागर तरून गेले !

**बि.ल.ठे.** - (१) श्रीरामसीता संवादांत दो. ६४ च्या टीकेत मनुष्यास आवश्यक अशी **सप्तविध** (सात प्रकारची) **सुखसाधने दाखविली आहेत.** त्यातील फक्त एकाचाच स्पष्ट उल्लेख येथे नाही तथापि ते साधन 'धवलधाम' मध्ये समाविष्ट झालेलेच आहे. जे सुंदर प्रासादात (भाड्याच्या नव्हे) राहात असतील त्यांचे संरक्षक, सेवक वगैरे असणारच. ज्याच्या दाराशी हत्ती झुलतांत तो श्रीमंत असणारच. **बाकींची सहा पहा :** (१) वनवास - नगरवास (२) वृक्ष - राजमहाल (३) तृणपर्णशय्या - भोगविलासयुक्त सुखशय्या. (४) वल्कले - उंची, सुंदर, कोमल भरपूर, सुखद वस्त्रालंकारादी. (५) कंदमूलफल - विविध खाद्य पदार्थ. (६) पाणी वनांतले - सुधादी - अमृतादी पेय पदार्थ. यावरून ठरले की या खेडवळ, अडाणी, **भोळ्या लोकांनी जी यादी दिली आहे ती** काहीतरी उदाहरणे

देऊन ब्रह्मदेवाला दोष देण्याची हौस पुरी करण्यासाठी नसून **तत्त्वसिद्धान्ताला धरून दिली आहे** आणि दाखविले की **सात प्रकारच्या सुखसाधनांपैकी** यांच्या योग्यतेला साजेल असे **एकही सुखसाधन या कुमारांच्या जवळ** त्या निर्दय, कठोर हृदयी विधीने **ठेवले नाही**. इतकेच नव्हे तर सगळी, साती दुःखसाधने त्यांच्या पदरांत टाकली आहेत.

(२) **शंका.** - येथे दोन कुमारांच्या बद्दलच उल्लेख कां? **सीतेच्या दुःखाचा व विधाता तिच्याशी निर्दय झाल्याचा उल्लेख का नाही? समाधान** - विधीला दोष देणारी ही स्त्रीपुरुष मंडळी, रानटी, खेडवळ, अशिक्षित असली तरी वैदिक सनातन धर्मसंस्कृति त्यांच्या रक्तात सहज भिनलेली आहे. **त्यांना माहीत आहे की वेदधर्मानुसारी सती पतिव्रतांच्या सर्व सुखानंदाचा महासागर म्हणजे फक्त त्यांच्यावर प्रेम करणारा त्यांचा प्रिय पति** ! सीता वनवासात असता तिला पतीसान्निध्याचा, पतिसौख्याचा व पतिप्रेमाचा जेवढा लाभ मिळत आहे तेवढा अयोध्येतील सप्तविध सर्वोत्तम सुखसाधनांत मिळत नव्हता व पुढेही मिळणार नाही; हे या खेडवळ स्त्रीपुरुषांस चांगले माहीत आहे. म्हणून त्यांनी त्या बाबतीत ब्रह्मदेवाला दोष दिला नाही.

(३) वरील सात ओळींतील वचने ज्यांनी श्रवण केली त्यांपैकी काहींनी 'तो पाठवि वनिं राजकुमारां' यांतील मर्म जाणले. ते श्रोते आता आपले विचार प्रगट करून 'तो पाठवि वनिं राजकुमारां' याचे कारण सांगतात. जनकपुरीतील लोकांनासुद्धा ते मर्म कळले नाही !

*हिं.* *। एक कहहिं ए सहज सुहाए । आपु प्रगट भए बिधि न बनाए ॥२॥*
*। जहँ लगि बेद कही बिधि करनी । श्रवन नयन मन गोचर बरनी ॥३॥*
*। देखहु खोजि भुअन दस चारी । कहँ अस पुरुष कहाँ असि नारी ॥४॥*
*। इन्हही देखि बिधि मनु अनुरागा । पटतर जोग बनावै लागा ॥५॥*
*। कीन्ह बहुत श्रम ऐक न आए । तेहिं इरिषा बन आनि दुराए ॥६॥*

*म.* *। कोणि म्हणति हे स्वभावसुंदर । स्वयें प्रगटले नहिं विधिकृत वरं ॥२॥*
*। जितकें वेद वदे विधिनिर्मित । श्रवण-नयन-मन-गोचर वर्णित ॥३॥*
*। धुंडुनि पहा भुवनिं दशचारी । असे पुरुष कोठें अशि नारी ॥४॥*

*। यांस बघुनि विधि मनिं अनुरागे । यांसम दुसरे निर्मू लागे ॥५॥*
*। बहुत करी श्रम परि न साधलें । त्या ईर्षें यां वनीं धाडले ॥६॥*

**अर्थ** - कोणी म्हणतात की हे स्वभावताच सुंदर असून स्वतःच प्रगट झाले आहेत. यांना विधीने नाही निर्माण केले बरं ! ॥२॥ ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्याचे वेदांनी जितके वर्णन केले आहे ते सर्व विधिनिर्मित कान, नयन व मन यांचा विषय आहे.॥३॥ (पाताळापासून इन्द्र लोकांपर्यंतची खालची) दहा भुवने व (महर्लोकापासून सत्यलोकापर्यंतची वरची) चारी भुवने धुंडून (सोधून) पहा व असे पुरुष व अशी स्त्री कोठे आहेत का सांगा. (कोठेच नाहीतच).॥४॥ यांना पाहतांच विधीच्या मनात अनुराग उत्पन्न झाला व तो यांच्यासारखे दुसरे निर्माण करू लागला.॥५॥ त्याने पुष्कळ श्रम केले पण ते काही साधले नाही, तेव्हा त्या ईर्षेने त्याने यांना वनात आणून लपविले.॥६॥

**टीका.** (१) कोणी साहित्यिक म्हणतील की खेडवळ अशिक्षित लोकांच्या मुखांतून हे असले रमणीय व तात्त्विक विचार प्रगट होणे अस्वाभाविक आहे ! **राम प्रेमात चित्त रंगले, सर्व इंद्रिये रामचर्चेत, चिंतनांत, सेवेत सहज रममाण होऊ लागली म्हणजे रामकृपेने योगांतील मधुमती भूमिका कशी प्राप्त होते हे जावे त्याच्या वंश तेव्हा कळे** ! वज्र हृदयी, विषयलोलुप, शब्द पांडित्यास हे कसे कळणार ! पण **असे सहज घडते हे मात्र खरे आहे.** १४।१५ व्या वर्षी ज्ञानदेवी कशी लिहिली? रेडा वेद कसे बोलला? १३ व्या वर्षी तोरणा किल्ला कसा घेतला? सिद्धारूढ महाराजांनी तिसऱ्या वर्षी मेलेली म्हैस कशी जिवंत केली? यांचे जे उत्तर त्यापेक्षा अधिक संयुक्तिक व शास्त्रीय उत्तर वर दिले आहे. **'तच्चिन्तनं तत्कथनं अन्योन्यैः तत्प्रबोधनम्...'** (श्रुति) **'तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकं । ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते' 'तेषामेवानुकम्पार्थम् अहमज्ञानजं तमः नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता'** (भ.गी.) या श्रुतिस्मृति वचनांची यथार्थता श्रीगोस्वामींनी येथे मोठ्या कौशल्याने दाखविली आहे.

**चौ. २ - (१) स्वयें प्रगटले, नहिं बिधिकृत** - जे लोक यांना राजकुमारच मानीत होते त्यांना आता हे ज्ञान झाले की हे जन्मले नसून स्वेच्छेने प्रगट झाले आहेत. जे ज्ञान अयोध्येतील लाखो स्त्री-पुरुषांत हाताच्या बोटांवर मोजण्या

इतक्यांना १८ वर्षात झाले नाही ते यांना काही क्षणात सहज झाले. **'इच्छामय नरवेषा घेइन प्रगट निकेतीं तुमच्या होइन'** (१।१५२।१) हेच यांना सहज कळले ! ही भक्तिभावाची व प्रभुकृपेची महती दाखविली ! गीतावलीत सुद्धा हे लोक म्हणतात की, 'रूप सोभा प्रेम के से कमनीय काय हैं । **मुनिबेष किए किधौ ब्रह्मजीव मायं हैं'** (२।२८) **(क) नहि विधिकृत** - विधिकृत सर्व सदोष आहे; पण यांच्यांत कोणतेच दोष नाहीत; म्हणून हे विधिकृत नाहीत. स्वयें प्रगटले - भाव हा की प्रगट होण्यापूर्वी अप्रगट, अव्यक्त होते. कान, डोळे, मन इ. इंद्रियांच्या पलीकडे, या इंद्रियांना अज्ञेय असे होते पण तुमच्या आमच्यावर व इतर अनेक दीनांवर कृपा करण्यासाठी इंद्रिय गोचर होऊन प्रगट झाले आहेत. 'रामकृपें दुर्लभ ना काही' हेच खरे !

**चौ. ३ - (१) विधिनिर्मित श्रवण नयन मनगोचर वर्णित** - विधिनिर्मित सर्व जग, मन व श्रवणादि इंद्रिये यांचा विषय आहे व त्याचे वर्णन वेदांनी केले आहे. भाव हा की हे राजकुमार मन व इंद्रिये यांचा विषय नाहीत. कारण ते विधिकृत = विधिनिर्मित नाहीत. म्हणजेच मनोवागतीत असे जे ब्रह्म तेच यांचे तात्त्विक रूप आहे. 'विधिनिर्मित' विश्वाचे वेद वर्णन करतात व हे विधिनिर्मित नाहीत', यातून दुसरा ध्वनि हा निघतो की वेद सुद्धा यांचे विश्वासारखे वर्णन करू शकत नाहीत. नेति नेति असे निषेध मुखाने वर्णन करावे लागते. असे असून ते आपल्याला सहज इन्द्रिय गोचर झाले ही त्यांचीच कृपा !

**चौ. ४ - (१) दश चारी** - अशी गणना का हे अर्थामध्ये कंसांत दाखविले आहे. **(क) असे पुरुष कोठें अशी नारीं** - यांच्यासारखे पुरुष व या स्त्रीसारखी स्त्री चौदा भुवनांत नाही. यांच्यासारखे पुरुष हेच व या नारीसारखी नारी हीच. भाव हा की शिव-विष्णु व पार्वती, लक्ष्मीसुद्धा यांच्यासारखी नाहीत. **'सुरमुनि मनुज दनुज नागांमधि । श्रुत न कुठें अशि अति शोभा कधिं । विष्णु चतुर्भुज विधि चतुरानन । बिकट वेष पुररिपु पंचानन ॥ असा देव दुसरा कोणी नहिं । ही छबि सखी तुलणें जयास हिं'** (१।२२०।६-८) असे जनकपुरी ललना म्हणाल्या; पण नुसत्या शोभेविषयी. त्यांना हे मर्म नाही कळले की हे विधिकृत नाहीत इ. सीतेविषयी १।२४७।४ पासून २४७ पर्यंत पाहणे.

**चौ. ५-६ (१) यांसम दुसरे निर्मू लागे** - ब्रह्मदेवाला या तिघांसारख्या दुसऱ्या व्यक्ती निर्माण करता आल्या नव्हत्या. सर्वांग सुंदर व पूर्ण निर्दोष ! त्यामुळे तो यांच्यावर अनुरक्त झाला. पण लोक म्हणतील की ब्रह्मदेवाला असे पुरुष व स्त्री निर्माण करताच येत नाहीत. म्हणून त्याने हे आदर्श पुढे ठेऊन हुबेहुब असे पुरुष व अशी स्त्री निर्माण करण्याचा प्रयत्न यांच्या विवाहापासून म्हणजे ४ वर्षे करून पाहिला पण काही साधेना ! तेव्हा यांच्यामुळे आपल्याला कमीपणा येतो असे वाटून त्या इर्षेने यांना वनात पाठवून देण्याची युक्ति योजली. हेतू हा की वनात कोण पाहणार यांना? पाहतील जंगली, रानटी लोक व ठेवतील नावे पण त्यांच्या म्हणण्याला कोण किंमत देणार? असे त्याला वाटले. आता या चर्चेचा गोड उपसंहार करतात.

*हिं.* ***। एक कहहिं हम बहुत न जानहिं । आपुहि परम धन्य करि मानहिं ॥७॥***
***। ते पुनि पुन्यपुंज हम लेखे । जे देखहिं देखिहहिं जिन्ह देखें ॥८॥***
*हिं.दो.* ***। एहि बिधि कहि कहि बचन प्रिय लेहिं नयन भरि नीर ॥***
***॥ किमि चलिहहिं मारग अगम सुठि सुकुमार सरीर ॥१२०॥***
*म.दो.* ***। कोणि म्हणति अम्हि बहु न जाणतों । धन्य आपणा परम मानतों ॥७॥***
***। पुण्यपुंज आम्हीं गणुं तेही । जे बघती बघतिल दिसले ही ॥८॥***
***। अशि वचनें प्रिय बोलतां लोटे लोचनिं नीर ॥***
***॥ कशीं कठिण पथिं चालती अति सुकुमार शरीर ॥१२०॥***

**अर्थ** - कोणी म्हणतात की आम्हाला काही (असे) जास्त माहीत नाही - कळत नाही. आम्ही परमधन्य आहोत इतके आम्ही समजतो.॥७॥ आणि आम्ही मानतो की ज्यांनी यांना पाहिले, जे बघत असतील व (पुढे) बघतील ते पुण्यपुंजच होत.॥८॥ अशी प्रिय वचने बोलता बोलता त्यांचे डोळे पाण्याने भरून आले (व म्हणतात की) अत्यंत कोमल शरीर असलेली (ही तिघं) कठीण मार्गाने चालतील तरी कशी?॥दो.१२०॥

**टीका. (१) बहु न जाणतों** - तर्क वितर्कयुक्त कल्पनांच्या उंच भराऱ्या आम्हाला काही मारता येत नाहीत. आमच्या भाग्याने हे वनात आले आणि आमच्या दृष्टीस पडले; आम्हाला परमसुख मिळाले व आम्ही परम धन्य झालो;

एवढे मात्र आम्हाला कळते. आम्हीच कशाला जे कोणी यांना आता पहात असतील, यापूर्वी ज्यांनी यांना पाहिले असेल व जे भविष्यकाळी पाहतील ते सगळे आमच्यासारखेच पुण्यराशी इतके खरे. 'आम्हि सकल सब सुपुण्यरासी । जन्मुनि जगतिं जनकपुरवासी । जिहिं जानकी रामछबि दृष्टही । सुकृति अम्हांसम अधिक कोणी नहिं' (१।३१।४-५) असे जनकपुरीतील लोक म्हणाले आहेत.

**दो.** (१) ज्यांच्या नुसत्या दर्शनाने परमधन्यता मानण्याइतके सुख झाले, त्यांस वनवासाने होणाऱ्या कष्टांची, क्लेशांची, स्मृति होताच सर्व गहिवरून जातात. उत्तरार्धात विषम अलंकार आहे. मार्ग अति कठीण आणि यांचे देह अति कोमल ! अगदी शंभर टक्के विषमता ! मार्गाची कठीणता व पायांची अति मृदुता, ग्रीष्म ऋतूचा उन्हाळा, काही नाही पायां, डोक्यावर नाही छाया, सात्त्विक अन्न नाही खाया ! अशा गोष्टींचा विचार करीत वर्णन करावे व अश्रू ढाळावे असे चालू झाले. स्त्रियांची व पुरुषांची एकच दशा !

*हिं.* ***। नारि सनेह बिकल बस होहीं । चकई साँझ समय जनु सोहीं ॥१॥***
***। मृदु पद कमल कठिन मगु जानी । गहबरि हृदयँ कहहिं बर बानी ॥२॥***
***। परसत मृदुल चरन अरुनारे । सकुचति महि जिमि हृदय हमारे ॥३॥***
***। जौं जगदीस इन्हहि बनु दीन्हा । कस न सुमनमय मारगु कीन्हा ॥४॥***
***। जौं मागा पाइअ बिधि पाहीं । ए रखिअहिं सखि आँखिन्ह माहीं ॥५॥***

*म.* ***। नारी स्नेह - विकल अति बनल्या । सायं कोकी समान दिसल्या ॥१॥***
***। मृदु पदकमल कठिण पथ गणुनी । वदति वचन मृदु हृदिं गहिंवरुनी ॥२॥***
***। कोमल लाल पाउलें लागत । निज हृदयांसम महि संकोचत ॥३॥***
***। दिधलें जर जगदीशें यां बन । का प्रसूनमय केला मार्ग न ॥४॥***
***। विधि देइल जर जें मागावें । सखि यानां लोचनिं ठेवावें ॥५॥***

**अर्थ** - सायंकाळी जशा चक्रवाकी तशाच जणू स्त्रिया स्नेहाने अति व्याकुळ झालेल्या दिसू लागल्या.॥१॥ मार्ग कठीण आहे व (त्यांचे) पाय कोमल आहेत हे लक्षात घेऊन हृदय गहिवरून कोमल वाणीने म्हणतात की - ॥२॥ कोवळी कोवळी लाल लाल पावलं जमिनीला लागताच महीसुद्धा आपल्या हृदयासारखी संकोचित होते ! (होत असेल) ॥३॥ जगदीशाने जर यांना वनवास दिला तर

(निदान) मार्ग पुष्पमय का नाही करून टाकला?॥४॥ सखी ! विधीजवळ जे मागावे ते मिळत असेल तर असे वाटते की या तिघांना डोळ्यांतच ठेऊन घ्यावीत.॥५॥

**टीका. - चौ. १ - (१) नारी स्नेह विकल** - आता स्त्रियांच्या विशेष भावनांचे व व्याकुळतेचे वर्णन करीत आहेत. **'नारी नर बिह्वल फिरता अति'** (११९।१) असा उपक्रम करून स्त्रिया व पुरुष यांच्या सामान्य स्थितीचे व भावनांचे वर्णन मागल्या दोह्यांपर्यंत केले; पण स्त्रिया निसर्गतःच अधिक कोमल हृदयीं असल्यामुळे त्यांच्यांत काही वैशिष्ट्य दिसले ते या पाच चौपायांत सांगत आहेत. **(क) सायं, कोकी समान** - सायंकाळ म्हणजे सूर्यास्तानंतरचा अर्धा प्रहर. सूर्यास्त झाला म्हणजे कोकी-चक्रवाकी जशा खिन्न, म्लानमुखी, दीन दिसू लागतात व व्याकुळ होतात तशीच स्त्रियांची दशा झाली. सुचविले की आतापर्यंत लक्ष्मण सीता व राम जात असता पाठमोरी तरी दिसत होती; पण आता मुळीच दिसत नाहीशी झाली. **'जणूं कोक कोकी कमल दीन विहीन तमारि'** (८६) असे अयोध्येतील स्त्रीपुरुषांचे वर्णन केले आहे. येथे तीच उत्प्रेक्षा आहे. साँझसमय = सायं (काळ) = तमारि विहीन झाल्याची वेळ. तमारि = सूर्य. दाखविले की अयोध्येतील पुरुषांची व स्त्रियांची बऱ्याच वर्षांच्या संगतीनंतर झालेल्या रामविरहाने जी दशा झाली तशीच या खेडवळ स्त्रियांची घटकाभर झालेल्या दर्शनाने व संगतीने झाली; पण या पुरुषांची तेवढी झाली नाही.

**चौ. २-३ (१) 'मृदुपदकमल...' 'कशीं कठिण पथिं चालती अति सुकुमार शरीर'** (दो.१२०) असे पुरुषांनासुद्धा वाटले; पण त्यांचे लक्ष्य रामलक्ष्मणांच्या कोमल लाललाल पावलांकडे फारसे गेले नाही. स्त्रियांच्या ते विशेष स्मरणात राहिले म्हणून त्या कोवळ्या लाल कमलांसारख्या तळव्यांचे हृदयात दर्शन होताच त्या अगदी गहिवरल्या. त्यांना असे वाटू लागले की आपले कठोर, रानटी हृदय या कोमल पायांनासुद्धा खुपत आहे, बोचत आहे; त्यामुळे त्यांचे हृदय संकोचित झाले व संकोच वाटू लागला हृदयाला. म्हणून म्हणतात निज हृदयांसम संकोचत. अशा कोमल पायांना कठीण मार्गाने चालताना किती क्लेश होत असतील असे वाटून गहिवरल्या. डोळे उघडून त्यांनी पाहिले तो त्यांना वाटले की आमच्या

हृदयांसारखीच कठीण ही पृथ्वीसुद्धा संकोच पावत आहे ! धन्य धन्य प्रेम ! 'आत्मवत् सर्वभुतेषु यः पश्यति सपश्यति' भाव हा आहे की या तिघांना हृदयांत ठेवण्याची आम्हाला लाज वाटते. नेहमी जवळच प्रत्यक्ष ठेवली पाहिजेत; पण ते तर निघून गेले. आता त्यांच्या पायांचे काय होईल असे वाटून म्हणतात -

**चौ. ४-५ (१) कां प्रसूनमय केला मार्ग न** - वनवास देणाऱ्या जगदीशाने यांच्या या कोमल पायांकडे पाहून हे ज्या मार्गाने जाणार तो मार्ग फुलांच्या (प्रसून = कृत्य) शेजेने भरून ठेवणे जरूर होते. तसे केले असते तरच यांच्या पायांना क्लेश झाले नसते; पण तसा मार्ग जगदीशाने केला नाही यावरून तोसुद्धा निर्दयच असला पाहिजे, असे यांना वाटत आहे. पुन्हा आपल्या कठीण हृदयाची आठवण झाली व विचार केला की आपले हृदय फुलांच्या सारखे कोमल नसता आपण यांना हृदयांत ठेवले हा तरी निर्दयपणाच ! मग यांना ठेवावे तरी कुठे? तेव्हा वाटले की **'यांना लोचनिं ठेवावे.'** यांना डोळ्यांत ठेवले तर आपल्याला हे सतत दिसतील, त्यांच्या शिवाय दुसरे काही पाहू नये असे वाटते तेहि साधेल व डोळे यांनी काही खुपणार नाहीत; पण हे व्हावे कसे? या तिन्ही मूर्ति आमच्या डोळ्यांत राहतील एवढ्या लहान व्हाव्या कशा? ते आपल्या हातात नाही. ते आहे विधीच्या हातात. त्याने जर आमची ही मागणी मान्य केली तरच ते शक्य आहे; पण ज्या अर्थी जगदीशालसुद्धा यांची दया आली नाही त्याअर्थी 'निष्ठुर, निरंकुश, निःशंक' असा जो विधि त्याला दया येणे शक्य नाही, असे वाटून पूर्ण निराशा झाली. या स्त्रियांच्या पुढील दशेची कल्पना कवींनी वाचकांवरच सोपविली आहे. कारण त्यांच्या त्या दशेचे वर्णन करणे शक्यच नाही. ल.ठे. जरी रामसीतालक्ष्मण केव्हाच दृष्टीआड झाले आहेत तरी या म्हणतात 'यांना', कारण यांच्या हृदयांत त्या तिन्ही मूर्ति दिसत आहेत.

*हिं. । जे नर नारि न अवसर आए । तिन्ह सिय रामु न देखत पाए ॥६॥*
*। सुनि सुरूप बूझहिं अकुलाई । अब लगि गए कहाँ लगि भाई ॥७॥*
*। समरथ धाइ बिलोकहिं जाई । प्रमुदित फिरहिं जनमफलु पाई ॥८॥*
*हिं.दो. । अबला बालक वृद्ध जन कर मीजहिं पछिताहिं ॥*
*॥ होहिं प्रेमबस लोग इमि रामु जहाँ जहँ जाहिं ॥१२१॥*

म. *। जे नर नारि न अवसरिं आले । त्यांना सीताराम न दिसले ॥६॥*
*। परिसुनि सुरूप विह्वळ पुसती । गेले अतां कोठवर असती ॥७॥*
*। धावत जाउनि समर्थ बघती । सुफलित जन्म मुदित अति वळती ॥८॥*
म.दो. *। अबला बालक वृद्ध, कर चोळुनि हळहळतात ॥*
*॥ असे प्रेमवश जन, जिथें जिथें राम जातात ॥१२१॥*

**अर्थ** - ज्या स्त्रिया व पुरुष (बाल व वृद्ध) वेळेवर आले नाहीत त्यांना सीताराम व (लक्ष्मण) दर्शन झाले नाही.॥६॥ त्यांच्या सुंदर रूपाचे वर्णन ऐकून ते विचारतात की आता या वेळेपर्यंत ते कोठपर्यंत गेले असतील बरे?॥७॥ जे सशक्त होते ते धावत गेले व त्यांनी दर्शन घेतले व ते आपला जन्म सुफल करून अति आनंदित होऊन परत आले (वळले).॥८॥ दुर्बळ स्त्रिया, बालक व वृद्ध माणसे हात चोळीत हळहळू लागली (पश्चात्ताप करू लागली). या प्रमाणे राम (सीतालक्ष्मण) जिथे जिथे जातात तिथे तिथे लोक असे प्रेमवश होतात.॥दो.१२१॥

**टीका. चौ. ६** - (१) **जे नर नारि न अवसरिं आले** - येथे बाल आणि वृद्ध अध्याहृत घेणे जरूर आहे; कारण त्यांचा उल्लेख दोह्यांत केला आहे. जी माणसे कामधंद्यासाठी बाहेर गेली होती ती वेळेवर येऊ शकली नाहीत. बालकांना, वृद्धांना व अशक्त स्त्रियांना येण्यास वेळ लागला व त्यामुळे या मंडळीला रामदर्शन होऊ शकले नाही. हा सरळ वाच्यार्थ झाला. (क) **गूढार्थ** - रामदर्शनाचा सुयोग ईशकृपेने सहज लाभला असता जे वेळेवर प्रयत्न करीत नाहीत त्यांस रामदर्शन होत नाही. नरदेहलाभ म्हणजेच देवांनासुद्धा दुर्लभ अशी व कपिलाषष्ठीपेक्षाही दुर्लभ अशी रामदर्शनाची पर्वणी ईशकृपेने सहज आली आहे असे असून जे कोणी आपले कौमार्य व तारुण्य अन्य व्यवसायात घालवितात त्यांस रामदर्शन होत नाही; होणे फार कठीण. त्यांना मग वृद्धपणी किंवा मेल्यावर पश्चात्ताप करण्याची - हळहळत हात चोळीत बसण्याची पाळी येते. **'कधितरि करुणेनें नरदेहीं । घाडि ईश निःस्वार्थी स्नेही'** (७।४४।६) **'बहुभाग्यें मानुषतनु मिळली । सुरदुर्लभ सद्ग्रंथि गाइली ॥ साधन धाम दारमोक्षाचें । मिळुनि न मिळविति पर-लोका जे ॥ पावति दुःख परत्र ते शोचति शिर बडवीति'** (७।४३।)

**चौ. ७ - (१) परिसुनि सुरूप बिह्वळ पुसती** - पाठीमागून आल्यावर तेथे जमलेल्या रामप्रेमभक्त स्त्रीपुरुषांच्या मुखाने ऐकले की सीतारामलक्ष्मण अपार अनुपम रूपसंपन्न आहेत. त्यांच्या दर्शनाने आम्हाला परमानंद होऊन आम्ही परम धन्य झालो. सर्व दुःख विसरलो व परम सुखी झालो इ. हा वाच्यार्थ सरळ आहे. **(क) गूढार्थ** - तारुण्य ओसरल्यावर का होईना ज्यांना रामभक्तसंत मुखाने रामस्वरूपाचे वर्णन व त्याच्या साक्षात्काराने होणाऱ्या दुःखरहित परमानंद परमसुख - प्राप्तीचे वर्णन श्रवण करण्यास सापडते ते म्हणतात - **गेले**; ! आता (असे) कोठवर, असती? आयुष्याचे इतके दिवस **गेले** ! वाया गेले ! गेले ते गेले; **पण अता असे कोठवर** व्यर्थ घालवावयाचे? काहीतरी उपाय **असती?** आहेत की नाहीत? (अबलगि गए, **कहँ** लगि? असा पदच्छेद केला म्हणजे वरील गूढार्थ निघतो.) तेव्हा मग साक्षात्कारी, अनुभवी भक्तसंत सांगतात की :

**चौ. ८ - (१) धावत जाउनि समर्थ बघती** - वेळेवर न आलेल्या लोकांनी विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर मागल्या चौपाईनंतर पाहिजे होते; पण ते अध्याहृत ठेवले. या समर्थ लोकांना किती अधीरता झाली आहे हे अध्याहृत ठेवण्याने दाखविले आहे. अमुक अमुक स्थळांपर्यंत फार तर गेले असतील असे काहीतरी खुणेचे स्थान सांगितले असेल. ते शब्द कानात पडताच निघाले धावत. यांत स्त्रिया पण धावल्याच हे दोह्यांतील 'अबला' शब्दाने सुचविले आहे. ज्या सशक्त स्त्रिया होत्या त्या गेल्या धावत, पण लहान मुले, दुर्बल स्त्रिया व वृद्ध स्त्रीपुरुष यांना तेवढी शक्ती नसल्याने धावत जाता येणे शक्य नव्हते व जोराने धावत गेल्याशिवाय त्या त्रिमूर्तींना गाठता येणे शक्य नव्हते. **(क) गूढार्थ** - रामभक्त सांगतात की काही हरकत नाही; तुम्ही अमुक अमुक स्त्रिया व पुरुष अजून रामसाक्षात्कार करून घेण्यास समर्थ आहात; पण आता साधन मार्गाचे आक्रमण अति द्रुत गतीने, इकडे तिकडे (इतर विषयांकडे) न बघता जोराने केले पाहिजे. तसे केलेत तर तुम्हालाही रामदर्शन होईल व तुमचा जन्म सुफल होईल. असमर्थांनी काय करावे ते आता सुचवितात.

**दो. - (१) अबला** = दुर्बल स्त्रिया, ज्यांना वेगाने व जोराने साधन मार्ग आक्रमता येत नाही अशा. असेच दुर्बल, अशक्त झालेले वृद्ध व शक्ति नसलेले

बालक यांना अंतःकरणपूर्वक पश्चात्ताप झाला. शरीराने, वाणीने व मनाने पश्चात्ताप होऊन खरी हळहळ वाटली तर ते सुद्धा संतमुखाने हरिकथा श्रवण करून रामप्रेमवश होऊ शकतील व त्यांचाही जन्म सुफल होईल. **(क) असे प्रेमवश** (होतात) हे शब्द मागील व पुढील चरणाबरोबर घेणे जरूर आहे. दुर्बलांनी धावाधाव करण्याची जरूर नाही **'ठायींच बैसौनि करा एक चित्त । आवडीं अनंत आळवावा'** हात चोळून पश्चात्ताप करतात की आतापर्यंत या हातांचा योग्य उपयोग केला नाही तरी आता ॥ **करा पूजना श्रीहरीच्या करांनों !** असा उपदेश हात व इतर सर्व इन्द्रियांना करून त्यांना तिकडे वळवितात.. ('इंद्रियांस उपदेश' हस्तलिखित कविता आहे.) वाणीने आजपर्यंत ॥ **रामनामगुण यश न गाइलें । क्रीडारत, सुत वित्त वाइले ॥१॥ आता मौन धरी गे रसने । हृदयीं रघुपतिनाम सुरस ने ॥२॥ असे वाणीने प्रेमवश होतात. 'कृत धन दार धाम सुत चिंतन । चित्ता ! रामरूपिं रम, चिंत न ॥३॥** (चिंत = चिंता) असे मनाने प्रेमवश होऊ शकतात. **ल.ठे. लक्ष्मण सीते सहित रघुपती । जै जै गांवा वरुनी जाती'** (११४।१) अशा उपक्रमाने ज्या एका गांवच्या (हल्लीचे रामनगर) आनंदाचे वर्णन सुरू केले होते ते या १२१ व्या दोह्यांत पूर्ण झाले. आता पुढील चौपाईत उपसंहार करून आणखी थोडे सामान्य वर्णन करतील.

**हिं.** ***। गाँव गाँव अस होइ अनंदू । देखि भानुकुल कैरव चंदू ॥१॥***
***। जे कछु समाचार सुनि पावहिं । ते नृप रानिही दोसु लगावहिं ॥२॥***
***। कहहिं एक अति भल नरनाहू । दीन्ह हमहि जोइ लोचन लाहू ॥३॥***
***। कहहिं परसपर लोग लोगाईं । बातें सरल सनेह सुहाईं ॥४॥***

**म.** ***। गांवो-गांविं असा आनंदू । बघुनि भानुकुल-कैरव-चंदू ॥१॥***
***। कांहिं समाचारास ऐकती । ते नृप-राणिंस दोष लावती ॥२॥***
***। भला म्हणति अति कुणी नरनाहो । देइ अम्हां जो लोचन लाहो ॥३॥***
***। कथिति परस्पर पुरुष बाया । स्नेहल सुंदर सरल कथा या - ॥४॥***

**अर्थ** - सूर्यवंशरूपी कैरवांना (कुमुदांना) प्रफुल्ल करणाऱ्या रामरूपी चंद्राचे दर्शन होताच प्रत्येक गावी असा आनंद होऊ लागला.॥१॥ ज्यांना काही (थोडासा) समाचार ऐकण्यास सापडला ते राजाराणींना दोष देऊ लागले.॥२॥ कोणी म्हणतात

की राजा अत्यंत चांगला आहे; कारण त्याने आम्हाला लोचनलाभ दिला.।।३।। पुरुष व बाया स्नेहाने भरलेल्या, सुन्दर व सरल कथा या प्रमाणे आपसांत सांगू लागतातः ।।४।।

**टीका. चौ. १-३** (१) ११४।१ पासून १२१ अखेरपर्यंत वर्णिला तसा आनंद प्रत्येक गावच्या लोकांस मिळाला व मिळणार आहे. 'जो आनंदसिंधु सुखराशी, सुखधाम' तेच राम असल्याने ते सीतालक्ष्मणांसह जेथे जातात तेथे त्यांच्याच कृपेने आनंद लुटण्यास सापडणारच. आमच्या हृदयग्रामांत आनंदसागर असावा असे वाटत असेल तर तेथे सानुज, सशक्तिक, सायुध राम आले पाहिजेत. राम कोणत्या हृदयग्रामांत येऊन राहतात याचे वर्णन पुढे वाल्मीकी-मिलन प्रकरणात आहे; त्याप्रमाणे आम्ही आमच्या हृदयरुपी गावात परिस्थिति निर्माण केली पाहिजे. (क) **भानुकुल कैरवचंद** - भानुकुलरूपी कुमुदांना प्रफुल्लित, सुखी करणारे असून या लोकांवर विशेष कृपा करण्यासाठी अयोध्येतील लोकांना विरह दुःखसागरात लोटून इकडे आले आहेत. ११२ व्या दोह्यांत **'रघुकुलकमलरवि'** म्हटले आहे. तेसुद्धा याच हेतूने; फरक इतकाच की चंद्र = भक्तिरजनी नाथ व रवि = ज्ञानदिनकर, भक्तीनेच ज्ञानाची प्राप्ति होणार असल्याने आधी चंद्राचा उल्लेख केला व नंतर सूर्याचा केला आहे.

**चौ. २-४-(१) 'ते नृपराणिंस दोष लावती'** - ज्यांना काही समाचार म्हणजे थोडी हकीगत कळली, सगळी हकीगत कळली नाही ते लोक मुख्यतः राजाला दोषी ठरवितात; पण पूर्वी ज्यांना सर्व हकीगत कळली ते म्हणाले की, **'राणी राय न भलें आचरति'** (११०।६) म्हणजे त्यांनी राणीला मुख्य दोषी ठरविली. **अर्धवट माहितीवर विसंबून मत बनविणे व मत प्रदर्शित करणे कसे चुकीचे ठरते ते दाखविले.** वाईटांतून चांगले काय निष्पन्न झाले हा विचार ज्यांना करता येतो ते त्याच्या उलट बोलतात. ते राजाचे गुण गातात व राणीला दोष देत नाहीत. **'कोणी म्हणति कृत भलें नृप भला। लोचन लाभ किं बिधिनें दिधला'** (८९।२) येथे विधीचा नामनिर्देश नाही इतकाच फरक. (क) कथिति परस्पर पुरुष बाया - स्त्रिया-स्त्रियांमध्ये आणि पुरुष-पुरुषांत जी सुंदर, प्रेमळ व सरळ चर्चा करतात ती पुढील चौपायांत दिली आहे. ही मंडळी राणीला दोष देत नाहीत की राजाची

प्रशंसा करीत नाहीत. म्हणून यांच्या बोलण्यास सुंदर व सरळ म्हटले. येथे जनस्वभावाचे तीन प्रकार दाखविले. उतावळ्या स्वभावाचा, दोष देणारा एक वर्ग, दुसरा गुण बघणारा व तिसरा गुण किंवा दोष न बघणारा. हे उत्तरोत्तर एकापेक्षा एक श्रेष्ठ आहेत. येथील हे तिन्ही वर्ग रामप्रेमवश होऊन वागत आहेत; म्हणून तिघांचेही भाषण सुंदर व प्रेमळ आहे पण सर्वांचे सरळ नाही.

हिं. *। ते पितु मातु धन्य जिन्ह जाए । धन्य सो नगरु जहाँ तें आए ॥५॥*
*। धन्य सो देसु सैलु बन गाऊँ । जहँ जहँ जाहिं धन्य सोइ ठाउँ ॥६॥*
*। सुखु पायउ बिरंचि रचि तेही । ए जेहि के सब भाँति सनेही ॥७॥*
*। राम लखन पथि कथा सुहाई । रहि सकल कानन मग छाई ॥८॥*

हिं.दो. *। एहि बिधि रघुकुल कमल रबि मग लोगन्ह सुख देत ॥*
*॥ जाहिं चले देखत बिपिन सिय सौमित्रि समेत ॥१२२॥*

म. *। पितरौ धन्य जयां हे झाले । धन्य नगर जेथुनि हे आले ॥७॥*
*। धन्य देश वन शैल गांव ते । जिथं जिथं जाती धन्य ठाव ते ॥६ ॥*
*। रचुनि विरिंचि तया सुख पावे । हे स्नेही ज्याचे सर्वस्वें ॥७॥*
*। पथिक राम-लक्ष्मण सुकथेनें । मार्ग सकल भरलेहि काननें ॥८॥*

म.दो. *। ऐसे रघुकुल - कमल - रवि मार्ग - जनां सुख देत ॥*
*॥ बघत जाति वन जानकी सौमित्री समवेत ॥१२२॥*

**अर्थ** - ज्यांना हे झाले ते आईबाप (पितरौ) धन्य होत; व ज्या नगरांतून हे आले ते नगर धन्य होय.॥५॥ हे जिथे जिथे जातात, जातील वा गेले ते देश, पर्वत, वने, गावे व ती स्थाने (ठाव) धन्य होत.॥६॥ ज्याचे हे सर्व प्रकारे स्नेही आहेत (जो ह्यांच्यावर सर्व प्रकारे स्नेह करतो) त्याला निर्माण करून ब्रह्मदेवाला सुख झाले (परिश्रम सफल झाल्याचे समाधान वाटले) ॥७॥ रामलक्ष्मण वाटसरूंच्या सुंदर कथेने सर्व मार्ग व कानने व्यापली.॥८॥ या प्रमाणे रघुकुलकमलरवि रामचंद्र मार्गावरील लोकांना सुख देत देत व वन (शोभा) बघत बघत सीता (जानकी) व सौमित्री (लक्ष्मण) यांच्यासह जात आहेत.॥दो.१२२॥

**टीका. चौ. ५-६ (१) पितरौ धन्य जयां हे झाले इ.** - दोहा ११३।१-८ मध्ये पुरे, गावे, मार्गावर राहणारे लोक, तलाव, सरिता, वृक्ष व भूमी इत्यादी

ज्यांच्या ज्यांच्याशी रामाचा संबंध आला त्यांना सुकृती, धन्य वगैरे म्हणून नाग, सुर इत्यादिकांनी त्यांच्या भाग्याची प्रशंसा विस्तारपूर्वक केली आहे. त्याचाच या दोन चौपायांत संक्षेपाने उपसंहार केला आहे. 'सुकृती पुण्यवान् धन्यः' (अमरे) (क) येथे दशरथ-कौसल्या यांच्या भाग्याचा विचार प्रथम करतात. त्यांच्यासारखे अप्रतिम पुण्यशील दांपत्य या पृथ्वीला लाभले म्हणून आज आपल्याला हा भाग्याचा दिवस पाहण्यास सापडला व आपण धन्य झालो. हा मुख्य भावार्थ आहे.

**चौ. ७ - (१) रघुनि विरंचि तया सुख पावे... सर्वस्वें** - येथे हे दाखविले की कोणी एक जरी रामभक्त बनला तरी ब्रह्मदेवाला धन्यता वाटते, मग इतर देवांना व पितरांना वाटेल यांत नवल काय? **'ऐक उमे कुल धन्य तें जगत्पूज्य सुपुनीत ॥ श्रीरघुवीर - परायण जिथं नर होइ विनीत'** (७।१२७) असे शंकर म्हणाले आहेत. अशा प्रकारे राम व रामभक्त यांची समता सिद्ध होते. **(क)** तया (तेही) = त्यास हे एकवचन आहे. भाव हा की असा कोणी एखादाच असतो. 'श्रुतिगीता **रघुनाथभक्ति** ते । रामकृपे **कुणि एका मिळते'** (७।१२६।८) **'जशि मम भक्ति एक कुणि जोडी'** (४।१६।१०) असे शंकर व राम (क्रमशः) म्हणतात. **(ख) सर्वस्वें स्नेहीं** - ज्याचे इतर कोणावरही प्रेम नसून सर्व प्रेमाचे संबंध ज्याने रामाशीच जोडलेले असतात व ज्याने आपले मन स्नेहरज्जूने रामचरणी घट्ट बांधलेले असते तोच सर्व प्रकारे स्नेही समजावा. जो मनाने, कृतीने व वाणीने फक्त रामावरच प्रेम करील तो. (५।४८।४-५), (३।१६।१०) पहा.

**दो. - (१) रघुकुल कमलरवि** - यांतील भाव चौपाई १ च्या टीकेत दाखविला आहेच. शिवाय रघुकुलकमलांना अंधारात टाकून इकडे का आले, याचे उत्तर 'मार्गजनां सुख देत' याने येथेच दिले आहे. राम भानुकुल कैरवचंद्र आहेत व रघुकुल कमलरवि आहेत. **'विश्व सुखद इव इंदु तमारि' 'विश्वहितार्थ विमल विधुपूषण'** (१।२०।६) आहेत. राम निर्दोष चंद्र व निर्दोष रवि आहेत. सूर्याचे १२ दोष १।२०।६ च्या टीकेत पहावे. **(क) सौमित्रि** - सुमित्रेचा पुत्र लक्ष्मण. सुमित्रा-पुत्रच असल्याने लक्ष्मणही सु-मित्र आहेत. जी सेवा मित्र (सखा) निषादराज दोन-तीन दिवस करीत होता ती सेवा लक्ष्मण करीत असतात, हे याने सुचविले.

हिं. *। आगें रामु लखनु बने पाछें । तापस वेष बिराजत काछें ॥१॥*
*। उभय बीच सिय सोहति कैसें । ब्रह्म जीव बिच माया जैसें ॥२॥*
*। बहुरि कहउँ छबि जसि मन बसई । जनु मधु मदन मध्य रति लसई ॥३॥*
*। उपमा बहुरि कहउँ जियँ जोही । जनु बुध बिधु बिच रोहिनी सोही ॥४*

म. *। पुढें राम लक्ष्मण माघारीं । तापस वेषिं विराजति भारी ॥१॥*
*। मधें सिता शोभतसे कैसी । ब्रह्म-जिवांमधिं माया जैसी ॥२॥*
*। पुन्हां वदें छबि जशि मनिं वसते । जणुं मधु-मदनमधें रति लसते ॥३॥*
*। पुन्हां देउं उपमा हृदिं शोधित । जणुं बुध-विधुमधिं रोहिणि शोभित ॥४॥*

**अर्थ** - पुढे राम व मागे लक्ष्मण असे (दोघे) तपस्वी वेषांत फारच चांगले शोभत आहेत.॥१॥ (आणि) ब्रह्म व जीव यांच्या मध्ये जशी माया शोभावी तशी (त्या) दोघांच्या मध्ये सीता शोभत आहे.॥२॥ माझ्या हृदयांत ही छबि (शोभा) जशी बसत आहे तशी पुन्हा सांगतो की जणू वसंत (मधु) व मदन यांच्यामध्ये जशी रति (तशी लक्ष्मण व राम यांच्या मध्ये सीता) शोभत आहे.॥३॥ हृदयांत शोधून पाहून पुन्हा उपमा देतो की जणू बुध (ग्रह) व विधु (पूर्णचंद्र) यांच्यामध्ये जशी रोहिणी (तशीच लक्ष्मण व राम यांच्या मध्ये सीता) सुशोभित दिसते.॥४॥

**टीका. - चौ. १-२** (१) या दोन चौपाया जवळ जवळ जशाच्या तशाच (३।७।२-३) पुन्हा अरण्यकाण्डात आहेत. **'पुढें राम लक्ष्मण माघारीं । तापस वेषी विराजति भारी ॥१२३।१॥ 'पुढें राम लक्ष्मण माघारीं । मुनिवर वेष शोभतो भारी'** (३।७।२) येथील 'तापस' चा अर्थ मुनिवर शब्दाने स्पष्ट केला आहे. **(क)** पुढे किंवा पूर्वी जिथे या तिघांच्या पायी वनप्रवासाचे वर्णन असेल तेथे चालण्याच्या क्रमाचा उल्लेख केलेला नसला तरी नेहमी पुढे राम, त्यांच्या मागे सीता व सीतेच्या मागे लक्ष्मण असा चालण्यातील क्रम असतो हे विसरू नये. ही द्विरुक्ति रीतिदर्शक आहे. तसेच येथील पुढील ६ चौपाया तेथे भरतीस घ्यावयाच्या आहेत व सर्वत्र वनप्रवासात यांची चालण्याची पद्धतीसुद्धा पुढे वर्णन केल्याप्रमाणेच असते, असे समजावे.

(२) **ब्रह्मजिवांमधि माया जैसी - हा दृष्टान्त आहे, रूपक नाही** हे लक्षात असावे. हा दृष्टान्त तिघांची शोभा वर्णन करण्यासाठी दिला आहे. येथे माया

म्हणजे विद्या, माया असा अर्थ घेणे योग्य; कारण ब्रह्माच्या पाठीशी अविद्या माया असू शकत नाही व अविद्या मायेने जीवाकडे पाठ फिरविली म्हणजे त्याच्या जवळ ती नसतेच. मानसांत विद्या व अविद्या या दोनच मायांचा उल्लेख असून तो स्वतः श्रीरामचंद्रांनी लक्ष्मणालाच सांगितला आहे; म्हणून इतर कोणत्याही (हरि) मायेचे मानसांत ग्रहण करता येत नाही. **'ऐका वदें तिचे भेदांनां । विद्या, अपर अविद्या जाणा'** (३।१५।४) येथे ब्रह्म = परमात्मा - परमेश्वर असा अर्थ आहे. म्हणजेच सगुण निराकार ब्रह्म. **'ईश्वर अंश जीव अविनाशी चेतन अमल सहज सुखराशी । तो प्रभु, मायेला वश झाला । शुक-मर्कट सम बंधनिं पडला ॥'** या दोन चौपायांत ईश्वर (अविद्या) माया व जीव यांचा संबंध दाखविला आहे. तसाच येथे ईश्वर विद्यामाया व जीव यांचा संबंध दाखविला आहे.

(३) निर्गुण निराकार ब्रह्म अदृश्य, रूपरहित असल्याने शोभणे वगैरे त्याच्या विषयी म्हणताच येत नाही. त्याचा विद्यामायेशी संबंध आला म्हणजेच परमेश्वर होतो; व तो साकार झाला म्हणजे शोभतो. 'कमलं फुलुनि सर कसें खुलतसे । ब्रह्म अगुण जैं सगुण होतसे' (४।१७।२) निर्गुणनिराकार ब्रह्माला किंवा सगुणनिराकार (परमेश्वराला) ब्रह्माला शोभायमान करण्यास माया-विद्यामायाच उपयोगी पडते. तिच्या योगानेच परमेश्वर साकार-रूपधारी होतो. 'सुंदर सुंदरतेला करते' (१।२३०।७) असे सीतेचे वर्णन आधीच केले आहे. भाव हा की जेथे कोठे ईश्वराच्या गुणादिकांचे वा शरीरादिकांचे सौंदर्य आहे ते सीतेच्या, आदिशक्तीच्या = विद्यामायेच्यामुळेच आहे. तिच्याशिवाय अगुणाला सगुणत्व = ईश्वरत्व येत नाही व ईश्वराला साकारता येऊ शकत नाही. चरित्रलीला इत्यादी करता येत नाही. **'ईशविवश माया गुणखाणी'** (७।७८।६) म्हणून माया रामाच्या मागे मागे (अनुगामी) दासीसारखी आहे व लक्ष्मण राम व सीता यांच्या मागे जाणारा म्हणजे रामसीतानुगामी, जीवासारखा आहे. राम व लक्ष्मण यांचे सर्व प्रकारचे सौंदर्य, शोभा, गुण, यश, कीर्ती, प्रताप, महिमा, तेज इ. सर्व सीतेच्या योगाने आहे. जसे **ईश्वराचे ईशत्व व जीवाचे जीवत्व केवळ मायेच्या योगाने असते.** या दृष्टान्ताने तात्त्विक दृष्टीने तिघांचा संबंध दाखविला व सुचविले की **पुढे या दोघांचे जे काही सुंदर चरित्र दिसेल ते सीतेच्या योगानेच, सीतेमुळेच आहे.**

(४) एक श्यामवर्ण व दुसरे गौरवर्ण असून दोघांच्या शरीरांवर वीर्य, शौर्य, धैर्य, निर्भयता, पौरुष इ. सर्व परमोत्तम-पुरुष लक्षणे विराजमान आहेत. दोघांच्या मध्ये अति कोमल, अति सुंदर व समस्त शुभ-स्त्रीगुणसंपन्न सीता आहे. त्यामुळे रामलक्ष्मणांचे पौरुषधर्म-गुण व सीतेचे स्त्रीजाति धर्म-गुण विरोधामुळे (by contrast) अधिकच खुलून अधिक प्रलोभनीय व चित्ताकर्षक झाले आहेत. लाल कागदावर चांदीचे जिन्नस व शुभ्र कागदावर सोन्याचे जिन्नस जास्त खुलतात. तसे शुभ्र कागदावर चांदीचे व पिवळ्या कागदावर सोन्याचे शोभत नाहीत. **या दृष्टान्ताने सामान्य मनो-हरता दाखविली.** आता विशेष उत्प्रेक्षेने सांगतात.

**चौ. ३ - (१) जणुं मधु - मदनमधें रति लसते** - सह लक्ष्मण जानकी प्रभू राजति रुचिर गृहांत ।। शोभे मुनिवेषी जणू मदत स-रति ऋतुनाथ' (१३३). असे चित्रकूटला पर्णकुटित निवास केल्यावरचे वर्णन आहे. यांत मदन कोण, रति कोण व मधु = वसंत = ऋतुनाथ कोण? हे स्पष्ट केले आहे. मदन = प्रभु, राम, रति = जानकी सीता व मधु ऋतुनाथ = लक्ष्मण हे मानसाधारे ठरले. मदनाचे सामर्थ्य, ऋतुराज जो वसंत त्याच्या साह्याने सफल-सुफल, यशस्वी होते. बालकाण्डात नारदमोह व शिवसमाधीभंग प्रकरणात हे दिसते. तसेच **रामचंद्रांचे सामर्थ्य प्रतापादि लक्ष्मणाच्या साह्यानेच यशस्वी होणार आहेत हे सुचविले.** 'रघुपति-कीर्ति-पताके विमले । ज्यांचे यश दण्डासम बनलें' (१।१७।६) यांत हेच सांगितले आहे. दण्डावाचून पताका वर फडकत नाही व पताकेशिवाय दण्डाची शोभा नाही. वसंत जसा मदन व रति यांना सुखदायक व त्यांचा आज्ञाकारी सेवक आहे; तसेच लक्ष्मण सीतारामांस सुख देणारे व सीताराम-सेवामूर्ति आहेत.

(२) मागील दोन चौपायांत ब्रह्म माया जीव - राम सीतालक्ष्मण असा क्रम आहे. परंतु येथे व पुढील उत्प्रेक्षेतसुद्धा लक्ष्मण सीताराम = मधु रति मदन = बुध रोहिणी विधु' असा उलट क्रम आहे. म्हणजेच जीव माया ब्रह्म असा क्रम आहे. असाच क्रम दो. १३३ पूर्वार्धात **'सह लक्ष्मण जानकी प्रभु'** आहे; पण उत्तरार्धात **'मदन सरति ऋतुनाथ'** असा आहे. **असा उलटा क्रम तीन वेळा का?** ब्रह्म माया जीव असा उत्पत्ति क्रम - अध्यारोप क्रम आहे व जीव माया ब्रह्म हा संहार-लय क्रम म्हणजेच अपवाद क्रम आहे. उतरती भांजणी व चढती

भांजणी आहेत. जीवाच्याकडे ब्रह्मविद्या रूपी मायेची पाठ आहे; म्हणजेच तो ब्रह्मविद्याविमुख आहे. **ब्रह्मविद्येची पाठ म्हणजेच अविद्या मायेचे मुख.** त्यामुळे जीव अविद्या विवश होतो. पण ज्या वेळी ब्रह्मविद्यारूपी सीता प्रसन्न होईल त्या वेळी त्याला अविद्या दिसणार नाही. विद्या माया बाजूस सरेल व जीव ब्रह्मैक्य होईल. **या तिघांमुळेच सर्व रामचरित्र व सर्व जगाचे नाटक चालले आहे. तिघांमुळेच जग व जगाची शोभा आहे. (क) उत्प्रेक्षा करण्याचे कारण** इतकेच की लक्ष्मण सीताराम प्रत्यक्ष वसंत रति मदन नाहीत; इतकेच नव्हे तर त्या तिघांचे सौंदर्य या तिघांच्या सौंदर्याच्या पासंगात घालणेसुद्धा योग्य नाही 'कोटिं मनोजां लाजविणारे' रामलक्ष्मण आहेत. सीता तर 'सुंदर सुंदरतेला' करणारी आहे. ऋतुराजादि सदोष आहेत, लक्ष्मण सीताराम पूर्ण निर्दोष आहेत.

**चौ. ४ -** (१) वरील उत्प्रेक्षेतील सर्व उपमाने व उपमेये अगदी अपरिचित आहेत. मदन रति तर दिसतच नाहीत. रामलक्ष्मण सीता सुद्धा तशीच. ब्रह्ममायाजीव ही तर अगदीच अदृश्य ! यामुळे लक्ष्मण सीताराम यांच्या परस्पर संबद्ध शोभेची कल्पना करता येणार नाही म्हणून तेजोमय, शीतल, सौंदर्यसंपन्न अशी दृश्य, व्यवहारातील उपमाने मुद्दाम शोधून काढून तेथे दिली आहेत. **(क) बुध** हा ग्रह आहे. रोहिणी नक्षत्र आहे. चंद्रबिंब बुधाच्या कितीतरी पट मोठे, तेजस्वी असते. रोहिणी चंद्राची प्रिय पत्नी आहे, रोहिणी नक्षत्रात चंद्र उच्चीचा व अत्यंत गतिमान असतो. रामचंद्र विमल विधु (१।२३२।) व पूर्व दिशेस प्रगट झालेला चारु (निर्दोष) शशी (१।१६।५) म्हणजे पौर्णिमेचा विधु आहे. एकदा सांगून ठेवले असल्याने पौर्णिमेचा विधुच येथे समजणे भाग आहे. **पौर्णिमेचा चंद्र व बुध यांमध्ये रोहिणी नक्षत्र** दिसणे खगोल ज्योतिषशास्त्रदृष्ट्या अशक्य आहे. **प्रत्यक्ष दिसणे शक्य नाही.** कारण बुध हा ग्रह सूर्यापासून जास्तीत जास्त २८ अंश मागे किंवा पुढे असतो. आणि पौर्णिमेला सूर्य व चंद्र यांत १६९ अंशांपासून १८० अंशांपर्यंत अंतर असते. पण **कल्पनेने हे दृश्य मनःचक्षूंसमोर उभे करणे शक्य असल्याने उत्प्रेक्षा केली.** हे दृश्य जसे दिसेल तशी लक्ष्मण सीता राम यांची शोभा दिसते. **(ख) बुध आणि चंद्र यांच्यामध्ये रोहिणी नक्षत्र वैशाख, ज्येष्ठ किंवा आषाढ महिन्यांतील शुद्ध प्रतिपदा किंवा द्वितीया**

**या तिथींनाच दिसणे** कदाचित शक्य असते; कारण बुध ग्रह दिसतो तेव्हा क्षितिजाजवळच असतो व या तीन महिन्यांत क्षितिजाजवळ सकाळी सायंकाळी ढग असतात. कधी सकाळी किंवा सायंकाळी सूर्योदयापूर्वी किंवा सूर्यास्तानंतर फार तर अर्धा तासच दिसू शकतो. एकूण सार हे की हे दृश्य दिसणे जवळ जवळ अशक्य. तसेच लक्ष्मण-सिताराम यांचे वनांतून प्रवासांतील दर्शन जवळ जवळ अशक्यच. या उत्प्रेक्षेने विशेषे करून शरीरकान्तीचा एकमेकांवर होणारा परिणाम व तिघांची मिळून एकत्र दिसणारी शोभा (छबि) सुचविली आहे. **गीतावली** २।२४।१-२; २।२५।३; यांत याच उपमा आहेत. आता चालण्यांतील आणखी वैशिष्ट्य सांगतात.

***हिं.*** ***। प्रभु पद रेख बीच बिच सीता । धरति चरन मग चलति सभीता ॥५॥***
***। सीय राम पद अंक बराएँ । लखन चलहिं मग दाहिन लाएँ ॥६॥***
***। राम लखन सिय प्रीति सुहाई । बचन अगोचर किमि कहि जाई ॥७॥***
***। खग मृग मगन देखि छबि होहीं । लिए चोरि चित राम बटोहीं ॥८॥***

***म.*** ***। प्रभुपद-चिन्हयुगांमधिं सीता । चाल पथिं पद टाकि सुभीता ॥५॥***
***। सीता - राम - पदांकां राखुनि । लक्ष्मण चालति उजवीं घालुनि ॥६॥***
***। राम - सीता - लक्ष्मण सुप्रीती । वाचातीता वदूं कशी ती ॥७॥***
***। मग्न विहग मृग रूप विलोकुनि । राम पथिक ने चित्ता चोरुनि ॥८॥***

**अर्थ** - प्रभूंच्या दोन चरणचिन्हांच्या मधे पाऊल टाकीत सीता भीत भीत चालते.॥५॥ सीता व राम या दोघांच्याही चरणचिन्हांना राखून (त्यांना ढका न लावता) त्यांना उजवी घालून (आपल्या उजव्या बाजूस ठेऊन) लक्ष्मण चालतात.॥६॥ रामसीता व लक्ष्मण यांची सुंदर प्रीती वाचेचा विषय नाही (वाचातीत आहे); मग तिचे वर्णन मला कसे करता येईल ! ॥७॥ (मार्गावरील) पशुपक्षीसुद्धा रूप पाहून (प्रेम) मग्न होतात; (कारण) प्रवासी राम त्यांच्या चित्तास चोरून नेऊ लागले.॥८॥

**टीका. - चौ. ५-६** (१) रस्त्यांत उमटलेल्या रामचंद्रांच्या पावलांवर सीता पाऊल टाकीत नाहीच; पण तिला पावलोपावली अशी भीती वाटते की प्रभूंच्या त्या पावलांना माझ्या पायाचा स्पर्श तर नाहीना होणार ! यांत भक्तिमय प्रेमाची

मर्यादा आहे. मातीत उठलेल्या प्रभूंच्या पावलांवर पाऊल टाकणे म्हणजे त्यांवर लाथ मारणे, प्रभूच्या पायांवर लाथ मारणे आहे; आणि त्यांना पायाचा स्पर्श होणे म्हणजे प्रभूच्या पायाला पायाने स्पर्श करण्यासारखे आहे. पूज्य, वंद्य, प्रियतम व्यक्तीच्या कोणत्याही पदार्थाला पाय लावणे म्हणजे त्या व्यक्तीचा अपमान करणे आहे. ज्या पादचिन्हांचे दर्शन झाले म्हणजे रामसेवकांस प्रत्यक्ष रामदर्शन झाल्याचा आनंद वाटतो, जेथील धुळीस वंदन करून रामसेवक तिला मस्तकावर धारण करतात व नेत्रांना हृदयाला लाऊन प्रत्यक्ष रामभेटीचे समाधान मिळवितात. त्या पादचिन्हांना पायांखाली तुडविण्याचे किंवा त्या धुळीस पाय लावण्याचे धाडस सीता व लक्ष्मणांसारख्या रामसेवकांस कसे करवेल? **(क)** रामचरण चिन्हांविषयी सीतेची जी परमपूज्य भावना आहे तशीच लक्ष्मणाची रामसीता या दोघांच्या चरणचिन्हांविषयी आहे. पूज्य वंद्य नेहमी आपल्या उजव्या बाजूस असावी; म्हणून लक्ष्मण त्यांना ढका न लावता ती आपल्या उजव्या बाजूस ठेऊन चालतात. सीता वामांगी म्हणून ती रामचंद्राच्या मागे त्यांच्या डाव्या बाजूस चालते व सीतेच्या मागे तिच्या डाव्या बाजूस लक्ष्मण चालतात. गीतावली २।३१।१-२ असेच वर्णन आहे. **(ख)** सीता व लक्ष्मण यांनी रामचरण चिन्हे सुरक्षित ठेवली म्हणून पुढे भरताला किती आनंदाचा लाभ झाला ! 'निरखत हर्ष रामपद अंकां। जणूं लाभला परीस रंका' (१३८।३-४) **भक्तिमार्गातील सेवकांनी सेव्याविषयी, पूज्यांविषयी भावना कशी ठेवावी याची मर्यादा येथे दाखविली आहे.** हृदयांत पूर्ण आदरयुक्त परमप्रेम असल्याशिवाय इतकी सावधानता सतत राहणे शक्य नाही.

**चौ. ७-८ (१) सुप्रीती वाचातीता** - त्यांची ती उत्तम प्रीती पाहून मन प्रसन्न होते, मनाला ती फार आवडते पण वाचेने बोलून दाखविता येत नाही. 'श्याम गौर सुंदर हे भ्राते । आनंदा आनंदहि दाते ।। यांची प्रीति परस्पर पावन ।। ना वदवे शोभन मनभावन' (१।२१७।२-३) सीताराम यांची परस्पर प्रीती फक्त राम व सीता यांच्या मनाला कळते. पण त्यांना सुद्धा तिचे वर्णन करता येत नाही. 'तुझें नि माझें प्रेम तत्त्व तें । प्रिये मना मम एका कळतें ।। तें मन राहि सदा तुजपासी' (५।१५।६-७) मग इतरांना त्यांची प्रीति कळणार कशी व वर्णन तरी कसे करता येईल?

**चौ. ८ - (१) मग्न विहग मृग रूप विलोकुनि** - पशुपक्ष्यांचे चित्तसुद्धा राम सहज रस्त्याने जाता जाता चोरून नेतात व त्यामुळे ते सुद्धा रामप्रेमात मग्न होऊन देहभान विसरतात. भोळ्या खेडवळ लोकांची काय दशा झाली असेल याची यावरून कल्पना करावी. प्रयागातील गृहस्थ, बटु, तापस, सिद्ध, मुनि, संन्यासी यांना मात्र क्षणिक नेत्रलाभ होण्यापलीकडे दुसरा काही लाभ झाला नाही ! दात्याने दिला तर होणार ! अहंकार रूपी वित्त ज्यांच्या जवळ असते त्यांना प्रभु काहीच देत नाहीत.

*हिं.दो.* *। जिन्ह जिन्ह देखे पथिक प्रिय सिय समेत दोउ भाइ ॥*
*॥ भवमगु अगमु अनंद तेइ बिनु श्रम रहे सिराइ ॥१२३॥*

*म.दो.* *। सिते सहित दो प्रिय पथिक दिसले बंधू ज्यांस ॥*
*॥ भवपथ दुर्गम मुदित तिहिं अश्रम नीत लयास ॥१२३॥*

**अर्थ** - ज्यांनी ज्यांनी सीतेसहित दोन प्रिय प्रवासी (पथिक, पांथिक) बंधूंना पाहिले त्यांनी दुर्गम असा भवपंथ आनंदाने श्रमांशिवाय लयास नेला.॥दो.१२३॥

**टीका. (१) प्रिय पथिक जयांस दिसले** - पथिक - प्रवासी - वाटसरू. वाटसरू वाट चालून दमून-भागून येतात. रात्रभर कुठे तरी राहतात व सकाळी उठून चालू लागतात. जेथे राहतात त्या जागेवर, गावावर, वाटसरूंचे मन आसक्त होत नाही. **'वाटसरू वाटां आले । प्रातः काळी उठोनि गेले ॥ तेथे मन नाही गुंतलें'** (एकनाथ). तसेच वाटसरू जेथे ज्या गावात वस्तीला राहतात तेथील लोकांचे मन वाटसरूंवर आसक्त होत नाही. पण या राम सीता लक्ष्मण वाटसरूंवर ज्यांचे मन जडले, हे प्रवासी ज्यांना प्रिय वाटले त्यांचा या संसारातील प्रवास संपला (असे समजावे). हे घडण्यास या लोकांना जपतपादि काहीच सायास, श्रम करावे लागले नाहीत. केवळ रामलक्ष्मण व सीता यांच्या ठिकाणी सर्व भावे भक्ति प्राप्त झाल्यामुळेच ते मुक्त झाले. त्यांना रामधामप्राप्ति देहपातानंतर होणार. **(क) भवपथ** - जन्म मरणाचा मार्ग; म्हणजेच ८४ लक्ष योनींत अनंत काळ भ्रमण करीत राहणे. यमुना तीरापासून राम प्रवासात ज्यांना ज्यांना हे प्रवासी दिसले ते सर्व जीव, पशुपक्षी, कीटपतंगादी सुद्धा मुक्त झाले हे या दोह्यांत सांगितले.

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या कांड अध्याय बारावा समाप्त.***

## अध्याय १३ वा

*हिं.* *। अजहुँ जासु उर सपनेहुँ काऊ । बसहुँ लखनु सिय राम बटाऊ ॥१॥*
*। रामधाम पथ पाइहि सोई । जो पथ भाव कबहुँ मुनि कोई ॥२॥*
*। तब रघुबीर श्रमित सिय जानी । देखि निकट बटु सीतल पानी ॥३॥*
*। तहँ बसि कंद मूल फल खाई । प्रात नहाइ चले रघुराई ॥४॥*

*म.* *। ज्या स्वप्निंहि कधिं आज मनीं जर । पथिक बंधु सीता बसती तर ॥१॥*
*। रामधाम-पथ तयास फावे । जो कोणी मुनि विरळा पावे ॥२॥*
*। सीता श्रान्त दिसत रघुवीरा । बघुनि निकट वट शीतल नीरा ॥३॥*
*। कंद मूल फल खाउनि रघुवर । बसुनि निघति उदयीं स्नानोत्तर ॥४॥*

**अर्थ** - आजसुद्धा ज्याच्या हृदयात प्रवासी बंधू (रामलक्ष्मण) व सीता स्वप्नांत का होईना, वास करतील - ॥१॥ तर जो मार्ग कोणी विरळा मुनि पावतो तो रामधामाचा मार्ग (भक्तिमार्ग) त्याला सहज लाभतो.॥२॥ (मग) सीता श्रान्त झाली (दमली) आहे असे रघुवीरास दिसताच (कळतांच) वडाच्या झाडाजवळच शीतल पाणी असलेले आढळतांच-॥३॥ कंदमूलफले खाऊन तेथे वस्ती केली व सकाळी स्नान (वगैरे) केल्यानंतर रघुवर (वाल्मीकी-आश्रमांकडे जाण्यास) निघाले.॥४॥

**टीका.** - **चौ. १-२ (१) आज** - अजूनसुद्धा या कराल कलियुगांतसुद्धा. ज्या = ज्याला कोणाला - जात गोत, वर्ण, आश्रम, बाल, तरुण, वृद्ध, स्त्रीपुरुष, कोणत्याही धर्माचा, पंथाचा असला तरी त्याला हे पुढे सांगतात ते फळ मिळेल. स्वप्नांत काही क्षण वास केल्याचे जर हे फळ आहे तर जागृतीत या तिघांचे हृदयांत दर्शन झाल्यावर मिळेलच मिळेल. **(क) रामधामपथ** - रामधामाचा मार्ग, म्हणजे **भक्तिमार्ग,** जो सोपा व सुखकर आहे तो सहज मिळेल. ७।४५।२ हा भक्तिमार्ग मोठमोठ्या मुनींनासुद्धा सापडत नाही. क्वचित एखादा विरळा मुनीच हा मार्ग पावू शकतो. **'जन्म जन्म मुनि झिजति साधनीं अंतीं 'राम' न येत आननीं'** (४।१०।३) 'राम' असा उच्चारसुद्धा अंतःकाळी करता येत नाही मग रामधाममार्ग भक्तिमार्ग कसा मिळणार ! **(ख)** दो. १०९ पासून १२३ पर्यंतच्या

**या छोट्याशा मधुर प्रकरणाची ही फलश्रुति आहे** असे समजावे. हे प्रकरण जे वारंवार श्रवण, पठन, मनन करतील त्यांस वनप्रवासी रामसीतालक्ष्मण यांचे स्वप्नांत दर्शन होईल व ते मार्गाला लागतील.

**चौ. ३-४ (१) सीता श्रान्त दिसत रघुवीरा** - सीता दमलेली दिसली. अयोध्येतून निघाल्यापासूनचा हा पाचवा दिवस आहे. आज सकाळी प्रयागातून निघून रामनगरजवळ, म्हणजे **४० मैल आल्यावर**, घटकाभर विश्रांती **'कुअँर दो ताल'** जवळ घेतली. तेथून वाल्मीकी आश्रम १०/१२ मैल आहे. तिकडे जात असता मध्ये कोठेतरी सीता पुन्हा दमलेली दिसली. ५/६ मैल आले असतील असे समजू म्हणजे **सकाळपासून संध्याकाळपर्यंत ४५ मैल सीता चालली** ! न दमेल तरच आश्चर्य ! आज शहरांतील तरणाबांड, सशक्त असलेला कोणी पुरुषसुद्धा अनवाणी, पायी वनांतून = २०/२५ मैल गेला तर मोठे नवल ! **(क) रघुबीर** - येथे मुख्यतः कृपावीरता व धर्मवीरता दिसते. अशा कोमल पत्नीला ती फार दमली असता तशीच दामटीत नेणे हा पतीचा धर्म नाही; व सीतेची दया आली म्हणून अनुकूल ठिकाण दिसतांच वस्ती केली.

**(२) बधुनि निकट बट शीतल नीरा - नीर** = पाणी. उन्हाळ्यात वडाची छाया शीतल असते; त्यांत जवळच जलाशय दिसला व त्याचे पाणीही शीतल होते म्हणून तेथे मुक्काम केला. पहिला मुक्काम तमसाकाठी, दुसरा शृंगवेरपुरास, तिसरा प्रयागाच्या वाटेत, चौथा भरद्वाजाश्रमात व **हा पाचवा मुक्काम येथे वडाच्या झाडाखाली झाला.** पाच रात्री गेल्या व साहवा दिवस उजाडला. आता निघाले ते वाल्मीकी आश्रमात जाऊन तेथून निघून वस्तीला चित्रकूटास जातील. **(क) रघुवर निघाले** - रघुवीरत्व बाजूस ठेऊन निघाले. तेथे कोणावर कृपा वगैरे केलेली दिसणार नाही. केवळ एक रघुकुळातील श्रेष्ठ पुरुष या नात्यानेच म्हणजे माधुर्य भावनेनेच वागताना दिसतील. दो. ११८ मध्ये **'रघुनाथ'** आणि भरद्वाजाश्रमांतून निघताना **'रघुराज'** (१०९।६) याच भावाने वापरला आहे. टीका पहावी.



## वाल्मीकी भेट (मुख्य) प्रकरण - (१२४/५ - १३२)

हिं. *। देखत बन सर सैल सुहाए । बालमीकि आश्रम प्रभु आए ॥५॥*
*। राम दीख मुनि बासु सुहावन । सुंदर गिरी कानन जल पावन ॥६॥*
*। सरनि सरोज बिटप बन फूले । गुंजत मंजु मधुप रस भूले ॥७॥*
*। खग मृग बिपुल कोलाहल करहीं । बिरहित बैर मुदित मन चरहीं ॥८॥*

म. *। निरखत वन सर पर्वत सुंदर । वाल्मिकि - आश्रमिं आले प्रभुवर ॥५॥*
*। राम बघति मुनि-वास सुशोभन । सुंदर गिरि कानन जल पावन ॥६॥*
*। शरीं सरोज विटप वनिं फुलले । गुंजति मंजु मधुप रस-भुलले ॥७॥*
*। खग मृग बहु कोलाहल करती । विरहित वैर मुदितमन चरती ॥८॥*

**अर्थ** - सुंदर वन, तलाव व पर्वत पहात पहात प्रभु-श्रेष्ठ (सीतालक्ष्मणांसह) वाल्मीकी मुनींच्या आश्रमाजवळ आले.॥५॥ (ते) मुनीचे सुंदर निवासस्थान (तो आश्रम) रामचंद्रांनी पाहिले तो (दिसले की) त्यांतील पर्वत, वन व जल सुंदर व पावन आहेत.॥६॥ तलावांमध्ये कमले व वनांत वृक्ष फुलले असून मधुप (भुंगे) रस पिऊन मत्त झाल्याने मधुर गुंजारव करीत आहेत.॥७॥ पशुपक्षी गणांचा एकच कोलाहल होत असून ते आपसातील वैर विसरून वनांत प्रसन्न मनाने चरत व संचार करीत आहेत.

**टीका. चौ. ५** - (१) वडाच्या झाडाखालून सकाळी निघाले ते वाल्मीकी आश्रमापर्यंतच्या मार्गावरील **'निरखत वन सर पर्वत सुंदर'** आले. हे वाटेतील वन, तलाव व पर्वत सुंदर आहेत, पण पावन असल्याचा उल्लेख नाही व सरिताचा उल्लेख नाही. म्हणजे ६/६ मैलांच्या प्रवासात नदी वगैरे नाही. **(क) आश्रमिं आले** - येथे आश्रम म्हणजे पर्णकुटी हा अर्थ नसून पर्णकुटीच्या आसमंतात असलेला आश्रमाचा भाग असा अर्थ आहे, हे पुढे दिसेलच. **(ख) प्रभु** - सर्व समर्थ, सर्वज्ञ, सर्वदर्शी परमात्माच असून स्वतःच वाल्मीकींना मोठेपणा देण्यासाठी जात आहेत. कोठे रहावे हे वाल्मीकींना विचारणार आहेत. 'महती दासां सदा देतसां' (३।१३।१३) असा स्वभाव असल्यामुळे आडवळण घेऊन आले.

**चौ. ६ - (१) राम बघति मुनिवास सुशोभन** - मुनिवास हा शब्द मागील

मुनिआश्रम याला वापरला आहे. जेथे अनेक मुनि वास करतात असे आश्रमस्थान = मुनिवास. राम स्वतः 'आनंदसिंधु सुखराशी, सुखधाम' (१|१९७|५-६) 'छबिसमुद्र' (१|१४८|५) 'शोभा शीव सुभग' (१|२३३|१) असून त्यांना हे आश्रमस्थान **सुशोभन** वाटले ! यावरून ते किती रमणीय असेल याची कल्पना करावी. **(क) सुंदर गिरि कानन जल पावन** - गिरि, त्यांवरील वन आणि तलावांतील जल या सर्व गोष्टी सुंदर व पावन आहेत. तलाव, पर्वत व कानन सुंदर कशाने झाली आहेत हे पुढील चौपायांत दाखविले आहे. पावनता येथे राहणारांच्या परमपावनतेचा परिणाम आहे. सुशोभन मुनिवासांचा परिणाम आहे.

**चौ. ७-८ (१) सरीं सरोज बिटप बनिं फुलले - भुलले** - अनेक तलावांत विपुल कमले फुलली असल्याने ते तलाव सुंदर दिसत आहेत. त्यांत मासे असले तरी ते दुरून दिसत नसल्याने त्यांचा उल्लेख नाही. वनांतील वृक्ष फुलले असल्याने पर्वत व वन सुंदर दिसत आहेत; शिवाय भुंगे व पशुपक्षी यांच्या योगानेही पर्वत व वन यांना शोभा आली आहे. **(क) कोलाहल** = अनेकांनी केलेला महाध्वनि, कलकलाट 'कोलाहलः कलकलः' (अमरे). अनेक प्रकारच्या खगांचा निरनिराळा आवाज व अनेक प्रकारच्या पशूंचा आवाज एकत्र झाल्यामुळे त्याला कोलाहलाचे स्वरूप आले. याने दाखविले की पशुपक्षी अनेकविध असंख्यात आहेत.

**(२) विरहित बैर मुदितमन चरती** - 'खग मृग मधुप सुखी सब राहति ॥ सहज बैर सब जीवीं त्यजलें ॥' (१|६६|१-२) वैर = सहजवैर, स्वभाव वैर, जसे सर्प-मुंगूस, वाघ-गाई, उंदीर-मांजर इत्यादिकांत असते तसे. 'वैर न विग्रह भीति न आशा । सुखमय तया सदा सब आशा (दिशा)' जोपर्यंत वैर आहे तोपर्यंत भांडण, मारामाऱ्या, युद्धे, कलि = कलह, विरोध इ. असणारच. ही आहेत तेथे भीती असावयाचीच व भय आहे तेथे सुखाचा अभाव असायचाच. **(क) हे कशाने घडले** याचे उत्तर पातञ्जल योगांत आहे. 'अहिंसा - प्रतिष्ठायां तत्संनिधौ वैरत्यागः' जेथे अहिंसा परिपूर्णपणे नांदत असेल तेथे त्या व्यक्तीच्या संसर्गात येणारे पशु, पक्षी, इत्यादी सर्व जीव आपसांतील स्वभाववैर सुद्धा विसरतात. यावरून ठरले की या वाल्मीकींच्या आश्रमांत अहिंसा सुप्रतिष्ठित झाली आहे. हिंसेचे कृत, कारिता व अनुमोदिता हे मुख्य तीन प्रकार असून या

प्रत्येकाचे लोभजनित, क्रोधजनित व शास्त्रजनित असे तीन प्रकार आहेत व कायिक, वाचिक, मानसिक अशी मुख्य २७ प्रकारची हिंसा जेथे नसेल तेथे ॥ विरहित वैर बिहग मृग वसती ॥ **'परम धर्म वेदोक्त अहिंसा'** (७।१२१।२२) **(ख)** आजच्या विद्यालयांत व विश्वविद्यालयांत नेमके याच्या उलट दिसते व देशहितचिंतकांनी समाजात आपल्या वाणीने अहिंसेचा व सत्याचा पाऊस पाडला तरी त्याच्या साह्याने हिंसा व असत्य वृक्ष उत्पन्न होऊन फोफावत असलेले दिसतात ! हा कलिकालाचा विपरीत प्रभाव आहे ! वैर व विग्रह यांचे उच्चाटन व्हावे असे वाटत असल्यास वाल्मीकींच्या आश्रमांसारखे गुरुकुल आश्रम निघाले पाहिजेत. **'कोणि कुणासि न करिति शत्रुता'** ही पुढे रामराज्यात दिसणारी स्थिति वाल्मीकि-आश्रमांत आधीपासूनच आहे.

**वि.ल.ठे.** - मानसांत आपसांतील वैर पशुपक्षी वगैरे विसरल्याचे उल्लेख एकंदर चार ठिकाणी आहेत. १. पार्वती जन्मानंतर हिमालयांत, २. येथे वाल्मीकी आश्रमांत, ३. राम जाऊन राहिल्यावर चित्रकूट वनात, ४. रामराज्य झाल्यावर रामराज्यात. यांतील पार्वती ही परमेश्वरी भवानी असल्याने व राम परमात्मा असल्याने ती तीन उदाहरणे (१. पार्वती, २. रामामुळे) इतरांशी तुलना करण्यास घेता येत नाहीत. **जीवांच्या चरित्रांत वाल्मीकी आश्रम हे एकच स्थान सहजवैरत्याग केला असल्याचे आहे.** भरद्वाजादि इतर कोणाही मुनीच्या आश्रमांत हे नाही, म्हणूनच हा आश्रम पाहून भगवंतास हर्ष होत आहे.

***हिं.दो.*** *। सुचि सुंदर आश्रमु निरखि हरषे राजिवनेन ।*
*॥ सुनि रघुबर आगमनु मुनि आगें आयउ लेन ॥१२४॥*

***म.दो.*** *। शुचि सुंदर आश्रम बघुनि हर्ष राजिवाक्षास ।*
*॥ श्रवुनि रघुवरागमन मुनि पुढें येति नेण्यास ॥१२४॥*

**अर्थ** - पवित्र व सुंदर आश्रम पाहून राजीवाक्षास (रामास) हर्ष झाला. आनंद झाला. रघुवराचे आगमन ऐकून (त्यांस) घेऊन जाण्यासाठी मुनि पुढे (सामोरे) आले.॥१२४॥

**टीका. - (१) शुचि सुंदर - शुचि =** निर्मल, शुद्ध, पवित्र. बाह्य स्वच्छता आहे म्हणून निर्मल; कोणतेही पाप घडत नाही म्हणून शुद्ध व परम धर्माचे व

भक्तीचे अस्तित्व आहे म्हणून पवित्र. सुंदर = रम्य, आदरणीय. पावित्र्य आणि निसर्गसौंदर्य असतील ते स्थान परमार्थ साधनास योग्य; पण या दोन गोष्टी क्वचितच एकत्र दिसतात. (क) **हर्ष राजिवाक्षास** - राजीवलोचन रामास हर्ष झाला. या राजीवाक्ष = राजीवलोचन शब्दाने अरण्य काण्डारंभीच्या 'सांद्रानदपयोदसौभगतनुं-' या श्लोकांत वर्णिलेले ध्यान व सौंदर्य सुचविले आहे. राजीवायतलोचनं धृतजटाजूटेन संशोभितं । सीतालक्ष्मणसंयुतं पथिगतं रामाभिरामं मजे' हे त्या श्लोकांतच आहे. भाव हा की स्वतः अनुपम अद्वितीय, सुंदर व पवित्र असून त्यांस हा आश्रम पाहून हर्ष झाला. यावरून ते सौंदर्य व पावित्र्य किती असेल याची कल्पना करावी. रघुराज राम 'हर्षविषाद रहित' असून त्यांस हर्ष होण्याचे कारण हेच की भरद्वाजाश्रम, प्रयागक्षेत्रांत, तीर्थराजांत असून तिथे जे पाहण्यास सापडले नाही ते वैशिष्ट्य या आपल्या भक्ताच्या आश्रमांत दिसले. भक्तांच्या ठिकाणचे अनुपम गुण पाहून भगवंतास हर्ष होतो.

(२) **शंका. - 'भरद्वाज आश्रम अति पावन । परम रम्य मुनिवर-मनभावन'** (१।४४।६) असे भरद्वाजाश्रमाचे वर्णन केले आहे. भरद्वाज वाल्मीकींचे शिष्य असून व त्यांच्या आश्रमात सहजवैरत्याग झालेला नसून वाल्मीकींच्या आश्रमास नुसते 'शुचिसुंदर' कां म्हटले? भरद्वाजाश्रमापेक्षा हा कमी पवित्र व रम्य आहे की काय? या शंकेचे समाधान दृष्टान्तासह १।४४।६ च्या टीकेत बालकांडांत सविस्तर केले आहे. ज्यांच्या पावित्र्यास व सौंदर्यास विश्वात उपमा नाही त्या रामचंद्रांस हा शुचि व सुंदर वाटला. **मग याच्या पावित्र्यास व सौंदर्यास उपमा किंवा विशेषणे कोणती वापरता येणार?** भरद्वाजाश्रम परमपावन (शुचि) व परमरम्य (सुंदर) वाटतो मुनिवरांना. रामचंद्रांस तो शुचि व सुंदर सुद्धा वाटला नाही. सुचविले आहे की या आश्रमाच्या पावित्र्यास व सौंदर्यास उपमा नाही. **याच्यासारखा शुचि व सुंदर आश्रम हाच** - अधिक विस्तार नको.

(३) **श्रवुनि - रघुवरागमन** - रघुवर + आगमन = रघुवरागमन. रघुवर येत आहेत असे मुनींना कोणी सांगितले? वाल्मीकी त्रिकालदर्शी मुनि असल्यामुळे त्यांना कळले की राम आपल्या आश्रमात आज येत आहेत. त्यामुळे त्यांनी रघुवरांच्या रूपाच्या खाणाखुणा सांगून पाहण्यासाठी व दुरून दिसताच वर्दी

पोचविण्यासाठी शिष्य ठेवले असले पाहिजेत. त्यांनी जाणले असते तर 'रघुवर आए जानि मुनि' असे कवींना म्हणता आले असते. राम अत्रि-आश्रमात जातात तेव्हा असेच घडले आहे. अगस्तींना सुतीक्ष्णाने पुढे जाऊन सांगितले आहे. **(क) रघुवर आगमन** - यांतील रघुवर शब्दाने सुचविले की वाल्मीकी रामचंद्राशी परमात्मा भगवान या भावनेने न वागता ते रघुवर आहेत याच भावनेने म्हणजे माधुर्य भावनेने वागणार. **(ख) पुढें येति नेण्यास** - पर्णकुटीत घेऊन जाण्यासाठी सामोरे आले. माधुर्य भावनेने असे करण्याची आवश्यकता नव्हती. पण रघुकुलश्रेष्ठ असून अतिथि रूपाने येत आहेत म्हणून अतिथि भावनेने स्वागत करण्यासाठी आले. अतिथींचे स्वागत करणे हे विप्राचे कर्तव्यच आहे. पुढे रघुवरास अतिथि व मुनिवरांस विप्रवर म्हटले आहे ते याचसाठी.

*हिं.* *। मुनि कहुँ राम दण्डवत कीन्हा । आसिरबादु बिप्रबर दीन्हा ॥१॥*
*। देखि राम छबि नयन जुडाने । करि सनमानु आश्रमहिं आनें ॥२॥*
*। मुनिबर अतिथि प्रानप्रिय पाए । कंदमूल फल मधुर मगाए ॥३॥*
*। सिय सौमित्रि राम फल खाए । तब मुनि आश्रम दिए सुहाए ॥४॥*

*म.* *। रामें मुनिस दण्डवत नमलें । आशीर्वाद विप्रवर वदले ॥१॥*
*। बघुनि राम-छबि लोचन निवले । सन्मानुनि आश्रमीं आणले ॥२॥*
*। प्राण प्रिय अतिथी मुनि पावति । कंदमूल फल मधुर मागवति ॥३॥*
*। सीता अनुज राम फळ भक्षिति । तैं मुनि रुचिर आश्रमां अर्पिति ॥४॥*

**अर्थ** - रामचंद्रांनी मुनिवरास दण्डवत नमस्कार घातला व विप्रश्रेष्ठाने त्यांस (रामलक्ष्मणांस) आशीर्वाद दिला.॥१॥ रामचंद्रांस पाहून मुनीचे नयन निवले (तेव्हा) त्यांस सन्मानाने आपल्या पर्णकुटीत (आश्रमी) आणले.॥२॥ (आज) प्राणांसारखे प्रिय असलेले अतिथि (म्हणून) प्राप्त झाले असल्याने मुनींनी मधुर कंदमूल फलादिक मागविली. (व अतिथींना समर्पण केली) ॥३॥ सीता लक्ष्मण व राम यांनी (कंदमूल) फळे खाल्ली तेव्हा मग मुनीने त्यांस सुंदर आश्रम दिले.॥४॥

**टीका. चौ. १ - रामें मुनिस दण्डवत नमलें** - कनिष्ठांनी श्रेष्ठांना दंडवत - साष्टांग - नमस्कार करणे ही नीतिमर्यादा आहे. येथे नरनाट्य सुरू झाले. राम दण्डवत करीत असता भरद्वाजांप्रमाणे या मुनिवरांनी उचलून घेतले नाहीत. या

चार चौपायांच्या शेवटी भरद्वाज, वाल्मीकी, अत्रि, शरभंग, सुतीक्ष्ण व अगस्ति या सहा मुनींच्या भावनांची व त्यांच्या रामचंद्रांशी वागण्याची तुलना कोष्टक रूपाने केली असल्याने येथे विस्तार नको. (क) - **आशीर्वाद विप्रवर बदले** - आशीर्वाद का दिला याचे कारण 'विप्रवर' शब्दाने सुचविले आहे. राम रघुवर - क्षत्रिय कुलश्रेष्ठ असल्याने विप्रोत्तमाने त्यांस आशीर्वाद देणेच योग्य आहे. नमन केल्यानंतर आशीर्वाद देणे हेही कर्तव्य आहे. रामचंद्रांनी नमस्कार केला म्हणजे लक्ष्मणाने तसाच केला व सीतेने स्त्रियांच्या पद्धतीने केला हे न सांगता समजण्यासारखे असल्याने उल्लेख केलेला नाही. आशीर्वादही तिघांना दिलेच.

चौ. २ (१) **बघुनि रामछबि लोचन निवले** - नेत्र निवले, शान्त झाले असे म्हटले. याने सुचविले की आधी रामरूपदर्शनासाठी संतप्त झाले होते. यावरून ठरले की पुढे वाल्मीकींनीच वर्णिलेल्या १४ प्रकारच्या भक्तांपैकी **'लोचन चातक करुनी राखति । जे दर्शन - जलधर - अभिलाषति । सरसरिता सागरीं निरादर । रूपबिंदुजल मिळत सुखाकर'** या दुसऱ्या प्रकारचे भक्त स्वतः हे मुनिराजच आहेत. (क) **बघुनि रामछबि** - जेथे जेथे रघुवरांच्या दर्शनाने कोणास आनंद झाला आहे तेथे तेथे रघुवर, रघुपति वगैरे इतर शब्द न वापरता 'राम' शब्दच वापरला आहे. विश्वामित्र १।२०७।७; परशुराम १।२६९।८; भरद्वाज, त्यांच्या आश्रमांतील मुनि, प्रयागवासी लोक, अज्ञात तापस, अत्रि, शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्ति, शबरी, सुग्रीव इ. उदाहरणे पहावी. **राम** = 'आनंदसिंधु सुखराशी'. (ख) **सन्मानुनि आश्रमीं आणले** - कोणत्या भावनेने सन्मान केला हे पुढील चौपाईतील 'प्राणांप्रिय अतिथी' या शब्दांनी कळते. लहानांनी मोठ्यांस दण्डवत केल्यावर त्यांस उचलून घेऊन आलिंगन देणे हा शिष्टाचार दृढ प्रेम संबंधात पाळतात. नंतर कुशल विचारून आशीर्वाद देतात किंवा आशीर्वादानंतर कुशल विचारतात. या मुनिवरांनी राममुखपंकज अवलोकन केल्याबरोबर मन नेत्रपुटांनी रूपामृतपान करण्यात दंग झाले व त्यामुळे व्यवहार मर्यादा जरा सुटली; क्षणभर देहभान विसरले व त्यामुळे आशीर्वाद देण्यापूर्वी भेटण्याचे राहिले. कुशल विचारले नाही हे योग्यच आहे. **अतिथीचे भोजनादि होईपर्यंतचे कुशल विचारू नये** पूर्वी जे **'मधुप रस भुलले (गुंजति)'** असे वर्णन केले ते येथे ॥ मुनिमन मधुप रूपरसि भुलला ॥ असे खरे करून दाखविले. वृत्तीवर

आल्यावर अर्घ्य देणे व **'भाग्यें अमच्या आगमन अपले कोसलराय'॥ धन्य आज आश्रम मम झाला । अतिथि रघुपते आश्रमिं आलां ॥ पायधूळ आश्रमिं झाडावी । थकलां बहु विश्रान्ती घ्यावी ॥** वगैरे म्हणून पर्णकुटीत नेले.

**चौ. ३-४ (१) प्राणप्रिय अतिथी मुनि पावति** - अतिथी हे अनेक वचन आहे. मुळात 'पाए' हे अनेक वचन आहे. आतापर्यंत लक्ष्मणाचा उल्लेख स्वतंत्रपणे केला नाही तो येथे बहुवचनाने सुचविला आहे. **प्राणप्रिय** = प्राणांसारखे प्रिय किंवा प्राणांहून प्रिय असे दोन अर्थ होऊ शकतात; पण येथे राम परमात्मा आहेत हे मुनि जाणत असल्याने प्राणांपेक्षा प्रिय जो आत्मा, परमात्मा तोच अतिथीच्या रूपाने आला आहे हे मुनिवरांनी जाणले. पण अतिथीप्रमाणेच त्यांच्याशी वागणार हे सुचविले. **(क) कंद मूल फल मधुर मागवति** - भरद्वाज भेटीतील वर्णन येथे गृहीत धरावे. अमृतासारखी मधुर मागविली. भरद्वाजांनी स्वतः आणून दिली आहेत. **'मागवति'** शब्दाने सिद्ध होते की मुनींच्या या आश्रमांत शिष्य होते. मागविल्याचा उल्लेख केला पण पूजन करून ती समर्पण केल्याचा उल्लेख नाही; आसने दिल्याचा उल्लेखही नाही. पण **(ख) सीता अनुज राम फळ भक्षति** - असे स्पष्ट सांगितले. मग न देताच त्यांनी खाल्ली व उभ्याउभ्यानेच करपात्री परमहंस संन्याशाप्रमाणे खाल्ली असे मानावयाचे की काय? पण गृहस्थांस ते वर्ज्य आहे. व अतीथीचे पूजन केले नाही असे मानल्यास प्राणप्रिय अतिथि व विप्रवर हे शब्द निरर्थक ठरतील. अतिथि पूजन व यथाशक्ती अतिथि भोजन या गोष्टी तर अतिथि सत्कारात मुख्य आहेत. म्हणून पूजन करून कंदमूलफल नैवेद्य समर्पण केला असे मानणे भाग आहे. पूजनात आसन द्यावे लागतेच.

(२) **सीता अनुज राम फळ भक्षति** - पूजन करताना व कंदमूल फलादि समर्पण करताना ज्या प्रेमाने मुनिवर ते करीत आहेत ते प्रेम पाहून कविराज गोस्वामी वाल्मीकीचेच अवतार असल्याने असामान्य आनंदोद्रेक झाला व त्यामुळे बऱ्याच गोष्टी अध्याहृत राहिल्या. हनुमंताचे भाग्य वर्णन करण्यात शिवजींना असाच अपार आनंद झाला आहे; कारण हनुमान शिवावतार ! **(क)** येथे भक्षण करण्यात नुसत्या फळांचाच उल्लेख असला तरी कंदमूळांचा अव्हेर करून राम ज्यांना मुनिनाथ ! प्रभु ! म्हणून संबोधितात त्यांचा अपमान केला असे नाही.

कंदमूलफले खाल्ली असेच मानणे भाग आहे. मागल्या मुक्कामात कोणी मुनींनी आणून दिली नाहीत तरीसुद्धा ज्यांनी कंदमूलफळे खाल्ली ते वाल्मीकींनी दिलेली खाणार नाहीत हे शक्यच नाही. अत्रि भेटीत मुनींनी मूलफळ दिल्याचा उल्लेख आहे पण प्रभूंनी भक्षण केल्याचा उल्लेखच नाही ! मग तेथे खाल्ली नाहीत असे म्हणावे लागेल ! १०७।२-३ व ८९।८ व ८९ टीका पहावी.

**(३) तैं मुनि रुचिर आश्रमां अर्पिंति** - कंदमूलफलादि भक्षण केल्यावर त्यांना विश्रांतीसाठी स्वतंत्र आश्रम दिले. भरद्वाजाश्रमात सुद्धा कंदमूळफलादि भक्षण केल्यावर रामचंद्रांनी विश्रांती घेतल्याचा उल्लेख आहे व जनकपुरीत गेले त्या दिवशी भोजनानंतर विश्राम केल्याचा उल्लेख आहेच. (१।२१७) एकांतांत काहीतरी संभाषण करण्याची मुनींची इच्छा आहे हे दुसरे कारण आहे. विश्रांती घेतल्यावर मग बोलू या विचाराने आश्रम दिले. **(क) आश्रमां** हे अनेकवचन आहे तसेच हिंदीत **'दिए'** हे क्रियापद अनेकवचनी आहे. म्हणून दोन आश्रम तरी दिले असे ठरले. याने सुचविले की जेथे रहाल तेथे दोन आश्रम तरी पाहिजेत. चित्रकूटास प्रभूंनी न सांगताच दोन पर्णकुटी तयार केल्या गेल्या आहेतच. रामचंद्रांनी आज विश्रांति घेतली नाही हे पुढे स्पष्ट दिसते.

**पाठभेद - 'आश्रम'** हा पाठ जुन्या हिंदी पोथ्यांत आहे. पण नंतरच्या काही पोथ्यांत 'आश्रम'च्या ऐवजी **'आसन'** हा पाठभेद आहे. पण तो लेखक प्रमाद मानणेच भाग आहे. आश्रमांत आणल्यावर आसन देणे योग्य होते; पण कंदमूळफळे भक्षण केल्यानंतर मग बसण्यास पाट दिले असे म्हणणे हास्यास्पद आहे अतिथिंची क्षुधा शांति (भोजनादि) झाल्यावर त्यांना विश्रांतीसाठी जागा देणे हे यजमानाचे कर्तव्यच आहे. (मा.पी.मध्ये प्रज्ञानानंदांची टीका येथे दिली आहे. पण त्यांत एक महत्त्वाचे वाक्य गाळले आहे, ते : 'उनके साथ एकान्त में बतकही करनेके लिए दो कुटियां देदी' अशा मोठ्या आश्रमांत अतिथींसाठी स्वतंत्र अतिथिगृहे असत हे यावरून ठरले.

भरद्वाजादि सहा मुनींची तुलना कोष्टकरूपाने एकाच ठिकाणी न करता (छपाईच्या सोयीसाठी) दोन विभागांत केली आहे.

| | भरद्वाज | वाल्मीकी | अत्रि |
|---|---|---|---|
| १. | आधी कळले नाही. प्रभु आले. | येत आहेत हे ऐकले | येत आहेत असे ऐकले. |
| २. | .......... | सामोरे चालत आले. | अत्रि धावत सामोरे आले. |
| ३. | दण्डवत करताना उचलून घेतले. | दण्डवत करू दिले. | दण्डवत करताना उचलले. |
| ४. | आशीर्वाद दिला. | आशीर्वाद दिला. | नाही दिला. |
| ५. | कुशल विचारले | अतिथीला कुशल विचारू नये. | परमात्मा जाणून विचारले नाही. |
| ६. | आसन दिले. | सन्मानाने आणले. | आदराने आणले. |
| ७. | पूजा केली. | पूजा सूचित. स्पष्ट उल्लेख नाही. | पूजा केली. |
| ८. | कंदमूलादि अमृतासम स्वतः आणून दिली. प्रभूंनी खाल्ली. | कंदमूळफले मागविली. प्रभूंनी खाल्ली. | मूळफलादि दिली. नी प्रभूंना आवडली; म्हणजे खाल्लीच. |
| ९. | स्तुति थोडीशी केली. | स्तुति केली. | स्तुति पुष्कळ केली. |
| १०. | भक्ति वर मागितला. | वर मागितला नाही. | वर मागितला, भक्तीच. |
| ११. | प्रभूंनी प्रशंसा केली. | प्रभूंनी प्रशंसा केली. | केली नाही म्हटले तरी चालेल. |
| १२. | प्रभूंनी मार्ग विचारला. | निवासस्थान विचारले. | जाण्यास परवानगी मागितली. |
| १३. | आज्ञा घेऊन, वंदून प्रभु निघाले. | उल्लेख नाही. (टी.प.) | नमन करून निघाले. |
| १४. | एव मस्तु म्हणाले नाहीत प्रभु. | × × × | एवमस्तु म्हणाले नाहीत प्रभु. |

| | | | |
|---|---|---|---|
| १५. | **प्रौढतनयसम ज्ञानी भक्त** | **पूर्ण माधुर्य भावांत** | **प्रौढतनयनसम ज्ञानी भक्त.** |
| १६. | **ऐश्वर्य माधुर्य आलटून पालटून** | **प्राणप्रिय अतिथि प्रभु.** | **पूर्ण ऐश्वर्यभाव.** |

सूचना - ज्या भरद्वाजाश्रमात प्रभु गेले ते भरद्वाज एका कल्पातले व ज्यांना याज्ञवल्क्य शिवपार्वती संवाद सांगत आहेत ते निराळ्या कल्पातले हे लक्षात असावे.

| | शरभंग | सुतीक्ष्ण | (गुरु) अगस्ती |
|---|---|---|---|
| १. | कळले नाही. प्रभु एकदम आले | मुनि वनांत प्रेममग्न हिंडत होते. | येत आहेत असे ऐकले. |
| २. | × × मुनि बघत राहिले. | प्रभु समोर प्रगट झाले | धावत सामोरे गेले. |
| ३. | कोणी कोणाला नमन नाही. | मुनि पायांवर छडीसारखा पडला. | प्रभु पाया पडले मुनींच्या. |
| ४. | आशीर्वाद इत्यादी काही नाही. | प्रभु कडकडून प्रेमाने भेटले. | उचलून मुनि भेटले आशीर्वाद नाही. |
| ५. | कुशल विचारले नाही. | वारंवार प्रभुच्या पाया पडले. | कुशल विचारले. |
| ६. | आसन इ. नाही. प्रभु उभेच ! | आश्रमांत आणले. | आणून वरासनी बसविले. |
| ७. | पूजा नाही. प्रेममग्न मुनि. | विविध प्रकारे पूजा केली. | बहु प्रकारे पूजा केली. |
| ८. | कंदमूलादि काही नाही. | पूजेत नैवेद्य असतोच. | पूजेत नैवेद्य असतोच. |
| ९. | स्तुति विचित्र केली. | स्तुति पुष्कळ केली. | स्तुती बरीच केली. |
| १०. | भेदभक्ति वर मागितला. | वर तीन वेळा, भिन्न मागितला. | भक्ति वर मागितला व सत्संग. |

| | | | |
|---|---|---|---|
| ११. | योगाग्नीने देहत्याग. | प्रभु पुन्हा हर्षाने भेटले. | प्रभूंनी स्तुति केली. |
| १२. | वैकुंठास गेले शरभंग. | वर माग म्हणून सांगितले. | मंत्र विचारला. पंचवटी स्थान सांगितले. प्रभु आज्ञा घेऊन गेले. |
| १३. | ब्रह्मलोकांस मुनि जाणार होते ! | मला कळत नाही, तुम्ही द्या. | .......... |
| १४. | वर मिळाला; एवमस्तु नाही. | दिला तो पावला पण मागतो तो द्या. | एवमस्तु म्हणाले नाहीत. |
| १५. | **मित्र - बालक सुतसम दास.** | **हृदयीं निवास मागितला.** | **प्रौढतनय सम ज्ञानीभक्त.** |
| १६. | **प्रेममग्नता,** | **एवमस्तु म्हणाले प्रभु** | **'ऐश्वर्यभाव प्रधान थोडे माधुर्य** |
| १७. | **व्यवहाराला फाटा** | **उत्तम बालकसुत समदास. पूर्ण ऐश्वर्य भावना, दास्यभाव.** | वर मिळालाच. |

**सूचना** - दोनदा अत्यंत प्रेमाने भेटून, 'वर माग' असे सांगून एवमस्तु (तथास्तु) म्हटले फक्त सुतीक्ष्णालाच. युक्तीने प्रार्थना करून प्रभूंच्या बरोबर अगस्त्याश्रमांत सुतीक्ष्ण गेला व जाताना प्रभु-मुखाने भक्तिकथा ऐकण्याचे परम भाग्य सुतीक्ष्णासच लाभले.

**विश्वामित्र** - विश्वामित्रांची सेवा गुरु म्हणून प्रभूंनी केली. विश्वामित्रांनीच गुरुत्वाचा पूर्ण निर्वाह केला. प्रशंसा केली नाही. वर मागितला नाही. प्रभूंनी पाय चेपले आहेत !

**वसिष्ठ** - दीर्घकाळपर्यंत गुरुत्वाचा निर्वाह केला; पण शेवटी स्तुति करून (ऐश्वर्य भावाने) वर मागितला आहे.

***हिं.*** ***। बालमीकि मन आनँदु भारी । मंगल मूरति नयन निहारी ॥५॥***
***। तब कर कमल जोरि रघुराई । बोले बचन श्रवन सुखदाई ॥६॥***

*। तुम्ह त्रिकाल दरसी मुनिनाथा । बिस्व बदर जिमि तुम्हरें हाथा ॥७॥*
*। अस कहि प्रभु सब कथा बखानी । जेहि जेहि भाँति दीन्ह बनु रानी ॥८॥*

म. *। वाल्मीकी मनिं अति आनंदित । मंगल मूर्तिस नयनीं निरखत ॥५॥*
*। रघुपति तदा जुळुनि कर-कमलें । श्रवण-सुखद वचना या वदले ॥६॥*
*। तुम्हीं त्रिकालदर्शी मुनिनाथा । विश्व बदर सम तुमचे हातां ॥७॥*
*। तैं प्रभु सगळा प्रसंग वानित । ज्या प्रकारिं राणी वन अर्पित ॥८॥*

**अर्थ** - मंगलमूर्तीला (रामाला) डोळ्यांनी निरखून पाहून वाल्मीकी मनात अति आनंदित झाले.॥५॥ तेव्हा दोन्ही करकमले जोडून रघुराज (रघुपति) कानांना सुख देणारे हे वचन बोलले - ॥६॥ मुनिनाथ ! आपण त्रिकाळदर्शी असून हे विश्व बोरासारखे आपल्या (तळ) हातावर आहे.॥७॥ (असे म्हणून) मग ज्या प्रकाराने राणीने वन दिले (वनात धाडले) तो सगळा प्रसंग प्रभूंनी वर्णन करून सांगितला.॥८॥

**टीका. - चौ. ५** - (१) **ल.ठे.** - वाल्मीकी मनि अति आनंदित - निरखित - या चौपाईत कार्याचा उल्लेख व नंतर कारणाचा उल्लेख का केला? **'बघुनि राम छबि लोचन निवले'** असे पूर्वीच (चौ.२) म्हटले आहे. तेथे रामचंद्रांकडे बघण्यास प्रारंभ होऊन प्रथम नयन शीतल झाले. आनंद झाल्याचे वर्णन तेथे नाही. त्याचे कारण येथे सांगतात की तो आनंद वाल्मीकी मनि होता. बाहेर दिसण्या इतका अति (भारी) नव्हता, कारण की आश्रमात येऊन आतिथ्य स्वीकारतील की नाही व एकांतात भाषण करण्यास सापडेल की नाही अशा शंका वाटत होत्या व त्यामुळे मनातला आनंद बाहेर प्रगट दिसण्याइतका वाढला नव्हता. रामचंद्रांनी आपली पावले पर्णकुटीकडे वळविली तेव्हा तो आनंद वाढू लागला. पर्णकुटीत येऊन फलाहार केला तेव्हा तो वाढला व आता स्वतंत्र आश्रमांत एकांतांत प्रवेश केल्यावर समोर बसून या मूर्तीचे नखशिखांत निरीक्षण करण्याने तो भारी = अति झाला. 'नयनीं नीर तनू पुलकांकित । नखशिख मंगलमूर्तिस निरखित ॥ अशी दशा झाली. आनंदाच्या वृद्धीच्या दोन कारणांमध्ये हा पहिला चरण घातला तो एवढ्यासाठी. प्राणप्रिय अतिथि आलेला पाहिला म्हणजे आनंद होतो; पण त्या अतिथीने आतिथ्य स्वीकार केला, भोजनादि केले व विश्रान्तीसाठी थांबले हे

पाहण्याने आश्रम धर्माचे सार्थक झाले असे वाटते. **अतिथि प्रसन्न व गतश्रम झालेला पाहिला म्हणजे आश्रमीला फार आनंद वाटला पाहिजे.**

(२) राम क्षत्रिय राजपुत्र व मुनि विप्रवर ! तेव्हा आपण बसल्याशिवाय रघुवर बसणे शक्य नाही हे जाणून मुनि आधी बसले तेव्हा त्यांच्या समोर राम बसले. दोघेही एकमेकांच्या भावना जाणून त्यांचे रक्षण करीत आहेत. आश्रमस्थ इतर मुनींनी आधीच दर्शन घेतले असावे. फलाहारानंतर कोणी येऊ नये अशी व्यवस्था केली असेलच. पुढील संभाषणात अवतार रहस्याचा स्फोट करावा लागणार हे त्रिकालदर्शी मुनिनाथ जाणत असल्याने ते रहस्य गुप्त ठेवण्याच्या दृष्टीनेच मुनिवर आतापर्यंत वागले आहेत. तेथील वाल्मीकींची भूमिका वा.रा.मध्ये रेखाटलेल्या रामचरित्राला अगदी साजेल अशीच आहे. (क) **मंगलमूर्ति** शब्द महाराष्ट्रात गणपतीला लावला जातो. सर्व प्रकारच्या मंगलांनी मनुष्य शरीर धारण केल्याने तयार झालेली जी मूर्ति ती मंगलमूर्ति. सर्व मंगलांची साक्षात मूर्तीच. मंगल = कल्याण, श्रेय, शुभ या मंगलमूर्ति शब्दाने सुचविले की राम परमात्मा आहेत हे मुनिवरांनी ओळखले आहे. **'मूर्तिस मधुर मनोहर देखे । होइ बिदेह बिदेह बिशेखें'** (१।२१५।८) अशी स्थिति या मंगल मूर्तिस न ओळखता सुद्धा जनक राजांची झाली. मग वाल्मीकींनी देहभान भुलून परमानंद मग्न होऊन टक लावून पाहिले तर नवल नाही.

**चौ. ६ (१) तदा रघुपति करकमलें जुळुनि... वदले** - **तदा** = तेव्हा, मुनिराज तटस्थ होऊन राहिले आहेत असे पाहिले तेव्हा. या प्रेमसमाधीतून मुनि केव्हा वृत्तीवर येतील व आपण केव्हा विचारणार व येथून केव्हा जाणार असे वाटले व ठरविले की आता मुनींनी न विचारता बोलल्याशिवाय भागणार नाही. (क) **कर कमलें जोडून** - सुचविले की काही विनंती करावयाची आहे हे जाणून मुनि काहीतरी विचारतील व मग आपण बोलू म्हणजे मर्यादाभंग होणार नाही. पण एवढ्यानेसुद्धा भागले नाही, तेव्हा बोलावे लागलेच. (ख) **रघुपति** - रघुवंशांतील राजाने महामुनींशी ज्या पद्धतीने बोलणे उचित आहे त्या पद्धतीने राम आता बोलणार.

(२) **श्रवणसुखद** - मृदु, मधुर, सत्य, प्रिय, विनीत विवेकयुक्त व श्रुति

गुरु संतसंमत असणारे भाषणच संतांच्या कानांस सुखदायक होते. सत्तादि कोणताही मद, स्वार्थ, अनीति इ. चा गंधसुद्धा असता नये. पुढील भाषणांत आपला स्वार्थ साधण्यासाठी रघुपति तोंडपुजेपणा करीत आहेत असे वाटू नये म्हणून पुढे (चौ.८) प्रभु शब्द वापरला आहे. कोणी असेही समजू नये की आपली स्तुती ऐकल्यामुळे वाल्मीकी प्रसन्न झाले. मुनिवरांना सुख झाले याचे कारण 'साधु साधु वदले ज्ञानी मुनि' च्या टीकेत पुढे स्पष्ट केले आहे.

**चौ. ७ - (१) मुनिनाथ** - मुनींनासुद्धा सनाथ करणारे; त्यांना धीर व आधार देऊन त्यांच्यावर कृपा करणारे. **(क) त्रिकालदर्शी** - ज्यांना आपल्या दृष्टीपुढे भूत-भविष्य-वर्तमान काळातल्या गोष्टी प्रत्यक्ष दिसू शकतात असे. भाव हा की आम्ही कशासाठी आलो, कोणत्या हेतूने आलो इ. सर्व त्रिकाल ज्ञानाने आपण जाणताच. तिन्ही काळातील वस्तुस्थिती पाहण्यासाठी समाधिसिद्ध योग्याला भूतपरिणाम, लक्षण परिणाम व अवस्था परिणाम यांच्या ठिकाणी संयम करावा लागतो. या विषयी 'ध्यान धरुनि तैं शंकर पाहति । सर्व सतीकृत चरिता जाणति' (१।५६।४) च्या टीकेत पूर्वी विस्तार केला आहे. शंकर, भारद्वाज, याज्ञवल्क्य, नारद, अगस्ति, विश्वामित्र, वसिष्ठ इ. सर्व त्रिकालदर्शी आहेत.

**(२) विश्व बदरसम तुमचे हातां** - सर्व विश्वाचे यथार्थ ज्ञान आपल्याला तळहातावरील बोरासारखे प्रत्यक्ष व निकट आहे. **भरद्वाजांना कर तळावरील आवळ्यासारखे ज्ञान होते** असे (१।३०।७) म्हटले आहे व **बोरासारखे आहे असे येथे म्हटले.** या दोन भिन्नधर्मी उपमा देण्यातच श्रीतुलसीदासांच्या अद्वितीय तत्त्वग्राही प्रतिभेचे सम्यक, सुचारु दर्शन होत असून काही टीकाकार म्हणतात की वाल्मीकींचे ज्ञान भरद्वाज याज्ञवल्क्यांच्या ज्ञानापेक्षा हीन होते. कारण सांगतात की आवळा रोगनिवारक आहे व बोर रोगोत्पादक आहे. चिंतामणीला गारगोटी गणून लाथेने उडवून देणारेच हे ! तु.दासांनी हा फरक का केला ते पाहू : या विषयावर **'श्रीमानस का आमलक और बदर' हा लेख मा.मी. फेब्रु.** १९५५ मध्ये प्रकाशित झाला आहे.

त्रिकालज्ञ ते **आत्मज्ञाना । जाणति करिं आमलक समाना'** (१।३०।७) (१) येथे **आत्मज्ञान** हा विषय आहे व त्याला करतलामलक - तळहातावरील आवळा,

ही उपमा दिली आहे. ही अनेक ठिकाणी इतर ग्रंथांत सुद्धा आढळते. **आत्मज्ञान, आत्मस्वरूप सदा एकरस असते.** आवळ्यांच्या अनेक जाती असल्या तरी आवळ्याला कीड लागत नाही. सर्व आवळ्यांत तुरटपणा हा एकच रस असतो; पित्तशामकता हा गुण असतो. आवळ्यांतून रस काढतात, काढता येतो. आत्मज्ञानातून भक्तिरस मिळणे शक्य असते. आवळा खाताना तुरट व कसासाच लागला तरी पाठीमागून तोंड गोड होते; म्हणजे तो सात्त्विक सुखदायी आहे. असे आत्मज्ञानाचे साम्य आढळणाऱ्या उपमेने जितके तंतोतंत दाखविता येते तितके इतर कोणत्याही उपमेने दाखविता येत नाही. आवळा रोगनाशक आत्मज्ञान भवरोगनाशक, आवळा वाटोळा, निराकाराचे प्रतीक, आत्मज्ञान निराकार; आवळ्यांतील अठी-आठोळी कठीण रसहीन, तीन धारा व तीन विभाग असलेली, अशी असून त्या प्रत्येक विभागात अनेक बीजे असतात. वरील रसमय भागाला आठोळी (आठी) अगदी चिकटून असते. आवळा वाळल्यावर सुद्धा चिकटलेलीच असते. काही काळाने वाळलेला आवळा आपोआप फुटतो व आत गुप्त असलेली सूक्ष्म बीजे बाहेर पडतात. असेच हुबेहुब ब्रह्म व माया यांचे आहे. ब्रह्म व माया इतकी एकरूप झालेली आहेत की मायेला मुद्दाम बाहेर काढल्याशिवाय आत्मज्ञानाची - ब्रह्माची प्राप्ती होत नाही. कल्पांताच्या वेळी माया जीवांच्या संस्कार बीजांसह ब्रह्मांत गुप्त असते. यथाकाळी = कल्पारंभी त्या मायेतून आठोळीतून बीजे बाहेर पडतात व सृष्टिचक्र चालू होते. आवळ्याच्या आठोळीप्रमाणे माया त्रिगुणात्मक - तीन धारा - कंगोरे असलेली व तीन अवस्था रूपी टरफले असलेलीच आहे. टरफले व बिया यांचा त्याग केल्याशिवाय आवळकटी उपयोगात आणता येत नाही. त्याप्रमाणे त्रिगुण व अवस्था इत्यादींचा व मी - मम बीजांचा त्याग केल्याशिवाय आत्मज्ञान होत नाही. अशा रीतीने या उपमेचा जेवढा विस्तार करावा तेवढा थोडा.

## विश्व बदरसम तुमचे हातां

१. येथे आत्मज्ञान हा विषय नसून इंद्रिय मनोगोचर असणारे विश्व जग हा विषय आहे. या विषयाला बोराची उपमा दिली आहे. आत्मज्ञानाला दिलेली

नाही. हीच उपमा वसिष्ठ व विश्वाचे ज्ञान या संबंधी वापरली आहे. 'जग जाणे गुरु विवेक सागर । त्यांस **बदरसम विश्व करावर**' (२।१८२।१) आवळा व बोर या भिन्न उपमा एकाच वस्तूला दिलेल्या नसून भिन्न वस्तूंना दिलेल्या आहेत; म्हणून कोणाचे ज्ञान निरोगी व कोणाचे रोगट हा विचारच चुकीचा, निराधार व हास्यास्पद आहे.

**२. विश्व एकरस नसून विचित्र आहे.** त्यातील प्रत्येक व्यक्ति, पदार्थ, स्थान यांच्या प्रकृति धर्मात भेद आहेत. तसेच बोरांचे आहे. एकाच झाडाच्या प्रत्येक बोराची चव निराळी; फार काय एकाच बोराच्या भिन्न भागात भिन्न चवी ! (क) बोर जेवढे अधिक चांगले दिसणारे व मधुर वास येणारे तेवढी त्यांत कीडी असण्याची शक्यता जास्त. बोरांच्या आकारात, रंगरूपात अनंत प्रकार. या जगात बाह्यतः चांगल्या दिसणाऱ्या व्यक्ति, वस्तु व स्थाने इत्यादीकांत अनेक सद्गुणांची माती करणारा किडीसारखा एखादा गुप्त दुर्गुण असतो तो दुरून दिसत नाही. विश्व आणि बोर यांत जेवढे साम्य आहे तेवढे इतर कोणत्याही उपमेने दाखविता येण्यासारखे नाही. जगात जेवढे रस (सहा) व त्यांची मिश्रणे आहेत तेवढी भिन्न भिन्न बोरांत दिसतील. खाताना गोड पण परिणामी रोगोत्पादक, विश्वाप्रमाणेच राजस, तामस सुख देणारी बोरे आहेत. बोरांचा उपयोग रोगनिवारणात न होता रोगवर्धक होतो, तसेच विश्वाचे सेवन भवरोगवृद्धिकारक व आत्मज्ञान भवरोगहारक आवळा व आवळीचा वृक्ष, आत्मज्ञान व ते देणारे संतगुरु, पवित्र आहेत. बोर व बोरीचे झाड पूज्य पवित्र नाहीत; कंटकमय दुःखद वृक्षापासून बोराची उत्पत्ति तर अविद्या वृक्षापासूनच दुःखद विश्वाची उत्पत्ति, दोन्ही अपवित्रच. आत्मज्ञान भवरोगहारक महारसायन आहे. तसाच आवळ्यांचा कायाकल्प होतो; बोरांचा होत नाही. सार हे की बोर तळहातावर घेतले म्हणजे त्याच्या **गुणदोषांचे ज्ञान होणे शक्य असते.** तसे ते दूर किंवा झाडावर असता होऊ शकत नाही. असेच विश्वाचे आहे. 'दुरून डोंगर साजरे' दिसतात. (ख) वाल्मीकींना सर्व विश्व हातावरील बोरासारखे असल्याने रघुवरांस जी माहिती पाहिजे आहे ती त्यांच्याकडून निर्दोष व खात्रीलायक मिळू शकेल. आत्मज्ञान व विश्वज्ञान या परस्पर विरोधी ज्ञानांना

परस्परविरुद्ध धर्मी आवळा व बोर या उपमा देण्यानेच गोसाईंच्या काव्य प्रतिभा कौशल्याचे आणि शब्दांचे व वस्तूंच्या गुणधर्मज्ञानाचे दर्शन होत आहे. **एका एका शब्दाने अशा विस्तृत भावार्थांचे निदर्शन मानसांत अनेक ठिकाणी केलेले आहे. धन्य तुलसीदास** ! असेच उद्गार येथे निघतील. (ग) **सरस्वतीच्या मंगलाचरणांत ही उपमा अशीच वापरली आहे. 'करबदरसदृशमखिलं भुवनतलं यत्प्रसादतः कवयः। पश्यन्ति सूक्ष्ममतयः सा जयति सरस्वती देवी ॥' (सु.र. कल्पतरुलता)**

**चौ. ८ - (१) प्रभु सगळा प्रसंग बानित** - वन अर्पित - प्रभु - रघुनाथाच्या बोलण्या-चालण्या-वागण्यावरून ते मनुष्य आहेत असा भ्रम श्रोते, वक्ते, वाचक यांच्या मनात उत्पन्न होण्याची शक्यता जेथे असते तेथे विविध प्रकारांनी घंटा वाजवून कवि सावध करतात; त्या प्रकारांपैकी 'प्रभु' शब्दाचा उपयोग करणे हा एक प्रकार आहे. प्रभु = सर्वसमर्थ, सर्वज्ञ, सर्वदर्शी असूनसुद्धा नरनाट्य उत्तम प्रकारे करण्यासाठी पुढील वचने बोलणार आहेत. हा रघुनाथाचा हेतु मुनिनाथाने ओळखला आहे हे पुढे दिसेल. (क) **सगळा प्रसंग बानित** - राज्याभिषेक तयारी पासून वनात येण्यास निघेपर्यंत राणीने जे जे केले ते सर्व वर्णन केले. (ख) **राणी वन अर्पित** - राणीने वन दिले असे म्हटले. कैकयीने वनवासात पाठविले असे म्हटले नाही. म्हणजेच कैकयीचे दोष भडक दिसणार नाहीत, अत्यंत सौम्य दिसतील अशा रीतीने सांगितली सर्व हकीगत. वन दिले म्हणण्यात तिने उपकार केले हा भाव ध्वनित आहे. एखादे वन एखाद्या राणीने आज कोणास दिले तर त्यास वाईट न वाटता राणीने फार उपकार केले असे तो जन्मभर म्हणेल. कौसल्येला सांगतानासुद्धा **'देति तात मज काननराज्य'** असे म्हटले आहे. कौसल्येने सुद्धा 'वन दिलें' असेच म्हटले आहे. 'राज्य देउं वदुनी **दिलें वन** मजला दुःख न लेश' (२।५५।)

(२) **शंका** - कौसल्येने कारण विचारले तेव्हा रघुनाथाने सांगितले नाही. त्यांची इच्छा जाणून सचिवसुताने सर्व प्रसंग सांगितला. मग येथे आपल्या मुखाने भरत जननीच्या करणीचा पाढा प्रभूंनी का वाचला? (क) या वेळी सीता व लक्ष्मण यांशिवाय इतर कोणी जवळ नाही. आपण स्वतः न सांगता बायकोकडून सांगविणे योग्य नाही व लक्ष्मणाकडून सांगविणे म्हणजे स्वतःच्या कानांनी आपल्या

आईबापांची निंदा ऐकण्यासाठी फोनोची प्लेट लावण्यासारखे ठरून लक्ष्मणाच्या स्वभावाचे निष्कारण प्रदर्शन केल्यासारखे झाले असते. नाईलाजास्तव सांगणे भाग होते; पण ते दोषरूपाने न सांगता गौरवरूपाने मनाला खरोखरच जे वाटत होते ते तसे सांगितले. (ख) वनराज्य दिले हे सांगितलेच व आणखी किती उपकार राणीने केले ते पुढील दोह्यांत सांगणार आहेत. राणीने वन देऊन माझ्यावर फार मोठे उपकार केले. मला मोठ्या बंधनांतून सोडविला इत्यादी प्रकारे राणीची स्तुती करीतच सर्व हकीगत सांगितली. वनात राहण्यास स्थान विचारावयाचे असल्याने वनात राहण्याची आवश्यकता का निर्माण झाली हे सांगणे जरूरच होते.

*हिं.दो. । तात बचन पुनि मातु हित भाइ भरत अस राउ ॥*
*॥ मो कहुँ दरस तुम्हार प्रभु सबु मम पुन्य प्रभाउ ॥१२५॥*

*म.दो. । तातबचन नी मातृहित भाउ भरतसा भूप ॥*
*॥ प्रभु दर्शन मज हा मम पुण्यप्रभाव खूप ॥१२५॥*

**अर्थ** - वडिलांच्या वचनाची पूर्तता करणे, त्यातही मातेचे हित साधणे आणि भरतासारखा भाऊ राजा होणार व त्यातही प्रभु ! मला आपले दर्शन, हा सर्व माझ्या पुष्कळ (खूप) पुण्याचा प्रभाव आहे. (राणीने माझ्या पुण्याचे चतुर्विध फळ माझ्या पदरात टाकले व माझ्यावर अनंत उपकार केले.)॥दो.१२५॥

**टीका.** (१) वडिलांचे वचन पूर्ण करण्याने पुत्रधर्माची प्राप्ति, मातेला राज्य, धनसंपत्ती पाहिजे होती ती तिला मिळाली, म्हणजे अर्थ हा पुरुषार्थ साधला. भरत राजा व्हावा अशी माझी स्वतःची इच्छा, कामना होती म्हणून काम पुरुषार्थ साधला व भगवंतासमान असलेल्या आपल्यासारख्यांचे दर्शन आहे याने मोक्ष चौथा पुरुषार्थ साधणार. 'संतसंग अपवर्गपथ' (७।३३) 'आज धन्य मी पहा मुनीश्वर । अपलें दर्शन अघराशीहर ॥ बहुभाग्यें सत्संग लाभतो । बिना श्रमहि भव भंग पावतो' (७।३३।७-८) 'पुण्यपुंज विण भेट न संतां' म्हणून म्हटले की पुण्यप्रभाव खूप. (क) भरत तर राजा नाही झाला ! मग येथे असे कसे म्हटले? ही शंकाच अविचारमूलक आहे. रघुनाथ येथे अज्ञानी राजपुत्राचे नाट्य करीत आहेत. ते इतकेच जाणतात की दशरथांनी भरतास राज्य दिले आहे आणि

'श्रुति जनसंमत, म्हणति सकल, तोच राज्य करी ज्या पिता अर्पितो' (२०७।३) पुढे काय होणार आहे हे ते जाणत नाहीत. म्हणून त्यांच्या दृष्टीने त्यांनी म्हटले ते अगदी योग्यच म्हटले ! म्हणून येथे पुढील भावी घटना लक्षात घेऊन आक्षेप घेण्यास जागाच नाही. नाटकांतील भावी घटना आधीच गृहीत धरणेच चुकीचे.

नाटकात नट जेव्हा भाषण करतो तेव्हा तो भावी घटना ध्यानात घेऊन थोडाच बोलतो? अर्थातच कधीच नाही. त्या प्रसंगापर्यंत त्याचे जे ज्ञान असेल त्यास अनुसरूनच बोलतो. अर्थात येथे भरताने कुठले राज्य प्राप्त केले वगैरे दुसऱ्या प्रकारे दाखविण्याचा प्रयत्न करणे ही चूक आहे. (ख) या प्रकारे रघुनाथाने दाखविले की राणीच्या कृपेने मला धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चारी पुरुषार्थांची प्राप्ति सहजच झाली आहे आणि याला मूळ कारण माझा मोठा पुण्यसंग्रह हेच आहे. या चारांपैकी एकाची प्राप्ती होती तरी कल्याण झाले असते मग चारींची प्राप्ती ज्या पुण्यसंग्रहाने झाली तो किती मोठा असला पाहिजे. (४१।६-७) (दो. ४१ व ४२।१) यांत श्रीरामांनी जे म्हटले आहे त्याच्याशी तुलना करून पहावी.

हिं. *। देखि पाय मुनिराय तुम्हारे । भए सुकृत सब सुफल हमारे ॥१॥*
*। अब जहँ राउर आयसु होई । मुनि उदबेगु न पावै कोई ॥२॥*
*। मुनि तापस जिन्ह तें दुखु लहहीं । ते नरेस बिनु पावक दहहीं ॥३॥*
*। मंगलमूल बिप्र परितोषू । दहइ कोटिकुल भूसुर - रोषू ॥४॥*

म. *। बघुनि पाय मुनिराय आपले । अमचें सकलही सुकृत सुफळलें ॥१॥*
*। अतां जिथें प्रभु आज्ञा देतिल । मुनि उद्वेग न कोणि पावतील ॥२॥*
*। ज्यांकारण मुनि तपी कष्टती । ते नरेश विण पावक जळती ॥३॥*
*। मंगलमूल विप्रपरितोषू । जाळि कोटिकुळ भूसुर-रोषू ॥४॥*

**अर्थ** - मुनिराज ! आपल्या पायांच्या दर्शनाने आमचे सर्व सुकृत चांगले फळास आले (सुफळ झाले) ।।१।। आता जिथे आपली आज्ञा होईल व जेथे (आमच्यामुळे ) कोणाही मुनीला उद्वेग वाटणार नाही (असे स्थळ सांगावे).।।२।। ज्या नरेशांमुळे मुनी व तपस्वी (तपी-तापस) यांना कष्ट होतात; ते पावका (अग्नी) वाचूनच जळून जातात.।।३।। विप्रांचा परितोष सर्व मंगलांचे मूळ आहे; पण भूसुरांचा (विप्रांचा, ब्राह्मणांचा) क्रोध कोटि कुळांना जाळून टाकतो.।।४।।

**टीका.चौ. १ (७) बघुनि पाय** - पूज्य, सेव्य व्यक्तींच्या पायांचेच महत्त्व सेवकाला जास्त; म्हणून पायांचा उल्लेख करून दास्यभाव प्रगट केला. **(क) अमचें** = राम, लक्ष्मण व सीता या तिघांचे. मागल्या दोह्यांत 'मम पुण्यप्रभाव' म्हटले कारण वनप्राप्तीसह ज्या चार-पांच गोष्टींचा तेथे उल्लेख केला त्यांचा संबंध रामचंद्रांशीच आहे. सीता व लक्ष्मण यांना राणीने वन दिलेले नाही. **संतदर्शन घडते ते ज्याच्या त्याच्या पुण्यप्रभावाने** - सुकृत फळास आल्यानेच घडते. (७।४५।६ पहा.)

**चौ. २ - (१) या चौपाईपासून** पाचव्या चौपाईपर्यंत मुनिराजांना असे स्थान विचारतात की जिथे या तिघांना काही काळ राहता येईल व यांच्या राहण्यामुळे मुनि वगैरे कोणांस दुःख, कष्ट होणार नाहीत. **(क) मुनि उद्वेग न कोणि पावतिल** - 'मुनि' शब्दांत तपस्वी व विप्र यांचा अन्तर्भाव करणे जरूर आहे. रघुपति क्षत्रिय असल्याने शिकार करणार; ते मुनि वगैरेंना आवडणार नाही. जिथे कंदमूलफलादि आधीच तुटपुंजी आहेत व तेथे राहणाऱ्या मुनिवगैरेंनासुद्धा पुरत नाहीत तेथे या तिघांनी राहिल्याने त्यांना दुःखच. हे रघुवंशी, अयोध्यापति असल्याने अयोध्येतील लोकांची येजा होणारच व त्यामुळेही त्यांना त्रास होण्याचा संभव इ. कारणांमुळेच मुनींना **उद्वेग = खेद, विषाद,** दुःख होणे साहजिक आहे. त्यांनी दुःख मानले नाही. रागावले नाहीत तरी दुःखाला कारण होणारे दोषी ठरतातच. दुःख झाले तरी दुःख न मानणारांचा, उत्तम वर्ग येथे सुचविला.

**चौ. ३-४ (१) ज्यांकारण मुनि तपी कष्टती** - दुःख झाल्यावर दुःख मानतात पण रागावत नाहीत हा मध्यम वर्ग यांत सुचविला व पुढील चौपाईत दुःख देणारांवर क्रोध करणारांचा म्हणजे तिसरा प्रकार सुचविला आहे. **(क) नरेश** = राजा हा मुख्यार्थ व क्षत्रिय हा गौण अर्थ आहे. राजाचा सुद्धा विनाश होतो; मी राजा नसल्यामुळे मला तर फार सावध राहिले पाहिजे. **'शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् । दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्'** ईश्वरभाव = सत्ता गाजविण्याची प्रवृत्ती, अस्सल क्षत्रियाच्या ठिकाणी सहज असते म्हणून नरेश = क्षत्रिय हा अर्थही घेता येईल. शिवाय 'देति तात मज काननराज्य' असे म्हटलेच आहे व पुढे चित्रकूटचे राज्यरूपकाने वर्णन केलेच आहे.

(२) **मंगलमूल विप्रपरितोषू** - वाल्मीकींना मुनि, मुनिराय, विप्रवर, मुनिवर म्हटले आहे म्हणून येथे विप्र = मुनि, तपस्वी, विप्र इत्यादीचे ग्रहण केले पाहिजे. **'तनुमन वचनें त्यजुनि छल जो भूसुर सेवील ॥ मी विधि शिव सुर सर्वही त्याला वश होतील.'** (३।३३) असे श्रीरामवचन आहे. ३।३४।१-२ पहा. (क) जाळि कोटिकुळ भूसुर - रोषू - कपिलाच्या क्रोधाने ६० हजार सगरपुत्र अग्नीवाचून जळले. ५६ कोटि यादव विप्रशापाने नष्ट झाले. दंडक, सहस्रार्जुन, इ. अनेक उदाहरणे आहेत. ब्राह्मणांनी शान्तता राखून जरी शाप दिला नाही व प्रत्यक्ष विनाश झालेला जरी दिसला नाही, तरी देह त्यागानंतर ब्राह्मण पीडकांना शिक्षा भोगावी लागतेच. येथे जिवंत असतासुद्धा त्या कर्माचा परिणाम भोगावा लागतोच. पण अमक्या कर्माचे अमुक फळ हे समजत नाही इतकेच. क्षत्रियांतील क्षात्रतेज व ब्राह्मणांतील ब्रह्मतेज यांचा या कराल कलिकालात लोप झाला असला तरी अपवाद रूपाने कुठे कुठे दिसतातच.

*हिं. । अस जियँ जानि कहिअ सोइ ठाऊँ । सिय सौमित्रि सहित जहँ जाऊँ ।।५।।*
*। तहँ रचि रुचिर परन तृन साला । बासु करौं कछु काल कृपाला ।।६।।*
*। सहज सरल सुनि रघुबर बानी । साधु साधु बोले मुनि ग्यानी ।।७।।*
*। कस न कहहु अस रघुकुलकेतू । तुम्ह पालक संतत श्रुति सेतू ।।८।।*
*म. । अस मनिं जाणुनि थळ सांगावें । सह सौमित्रि सिता जिथ जावें ।।५।।*
*। तिथें रुचिर रचुनी तृणशाला । कांहिं काळ करुं वास कृपाला ।।६।।*
*। सहज सरल रघुवरवच परिसुनि । साधु साधु वदले ज्ञानी मुनि ।।७।।*
*। कसं न वदां अस रघुकुल केतू । पालक सतत तुम्हीं श्रुतिसेतू ।।८।।*

**अर्थ** - असे मनात आहे, हे जाणून आपण असे स्थळ (थळ) सांगावे की जेथे सीता व सौमित्रीसह मी जावे ।।५।। तिथे सुंदर पर्णकुटी (तृणपर्णशाला) बांधून कृपाला ! आम्ही काही काळ वास करू.।।६।। रघुवराची सहज सरल भाषा (बोलणे) ऐकून ज्ञानी मुनि म्हणाले की साधु साधु ! (शाबास शाबास !) ।।७।। रघुकुल केतू ! तुम्ही असे का बरे म्हणणार नाही ! तुम्ही सतत श्रुतिसेतु (वेदमर्यादा, धर्म मर्यादा) पालन करणारे आहात.।।८।।

**टीका. - चौ. ५ - (१) अस मनिं (अस जियँ)** - असे माझ्या मनात आहे.

जेथे राहून आम्ही विप्रांना पारितोष तर देऊ शकू पण विप्रांचा रोष किंवा त्यांस आमच्यामुळे त्रास होणार नाही व जेथे आम्हाला तिघांना सुखाने राहता येईल, असे स्थळ असावे. या सर्व गोष्टी विचारात घेऊन व असे स्थळ कोणते ते मनाशी ठरवून 'अस मनिं जाणुनि' मला सांगावे, म्हणजे आम्ही तेथे जाऊ. **(क) सौमित्री** - दो. १२२ 'सौमित्री' टीका पहावी. **(ख) वा. रा.** - भरद्वाजांनांच स्थान विचारले आहे व त्यांनी चित्रकूट सांगितले आहे. मानसांतील भरद्वाज **'परमार्थी पथिं परम सुजाणू'** (१।४४।२) आहेत. ते पथप्रवीण असल्यामुळे त्यांस मार्ग - पथ विचारणेच योग्य. वाल्मीकींना निवासस्थान = अयन विचारले **'अयनं पथि गेहे'** (हैमः) हे सुद्धा सहेतुक. वाल्मीकी रामायण-निर्माते आहेत. रामायण = राम + अयन = रामाचे निवासस्थान. मग रामचंद्रांनी निवास करण्यासारखे स्थान त्यांना विचारणेच योग्य की इतरांस?

**चौ. ६ - (१) रुचिर तृणशाला** - रुचिर तृणपर्णशाला बांधून राहू, असे सांगितले. तृणशाला - पर्णकुटी, आश्रम, पर्णकुटी सुंदर वाटण्यास भोवतालची परिस्थितीसुद्धा रुचिर = मनो-हर, मनोरम असावी लागते; म्हणून सुचविले की ते स्थान रमणीय असावे.

**चौ. ७ - (१) सहज सरल... साधु साधु बदलें ग्यानी मुनि** - सहज सरलता हा रघुवीराचा स्वभाव आहे. यात आत एक बाहेर एक असे नाही. जे सोंग घेतले आहे त्याला अगदी योग्य असे स्वाभाविक सरल भाषण आहे. भाषण ऐकून वाल्मीकींना आनंद झाला. परमात्मा असून रघुकुल श्रेष्ठाला शोभेल असेच बोलले म्हणून हर्ष झाला. या हर्षाच्या भरात आता सर्व अवतार रहस्य हळूच बाहेर पाडणार ! एवढ्यासाठी तर स्वतंत्र आश्रम दिले आहेत. मराठीत जसे शाबास शाबास ! किंवा वाहवा वाहवा ! म्हणतो त्या प्रमाणे संस्कृतात साधु, साधु ! म्हणून प्रसन्नता, संतोष व्यक्त करतात.

**चौ. ८ - (१) रघुकुलकेतू** = रघुकुलाची ध्वजा; रघुकुलाची कीर्ति ध्वजेप्रमाणे फडकविणारे. रघु वगैरे सर्व राजे सरळ व विप्रांचा, मुनिवृंदांचा सन्मान करणारे, त्यांना भिऊन वागणारे, त्यांचे सेवक म्हणून वागणारे होते. तुम्ही तर त्यातील शिरोमणि मग तुम्ही असे विचारणार नाही तर कोण विचारील ! **(क) तुम्हीं**

**सतत श्रुति सेतु पालक** - रघु आदि सर्व मोठे राजे धर्ममार्गाचे, वेदमार्गाचे पालन करणारे होते. तुम्ही तर त्यांत श्रेष्ठ, म्हणून तुम्ही सदासर्वदा श्रुतिसेतूंचे पालन करता हे तुम्हाला साजेसेच आहे. सतत शब्दाने ईश्वरत्त्व सुचविले आहे. कारण कितीही दीर्घायुषी राजे झाले तरी ते संतत - सतत - रहात नाहीत. मग सतत श्रुतिसेतुपालक कसे असणार? **सतत श्रुति - सेतुपालक फक्त ईश्वरच.** येथे ऐश्वर्यभाव गूढ आहे तो आता छंदांत उघड करतात. आदिकवि रामप्रेमरंगांत रंगून अवताररहस्य रक्षणाचा भंग करीत आहेत.

*हिं.छं.* *। श्रुति-सेतु पालक राम तुम्ह जगदीस माया जानकी ॥*
*॥ जो सृजति जगु पालति हरति रुख पाइ कृपानिधान की ॥*
*। जो सहससीसु अहीसु महिधरु लखनु सचराचर धनी ।*
*॥ सुर काज धरि नरराज तनु चले दलन खल निसिचर अनी ॥१॥*

*मं.छं.* *। श्रुति-सेतु-पालक राम तुम्हिं जगदीश माया जानकी ।*
*॥ जग निर्मि जी पाळी हरी करुणानिधी - कल बघुन कीं ॥*
*। जो अमितशीर्ष अहीश महिधर लक्ष्मण ही अगजग धनी !*
*॥ सुरकाजिं जातां नृपतितनुधर दलन खल निशिचर - अनी ! ॥१॥*

**अर्थ** - राम ! तुम्हीं श्रुति सेतुपालक जगदीश आहात व जानकी माया आहे; जी करुणानिधीचा कल (मनोगत) पाहून जग निर्माण करते, त्याचे पालन करते व त्याचा संहार करते. हजार (अमित) शीर्षाचा, पृथ्वीला धारण करणारा जो शेष आणि जो चराचराचा स्वामी तोच लक्ष्मण आहे. तुम्ही सुरकार्य करण्यासाठी नृपति देह धारण करून दुष्ट निशाचर समूहांचा (अनी, अनीक) विनाश करण्यासाठी जात आहात.।।छं. १।।

**टीका** - प्रत्येक पंचविसाव्या दोह्यांत छंद वापरण्याचा या काण्डातील कवींचा संकेत आहे, त्याप्रमाणे २५ × ५ = १२५ व्यात छंद व सोरठा यावयास पाहिजे होता; पण अज्ञात तापस वर्णनाचा एक दोहा अज्ञात रीतीने मध्येच वाढला व त्याला कवींनी मान्यता दिली. त्यामुळे येथे १२६ व्यांत छंद झाला. २५, ५०, ७५ व १०० यांत छंद व सोरठे आहेत, तसेच पुढे १५१, १७६, २०१ या प्रमाणे प्रत्येक २५ व्यात काण्डसमाप्तीपर्यंत छंद व सोरठा आहे. या

काण्डातील प्रत्येक छंदांत तुलसी, तुलसीदास किंवा दास तुलसी असा कवीच्या नावाचा उल्लेख आहे. फक्त याच छंदांत तसा उल्लेख नाही किंवा सोरठ्यांतही नाही. तुलसीदास वाल्मीकीचेच अवतार आहेत व प्रत्यक्ष वाल्मीकीच येथे वक्ते आहेत. अवतार अवतारीशी इतका तदाकार झाला की आपला अवतारपणा व कविपणा साफ विसरून गेला. त्यामुळे तुलसी निराळे राहिले नाहीत. यामुळेच मागील चार छंदांत व पुढील आठ छंदांत तुलसीदास असून फक्त येथे नाहीत !

(१) **राम श्रुतिसेतुपालक जगदीश** - यांनी सांगितले की राम परमात्मा परमेश्वर आहेत. निर्गुण निराकार **ब्रह्म** = राम हे सोरठ्यात सांगतील. सर्व जगावर आपली सत्ता चालविणारे जगदीश तुम्ही आहात. धर्ममर्यादाचा भंग झालेला पाहताच, धर्माचे रक्षण करून धर्ममर्यादा घालून देण्यासाठी तुम्ही नरपती - नृपतिरूप घेतले आहे. तो हेतु सिद्ध करण्यासाठी जात असून कोठे रहावयाचे वगैरे सर्व तुम्हाला माहीत असून नरपतिरूपास शोभेल असे धर्माचरण करणे जरूर असल्याने व मला मोठेपणा देण्यासाठी विचारलेत हेही योग्यच आहे.

(२) **माया, जानकी** - जानकी जगदीशाची माया आहे. कोणती माया हे येथे स्पष्ट नसल्याने सांगतात की, **'जी जग निर्मि, पाळी हरी'** जी उद्‌भव स्थिति संहार करते ती माया जानकी आहे. म्हणजे विद्यामाया आहे. **'आदि शक्ति जी निर्मि जगा या । ती ही मम अवतरेल माया.'** (१।१५२।४ टी.पहा.) माया जगाची उत्पत्ति, स्थिति लय करते असे म्हटल्याने माया स्वतंत्र ठरेल, म्हणून सांगितले की 'करुणानिधीकल बघुनि' करुणासागर जगदीशाच्या इच्छेने, प्रेरणेने सर्व करते. **'एक रची जग गुण बश जीतें । प्रभूप्रेरिता स्वबल न तीतें'** (३।१५।६) असे रामचंद्राच म्हणतात. (१ मं. ५ टी.प.)

(३) **लक्ष्मण कोण** हे तिसऱ्या चरणात सांगतात. वक्ते वाल्मीकी आहेत. वा.रा. लक्ष्मण शेषावतार असल्याचे वर्णन आहे. अमित = सहस्र, हा शब्द अनंतवाची आहे.

**(क) अग** = अचर, **जग** = चर, अगजग = **अचर व चर, धनी = स्वामी** 'शेष सहस्रशीर्ष जगकारण । जो अवतरला भूभय-दारण' (१।१७।७) हाच अर्थ येथे घेणे जरूर आहे. 'भूभयदारण' येथे 'दलनखलनिशिचर अनी' याने स्पष्ट करून दाखविले.

जग = अगजग, – म्हणून धनी = स्वामी = कारण हे स्पष्ट झाले. कधी शेषाचा अवतार असतात तर कधी भगवान नारायणाचा. १।१७।७ टी.प.

(४) **सुरकाजिं जाता नृपतितनुधर** - तिघे मिळून सुरकार्य करून धर्मस्थापना करण्यासाठी जात आहात; पण नृपतिरूप घेतले असल्याने त्याला शोभेल असे धर्माचरण करून दाखवित आहात. **(क) दलन खल निशिचर अनी** - = अनीकिनी सेना, समुदाय; 'नामैकदंशे नामग्रहणम्' या नियमाने जसा भामा = सत्यभामा, अमा = अमावस्या तसाच अनी = अनीकिनी खलनिशाचरांचा संहार करणारे म्हणजे सज्जन निशाचरांचा विनाश करणार नाहीत हे सुचविले. या प्रमाणे या छंदांत राम सीता व लक्ष्मण यांचे आदिदैविक स्वरूप सांगितले. धर्मसंस्थापना व सुरकार्य हा अवतार हेतु सांगितला. आता सांगतील की निर्गुणनिराकार ब्रह्म = रघुपतिराम हे एकम् एव अद्वितीय असल्यामुळे सीता (माया) व लक्ष्मण (जीव) यांचे वर्णन पुढील सोरठ्यात नाही.

***हिं.सो.*** *। राम सरूप तुम्हार बचन अगोचर बुद्धि पर ॥*
*॥ अबिगत अकथ अपार नेति नेति नित निगम कह ॥१२६॥*

***म.सो.*** *। रामा तवस्वरूप वचनाऽगोचर बुद्धि-पर ॥*
*॥ व्यक्त न, अकथ अपार नेति नेति वदती निगम ॥१२६॥*

**अर्थ** - रामा ! तुमचे स्वरूप वाणीचा विषय नाही. बुद्धीच्या पलीकडे आहे. ते व्यक्त नाही (अव्यक्त = अविगत), अकथ = अकथनीय, अनिर्वचनीय आहे व अपार आहे व वेद नेहमी नेति नेति म्हणूनच त्याचे वर्णन करतात.।।दो.१२६।।

**टीका.** - निर्गुण निराकार, निषेधावधि ब्रह्मांत इतर काही नाही. मग सीता व लक्ष्मण कुठून असणार? 'एकम् एव अद्वितीयं' ब्रह्म, ' न इह नाना अस्ति किंचन' (श्रुति). ते मन, वाणी बुद्धि यांचा विषय नाही. मनबुद्धिवाणी तेथपर्यंत जाऊ शकत नाहीत. 'न विद्मः न विजानीयः' 'यो बुद्धेः परतस्तु सः' (भ.गी.) अविगत = अव्यक्त असल्याने इंद्रियांचा विषय नाही. या सर्व विशेषणांचे निरूपण बा.कां. अनेक वेळा झाले आहे. सती - विश्वरूप दर्शनात तिला प्रथम सीता लक्ष्मणरहित एकटे प्रभूच सर्वत्र दिसले. टीका पहावी. जे निर्गुण ब्रह्म तेच राम परमेश्वर व तेच रघुपति असे आतापर्यंत सांगितले. आता प्रभाव वगैरे सांगतात.

हिं. *। जगु पेखन तुम्ह देखनिहारे । बिधिहरिसंभु नचावनिहारे ॥१॥*
*। तेउ न जानहिं मरमु तुम्हारा । औरु तुम्हहि को जाननिहारा ॥२॥*
*। सोइ जानइ जेहि देहु जनाई । जानत तुम्हहि तुम्हइ होइ जाई ॥३॥*
*। तुम्हरिहि कृपा तुम्हहि रघुनंदन । जानहिं भगत भगत - उर चंदन ॥४॥*

म. *। विश्व दृश्य आपण बघणारे । बिधि हरि शंभुस नाचविणारे ॥१॥*
*। मर्म न तुमचें त्यांसहि कळतें । तुम्हां जाणतिल अन्य कवण ते ॥२॥*
*। तो जाणे ज्या जाणूं देता । तुम्हिंच होइ तो तुम्हा जाणतां ॥३॥*
*। तुमचे कृपे तुम्हा रघुनन्दन । जाणति भक्त भक्त-उर-चंदन ॥४॥*

**अर्थ** - (हे सर्व) विश्व दृश्य असून तुम्ही पाहणारे - द्रष्टे आहात; आणि तुम्ही ब्रह्मा, विष्णु व शंभु यांना (सुद्धा) (नट मर्कटाप्रमाणे) नाचविणारे आहात.॥१॥ तेसुद्धा तुमचे मर्म जाणू शकत नाहीत मग इतर कोण असतील की जे तुम्हास जाणू शकतील ! ॥२॥ तुम्ही ज्याला जाणू देता तोच तुम्हाला जाणतो; व तुम्हाला जाणल्या बरोबर तो तुम्हीच होतो.॥३॥ हे रघुनन्दना ! भक्तांच्या हृदयाच्या चंदना ! तुमच्याच कृपेने भक्त तुम्हाला जाणतात = ओळखतात ॥४॥

**टीका. - चौ. १** - (१) या चौपाईचा व मागील दोह्याचा (सोरठ्याचा) संबंध काय आणि या व खालील चौपायांत कोणत्या रूपाचे वर्णन आहे हे प्रथम ठरविले पाहिजे. मागल्या छंदांत सगुणनिराकार परमेश्वराच्या स्वरूपाशी रघुपति रामाचे ऐक्य दाखविले. सोरठ्यात निर्गुणनिराकार रामरूपाचे वर्णन केले. **असे जे ब्रह्म त्याचा साक्षात्कार कसा होऊ शकतो याचे उत्तर पुढील चौपायांत द्यावयाचे आहे.** या चार चौपायांत राम शब्द एकदाही न वापरता रघुनन्दन शब्द चौथ्या चौपाईत वापरून दाखविले की **हे वर्णन दशरथनन्दन रघुनंदनाचे आहे;** जे वाल्मीकींस त्यांच्या समोर दिसत आहेत त्यांचे आहे.

(२) **विश्व दृश्य आपण बघणारे - नाचविणारे** - भाव हा आहे की तुम्ही एखाद्या राजपुत्राप्रमाणे मला विचारलेत तरी तुम्ही राजपुत्र नसून परमात्मा परमेश्वर आहात. तुमचा देह दृश्य आहे असे वाटत असले तरी इतर दृश्यांसारखा आपला देह नाही. तुमचा देह व तुम्ही दोन नाहीत. तुमच्याशिवाय इतर सर्व जग

मनबुद्धिद्रियांनी जाणले जाणारे आहे. तुम्ही या सर्व जगाचे द्रष्टे आहात, साक्षी आहात. 'यद् दृष्टं तत् –' म्हणून हे सर्व दृश्य जग नश्वर, विनाशशील आहे. तुम्ही एकटे अविनाशी, अविकारी आहात. **(क) विधिहरि शंभुस नाचविणारे** - दृश्यासारखा वाटणाऱ्या या तुमच्या देहादिकांनी तुम्ही ज्या लीला करता त्यांनी तुम्ही उत्पत्तिस्थितिप्रलय करणाऱ्या ब्रह्मा, विष्णु महेशांनासुद्धा नाचविता = मोहित करता - भ्रमात पाडता. **'नारद भव विरंचि सनकादिक । आत्मवादि जे ही मुनिनायक ॥ मोहें अंध न कृत कोणाला'** (७।७०।६-७) भव = शंकर, विरंचि = ब्रह्मदेव ७।६०।४ पहा. 'प्रेमें हरिस (विष्णूला) राम जैं पाहति । रमासमेत **रमापति मोहति** ॥ (१।३१७।३) **(ख)** येथे **नाचविणें कोणा सारखें?** विधि हरि शंभु पुरुष आहेत. त्यांना काष्ठपुतळीची स्त्रीलींगी उपमा देणे मानसाभ्यासी व्यक्तींना तरी शोभणार नाही. **'दारुनारि सम सब जीवांप्रति । उमे ! राम गोस्वामि नाचवित'** (४।११।७) हे तारेविषयी बोलत असता म्हटले आहे. **'नट मर्कट इव जगा नाचविति । राम, खगेश ! वेद हें वर्णिति'** (४।७।२४) हे सुग्रीवाविषयी बोलत असता म्हटले आहे. सुग्रीव पुरुष म्हणून पुल्लिंगी उपमा (मर्कट) वापरली. यांतील कोणती उपमा येथे योग्य ते आता वाचकांनी ठरवावे.

**चौ. २ (१) मर्म न तुमचें त्यांसहि कळते** - विधि हरि शंभूंना **कसे नाचवितात हे येथे सांगतात.** त्यांना तुम्ही आपल्या अवतारलीलातील मर्म कळू देत नाही. त्यांनासुद्धा तुमच्या नरलीला पाहून मोह उत्पन्न होतो. तुम्ही नुसती मनात इच्छा केलीत की त्याप्रमाणे वागण्याची, (नाचण्याची) करण्याची बुद्धी त्यांना होते. नराच्या इच्छेने इशाऱ्याने, शब्दाने माकड जसे नाचते तसे तुमचे मर्म ब्रह्मादि देवांना न कळल्यामुळे तुमच्या इच्छेप्रमाणे, इशाऱ्याप्रमाणे ते देवत्रय सुद्धा नाचतात. श्रीगोपालकृष्ण लीलांनी मोहित झालेले ब्रह्मदेव (ब्रह्मस्तुतीत भाग १।१४) म्हणतात : **॥ लीला ईशा ! कितीक दावां । कोठें कैशा किती कदा वा ॥ न कळे; बनलो । किती बावळा । क्षमा करो हा कृष्ण सावळा ॥ तूं चि योगमायेचा ईश्वर । महिमा तुमचा अचिंत्य अक्षर ॥ मायालीला कुणा कळे ना । तुझ्या कृपेविण मति विमळेना ॥ (प्रज्ञा-अप्रकाशित). 'कोवेत्ति भूमन भगवन् परात्मन् ॥ योगेश्वरोतीर्भवतस्त्रिलोक्याम् ॥ क्व वा कथं कति वा कदेति विस्तारयन् क्रीडसि योगमायाम् ॥** (भाग. १०।१४।२१).

(क) **तुम्हां जाणतिल अन्य कवण ते** - या देवत्रयानां प्रभुलीलांचे मर्म कळत नाही व मग ते मर्म ब्रह्मदेव-निर्मित जगातील इतर कोण असा जाणू शकेल? व मर्म जाणल्याशिवाय तुम्हाला जाणणे-ओळखणे कसे शक्य होईल? कोणीही केव्हाही जाणणे व ओळखणे शक्य नाही. (**ख**) या प्रमाणे येथे दाखविले की **सगुणसाकाराचे - अवताराचे ज्ञान होणे शक्य नाही व निर्गुण निराकार ब्रह्माचे ज्ञान होणेसुद्धा दुर्घटच** ! मग निर्गुण व सगुण ही दोन्ही अज्ञेयच की काय? व येथे अज्ञेयवाद सांगितला की काय अशी शंका येईल म्हणून पुढील दोन चौपायांत उपाय सांगतात. सोरठ्यात वर्णिलेल्या निर्गुण स्वरूपाचे ज्ञान कसे होईल हे प्रथम (चौ.३) सांगून नंतर सगुणाविषयी सांगतील.

**चौ. ३ - (१) तो जाणे ज्या जाणू देता - 'रामा तव स्वरूप वचनाऽगोचर बुद्धिपर'** इ. प्रथम वर्णिलेल्या स्वरूपाचे ज्ञान कसे होईल हे येथे सांगितले. तुमच्या त्या स्वरूपाचे ज्ञान व्हावे असे ज्याच्याविषयी तुम्हाला वाटते त्याला ते होते. तुमच्या त्या स्वरूपाला जाणण्याची शक्ती तुम्ही ज्याला देता, जेव्हा देता, तेव्हा त्याला ते ज्ञान होते, ते स्वरूप तो जाणतो. **'नायम् आत्मा प्रवचनेन लभ्यः न मेधया न बहुना श्रुतेन ॥ यम् एव एष नृणुते तेन लभ्यः तस्य एष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्'** (कठ.उ. १।२।२२). या श्रुतीचे सारच वरील एका चरणात अगदी थोडक्यात दिले आहे. परंतु जाणतो म्हणजे काय होते ते ऐका (**क**) **तुम्हिं च होइ तो तुम्हां जाणतां** - त्या तुमच्या निर्गुण स्वरूपाला जाणतो म्हणजे तो जीव स्वतःच निर्गुण स्वरूप होतो. दुजेपणाने जाणता येत नाही. **'ब्रह्मविद् ब्रह्म एवभवति' 'ब्रह्म एव सन् ब्रह्माप्येति'** या श्रुतींचाच हा सोपा अनुवाद आहे. कोणीही जीव ईश्वर-परमेश्वर होऊ शकत नाही. **'जीव किं ईश-समान'** सरूपता मुक्ति मिळाली तरी ती देहत्यागानंतर मिळते. ज्या क्षणी आत्मज्ञान-आत्मसाक्षात्कार होतो त्या क्षणी सरूपता प्राप्त होत नाही व मेल्यावर सरूपता मिळाली तरी तो विधिहरिशंभुस नाचविणारा होऊ शकत नाही. श्रीवत्स, कौस्तुभ व सीता किंवा लक्ष्मी त्याला मिळत नाहीत; म्हणून **'तुम्हिंच होइ तो' हे वचन सरूपतामुक्तीस लागू पडत नाही, म्हणून हे वचन जीवब्रह्मैक्य प्रतिपादकच मानणे भाग आहे.** निर्गुण सायुज्य किंवा कैवल्यसुद्धा देहपातानंतर मिळते म्हणून त्याचेही ग्रहण येथे करता येत नाही.

जीवन्मुक्त होऊ शकेल एवढे म्हणता येईल. **(ख)** येथे हे दाखविले की कैवल्यमुक्ति देणारे ज्ञान पाहिजे असले तरी सगुणाची - रघुनंदनाची कृपा संपादन केल्यशिवाय तेही मिळणार नाही. रामकृपेनेच सद्गुरु भेट व कृपा होते (५।७।४) व सद्गुरु कृपेनेच अद्वैत सिद्ध होते. या ज्ञानासाठी तळमळसुद्धा **'ईश्वरानुग्रादेव, पुंसामद्वैतवासना'** (अव.गी. अ. १) - **'जन्मा नेक शतैः सदादरयुजा'** हा श्लोक बा.कां.मं.श्लो ३ च्या टीकेत पहावा. श्रीमदाचार्य शंकर त्यात हेच सांगतात की अनेक जन्मांच्या भक्तीनेच ईशकृपा होते.

**चौ. ४ - (१) तुमचे कृपें तुम्हां रघुनंदन ! जाणति भक्त -** निर्गुणाचा साक्षात्कार होण्यास किंवा सगुणाचे मर्म समजण्यास मुख्य उपाय रघुनंदन कृपा हाच आहे हे येथे स्पष्ट सांगितले. **'सगुणीं भजतां पाविजे निर्गुणा'** (समर्थ) महाराष्ट्रातील सर्व प्रसिद्ध संतांचे व श्रीमदाद्य शंकराचार्यांचेसुद्धा हेच मत आहे की भगवंताच्या कृपेनेच निर्गुणाचा साक्षात्कार म्हणजे आत्मज्ञान होते. सगुणाची विमलभक्ति मिळविण्यास भगवत्कृपा पाहिजेच याबद्दल वाद नाही. **'माम् एव ये प्रपद्यन्ते मायाम् एतां तरन्ति ते'** (भ.गी.) **'तेषामेवानुकम्पार्थम् अहम् अज्ञानजं तमः । नाशयामि आत्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता'** (भ.गी.) पण याला 'अन्ययाः चिन्तयन्तो माम् ये जनाः पर्युपासते' अनन्यगतिक पर्युपासना घडली पाहिजे. (क) ल.ठे. - जो सिद्धान्त 'यत्पादप्लव एक एव हि भवम्भोपेस्तितीर्षावताम्' (बा.कां.मं.६) यांत उपक्रमाने सांगितला, 'विण हरिभजन न भवतरण, सिद्धान्त चि-' (७।१२२) यांत उपसंहाररूपाने सांगितला तोच येथे अभ्यासरूपाने सांगितला.

(२) **जाणति भक्त** - साधनरूप श्रवणकीर्तनादि नवविधा भक्ती केल्याने रामकृपेने ज्ञान होते. **'बंधमोक्षदहि सर्वपर माया प्रेरक शीव'** (३।१५) शिव = ईश्वर. **'निर्गुण रूप सुलभ अति सगुण न जाणे कोणि । सुगम अगम चरितां श्रुनि जाती मुनिहि भुलोनि'** (७।७३) **'जानत एव जानन्तु किं बहूक्त्या न मे प्रभो । मनसो वपुषो वाचो वैभवं तव गोचरं'** (भाग १०।१४।३९) यात ब्रह्मदेव हेच सांगतात. **(क)** निर्गुणाचे ज्ञान दुर्घट असले तरी ते कदाचित सुगम होऊ शकेल, पण सगुण पूर्णपणे जाणणे कोणालाच शक्य नाही. सगुणाचा साक्षात्कार झाला, **प्रत्यक्ष रामदर्शन झाले तरी सगुणाला जाणणे अशक्य.** निर्गुण जाणणे कठीण

असले तरी सगुण जाणण्यापेक्षा फार सोपे आहे. श्रीमद्‌भागवतातील वरील श्लोक व मानसांतील वरील (७।७३) हा दोहा अगदी एक सिद्धान्त सांगतात. **(ख) भक्त - उर - चंदन** - चंदन छातीला लावले म्हणजे दाह शांत होतो. सुगंध मिळतो व प्रसन्नता प्राप्त होते. भक्तांचे त्रिविधताप, संसारपतंग किरणांचा दाह नष्ट होणे, राम कीर्तिलीलादिकांतील रहस्यरूपी सुगंध प्राप्त होणे व सतत, सर्वदा सुखी राहणे या गोष्टी रामकृपेनेच घडतात. 'चंदन तरु हरि, संत समीर' (७।१२०।१७) समीर = वायु; चंदनाचा सुगंध वायूच्या साह्याशिवाय मिळत नाही; म्हणून येथे **संतकृपेची आवश्यकता ध्वनित केली आहे** असे मानणे जरूर आहे. कोणत्या भक्ताला मर्म कळते ते मर्म कोणते हे आता सांगतील :

*हिं.* ***। चिदानंदमय देह तुम्हारी । बिगत बिकार जान अधिकारी ॥५॥***
***। नर तनु धरेहु संत सुर काजा । कहहु करहु जस प्राकृत राजा॥६॥***
***। राम देखि सुनि चरित तुम्हारे । जड़ मोहहिं बुध होहिं सुखारे ॥७॥***
***। तुम्ह जो कहहु करहु सब साचा । जस काछिअ तस चाहिअ नाचा ॥८***

*म.* ***। चिदानंदमय अपली काया । विगत विकार कळे अधिकाऱ्या ॥५॥***
***। धृत नरतनू संत-सुर-काजा । कृति वच जशि की प्राकृत राजा ॥६॥***
***। राम ! चरित तव ऐकुनि पाहुनि । सुख बुधांस जड माती मोहुनि ॥७॥***
***। योग्य चि तुमचें वचन वागणें । सोंगा योग्य किं नटें नाचणें ॥८॥***

**अर्थ** - (राम !) आपला देह (काया) सच्चिदानंदमय व सर्व विकार-रहित आहे. विकाररहित अधिकारी असतील त्यांना हे (मर्म) कळते.॥५॥ संत व सुर यांचे कार्य करण्यासाठी मनुष्यदेह धारण केला असून पांचभौतिक देह असलेल्या (= प्राकृत, प्रकृति जनित) राजासारखे आपण बोलता व करता.॥६॥ राम ! तुमचे (असले) चरित्रलीला पाहून वा ऐकून बुधांना सुख होते व जडमूढ मोहित होतात.॥७॥ (पण) तुम्ही जे बोलता व करता ते योग्यच (आवश्यकच) आहे; (कारण) जसे सोंग (नाटकातले) असेल त्याला योग्य असे नाचलेच पाहिजे (सोंगासारखी बतावणी केली पाहिजे)॥८॥.

**टीका. - चौ. ५ - (१) चिदानंदमय अपली काया । बिगत बिकार; -** चिदानंदमय = सत्, चित् आनंदमय, आपला देह सच्चिदानंदाचाच आहे. ब्रह्ममय

आहे. पंचभूते व त्रिगुण यांचा बनलेला नाही. (क) **बिगत बिकार** - पंचभूतांच्या बनलेल्या देहाला विकार असतात. ब्रह्म निर्विकार आहे म्हणून आपल्या देहाच्या ठिकाणी कोणतेही विकार नाहीत. स्थूल देह जायते, अस्ति, वर्धते, परिणमते, अपक्षीयते व नश्यति. तो मातृमार्गात जन्मतो, या जगात अस्तित्वात येतो, वाढतो, वाढ पूर्ण होते, क्षय होऊ लागतो व नाश पावतो. अशा या सहा विकारांनी युक्त स्थूल देह जीवमात्राचा असतो. जीवाच्या लिंगदेहांत (सूक्ष्म देहांत) कामक्रोधादि अनंत विकार असतात. त्यांपैकी कोणताही आपल्या ठिकाणी नाही. **'निर्दोषं हि समं ब्रह्म'** (भ.गी.) श्रीमत् भागवतांत ब्रह्मदेव श्रीगोपालकृष्णास म्हणतात. **'अस्यापि देव वपुषो मदनुग्रहस्य । स्वेच्छामयस्य न तु भूतमयस्य कोऽपि ॥ नेशे महि त्ववसितुं मनसांतरेण । साक्षात्तवैव किमुतात्मसुखानुभूतेः ॥** (भाग - १०।१४।२) जे गोपाल गोवत्सादि निर्माण करून ब्रह्मदेवाला (कः ब्रह्मदेव) मोहित केला तीसुद्धा सर्व ब्रह्ममयच होती. भूतमय नव्हती. मग ज्याने ती इच्छामात्रे करून निर्माण केली तो साकार परमात्म देह पंचभूतमय कसा असेल? **'इच्छामय नरवेषा घेइन । प्रगट निकेतीं तुमच्या होइन'** (१।१५२।१) असे श्रीमुखवचन आहे. गू.चं. पहा. १।१२२ पहा.

(२) **हे सांगण्यात गूढभाव हा आहे** - ब्रह्म सच्चिदानंदमय आहे. आकाशापेक्षाही सूक्ष्म व कोमल आहे व जे आनंदमय आहे, निर्विकार आहे, त्याच्यापासून कोणाला उद्वेग, कष्ट इ. कसे होतील? आकाश कधी कोणाच्या डोळ्यांत खुपेल का? जे ज्ञानमय आहे त्यास कोठे रहावे हे माहीत नाही असे कसे होईल? आपण जे विचारलेत त्यावरून ऐकणारांस वाटेल की राम अज्ञानी आहेत, होते; म्हणून त्यांनी स्थान विचारले. आपला देह साकार दिसत असला तरी तो आकारवान नाही. विविध कर्म, क्रिया करताना दिसलात तरी तुम्ही काही करीत नाही. आपल्या देहाच्या ठिकाणी सर्व देहधर्म दिसत असले तरी ते केवळ योगमायेच्या प्रभावाने भासतात. एक असून भलतेच का दिसावे? व सत्य मर्म कोणाला कळते? (क) **विगत-विकार अधिकाऱ्या कळे** - जो भक्त विगतविकार झाला असेल, जो अधिकारी असेल त्यालाच तुमच्या कृपेने मर्म कळते. विगतविकार = ज्ञानी असा अर्थ घेणे मानसविरोधी ठरेल. सती, भरद्वाज, नारद, गरुड व

काकभुशुंडी यांना मोह, महामोह भ्रम, संदेह उत्पन्न झाल्याचे वर्णन मानसांतच आहे. या सर्व व्यक्ती ज्ञानीच नव्हे तर महाज्ञानी होत्या, आहेत. शंकर, ब्रह्मदेवांसारख्यांनासुद्धा रामस्वरूपाविषयी मोह झाला, म्हणून जे भक्त **'षड्विकारजित अनघ अकाम'** असून ज्यांच्यावर रामकृपा करतील तेच अधिकारी. विगत विकार = षड्विकार जित अनघ अकाम. षड्विकार = कामक्रोधादि जे मर्म विधि हरिशंभु यांस कळत नाही ते त्या नावाड्यास लक्ष्मणमुखाने कळले. गुहावर कृपा करून लक्ष्मण-मुखाने उपदेश करून आपले मर्म त्यांच्या कानांवर घातले. देह चिदानंदमय, अप्राकृत व निर्विकार असून विकारी का दिसतो व विकारी जीवांसारखे वर्तन का करतात याचे उत्तर पुढील दोन चौपायांत आहे.

**चौ. ६ - (१) धृत नरतनू संत सुरकाजा** - मागल्या छंदांत म्हटले की 'सुरकाजिं नृपति तनुधर' येथे संतकार्याचा उल्लेख प्रामुख्याने केला. छंदांत सांगावयाचे राहिले होते ते येथे सांगितले. अवतारहेतु सारांशाने सांगितला. 'अवतारहेतुकथन' प्र. पृष्ठ ३५५ पहा. (क) कृति वच जशिं कीं प्राकृत राजा - प्राकृत = अष्टधाप्रकृतिनिर्मित, गुणभूतमय. याने सांगितले की आपला देह प्राकृत नाही. पण योगमायासमावृत असल्याने प्राकृतासारखा दिसतो, वाटतो. तसा तो समजला जावा म्हणून प्राकृत राजाप्रमाणे तुम्ही वागता. हा योगमायेचा पडदा रामकृपेने ज्यांच्या दृष्टीसमोरून दूर होतो त्याच ज्ञानी भक्तांस मर्म कळते. शृंगवेरपुरच्या नावाड्यास कळले पण भृगुपतींस कळले नाही. मंदोदरीला कळले पण रावणाला कळून वळले नाही. कळूच दिले नाही तर कसे कळणार?

**चौ. ७ (१) चरित ऐकुनि पाहुनि सुख बुधांस जड जाती मोहुनि** - चरित = बोलणे - चालणे क्रिया, कर्म करणे इत्यादी सुगम, दुर्गम अशा सर्व लीला. मोह होणे म्हणजे राम परमात्मा भगवान ब्रह्म आहेत असे न जाणता ते मनुष्य, राजपुत्र, जीव आहेत इत्यादी प्रकारच्या भावना उत्पन्न होणे.

(२) जड कोण बुध कोण हे ठरविणे जितके सोपे वाटते तितके ते नाही; फार कठीण आहे. प्रभुचरित्र पाहून किंवा ऐकून ज्यांना मोह होतो ते जड व ज्यांना सुख होते ते बुध असा अर्थ करणे जरूर आहे. बुध = संत, साधु १।१०।६; १।१५।७-८ पहा. शंकरच 'वदले हसुनि महेश तैं कोणि मूढ ना

ज्ञानि । **रघुपति करि जैं ज्या जसा होइ** तसा तैं प्राणि' (१।१२४।टी.प.) 'अति **विचित्र रघुपति चरित** जाणे, परम सुजाण ।। जे मतिमंद विमोहवश धरिति **कहिं हृदिं** आन' (१।४९।टी.प.) अति विचित्र रघुपति चरित्र जो जाणे तोच परम सुजाण असाच अर्थ यांत शेवटी करावा लागला आहे. 'उमे रामगुण गूढ पंडित मुनि पावति विरति ।। पावति मोह विमूढ जे हरि विमुख न धर्म रति' (३ मं.सो.) 'निर्गुणरूप सुलभ अति' 'निर्गुणरूप सुलभ अति सगुण न जाणे कोणि । सुगम अगम चरितां श्रवुनि' जाती मुनिहि भुलोनि' (७।७३) 'बघ बघुनी तुमच्या आचरणा । होइ मोह मम हृदयिं पार ना' (७।४८।४) असे वसिष्ठ म्हणाले आहेत. भरद्वाज महाज्ञानी होते, सती ज्ञानी होती, गरुड महाज्ञानी, भगवंताचे वाहन, हरिभक्त होता. लोमशांच्या वरदानाने व आकाशवाणीने भुशुंडी महाज्ञानी रामभक्त होते. तरी या सर्वांस रामचरित्र, रामलीला पाहून मोह, महामोह झाला. वसिष्ठ स्वतः सांगतात की त्यांना अनेक वेळा मोह होत होता. ब्रह्मदेवांची तीच दशा; म्हणून निष्कर्ष हा की रामकृपेने ज्यांचे, ऐश्वर्य ज्ञान कधी नष्ट होत नाही व प्रभु नरनाट्य करीत आहेत ही स्मृति जागृत राहते तेच ज्ञानीभक्त बुध. **'धृत नरतनू संतसुरकाजा । कृति जशिं कीं प्राकृत राजा' ही स्मृति ज्यांची नष्ट होत नाही ते बुध व इतर सर्व जड, मूढ असा अर्थ करणे भाग आहे.** अन्यथा या चक्रव्यूहातून सुटणे अशक्य आहे. वरील सर्व अवतरणांचा व उदाहरणांचा समन्वय केवळ या एकाच अर्थाने होऊ शकतो व १।१२४ रा व १।४९।- त्यांच्याशीही समन्वय होतो. येथे ज्यांना बुध म्हटले त्यांनाच परम सुजाण, पंडित मुनि, प्रवीण, संत, साधु असे निरनिराळ्या ठिकाणी म्हटले आहे. या दोन चौपाया फार महत्त्वाच्या आहेत.

**चौ. ८ - (१) योग्यचि तुमचें वचन वागणें - नाचणें** - आपण मला जे विचारले व जे लीला चरित्र करीत आहात ते अगदी योग्यच आहे. कारण आपल्या स्वतःच्या आचरणाने धर्ममार्ग दाखवून 'श्रुतिसेतुपालन' करण्यासाठी 'खलनिशाचर संहार' नाटकांत आपण नृपतिरूप घेतले आहे. जसे जे रूप, सोंग घेतले असेल तसे आचरण, व्यवहार, भाषा, चरित्र करण्यातच शोभा व यशकीर्ति लाभ असतो. **(क)** मुनिनाथांच्या बोलण्यातील भाव हा आहे की आपल्या

कृपेनेच मी आपल्याला ओळखले आहे हे जाणूनसुद्धा आपण मला स्थान विचारता तेव्हा सांगावे तर एका दृष्टीने उद्धटपणा व न सांगावे तर दुसऱ्या दृष्टीने कर्तव्यच्युति अशा अडचणींत मी पडलो आहे. तेव्हा सांगितलेच पाहिजे का ठिकाण? (ख) येथपर्यंत **त्रिविध रामरूपाचे थोडक्यात सुंदर सर्वांगपूर्ण विवेचन केले** पण रामरूपाची व्याप्ति सांगावयाची राहिली आहे ती आता दोह्यात मधुर विनोदी प्रश्नाने न सांगता सांगतात.

*हिं.दो.* ***। पूँछेहु मोहि कि रहौं कहँ मैं पूँछत सकुचाउँ ।***
***॥ जहँ न होहु तहँ देहु कहि तुम्हहि देखावौं ठाउँ ॥१२७॥***

*म.दो.* ***। राहुं कुठें पुसलेंत मज संकोच किं पुसण्यास ॥***
***॥ जिथें नसां तें वदा स्थळ मग सांगूं स्थानास ॥१२७॥***

**अर्थ** - कुठे राहू असे आपण मला विचारलेत, मला विचारण्यास संकोच वाटतो की जिथे आपण नसाल ते स्थान मला सांगावे म्हणजे मी (आपणास राहण्यास) स्थान सांगेन.॥दो.१२७॥

**टीका.** (१) छंदांत आधिदैविक स्वरूपाचे वर्णन केले. नंतर सोरठ्यात आध्यात्मिक स्वरूपाचे वर्णन केले व त्यानंतर मागील चौपाईपर्यंत मुख्यतः रामाच्या आधिभौतिक स्वरूपाचे वर्णन केले. आता या दोह्यापासून स्थान सांगण्यास प्रारंभ होतो. **या दोह्यांत आध्यात्मिक दृष्टीने स्थान सांगितले आहे. पुढे १२८।३ पासून १३१ अखेर आधिदैविक दृष्टीने व १३२।२ - १३२ पर्यंत आधिभौतिक दृष्टीने स्थान सांगतील.**

(२) **राहुं कुठें पुसलेंत मज** - आपण परमात्मा सर्व समर्थ असून मला एका अल्पज्ञ जीवाला स्थान विचारलेत; त्यांत आपल्याला कमीपणा वाटला नाही व संकोच वाटला नाही की मी भगवान व हा मुनि एक जीव, याला कसे विचारावे? पण मी आपणांस ओळखले असल्याने आपल्याला स्थान सांगण्यास मला संकोच वाटतो; कारण की अमुक ठिकाणी रहा असे म्हटले तर अर्थ होईल की तेथे तुम्ही पूर्वी नव्हता व काही काळानंतर तेथे नसाल; म्हणजेच (आपले स्वरूप) आपण, सर्वव्यापक नसून देशकालपरिच्छिन्न आहात असे ठरेल. आपण जेथे नित्य निरंतर रहात नाही असे एकही स्थान मी अल्पज्ञ असल्यामुळे मला तरी

माहीत नाही. मग मी कसे बरे सांगू की अमक्या ठिकाणी जाऊन रहा म्हणून? तेव्हा आता एकच उपाय आहे तो हा की आपण जेथे सतत रहात नाही अशी जी स्थाने आपणास माहीत असतील ती सांगावी. म्हणजे त्यांतले आपणास यापुढे राहण्यास कोणते योग्य ते मी सांगू शकेन. प्रभूच्या निर्गुणनिराकार व सगुण निराकार स्वरूपाची सर्वव्यापकता या प्रमाणे अति प्रेमळ, विनम्र पण विचित्र रीतीने सुचविली आहे. **येथे चित्रोत्तर अलंकार आहे.**

(३) रामवाल्मीकि भेटीची कथा वा.रा.मधे नाही, अ.रा. आहे. तेथे व येथे स्थान विचारणे व सांगणे या गोष्टी सारख्याच असल्या तरी येथील भावभक्तिरसाचा ओलावा व काव्य सौंदर्य अ.रा. नाहीत. खाली अगदी संक्षिप्त तुलना केली आहे.

| अध्यात्म रामायण सर्ग ६ | मानस चालू प्रकरण (१२५/६ - १२७) |
|---|---|
| १. राघवः प्राञ्जलिः प्राह वाल्मीकिं विनयान्वितः ॥ पितुराज्ञाम् पुरस्कृत्य...भवन्तो यदि जानन्ति किंवक्ष्यामोऽत्र कारणम् ॥ | रघुपति तदा जुळुनि करकमलें 'तात-वचन नी मातृहित... ॥१२५॥ तुम्हीं त्रिकाल दर्शी मुनिनाथा । विश्व बदरसम तुमचे हाता. |
| २. यत्र मे सुखवासाय भवेत्स्थानं वदस्वतत् ॥ सीतया सहितः कालं किंचित्तत्र नयाम्यहम् | अतां जिथें प्रभु आज्ञा देतिल। मुनि उद्वेग न कोणि पावतिल ॥... असं मनिं जाणुनि थळ सांगावें । सह सौमित्रि... काहिं काळ करुं वास कृपाला ॥१२६।१-६ पहा. |
| ३. त्वमेव सर्वलोकानां निवास स्थानमुत्तमम् तवापि सर्वभूतानि निवास सदनानि हि ॥ | संकोच किं पुसण्यास ॥ जिथे नसां तें वदा स्थळ मग सांगूं स्थानास ॥१२७॥ |

राम स्वरूपाचे त्रिविध वर्णन, सहजासहजी क्षत्रिय-धर्माचे दिग्दर्शन, साक्षात्काराचे सरळ व मुख्य साधन इत्यादी अनेक गोष्टी अ.रा.मधे नाहीत. येथील दोघांचेही प्रेम, लीनता व भावोत्कर्ष तेथे नाही. ते वर्णन शुष्क, नीरस

व काव्यसौंदर्यहीन आहे. विस्तार वाचक करतील.

हिं. *। सुनि मुनि बचन प्रेम रस साने । सकुचि राम मन महुँ मुसुकाने ॥१॥*

*। बालमीकि हँसि कहहिं बहोरी । बानी मधुर अमिय रस बोरी ॥२॥*

म. *। ऐकुनि वचना प्रेमरसमया । राम संकुचित, सस्मित ह्रदया ॥१॥*

*। हसुनि पुन्हा वाल्मीकी वदले । वचन सुमधुर सुधारस-भलें ॥२॥*

**अर्थ** - (मुनींचे) प्रेमरसमिश्रित वचन ऐकून रामचंद्रांस संकोच वाटला व त्यांनी मनात स्मित केले.॥१॥ वाल्मीकी हसून पुन्हा अमृतरसाने भरलेले फार मधुर असे बोलू लागले.॥२॥

**टीका. चौ. १-२ (१) 'साधु साधु वदले ज्ञानी मुनि'** हा मुनिवरांच्या पहिल्या भाषणाचा उपक्रम आहे. येथे **'ऐकुनि वचना'** शब्दांनी त्याचा उपसंहार दाखविला. **प्रेमरसमय =** प्रेमरसप्रचुर, प्रेमरसमिश्रित. पुढील भाषणाला अमृतरसाने भरलेले व मधुर म्हटले आहे व सुचविले आहे की प्रेम = अमृत. **'प्रेम अमृत** मंदर विरह...' (२।२३८) म्हणजे हे पहिले भाषणसुद्धा अमृतमय मधुरच आहे हे ठरते. **(क) राम संकुचित** - आपल्या मुखावर वनिता बंधूंच्या देखत स्वतःचे महत्त्व ऐकावे लागले. म्हणून संकोच वाटला. 'स्वगुण कानिं पडतां संकोचति' (३।४६।१) हे संतलक्षण प्रभूंनीच सांगितले आहे. येथे हा उल्लेख नसता तर 'पर-उपदेशिं कुशल बहु असती । आचरती ते नर बहु नसती' (६।७८।२) अशा परोपदेशकुशलांच्या वर्गात रामाची गणना झाली असती ! कवीची सावधानता वाखाणण्यासारखी आहे. संकोच वाटला म्हणजे मान खाली घातली. 'सहज सरूप (स्वरूप) कथा मुनि **बरनत रहत सकुचि सिर नाई'** (बि.प. १६४।५) या प्रसंगाला उद्देशूनच हे वचन आहे. **(ख) सस्मित ह्रदया** - हे ऐश्वर्य भावातील स्मित आहे. स्मिताचे कारण मुनींचे अलौकिक प्रेम आहे. **'प्रीति अलौकिक बघुनि, मनिं रघुकुलमणि हसतात.'** (१।२६५)

(२) **हसुनि वाल्मीकी वदले** - रघुनाथांनी संकोचाने मान खाली घातलेली पाहून हसू आलेच पण आता विनोदानेच बोलणार असल्यानेही हसू आले, असे सहजच घडते. सुधारस भरले - सुचविले की भक्तिरसाने भरलेले भक्तिविषयीच पण फार प्रेमाने बोलणार आहेत.

# रामलक्ष्मणसीता-निवासार्थ चौदा भवनें

## प्रथम भुवन - कथा श्रवणरति (१२८।३-५)

हिं. *। सुनहु राम अब कहउँ निकेता । जहाँ बसहु सिय लखन समेता ॥३॥*
*। जिन्ह के श्रवन समुद्र समाना । कथा तुम्हारि सुभग सरि नाना ॥४॥*
*। भरहिं निरंतर होहिं न पूरे । तिन्ह के हिय तुम्ह कहुँ गृह रूरे ॥५॥*

म. *। राम अतां श्रुणु सांगुं निकेतन । तिथे वसा सह सिता लक्ष्मण ॥३॥*
*। श्रवण जयांचे समान अर्णव । नाना सरिता सुभग कथा तव ॥४॥*
*। भरति निरंतर पूर्ण न होती । त्यांचें ह्रदय तुम्हां शुभ वसती ॥५॥*

**अर्थ** - राम आता निवासस्थान (निकेतन) सांगतो, ऐका ! व तेथे सीता व लक्ष्मण यांच्यासह रहा.॥३॥ ज्यांचे कान (श्रवण) सागरा (अर्णवा) सारखे आहेत व तुमच्या सुंदर, कथारूपी, पावन सरिता असून - ॥४॥ त्या निरंतर ज्या सागरांस भरीत असतात पण जे (कधी) पूर्ण होत नाहीत; त्यांचे ह्रदय तुम्हाला चांगले वसतिस्थान (घर, निकेतन) आहे.॥५॥

**टीका. चौ. २ -** (१) रामचंद्रांनी विचारले की असे स्थान सांगावे की जिथे सीतासौमित्रीसह जाऊन काही काळ राहू - त्यावर ही चौपाई सरळ उत्तर आहे. हसू येण्याचे कारण येथे स्पष्ट दिसते. या चौपाईतील शब्द कानी पडताच ऐकणारास वाटणार की आता एखादे जवळपास असलेले सुंदर सुखद स्थान सांगणार पण बोलणाराचा हेतु बाह्यस्थान सांगण्याचा नसून अगदी निराळेच स्थान सांगण्याचा आहे. दोन्ही गोष्टी बोलणाराच्या मनात असल्यामुळे हसू आले. सांगतात की मी स्थान सांगतो पण तेथे तुम्ही तिघांनी जरूर राहिले पाहिजे.

**सूचना** - पुढील वर्णनांत जेथे तिघांच्या नावांचा उल्लेख नाही तेथे या चौपाईच्या आधारे ही तीन नावे किंवा यांपैकी ज्यांचा उल्लेख नसेल ती गृहीत धरली पाहिजेत. (क) राम सर्वांच्याच ह्रदयात आहेत पण अव्यक्त, निराकार रूपाने असल्यामुळे जीवांच्या अविद्यादि क्लेशांचा नाश होत नाही व जीव सदा दुःखी असतात म्हणून सांगतात की या सगुण साकार रूपाने रहा. **शंका** - सर्वांच्याच ह्रदयांत रहा असे का नाही सांगितले? जेथे रहावयाचे ते स्थान

निदान पावन व मनोहर पाहिजे. आजूबाजूच्या लोकांस राहणारांचा व राहणारांना लोकांचा त्रास उद्वेग वाटता उपयोगी नाही. म्हणून ज्या प्रकारचे स्थान विचारले त्या प्रकारची १४ स्थाने, चौदा भवने, आता मुनि सांगणार आहेत. हे भक्तीचे व भक्तांचे स्थूल वर्गवारीने चौदा प्रकार आहेत. ब्रह्मांण्डांत जशी १४ भुवने आहेत तसेच १४ प्रकारच्या भक्तांचे वर्णन आहे. चौदा प्रकारच्या भक्तांची दिलेली लक्षणे अगदी पूर्णपणे स्वतंत्र, इतरांचा संबंध अगदीसुद्धा नसलेली आहेत असे नाही. हे चौदा प्रकार क्रमशः प्रत्येक सोपानात दोन या प्रमाणे सात काण्डांत आढळतात. एका प्रकारचे उदाहरण पूर्वार्धात व दुसऱ्या प्रकारचे काण्डाच्या उत्तरार्धात अशी आहेत, हे विशेष आश्चर्य आहे. पंचज्ञानेंद्रियांपैकी श्रवणेंद्रियांचा उपयोग प्रथम सांगतात.

**चौ. ४-५ (१) श्रवण जयांचे समान अर्णव । नाना सरिता सुभग कथा तव** - सागरात अनेक लहान-मोठ्या नद्या येऊन मिळतात व त्या रात्रंदिवस, अखंड आपल्या जलाने सागर भरण्याचा प्रयत्न करीत असतात. पण सागर परिपूर्ण भरला व त्याचे पाणी मर्यादा उल्लंघन करून वाहू लागले असे कधीच घडत नाही. तृप्तीची ढेकर तो कधी देत नाही; पुरे, आणखी नको असे खुणेने सुद्धा दाखवीत नाही. हा जसा सागरगामी महानद्यांचा व सागरांचा संबंध तसाच. **(क) श्रवण =** कान व रामकथा यांचा संबंध जेथे असेल त्या व्यक्तीचे हृदय तुम्हाला तिघांना राहण्यास सुखसोयींचे स्थान, घर आहे. म्हणून अशा हृदयांत तुम्ही तिघांनी रहावे. तुमच्या कथा (कथा तव) शब्दांनी सगुण भगवंताच्या कथा असा अर्थ होतो; निर्गुणाच्या कथा असू शकत नाहीत. निर्गुणाचे निरूपण कहाण्यांच्या योगे करता येते. म्हणूनच ज्ञानदीप प्रकरणाचा उपक्रम 'अकथ कहाणी' शब्दांनी केला आहे. **(ख) सुभग =** सुंदर, हे विशेषण सरिता व कथा या दोहोंकडे घेणे जरूर आहे. येथे रूपक अलंकार आहे. सुंदर कथासरितेत कोणते गुणधर्म पाहिजेत हे बा.कांडांत कथा शरयू रूपकांत सांगितले आहे. **'निघे सुभग कविता सरिता ती'** (१।३९।१) पासून १।४३।१ पर्यंत आहे. त्यांत रामकथा सरितेच्या सुभगतेचे वर्णन आहे ते पहावे. तशा प्रकारच्या सुंदर हरिकथा कितीही ऐकल्या तरी ज्यांची तृप्ती होत नाही, फार श्रवण केले, आता पुरे,

आणखी नको, असे ज्यांस कधी वाटत नाही, त्यांच्या श्रवणांत जे काळवेळ इत्यादींचा विचार करीत नाहीत व सुभग हरिकथा कोणाच्याही मुखांतून कानात पडल्या तरी सुखच वाटते; अशी सतत, अखंड हरिकथा श्रवणाची गोडी ज्यांना लागली असेल त्यांचे हृदय वाल्मीकी म्हणतात तुम्हाला राहण्यास चांगले घर आहे. कारण की सुभग हरिकथा श्रवणाने पाप, ताप, शोक, संताप, कामक्रोधादि सर्व विकार नष्ट होऊन ते हृदय परम, पावन निर्मल व सुंदर झालेले असते. रामकथाप्रभाव **'श्रीरामचरितमानसाचा प्रभाव' प्र. पृ. ४४ पहा.**

(ग) **मात्र येथे श्रवण सांगितले आहे, पठण नव्हे, हे नीट ध्यानात ठेवावे.** (घ) **शंका** - तिघांनी राहण्यात प्रयोजन काय? राम = ज्ञान, लक्ष्मण = वैराग्य व सीता जानकी = शान्ति, भक्ति, एकत्र असतील तरच दुःखशोकरहित नित्यसुख मिळेल; म्हणून तिघांचा उल्लेख केला. (ड) या पहिल्या प्रकाराची उदाहरणे पहिल्या (बाल) काण्डाच्या पूर्वार्धात प्रथम भरद्वाज व नंतर उमापार्वती ही आहेत. भरद्वाज तर श्रवणात इतके 'मग्न झाले आहेत की कुठे हुं हुं ! सुद्धा करीत नाहीत. ग्रंथाच्या उपसंहारांत भरद्वाजांची जबानी नाही. पार्वतीने आपल्या जबानीत तृप्ति न झाल्याचे स्पष्ट सांगितले आहे. **'स्रवत नाथ आनन शशी कथासुधा रघुवीर ॥ श्रवणपुटीं पिउनियां मन तृप्त नसे मतिधीर'** (७।५२।म) **'रामचरित ऐकुनि जे धाती। त्यां न कळे रस विशेष जाती'** (७।४३।१) **असे पार्वतीच म्हणते. रामलक्ष्मण व सीता हृदयांत येऊन राहीपर्यंतचा परमार्थाचा सर्व सोपान केवळ रामकथाश्रवण या एका साधनाने सहज सुखाने चढता येतो हे येथे सांगितले.**

*हिं. । लोचन चातक जिन्ह करि राखे । रहहिं दरस जलधर अभिलाषे ॥६॥*
*। निदरहिं सरित सिंधु सर भारी । रूप बिंदु जल होहिं सुखारी ॥७॥*
*। तिन्ह कें हृदय सदन सुखदायक । बसहु बंधु सिय सह रघुनायक ॥८॥*
***म. । लोचन चातक करुनी राखति । जे दर्शन - जलधर अभिलाषति ॥६॥***
***। सर सरिता सागरीं निरादर । रूप-बिंदुजल मिळत सुखाकर ॥७॥***
***। त्यांचें हृदय सदन सुखदायक । वसा स-सीतानुज रघुनायक ॥८॥***

**अर्थ** - ज्यांनी आपल्या लोचनांना चातक करून ठेवले आहेत व ज्यांना तुमचे दर्शनरूपी जलधराची (मेघाची) च अभिलाषा आहे.॥६॥ व जे तलाव

नद्या व सागरांसारख्या जलाशयांचासुद्धा अनादर करतात; पण तुमचे रूप (दर्शन) रूपी एक जलाचा बिंदु मिळताच जे सुखसागर (सुखकर) बनतात.॥७॥ त्यांचे हृदय रघुनायका ! तुम्हाला सुखदायक सदन आहे. तेथे तुम्ही सीता व बंधु (लक्ष्मण) यांसह निवास करावा.॥८॥

**टीका. भवन दुसरे - (१) चातक** पक्षी एकांगी प्रेमाचे उत्कृष्ट उदाहरण आहे. दोहावलीत चातक छत्तीसा हे २७७-३१२ = ३६ दोहे चातकाच्या प्रेमाचे व स्वभावाचे सविस्तर वर्णन करणारे आहेत. **'एक भरवसा एक बल एक आस विश्वास ॥ एक राम घनशाम हित चातक तुलसीदास'** (२७७) चातकाच्या चरित्राकडे पाहिले म्हणजे वरील चौ. (६-७) मधील भाव प्रगट होतील. चातक आपली चोंच वर करून नेहमी मेघाच्या दर्शनासाठी पिऊऽऽ पिऊऽऽ करीत ओरडत असतो. स्वाती नक्षत्रांतील मेघांतले काही थेंब चोचींत पडले की तो तेवढ्याने अत्यंत सुखी होतो. ते मिळविण्यासाठी तो आपली मान कधी खाली करीत नाही की तिरपी वळवीत नाही. बाकीच्या सर्व नक्षत्रांत जरी सतत पाऊस पडला तरी तो आपली चोच उघडणार नाही. स्वातीचे मिळाले तरच जल तोंडात घेईल. या त्याच्या मानी किंवा हट्टी स्वभावामुळे रागावून मेघांनी कडकडाट केला, विजा पाडल्या, गारांचा वर्षाव करून त्याचे पंख छिन्न छिन्न केले तरी तो आकाशाकडे बघत मेघावर प्रेमच करीत राहणार. ते त्याचे प्रेम कधीही जरासुद्धा कमी होत नाही. तृषेने प्राण जात असले तरी मरेल पण स्वातीच्या मेघांतील जलाशिवाय इतर जलाचा थेंबसुद्धा तोंडात पडू देणार नाही. मरत असता वायूने त्यांस परम पावन भगीरथीच्या जलांत पाडला तरी तो त्यातून बाहेर येऊन मरेल. उडताना कितीही थकला तरी इतर नक्षत्रांतील जलाने वाढलेल्या वृक्षांचा व त्यांच्या छायेचा सुद्धा आश्रय करणार नाही; कडकडीत उन्हात पडेल. स्वातीजलाचासुद्धा संग्रह करणार नाही.

**'ना मागत ना संग्रही ना शिर नमवुन घेत ॥ ऐशा मानी चातका कोण जलद विण देत'** ॥२९०॥ (दोहा)

(२) ही जशी चातकांची स्थिति तशीच ज्यांनी आपल्या नेत्रांची करून ठेवली आहे. ज्यांचे नेत्र आपल्या इष्ट-स्वरूपाच्या दर्शनाशिवाय इतर कोणाच्याही

व कशाच्याही दर्शनाने किंवा लाभाने कधी शीतल होत नाहीत; आपल्या इष्ट देवतेच्या इष्ट स्वरूपाचेच जे ध्यान करीत असतात; तसे दर्शन न देता विविध तापांचा कितीही वर्षाव केला, कितीही दुःखे कोसळली तरी ज्यांची रूपदर्शन लालसा जरासुद्धा कमी न होता वाढतच जाते. फार काळ गेला, हा देव प्रसन्न होऊन दर्शन देत नाही असे पाहून जे कधी इतर देवांची अपेक्षा मनातसुद्धा करीत नाहीत. देव फार निष्ठुर निर्दय आहे, इत्यादी कुकल्पना स्वप्नातसुद्धा मनात येत नाहीत. देवा ! 'किती अंत पाहशी प्राणांत मांडियेला' असे सुद्धा ज्यास कधी वाटत, म्हणत नाहीत. देव दर्शन देत नाही म्हणून आत्महत्या, प्रायोपवेशन इत्यादी तामसी साधनांचा विचारसुद्धा करीत नाहीत, एका विशिष्ट रूपावरच प्रेम करणे हा ज्यांचा स्वभाव बनला आहे, अशांना रूपदर्शनाशिवाय इतर काहीही प्रेमाच्या मोबदल्यात नको असते. इतर काही दिले तरी घेत नाहीत. इष्ट देवतेच्या इष्ट स्वरूपाचे दर्शन अल्प काळ झाले तरी जे परमसुखी होतात, पण पुन्हा दर्शनाची लालसा चातकाप्रमाणे कमी होत नाही अशा अनन्यगतिक, पूर्ण निष्काम प्रेम करणारावर प्रभु राम कृपाधाम, का बरे प्रेम करणार नाहीत? ते त्याला कसे दूर ठेवतील? काही वेळ 'कृपाळूपणे अल्पधारिष्ट' पाहणारच.

(३) **सर सरिता सागरीं निरादर** - निरादर करतात म्हणजे मुळीच आदर वाटत नाही. त्यांची काहीच किंमत वाटत नाही. सिंधु-सागर = समुद्रासारखे गोड्या पाण्याचे जलाशय असाच अर्थ करणे भाग आहे. कोणतेच पशुपक्षी जीवजंतु पाणी पिण्याच्या आशेने सागराची - लवणसिंधूची अपेक्षा करीत नाहीत. **(क) सर सरिता सागर म्हणजे काय? सर = अर्थ व काम, सरिता =** सागरगामी नदी = **धर्म** व **सागर = मोक्ष** - कैवल्य, सायुज्य. काही तलावांतून - सरोवरांतून नद्या उगम पाऊन सागरास जाऊन मिळतात. अर्थ व धर्म-अविरोधी काम यांच्या साह्यानेच धर्माचरण घडते; धर्मरूपी सरिताच जीवाला मोक्षरुपी सागरात घेऊन जाते. 'विरतिस धर्म योग दे ज्ञाना । ज्ञान मोक्ष दे श्रुति करि गाना' (३।१६।१) 'सरिताजलजल निधिमधिं जाउनि । होइ अचल जिव इव हरि पाउनि' (१४।८ टी.प.) यांत मोक्षप्राप्तीच सांगितली आहे. पण... 'हरिभक्त विचक्षण । भक्ति लुब्ध करि मुक्ति उपेक्षण' (७।११९।७) जेथे अनन्य एकांगी प्रेमाला भरताने

चातकाच्या प्रेमाची उपमा दिली आहे तेथे आधी म्हटले आहे की '**अर्थ न धर्म न काम रुचि नको गतिहि निर्वाण** । जन्म जन्म रति रामपदिं हे वरदान न आन' - (२।२०४) असे वरदान प्रयाग राजाजवळ मागितल्यावर मग भरत म्हणतात - '**सीताराम चरणरति अनुपम । तुझ्या कृपें वाढो अनुदिन मम ॥२॥ न करो स्मरणा जलद जन्मभर । जल याचत पवि वर्षी प्रस्तर ॥ चातक-घोष घटे तर दूषण । प्रेम वाढतां सर्व भलेपण ॥४॥** (२०५) **यावरून खात्री होईल की अर्थ, काम, धर्म व मोक्ष (निर्वाण) म्हणजेच सर सरिता सागर** हाच अर्थ श्री तु.दासांस अभिप्रेम आहे.

(४) **रूपबिंदुजल मिळत सुखाकर** - इतर देवांचे दर्शन म्हणजे इतर ऋतूंतील वृष्टि ही तर चातकास मुळीच नको असते. शरदांतील मेघ म्हणजे नारायण, विष्णु, कृष्ण, व्यंकटेश इ. विष्णुदेवतांची रूपे. स्वातीचा मेघ म्हणजे राम घनश्याम - स्वातीच्या मेघांतून अनेक बिंदूंची-थेंबांची वृष्टी होत असते. पण चातकाला तेवढी नको असते; त्याच्या चोचीत एकच बिंदु पडला तरी तेवढ्याने तो सुखी होतो. रामचंद्रांची कितीतरी भिन्न भिन्न रूपे मानसांतच वर्णिली आहेत. त्यांतील काही नमुने पहा : अवताररूप, (१।१९२) शिशुरूप (१।१९९); बालकेलिरूप (१।२०३); किशोररूप (१।२१०) अहल्योद्धारक राम, (१।२११); जनकपुरीनिरीक्षक राम (१।२१९); पुष्पवाटिकानिरीक्षक राम (१।२३३) भवधनुभंजक राम (१।२४३।२४४) भृगुपतिमदमर्दक राम, वरवेषधारी, सप्तपदीविधिकर्ते, जटाहीन मुनिवेषधारी, जटाधारी मुनिवरवेष, वनमार्गस्थ, जटायुवत्सल, पर्णकुटीस्थ, कपिशिरिंपाणिसरोज धारक, त्रिकूटशैलासीन, रणाजिरविहारी, दिव्यरथस्थ, रावणप्राणहारी, पुष्पकगामी, सिंहासनस्थ इ. शतशः भिन्न रूपे हेच स्वातीचे शतशः बिंदू होत. यांतील एखाद्या ठराविक बिंदूच्या प्राप्तीचीच - दर्शनाचीच त्याची इच्छा असते व ते दिसल्याशिवाय त्याचे नेत्र शीतल होत नाहीत.

**चौ. ८ (१) त्यांचें हृदय सदन सुखदायक** - **ल.ठे.** - या चौदा भवनांच्या वर्णनांत कुठे शुभ = चांगले, घर, कुठे सुखदायक सदन, निजगेह, मंदिर वगैरे वापरलेली बहुतेक सर्व विशेषणे प्रत्येक ठिकाणी गृहीत धरणे आवश्यक आहे. **शुभ** = पवित्र, सत्य अहिंसादियुक्त. **सुखदायक** = विशाल, विस्तृत,

अपमानतिरस्कारादि रहित, सांप्रदायिक अभिमान द्वेषादि विरहित. **निजगेह** = निःसंकोचता, सरलता, आत्मीयता, प्रेमळपणा जेथे राखता येईल असे. **मंदिर** = एकान्त, स्वच्छंता, विश्वास, श्रद्धापूर्ण अहंता ममता रहित, अन्य विषय चिंतारहित असे पूजा, भजन, कीर्तनादी करण्याचे स्थान. **(क)** प्रत्येक ठिकाणी सर्व विशेषणे देणे शक्य नाही व पुनरुक्ति दोषही टाळला पाहिजे म्हणून हृदय सदनाची उपलक्षणे अशी विभागून सांगितली आहेत. सर्व विशेषणे प्रत्येक ठिकाणी नसल्यामुळे कोणी असे समजू नये की 'शुभसदन'च म्हटले म्हणजे ते सुखदायक नाही, म्हणून ते कमी प्रतीचे व 'निजगेह' म्हणून ते या दोन्हीपेक्षा श्रेष्ठ असे वाटणे व अर्थ काढणे हा मोठा अनर्थ ठरेल. चौदा प्रकारांत श्रेष्ठ-कनिष्ठ मध्यम अशी विभागणी नाही. सर्व प्रकार सारख्याच योग्यतेचे आहेत. या प्रमाणे दुसरे भवन सांगितले.

(२) भरत जरि चातक जातीचे भक्त आहेत तरी ते रूपासक्त नाहीत. ते प्रेमासक्त आहेत. सुतीक्ष्ण जरी चतुर्भुज रूप दिसताच घाबरा झाला तरी तो नुसत्या रूपावर आसक्त नाही. **या प्रकारांची उदाहरणे बा.कांड उत्तरार्धात, मनुशतरूपा, दशरथ व जनकपुरीतील लोक ही आहेत.**

**(क) मनु - 'वसे निरंतर अभिलाषा मनिं । तो प्रभु परम पहावा लोचनिं'** (१|१४४|३) विधि हरि हर तप अपार पाहुनि । मनुसमीप बहु वेळा पावुनि ।। किती प्रलोभिति घ्या वर वदती । चाळवितां अति धीर न चळती ।। (१|१४५|२-३) हा सरसरिता सागरी निरादर. येथे खुणेचा शब्द **अभिलाषा** आहेच. **(ख) दशरथ** - 'स्वामि ! न देणें घडे राम मम ।। (१|२०८|१). 'प्रिये प्रवीण करुनि बघ चिंतन । **रामदर्शना** अधीन जीवन' (२|३३|३) दर्शन हा खुणेचा शब्द दोन्ही ठिकाणी आहे. 'अपयश मिळो सुयश जगिं जावो । मिळो नर्क वा स्वर्ग न पावों ।। दुःसह दुःख सकल मज देणें । रामा नेत्रां आड न नेणें ।। (२|४५|१-२) यांत सरसरिता सागर निरादर आहे. **(ग) जनकराजा** - 'यांस विलोकत मन अनुरागी । **ब्रह्मसुखहि** जबरीने त्यागी ।। (१|२१६|५) **(घ) मिथिला जन - 'रूप** बघुनि घ्या **नयनीं** भारी । प्रिय पाहुणे भूपसुत चारी ।।... 'मरणशील जशि सुधा पावतो । सुरतरु जन्मभुकेला लभतो ।। मिळे नारक्या हरिपद जैसें । **यांचें दर्शन**

आम्हां तैसें ॥ बघुनि राम शोभा किं उरिं धरा । निज मन फणि मूर्तीस मणि करा' (१।३३५।३-७) (ड) ल.ठे. **या भवनांत नेत्रेंद्रियांचेच कार्य मुख्यतः सांगितले.**

*हिं.दो.* ***। जसु तुम्हार मानस बिमल हंसिनि जीहा जासु ॥***

***॥ मुकताहल गुन गन चुनइ राम बसहु हियँ तासु ॥१२८॥***

*म.दो.* ***। यश तुमचें मानस विमल हंसिनि जिव्हा ज्याचि ॥***

***॥ मुक्ताफळ गुणगण टिपी राम रहा ह्रदिं त्याचि ॥१२८॥***

**अर्थ** - तुमचे निर्मल यश हे निर्मल मानससरोवर असून त्यांत ज्याची जिव्हा हंसिनी झाली व तुमचे गुणगण रूपी मुक्ताफळे जी टिपून-वेचून घेते, त्याच्या ह्रदयांत राम तुम्ही (सीता व लक्ष्मण यांच्यासह) रहाच ।।दो.१२८।।

**तिसरे भवन - टीका.** - (१) **यश तुमचें मानस विमल** - राम विमल यशाला येथे विमल मानस सरोवर म्हटले. मानसांतील जलाचे वर्णन पहा - 'वर्षति राम सुयश **वर बारी** । मधुर मनोहर मंगलकारी ।' 'तें जल पावन', 'सुखद, शीत, रुचि, चारु' (१।३६।४,८,९) **वर बारी = निर्मल जल.** हंस हंसिनी मानस सरोवरांत असतात व मानसांत मोत्यांच्या शिंपा असल्याचे पूर्वी 'युक्ती मंजुल मणि शिंपा या' (१।३७।४) असे सांगितले आहे. म्हणून येथे मानस सरोवराचे रूपक केले. (क) **हंसिनि जिव्हा** - जिव्हा स्त्रीलींगी असल्याने हंसिनी हा स्त्री लिंगी शब्द वापरला, बाकी हंसहंसिनी यांच्या स्वभावधर्मात व राहणीत अंतर नाही. जीभ हंसिनी आहे, पण सर्वांची नसते; हंसिनी जिव्हा असलेले फारच विरळा म्हणून येथे **जासु = ज्याचि** ज्याची हे एकवचन वापरले. पुष्कळांची जिव्हा बेडकी, काकी, जळू, बकी, लांडोर, गर्दभी वगैरे असते. जिव्हा म्हटल्याने वाणी-वाचा या कर्मेंद्रियांचे ग्रहण करण्याकडे वृत्ती वळेल; पण जिव्हा असून मुके असतात. म्हणजे जिव्हा हे वाचिंद्रिय नाही. ते रसनेंद्रिय आहे. हंसिनी मानससरोवरातील मोत्ये टिपून खातात व क्षुधाशमन करतात. हंसिनीच्या ठिकाणी नीरक्षीर विवेक असतो तर जिव्हेला इष्टानिष्ट रसांचे ज्ञान असते. भक्षिल्या जाणाऱ्या अन्नाला रसरूप करण्यात जिव्हा फार मोठी मदत करते.

(२) जिव्हारूपि हंसिनी रामविमलयशरूपी मानस सरोवरात बुड्या मारून त्यांतील मोत्यांच्या शिंपल्यांतील रामगुणसमूहरूपी मोत्ये टिपून खाते. खाताना

त्यांना रसरूप बनवून हृदयांत पाठविते. **'हरिपदरतिरस'** आहे. **'रामभक्तिरस'** (२।२०८) या प्रमाणे सद्‌गुणांचे व त्यातील रसाचे जीभ हळुहळु ग्रहण करू लागली म्हणजे **'जळ साचुनि सर हळुहळु भरती जसे सुगुण सुजनांमधि जमती'** (४।१४।७) (क) राम यशातील गुणगणांच्या ग्रहणाने त्या त्या गुणांनी व त्यांतील रसाने स्वतःचे मानस हृदय भरून टाकणे हे येथे मुख्य साधन आहे. गुणगण ग्रहण करण्यास प्रथम रामयशाचे - रामचरित्राचे - श्रवण पाहिजेच पाहिजे. केलेल्या श्रवणाचे मनन व निदिध्यासन करीत भगवद्‌गुण - चिंतनाने भक्तिरसांत मग्न होणे हे मुख्य साध्य आहे. यांत भगवद्‌गुण कीर्तनाचाही समावेश होऊ शकेल पण त्यासाठी कलहंसिनी असा हंसिनीचा अर्थ करावा लागेल. राजहंसिनी असा अर्थ घेतल्यास, गुणगान करीत नृत्य करणे असा अर्थ होईल. मानसांत हंस = नीरक्षीरविवेक प्रधान; कलहंस = गान प्रधान व राजहंस गतिप्रधान असा भेद केलेला आहे. येथे **प्रामुख्याने जिव्हा हे रसज्ञानेंद्रिय व गौणत्वाने वाणी हे कर्मेंद्रिय ग्रहण केले.**

(३) या तिसऱ्या प्रकारच्या भक्तांचे उदाहरण अयोध्याकाण्ड पूर्वार्धात अयोध्यावासी नरनारींचे आहे. या लोकांत रामचंद्रांच्या रूप, शील, बल, तेज, कृपालुता, सरलता इ. गुणांची चर्चा चालत असे व या विषयी बातमी दशरथांच्या कानांवरही येत असे. 'राम-रूप-गुण-शिला स्वभावा । बघुनि **परिसुनी** प्रमोद रावा' (२।१।८) अयोध्यावासी नरनारी रामगुणचिंतन कसे करीत असत याचा नमुना उत्तरकाण्डांत ३०।१ पासून दो. ३० पर्यंत आहे.

*हिं.* *। प्रभु प्रसाद सुचि सुभग सुबासा । सादर जासु लहइ नित नासा ॥१॥*
*। तुम्हहि निवेदित भोजन करहीं । प्रभु प्रसाद पट भूषन धरहीं ॥२॥*
*। सीस नवहिं सुर गुरु द्विज देखी । प्रीति सहित करि बिनय बिसेषी ॥३॥*
*। कर नित करहिं राम पद पूजा ॥ राम भरोस हृदय नहिं दूजा ॥४॥*
*। चरन राम तीरथ चलि जाहीं । राम बसहु तिन्ह के मन माहीं ॥५॥*

*म.* *। प्रभु - प्रसाद सुभग शुचि बासा । घेइ सदा सादर यन्नासा ॥१॥*
*। तुम्हां निवेदित भोजन करिती । प्रभू-प्रसाद वसन मणि धरिती ॥२॥*
*। बघत विप्र गुरु सुर शिर नमतें । प्रेमें बहु करुनी, विनतीतें ॥३॥*

*। कर नित करिति रामपद-पूजा । राम-भरवंसा हृदिं ना दूजा ॥४॥*
*। रामतीर्थि पदिं चालत जाती । राम करा मनिं त्यांच्या वसती ॥५॥*

**अर्थ** - ज्यांची नासा - (कान, घ्राणेंद्रिय) प्रभूच्या सुंदर व पवित्र प्रसादाचा सुवास (वास) नेहमी आदराने घेते.॥१॥ तुम्हाला निवेदन (समर्पण) केलेल्या पदार्थांचेच जे सेवन (भक्षण/भोजन) करतात आणि प्रभूचा प्रसाद म्हणून वस्त्रे भूषणे (मणि) वगैरे धारण करतात ॥२॥ देव ब्राह्मण व गुरु दिसतांच बहुत प्रेमाने प्रार्थना-विनंती करून ज्यांचे मस्तक सहज नमते.॥३॥ ज्यांचे हात नित्यकर्म व रामपदपूजा करतात व ज्यांच्या हृदयाला दुसऱ्या कोणाचा भरवसा न वाटता रामाचाच भरवसा वाटतो.॥४॥ व जे पायांनी चालत (अनवाणी) रामतीर्थास जातात; त्यांच्या हृदयांत-मनात राम ! तुम्ही (सीता व लक्ष्मणासहित) निवास करा.॥५॥

**चौथे भवन - टीका** - ल.ठे. - मागील तीन प्रकारांचे साधन व या चौथ्या प्रकारच्या भक्तांचे साधन पाहिल्यावर स्पष्ट दिसते की मागील तीन प्रकारांत फक्त एका, एका ज्ञानेंद्रियांचेच साधन सांगितले आहे व वर्णनसुद्धा २/२ ओळींतच आहे. येथे बरीचशी साधने एकत्र करून सांगितली आहेत. येथे वर्णन केलेले साधन बऱ्याच अंशाने भावनात्मक आहे व हे करण्यास फारसा वेळ मोडावा लागणार नाही. मागील तीन प्रकारांत सतत निरंतर श्रवण, निरंतर ध्यान व निरंतर गुणचिंतन असे एकेकच साधन असले तरी त्यांतील कोणतेही एक गृहस्थाश्रमी, व्यवहारांत, प्रवृत्तींत असणाऱ्या व्यक्तींस करता येण्यासारखे नाही. हे चौथ्या प्रकारचे साधन व्यावहारिक जबाबदाऱ्या शिरावर पुष्कळ, गृहत्याग करता येत नाही, वेळ अगदी थोडा अशा प्रपंचांतील माणसांस सहज करता येण्यासारखे आहे. यांत योग याग जप तप उपवास इत्यादी काही कष्ट नाहीत. भोगांचा त्याग आवश्यक नाही. फार काय नाम जपसुद्धा नाही; आणि फलप्राप्ती सारखीच ! रामभक्ति प्राप्ति व राम सीतालक्ष्मण यांचा हृदयांत निवास !

**चौ. १** - (१) मागील तीन प्रकारांत **श्रवण, नेत्र व रसना** या तीन ज्ञानेंद्रियांचा उपयोग क्रमशः सांगितला. येथे चौथे **घ्राणेंद्रिय** जे नाक त्याचा उपयोग सांगतात. नानाविध फुलांचे, फळांचे, अत्तरे, तेले इत्यादींचे सुगंध, सुवास घेण्यास मुळीच

हरकत नाही. मात्र हे सर्व भोगविषय मूळचेच पवित्र व सुंदर असावे. ते प्रभूला समर्पण करून, प्रभु श्रीरामाचा प्रसाद मानून, शिरसा वंदन करून खुशाल वापरावे, केवळ **भावनेचे कार्य आहे.**

**चौ. २ (१) तुम्हां निवेदित भोजन करिती** - जेवण्याखाण्याचे पदार्थ **प्रभूला नैवेद्य समर्पण करण्यास योग्य असे शास्त्रशुद्ध असले पाहिजेत.** एकभुक्तच करा, कंदमूळफळेच खा इत्यादी बंधन नाही. फक्त मुखांत घालण्याचा प्रत्येक पदार्थ, पाणीसुद्धा, आधी रामचंद्रास समर्पण केलेला पाहिजे. मुखशुद्धीचे तुलसीपत्र का असेना, रामार्पण केल्याशिवाय मुखांत जाता उपयोगी नाही. याला वेळ लागत नाही; फक्त त्या त्या वेळी स्मरण राहिले म्हणजे हे सहज घडते. (क) जे रामार्पण केले असेल ज्याचा नैवेद्य समर्पण केला असेल ते जिन्नस ज्या स्थितीत, ज्या चवीचे असतील तशाच स्थितीत ते भक्षण केले पाहिजेत. समर्पण केल्यानंतर चवीत बदल करून आपण खाणे किंवा आवडत नाहीत, बाधतील, म्हणून टाकून देणे मात्र घडता उपयोगी नाही. उदा. नैवेद्य समर्पण करून भोजन सुरू झाले, भाजी अळणी किंवा कडू लागली तरी मीठ किंवा साखर-गूळ घालून चविष्ट करून खाता नये किंवा कडू म्हणून टाकता नये. **जे रामाला अर्पण केले ते बाधेल कसे?** व प्रभूला आंबट, तिखट, खारट, अळणी, कडू वाटेल ते चालेल. आम्हाला मात्र चालणार नाही, हे भक्तीचे लक्षण नसून दांभिक भक्तीचे लक्षण आहे. हवी तर रोज पंचपक्वान्ने खा पण प्रभूला समर्पण करून, प्रभूचा प्रसाद मानून श्रद्धेने खा. **रसास्वाद हा जिव्हेचा विषय पवित्र व भक्तिमय कसा होतो हे येथे दाखविले.**

(२) **प्रभू-प्रसाद वसन मणि धरिती - स्पर्शविषयांचा व सौंदर्य वृद्धिकारक साधनांचा भक्तिमय उपयोग कसा करावा हे येथे सांगितले.** श्रीरघुनाथास समर्पण करून, रामाचा प्रसाद म्हणून प्रथम मस्तकी धारण करून, त्यांस वंदन करून वाटेल तितकी उंची, सुखकर, शोभावर्धक सुंदर वस्त्रे, अलंकार, भूषणे, शय्या, गाद्या, पलंग, पुष्पहार इत्यादी वापरण्यास हरकत नाही. असला प्रत्येक पदार्थ प्रभूला समर्पण करण्यास योग्य असा शास्त्रशुद्ध हवाच व प्रत्येक पदार्थ प्रभूचा प्रसाद आहे असे स्मरण भोग भोगताना राहिले म्हणजे झाले. **या चौपाईतील कार्यसुद्धा भावनात्मकच आहे.** (क) प्रत्येक ठिकाणी पहिल्या चौपाईतील शुचि व सादर हे

दोन शब्द घेतले पाहिजेत. दारू, भांग, गांजा इ. आम्हाला पाहिजेत म्हणून त्यांचा नैवेद्य समर्पण करून सेवन करणे 'शुचि' शब्दांत बसत नाही. असेच इतर सर्व पदार्थांचे समजावे. प्रसाद म्हणून वंद्य मानल्यावर त्याचा उपयोग करताना अविश्वास, दोषदृष्टि, भय, चिंता इत्यादींचा उदय झाला तर नक्की समजावे की 'प्रसाद' ही भावना हृदयांत दृढ मूळ झालेली नाही. 'प्रसादस्तु प्रसन्नता' (अमरे) 'प्रसादोऽनुग्रहे (हैमः) प्रसन्नस्य भावः प्रसादः' (अ.व्या.सु.) तो तो पदार्थ म्हणजे रामाची साकार कृपाच वाटून त्याचे सेवन करताना चित्तवृत्ति प्रसन्न राहू - होऊ लागली तरच प्रसाद शब्दाची व त्या भावनेची सार्थकता झाली.

**चौ. ३ - (१) बघत विप्र गुरु सुर शिर नमतें...विनतीतें** - आपला कमीपणा वर्णन करून विप्र, गुरु, सुर, संत यांचा मोठेपणा नम्रतेने व अति प्रेमाने वर्णन करून सहज नमन घडले पाहिजे. आपल्याच कृपेने मी सुखी आहे. अशीच कृपा दासावर सतत असावी. आपल्याच अनुग्रहाने सुखाची साधने माझ्याजवळ जमली आहेत वगैरे विनंती करावी. अशी विनंती केली जाण्यास हृदयांत विश्वास, श्रद्धा, लीनता व निरभिमानता इ. गुण असावे लागतात व त्या व्यक्तीबद्दलचे प्रेम असावे लागते. **(क) शिर नमतें** - नमवितात असे म्हटले नाही. भाव हा की त्या मस्तकाचा सहज स्वभाव बनला पाहिजे. सवयीने व प्रेमाने आणि सुसंगतीने स्वभाव बनण्यास फार वेळ लागत नाही. कचेरीत जाण्यास उशीर झाला व वरिष्ठ अधिकारी मुख्य प्रवेशद्वारातच दिसले की मान वाकविण्यासाठी निमिषार्धही विचार करावा लागत नाही. तसेच हे घडते व घडले पाहिजे. **(ख)** गुरु, ब्राह्मण व देव रामाला फार प्रिय असल्याने त्यांना प्रेमाने, आदराने व अत्यंत विनयाने नमन केल्याने राम प्रसन्न होतात. हे करण्यात कोणतीही आशा, कामना असू नये हे पुढील **'राम भरंवसा हृदिं ना दूजा'** याने अगदी स्पष्ट आहे. **अशा रीतीने आदरणीय, वंद्य व्यक्तींबद्दल आम्ही ज्या ज्या गुणांचे निष्काम बुद्धीने वर्णन करू ते ते गुण त्यांच्या वारंवार चिंतनाने आमच्यात सहज प्रादुर्भूत होतील.**

**चौ. ४ - (१) कर नित करिति राम-पद-पूजा - नित** = नित्य, कर नित्य कर्म करिती व रामपदपूजा करिती असा अर्थ घेणे आवश्यक आहे. शौचस्नान संध्यावंदनादि नित्य कर्म केल्याशिवाय पूजा करता येत नाही असे धर्मशास्त्र

सांगते आणि मानसांत स्वतः रामचंद्रांनी स्नानसंध्यादि केल्यानंतरच शिवपार्थिव पूजन केले आहे. नित्य कर्म म्हणजे वर्णाश्रमानुसार शास्त्रोक्त आन्हिक. (क) रामपदपूजा नित्य नियमाने स्वतः करतो. यांत राम परिवाराचा समावेश करण्याची आवश्यकता नाही. ते पुढल्या पाचव्या प्रकारांत सांगितले आहे. ज्यास शक्य असेल त्यांनी परिवारासह केली तरी बिघडणार नाही. पण आवश्यकता नाही. रामपद शब्दाने मूर्ति, पादुका, शालिग्राम, माता, पिता, गुरु, विप्र, अतिथि, अग्नि यांचे ग्रहण करता येते हे श्रीमद्‌भागवतातील पूजास्थानांच्या वर्णनावरून ठरते. मूर्ति धातू, पाषाण, लेख्य, लेप्य किंवा सैकत (वाळूची) असली तरी चालते. पूजा करताना मी प्रत्यक्ष रामाची पूजा करीत आहे ही भावना सतत जागृत पाहिजे. पूजेला प्रतीक मातापिता किंवा मूर्ती आदि काही असले तरी हरकत नाही. मात्र ते प्रतिक आहे असे मुळीच वाटता उपयोगी नाही. मुख्य पाहिजे प्रेम व भावना. उपचार किती व कोणते हा प्रश्न फार महत्त्वाचा नाही. यथाशक्ती देशकालपरिस्थित्यनुसार उपचार वापरावे; मात्र वित्तशाठ्य करू नये. जास्तीत जास्त वैभवाने करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. गृहस्थांस मानसपूजा व बाह्यपूजाही आवश्यक आहे, हे रामार्चन चंद्रिकेत स्पष्ट सांगितले आहे. हे भवन गृहस्थाश्रमी लोकांचेच हृदय आहे. ब्रह्मचारी, वानप्रस्थ व संन्याशी यांना बाह्य पूजा आवश्यक नाही.

(२) **राम भरंवसा हृदिं ना दूजा** - हृदयांत एका रामावरच पूर्ण निष्ठा पाहिजे. तोच माझे सर्व काही उणे पुरे करील. तोच मला सन्मार्ग दाखवून आपल्या चरणी अनन्य निष्ठा देईल; व माझ्या हृदयांत येऊन राहील; असा दृढ भरवसा पाहिजे. जे काही मागावयाचे असेल (न मागणे चांगलेच) ते रामाजवळ मागतो. स्वतःच्या साधनांचा भरवसा वाटत नाही. मी करीत असलेल्या साधनांनी राम प्रसन्न होतील असे स्वप्नातसुद्धा वाटत नाही. माझ्याकडून काहीच घडत नाही. साधनदोष मात्र क्षणोक्षणी घडतात, तरीपण मी रामाचा वेडावाकडा - असेना दास आहे. राम आपल्या ब्रीदासाठी माझ्या दोषगुणांकडे न बघता माझ्यावर पूर्ण कृपा करतील. कारण राम हेतुरहित उपकारी आहेत. दुःखात, संकटांत इतर कोणी मदत करील असे कधीच वाटत नाही. इतर कोणाची आशा, भरवसा धरीत नाही. म्हणजेच

अनन्यगतिक होतो. चांगले-वाईट, सुखदुःख, लाभहानि, जन्ममरण इ. काही घडले तरी रामावरील अनन्यनिष्ठा कमी होत नाही. इतरांची आशा वाटू लागली म्हणजे रामावरील विश्वास उडालाच म्हणून समजावे. **'म्हणवि दास मम नर आशा करि। वदा कुठें विश्वास खरा तरी'** (७।४६।३) असे रामच म्हणाले आहेत. या साधनांत सुद्धा वेळ, पैसा, परिस्थिति इ. काहीच आड येत नाही.

**चौ. ५ रामतीर्थि पदिं चालत जाती** - अनवाणी पायांनी चालत रामतीर्थास जातात. तीर्थयात्रा केल्या पाहिजेत व त्या पायी, अनवाणी चालत केल्या पाहिजेत हे येथे इतके स्पष्ट सांगितले आहे की त्यातून पळवाट काढता येत नाही. **(क)** अनवाणी हा अर्थ या चरणांत नाही हे खरे; पण या प्रकाराचे जे उदाहरण मानसांत आहे त्या भरतचरित्रांत ते अगदी स्पष्ट केले आहे. तीर्थयात्रा, देवदर्शन इ. करण्यास जाताना पादत्राण (जोडा वगैरे) घालणे हा दोष सांगितला आहे. नर्मदा प्रदक्षिणा करणारे बरेच यात्रेकरू या नियमाचे पालन करताना आढळले. (सन १९३९) **(ख)** रामतीर्थास जातात याचा अर्थ इतर तीर्थक्षेत्रांस जात नाहीत असा नाही. तसा अर्थ करणे श्रीरघुनाथाच्या इच्छेविरुद्ध आहे. **'जे रामेश्वर दर्शन करतिल। त्यजतां तनु मम लोकीं जातील'** (६।३।१) असे रामवचन आहे. राम ज्या ज्या तीर्थास गेले ती सर्व तीर्थे हा अर्थही संकुचितच ठरेल. वाहनांत बसून जाण्याने तीर्थयात्रा घडत नाहीत. पायी तीर्थयात्रा करून पाहावी म्हणजे किती फायदे होतात ते कळेल. स्कंद पुराणादी ग्रंथांत वर्णन व माहात्म्य सापडेल. **(ग) राम करा मनिं त्यांच्या वसती - राम** = राम सीता लक्ष्मण हे वाल्मीकींनी आधीच सांगून ठेवले आहे. (चौ. १२८।३ पहा.)

**चौथ्या भवनाचे उदाहरण अयो.कां. उत्तरार्धात भरताचे** आहे. ही लक्षणे भरत चरित्रांत तंतोतंत दिसतात -

(१) **प्रभु प्रसाद वसन मणि धरती** - 'भरत जाइ घरिं करि विचारा। पुरि हय गज गृह खजिना सारा॥ असे सकल रघुपतिसंपत्ती' (१८६।२-३). (२) **'प्रभुप्रसाद सुभग शुचि बासा।** सादर घेइ नित्य यन्नासा॥' २।३२४।६-७ पहा. (३) **बघत बिप्रगुरु सुर शिर नमतें** - 'तीर्था मुनि-आश्रम-सुरधामा। स्नान करिति पाहुनी प्रणामा' (२२४।२, ४, ५ पहा). (४) **कर नित करिति** - 'नित्य कर्म कृत'

(२०२।-) २०४।४ पहा. (५) रामपदपूजा - 'पुजिति सदा प्रभुपादुका मन न पुरे प्रेमास ।। घे घेउनि आज्ञा करिति विविध राजकार्यास (३२५) (६) **'राम भरवंसा हृदिं ना दूजा** - मातृमतीं मज मानुनी थोडें जें करतील ।। ब्रीद जाणुनी क्षमुनि अघ अवगुण आदरतील' (२३३।-) 'यद्यपि मी वाइट अपराधी । जरी मजमुळें सर्व उपाधी ।। तदपि शरण सन्मुख मज बघतिल । क्षमुनि सकल बहु कृपा वर्षतिल ।। (१८३।३ पासून दो. १८३ पर्यंत पहा) आणखी पुष्कळ वचने अशी आहेत. (७) रामतीर्थि पदिं चालत जाती - सानुज भरत कर्म निज सारुनि' (३११।२ पासून ३१२ पहा.) 'मृदुचरणीं अनवाणी चालत' (३११।४) चित्रकूट प्रदक्षिणा वर्णन पहावे. चित्रकूटास गेले तेसुद्धा पायी अनवाणी चालतच. येथे अगदीच थोडी उदाहरणे दिली आहेत. भरतचरित्रांत आणखी पुष्कळच आहेत. या प्रमाणे या पाच चौपायांत वर्णिलेली सर्व लक्षणे भरत चरित्रांत सापडतात.

*हिं.* *। मंत्रराजु नित जपहिं तुम्हारा । पूजहिं तुम्हहि सहित परिवारा ॥६॥*
*। तरपन होम करहिं बिधि नाना । बिप्र जेवाँइ देहि बहु दाना ॥७॥*
*। तुम्ह तें अधिक गुरहि जियँ जानी । सकल भायँ सेवहिं सनमानी ॥८॥*

*हिं.दो.* *। सब करि मागहिं एक फलु राम चरन रति होउ*
*॥ तिन्ह कें मन मंदिर बसहु सिय रघुनंदन दोउ ॥१२९॥*

*म.* *।मंत्रराज तव नित्य चि जपती । परिवारासह तुम्हां पूजती ॥६॥*
*। करिति होम तर्पण बिधिं नाना । बिप्रां भोजन देति सुदानां ॥७॥*
*। मनिं गुरु अधिक तुम्हांहुन जाणति । सर्वभाविं सेविति सन्मानति ॥८॥*

*म.दो.* *। सर्व करुनि रति राम पदिं मागति एक फळा हि ।*
*॥ तन्मन - मंदिरिं रहा युग रघुनन्दन सीता हि ॥१२९॥*

**अर्थ** - तुमच्या मंत्रराजाचा (राममंत्रराजाचा) नित्य नियमाने जप करतात व तुमच्या परिवारासह तुमचे (नित्य नियमाने त्रिकाळीं) पूजन करतात.॥६॥ होम तर्पण (मार्जन) वगैरे सर्व विविध विधि यथाविधि करतात व विप्रांना भोजन घालून पुष्कळ दाने (सु-दाने) देतात.॥७॥ मनात गुरुला तुमच्यापेक्षा श्रेष्ठ जाणून सर्व भावाने सेवा व सन्मान करतात.॥८॥ इ. सर्व करून रामचरणी (त्रिविध) प्रेम हे एकच फळ मागतात त्यांच्या मनरूपी मंदिरात तुम्ही दोघे

रघुनंदन सीतेसुद्धा रहा.।।दो.१२९।।

**पाचवे भवन टीका - ल.ठे.** - चौथ्या भवनाचे वर्णन पाच ओळीत केले. तसे हे पण पाच ओळीतच आहे. परंतु त्यांत व यांत महदंतर आहे. हे साधन पुष्कळ वेळ लागणारे व विधिनिषेधयुक्त कर्मकाण्ड प्रधान आहे, आणि त्यांत गुरुसेवा व राममंत्रानुष्ठान ही मुख्य आहेत. बाकीची अंगभूत आहेत व रामरति हे ध्येय, फल आहे.

(१) पहिल्या दोन ओळींत **राममंत्राचे पुरश्चरण सुचविले आहे. 'पूजा त्रै कालिकी नित्यं जपस्तर्पणमेवच होमो ब्राह्मणभुक्तिश्च पुरश्चरण मुच्यते.** (वसिष्ठ संहिता) त्रिकाळ, पूजा, जप, होम, तर्पण (व मार्जन) आणि ब्राह्मण भोजन ही पुरश्चरणाची मुख्य पाच अंगे आहेत. या पाची अंगांचा स्पष्ट उल्लेख दोन चौपायांत आहे. तर्पणाचे अंग मार्जन आहे. **(क)** पुरश्चरणांत मंत्राचा जप हे मुख्य कार्य असल्याने येथे त्याचा उल्लेख प्रथम केला आहे. मंत्रराजतव = राममंत्रराज. एकाक्षर मंत्र राममंत्रसुद्धा मंत्रराज आहे. **'एकाक्षरो मनुः प्रोक्तो मंत्रराजः सुरद्रुमः'** (रा.र.उ. २।२). **'सर्वेषु राममंत्रेषु मंत्रराजः षडक्षर'** (रा.र-उ.) एकाक्षर मंत्रापासून क्रमाने २४ अक्षरापर्यंतचे, राम-अनुष्टुभ् ३२ अक्षरांचा व राममाला मंत्र ४७ अक्षरांचा असे (रा.र.उ.) उपनिषदांत व रामार्चन चंद्रिकेत सांगितले आहेत. पण ते मंत्र परिभाषेत असल्यामुळे चांगल्या शास्त्री पंडितांस सुद्धा उलगडा होत नाही. एकाक्षर व षडक्षर मंत्रांचा अधिकार फक्त उपनीत द्विजांचा आहे. बाकीचे मंत्र स्त्रीशूद्रादिकांना देण्यास हरकत नाही.

(२) अनेक राम मंत्रांना मंत्रराज म्हटले असले तरी **गुरुपरंपरेने ज्याला जो मंत्र मिळाला असेल तो त्याला मंत्रराजच होय;** आणि म्हणूनच गुरुचा उल्लेख (चौ.८) केलेला आहे. **(क) मंत्र** - मननात् त्राणनात् मंत्रः मंत्रिणां कल्पभूरुहः ।। मूलत्वात् सर्वमंत्राणां मूलाधार समुद्भवात् ।। मूलस्वरूपलिंगत्वात् मूलमन्त्र इति स्मृतः ।। मनन केल्याने त्राणन = संरक्षण करणारा म्हणून मंत्र. मंत्राचे अनुष्ठान करणारांना मंत्र हा कल्पतरु आहे. स्वेच्छेने ग्रंथांतून वगैरे घेतलेल्या अनुपदिष्ट मंत्राचे अनुष्ठान निषिद्ध आहे. **(ख) नित्य जपती** - पुरश्चरणांत 'न्यूनाधिकं जपं न कुर्यात्' असा जो नियम आहे त्याचा ध्वनि 'नित्य' (नित) शब्दांत आहे. जितका जप रोज

करण्याचा संकल्प केला असेल तेवढा रोज झालाच पाहिजे. अधिक केल्यास त्याची गणना पुरश्चरणाच्या संख्येत करता येत नाही. 'अक्षरलक्ष संख्याकं पुरश्चरणम्'. मंत्राची जेवढी अक्षरे असतील तितके लक्ष जप एकंदर झाला म्हणजे एक पुरश्चरण होते असा सर्वसाधारण नियम आहे. परंतु **'कलौ चतुर्गुणः प्रोक्तः'** कलियुगात अक्षरलक्षसंख्येच्या चौपट केला पाहिजे. जप करावयाचा म्हटले म्हणजे ध्यान, मुद्रा, न्यास इत्यादी उपांगे आलीच. कवच, हृदय, स्तवराज, सहस्त्रनाम, रहस्य इत्यादींचा नित्यपाठ पण करावा लागतो. रामार्चन चंद्रिकेत जे १३ मुख्य न्यास सांगितले आहेत ते करण्यास चांगल्या चपल पुरुषास २॥-३ तास तरी लागतीलच. पण न्यासांच्या योगाने शरीरादि मंत्रमय होतात. त्यामुळे न्यासांचे फार महत्त्व आहे. अधिक विस्तार रामार्चन चंद्रिकेत पहावा.

(३) **परिवारासह तुम्हां पूजती** - श्रीराम पूजेत परिवार किती या संबंधी संक्षेप व विस्तार इत्यादी दृष्टींनी अनेक मते सापडतात. कोणत्याही देवतेच्या पूजनात अंग, परिवार, आयुधे व शक्ती यांचे पूजन आवश्यक असते. येथील परिवार शब्दाने सर्व आवरण देवतांचे ग्रहण करणे योग्य. तसेच याने रामयंत्रराज पूजनविधि सुचविले जातात. एकाक्षर मंत्रापासून नवाक्षर मंत्रजपानुष्ठानांत यंत्र, परिवार एका प्रकारचा असून दशाक्षर मंत्रापासून पुढील मंत्रांच्या अनुष्ठानात निराळे यंत्र आहे व परिवारात थोडा भेद आहे. यात एकंदर दहा आवरणे असून त्यात ११५ देवता अधिक लक्ष्मण शार्ङ्ग व शर मिळून ११८ देवता आहेत. **(क) कल्याण मानसांकांत** ४१ देवता दिलेल्या आहेत व त्यांत दशदिक्पाल मिळून एकच देवता मानली आहे. आधार दिलेला नाही. पण कमीत कमी लक्ष्मण, सीता व हनुमान यांचे तरी पूजन केलेच पाहिजे (परिवारात). पूजनांत दोन सांप्रदाय आढळतात. शेवटच्या आवरणापासून आत आत मुख्य देवतेपर्यंत (हा लयक्रम आहे) व मुख्य देवतेपासून बाहेर बाहेर शेवटच्या आवरणापर्यंत (हा उत्पत्तिक्रम) पूजन करतात. हा पूजाविधि पुष्कळ वेळ लागणारा असून पुष्कळ द्रव्ये (पदार्थ) पात्रे इत्यादींची आवश्यकता असते. या विधीप्रमाणे पुरश्चरण करावयाचे म्हटल्यास रोज सहा हजारच जप करून संपूर्ण दिवसांत १॥/२ तासच मोकळे सापडतात. **(ख) ल.ठे.** येथे जपाचा उल्लेख प्रथम केला असला तरी स्नानसंध्यादी आवश्यक प्रातः कर्म

समाप्तीनंतर आधी पूजा, पूजांग तर्पण, पूजांग होम इत्यादी व नंतर पुरश्चरणाचा रोजचा जप, पूजासमाप्ति असा क्रम असतो.

**चौ. ७ - (१) करिति होम तर्पण बिधि नाना** - नित्याच्या पूजांग होमांत सुमारे २४० आहुती आहेत. (रा.र.उ. व रा.चं.प.) ज्या देवतांचे पूजन केले असेल त्यांचे तर्पण त्यांच्या नामाने करतात किंवा जपमंत्राने मुख्य देवतेचे तर्पण करतात इ. विविध प्रथा आहेत म्हणून 'नाना' म्हटले. जो मंत्र असेल तो उच्चारून पुढे रामं तर्पयामि असे म्हणून तर्पण करावयाचे असते. या तर्पणाला साधे जल न घेता ताम्रादि पात्रात जल घालून त्यात मुख्य देवतेचे आवाहनादि पंचामृतासह पूजन करून, देवतेचे विसर्जन करून, त्या पात्रांतील त्या तीर्थजलाने तर्पण करावयाचे असते. हे पूजांग तर्पण होय. नित्य पूजेत मार्जन नाही. एवढे झाल्यावर नित्याचा ठरविलेला जप करावयाचा असतो. नंतर पूजा पूर्ण करून तीर्थप्रसाद ग्रहण करून मध्यान्ह स्नान संध्या, (स्नानांतील व संध्येतील तर्पण) ब्रह्मयज्ञ व तदंगभूत तर्पण, नंतर नैवेद्य वैश्वदेव = होम करावा लागतो म्हणून होम तर्पण 'नाना' म्हटले. नंतर ब्राह्मणांस विविध दाने, भोजन, दक्षिणा इत्यादी सर्व यथाविधि, यथासांप्रदाय गुरूपदिष्ट मार्गाने करतात.

**चौ. ८ - (१) गुरु अधिक तुम्हांहुनि जाणति** - गुरुकृपेवाचून मंत्रशक्ति व मंत्र चैतन्य जागृत होत नाहीत. **'राममंत्र भज दिला हर्षुनी'** (७।११३।६) ज्याची अप्रतिहत गति होती, ज्याला अनेक पूर्वजन्मांचे ज्ञान होते, ज्या मेरुपर्वतावर रावणसुद्धा जाऊ शकत नव्हता त्यावर जो विप्र जाऊ शकत होता, तो राममंत्रप्राप्तीसाठी अनेकांच्या पायधरण्या करीत हिंडत होता ! यावरूनही ठरतेच की मंत्र अधिकारी सद्गुरुंकडून मिळालेलाच पाहिजे. गुरुकृपेवाचून ज्ञान होत नाही. **'गुरुविण नोहे ज्ञान'** (७।८९।।) पूजा, जप, संध्या इत्यादीकांपासून आत्मज्ञानापर्यंतचे कोणतेही ज्ञान गुरुशिवाय होत नाही. **'गुरुविण भवनिधि कोणि तरे ना । विधि शंकरसम कोणि असेना'** (७।९३।५) गुरु हे ज्ञानोत्पत्ति करण्यात अचतुर्वदन ब्रह्मा आहेत, अज्ञान भ्रमादिकांचा संहार करण्यात एकमुखी महेश आहेत व ज्ञानादिकांचे संरक्षण करण्यात **'द्विबाहुरपरो हरिः'** द्विभुज विष्णु, नारायण आहेत. म्हणूनच गु.गी. म्हणते की **'गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुः देवो महेश्वरः'** इ.

**(क) अधिक जाणून** - नुसते मानून, समजून नव्हे. तत्त्वतः जाणून की 'गुरुरेव परं ब्रह्म' अलीकडे मंत्रोपदेश देणे हा एक धनमान कमाईचा धंदा सुरू झाल्यामुळे फार स्वस्तात, विना कष्ट मंत्र मिळू लागला व त्यामुळे मंत्राबद्दलचा आदर नाहीसा झाला आहे. भवरोग विनाशाच्या उपायांत **'सद्गुरु वैद्यवचनिं विश्वास हि'** (७।१२२।६) हा मुख्य उपाय सांगितला आहे. गुरुकृपेशिवाय प्रेमभक्ति = हरिपदरति प्राप्त होत नाही. **'सकल फलहि हरिभक्ति सुशोभन । संतकृपेविण कुणाहि लाभ न'** (७।१२०।१८) यांत संत = सद्गुरु, गुरु हा अर्थ आहे. येथील ही चौपाई व पुढील दोहा यांनी तो स्पष्ट केला आहे. दोह्यांत जे फळ वर्णिले आहे ते ( = रामचरण रति) सद्गुरुकृपेशिवाय मिळत नाही हे दाखविण्यासाठीच या गुरुवर्णनाचा व दोह्याचा निकट संबंध ठेवला आहे. दोह्यांत सांगितलेले फल मिळण्यासाठी सद्गुरुंना रामापेक्षा मोठे जाणून त्यांची सर्व भावाने सेवा केली पाहिजे.

(२) **'सर्वभावि सेविति** - 'ध्यान मूलं गुरोर्मूर्तिः पूजामूलं गुरोः पदम् । शास्त्रमूलं गुरोर्वाक्यं मोक्षमूलं गुरोः कृपा' 'तीर्थानि दक्षिणे पादे वेदास्तन्मुखमाश्रिताः' (गु.गी.) 'गुरुरेव शिवः गुरुरेव शिवः गुरुरेव शिवः गुरुरेव शिवः' 'न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं' (गु.गी.) असे महेश्वरांनी पार्वतीस सांगितले आहे. **(क) सन्मानति** - पूर्ण निष्काम बुद्धीने सेवा करावयाची म्हणजे कामक्रोध व लोभादि विकारांना बाजूस ठेवावेच लागतात. त्याशिवाय सन्मानपूर्वक सेवा होऊच शकत नाही आणि दंभ, अहंकार, मत्सर यांची वृद्धि होण्याचा संभव फार असतो. म्हणूनच कामक्रोधलोभादिरहित होऊन गुरुसेवा करणाराला (गु.गी.) शंकरांनी खरा संन्यासी व 'इतरे वेषधारिणः' असे म्हटले आहे. **(ख)** गुरुदेहाच्या ठायीसुद्धा ब्रह्मभावना (सर्व : ब्रह्म) दृढ झाली म्हणजे तीच हळुहळु पाण्यावरील तेलाच्या थेंबाप्रमाणे विश्वव्यापक होण्यास वेळ लागत नाही. **'गुरुपदपंकज सेवा, तिसरी भक्ति, अमान'** या शबरीला सांगितलेल्या वचनात अमान शब्दाने 'अमानित्वमदंभित्वमहिंसा' इत्यादी गीतोक्त ज्ञानलक्षणांचा अन्तर्भाव केलेला आहे व तोच येथे 'सन्मानति' शब्दाने सुचविला आहे. गुरुसेवा कशी करावी याचे सुंदर भावनापूर्ण विवेचन 'आचार्योपासनम्' (भ.गी. १३।८) वरील श्रीज्ञानदेवीतील

ओव्यांत पहावे, व त्यापेक्षा विस्तृत एकनाथी भागवतांत पहावे.

**दोहा. (१) सर्व करुनि रति रामपदिं मागति एक फळहि - रामपदिं रति =** रामभक्ति, प्रेमभक्ति, हे एकच फळ मागतात. कोणाजवळ मागतात हे मागल्या चौपाईवरून ठरते. मंत्रपुरश्चरणादि अनुष्ठान आणि सर्व भावे सन्मानपूर्वक गुरुसेवा करून गुरुजवळ रामप्रेमभक्ति हे एकच फळ मागतात. **'सकल फलहि हरिभक्ति सुशोभन । संतकृपेविण कुणाहि लाभ न' 'मुख्यतस्तु महत्कृपयैव, भगवत्कृपालेशाद्वा'** (ना.भ. ३८) मुख्यतः महापुरुषांच्या (गुरु) कृपेनेच प्रेमभक्ति मिळते. ना.भ.सू. ४६ पहा. **'यः संगांस्त्यजति महानुभावं सेवते'** हेच मागल्या चौपाईत व या दोह्यांत सांगितले आहे. गुरुकृपेशिवाय रामभक्ति, रामपदीं अगाध गाढ प्रेम मिळत नाही म्हणून गुरुजवळ व रामाजवळ अर्थ, धर्म, काम, मोक्ष या फळांपैकी एकही न मागता फक्त एकच फळ रामप्रेमभक्ति मागतात. **(क) सर्व करुनि** - जपतपतीर्थयात्रा, योग याग इ. सर्व साधने करून इतर काहीही मागत नाहीत. सर्व साधनांचे सुफल = सुंदरफल रामभक्ति आहे, असे वसिष्ठ व शंकर मानसांतच म्हणाले आहेत. उतारे १०७/५-८ च्या टीकेत दिले आहेत. **(ख) 'मन मंदिरिं'** - मनाला - हृदयाला मंदिर म्हणण्यात भाव हा आहे की त्यांचे हृदय तुम्हाला निवास करण्यास सर्व प्रकारे योग्य, परम पवित्र व परम सुंदर झालेले असते. शुद्ध भक्ति सुधारस हे तुमचे एक रूप तेथे राहिल्याने त्याला मंदिरत्व आलेले असते **'रसः वै सः'** (श्रुति) **हरिपदरति रस वेद वदे कल'** (१।३७।१४) म्हणून त्यांच्या रुचीप्रमाणे रूपे धारण करून तेथे जाऊन रहावे. येथील मंदिर शब्द व त्याचा भावार्थ प्रत्येक भवनात घेणे जरूर आहे. **(ग) रघुनन्दन** शब्दाने सुचविले की आपण तेथे जाऊन राहिलात, आपला अवतार तेथे प्रगट झाला म्हणजे ते परमानंद मग्न होतील. आपण कौसल्येच्या मंदिरात प्रगट झाल्यावर 'परमानंद पूर्णमन राजा' दशरथ झाले, त्याहीपेक्षा अधिक आनंद व सुख त्यांना होईल कारण या मंदिरात आपण दोघे रघुनन्दन व सीता प्रगट होणार.

**पाचव्या भवनाचे उदाहरण अरण्यकाण्ड पूर्वार्धातील मुनि** अत्रि, शरभंग वगैरे. वाल्मीकी स्वतःच सांगत आहेत = **'अत्रि आदि मुनिवर बहु वसती । जप तपयाग करित तनु कसती ॥ श्रमां सफल सकलांच्या करणें'** (१३२।७-८) अरण्यकाण्डात

अत्रि आदि मुनिवरांचेच वर्णन प्रथम केले आहे. श्रम सफल कशाने होतील हे वरील दोह्यांतच सांगितले आहे. त्या सर्व मुनींनी प्रभूचे दर्शन झाल्यावर प्रेमभक्तीच मागितली आहे. (१) विविक्तवासिनः सदा भजन्ति मुक्तये मुदा पण **अत्रि** म्हणतात 'भजामि ते पदांबुजं, नमामि ते, पदाब्जभक्ति देहि मे' (२) 'योगयागजपतप कृत देई । प्रभुला सकल, भक्ति वर घेई' (३।८।७) हे **शरभंगांनी** केले. (३) **अगस्ति** - 'भेटूं आले जगदाधार ।। राम अनुज समेत वैदेही । **निशिदिन देव ! जपतसां** जे ही ।।' (३।१२।७-८) असे सुतीक्ष्ण अगस्तींना म्हणाले आहेत. **'अविरल भक्ति विरति सत्संगा । या पदकमलीं प्रीति अभंगा ।।'** असे अगस्तींनी मागितले आहे. (४) सुतीक्ष्णाने हेच मागितले आहे.

हे सर्वसंगपरित्याग केलेले, परम विरागी, वनात राहणारे मुनि असल्याने त्यांना हे मंत्रपुरश्चरणाचे चिवट, श्रमांचे, पुष्कळ वेळ व काळ लागणारे साधन सहज करता येण्यासारखे आहे.

*हिं.* *। काम कोह मद मान न मोहा । लोभ न छोभ न राग न द्रोहा ।।१।।*
*। जिन्ह कें कपट दंभ नहिं माया । तिन्ह कें हृदय बसहु रघुराया ।।२।।*

*म.* *। काम कोप मद मान न मोहहि । क्षोभ न लोभ राग ना द्रोहहि ।।१।।*
*। ज्यांमधिं कपट दंभ नहि माया । त्यांचे हृदयिं रहा रघुराया ।।२।।*

**अर्थ** - ज्यांच्या ठिकाणी काम, क्रोध, मद, मान व मोह नाहीत (तसेच) क्षोभ नाही, लोभ नाही, राग (आसक्ति) नाही व द्रोह ही नाही.।।१०।। व ज्यांच्यात कपट, दंभ व माया नाहीत त्यांच्या हृदयांत हे ! रघुराया ! तुम्ही (लक्ष्मण व सीता यांच्यासह) रहा.।।२।।

**सहावे भवन - टीका. चौ. १ - (१) काम** = नश्वर विषयांची इच्छा वासना. 'कामवात कफलोभ' ही भवरोगाची मुळे आहेत. 'काम तिथे स्वप्निं न सुख भासे.' 'राम भजन विण काम न मरती' (७।९०।२) म्हणून येथे रामभजन सूचित केले आहे. **(क) कोप** - क्रोध; हा एक प्रबल खल आहे. 'क्रोध पित्त उर नित्य जाळतो.' क्रोधाची उत्पत्ति अतृप्त कामापासून होते. हा तमोगुणी आहे. काम रजोगुणी आहे. द्वैतबुद्धी असल्याशिवाय क्रोध येत नाही. **(ख) मद** - गर्व, ताठा; विद्यामद, धनमद, अभिजनमद, तारुण्यमद, रूपमद, सत्तामद,

जातिवर्णाश्रममद इत्यादी यांचे अनेक प्रकार आहेत. हा अनेक दोषांचा जनक होतो. (ग) **मान** - प्रतिष्ठा, मोठेपणा वा मिळविण्याची इच्छा. मदाला आधारभूत असणारी एखादी गोष्ट जवळ असली म्हणजे त्या गोष्टीमुळे इतरांनी आपणास चांगले म्हणावे, आदर राखावा, स्तुति प्रशंसा करावी, हार घालावे, मानपत्र द्यावे इ. जे वाटणे तोच मान. तो मिळाला नाही म्हणजे दंभ, मत्सर, ईर्षा, असूया, द्वेष इ. दोषांची उत्पत्ति होते. (घ) **मोह** - हा सर्व मानस रोगांचे मूळ आहे. 'मोह सकल रोगांचे मूळ' (७।१२१।२९) मोह = अज्ञान व विपरीत ज्ञान. (ङ) **लोभ** - नश्वर विषयांचा संग्रह करून ठेवण्याची व अधिकाधिक मिळविण्याची इच्छा. कामाची तृप्ती झाली, इच्छित वस्तूचा लाभ झाला म्हणजे तो आणखी व्हावा व मिळालेले कमी होऊ नये असे वाटणे म्हणजे लोभ. 'लाभात् लोभ प्रवर्धते' 'लोभमूलानि पापानि' (च) **क्षोभ** - (छोभ) उद्वेग, चिंता, खळबळ. **'क्षुब्ध ईशमन फार जाहलें'** (१।८७।४) ज्या वेळी एखादी गोष्ट इच्छेविरुद्ध अकस्मात घडते व कार्याकार्य, हेतु इ. निर्णय चटकन होत नाही, त्या वेळी चित्तांत उत्पन्न होणारी जी खळबळ तो क्षोभ. पुढे याचे शोक, क्रोध, वैर, विरोध, निराशा, निरुत्साह इ. अनेक विकारांत रूपांतर होण्याचा संभव असतो. 'क्षुब्ध ईशमन फार जाहलें' चे रूपांतर 'होते कुपित' असे झाले व मदनाला जाळला (छ) **राग** = आसक्ति, विषयासक्ति, विषयप्रीति असा अर्थ येथे आहे. (ज) **द्रोह** - दुसऱ्याच्या सुखाचा, वित्ताचा, हिताचा, मानप्रतिष्ठेचा वगैरे विनाश करण्याची जी मनोवृत्ति तो द्रोह. भृगुपति - परशुराम आपणास 'क्षत्रियकुल द्रोही' म्हणाले आहेत. वैर, विरोध, द्वेष ही यांचीच रूपे आहेत. रावणाला सुरद्रोही, विप्रद्रोही, परद्रोही म्हटले आहे.

**चौ. २ - (१) माया** - माया शब्दाचे प्रेम, वात्सल्य, कृपा, कष्ट, अविद्या, विद्या, छल, धनसंग्रह इत्यादी अनेक अर्थ संदर्भानुसार होऊ शकतात. येथे माया, ममता, ममत्व हा अर्थ आहे. दया, कृपा, करुणा ही संतलक्षणे असल्याने येथे त्यांचा समावेश करता येत नाही. कपट, दंभ, राग यांचा स्वतंत्र उल्लेख केला आहे. सूचना - कपट, दंभ, काम, क्रोध इत्यादी विषयी मानसरोग निरूपणात सविस्तर वर्णन केले आहे.

**या सहाव्या भवनाचे उदाहरण अरण्यकांड उत्तरार्धात नारद.**

(२) अरण्यकाण्डांत शेवटी नारद चरित्र आहे. त्यात जी संतांची लक्षणे प्रभूंनी सांगितली आहेत ती सर्व नारदांच्या ठिकाणी असल्यामुळेच सांगितली आहेत. पण येथील लक्षणे - पार्वती विवाह - तपश्चर्या प्रकरणात नारदांची जी व्याजस्तुती केली आहे तिच्यात व नारदांच्या कामविजय प्रकरणांत बरीच आहेत. **'काम न** - व्यापि न कामकला मुनिला लव' **कोप न** - नारदमनि मुळी रोष न आला. मदमान न - 'ठरो मृषा मम शाप कृपाला' (१।१३८।३) मदमान असलेला तपस्वी असे कधीच म्हणणार नाही. **क्षोभ न** - मदनाने क्षोभ उत्पन्न करण्याचा प्रयत्न अगदी कसून केला; पण क्षोभ उत्पन्न झाला नाही; उलट 'प्रियवचनें तोषवि कामाला? राग न' - 'उदासीन धन धाम न जाया' (१।९७।३) **मोह न माया न - 'त्यास खरेंच मोह न माया'** (१।९७।३) लोभ न - वरदान मागताना स्वतःच्या कोणत्याच लाभासाठी काहीही मागितले नाही. (३।४२). **कपट दंभ नाही** - अगदी सरळ हृदयी, लपवालपव नाही म्हणून तर स्पष्ट विचारले की **'तदा लग्न मी करूं पाहिलें । कारण कवण किं करुं नहि दिलें'** (३।४३।३) कोणता कपटी व दंभी तपस्वी, भक्त आपल्या नावाला कमीपणा आणणाऱ्या आपल्या पूर्वचरित्राचा आपण होऊन असा उल्लेख करील?

**शंका (१)** - नारदमोहकथा व कामक्रोधवश झाल्याचे वर्णन मानसांतच आहे त्याची वाट काय? **(क)** त्या नारदमोहकथेचा संबंध काक भुशुंडी कथेशी आहे. त्यानंतर कमीत कमी २७ कल्पे व २६।२७ महायुगे गेल्यावर ही कथा शंकर पार्वतीला सांगत आहेत. म्हणून विसंगति नाही. शिवाय तो मोह अविद्याजनित स्वाभाविक नसून भगवान नारायणांनी आपल्या विद्यामायेने मुद्दाम निर्माण केला होता. त्यानंतर नारद विद्यामायामुक्तही झाले. **शंका (२)** - हा सहावा स्वतंत्र प्रकार सांगितला म्हणजे बाकीच्या तेरा प्रकारच्या भक्तीत हे विकार असले तरी चालतात असा निष्कर्ष निघतो की नाही? **समाधान - तसा निष्कर्ष निघत नाही.** तसा निष्कर्ष काढताना वरील निरूपणाचा अर्थच समजला नाही असे ठरते. इतर सर्वांच्या ठिकाणी ही लक्षणे असतातच; पण त्यांना ही लक्षणे भक्तिमार्ग साधनात रामकृपेने साध्य झालेली असतात व येथे सांगितलेल्यांनी

ही लक्षणे आपल्या स्वतःच्या प्रयत्नांनी व गुरुकृपेने अपरोक्षज्ञान दृढ करून, अन्वयज्ञान दृढ करून संपादन केलेली असतात. असे लोक सगुण चरित्रांत रमत असले तर त्यांच्या हृदयांत जाऊन रहा असे सांगण्याचा मुनींचा हेतु आहे. कारण केवळ ज्ञानी भगवंताला आवडत नाहीत हे मुनींना माहीत आहे. **'भक्तिहीन तो प्रिय नहिं मजला'** (७।४५।४) असे प्रभुवचन आहे. **'हे समजुनि-मुनि जे विज्ञानी । याचिति भक्ति सकल सुखदानी'** (७।११६।८) असे असतील त्यांच्या विषयी येथे सांगितले आहे. नारदचरित्रावरून हेच ठरते.

(३) कोणत्याही प्रकारचा भक्त असो कामक्रोधादि विकारांपासून मोकळा झाल्याशिवाय राम हृदयांत राहणारच नाहीत. प्रभु स्वतःच सांगतात की, 'मम गुण गातां तनू पुलकते । गदगद गिरा नयनजल गळतें ॥११॥ काम आदि मद दंभ न ज्याला । तात निरंतर वश मी त्याला ॥११५॥ वचनकर्म मन मम गति भजन करिति निष्काम ॥ हृदय कमलिं त्यांचे सदा करतो मी विश्राम' (३।१६।). कोणी आधी भक्ति करू लागून सर्व विकारांना जिंकतात व हे सहाव्या प्रकारचे आधी सर्व विकारांना जिंकून **त्यांचे भय राहू नये म्हणून भक्ति करू लागतात.** वरील बारावी चौपाई हाच फरक दाखविते. ११ व्या चौपाईपर्यंत वर्णिलेल्या भक्तीच्या पायऱ्या चढल्या गेल्या म्हणजे १२ व्या चौपाईतील लक्षणे प्राप्त होतात व १२ वीतील 'काम अदि मद दंभ न ज्यांना' असे असून जे 'वचन कर्म मन मम गति भजन करिति निष्काम' अशा दोन्ही प्रकारच्या भक्तांच्या हृदयांत मी राहतो असे प्रभूंनी सांगितले. **'मम बल भक्तां स्वबल तयानां । काम क्रोध हे रिपु उभयानां ॥ हें जाणुनि पंडित मज भजती । ज्ञानलाभिं हि न भक्ती त्यजती,** (३।४३।८-१० पहा). इतरत्रही संतसाधु = भक्त लक्षणांत कामक्रोधादिकांचा त्याग सांगितलेला आहेच.

***हिं.*** *। सब के प्रिय सब के हितकारी । दुख सुख सरिस प्रसंसा गारी ॥३॥*
*। कहहिं सत्य प्रिय बचन बिचारी । जागत सोवत सरन तुम्हारी ॥४॥*
*। तुम्हही छाडि- गति दूसरि नाहीं । राम बसहु तिन्ह के मन माहीं ॥५॥*

***म.*** *। सर्वा प्रिय हितकर सर्वांही । सम सुख दुःखें स्तुति निंदाही ॥३॥*
*। वदति विचारिं खऱ्या प्रिय वचना । स्वप्न जागृतीं शरण आपणां ॥४॥*
*। तुमच्या विण दुसरी गति नाहीं । राम रहा हृदयीं त्यांच्याही ॥५॥*

**अर्थ** - जे सर्वांना प्रिय असतात व सर्वांचे हितकर्ते असतात, ज्यांना सुखदुःखे, स्तुति-निंदा (इ. द्वंन्द्वे) सारखी वाटतात ।।३।। जे खरे व प्रिय वचन विचार करून बोलतात; जे झोपेत व जागृतीत तुम्हाला शरण गेलेले असतात.।।४।। व ज्यांना तुमच्याशिवाय अन्य गति नाही त्यांच्या हृदयांत राम ! तुम्ही तिघांनी रहावे.।।५।।

**सातवे भवन - टीका. - चौ. ३ - (१) सर्वा प्रिय** - बहुजनप्रिय; कारण, असे कोणाचेही चरित्र आढळणार नाही की त्याला अप्रिय मानून त्याचा द्वेष करणारे कोणी सुद्धा नव्हते. कुबडी व कैकयी यांना राम अप्रिय वाटलेच. एवढेच म्हणता येईल की आपल्याला अप्रिय मानणारे वा शत्रु कोणी आहेत असे त्यांस वाटत नाही. **(क) सर्वा हितकारी** याचा अर्थ सुद्धा वरच्या सारखाच मर्यादित घेणे जरूर आहे. ज्यांचा ज्यांचा संबंध येईल त्या सर्वांचे हित करण्याचा ते प्रयत्न करतात. **(ख) सम सुखदुःखें स्तुतिनिन्दाही** - या चरणाने 'सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाऽजयौ' (भ.गी.) 'समदुःख सुखः स्वस्थः समलोष्टाश्म काञ्चनः, (भ.गी.) अशा प्रकारचे, प्रतिकूल परिस्थितीत सुद्धा चित्ताची समता ढळू न देणारे. 'द्वंद्वैर्विमुक्ता सुखदुःखसंज्ञैः' असे द्वंद्वातीत झालेले सुचविले.

**चौ. २ (१) वदत्ति विचारिं खऱ्या प्रिय वचना** - असत्य बोलण्यात स्वार्थ, भय व लोभ ही कारणे असतात. ज्याला सर्वच प्रिय वाटतात व जो द्वंद्वांपासून सुटला त्याला भय उरतच नाही. 'भयं द्वितीयाऽभिनिवेशतः स्यात्' (भाग) 'द्वितीयात् वै भयं भवतिद्व ज्याला सर्व जग रामरूप किंवा आत्मस्वरूप दिसू लागले त्यालाच भय राहणार, वाटणार नाही. स्वार्थी व लोभी कोणाचे खरे हित करू शकत नाहीत. स्वार्थी किंवा लोभी जेव्हा परहित करतोसे दिसते तेव्हा ते स्वार्थासाठी, स्वतःच्या लाभासाठी करतो. इतरांचे दुःख दूर करण्याच्या हेतूने किंवा इतरांचे हित साधण्याच्या हेतूने करीत नाही. **(क) स्वाप = निद्रा**. गाढ निद्रेत शरण जाणे वगैरे काहीच शक्य नसते. पण ज्याला आत्मज्ञान झाले त्याची बुद्धी शुद्ध ब्रह्म स्वरूपातच निद्रेत लीन झालेली असते व अज्ञानावृत्त नसते; म्हणून निद्रेत शरण जाणे, शरण असणे याने **अज्ञानावरण नाश व ज्ञानप्राप्ति सुचविली आहे.** भाव हा की कोणत्याही अवस्थेत रामाशिवाय दुसरा आधार,

आश्रय त्यास वाटत नाही. (ख) निद्रेतच स्वप्ने पडतात. म्हणून स्वप्नांतही राम शरण राहण्यास ती भावना जागृतीत अत्यंत दृढ झालेली पाहिजे. येथे अनन्यगतिकता अन्वय पद्धतीने दाखविली. पुढे व्यतिरेक पद्धतीने दाखवितात.

**चौ. ५ - (१) तुमच्याविण दुसरी गति नाहीं** - येथे व्यतिरेक पद्धतीने अनन्यगतिकता सांगितली. **'रामभरवसा हृदिं ना दूजा'** हे चौथ्या प्रकारांतले एक लक्षण येथे सांगितले आहे.

**सातव्या भवनाचे उदाहरण सुग्रीव; किष्किंधाकाण्ड - पूर्वार्धात आहे.**

(१) **सर्वा प्रिय** - 'स्वामिरहित पुर मंत्री पाहति । मला राज्य जबरीने अर्पति ।।४।६।९, आणि वाली वधानंतर सुग्रीव सर्व प्रजेला व वालीच्या बायकोलासुद्धा प्रिय झाला आहे. (२) **सर्वां हितकारी** - वालीचा वध करवून सुग्रीवाने स्वतःच्या हितापेक्षा वालीचेच अधिक हित साधले आहे. (टी.पहा.) 'वालि परम हित जया-प्रसादां । भेट राम तव शमन विषादा' (४।७।१९). (३) **सम सुखदुःखें** - 'शत्रुमित्र सुखदुःखे जगतीं । मायाकृत परमार्थे नसतीं' (४।७।१८) अशी सुग्रीवाची भावना वालीवधापूर्वीच झाली होती. (४) **वदति खऱ्या प्रिय वचना** - 'सुरनरमुनि वश विषयां स्वामी ! मी पामर पशु कपि अति कामी' (४।२१।३-६ पहा). (५) **स्वप्न जागृतीं शरण** - 'महती सुख परिवार संपदा । सोडुनि सब सेवणें प्रभुपदा ।। अतां कृपा प्रभु ! अशी करावी ! निशिदिन भजनिं, तजुनि सब, जावीं' (४।७।१६,२१) 'मन तन वचनिं यत्न योजावे । रामचंद्र कार्या साधावें ।। बंधू ! फळ हे देहा धरुनी राम भजावा कामां त्यजुनी' (४।२३।३,६) (६) **तुमच्याविण गति दुसरी नाहीं** - 'पदिं शिर नमुनि वदे कर जोडी । नाथ ! नसे मम कांहिंहि खोडी ।। देव ! प्रबला अति तव माया ! सुटे, करा जर राम तुम्हिं दया ।। हे गुण साधन करुनि न लाभत । तुमचे कृपें कुणी कुणि पावत' (४।२१।१-६ पहा).

**सूचना** - वरील तीन चौपायांचा अर्थ लावण्यास या उताऱ्यांचा उपयोग होईल.

***हिं.*** *। जननी सम जानहिं पर नारी । धनु पराव बिष तें बिष भारी ॥६॥*
*। जे हरषहिं पर संपति देखी । दुखित होहिं पर बिपति बिसेषी ॥७॥*

*। जिन्हहि राम तुम्ह प्रान पिआरे । तिन्ह के मन सुभ सदन तुम्हारे ॥८॥*

म. *। जननीसम जाणति परनारी । परधन विषाहुनी विष भारी ॥६॥*

*। हर्षति पाहुनी परसंपत्ती । दुःखी बहु पर बघुनि विपत्ती ॥७॥*

*। प्राणप्रिय तुम्हि राम जयांला । त्यांचें मन शुभ सदन तुम्हांला ॥८॥*

**अर्थ** - जे परस्त्रियांना माते (जननी) समान जाणतात व ज्यांना दुसऱ्यांचे धन विषापेक्षा भयंकर (भारी) विष वाटते.॥६॥ जे दुसऱ्यांची संपत्ती पाहून हर्षित होतात व दुसऱ्यांची विपत्ती पाहून फार दुःखी होतात;॥७॥ आणि राम ! ज्यांना तुम्ही प्राणांपेक्षा प्रिय वाटता त्यांचे हृदय (मन) तुम्हाला राहण्यास चांगले घर आहे (तेथे रहा)॥८॥

**आठवे भवन - टीका - सीता शोधासाठी दक्षिणेस पाठविलेले रामदूत या प्रकारचे भक्त होत.** किष्किंधाकाण्ड उत्तरार्धात हे उदाहरण आहे. यात पाच साधने सांगितली आहेत.

**टीका. चौ.** (६) (१) **जननीसम जाणति परनारी** - याने कामजय, ब्रह्मचर्य, इंद्रियनिग्रह, मनोनिग्रह या गोष्टी सुचविल्या. उदा. 'रुचिर मंदिरीं दिसे स्थित एक नारि तपपुंज' 'त्यानीं दुरुनी प्रणाम कृत तिज' (४।२४; २५।१) **(क) परधन विषाहुनी भारी विष** - धन शब्दाने, गोधन, स्त्रीधन, वस्त्र, पात्र, पुष्प, फळ इत्यादी कोणताही पदार्थ असा अर्थ घेता येतो. विष पोटात वा रक्तात गेल्याने जड देहाला एकदाच मरण येईल कदाचित; नाहीतर काहीतरी औषध, उतारा मिळेल किंवा त्या वाचूनही जगू शकेल कदाचित. परधनरूपी हलाहल स्थूल देहाला विषमय करीत नाही. पण लिंगदेहाला विषमय करते. त्यामुळे मरणानंतर यमयातना भोगाव्या लागतात व त्या धनाची सव्याज परतफेड करण्यासाठी पुन्हा कोणत्या योनीत किती वेळा जन्मावे व मरावे लागेल याचा नेम नाही. परधन न विचारता घेणे म्हणजे चोरी; व बलात्काराने घेणे म्हणजे दरोडा घालणेच. **जी वस्तु हक्काने वा मालकीने आपली नाही ते परधन** - एक तुलसीपत्र, पाणी, फूल, मातीचे ढेकूळ का असेना. येथे अस्तेय, निर्लोभता व निःस्पृहता हे गुण दाखविले **उदाहरण :**

अंगदादि रामदूतांचे प्राण तृषेने पाण्यावाचून कासावीस झालेले असता,

स्वयंप्रभेच्या विवरात शिरल्यावर अमृतासारखे पाणी व सुधेसारखी विपुल फळे तेथे दिसली; तरी त्या दूतांनी, वानरे माकडे असून कशाला स्पर्शसुद्धा केला नाही. फार काय तहान लागल्याचे सांगून पाणी पिऊ का असेसुद्धा विचारले नाही. **'तंव ती म्हणे करा जलपाना । सुंदर सुरस फळें खा नाना'** (४।२५।१-२). मगसुद्धा स्नान केल्याशिवाय काही केले नाही. इतका मनोनिग्रह व इन्द्रिय निग्रह आमच्यापैकी परमार्थी म्हणविणारे तरी कोण व किती करू शकतील?

**चौ. ७ - (१) जे 'हर्षति पाहुनि पर-संपत्ती'** - संपत्ति शब्दाने विद्या, आरोग्य, सौंदर्य, कीर्ती, भूमी, ऐश्वर्य, अधिकार, घर व पुत्र पौत्रादि सर्व गोष्टी सुचविल्या जातात. **'दुःखि दुःख बघतां सुखि सुख पर'** (७।३८।१) या दोन संत लक्षणांचे अस्तित्व या चौपाईने दाखविले आहे. संपत्ति हे सुखाचे साधन व विपत्ति हे दुःखाचे कारण असते; म्हणून दुसऱ्यांचे सुख पाहून सुखी व दुःख पाहून दुःखी ही संतलक्षणे या प्रकारांत दाखविली. **उदाहरण** - 'धन्य जटायू सम न जाहला ॥ देह रामकार्यार्थी त्यागी । हरिपुरिं जाइ परम बहु भागी' (४।२७।७।८) असे रामदूताग्रणी अंगदाने म्हटले आहे. स्वतः रामदूत, सर्वस्वाचा त्याग करून आले असून जटायूचा त्याग, रामप्रेम, परोपकारशीलता इ. दैवी संपत्तीचे व त्याचे भाग्य चिंतन यांनी हर्ष झाला. सुख झाले.

(२) **पर बिपत्ती बघुनि बहु दुःखी** - विपत्ति = आपदा, संकटे, दुःख, कष्ट, चिंता इ. बहु दुःखी (विशेष दुःखी) म्हणण्यात भाव हा की स्वतःवर विपत्ती कोसळल्या असता जितके दुःख झाले असते त्यापेक्षा अधिक, फार दुःखी होतात. **उदाहरण - अंगदाचे दुःख पाहून सर्व दुःखी झाले आहेत. 'अंगदवच ऐकुनि कपिवीरां। वदवे ना, ढाळिति बहु नीरा ॥ शोक मग्न पळभर होत ते'** (४।२६।७-८)

**चौ. ८ - (१) प्राणप्रिय राम** - प्राणांपेक्षा प्रिय, प्राणांपेक्षा काहीतरी प्रिय असते म्हणून तर मनुष्य प्राण देण्यास तयार होतात. रामाकार्यासाठी प्राण देण्यास तयार होतील त्यांना राम प्राणांपेक्षा जास्त प्रिय आहेत असे ठरेल. उदाहरण - सीताशोध लागला नाही म्हणून ते सगळे रामदूत सागर तीरावर प्रायोपवेशन करण्यास बसले आहेत. **'रामकार्यि मन लीन ते विसरति तनुममतेस'** (४।२३). **सूचना** - पुनरुक्ति व विस्तार टाळण्यासाठी तुलना करण्याच्या पद्धतीत थोडा बदल केला.

*हिं.दो.* *। स्वामि सखा पितु मातु गुर जिन्ह के सब तुम्ह तात ॥*
*॥ मन मंदिर तिन्ह के बसहु सीय सहित दोउ भ्रात ॥१३०॥*
*म.दो.* *। स्वामि सखा पितृ माय गुरु । तुम्हिंच तात ! सब ज्यांस ॥*
*॥ तन्मनमंदिरिं करा सह सीते सानुज वास ॥१३०॥*

**अर्थ** - ज्यांना गुरु, आई, बाप, मित्र, धनी (स्वामी, मालक) इत्यादी सर्व तुम्हीच आहात; तात ! त्यांच्या मनरुपी मंदिरांत तुम्ही सीता व बंधु यांच्यासह वास करा - रहा.॥दो.१३०॥

**नववे भवन - श्री हनुमान या प्रकारचे भक्त आहेत. सुंदर काण्ड पूर्वार्धात हे उदाहरण आहे. टीका. (१) स्वामि सखा पितृ माय गुरु** - यांत श्रेष्ठतेचा क्रम उत्तरोत्तर वाढता आहे म्हणून **गुरु** = परमार्थ गुरु, **सद्गुरु** असा अर्थ घेणे भाग आहे. **(क) स्वामि** = स्वामी = सेवा करून घेऊन उदरास देणारा. जो आपल्या पालन पोषणाचा, प्रपंचाचा सर्व भार रामावर घालून काहीही न मागता रामचंद्रांसच स्वामी मानून दासाप्रमाणे तनमन वाणीने व शक्य असल्यास धनाने (निर्धन, संन्याशी धन कोठून आणणार !) राम स्वामींचे कार्य करण्यात तत्पर असतो. योगक्षेमाची चिंता करीत नाही व रामसेवा सुद्धा निष्काम बुद्धीनेच करतो असा भक्त. **उदाहरण** - 'रामदूत मी जननि जानकी' (५।१३।९) 'रामकार्य केल्या विना कुठला मज विश्राम' (५।१।-) 'बंधनिं मजला लाज न काहीं । प्रभुच्या मम करणें कार्या ही' (५।२२।६) असे रावणास सांगितले आहे. आणखी पुष्कळ वचने आहेत.

(२) **सखा** = मित्र सुहृद. मित्रलक्षणे ४।७।२-६ मध्ये पहावी. 'दुःखगिरी निज रज सम जाणत । मित्रदुःखरज सुमेरु वाटत ॥ देत घेत मनिं शंका न धरी । बल अनुमानें सदा हितकरिं' इ. **उदाहरण** - रामहित - सीता शोध - करण्यासाठी हनुमान सर्व समर्थ असून मशका एवढे लहान बनून रात्री चोरून लंकेत शिरत होते. रामहित साधण्यासाठी मुद्दाम इन्द्रजिताच्या बंधनात पडले. सुरसेला सांगितले रामचंद्रास सीताशोधाचा समाचार देऊन परत येईन आणि मग तू मला खा. इ. पुष्कळ आहेत. 'परम निकट कर धरुनि बसविती' (५।३३।४) हे भाग्य फक्त हनुमंतासच लाभले.

(३) **पितृ-पिता**; 'जनिता चोपनेताच यश्च विद्यां प्रयच्छति ।। अन्नदाता भयत्राता पञ्चैते पितरः स्मृताः पिता स्वर्गः पिता धर्मः पिताहि परमं तपः ।। पितरि प्रीतिमापन्ने सर्वाः प्रीणन्ति देवताः ।। (स्कं.पु.) ज्याच्या ठिकाणी थोडा तरी स्वार्थ असतो अशा प्राकृत पित्याचे महत्त्व व त्यांच्या सेवेचा हा प्रभाव आहे तर सर्व समर्थ जगत्पिता जे राम त्यांची पितृ-पिता भावनेने सेवा केल्यास काय दुर्लभ आहे? 'श्रुणु **सुत** अनृण तुझा मी नाही' (५।१२।७) असे राम स्वतःच म्हणाले आहेत हनुमंतास, म्हणजे राम पिता हे ठरले.

(४) **माय = माता** - संत व भगवंत सोडून जगात जास्तीत जास्त प्रेम करणारी आई असते. 'नास्ति मात्रा समं **तीर्थं** नास्ति मात्रा समा **गतिः** । नास्ति मात्रा समं **त्राणं** नास्ति मात्रा समा **प्रपा** ।। 'कुक्षौ संधारणात् **धात्री** जननात् **जननी** तथा ।। अंगानां वर्धनात् **अंबा** वीरसूत्वेन **वीरसूः** ।। शिशोः शुश्रूषणात् **शक्तिः** ।। माता स्यान्माननाच्च सा' (स्कं.पु.मा.कु.खंड) तीर्थ, गति, रक्षण (त्राण) पाणपोई (प्रपा) धात्री, जननी, अंबा, वीरसू, शक्ति व माता यांच्यापासून होणारा सर्व लाभ, सर्व सुख रामापासून मिळेल असा दृढ विश्वास असणारा भक्त मातेसमान तीर्थ नाही, गति नाही, संरक्षक कोणी नाही, पाणपोई नाही. धात्री उदरांत धारण करते. म्हणून धात्री; जन्म देते म्हणून जननी; शरीराचे संवर्धन करते म्हणून अंबा; वीराला प्रसवते म्हणून वीरसू; शिशूची शुश्रूषा करते म्हणून शक्ति; व मान देण्यास योग्य म्हणून माता. हे सर्व गुण प्रभु रामाच्या ठायी प्राकृत मातेच्या अनंतपट नाहीत असे कोण म्हणेल? मानसांत या सर्वांचे वर्णन आहे. सुमित्रा लक्ष्मण भेट, रामनारद संवाद व काकभुशुंडी गरुड संवाद यांत बहुतेक सर्व आधारवचने आहेत. उदाहरण - **'सेवक-सुत पति-मातृ भरोशीं । वसति निश्चिंत तया प्रभुपोशी'** (४।३।४) असे हनुमान रामचंद्रांसच म्हणाले आहेत. राम म्हणतात : 'श्रुणु मुनि हर्षे तुला सांगतो । त्यजुनि भरवसा सब मज भजतो ।। त्यास सदा मी रक्षी ताता ! जशी बालका जपते माता ।।' (३।४३।५).

(५) **गुरु** = सद्गुरु अज्ञानांधकार निवारण करून ज्ञानरूपी प्रकाश देणारा. उदा. प्रभूंनी स्वतःच हनुमन्तास उपदेश केला आहे. 'तो अनन्य ज्याची अशी मति न ढळे हनुमंत । मी सेवक सचराचर, रूपें प्रभु भगवंत' (४।३।-) या

प्रमाणे हनुमन्ताची ही सर्व नाती रामाशी जोडलेली होती.

(६) या प्रमाणे वर वर्णिलेली पाच मुख्य नाती व जगातील इतर सर्व नाती, व नात्याचे सर्व प्रेम, ममता, ज्याने रामचरणी जोडली असतील असा भक्त. (क) प्रभूस्नेहिं शिशु मी प्रतिपालित ।।३।। गुरु पित' माय न कुणि मज ठावे 'जगिं जितकीं स्नेहादिक नातीं । प्रीती प्रतिती श्रुती निज गाती ।। सर्व एक तुम्हिं मजला स्वामी ! दीनबंधु ! हृदयान्तर्यामी ।।' (२।७२।३-६) असे लक्ष्मणाने म्हटले आहे व त्या प्रमाणे लक्ष्मणाचे अक्षरशः वागणे आहे हे पूर्वी टीकेत दाखविले आहे. (ख) 'जननी जनक बंधु सुत नारी । तन-धन-भवन-सुहृद-परिवारीं ।। जी ममता ते धागे जमवुनि । वळुनि दोरि मन मम पदिं जखडुनि ।। समदर्शी इच्छा मुळिं नाहीं । हर्ष शोकभय मनिं नहि काहीं ।। असे संत हृदिं वसति मम कसे । लोभी हृदयीं वसे धन जसें ।।' (५।४८।४-७) असे प्रभूंनी बिभीषणास म्हटले आहे. (ग) श्रीरामगीतेत सर्वसामान्य भक्त लक्षणांत याचा समावेश प्रभूंनीच केला आहे. 'माय बाप गुरु बंधु देव पति । सकल मला जाणुनि दृढ सेवति' (३।१६।१०) या व लक्ष्मणवचनांतील 'गुरु' विद्यागुरु आहेत. सद्गुरु घेता येत नाहीत कारण माता-पिता गुरु असा श्रेष्ठतेचा उतरता क्रम आहे.

**ल.ठे.** या प्रकारच्या भक्तांत ही भावना सहज असते व इतरांस भक्तिमार्गाचे आक्रमण करताना ती क्रमक्रमाने मिळते इतकाच फरक. असेच इतर सर्व प्रकारांतील महत्त्वाच्या आवश्यक लक्षणांचे असते. भक्तीच्या अनेक साधनांपैकी कोणते तरी एक दृढ झाले म्हणजे बाकीची आवश्यक सर्व लक्षणे रामकृपेने आपोआप प्राप्त होतात हे प्रभूंनी शबरीस केलेल्या उपदेशांत सुचविलेले आहे.

(७) **मन मंदिर** - दो. १२९ मधील टीका पहावी.

***हिं.*** *। अवगुन तजि सब के गुन गहहीं । बिप्र धेनु हित संकट सहहीं ।।१।।*
*। नीति निपुन जिन्ह कै जग लीका । घर तुम्हार तिन्ह कर मनु नीका ।।२।।*

***म.*** *। अवगुण तजुनि सबगुणां ग्रहती । विप्र-धेनु-हित संकट सहती ।।१।।*
*। नीति निपुण आदर्श जगाला । तन्मन शुभ निज सदन तुम्हांला ।।२।।*

**अर्थ** - जे अवगुणांचा त्याग करून सर्वांच्या (दुसऱ्यांच्या) गुणांचे ग्रहण

करतात. (घेतात) आणि विप्र व धेनूंच्यासाठी संकटे सहन करतात.॥१॥ व नीतिनिपुण म्हणून जे जगाला आदर्श असतात, त्यांचे चांगले (शुभ) हृदय (मन) तुम्हाला आपले स्वतःचेच घर आहे. (तेथे तिघांनी रहावे.)॥२॥

**दहावे भवन - टीका. चौ. १ - (१) अवगुण तजुनि** - इतर कोणाचेही अवगुण = दोष दिसल्यास ते आपल्यात आहेत की नाहीत हे नीट शोधून, असल्यास स्वतःच्या अवगुणांचा त्याग - करतात व दुसऱ्यांच्या अवगुणांचे चिंतन, वर्णन, चर्चा करीत नाहीत. परदोषदर्शन व वर्णन हे खलांचे लक्षण आहे. **'परदोषां लक्षिति सह साक्षी' 'वर्णी सहस्त्रमुखिं परदोषा'** (१।४।४,८) **'पाप पिशुनते सम कीं आन'** (७।११२।१०) **पिशुनता = परदोषवर्णन. येथे सुचविले आहे की स्वतःच्यात अवगुण-दोष नाहीत असे कोणी समजू नये. (क) सबगुणां ग्रहती** - सर्वांच्या ठिकाणचे गुण घेतात. याने प्रथम सुचविले की **प्रत्येक स्थावर जंगम वस्तूंत - इतरांनी घेण्यासारखे काही सद्गुण असतातच. 'जड चेतन गुण दोषमय कर्ता निर्मि जगास ॥ संत हंस गुण घेति पय त्यजुनि जला दोषांस'** (१।६) **'विधीप्रपंच गुणाऽगुण मिश्रित:'** (१।६।४) दुर्गुण, दोष हे अविद्येचे लक्षण आहे व सद्गुण हे विद्येचे लक्षण आहे. जे अवगुणांचा (स्वतःच्या व इतरांच्या) त्याग करतील ते अविद्येतून सुटतील व जे सद्गुणांचे ग्रहण करतील ते विद्या-ज्ञान-संपन्न होऊन भवसागरातून तरून जातील. **'संत असंत गुणागुण कथिले । ते न पडति भविं जिहिं मनिं धरिले'** (७।४१।८) **(२) विप्रधेनु-हित - 'विप्रधेनु'** शब्दांनी 'विप्रधेनुसुरसंत' यांचे ग्रहण येथे केले पाहिजे. **'विप्रधेनुसुरसंतहित धरिति मनुज अवतार'** (१।१९२) असे भगवान करतात. **'राम भक्तहित मानव तनुधर । सहुनि संकटें संतां सुखकर'** (१।२४।१) येथेही 'विप्रधेनुहित संकट सहती' आहेच. या तीन वचनांच्या समन्वयाने हा भाव निघतो की असे संत-भक्त सुद्धा कोणाचे तरी अवतारच असतात. **'गोभिर्विप्रैश्च वेदैश्च सतीभिः सत्यवादिभिः ॥ अलुब्धैर्दानशीलैश्च सप्तभिर्धार्यते जगत् ॥' (क) संकट सहती** - कायिक, वाचिक, मानसिक, आर्थिक वगैरे सर्व प्रकारची संकटे, दुःख, कष्ट, दैन्य, अपमान इ. सर्व सोसतात पण विप्रादिकांचे हित करतात. ज्या भगवंताची भक्ति करावयाची त्यांनी जर विप्रधेनुसुर संत यांच्या हितासाठी नानाविध संकटे आनंदाने सोसली;

तर मग त्यांचे भक्त होऊ इच्छिणाऱ्यांनी सोसलीच पाहिजेत. न सोसतील तर भक्त नव्हेत. बिभीषणाच्या उदाहरणावरून हे अधिक स्पष्ट होईल.

**चौ. २ - (१) नीतिनिपुण आदर्श जगाला** - **नीति** दोन प्रकारची असते. एक धर्मनीति व दुसरी राजनीति. **(क)** 'धर्मनीति शिकविणे तयाला' (१।७२।७) '**नीति धर्म मी पाळित असतो**' (६।२२।४) हे धर्मनीतीचे उल्लेख आहेत. 'नीतिविरुद्ध, न वधणें दूता' (५।२४।७) 'राजनीति राखिति सुरपाते' (४।२३।१३) ही राजनीतीची उदाहरणे आहेत. पुष्कळ वेळा राजनीति व धर्मनीति यांत विरोध उत्पन्न होतो, त्या वेळी **धर्माचा बिघाड न करता जो राजनीतिचे पालन करू शकेल तो नीतिनिपुण (ख)** तसेच अर्थ धर्म व काम यात विरोध येईल त्या वेळी अर्थाला धर्म-अविरोधी ठेवणे व कामाला अर्थधर्म-अनुकूल ठेवणे, आणि अर्थ धर्म काम यांना मोक्ष अविरोधी ठेऊन मोक्षाला भक्ति अनुकूल ठेवणे यांत **उत्तमोत्तम नीतिनिपुणता आहे. 'नीतिनिपुण तो परम** शहाणा । श्रुति-सिद्धान्त सुज्ञ तो जाणा ॥ **भजे त्यजुनि छल जो रघुवीर** ॥' (७।१२७।३-४) असे उमापति उपसंहारांत म्हणतात.

**(२) आदर्श जगाला** - जो अति प्रसिद्ध असेल तोच आदर्श समजला जातो; व लोक त्याचे अनुकरण करतात. लीका = लीक - रेषा, = गणना; श्रेष्ठ म्हणून प्रसिद्धि; प्रमुखांत गणना; म्हणून मराठीत आदर्श शब्द घातला. **'यद्यदाचरतिश्रेष्ठः तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥'** (भ.गी.) म्हणून आदर्श शब्द घातला.

**दहाव्या प्रकारच्या भक्तांचे उदाहरण बिभीषण; सुंदरकांडांत उत्तरार्धात आहे. (१) अवगुण त्याग व गुणग्रहण** - रावण, कुंभकर्ण, शूर्पणखा इत्यादी दुष्ट निशाचर नातेवाईक ! त्यांच्या संगतीत राहून 'दशनामधिं जशि जीभ' त्यांच्या अवगुणांना बाजूस ठेऊन, त्यांची तपश्चर्या, निर्भयता, शौर्य, वीर्य, भक्ति (शिवाची) इत्यादी सद्गुणांचे ग्रहण केले; म्हणूनच भगवंतांनी विचारले की **'खलमंडलि' दिनरात बसतसां । सखे ! धर्मनिर्वाह तरि कसा'** (५।४६।५) खलांच्या संगतीने धर्म, सद्गुण यांचा विघात होतो म्हणून प्रभूंनीच सांगितले आहे की – **'अतां असंतस्वभाव ऐका । चुकुन हि संगति कधीं करूं नका'** (७।३९।१). बिभीषणने

हनुमंतास सांगितले 'पहा पवनसुत अमचि राहणी । जेवीं जीभ बिचारी दशनीं' (५।७।१). बत्तीस दातांच्या बत्तीस दुर्गुणांपैकी जीभ एकही दुर्गुण कधी घेत नाही. (टी.प.).

(२) **विप्रधेनुहित संकट सहती** - मशका एवढे लहान रूप घेऊन रात्रीसुद्धा हनुमंताला पहारा चुकवून लंकेत प्रवेश करता आला नाही. जेथे विप्रधेनु ही राक्षसांची न्याहरी होती त्या लंकेत हनुमान विप्ररूपाने बिभीषणास भेटण्यास गेले असता केवळ - विप्रप्रेमामुळेच बिभीषणाने त्यांस आश्रय दिला. याचा परिणाम शिक्षा वगैरे काय होईल ही कल्पनासुद्धा त्याला शिवली नाही. प्राणसुद्धा खर्ची पडण्याची भीती होती पण ब्राह्मण पाहताच आत घेतला. **'ऐकवि वचनां विप्र बनोनी । श्रवत बिभीषण येति उठोनी ॥ कुशला पुसलें प्रणाम करुनी । विप्र वदा निज कथा वर्णुनी'** (५।६।५-६)

(३) **नीतिनिपुण आदर्श जगाला** - **'मी जाणें तुमची सब रीती । अति नय निपुण न रुचें अनीती ॥'** (५।४६।६) असे सर्वज्ञ सर्वदर्शी रामरायांनीच म्हटले आहे. **'तात ! अनुज तव नीतिविभूषण । धरा मनीं जें कथित बिभीषण'** (५।४१।२) असे रावणाच्या आजोबाने माल्यवंताने रावणास सांगितले आहे. आणखी पुष्कळ उदाहरणे आहेत.

*हिं.* *। गुन तुम्हार समुझइ निज दोसा । जेहिं सब भाँति तुम्हार भरोसा ॥३॥*
*। राम भगत प्रिय लागहिं जेही । तेहि उर बसहु सहित बैदेही ॥४॥*
*म.* *। गुण तुमचे समजे निज दोषां । ज्या तुमचा सर्वस्वि भरोसा ॥३॥*
*। राम-भक्त वाटती प्रिय जया । वसा ससीता त्याचे हृदयां ॥४॥*

**अर्थ** - (स्वतःच्यांत असतील) तितके सर्व गुण तुमचे दोष (असतील) तितके स्वतःचे समजतो व ज्याला सर्वस्वी (सर्व बाबतीत) तुमचाच भरवसा वाटतो - ॥३॥ व ज्याला राम भक्त प्रिय वाटतात त्याच्या हृदयांत (हृदयां) तुम्ही सीतेसह (व लक्ष्मणासह) वास करा.॥४॥

**अकरावे भवन - टीका.** (१) मनुष्याची साधारण प्रवृत्ति अशी असते की चांगले असेल व चांगले केले असेल ते मी स्वतः संपादिलेल्या गुणांच्या, शक्तीच्या बळावर केले, मिळविले असे वाटते. जे वाईट घडेल, चुका, दोष, अपराध

वगैरे घडतील ते सर्व तो इतर कोणाच्या तरी माथी मारत असतो; किंवा म्हणतो की ईश्वराच्या इच्छेने, प्रारब्धाने वगैरे ते घडले. आपल्या ठिकाणी काही दोष आहेत असे बहुधा कोणासच वाटत नाही. मग मान्य करणे कोठले? हा केवळ व'था अहंकाराचा व अज्ञानाचा परिणाम असतो. पण जे विवेकी सुविचारी असतात व स्वतःचे अन्तर्निरीक्षण करतात त्यांची खात्री होते की - **(क) गुण तुमचे** - जे काही थोडे सद्गुण आहेत ते ईश्वराच्या कृपेने मिळालेले आहेत. ते ईश्वराचेच आहेत, माझे नाहीत. **(ख) दोषां निज समजे** - जे दोष, अवगुण, दुर्गुण आहेत ते मी स्वतः अविचाराने, कुसंगतीने, कुविचारांनी मिळविले आहेत व अविचाराने सांभाळून ठेवले आहेत. काही माझे स्वभावदोष आहेत. असे वाटू लागले म्हणजे अहंकाराचा नाश व लीनतेची प्राप्ति रामकृपेने होऊ लागली असे समजावे.

(२) **ज्या तुमचा सर्वस्वि भरोसा** - हे लक्षण पूर्वी चौथ्या व सातव्या प्रकारांत आहे. (१२९।४; १३०; ४-५ पहा.) मी अमुक करीन, मिळवीन असे त्यांस वाटत नाही. माझ्यातील दोष, दुर्बलता, न्यूनता भगवान दूर करतील तरच होतील. त्यांनी कृपा केली म्हणजे सर्व होईल. मी जरी मूर्ख, अवगुणी, पापी असलो तरी मी भगवंताचा आहे. निःस्वार्थी मातेप्रमाणे ते माझे संरक्षण करतील व निःस्वार्थी जनकाप्रमाणे तेच माझे पूर्ण हित करतील. जे सुख दुःख प्राप्त होते तो माझ्या प्रभूचा प्रसादच असतो; असे त्याला वाटते. पण अशा वृत्तीने ताठा, इतरांबद्दल बेपर्वाई, तिरस्कार इ. उत्पन्न होण्याचा संभव असतो म्हणून -

(३) **रामभक्त वाटती प्रिय जया** हे लक्षण पाहिजे. **'भक्त मला प्रिय संतत'** असे भगवान म्हणतात. भगवंताला जे प्रिय असते, ते ज्याला प्रिय वाटते तो भगवत्प्रिय होतो. **(क)** रामभक्त म्हणजेच संत, साधु, गुरु यांच्यावर प्रेम केले की रामभक्ति सहज प्राप्त होते. **'संतचरणपंकजिं सुप्रेमा'** (३।१६।१) ही भक्तिसोपानातील सहावी पायरी भगवंतांनीच सांगितली आहे. ही पायरी चढली गेली की शेवटची सातवी पायरी 'मन तन वचन भजन दृढ नेमां' (३।१६।९) ही सहज चढता येते.

**११ व्या प्रकारचे उदाहरण जलनिधि; लंकाकांड पूर्वार्धात आहे.**

या चरित्राचा बराच भाग सुंदरकांडाच्या अगदी शेवटी आहे व त्याचा संदर्भ **'श्रवुनि सिंधुवचन राम - म्हणति ॥... करा सेतु कटकें तरति'** असा लंकाकांडाच्या मंगलाचरणात घेतला आहे. सिंधुवचनानुसार कार्यास आरंभ होऊन ते पूर्ण झाले आहे.

**(१) गुण तुमचे समजे इ.** - 'गगन समीर अनल जलधरणी । यांची नाथ सहज जड करणी' (५।५९।२) पासून 'प्रभु - आज्ञा श्रुति वदति अभंगा' (५९।८) पर्यंत पहिले लक्षण अगदी स्पष्ट आहे. **(क) ज्या तुमचा सर्वस्विं भरोसा - 'प्रभूप्रतापें सुकेन मी जरी । जाइ चमू, नहि मम महती तरि'** (५।५९।७) **'या बाणें उत्तरतटवासी । वधा नाथ ! खल नर अघराशी'** (५।६०।५) **(ख) रामभक्त वाटती प्रिय जया -** रामभक्त हनुमंताला सागरलंघन करताना विसावा मिळावा म्हणून स्वतः जाऊन मैनाकाला प्रार्थना केली आहे. (५।१।९ टी.प.) पण त्याच सागराने प्रभु रामचंद्रांना चटकन दर्शनसुद्धा दिले नाही. तीन दिवस प्रायोपवेशन करून प्रार्थना करीत राहिले तरी दर्शनाला आला नाही. यावरून भगवंतापेक्षा त्याला रामभक्त अधिक प्रिय वाटला हे ठरले.

*हिं.* *। जाति पाँति धनु धरमु बड़ाई । प्रिय परिवार सदन सुखदाई ॥५॥*
*। सब तजि तुम्हहि रहइ उर लाई । तेहि के हृदयँ रहहु रघुराई ॥६॥*

*म.* *। जात गोत धन धर्म महत्ता । प्रिय परिवार सुखद गृह सत्ता ॥५॥*
*। जो त्यजि सकल तुम्हां हृदयीं धरि । त्याचे हृदिं रघुराज रहा तरि ॥६॥*

**अर्थ** - जात, गोत, धन, धर्म, मोठेपणा (प्रतिष्ठा) प्रियजन, परिवार, सौक्षयदायक घर, सत्ता - ॥५॥ इत्यादी सर्व सोडून ज्याने तुम्हाला हृदयांत धारण केले असतील त्याच्या हृदयांत रघुराज तुम्ही (सीतालक्ष्मणासह) रहा.॥६॥

**बारावे भवन - टीका. (१) जात गोत (त्यजि)** - या वचनाचा अर्थ जर शब्दशः घेतला तर धन, प्रियजन, परिवार, सदन इत्यादी सर्वस्वाचा प्रत्यक्ष त्याग केला पाहिजे हे ओघानेच मान्य करावे लागेल. व तो प्रत्यक्ष वस्तुस्थितीशी, तुलसीदासांच्या इतर वचनांशी (प्रकार ४ व १ चे उदारहरण, तसेच ७ चे उदाहरण सुग्रीव पहा) व इतिहासाशी असंबद्ध ठरेल. तुकाराम, गोरा, सांवता, चोखा, रोहिदास, नरहरि, नरसी मेहता, जनक राजा, दशरथ, भरत, अत्रि

इत्यादी कोणीही जात-गोत व धर्म यांचा त्याग केला नव्हता व स्वतः तुलसीदासांनी जात-गोत व धर्म यांचा त्याग केला नव्हता. (क) भावार्थ हा आहे की यांच्या विषयीची ममता व अहंकार यांचा त्याग करणे जरूर आहे. 'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज' (भ.गी.) याचा जो अर्थ तोच येथे आहे. त्यांच्या विषयी ममता, चिंता, चिंतन इ. मनात कधीही उत्पन्न होता उपयोगी नाही.

(२) **धर्म** - एकाच व्यक्तीला एकाच दिवसात अनेक प्रकारच्या धर्मांचे पालन करावे लागते. उदा. पुत्रधर्म, पितृधर्म, सेवकधर्म, स्वामी धर्म, राजधर्म, प्रजाधर्म, मित्रधर्म, शत्रुधर्म इ. इ. या सर्व धर्मांचा प्रत्यक्ष त्याग करावयाचा तर मग मानव धर्माचाही त्याग करावा लागेलच आणि देह असेपर्यंत पशुधर्म, राक्षसधर्म इत्यादींचा आश्रय करावाच लागणार; म्हणून धर्मत्याग म्हणजे वर दाखविल्या सारख्या कोणत्या तरी धर्माचे आचरण करीत असता त्या धर्माची ममता, अहंकार, राग, द्वेष इत्यादींचा त्याग असाच अर्थ करणे भाग आहे. श्रीमद् भाग. ११।१२।१४-१५ वरील नाथमहाराजांच्या ओव्या पहाव्या. अन्यथा खाणे पिणे, उठणे बसणे, देणे घेणे, पाहणे ऐकणे इत्यादीसुद्धा इंद्रियांचे धर्मच आहेत; त्यांचाही त्याग करण्याची पाळी येईल !

(३) **तुम्हां धरि हृदयीं** - जो सतत तुमचेच चिंतन करीत असतो, ध्यान करीत असतो वगैरे 'मत्कर्मकृत् मत्परमो' 'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु' 'मदर्थमपि कर्माणि कुर्वन्' (भ.गी.) इत्यादी वचनांप्रमाणे ज्याची मनबुद्धींद्रिये, देह, सतत रामचिंतनादिकांतच रमतात असा जो रामचंद्रानुरागी असेल त्याच्या हृदयांत तिघांनी रहावे.

**१२ व्या प्रकाराचे उदाहरण वानर गण; लंकाकांड उत्तरार्धात आहे.**

सर्व वानरसेनेने रामकार्यासाठी सर्वस्वाचा त्याग करून विना मोबदला आपले प्राण पणास लावले. नंतर रामाज्ञेने घरी परत गेले आहेत. प्रभूंनी त्यांची प्रशंसा केली तीसुद्धा त्यांना नको होती; त्यांना फार संकोच वाटला. 'तुमच्या बळें मारिला रावण । राज्यीं स्थापित सखा बिभीषण ।। आतां निज निज गृहिं तुम्हिं जावें । स्मरा मजसि कोणा ना भ्यावें ।। ऐकुनि हें प्रेमाकुल वानर । पाणी जोडुनि वदले सादर ।। प्रभु ! जें बोला तुम्हां शोभतें । ऐकुनि अमचें चित्त

मोहतें ॥' (६।११८।४-७). यांच्याच पैकी ज्यांना अयोध्येत नेले होते त्यांना उद्देशून राम म्हणाले आहेत. 'मम हितार्थ इहिं जन्म वेंचला' (७।८।८) 'सेवा केली तुम्हीं मम अती ॥ त्यक्त मदर्थ सदनसौख्याला । प्रिय तुम्हिं यास्तव मज अति झालां ॥ (७।१६।४-५) 'विस्मृत गृह, ना स्वप्नि आठवण' अशी त्यांची स्थिति होती.

*हिं.* *। सरगु नरकु अप बरगु समाना । जहँ तहँ देख धरें धनु बाना ॥७॥*
*। करम बचन मन राउर चेरा । राम करहु तेहि कें उर डेरा ॥८॥*

*म.* *। स्वर्ग नर्क अपवर्ग समानहि । बघे सर्व थळिं धृत धनुबाण हि ॥७॥*
*। किंकर तुमचा मनकृतिवचनें । राम ! हृदीं त्या डेरा करणें ॥८॥*

**अर्थ** - ज्याला स्वर्ग, नर्क व अपवर्ग (मोक्ष) सारखे वाटतात व जो सर्वत्र धनुष्य बाणधारी (आपल्यालाच) पाहतो; आणि कर्माने, मनाने व वाणीने जो तुमचा दास आहे (असेल) त्याच्या हृदयांत राम ! आपण आपले शिबिर (डेरा) करा.॥७-८॥

**तेरावे भवन - टीका** - (१) **स्वर्ग** - हे इंद्रलोकापासून ब्रह्मलोकांपर्यंत सात आहेत. तथापि स्वर्ग शब्दाने मुख्यतः इंद्रलोक समजला जातो. तेथे विविध भोग सहज व इच्छेप्रमाणे मिळतात व प्रदीर्घ काळपर्यंत मरण येत नाही म्हणून तेथे राहणारांस अमर म्हणतात. त्यांना जरा (वृद्धपणा) नाही म्हणून निर्जर म्हणतात. पण तेथेसुद्धा रागद्वेषादि सर्व द्वंद्वे आहेतच. ज्यांना विषयभोगांची इच्छा नाही त्यांना स्वर्ग लोकाचे विशेष काय वाटणार ! ज्यांना सुख दुःख समान वाटतात ते स्वर्गातील सुखाची इच्छा का करतील व नर्कातील दुःख नको, नर्क नको असे त्यांना का वाटेल? रामरूप दर्शनाने, कथाश्रवणाने ज्यांना ब्रह्मानंदापेक्षा अधिक आनंद मिळतो ते मोक्षसुखाची पर्वा का बाळगतील? 'न परिलषन्ति केचि दपवर्गमपीश्वर ते' (भाग. वे. स्तु.) जिथे जिथे जातील, दृष्टी जाईल तिथे सर्वत्र सर्वदा धनुर्बाणधर रामलक्ष्मणच दिसत असल्यामुळे 'सुखमय सदा तयां सब आशा (दिशा).'

(२) येथे नर्क शब्द स्वर्ग व अपवर्ग यांच्यामध्ये घातला आहे. सप्तप्रश्न विवरणांत 'नर्क नाक (स्वर्ग) अपवर्ग' असा उत्तरोत्तर श्रेष्ठता दाखविणारा

क्रम आहे. येथे हा गूढ भाव प्रगट केला आहे की स्वर्गात व अपवर्गात रामभक्ती नसेल आणि धनुर्बाणधारी राम सर्वत्र दिसत नसेल तर ते यांस नर्काप्रमाणेच दुःखद वाटतात. नर्कात नाना यातनाच असतात व स्वर्गातसुद्धा सुख नाहीच दुःखच आहे. लंकाकांडांत सर्व देवांनी ब्रह्मदेवाने व इन्द्राने केलेल्या स्तुती पहाव्या. **'आम्हि परम अधिकारी देवता । प्रभो ! स्वार्थरत भक्ति विस्मृता ॥'** असे सर्व देव म्हणाले; व भक्ति विस्मरणाचा परिणाम तेच सांगतात. **'संतत अम्हीं पतित भवनदीं ॥'** (६।११०।११-१२) ब्रह्मदेव म्हणतात. **'धिग् जीवन देव शरीर हरे । तव भक्ति विना भव भूलिं खरे' 'कृतकृत्य विभो सब वानर हे । निरखीति तवानन सादर हे'** (६।१११।९) हे ब्रह्मलोकांतले सुख की दुःख? देवराज इंद्र म्हणाले - 'होता मला स्वभिमान । नहि कोणि मज किं समान ।।' (६।११३।६) जेथे अभिमान, अहंकार आहे तेथे दुःख असणारच. 'अहंकार अर्बुद अति दुःखद (७।१२१।३५) अर्बुद = कॅन्सर रोग !

(२) **मोक्षसुख तरी शाश्वत** असतं **की नाही हे** आता पाहू. **'स्थळविण जळ कधिं राहुं न शकतें । यत्न कोटिही करुन विविध ते ॥ तसें मोक्षसुख बघ खगराया । टिकुं न शके हरिभक्ति विना या ॥** (७।११९।५-६) **'हें समजुनि हरिभक्त सुज्ञ जे । मुक्ति अनाद्रिति भक्ति लुब्ध ते'** 'येऽन्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिनः त्वय्यस्तभावादविशुद्ध बुद्धयः ।। आरुह्य कृच्छ्रेण परंपदं ततः पतन्त्यधोऽनादृत युष्मदङ्घ्रयः' (भाग) भक्तीची उपेक्षा करणारे **परंपदाला** (मोक्षाला) **गेलेले पतन पावतात** हे वरील श्लोकाचे सार आहे. सगुण स्वरूपाचे स्मरणभजनादिक न होणे हीच मोठी विपत्ति आहे असे हनुमान म्हणतात. 'तीच विपत् प्रभु ! हनुमान् म्हणती । स्मरण भजन तव यदा न घडती' (५।३२।३). 'या सम हानि असे कीं जगतीं । नरतनु मिळुनिहि राम न भजती' (७।११२।९) स्वर्गात भजन, भक्ति घडत नाही हे सर्व देवांनी व ब्रह्मदेवाने पण सांगितले आहे. मग जेथे महाहानि व महाविपत्ति आहे ते सप्त स्वर्ग नर्कासारखेच यांत नवल काय? व यांत संशय काय? मोक्षातसुद्धा भगवत्स्मरण भजन नाहीच व पतनाची भीती असतेच; मग ते सुख काय कामाचे व ज्याला सदा सर्वत्र धनुर्बाणधारी राम दिसू लागले त्याला या तिघांत फरक तो काय वाटणार !

(४) **बघे सर्व थळिं धृतधनु बाण हिं** - सर्व चराचर सृष्टी सगुण साकार राममय दिसू लागते. 'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म' (तुकोबा) **(क) मन कृति वचनें तुमचा किंकर** - कृतीने - कर्माने, मनाने व वाणीने रामचंद्रांची दास्य भक्ति करतो. **(ख) राम ! हृदीं त्या डेरा करणें - डेरा =** शिबिर, तंबू हे निवासस्थानच असते; पण इकडून तिकडे नेता येण्यासारखे असते. हे भक्त म्हणजे जंगम तंबूच. हे स्वर्गात गेले तरी इन्द्रादि ब्रह्मलोकावधि देवांना हरिचरित्र वर्णन करून सांगतील. नर्काजवळून जाताना तेथील दुःखी, कष्टी अभागी जीवांना हरिलीला हरिनामश्रवण करवितील व हरिकथा श्रवण करण्यासाठी मृत्युलोकात सुद्धा वारंवार येतील. **ल.ठे.** अशा रीतीने स्वर्गादि विविध लोकांत व विविध स्थळीं जाऊन त्रिविध भक्तीत रंगणारांच्या हृदयाला सदन, गृह, गेह, भवन, मंदिर इत्यादी प्रकारचा कोणताही शब्द वापरला असता तरी डेरा या शब्दाने जो भाव प्रगट होऊ शकतो तो झाला नसता. अशा प्रकारचे मानसांतील उदाहरण पाहिले म्हणजे अर्थ अधिक स्पष्ट होऊन आनंदवृद्धि होईल.

**तेराव्या प्रकाराचे उदाहरण सनकादिक; उत्तरकाण्ड पूर्वार्धात आहे.**

**सनकादि =** (१) सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे ब्रह्मदेवाचे मानसपुत्र; नेहमीचे निवासस्थान ब्रह्मलोक. हे सर्व लोकांत गमन करतात (वैकुंठात सुद्धा). '**ब्रह्मानंदिं सदा लयलीन** । बघतां बालकं, बहुकालीन ।। समदर्शी मुनि विगत विभेदहि ।। दिशा वसन, **हें व्यसन तयांप्रति । रघुपतिचरित कथिति तिथं ऐकति ॥'** (७।३२।३-६ पहा) (२) **मन कृति वचनें तुमचा किंकर - 'नारदादि सनकादि मुनीश्वर । दर्शन लागिं कोसलाधीश्वर ॥ प्रतिदिन सकल अयोध्ये येती'** (७।२७।१-२) उ.कांड ३४।३५ मध्ये यांनी प्रभूची स्तुती करून चार वेळा (प्रत्येकाने एकदा) अनपायिनी भक्ति मागितली आहे. **'होते हे सनकादि - भवानी ! । मुनिवर कुंभज जेथें ज्ञानी ॥ रामकथा मुनिवर बहु वर्णी'** (७।३२।७-८) रामकथा श्रवण करण्यासाठी ब्रह्मलोकांतून मृत्युलोकांत येतात. याने सगुणकथांची रति दिसून येते.

***हिं.दो.*** ***। जाहि न चाहिअ कबहुँ कछु तुम्ह सन सहज सनेहु ॥***
***॥ बसहु निरंतर तासु मन सो राउर निज गेहु ॥१३१॥***

*म.दो. । नको कधिंहि काहीं जया तवपदिं सहजीं स्नेह ॥*
*॥ वसा निरंतर तया मनिं तें अपलें निज गेह ॥१३१॥*

**अर्थ** - ज्याला कधींही काहीही नको असते व तुमच्या चरणी (तुमच्यावर) ज्याचा सहज स्नेह असतो त्याच्या हृदयांत तुम्ही निरंतर रहा; ते तुमचे स्वतःचेच घर होय.।।दो.१३१।।

**चौदावे भवन - टीका.** - (१) **नको कधिंहि कांहीं** - रामभक्तीशिवाय इतर कोणतीच गोष्ट ज्यास नको असते; फक्त भगवत्प्रेम पाहिजे असते. कीर्ति, स्वर्गमोक्ष सुद्धा नको असतात. केव्हाही कोणत्याही परिस्थितीत, महासंकटात सुद्धा इतर काही इच्छा होतच नाही. म्हणजे त्रिविध एषणा पूर्णपणे नष्ट झालेल्या असतात. (क) **सहजीं स्नेह** - रामावर प्रेम करणे हा त्यांचा सहज स्वभाव असतो. तो स्नेह सोडावयाचा, टाकावयाचा म्हटले तरी टाकता येत नाही. सूर्य उगवला की कमळे फुलणे व दिवस सुरू होणे या गोष्टी सहज स्वाभाविक आहेत. त्यांत सूर्याला किंवा कमळांना बदल करता येत नाही; तसा हा स्नेह असतो. शिशूचे मातेवर जन्मतांच व लहानपणी स्वाभाविक प्रेम असते. पण ते मोठेपणी टिकतेच असे नाही. तसे यांच्या स्नेहाचे होत नाही.

(२) **अपलें निज गेह** - आपले स्वतःचेच घर. स्वतःच्या घरात निरंतर राहण्यास संकोच वाटत नाही व कंटाळा येत नाही. जेथे घरात राहणाऱ्या व्यक्तींत सहज स्नेह नसेल तेथे राहणाऱ्या प्रत्येकाला ते स्वतःचे घर असे वाटणार नाही. भाव हा की त्याचे हृदय व आपले हृदय यांत पूर्ण ऐक्य असणार. 'साधवो हृदयं मह्यम् ॥ मदन्यत्ते न जानन्ति नाहं तेभ्यो मनागपि' (भाग.) ल.ठे. येथील निरंतर शब्द बाकीच्या तेरा ठिकाणीही घेणे जरूर आहे. सतत, अखंड, रात्रंदिवस रहा व सीता आणि लक्ष्मणासह रहा.

**१४ व्या प्रकारांचे उदाहरण काकभुशुंडी; उत्तरकाण्ड - उत्तरार्धात आहे.**

सहज स्नेह - काकभुशुंडीचा रामस्नेह एका जन्मांतला नसून अनेक पूर्वीच्या जन्मातसुद्धा तसाच होता हे 'तिर्यक् सुरवर जी जी तनु धरुं । तिथें रामभजनातें अनुसरू' (७।११०।१) पासून 'लागे रघुपतिचरणिं मन स्मरुनी गुरु वचनास ॥ गात रामयश फिरूं नव प्रीती क्षणोक्षणास' (७।११०।-) पर्यंत सविस्तर वर्णन

केले आहे. **'त्रिविध एषणा गेल्या गाढहि'** असे त्यांतच सांगितले आहे. (क) 'काक भुशुंडी माग वर मी प्रसन्न अति जाण ॥ अष्ट सिद्धि ऋद्धि सकल मोक्ष सकल सुख खाण' (७।८३ म) असे भगवंतांनी मागण्यास सांगितल्यावरसुद्धा त्याने भक्तीशिवाय काहीही मागितले नाही !

**उपसंहार** - या प्रमाणे मुनिश्रेष्ठांनी चौदा स्थाने - भवने सांगून भक्तांचे १४ प्रकार दाखविले. असे असले तरी टीकेत उपक्रमांतच दाखविले आहे व मधे मध्येही दाखविले आहे की हे विभाग म्हणजे - खंदकांनी वेढलेले व मजबूत तटबंदीने एकमेकांपासून पूर्ण विभक्त केलेले चौदा डोंगरी किल्ले नव्हेत. प्रकृति, परिस्थिति, संस्कार, देश, काल, ईश्वरेच्छा इत्यादी भेदांमुळे, कोणांत काही लक्षणे विशेषत्वाने दिसतील तर कोणात काही दिसतील. परंतु रामभक्ति प्राप्त झाल्यानंतर, इतरत्र वर्णन केलेली संत = साधु = ज्ञानीभक्तांची लक्षणे सर्वांच्या ठिकाणी असणारच. अरण्यकाण्डांत ४५।६ पासून ४६ पर्यंत; रामगीतेत १६।२ पासून १६ अखेर आणि उत्तर काण्डात ३७।६ पासून ३८ अखेर प्रभूंनीच सांगितलेली सर्व लक्षणे प्रत्येक प्रकारच्या भक्तांत नसतील तर ती प्रभूंनी सांगितलेली लक्षणे मिथ्या ठरतील. 'ज्यांत वसति ही सर्व लक्षणें । खरा सदा तो संत जाणणें' (७।३८।७) असे प्रभूंनीच स्पष्ट म्हटले आहे.

(२) सीतासौमित्रीसहित काही काळ राहण्यासाठी स्थान विचारले, त्या शब्दांचा फायदा घेऊन किंचित विनोदयुक्त प्रेमाने ही चौदा भवने म्हणजे जणू १४ भुवनेच दाखविली व काही काळ राहू असे म्हटले असता या दोह्यांतील 'निरंतर' शब्दाने सांगितले की काही काळ राहून भागणार नाही, सदासर्वकाळ अखंड राहिले पाहिजे. संत = भगवद्‌भक्त = साधु लक्षणे सांगण्याचा हा एक प्रकार अद्‌भुत आहे. आध्यात्मिक व आधिदैविक दृष्टीने स्थान सांगून आता या वर्णनाचा उपसंहार करून आधिभौतिक दृष्टीने स्थान चित्रकूट सांगतील.

*हिं.* *। एहि बिधि मुनिबर भवन देखाए । बचन सप्रेम राम मन भाए ॥१॥*
*। कह मुनि सुनहु भानुकुलनायक । आश्रम कहउँ समय सुखदायक ॥२॥*
*। चित्रकूट गिरि करहु निवासू । तहँ तुम्हार सब भाँति सुपासू ॥३॥*
*। सैलु सुहावन कानन चारू । करि केहरि मृग बिहग बिहारू ॥४॥*

म. *। अशिं भवनें मुनिवरें दाविलीं । प्रेमळ वचनें रामा रुचलीं ॥१॥*
*। मुनि म्हणति श्रुणु रवि कुलनायक । आश्रम सांगुं समयिं सुखदायक ॥२॥*
*। चित्रकूट गिरिं करणें वसती । सब सुख सोइ तुम्हां तिथं असती ॥३॥*
*। शैल सुशोभन कानन चारु । करि केसरि मृग विहग विहारु ॥४॥*

**अर्थ** - मुनिवराने अशी (या प्रकारे) भवने दाखविली व मुनींची प्रेमळ वचने (बोलणे) रामास आवडली.॥१॥ मुनि म्हणाले की रविकुलनायक ! ऐका, (आता) मी सर्व समयी सुखदायक असा आश्रम (आश्रमस्थान) सांगतो.॥२॥ आपण चित्रकूट पर्वतावर निवास करावा; (कारण) तेथे तुम्हाला सर्व प्रकारच्या सुखसोई आहेत.॥३॥ पर्वत सुंदर असून तेथे सुंदर वन आहे व हत्ती, सिंह, हरिणे इ. पशू व पक्षी यांचे ते विहारस्थान आहे.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) अशिं भवनें दाविलीं** - 'हसुनि पुन्हा वाल्मीकी वदले... राम अतां श्रुणु सांगुं निकेतन' असा एक स्थान सांगण्याचा उपक्रम विनोदाने हसून केला. त्याचा उपसंहार येथे केला. सांगितली दाखविली मात्र चौदा भवने म्हणून येथे देखाए = दाखविली हे बहुवचन वापरले. **(क) प्रेमळ वचनें रुचलीं** म्हणण्यात भाव जरी विनोदाने मुनि बोलले तरी त्यांचे भाषण प्रेमसुधारसमय असल्याने राम मनात खुष झाले. उपक्रमात 'वचन सुमधुर सुधारस भरलें' (१२८।२) असे म्हटले त्याचा येथे उपसंहार केला.

**ल.ठे. हे प्रकरण** काल्पनिक घातले आहे असे कोणी म्हणतील म्हणून सांगणे भाग आहे की **अ.रा. वाल्मीकींनी अशाच प्रकारे नऊ स्थाने सांगितली आहेत.** येथे त्यांच्याशी तुलना केली असती तर तु.दासांचे प्रेम, काव्यकला कौशल्य इत्यादींचे वैशिष्ट्य दिसले असते; पण आधीच वाढलेला टीकेचा विस्तार कंटाळवाणा होण्याइतका वाढला असता; तरी वाचकांनी तुलना करून पहावी. अ.रा. नऊ स्थानेच का व येथे १४ भवने का याचा विचारही वाचकांवरच सोपविणे भाग आहे.

**चौ. २ - रविकुलनायक** - मागील चौदा भवने सांगताना रवीचा संबंध कुठेच जोडला नाही. रघुनायक, रघुनन्दन, रघुराज इत्यादी रघुवंशाची संबंधदर्शकच नावे वापरली. येथे हे सुचवितात की रविकुलाशी म्हणजे सूर्याशी संबंध असलेले

एक प्रसिद्ध असे तुमचे फार पुरातन पूर्वज तेथे राहतात. ब्रह्मदेव, मरीचि, काश्यप, विवस्वान (सूर्य) आणि मनु (दशरथ) अशी परंपरा आहे; आणि **अत्रि ब्रह्मदेवाचेच मानसपुत्र मरीचीचे भाऊ,** सूर्याचे आजोबा (चुलत) आहेत. तुमच्या मूळ पुरुषाचे आजोबाच तेथे जवळच राहात असल्याने ते तुमची तिघांची सर्व प्रकारे काळजी वाहतील ! यात थोडा प्रेमळ विनोद आहेच. **(क) आश्रम =** आश्रम करण्यास योग्य असे स्थान; जसे भरद्वाजाश्रम स्थान, वाल्मीकि आश्रमस्थान तसेच रामाश्रमास योग्य स्थान. **(ख) समयिं सुखदायक** = सर्व समयी, सर्व काळी व सर्व ऋतूंत सुखदायक. **'कृत निवास चिंतुनि शुभ ठावा। सकल ऋतूंत इथें सुख पावां'** (१३६।४) असे पुढे चित्रकूटाचे भिल्ल कोळी म्हणाले आहेत.

**चौ. ३ - (१) चित्रकूटगिरि** - चित्र = चित्रविचित्र, रमणीय आहेत कूटे, शिखरे ज्याची तो चित्रकूट. नावसुद्धा आकर्षक आहे. निसर्ग सौंदर्याचा विनाश ठिकठिकाणी फारच झाला असला तरी सिद्धपूर, गोकुळ, वृंदावन, अयोध्या, यांच्या पूर्वीच्या सौंदर्याचा जसा आज तेथे मागमूसही नाही तसे तितके चित्रकूटचे झालेले नाही. इतर पौराणिक व ऐतिहासिक स्थानांच्या मानाने पुष्कळच रमणीय आहे. हा पर्वत विंध्याद्रीचा एक भाग असून, आजच्या विंध्य प्रदेशात आहे. मुंबईहून ७८२ मैल असलेल्या जी.आय.पी. रेल्वेच्या **माणिकपूर** स्टेशनपासून, **माणिकपूर-झाशी** रेल्वेच्या रस्त्यावर, **२४ मैलांवर चित्रकूट रे.स्टे. आहे.** तेथून चित्रकूट जवळ आहे. सटना या मुंबई माणिकपूर रेल्वे रस्त्यावरील स्टेशनपासून, **पायवाटेने ३०/३५ मैल आहे.** या वाटेने चित्रकूटला जाताना **'अनसूया'** हे स्थान वाटेत लागते व हे चित्रकूट यात्रेतील एक महत्त्वाचे स्थान आहे. इतकी माहिती येथे पुरे.

**(२) सब सुख सोई असती** - निसर्ग रमणीयता, बारा महिने भरपूर पाणी वहात असणारी नदी, मुबलक कंदमूलफळे, शिकारीला पुष्कळ पशुपक्षी, आजुबाजूस पुष्कळ मुनींचे आश्रम, निशाचरांची वस्ती जवळपास मुळीच नाही; हवापाणीही उत्तम, इतर क्षत्रियोत्तमाला वनवासात आवश्यक अशा सुखदायक होणाऱ्या सर्व गोष्टींची अनुकूलता तेथे आहे. **(क) आज मात्र** उठतां बसतां

पैसा खर्च केल्याशिवाय पाण्याखेरीज दुसरे काही मिळत नाही. यात्रेचे ठिकाण असल्याने सर्वच महाग. रेल्वेची व वाहनांची सोय असल्यामुळे पावित्र्य कमी झालेच; व ते वाढविणे राजसत्तेच्याच हाती असल्याने उपाय सुचवत विस्तार करण्याचा काही उपयोग नाही.

**चौ. ४ (१) शैल सुशोभन कानन चारु** - पर्वताची शोभा त्याची उंची, विशालता, आकार, शिखरे, नद्यानाले व वृक्षादिकांच्यामुळे असते. वनाची शोभा वृक्षलता, पाने, फुलेफळे, पशु, पक्षी, मृग वगैरेंच्यामुळे असते. पुढे चित्रकूटचे रामनिवासापूर्वीचे व नंतरचे वर्णन आहे. आणि भरत-चित्रकूट-प्रवासवर्णनात पुन्हा आहे. गीतावलीत अयो.कां.पदे ४३-५१ यांत फारच बहारीचे वर्णन आहे.

*हिं.* *। नदी पुनीत पुरान बखानी । अत्रिप्रिया निज तपबल आनी ॥५॥*
*। सुरसरि धार नाउँ मंदाकिनी । जो सब पातक पोतक डाकिनि ॥६॥*
*। अत्रि आदि मुनिबर बहु बसहीं । करहीं जोग जप तप तन कसहीं ॥७॥*
*। चलहु सफल श्रम सब कर करहू । राम देहु गौरव गिरिबरहू ॥८॥*

*म.* *। नदी पुनीत पुराणीं वानित । अत्री-प्रिया तपें निज आणित ॥५॥*
*। सुरधुनि-धार नाव मंदाकिनी । जी सब पातक-पोतक-डाकिनि ॥६॥*
*। अत्रि आदि मुनिवर बहु वसती । जप तप योग करित तनु कसती॥७॥*
*। श्रमां सफल सकलांच्या करणें । चलणें राम गिरिहि गौरविणें ॥८॥*

**अर्थ** - तिथे पुराणात वर्णिलेली (पुराणप्रसिद्ध) व अत्रिपत्नी अनसूयेने स्वतःच्या तपोबलाने (स्वर्गातून) आणलेली अशी एक पावन नदी आहे.॥५॥ ती (स्वर्गातील) देवनदीची एक धार (शाखा, प्रवाह) असून तिचे नाव मंदाकिनी आहे. ती सर्व पातकेरूपी शिशूंना भक्षण करणारी डाकीणच आहे.॥६॥ अत्रि आदिकरून पुष्कळ मुनिवर तेथे रहात असून ते जपतपयोगादि साधनांनी देह झिजवीत-कष्टवीत आहेत.॥७॥ राम ! (तेथे) चलावे, सर्वांचे श्रम सफल करावे व त्या गिरीचाही गौरव करावा.॥८॥

**टीका. चौ. ५-६ (१) पुनीत नदी - 'दर्शन मार्जन मज्जन पानें । अघ हरि बदती वेद पुराणें'** (१।३५।१). पुराणात पुनीत - पावन करणारी म्हणून प्रसिद्ध. **(क) अत्री प्रिया =** अत्रिप्रिया, अत्रि ऋषींची पत्नी अनसूया. महाराष्ट्रीयांस

अनसूयेबद्दल विशेष सांगण्याची जरूर नाही. थोडी माहिती अरण्यकाण्डात टीकेत दिली आहे. तिचे नावच तिच्या गुणांचे सार सांगणारे आहे. जिच्या ठिकाणी असूया नाही ती अनसूया. भगवान दत्तात्रेयांनी जिच्या पोटी अवतार घेतला तिचे महत्त्व व तपोबल - कोण वर्णन करणार ! **(ख) तपें निज आणित** - थोडक्यात इतिहास असा आहे. एकदा पुष्कळ वर्षे दुष्काळ पडल्यामुळे पुष्कळ मुनि अत्रींच्या आश्रयास येऊन राहिले होते. त्यांना कंदमूलफल यांचा पुरवठा अनसूया आपल्या तपोबलाने करीत असे. पुढे अत्रि आश्रमात पिण्यास पाणी मिळणे अशक्य झाले तेव्हा अनसूयेने आपल्या तपाच्या सामर्थ्याने स्वर्गातील देवनदी जी मंदाकिनी तिला आपल्या आश्रमाजवळ भूमीवर आणली. 'मंदाकिनी वियद्‌गंगा स्वर्णदी सुरदीर्घिका' अशी स्वर्गातील गंगानदीची नावे आहेत. भगीरथासारखी हजारो वर्षे तपश्चर्या करावी लागली नाही. एका क्षणात, न बोलावताच आली आहे. चित्रकूटापासून ५।६ कोसांवर असलेल्या अनसूया पर्वतावरच आली. तेथून चित्रकूटाजवळ वहात येते. पूर्वी केलेल्या तपश्चर्येपैकी फक्त एका वर्षाच्या तपाचे फळ द्यावे लागले तेव्हा कायम राहिली. ही कथा शिव पुराणात आहे. याबद्दलचा उल्लेख वा.रा. २।११७।९-१३ मध्ये अत्रि ऋषींनी स्वतः केला आहे.

(२) **पातक-पोतक-डाकिनि-** पोतक = बालक; डाकिनी, शाकिनी, लाकिनी हाकिनी वगैरे रुद्रशक्ती आहेत; पण त्यांतील डाकिनीचा संबंध येथे नाही. येथे डाकिनी = डाकीण, लहान मुलांना जिवंत खाणारी एक स्त्रीपिशाच्च, डाकिनी जशी लहान मुलांना खाते तशी मंदाकिनी सर्व पापांचा संहार करते.

**चौ. ७ - (१) 'अत्रि मुनिवर'** - ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकी व सप्तर्षी पैकी एक अत्रि आहेत. 'मरिचिरंगिरा अत्रिः पुलस्त्यः पुलहः क्रतुः ॥ वसिष्ठश्चेति सप्तैते' (अ.व्या.सु.) मरीचि, अत्रि, पुलस्त्य व वसिष्ठ हे सख्खे भाऊ. मरीचि, कश्यप, विवस्वान व मनु अशीही परंपरा आहे. मनूच दशरथ झाले आहेत व दशरथ पुत्र राम. मनु व दशरथ यांत पुष्कळ पिढ्या गेल्या तरी मानसांतील कथेप्रमाणे मनूचा अवतारच दशरथ; म्हणजे मनुपुत्रच राम; म्हणजे मरिचि हे रामचंद्रांचे निपंजोबा व अत्रि आणि वसिष्ठ चुलत निपंजोबा ठरतात. तसेच

पुलस्त्य. पुलस्त्य, विश्रवा व रावण अशी ही एक परंपरा आहे. म्हणजेच रावण रामचंद्राचा चुलत आजोबा ! एकाच मूळ पुरुषापासून वाढलेल्या वंशवृक्षावळीत कसे निरनिराळे प्रकार असतात व कसे विचित्र संबंध येतात हे लक्षात यावे म्हणून हा विस्तार केला. (क) **अत्रि** - अ म्हणजे नाहीत त्रि म्हणजे त्रिगुण, त्रिपुटी, अवस्थात्रय, भेदत्रय इ. जेथे ते. म्हणजेच गुणातीत, अवस्थातीत, इ. झालेले = व्यतिरेक ज्ञानी. बुद्धि असूयारहित = अनसूया झाल्याशिवाय. अत्रि = गुणातीत होताच येणार नाही. (ख) जपतपयोग करुनि **तनु कसती** - जप, विविध तपश्चर्या व योगाभ्यास करीत शरीर कष्टवीत, झिजवीत आहेत.

**चौ. ८** - (१) **श्रमां सफल सर्वांच्या करणें** - ते सर्व मुनिश्रेष्ठ इष्ट फलप्राप्तीसाठी जे कष्ट-श्रम करीत आहेत त्यांचे फल रामदर्शन त्यांना हवे आहे. ते झाले म्हणजे त्यांचे श्रम सफल होतील व रामकृपेने **रामभक्ति मिळाली म्हणजे सुफल होतील.** (क) **गिरिहि गौरविणें** - आपण तेथे जाऊन राहण्याने चित्रकूट पर्वताला व तो ज्याचा एक विभाग आहे त्या विंध्य पर्वताला सहज मोठेपणा दिल्यासारखे होईल. चित्रकूटाचे व विंध्याद्रीचे महत्त्व कसे व किती वाढले याचे वर्णन पुढे आहे. (दो. १३८।१३९). (ख) **चलणें - चलावें,** असे म्हटले. याने सुचविले की रामचंद्रास चित्रकूटचा रस्ता दाखविण्यासाठी व पोचविण्यासाठी मुनिराज निघाले. चित्रकूटापर्यंत गेल्याचे पुढे सिद्ध होत नाही; यावरून अनुमान निघते की आश्रमाच्या सीमेपासूनच त्यांस रघुनाथांनी विनंती करून परत फिरविले. अतिथीला पोचविण्यास जाणे हा धर्मच आहे. जसे सामोरे जाणे आवश्यक तसेच काही अंतरापर्यंत पोचविण्यास जाणेही आवश्यक असते. राम विश्वामित्रांस पोचविण्यास गेल्याचे व काही अंतरावरून विश्वामित्रांनी त्यांस परत फिरविल्याचे वर्णन बा.कां. ३६०।१० मध्ये आहे.

***हिं.दो.*** *। चित्रकूट महिमा अमित कही महामुनि गाइ ॥*
*॥ आइ नहाए सरित बर सिय समेत दोउ भाइ ॥१३२॥*

***म.दो.*** *। चित्रकूट - महिमा अमित महामुनी कथितात ॥*
*॥ येउनि बंधू सितेसह नदी - स्नान करितात ॥१३२॥*

**अर्थ** - वाल्मीकी महामुनींनी चित्रकूटचा अपार महिमा वर्णन करून सांगितला

(व मग) सीतेसहित दोन्ही भावांनी येऊन (मंदाकिनी) नदीत स्नान केले.।।दो.१३२।।

**टीका. (१) चित्रकूट महिमा अमित** - वाल्मीकींनी येथे जो महिमा वर्णन केला तर तो रघुनाथ चित्रकूटला जाऊन राहण्याच्या पूर्वीचा; म्हणून विनय पत्रिका व गीतावलीतील चित्रकूट वर्णनाचा हवाला देऊन भागणार नाही; कारण तो रामनिवासानंतरच आहे. श्रीदत्त प्रभूंचा अवतार याच पर्वतात झाला; चित्रकूटाचे दर्शन होताच नल राजा दुःखरहित झाला; वगैरे इतिहास सांगून त्या स्थानाचे माहात्म्य, प्रभाव वर्णन केला. **(क) वा.रा.** भरद्वाज स्वतः रस्ता दाखविण्यास आले आहेत; व काही वेळानंतर रामचंद्रांनी त्यांस वंदन करून परत पाठविले आहेत. तसेच येथे घडले. 'चलणें' असे म्हणून महामुनी चित्रकूटचा महिमा वर्णन करीत पुढे चालू लागले; तेव्हा कविराज तेथून झपाट्याने निसटले. त्यामुळे महिमा काय वर्णन केला तो त्यांनी वर्णन केला नाही व वाल्मीकी केव्हा परतले व रघुनाथांनी त्यांस परत जाण्याविषयी काय प्रार्थना केली वगैरे वर्णन केले नाही. 'चलणें' या शब्दाने व वा. रामायणातील भरद्वाजांच्या उदाहरणाने ते सहज समजण्यासारखे असल्याने विस्तार केला नाही. ज्यांनी भरद्वाजांनी दिलेल्या बटूंनासुद्धा विनंती करून परत पाठविले ते वाल्मीकींस फार दूर येऊ देतील व वंदन करणार नाहीत हे शक्यच नाही. म्हणून ते सर्व वर्णन अध्याहृत ठेवले.

**(२) येउनि सीतेसह स्नान केलें** - हे कवींचे वचन आहे. त्या अर्थी राम चित्रकूटला पोचण्याच्या आधी कवि तेथे हजर होते असे ठरते. नाहीतर 'जाउनि स्नान केलें' असे म्हटले असते. गंगेशिवाय इतर नद्या ओलांडावयाच्या असतील तेव्हा परतीराला गेल्यावर स्नान करावयाचे असते हे यमुना स्नानाच्या वेळीही दाखविले आहे. (दो. १०९ पहा.)

**वाल्मीकीकृत स्तुति - पुष्य नक्षत्र (सिध्य, तिष्य)**

**(१) अनुक्रम साम्य** - वाल्मीकीकृत स्तुति आठवी आहे; आठवे नक्षत्र पुष्य आहे. **(२) नाम साम्य** - नक्षत्राचे नाव पुष्य आहे. पुष्णाति कार्याणि इति, पुष्यकार्याचे पोषण करणारे आहे म्हणून पुष्य म्हणतात. सिध्यन्ति अस्मिन् कार्याणि;

या नक्षत्रावर सुरू केलेली कार्ये सिद्धीस जातात म्हणून सिध्य म्हणतात; व त्या नक्षत्राने तुष्टि, तोष होतो म्हणून तिष्य म्हणतात (अ.व्या.सु १।३।२२ पुष्ये तु सिध्यतिष्यौ, अमरे). रामकार्याचे पोषण, अत्रि आदि मुनिवरांच्या श्रमांची फलसिद्धि व त्यांस संतोष होण्यास हीच स्तुति कारण होणार आहे. पुष्य नक्षत्र सर्व नक्षत्रांत श्रेष्ठ आहे. (३) **तारे संख्या साम्य** - पुष्य नक्षत्रांत तीन तारे आहेत. तसेच राम लक्ष्मण व सीता हे तीन तारे या स्तुतीत असून ते वारंवार चमकत आहेत; तिघांच्या नावांचा उल्लेख वारंवार केलेला आहे. (४) **आकारसाम्य** - पुष्य नक्षत्राचा आकार बाणासारखा आहे. या स्तुतीत या तीन ताऱ्यांच्या अवतार रहस्याचे भेदन बाणासारखे प्रारंभी छंदांतच केले आहे. (५) **नक्षत्र देवतासाम्य** - पुष्याची देवता वाक्पति आहे. राम वाक्पति - गिरापति असल्याचा उल्लेख (१।१०५।४ मध्ये) **'स्मरुनि गिरेशा प्रभुसि धनुर्धर'** असा केलेला आहे. (७।५८।७ पहा). (६) **फलश्रुतिसाम्य** - 'शमन पाप संतापा शोका' (१।३२।५) 'रघुनन्दन, शब्दाने आनंददायकत्व म्हणजे शोकाचे शमन, 'भक्तउरचंदन' ने संताप शमन व 'विगत विकार' ने पापशमन सुचविले, पातकपोतक डाकिनि', सुख बुधांस, 'दलनखल निशिचर' इत्यादी अनेक शब्दांतून हेच सिद्ध होते.

***येथे वाल्मीकी-भेट प्रकरण समाप्त झाले.***



## 'चित्रकूटि भगवंत राहिले' प्रकरण (१३३|१ - १४२|४).

*हिं. । रघुबर कहेउ लखन भल घाटू । करहु कतहुँ अब ठाहर ठाटू ॥१॥*
*। लखन दीख पय उत्तर करारा । चहुँ दिसि फिरेउ धनुष जिमि नारा ॥२॥*
*। नदी पनच सर सम दम दाना । सकल कलुष कलि साउज नाना ॥३॥*
*। चित्रकूट जनु अचल अहेरी । चुकइ न घात मार मुठभेरी ॥४॥*
*। अस कहि लखन ठाउँ देखरावा । थलु बिलोकि रघुबर सुखु पावा ॥५॥*

*म. । राम म्हणति लक्ष्मण ! शुभ घाट । करा कुठें तरि निवास - थाट ॥१॥*
*। दिसे लक्ष्मणा पय-तटिं उत्तर । फिरला धनुसम चौदिशी निर्झर ॥२॥*
*। सरिता ज्या शर शम दम दान हि । सकल कलुष कलि सावज भिन्नहि ॥३॥*
*। चित्रकूट जणुं अचल शिकारी । नेम चुके ना, समोर मारी ॥४॥*
*। वदुनि दाखवी स्थाना लक्ष्मण । बघुन सुखी झालें रघुवर मन ॥५॥*

**अर्थ** - रामचंद्रांनी म्हटले की लक्ष्मणा ! आता कुठे तरी राहण्याची सुव्यवस्था (थाट) केली पाहिजे; कारण की हा घाट चांगला आहे.॥१॥ लक्ष्मणाने पयस्विनी (पय) नदीच्या उत्तर तटावर पाहिले तो एक निर्झर (नाला, ओढा) धनुष्यासारखा चारी बाजूंनी फिरला आहे.॥२॥ मंदाकिनी नदी ही त्या धनुष्याची ज्या (प्रत्यंचा-दोरी) आहे. शम, दम, दान हेच बाण आहेत. सकल पापे व कली हीच भिन्न भिन्न (निरनिराळी) सावजे (शिकारीचे प्राणी) आहेत.॥३॥ चित्रकूट जणू अचल शिकारी आहे व तो समोरून मारा करतो आणि त्याचा नेम कधी चुकत नाही.॥४॥ असे म्हणून लक्ष्मणाने स्थान दाखविले. ते पाहून रघुवराचे मन सुखी झाले.॥५॥

**टीका. चौ. १-२** (१) पर्णकुटी कुठे बांधावी हे ठरविण्याचे कार्य लक्ष्मणावर सोपविले गेले. वाल्मीकी चित्रकूटापर्यंत बरोबर आले असते तर हे घडले नसते. पय = पयस्विनी नदी, तिच्या उंच उत्तर तटावर उभे राहिल्यावर लक्ष्मणांस जे दृश्य दिसले त्याचे शिकारीच्या रूपकाने वर्णन केले आहे. दक्षिणेकडून मंदाकिनी व कामदगिरीच्या पायथ्याजवळून पयस्विनी येऊन जेथे संगम झाला आहे त्या ठिकाणास राघोप्रयाग (राघव प्रयाग) म्हणतात. येथे पर्णकुटी बांधली गेली असे

एक टीकाकार म्हणतात. (मा.पी.) या लेखकाने स्वतः चित्रकूटाचे हे दृश्य पाहिलेले नाही. निर्झर = नाला, ओढा, पयस्विनी, मंदाकिनी व निर्झर असे तीन प्रवाह नसून दोन नद्यांच्या संगमाजवळील उंच तटावर उभे राहिले असता जो जलाचा एक प्रवाह दिसतो त्याला निर्झर म्हटले.

**चौ. ३ - (१) सरिता ज्या** - मंदाकिनी नदी ही त्या धनुष्याची दोरी आहे. धनुष्याच्या दोरीवर बाण लावून ते सोडले जातात; तसे मंदाकिनीच्या जलाने मार्जन, स्नान पानादि केले आणि शम, दम, दानादि बाणांचा उपयोग केला की कलीचा प्रभाव व कलिकालजनित विविध विपुल पापे नष्ट होतात. कलिकाल हा जणू पापांचा वनराजा आहे व त्याच्या राज्यात वावरणारी कायिक, वाचिक, मानसिक विविध पापे हे शिकारीचे विविध पशू - सावजे आहेत.

**चौ. ४ - (१) चित्रकूट जणुं अचल शिकारी** - सावज दिसेनासे झाले किंवा रात्र झाली म्हणजे शिकार करणारे परत फिरतात. तसा हा चित्रकूटरूपी शिकारी = व्याध नाही. हा सदा सर्वकाळ जागृत असतो. व्याधांच्या बाणांचा नेम नेहमी लागतोच असे नाही व ते लपून दबा धरून बसूनसुद्धा शिकार करतात; तसा हा शिकारी नाही. हा लपून छपून मारा करीत नाही व याच्या बाणांचा नेम कधी चुकत नाही. भाव हा आहे की पापे कितीही घोर असोत, गुप्त असोत की सामान्य असोत, चित्रकूटला राहून मंदाकिनीचे त्रिकाळ स्नानादि केले व शम दमांचे पालन करून दान धर्म केला की सर्व पापे निःशेष होतात.

**चौ. ५ - (१)** चित्रकूटाचे हे वर्णन या रूपकाने लक्ष्मणाच्या मुखात घालून सुचविले की तो धनुष्याकार प्रवाह पाहिल्याबरोबर लक्ष्मणाच्या चित्तांत वीररस थोडासा जागा झाला व त्याच वेळी असेही वाटले की प्रभु येथे राहिल्यामुळे, भविष्यकाळी येथे तपस्या करणारांची सर्व पापे नष्ट होऊन ते द्वन्द्वमोह निर्मुक्त होतील व निष्ठेने प्रभूचे भजन करतील. **'येषां त्वनन्तगतं पापं जनानां पुण्य कर्मणाम् । ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥'** (भ.गी. ७।२८) सर्व पापे नष्ट झाली की पुढील कार्य सहज होते. **(क) रघुवर मन सुखी झाले** - भाव हा की रघुकुलातील व्यक्तींस वनात राहण्यास योग्य व सुखदायक आहे असे वाटले. हे स्थान पाहतांच रघुवर लक्ष्मणाला उत्साह वाटला, रघुनाथ सुखी झाले. रघुकुल

वधु सीतेचे सहज मनोरंजन होईल असे निसर्गरम्य हे स्थान असल्याबद्दल वा.रा. २।५६।१०-१५ यांत वर्णन आहे. १९-३५ हे श्लोक सुद्धा मुद्दाम वाचावे.

*हिं. । रमेउ राम मनु देवन्ह जाना । चले सहित सुर थपति प्रधाना ॥६॥*
*। कोल किरात बेष सब आए । रचे परन तृन सदन सुहाए ॥७॥*
*। बरनि न जाहिं मंजु दुइ साला । एक ललित लघु एक बिसाला ॥८॥*

*हिं.दो. । लखन जानकी सहित प्रभु राजत रुचिर निकेत ।*
*॥ सोह मदनु मुनि बेष जनु रति रितुराज समेत ॥१३३॥*

*म. । रमे राम मन देव जाणती । स्थपतिनायका सह सुर निघती ॥६॥*
*। कोळि - किरात - वेषिं ये सुरगण । रचिति पर्णतृण-गृहांस शोभन ॥७॥*
*। वर्णवती न मंजु युग शाला । एक ललित लघु एक विशाला ॥८॥*

*म.दो. । सह लक्ष्मण जानकी प्रभु राजति रुचिर गृहांत ॥*
*॥ शोभे मुनिवेषीं जणूं मदन स-रति-ऋतुनाथ ॥१३३॥*

**अर्थ** - रामाचे मन (या जागी) रमले आहे हे देवांनी जाणले व शिल्पज्ञांचा जो नायक (त्वष्टा) त्याच्या बरोबर देव (चित्रकूटास येण्यास) निघाले.॥६॥ व कोळी-भिल्लांच्या रूपाने ते देवगण (चित्रकूटास) आले आणि त्यांनी दोन सुंदर पर्णतृणगृहे निर्माण केली - बांधली.॥७॥ त्या दोन पर्णशाला इतक्या सुंदर (झाल्या) आहेत की त्यांचे वर्णन करवत नाही. त्यांतील एक लहान पण विशेष सुंदर व दुसरी विशाल (विस्तृत पुष्कळ मोठी) आहे.॥८॥ लक्ष्मण व जानकीसह प्रभु त्या विशेष सुन्दर पर्णकुटींत असे शोभत आहेत की जणू मदनच रति व ऋतुराज वसंतासह मुनिवेषांत शोभत असावा-आहे.॥१३३॥

**टीका. चौ. ६ - (१) रमे राम मन** - 'राम सहज आनंदनिधानू' असून त्यांचे मन ज्या स्थानाला पाहून रमले, त्याची रमणियता कोण व कशी वर्णन करणार ! हा येथे कवींचा गूढ भाव आहे. **(क) स्थपति (थपति)** = शिल्पज्ञ, सुतार, लोहार, गवंडी इ. कारागीर किंवा विश्वकर्मा. विश्वकर्मा म्हणजे कोणत्याही प्रकारचे कलाकौशल्याचे काम करणारा. येथे बांधकाम, गृहनिर्माण, कलाकुशल असा अर्थ घेणे जरूर आहे. देवांचा या कामांतला मुख्य कारागीर म्हणजे त्वष्टा; म्हणून स्थपतिनायक (थपतिप्रधान) = त्वष्टा. '**स्थपति** = कारुभेदे स्यात्' (अमरे)

'कारुस्तु कारके शिल्पे **विश्वकर्माणि शिल्पिनि'** (हैमः) **'त्वष्टा पुमान् देवशिल्पितक्ष्णोः'** तक्षा = सुतार, देवतक्षा : देवांचा सुतार त्वष्टा = स्थपतिनायक.

**चौ.७ - (१) कोळि - किरात वेषिं ये सुरगण** - चित्रकूटच्या जवळ कोळी भिल्ल लोकांची वस्ती होती हे पुढे दिसेलच. हे लोक तृणपर्णशाळांत, झोपड्यांत राहणारे होते. देवांनी पर्णशाला बांधल्या हे कोणास कळू नये म्हणून त्वष्ट्यासह बरेच देव कोळी भिल्ल रूपाने आले. चित्रकूटच्या कोळीभिल्लांनी झोपड्या बांधल्या तर त्या त्वष्ट्याने व त्याच्या हाताखालच्या देवांच्या कारागिरांनी बांधलेल्या झोपड्यांसारख्या सुंदर व सुखद होणार नाहीत हे जाणून देव आले. त्यांना घेऊन.

**चौ. ८ (१)** मागल्या चौपाईत दोन्ही पर्णशालांना शोभन = सुंदर म्हटले पण दोन्हीत काही भेद आहे तो या चौपाईत ललित व विशाल या शब्दांनी सांगितला. म्हणजेच लहान झोपडी विशेष सुंदर आहे व दुसरी सुंदर असून विशाल आहे. जेव्हा दोघातिघांनाच बसावयाचे असेल तेव्हा उपयोगी पडण्यासाठी लहान, पण विशेष सुंदर अशी बांधली व जेव्हा मुनिगणांसहित या तिघांना बसावयाचे असेल किंवा कोणी अतिथि आल्यास उपयुक्त, म्हणून दुसरी बरीच मोठी बांधली. **अ.रा.** याच प्रकरणात दोन पर्णशाला बांधल्याचा उल्लेख आहे. पण लहान मोठी वगैरे भेद तेथे नाही. तेथे दिलेली उपमा येथील दो. १४१ मध्ये दिलेल्या 'शचीजयंत समेत' या उपमेपेक्षा अगदी भावहीन व नीरस वाटते कारण तिच्यात जयंताचा उल्लेख नाही !

**दो. - (१) प्रभु** - परमात्मा असून विप्र संत सुर, धेनु हितासाठी, सर्वस्वाचा त्याग करून वनात पर्णकुटीत राहिले ! केवढी कृपाशीलता ! **जानकी** शब्दाने सुचविले की जनकासारख्या जगप्रसिद्ध राजाची कन्या असून अरण्यातील पर्णकुटीत आनंदमय होऊन राहिली आहे. दो. ६४ मध्ये सीता म्हणाली की रघुकुल कुमुदेन्दु ! तुमच्यावाचून 'सुरपुर नर्कसमान' त्याचे व्यत्यास रूपाने प्रत्यंतर येथे दाखविले की 'तुमच्यासह रघुकुलविधु वन विधिलोक-समान ।। व १४१ यात सुचविले आहे की ।। रघुकुलबिधु वन तुम्हांसह सुरपतिपुरा समान ।। म्हणजेच इंद्रलोकांपासून विधि-ब्रह्म लोकांपर्यतच्या सप्तस्वर्गात मिळणारे सुख-समाधान सीतेला रामसंगतीत वनातसुद्धा आहे. दो. ६५ पहा. मदनाचे निवासस्थान

ब्रह्मलोक आहे. (क) मुनिवेषांत मदन रति ऋतुनाथ म्हणण्याचे कारण इतकेच की राम सीतालक्ष्मण मुनिवेषांत आहेत. येथे सुद्धा रति मदन व ऋतुराज यांच्यामध्येच आहे. (१२३।३ टी.प.)

***श्रीमानसगूढार्थ चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय १३ वा समाप्त.***



## अध्याय १४ वा.

हिं. *। अमर नाग किंनर दिसिपाला । चित्रकूट आए तेहि काला ॥१॥*
*। राम प्रनामु कीन्ह सब काहू । मुदित देव लहि लोचन लाहू ॥२॥*
*। बरषि सुमन कह देव समाजू । नाथ सनाथ भए हम आजू ॥३॥*
*। करि बिनती दुख दुसह सुनाए । हरषित निज निज सदन सिधाए ॥४॥*
*। चित्रकूट रघुनंदनु छाए । समाचार सुनि सुनि मुनि आए ॥५॥*

म. *। अमर नाग किंनर दिक्पाल । चित्रकूटिं आले तत्काल ॥१॥*
*। राम करिति नमना सर्वांना । मुदित देव जैं लाभलोचनां ॥२॥*
*। सुमनें वर्षुनि देवसमाज । म्हणति नाथ अम्हिं सनाथ आज ॥३॥*
*। विनवुनि दुःसह दुःखें वदले । हर्षित निज निज सदना वळले ॥४॥*
*। चित्रकूटिं वसले रघुनंदन । कळे वृत्त ते येती मुनिगण ॥५॥*

**अर्थ** - अमर, नाग, किंनर व दिक्पाल हे सर्व तत्काळ चित्रकूटला आले.॥१॥ रामचंद्रांनी त्या सर्वांना नमन केले व नेत्रांच्या लाभाने ते सगळे देव आनंदित झाले.॥२॥ पुष्पांची वृष्टी करून ते सर्व देवसमाज म्हणाले की नाथ ! आम्ही आज सनाथ झालो.॥३॥ विनंती (प्रार्थना) करून देवांनी आपली दुःसह दुःखे निवेदन केली व ते हर्षाने, उत्साहाने आपापल्या स्थानी जाण्यास परत निघाले.॥४॥ रघुनंदनांनी चित्रकूटास निवास केला आहे ही बातमी (ज्यांना) कळली ते ते मुनिवर (त्यांस पाहण्यासाठी) येऊ लागले.॥५॥

**टीका. - चौ. १ - (१) चित्रकूटिं आले तत्काळ** - पर्णकुटी बांधण्यात कुशल असलेले देवांचे कारागीर त्यांच्या बायकासुद्धा कोळीभिल्ल वेषाने येऊन पर्णकुटी बांधून गेल्यानंतर, प्रभु पर्णकुटीत स्वस्थ बसले आहेत व अजुन मुनिजन किंवा इतर कोणी आलेले नाहीत असे पाहून-जाणून सर्व देवगण आले. स्वर्गातील व दिक्पालांच्या लोकांतील सर्व अमर = देव किंनर, नाग, गंधर्व इत्यादिकांसह आले. आता कोळीभिल्ल रूपाने नाही आले.

**चौ. २ - (१) राम करिति नमना सर्वांना... लोचनां** - देव आले आहेत. राम भगवान आहेत हे जाणून आपली रडकथा सांगून आश्वासन मिळविण्यासाठी.

पण रामचंद्रांनी त्यांस नमस्कार केला. रामचंद्रांचे अप्रतिम लावण्य पाहण्याने देवांनासुद्धा आनंद झाला व लोचन लाभ मिळाला असे वाटले. ल.ठे. हा चरण अगदी जशाच्या तसा व पुढील बहुतेक सर्व चरण पूर्वी १०८।७ यांत आहे. **'राम करिति सर्वांना नमना । मुदित होति जैं लाभलोचनां'** (१०८।७) व येथे **'राम करिति सर्वांना नमना । मुदित देव जैं लाभ लोचनां'** अशी पुनरुक्ति आहे. या पुनरुक्तीने सुचविले आहे की **'आशीसू देति परम सुख मिळतां'** हा तेथील (१०८।८ चा) चरण येथे अध्याहृत घ्यावयाचा आहे. आणखी हेतु हा आहे की प्रयागातील त्या लोकांची व या देवांची तुलना केली जावी. प्रयागातील लोकांना राम भगवान आहेत हे न जाणता जितका व ज्या कारणास्तव (लोचनलाभ) आनंद झाला तितकाच व त्याच कारणास्तव राम परमात्मा आहेत हे जाणूनसुद्धा देवांना झाला. प्रयागातील त्या गृहस्थ, बटु, तापस, मुनि, सिद्ध, उदासी यांनी आपली प्रपंचाची रडकथा तरी कानांवर घातली नाही; व देव रडकथा कानांवर घालण्याच्याच हेतूने आले आहेत. प्रभूच्या दर्शनासाठी आलेलेच नाहीत; रूप दिसल्याने त्यांना सहजासहजी लोचनलाभ मिळाला इतकेच.

**चौ. ३ - (१) देव 'म्हणति नाथ ! अम्हि सनाथ आज'** - भाव हा की ज्या अर्थी आपण अयोध्येचे राज्य, अनुपम राज्यवैभव व सुखोपभोग सोडून मुनिवेषाने वनात येऊन राहिलात त्या अर्थी आपण हा उपक्रम रावणवधासाठीच केला आहे अशी आम्हास खात्री वाटते. आता लवकरच आपल्या कृपेने आम्हाला आमची पूर्वस्थिति प्राप्त होईल. आजपर्यंत आम्ही अनाथ होतो आता वाटत आहे की आम्ही आज सनाथ झालो. शिवाय आता आपल्या आश्रयाने मुनिसमाज निर्भय होऊन यज्ञयागादि करू लागतील व आम्हाला हविर्भाग मिळू लागतील व आमची उपासमार थोडी कमी होईल. या प्रमाणे देवांनी स्वतःस सनाथ मानण्यात स्वतःच्या स्वार्थापलीकडे दुसरा उदात्त हेतु कोणताच नाही. महाधनिक व सत्ताधीश यांच्या भावनांची मजल इतकीच !

**चौ. ४ - (१) विनवुनि दुःसह दुःखें वदले** - आमचे सर्व लोक व तेथील संपत्ती रावणाच्या ताब्यात; मेरु पर्वताच्या गुहांत आम्हास लपून रहावे लागते, अंश रूपाने लंकेत रावणाच्या बंदिवासात राहून गुलामगिरी करावी लागते. अमर

असल्याने मरण येत नाही. हविर्भाग मिळत नाहीत; कोणत्याही प्रकारचे सुख नाही आणि रात्रंदिवस रावणाची भीती ! अशी ही दुःखे आम्हाला अगदी दुःसह झाली आहेत. यांतून सोडविणारे आपणच आहात फक्त; देव ही गोष्ट वारंवार करणार आहेत. येथे प्रार्थना करण्यात गुप्त हेतु हा आहे की आपण येथे चित्रकूटला न राहता राक्षसांच्या वस्तीत राहिला असतात तर अधिक चांगले झाले असते; राहिलात येथे तरी फार दिवस न राहता राक्षसांच्या वस्तीत शक्य तितक्या लवकर जाऊन रहा; म्हणजे आमची भीती कमी होईल. (क) **हर्षित निज निज सदना वळले** - आपापल्या लोकांत गेले असे न म्हणता 'सदना' = निवासस्थानांत म्हणण्यात कवींची परम सावधानता दिसते. या देवांचे सर्व लोक रावणाच्या ताब्यात आहेत, तेथे ते कसे जाणार? जेथे लपून राहतात तेथे जाण्यास परत फिरले. सदन = निवासस्थान. **'दिक्पालांचे लोक सुशोभन । पाहे सगळे शून्य ! दशानन ॥** (१।१८२।७) **'देव मेरुगिरि गुहा दडकती'** (क) **हर्षित वळले** - या वरून ठरते की रामचंद्रांनी त्यांस आश्वासन दिले की योग्य वेळी सर्व काही तुमच्या मनासारखे होईल. आपण निर्भय असावे. **'विबुध बघून दशा रघुपतिची । कथिति सुमन वर्षुनि गति घरची ॥ प्रभुनी दिलें आश्वासन । फिरले प्रमुदित'** (२।३२१।७-८)

**चौ.** ५ - (१) चित्रकूटच्या आसपास राहणाऱ्या मुनिवृंदांना हळुहळु ही बातमी कळू लागली की **'चित्रकूटिं वसले रघुनन्दन'**. ज्यांना ज्यांना कळली ते रघुनन्दनास पाहण्यासाठी येऊ लागले. अत्यंत लावण्यमय सम्राटपुत्र मुनिवेषांत येऊन राहिले आहेत. हे कळतांच कुतूहल निर्माण होणे साहजिक आहे. कोणत्या भावनेने मुनि येत आहेत हे 'रघुनन्दन' शब्दाने सुचविले आहे. **'कळत वृत्त हें प्रयागवासी । बटु तापस मुनि सिद्ध उदासी ॥ येति भरद्वाजाश्रमिं सादर । बघण्या दशरथसुतांस सुन्दर'** (१०८।५-६)

*हिं.* *। आवत देखि मुदित मुनिवृंदा । कीन्ह दण्डवत रघुकुल चंदा ॥६॥*
*। मुनि रघुबरहि लाइ उर लेहीं । सुफल होन हित आशिष देहीं ॥७॥*
*। सिय सौमित्रि राम छबि देखहिं । साधन सकल सफल करि लेखहिं ॥८॥*

*हिं.दो.* *। जथा जोग सनमानि प्रभु बिदा किए मुनिबृंद ॥*
*॥ करहिं जोग जप जाग तप निज आश्रमहि सुछंद ॥१३४॥*

म. *। येतां बघुनि मुदित मुनिवृंद । करिति दण्डवत रघुकुलचंद ॥६॥*
*। मुनी रघुवरा ह्रदयीं घेती । सुफल व्हावया आशिस देती ॥७॥*
*। रामसितालक्ष्मण - छबि देखति । साधन सकल सफल निज लेखति ॥८॥*

म.दो. *। योग्य मान देउनी प्रभु बोळविती मुनिवृंद ॥*
*॥ करिति योग जप याग तप निजाश्रमीं स्वच्छंद ॥१३४॥*

**अर्थ** - मुनिवृंद आनंदित झालेले येताना दिसताच रघुकुलचंद्र रघुनाथांनी दण्डवत नमस्कार केला.॥६॥ मुनी रघुवरास ह्रदयाशी धरतात व आपला आशीर्वाद सुफल व्हावा म्हणून आशीर्वाद देतात.॥७॥ ते राम सीता व लक्ष्मण यांचे रूप पाहतात व आपली सर्व साधने सफल झाली असे त्यांस वाटते - ते मानतात.॥८॥ प्रभूंनी यथायोग्य मान देऊन मुनिवृंदांना निरोप दिला व ते (परत जाऊन) आपापल्या आश्रमांत योग, जप, यज्ञयाग, तप वगैरे स्वच्छंदाने (मोकळेपणाने, निर्भय होऊन) करू लागले.॥१३४॥

**टीका. - चौ. ६ -** (१) मुनींचे दुरून दर्शन होतांच दण्डवत प्रणाम केला. भरद्वाज, वाल्मीकी, अत्रि, वसिष्ठ इत्यादी सर्वच मोठ्या मुनींना व राज्यावर बसल्यावर सुद्धा सनकादिकांना प्रभूंनी दण्डवत प्रणाम केला आहे. प्रयागवासी अनेक प्रकारचे लोक व मुनि एकदमच आल्याने तेथे मात्र दण्डवत नमस्कार केलेला नाही. **(क) रघुकुलचंद** - रघुकुलांतील राजे जसे चंद्राप्रमाणे मुनिवृंदांना सुख, संतोष देत असत तसेच रामचंद्र देत आहेत आणि आपल्या कुळाची व आपली धवल कीर्ति वाढवीत आहेत. **(ख) मुनि आनंदित होऊन,** प्रसन्न होऊन, **आले आहेत** यांतच रघुकुलचंद शब्दांतील गूढार्थाची सार्थकता दिसते. नुसते रघुनन्दन हे नाव व 'आले आहेत', असे ऐकताच मुनींच्या वृत्ति प्रसन्न झाल्या; या वरून रामचंद्रांची महती व त्यांची कीर्ति या मुनींना पूर्वीच कळली होती हे ठरते. प्रयागचे मुनि असे मुदित होऊन आलेले नाहीत ! हे मुनि अत्रि सारख्यांच्या संगतीतले व अपार महिमा असलेल्या चित्रकूट वनात राहणारे असल्याने राम भगवान आहेत हे त्यांस कळले होते व त्यांच्या दर्शनासाठीच वाल्मीकींनी सांगितल्याप्रमाणे साधनांचे श्रम करीत होते. पुढील दोन चौपायांत हे अधिक स्पष्ट होत आहे.

**चौ. ७ - (१) सुफल व्हावया आशिस देती** - आपला आशीर्वाद, आपले वचन सुफल होण्यासाठी आशीर्वाद दिल्याचे वर्णन जवळ जवळ याच शब्दांत पूर्वी १०३।८ मध्ये आहे. म्हणजे ही त्या वचनाची पुनरुक्ती आहे. 'तदपि देवि ! **मी आशिस देतें । सुफल व्हावया** निज वाचे तें' (१०३।८) येथे 'सुफल व्हावया आशिस देती' असे आहे. गंगा स्त्री व एक असल्याने देते व येथे मुनि पुष्कळ असल्याने देती इतकाच फरक आहे. या पुनरुक्तीने सुचविले की गंगेने जसे सीतेचे ऐश्वर्य वर्णन करून मग 'सुफल व्हावया आशिस देते' असे म्हणून आशीर्वाद दिला तसेच या मुनिवृंदांनी केले. येथे रघुवीराला हृदयाशी धरल्यावर मुनि म्हणाले असतील की ॥ श्रुणु रघुवीरा विप्रस्नेही । कोण न महिमा तव जाणे ही ॥ वंदिति पद कमला विधि हरि हर । सेविति सकल हि सिद्धि बद्ध कर ॥ तुम्हीं दण्डवत आम्हां नमिलें । जगतिं महत्वा प्रभु वाढविलें ॥ आशीर्वाद देव ! तरि देतों । मुनिवच सत्य सुयश हें घेतों ॥४॥ दो. सह सीता सौमित्रि तुम्ही सदा-कुशल राहाल ॥ हेतु पूर्ण करुनी सकल सुयश-जगी पसराल ॥ असा आशीर्वाद दिला असेल. (दो. १०३ पहा).

**चौ. ८ - (१) 'साधन सकल सफल निज लेखति'** - राम-सीता व लक्ष्मण यांचे रूप पाहून मुनींना वाटले की आपली सर्व साधने आज सफल झाली, फळास आली. यावरून ठरले की राम परमात्मा आहेत हे या मुनींनी ओळखले आहे. वाल्मीकीची आज्ञा आहेच की 'अत्रि आदि मुनिवर बहु वसती । जपतप योग करित तनु कसती ॥ श्रमां सफल सकलांच्या करणें' (१३२।७-८) त्याप्रमाणे प्रभूंनी आपले मर्म ओळखण्याची शक्ती त्यांस दिली म्हणा किंवा वर सांगितल्याप्रमाणे आधी रहस्य कळले असले पाहिजे म्हणा. सफल झाले त्यांचे श्रम. रामदर्शन हेच सर्व साधनांचे सुफल असे भरद्वाज म्हणाले आहेत. '**सकल साधनां सुफल सुशोभन । लक्ष्मण राम नि सीता दर्शन**' (२१०।४) सर्व साधनांचे सुफल = सुंदर फल रामभक्ति आहे. ती या मुनींना त्यांनी न मागता प्राप्त झाली हे येथे सुचविले आहे. देव व प्रयागांतले मुनि नुसत्या लोचनलाभाने तृप्त होऊन गेले आहेत !

**दो. - (१) योग्य मान देउनी** - सर्व मुनि जरी भक्तीचे अधिकारी होते तरी

तपश्चर्या, वय इत्यादिकांत न्यूनाधिकता असणारच म्हणून ज्याची त्याची बाह्य लायकी जाणून त्यांचा सन्मान केला. (क) उत्तरार्धावरून अनुमान निघते की तुम्ही निर्भयपणे आपल्या इच्छेप्रमाणे यज्ञयागादि साधन करण्यास आता हरकत नाही असे आश्वासन दिले. तिथे राम जें निवास करिती । सुखी होति मुनि भया विसरती' (३।१४।१) 'यज्ञ करावा निर्भय जाउनि' (१।२१०।१) **(ख) योग याग... निजाश्रमीं स्वच्छंद** - याचा अर्थ असा नव्हे की हे मुनि या पूर्वी अगस्त्यादिकांच्या आश्रमात जाऊन योगयोगादि करीत असत. तसे मानले तर **'अत्रि आदि मुनिवर बहु वसती । जपतपयोग करीत तनु कसती'** हे महामुनि वाल्मीकींचे वचन असत्य ठरेल. शिवाय अगस्त्याश्रम चित्रकूटपासून सुमारे पाचशे मैलांपेक्षा जास्त दूर आहे ! येथे भाव हा आहे की राक्षसांच्या भीतीने त्या गोष्टी पूर्वी इच्छेप्रमाणे, उघड उघड व निर्भयपणे करता येत नव्हत्या; पण आता सर्व समर्थ प्रभु व लक्ष्मण अगदी जवळच असल्याने आता भीती उरली नाही; व त्यामुळे संकोच व गुप्तता नाही. प्रथम देव एकदमच सगळे येऊन गेले. मुनिमात्र सगळे एकदम आले नाही. ज्यांना ज्यांना कळले ते तसतसे एकत्र जमून रोज येत राहिले. काही दिवस हे सुचविण्यासाठी चौ. ७ व ८ यांत हिंदीत भूतकाळ वापरलेला नाही. लेही, देही, देखहि, लेखहि असा वर्तमान काळ वापरला आहे. क्रमाक्रमाने येणाऱ्या सर्व मुनींशी प्रभु असेच वागले. आता या वनात राहणाऱ्या कोळी भिल्लांच्या प्रेमाचे वर्णन करतील.

*हिं.* *। यह सुधि कोल किरातन्ह पाई । हरषे जनु नव निधि घर आई ॥१॥*
*। कंद मूल फल भरि भरि दोना । चले रंक जनु लूटन सोना ॥२॥*
*। तिन्ह महँ जिन्ह देखे दोउ भ्राता । अपर तिन्हहि पूछहिं मगु जाता ॥३॥*
*। कहत सुनत रघुबीर निकाई । आइ सबन्हि देखे रघुराई ॥४॥*
*। करहिं जोहारु भेंट धरि आगे । प्रभुहि बिलोकहिं अति अनुरागे ॥५॥*
*। चित्र लिखे जनु जहँ तहँ ठाढ़े । पुलक सरीर नयन जल बाढ़े ॥६॥*
*म.* *। कोळि - किरातां वृत्त मिळालें । हर्षति जणुं नवनिधि घरिं आले ॥१॥*
*। भरुनी कंद मूल फल द्रोणे । निघति रंक जणुं लुटण्या सोनें ॥२॥*
*। त्यांत आधिं जिहिं बंधु पाहिले । अपर तयां पथिं पुसत चालले ॥३॥*

*। श्रवत कथित रघुवीर-रुचिरता । रघुराजा सब बघति पोचतां ॥४॥*
*। भेट पुढें ठेउनि जोहारति । अति अनुरागें प्रभुला पाहति ॥५॥*
*। जिथें तिथें स्थित चित्रिं किं दिसले । तनु पुलकित लोचनिं जल झरलें ॥६॥*

**अर्थ** - कोळी भिल्लांना हा समाचार मिळाला तेव्हा त्यांना असा हर्ष झाला की जणू नवनिधीच आपल्या घरी आले असे वाटले.॥१॥ कंदमूलफलांनी द्रोण भरून घेऊन (दर्शनासाठीच) असे चालले की जणू रंक सोने लुटण्यासाठीच जात आहेत.॥२॥ त्यांत ज्यांनी दोघा बंधूंना आधी पाहिले होते त्यांना वाटेने जाता जाताच इतर विचारू लागले.॥३॥ याप्रमाणे रघुवीरांचे सौंदर्याविषयी विचारत व सांगत ते येऊन पोचले व त्यांनी सर्वांनी रघुराजा पाहिले.॥४॥ भेट पुढे ठेऊन ते जोहार करू लागले व अति अनुरागाने प्रभूला (प्रभूकडे) पाहू लागले.॥५॥ तेव्हा ते जणू चित्रांत जिकडे तिकडे उभे असलेले, अंगावर रोमांच आलेले व डोळ्यांतून पाणी वहात असलेले दिसले.॥६॥

**टीका. चौ. १ - (१) कोळि किरातां वृत्त मिळालें** - तिसऱ्या चौपाईत म्हटले आहे की ज्यानी आधी पाहिले यावरून ठरते की काही मासे मारणाऱ्या कोळ्यांनी रामलक्ष्मणांना नदीवर पाहिले असतील व आश्चर्यचकीतच झाले असतील त्या रूपाने, तेव्हा त्यांनी ओळखीच्या मुनींना विचारले असेल व त्या मुनींकडून सर्व समाचार कळला. गीतावलीतील पदावरून हेच ठरते - 'ए उपहि (परदेशातले) कोउ कुँअर (क्षत्रिय) अहेरी ॥ (शिकारी) श्याम गौर धनु बान तूनधर, चित्रकूट अब आइ रहेरी ॥१॥ **इन्हहि बहुत आदरत महामुनि समाचार मेरे नाह** (नाथ, पति) **कहेरी** ॥ बनिता बंधु समेत बसे बन पितुहित कठिन कलेस सहेरी ॥२॥ बचन परसपर कहति किरातिनि पुलक गात जलु नयन बहे री ॥ तुलसी प्रभुहि बिलोकत एकटक लोचन जनु बिनु पलक रहे री ॥३॥ **(क) नवनिधि घरिं आले** असें जणूं त्यांना वाटले. 'पद्मोऽस्त्रियां महापद्मा शंखो मकर कच्छपौ ॥ मुकुन्द कुन्दनीलाश्च खर्वश्च निधयो नव' (शब्दार्णव), (१।२२०।२ टी.प.) विश्वामित्रांस दोनच महानिधि मिळविण्यास अविवेकी विप्र म्हणवून घ्यावे लागले. जनकपुरीतील लोक रामदर्शनास गेले ते **'धावति धामा कामा त्यागुनि । जणूं रंक निधि लुटण्या लागुनि'** (१।२२०।२) तर हे लोक 'निघति रंक जणुं लुटण्या सोने' यावरून हे

ठरले की हे लोकसुद्धा 'धामां कामां त्यागुनि धावति.'

**चौ. २-४** (१) मात्र हे लोक रानात राहणारे, अडाणी, अत्यंत घाईत असूनसुद्धा राजदर्शनास जाण्याची मर्यादा व औचित्य विसरले नाहीत. द्रोण भरभरून कंदमूलफले प्रत्येकाने बरोबर घेतली. (क) **त्यांत आधि जिहिं बंधु पाहिले** - या चौपाईने कळते की या लोकांची जिज्ञासा अत्यंत तीव्र आहे. परमात्मा आहेत हे न जाणताच 'कथतंतश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च' (भ.गी.) **हे भक्तलक्षण यांच्या ठिकाणी दिसले. हे प्रयागराज निवासी बटुतापस मुनीसिद्ध उदासींच्या ठिकाणी दिसले नाही?**

**चौ. ५-६ (१) भेट पुढें ठेउनि जोहारति** - भेट पुढे ठेऊन यथाधिकार नमन करणे व मग दर्शन घेणे (पाहणे) हा विधि या अरण्यवासी कोळी भिल्लांना चांगला माहीत आहे; पण तीर्थराज प्रयागातील दर्शनास गेलेल्या कोणीही राजा समजूनसुद्धा काही भेट नेली नाही ! भरतादि समाज चित्रकूटला आल्यावर या लोकांनी हाता पाया पडून, फार आग्रह करून भेट स्वीकारण्यास भाग पाडले आहे. (२५०।१-२५१।७ पहा). (क) **अति अनुरागें प्रभुला पाहति** - प्रभु शब्दाने सुचविले की भगवंतांनी त्यांच्यावर कृपा केली. राम परमात्मा आहेत हे मात्र यांस कळले नाही. किती अनुरागाने, प्रेमाने पाहू लागले हे. **'जिथें तिथे स्थित चित्रिं किं दिसले'** या चौपाईत दाखविले आहे. हे कोळी भिल्ल रामरहस्य न जाणता रामप्रेमात जितके मग्न आहेत; तितके पूर्वी वर्णिलेले रामरहस्य जाणणारे मुनिसुद्धा प्रेममग्न झाले नाहीत ! आणखी पहा -

*हिं.* *। राम सनेह मगन सब जाने । कहि प्रिय बचन सकल सनमाने ॥७॥*
*। प्रभुही जोहारि बहोरि बहोरी । बचन बिनीत कहहिं कर जोरी ॥८॥*

*दो.* *। अब हम नाथ सनाथ सब भए देखि प्रभु पाय ।*
*॥ भाग हमारें आगमनु राउर कोसलराय ॥१३५॥*

*म.* *। स्नेह मग्न सब, राम ओळखति । प्रिय वचनें सकलां सन्मानति ॥७॥*
*। पुनः पुन्हा प्रभुला जोहारुनि । वचन विनीत वदति कर जोडुनि ॥८॥*

*म.दो.* *। नाथ सनाथ अतां अम्हीं सब, दिसतां प्रभु-पाय ॥*
*॥ अमच्या भाग्यें आगमन अपलें कोसलराय ॥१३५॥*

**अर्थ** - रामचंद्रांनी ओळखले (जाणले) की हे सर्व स्नेहांत मग्न झाले आहेत; व त्यांनी प्रिय वचनांनी सर्वांचा सन्मान केला.।।७।। प्रभूला वारंवार (पुनः पुन्हा) जोहार करून हात जोडून नम्रपणाने ते म्हणतात ।।८।। नाथ ! हे प्रभु (स्वामी)! आपल्या पायांचे दर्शन झाल्याने आम्ही सर्व आता सनाथ झालो. कोसलराजा ! आमच्या सर्वांच्या भाग्यानेच आपले (येथे) आगमन (येणे) झाले.।।दो.१३५।।

**टीका.** (१) **पुनः पुन्हा जोहार** करणेच यांच्या ठिकाणची अत्यंत लीनता व गर्वरहित दशा दाखवित आहे. (क) **'नाथ सनाथ'** वगैरे राम रहस्य जाणणाऱ्या देवांनीसुद्धा म्हटले पण ते आपल्या विषय स्वार्थाच्या दृष्टीने म्हटले. हे अडाणी समजले जाणारे लोक मात्र निष्काम, निःस्वार्थ बुद्धीने दास्यभावाने म्हणतात की आम्ही आता सनाथ झालो. रामदर्शनाने पापांचा व पापबुद्धीचा संहार झाला हे त्यांचे त्यांनाच कळून आले. हे लोक पुढे स्वतःच सांगतात की 'जिथुनी प्रभुपदपद्म पाहिले । दुःसह दुःख न दोष राहिले' (२५१।७) हा या पहिल्या भेटीतील दर्शनाचा प्रभावच सांगितला आहे.

(२) आधी देवांचे वर्णन केले. नंतर मुनिवृंदांचे केले व येथे या भिल्ल कोळ्यांचे केले. यात एकापेक्षा दुसऱ्यांचे अधिकाधिक शुद्ध प्रेम दाखविले आहे. मुनींना वाटले की आपण जी कष्टमय साधने केली त्यांच्या प्रभावाने प्रभुदर्शन झाले. म्हणजेच थोडा तरी साधनाहंकार आहेच; **हे कर्मघाटाचे उदाहरण आहे.** या लोकांचे तसं नाही. **हे दीन घाटाचे आहेत.** सर्व साधनहीन असता आपले दर्शन झाले ही केवळ आपली कृपा ! असे यांचे म्हणणे आहे. देव आले व निघून गेले, पण आपली दुःखे दूर करण्याविषयी सूचना देऊन गेले. मुनि आले व आपले साधन सफल झाले असे वाटून परत गेले. पण हीन जातीचे अडाणी समजले जाणारे हे लोक सेवेसाठी प्रार्थना करण्यास हात जोडून उभे आहेत. **(क) भाग्यें अमच्या आगमन** - अयोध्याधीशांचे पाय या भूमीला लागण्यासारखा पुण्यसंग्रह, जपतपादि काहीही साधन आमच्याकडून घडले नसता; आपण याल अशी कल्पना स्वप्नातसुद्धा नसता ज्या अर्थी आपले येणे झाले त्या अर्थी पूर्वजन्मीचे मोठे भाग्य फळाला आले असेच म्हणावे लागेल. नाहीतर हे पाय आम्हाला कुठले दिसणार !

**वि.ल.ठे.** - येथे हे दाखविले गेले की रामरूपावर ते परमात्मा आहेत हे जाणून प्रेम करा की दशरथनंदन, कोसलराय आहेत हे जाणून प्रेम करा; साधनाहंकार किंवा इतर कसलाही अहंकार नसला व अत्यंत लीनता, सरलता व आपल्या दोषांची जाणीव असली की प्रभु कृपा केल्याशिवाय रहात नाहीत. परीस ओळखून लोखंडाच्या पेटीवर ठेवून पूजा करा की चांगली लखलखीत गारगोटी म्हणून लोखंडाच्या पेटीत टाकून द्या; परिणाम सारखाच. सेवेचा लाभ मिळावा म्हणून आता प्रार्थना करतात.

*हिं. । धन्य भूमि बन पंथ पहारा । जहँ जहँ नाथ पाउ तुम्ह धारा ॥१॥*
*। धन्य बिहग मृग काननचारी । सफल जनम भए तुम्हहि निहारी ॥२॥*
*। हम सब धन्य सहित परिवारा । दीख दरसु भरि नयन तुम्हारा ॥३॥*
*। कीन्ह बास भल ठाउँ बिचारी । इहाँ सकल रितु रहब सुखारी ॥४॥*
*। हम सब भाँति करब सेवकाई । करि केहरि अहि बाघ बराई ॥५॥*

*म. । धन्य धरणि पथ पर्वत कानन । जेथें कृत तुम्हिं नाथ पदार्पण ॥१॥*
*। धन्य बिहग-मृग काननचारी । सफल जन्म तव दर्शनिं सारीं ॥२॥*
*। आम्हिं सपरिजन धन्यचि सगळे । रूप नेत्रभर दिसलें अपलें ॥३॥*
*। कृत निवास चिंतुनि शुभ ठावा । सकल ऋतूंत इथें सुख पावां ॥४॥*
*। आम्हीं सेवा करूं सर्वपरिं । ठेउं दूर अहि वाघ सिंह करि ॥५॥*

**अर्थ** - नाथ ! जिथे जिथे आपले पाय लागले ती भूमि, तो मार्ग (रस्ता) ती वने व ते पर्वत हे सर्व धन्य होत.।।१।। त्या वनांत विहार करणारे पशुपक्षी सुद्धा धन्य व आपले दर्शन झाल्याने त्या सर्वांचाच जन्म सफल झाला.।।२।। आम्ही सगळे सुद्धा आमच्या परिवारासह धन्य झालो; कारण की आपले रूप आम्ही डोळे भरून पाहिले.।।३।। आपण चांगला विचार करूनच या चांगल्या ठिकाणी निवास केलात (असे वाटते) येथे आपण सर्व ऋतूंत सुख पावाल.।।४।। आम्ही सर्प, वाघ, हत्ती, सिंह वगैरेंना दूर ठेऊन आपली सर्व प्रकारे सेवा करू.।।५।।

**टीका. - चौ. १-३** (१) भाव हा की आपल्या दर्शनाने आम्हीच धन्य झालो व आमचाच जन्म सफल झाला असे नाही. ज्या स्थावर, जंगम, जड वस्तूंना आपले पाय लागले, ज्यांना आपले दर्शन झाले किंवा आपली दृष्टी ज्या कोणाही

जडचेतनावर पडली ते सर्वच धन्य झाले व त्या सर्वांचाच जन्म सफल झाला. **'पथिं जड चेतन जिव बहु नाना । ज्यां बघती प्रभु दिसले ज्यानां । ते सब परम-पदा अधिकारी ॥'** (२१७।११-२) असे जे 'सिद्ध साधु मुनिवर म्हणती' (२१७।६) तेच येथे राम परमात्मा आहेत हे न ओळखणारे वनातील भिल्ल कोळी म्हणत आहेत. हा वस्तुसत्तेचा व रामकृपेचा प्रभाव आहे. शुद्ध हृदयांत असेच विचार स्फुरतात. **(क)** दीख दरसु, भरि नयन तुम्हारा - या हिंदी चरणांत दिख व दरसु हे दोन शब्द समानार्थक आहेत असे वाटते पण दरस = दर्शन = रूप असा अर्थ येथे आहे. १०९।७ मध्ये याच अर्थाने 'दरसु' शब्द वापरला आहे. व तो खेडवळ लोकांच्या संबंधीच वापरला आहे यावरून हा खेडवळ भिल्ल कोळी लोकांतील वाक्प्रचार दिसतो जसे 'बोल बोलणें' तसेच 'दर्शन देखणें' : रूप पाहणे.

**चौ. ४-५ (१) कृत निवास चिंतुनि शुभ ठावा** - यांना वाटत आहे की कोसलराय वनवासाचा सर्व काळ येथेच राहणार आहेत व वाल्मीकींच्या सांगण्यावरून हे येथे राहण्यास आले हे यांना माहीत नाही. स्कंद व पद्मपुराणात उल्लेख आहे की राम चातुर्मास समाप्ती पर्यंतच चित्रकूटी राहिले. मानसांतील अरण्यकांडांतील दो. ३।१२ वरूच असेच वाटते. **(क) ठेउं दूर अहि...करि -** भाव हा की येथे जरी पुष्कळ हिंस्र पशू असले तरी त्यांचा त्रास आम्ही आपल्याला होऊ देणार नाही, त्यांना आपल्या आश्रमाच्या आजूबाजूस फिरकूसुद्धा देणार नाही. हेतु हा आहे की आम्ही रात्रंदिवस पाहरेकऱ्यांचे व संरक्षकांचे काम करू तरी आमची सेवा घ्यावी; आणखी काय सेवा करणार ते पुढे सांगतील. हे कोळी भिल्ल जसे रामप्रेमात रंगले आहेत तसे रामप्रेमी व रामभक्तप्रेमी कवि यांच्या सहज स्नेहाच्या वर्णनात रंगले आहेत. कवीचा परम आवडीचा जो विषय असतो त्याच्या वर्णनात प्रासादिक, अनुभवी, अभिजात कवि सहजच अधिक रंगतो व त्याची इच्छा नसताच तेथे थोडा अधिक विस्तार होतो. गोस्वामीजींना चित्रकूटावरच रामदर्शन झाले.

*हिं. । बन बेहड- गिरि कंदर खोहा । सब हमार प्रभु पग पग जोहा ॥६॥*
*। तहँ तहँ तुम्हहि अहेर खेलाउब । सर निरझर जल ठाउँ देखाउब ॥७॥*
*। हम सेवक परिवार समेता । नाथ न सकुचब आयसु देता ॥८॥*

दो. । बेद बचन मुनि मन अगम ते प्रभु करुना ऐन ॥
॥ बचन किरातन्ह के सुनत जिमि पितु बालक बैन ॥१३६॥

म. । दुर्गम बन गिरि गुहा कंदरा । विदित अम्हां प्रभु कोन कोपरा ॥६॥
। ठायिं ठायिं बहु शिकार करवूं । सर निर्झर जल ठाव दाखवू ॥७॥
। नाथ ! दास अम्हिं सह परिवारा । आज्ञापित संकोचा न धरा ॥८॥

दो. । वेद-वचन-मुनिमन-अगम ते प्रभु करुणावास ॥
॥ भिल्ल वचन परिसति जसे जनक बालवचनास ॥१३६॥

**अर्थ** - प्रभु ! (या भागातील) दुर्गम अरण्य, डोंगरांतील गुहा व दऱ्याखोरी यांचा कानाकोपरा आम्हाला माहीत आहे (पाहिलेला आहे).॥६॥ ठिकठिकाणी आम्ही आपल्याला शिकार मिळवून देऊ व तलाव, झरे, नाले इ. जलाशय दाखवू.॥७॥ नाथ ! आम्ही आमच्या सर्व परिवारासह आपले दास (सेवक) आहोत; तरी आपण आम्हाला आज्ञा देण्यात संकोच बाळगू (धरू) नये.॥८॥ वेदवाणी व मुनींचे मन यांना जे प्रभु अगम्य आहेत ते करुणेचे निवासस्थान, भिल्लांचे भाषण असे (प्रेमाने) ऐकत आहेत = जसे आपल्या बालकांचे बोल पित्याने ऐकावे.॥दो.१३६॥

**टीका. - चौ. ६-८** (१) या कोळी भिल्लांना कळले आहे की कोसलराज आहेत; शिवाय विशाल धनुष्ये व मोठमोठे भाते जवळ आहेत; यावरून त्यांना वाटले की यांना शिकारीची फार हौस असावी म्हणून सांगतात - **(क) दुर्गम बन** - घनदाट अरण्य, जेथे प्रवेश करणे फार कठीण असते अशा किर्र्ऽ झाडीतच वाघांची शिकार मिळण्याचा संभव असतो. कंदरा - दऱ्या खोरी, दोन अथवा अधिक डोंगरांनी बनलेल्या **दऱ्याखोऱ्यांतच हत्ती** व रानडुकरे बहुधा असतात. **सिंह बहुधा गिरिगुहांत** किंवा सपाट भागात उंच वाढलेल्या दाट गवतात असतात. या सावजांना त्यांच्या निवाऱ्याच्या जागेतून हुसकून, उठवून हाकलीत हाकलीत शिकार करणारांच्या बाजूस माऱ्याच्या टप्प्यात नेण्याचे काम वनात राहणारे हे असले लोक करतात. **यांना हाके म्हणतात**; व सावज उठविणे वगैरेला **हाका घालणे म्हणतात.** हे भिल्ल कोळी सांगतात की हे हाका घालण्याचे व तुम्हाला शिकार मिळवून देण्याचे काम आम्ही करीत जाऊ, म्हणजे आपल्याला शिकार

शोधीत हिंडावे लागणार नाही व शिकारीचा पाठलाग करण्याचे आपले श्रम वाचतील. (ख) **सर निर्झर** - तुम्हाला शिकार करताना तहान लागली तर झरे, नाले, तलाव इत्यादी चांगल्या पाण्याचे जलाशय आम्ही आपल्याला दाखवित जाऊ; कारण या काननांतील अगदी कानाकोपरा आम्ही अनेक वेळा पाहिलेला आहे. हत्तींची शिकार मोठ्या व खोल तलावांजवळ करता येते. वाघांची शिकार सूर्योदयापूर्वी, उजाडल्यावर ते जलाशयाजवळ पाणी पिण्यास येतात तेव्हा सहज करता येते. (ग) ल.ठे. - आम्ही आपल्याला पाणी आणून देऊ असे ते म्हणाले नाहीत. कारण ते जातीने अस्पृश्य आहेत व आपल्या हातचे पाणी यांना चालणार नाही हे ते जाणतात. (घ) **आज्ञापित संकोचा न धरा** - आपण आपल्या घरच्या सेवकांस दास-दासींना आज्ञा देण्यात जसा मुळीच संकोच बाळगीत नसाल तसेच आम्हाला आपल्या घरचे दास समजा. आम्ही व आमच्या घरांतील सर्व मंडळी आपले दासदासी आहेत. हा उल्लेख सीतेच्या सेवेचा लाभ आपल्या स्त्रियांना मिळावा या हेतूने केलेला आहे. ल.ठे. - या अडाणी वाटणाऱ्या, अरण्यात राहणाऱ्या, लोकांच्या भाषणात शरणागतीची सर्व लक्षणे (सहा) आहेत व यांनी सीतेचा उल्लेखसुद्धा केला नाही !

| | |
|---|---|
| १. अनुकूलस्य संकल्प | शिकार मिळवून देणे, जलाशय दाखविणे, पहारा करणे इ. |
| २. प्रतिकूलस्य वर्जनम् | आश्रमाच्या जवळपास श्वापदांना येऊ न देणे, चोऱ्या न करणे व धर्माने वागणे ही पुढे २५१।३,६ मध्ये स्पष्ट आहेत. |
| ३. रक्षिष्यतीति विश्वासः | आम्ही सर्व सनाथ झालो असे म्हणाले. |
| ४. गोप्तृत्व वरणम् | पित्याप्रमाणे जगत्प्रभु त्यांची वचने आनंदाने ऐकत आहेत. |
| ५. आत्मनिक्षेप | सह कुटुंब, सह परिवार विना वेतन सेवक बनणे. |
| ६. कार्पण्यम् | 'पाप करत रात्री दिन जातहिं' 'अम्हिं जड जीव जीवगणघाती । कुटिल कुचाली कुमति |

कुजाती' (२५१।५,४). येथे - 'भाग्यें अमच्या आगमन अपलें; आम्हीं धन्य झालों, जन्म सफल झाला.

अशा प्रकारे पाच लक्षणे पूर्णपणे दिसून आली म्हणून त्यांचे गोप्तृत्व प्रभूंनी न बोलता मान्य करून त्यांच्यावर कृपा केली. जसा पिता आपल्या बालकांवर कृपा करतो तशी **वात्सल्याने केली हे दोह्यांत दाखविले आहे.**

**दो.** - (१) मुनींना निरोप देऊन केव्हाच वाटेस लावले तेच हे प्रभु ! जिथे वेदवाणी मुकी होते, मुनींचे मनसुद्धा जिथे पोहोचू शकत नाही ते हे प्रभु ! या भिल्लकोळ्यांचे बोलणे वात्सल्याने, पित्याप्रमाणे ऐकून घेत आहेत. याचे कारण प्रभु करुणावास आहेत. करुणेचे, दयेचे माहेरघर आहेत. **'बोल बोबडे बालक बोलति । माता पिता मुदितमन ऐकति'** (१।८।९) **येथे दाखविले की हे लोक 'बालकसुतसम दास अमानी' भक्त आहेत व मुनी परत गेले ते 'प्रौढतनयसम ज्ञानी' भक्त होते. 'बालकसुतसम अमानी दास' वेडेवाकडे, अडाणी, अशिक्षित असले तरी श्रीरघुनाथास फार आवडतात हे येथे सुचविले आहे.** या दोह्याची लं.कां.दो. ११६ शी तुलना करून पहावी. प्रभूंना हे लोक इतके प्रिय का वाटले यातील जाणण्याचा मुख्य मुद्दा कवि पुढल्या चौपाईत सांगतील.

***हिं.*** *। रामहि केवल प्रेमु पिआरा । जानि लेउ जो जाननिहारा ॥१॥*
*। राम सकल बनचर तब तोषे । कहि मृदु बचन प्रेम परिपोषे ॥२॥*
*। बिदा किए सिर नाइ सिधाए । प्रभु गुन कहत सुनत घर आए ॥३॥*
*। एहि बिधि सिय समेत दोउ भाई । बसहिं बिपिन सुर मुनि सुखदाई ॥४॥*

***म.*** *। प्रेम चि केवल रामा प्यारे । जाणणार घ्या जाणुनि सारे ॥१॥*
*। मग रामें वनचर सब तोषित । मृदु वचनीं प्रेमें परिपोषित ॥२॥*
*। बोळविले, शिर नमवुनि निघती । श्रवत कथित प्रभुगुण गृहिं येती ॥३॥*
*। असे उभय बंधू सह सीते । वसति विपिनिं सुर-मुनि-सुखदाते ॥४॥*

**अर्थ** - जे जाणणारे (ज्ञानी) असतील त्या सर्वांनी हे जाणून घ्यावे की श्रीरामास फक्त शुद्ध (केवल) प्रेमच फार प्रिय (प्यारें) आहे.॥१॥ मग रामचंद्रांनी त्या सर्व वनचर (कोळी भिल्ल इ.) लोकांस संतुष्ट केले व मृदु वचने बोलून

प्रेमाने परिपुष्ट केले.॥२॥ व त्यांना निरोप दिला तेव्हा ते मस्तक नमवून (नमस्कार, जोहार करून) परत निघाले; व प्रभुगुण वर्णन करीत व श्रवण करीत घरी आले.॥३॥ या प्रमाणे सुरांना व मुनींना सुख देणारे दोघे बंधू सीतेसह वनांत राहू लागले.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) प्रेमचि केवल रामा प्यारें - केवल =** शुद्ध व फक्त असे दोन्ही अर्थ घेणे योग्य आहे. रामाला फक्त शुद्ध प्रेम प्रिय आहे. इतर ज्ञान, कर्म, पांडित्य, वित्त इत्यादी काहीही प्रिय नाही. प्रेम म्हणजेच भक्ति. स्वतः **'रघुपति वदति - । एक भक्तिनातेंच मानतों ॥ जात पात कुल धर्म महत्ता । धन बल परिजन सुगुण चतुरता । असून भक्तिहीन असेल तर 'भक्तिहीन नर शोभे कैसा । दिसे वारिविण वारिद जैसा'** (३।३५।४-६) असे शबरीला सांगितले आहे. शुद्ध प्रेम = ज्यांत छलकपट नाही असे. भक्तीत छलकपट कोणते याचे सविस्तर साधार विवेचन दो. १०७ च्या टीकेत पहावे. या वनचर, जंगली, रानटी म्हटल्या जाणाऱ्या लोकांजवळ असे कोणते कर्म, ज्ञान, वैराग्य, जप, तप, योग, विज्ञान इत्यादी आहे की प्रभूंना ते मुनिवरांपेक्षा प्रिय वाटावे? रोज जीवगणघाती, चोऱ्या करणारे, दरिद्री, हीन जातीचे, अक्षरशत्रु ! पण प्रभूला जी एकच गोष्ट वश करते ती भक्ति, प्रेम त्यांच्या जवळ आहे. भक्तिहीन ज्ञानी प्रभुला प्रिय नाही, आवडत नाही असे प्रभु स्पष्टच सांगतात - **'करुनि कष्ट जरि (ज्ञान) मिळे कुणाला । भक्तिहीन तो प्रिय नहिं मजला'** (७।४५।४).

**(२) जाणणार घ्या जाणुनि - जाणणार = ज्ञानी.** आत्मज्ञानी, केवल ज्ञानमार्गी. प्रभु वेदवचनास अगम्य आहेत असे नुकतेच सांगितले. वेदच मानसांत प्रभूला म्हणतात : 'जे ब्रह्म अजमद्वैतमनुभवगम्य मनपर ध्यायती । वदुं जाणुं दे त्यां, नाथ ! आम्हीं गावुं कीर्तिच सगुण ती' (७।१३।छं.६) हे वेदच म्हणतात : 'जे ज्ञान-मान-विमत्त तव भवहरणि - भक्ति न आद्रिती । ते प्राप्त सुरदुर्लभपदादपि पडत आम्हां आढळती' (१।१३ छं.३.) **(क)** श्री गोस्वामी म्हणतात की ज्ञानी लोकांनो हे नीट जाणून घ्या की भगवंताला भक्तिविरहित ज्ञान व ज्ञानी प्रिय वाटत नाहीत. त्यांच्यापेक्षा ज्ञानहीन, साधनहीन, दीन बालकांसारखे भक्त त्यांच्या प्रेमामुळे फार आवडतात. तुम्हाला व प्रेमळ भक्तांनाही कामक्रोधादि शत्रू सतत

आहेत. पण या 'बालकसुतसम अमानी दास' भक्तांना भगवंताचे बळ असल्याने हे शत्रू व माया त्यांच्याकडे वाकड्या नजरेने बघू शकत नाहीत. पण ते शत्रू तुम्हाला खाड्यात व मायेच्या खोड्यांत लोटल्याशिवाय राहणार नाहीत. तुमचा सांभाळ तुम्हालाच केला पाहिजे; पण ते अशक्यवत आहे. म्हणून या वनचरांचे उदाहरण पाहून व रामाला फक्त शुद्ध प्रेमच, भक्तीच प्रिय आहे हे जाणून घ्या व सर्व साधनाहंकारादि सोडून अनन्यगतिक दीन बनून रामावर अनन्य निर्मळ प्रेम करू लागा. **सूचना** - वर (क) मध्ये जे लिहिले आहे त्या अर्थाची वचने मानसांतच आहेत; लेखकाच्या पदरचा एकही शब्द त्यांत नाही.

**चौ. २ - (१) वनचर सब तोषित** - वनचर शब्दाने सुचविले की वनांतील पशूंच्या जीवनासारखे यांचे जीवन असून जगत्प्रभू राम त्यांना संतुष्ट करीत आहेत ! राम म्हणाले असतील की बाबांनो मी कुठे तुमच्या बाहेर आहे. आम्हाला या वनाची माहिती नाहीच. तुम्ही माझ्या घरच्या सेवकांसारखे आहात यात शंका नाही. जेव्हा जरूर पडेल तेव्हा तुम्हाला बोलावून घेत जाऊ हं ! आम्हाला मदत करणारे दुसरे इथे तुमच्याशिवाय कोण आहेत? आता घरी जा बरं; भुका लागल्या असतील तुम्हाला. तुम्हाला वाटेल तेव्हा, आपला कामधंदा सांभाळून येत जा. संकोच वाटण्याचे कारण नाही. तुम्ही माझे व मी तुमचा यात काय ते समजा. मात्र आमची चिंता मुळीच करू नका. आम्हाला येथे कसलेही भय नाही इ.

**चौ. ३ (१) श्रवत, कथित प्रभुगुण घरि येती** - दर्शनाला आले तेव्हा फक्त सौंदर्याची चर्चा करीत आले; पण परत जाताना रामगुणांची प्रशंसा करीत व श्रवण करीत चालले. इतक्या वेळात त्यांना जे गुण दिसले, अनुभवास आले त्यांची प्रशंसा करणे स्वाभाविक आहे. तो प्रेमळपणा, ते मधुर मनोहर भाषण, तो नम्रपणा ! इतके मोठे असून आमच्या सारख्या नीचांशी प्रेमाने बोलले, आमचे वेडेवाकडे बोलणे आनंदाने ऐकून घेतले. कोणी मुनीसुद्धा असे वागले नाहीत आपल्याशी. उगाच नाही मोठ मोठे मुनि यांना आदर देत ! केवढे आपले भाग्य ! किती सुख थोड्याशा वेळात आपल्याला मिळाले ! कधी जन्मात तरी असे सुख व असा आनंद झाला होता काय? अगदी देवमाणूस ! देव देव म्हणतात पण कोणी पाहिला आहे? आपला देव तरी इतके सुख कधी देतो का

आपल्याला? इत्यादी प्रकारे जो तो जे जसे सुचेल तसे कोणाला तरी सांगत आहे व जवळपासचे ऐकत आहेत अशा रीतीने ते सगळे घरी आले. **(क) घरिं आले - 'पुरजन जोहारुनि घरिं आले'** (२।८९।६) टीका पहावी. येथे कवि या लोकांच्या बरोबरच आले म्हणून तर म्हणाले की प्रभुगुण सांगत ऐकत आले.

**चौ. ४ - (१) सुर-मुनि-सुखदाते** - आले आहेत सुरांना व मुनींना सुख देण्यासाठी. तेवढ्यासाठी अवतार घेऊन वनवासाचे कष्ट सोसण्यास आले आहेत; पण प्रेम दिले त्या वनचरांना. सुरांना विषयसुख व मुनींना आत्यन्तिक सुख द्यावयाचे आहे. कोणाच्या निमित्ताने कोण कोठे जातात व जास्तीत जास्त रोकडा फायदा कोणाचा होतो हे येथे पाहण्यासारखे आहे. नित्याच्या व्यवहारात व संतांच्या चरित्रांतसुद्धा असे पुष्कळ वेळा होते. याचेच नाव भाग्ययोग, दैवयोग 'अति विचित्र भगवंत गति !' आता चित्रकूटवनाचे वर्णन करून त्याचे भाग्य सांगतात :

**हिं.** *। जब तें आइ रहे रघुनायकु । तब तें भयउ बनु मंगल दायकु ॥५॥*
*। फूलहिं फलहिं बिटप बिधि नाना । मंजु बलित बर बेलि बिताना ॥६॥*
*। सुरतरु सरिस सुभायँ सुहाए । मनहुँ बिबुध बन परिहरि आए ॥७॥*
*। गुंज मंजुतर मधुकर श्रेनी । त्रिबिध बयारि बहइ सुख देनी ॥८॥*

**दो.** *। नीलकण्ठ कलकंठ सुक चातक चक्क चकोर ॥*
*। भाँति भाँति बोलहिं बिहग श्रवन सुखद चित चोर ॥१३७॥*

**म.** *। जैं येउनि राहति रघुनायक । तैं पासुन वन मंगलदायक ॥५॥*
*। नानाविध तरु फुलले फळले । मंजु लता-मंडप वर बनले ॥६॥*
*। सुर-विटपां-सम सहज सुशोभन । आले जणुं सोडून विबुध-वन ॥७॥*
*। गुंजति मधुकर मंजु कदंबक । त्रिविध वायु वाहे सुखदायक ॥८॥*

**दो.** *। नीलकंठ कलकंठ शुक चातक चक्र चकोर ॥*
*॥ बोलति बहुविध विहग बहु श्रवणसुखद मनचोर ॥१३७॥*

**अर्थ** - रघुनायक जेव्हा चित्रकूटला येऊन राहिले तेव्हापासून ते वन मंगलदायक झाले.॥५॥ नाना प्रकारचे वृक्ष फुलू लागले व फळू लागले व त्यांच्यावर सुंदर लतामंडप तयार झाले.॥६॥ हे सर्व वृक्ष कल्पवृक्षांसारखे असे सुंदर दिसू

लागले आहेत की जणू काय देवांची (नंदनवनादी) वने सोडूनच येथे आले आहेत.।।७।। मधुकरांचे सुंदर समूह (कदंबक, श्रेणी) मंजुळ गुंजारव करीत आहेत आणि शीतल मंद सुगंधि असा त्रिविध वारा सुखदायक वाहू लागला आहे.।।८।। मोर (नीलकंठ) कोकिळ (कलकंठ) पोपट, चातक, चक्रवाक (चक्र) चकोर इ. विविध विहंग नाना प्रकारे बोलून कानांना सुख देत आहेत आणि मन चोरून घेत आहेत.।।१३७।।

**टीका. - चौ. ५ - (१) तैं पासुन वन मंगलदायक** - राम चित्रकूटास येऊन राहिल्यापासून चित्रकूटवन मंगलदायक झाले; पण पंचवटीस जाऊन राहिल्याने ते वन मंगलदायक का झाले नाही; अरण्यकांडांत व लंकाकांडांत मंगल शब्द एकदा सुद्धा का नाही इत्यादी गोष्टींचा सांगोपांग साधार विचार **"मानसिं मंगल विपुलहि दुर्मिळ"** प्र.प्र. ५।९ मध्ये केलेला पहावा.

**चौ. ६-८ व दोहा - (१) मंजु लतामंडप** - एका वृक्षावरील ओल्या लता-वेली दुसऱ्यावर जाऊन पसरल्या म्हणजे अशा दोन-चार झाडांच्या योगे सुंदर लतामंडप निसर्ग सुंदरीने बनविलेला फारच सुंदर दिसतो. घनदाट वनांतून ज्यांनी उन्हाळ्यात पायी प्रवास केला असेल त्यांनाच हे नयनमनोहर व प्रवासाचे श्रम हरण करणारे लतामंडप सुखकर वाटतात. उन्हाळ्यांत त्यांतील काही लतांना व वृक्षांना सुगंधी फुलेसुद्धा येतात. ज्यांनी हे वनांतील लतामंडप पाहिले नसतील त्यांनी नुसत्या बाष्कळ कल्पना कराव्यात.

(२) **ल.ठे.** - चित्रकूटवन एकदम मंगलदायक कसे झाले याचे सुंदर वर्णन गीतावलीत २।४५-४६ या पदात आहे. ४६ वे पद तर मुद्दाम पहावे. त्यातील एक मोठे वैशिष्ट्य पहा. : 'भए सब साधु किरात किरातिनि रामदरस मिटि गइ कलुषाई' सर्व कोळी, भिल्ल व त्यांच्या स्त्रिया साधु बनले व रामदर्शनाने त्यांचे सर्व पाप व ताप नष्ट झाले.

(३) **सुरविटप** = देवतरु = कल्पवृक्ष; **विबुधवन** = देवांचे वन, नन्दनवन वगैरे. (क) दोह्यांतील विहग शब्दाने सुचविले की आकाशात भराऱ्या मारीत विविध पक्षी आपली विविध भाषा बोलत आहेत. नीलकण्ठ म्हणजे मुख्यतः मोर पण हे नाव आणखीही काही पाखरांना आहे. **'कालकण्ठनीलकण्ठौ पीतसारे**

**महेश्वरे । दात्यूहे ग्राम चटके खञ्जरीटे शिखावले'** नीलकण्ठ = महेश्वर शंकर हा अर्थ येथे नाही. दात्यूह, गावी राहणाऱ्या चिमण्या, खञ्जन व मयुर या चौघांनाही नीलकण्ठ म्हणतात.

*हिं.* ***। करि केहरि कपि कोल कुरंगा । बिगतबैर बिचरहिं सब संगा ॥१॥***
***। फिरत अहेर राम छबि देखी । होहिं मुदित मृगबृंद बिसेषी ॥२॥***
***। बिबुध बिपिन जहँ लगि जग माहीं । देखि राम बनु सकल सिहाहीं ॥३॥***
***। सुरसरि सरसइ दिनकर कन्या । मेकलसुता गोदावरि धन्या ॥४॥***
***। सब सर सिंधु नदी नद नाना । मंदाकिनि कर करहिं बखाना ॥५॥***

**म.** ***। कपि केसरि करि किरी कुरंगें । विगतवैर विहरति सब संगें ॥१॥***
***। मृगये फिरत राम छवि निरखति । कुरग - कदंब अधिक आनंदति ॥२॥***
***। विबुध विपिन जितकीं जगिं असती । बघुनि रामवन सेर्षा स्तवती ॥३॥***
***। सुरसरि सरस्वती रविकन्या । मेकलदुहिता, गोदा, धन्या ॥४॥***
***। सब सर सिंधु नदीनद नाना । मंदाकिनीचे करिती गाना ॥५॥***

**अर्थ** - कपि, सिंह, हत्ती, डुकरे (किरी, कोल) हरणे इत्यादी पशु आपसांतील वैर विसरून एकमेकांच्या संगतीत विहार करू लागले.॥१॥ रामचंद्र शिकारीकरता फिरत असता रामरूप निरखून हरणांचे कळप (कदंब, वृंद) इतरांपेक्षा अधिक आनंदित होऊ लागले.॥२॥ जगातील सर्व देववने, रामवनाला पाहून त्याची ईर्षापूर्वक स्तुती करू लागली.॥३॥ देवनदी गंगा, सरस्वती, सूर्यकन्या यमुना, मेकल कन्या नर्मदा व गोदावरी वगैरे धन्य असलेल्या नद्या, सर्व नानाविध सरोवरे, विविध सागर, विविध नद्या व नद मंदाकिनीची प्रशंसा करतात.॥४-५॥.

**टीका. चौ. १-२ (१)** पूर्वी वनाची अनुपम रमणीयता व पक्ष्यांची आनंदमय स्थिति सांगितली. येथे प्रथम पशूंच्यात पडलेला अलौकिक फरक म्हणजे त्यांच्यांत असलेले अमंगलरूप स्वभाव वैर जाऊन मंगलरूप असणारे प्रेम परस्परांविषयी उत्पन्न झाले. हे नुकतेच वाल्मीकींच्या आश्रमात दिसले तेथे (१२४।८) च्या टीकेत या विषयी विस्तार पहावा. **(क)** दुसऱ्या चौपाईने दाखविले की हातात धनुष्यबाण घेऊन या विविध पशूंना ठार मारण्यासाठी राम वनात हिंडत असता हे सर्व पशू मरण समोर दिसत असून, मरणभय विसरून रामरूपाकडे बघत

राहू लागले व हरिणांचे कळप तर विशेषच आनंदमग्न होऊ लागले ! हरिणे दीपाच्या प्रकाशावरसुद्धा मोहित होतात मग रामशरीराच्या द्युतीवर इतर पशूंपेक्षा अधिक मुग्ध होतील यात नवल काय? 'मुनिगणनिकट विहग मृग (पशू) जाती। बाधक **वधिक** विलोकुनि पळती' असा खगमृगांचा स्वभाव आहे. राम **वधिक** (**= शिकारी, व्याध**) बनून हिंडतात तरी त्यांना मुळीच भीत नाहीत. कवितावलीतील २।२६, २७ ही पदे मुद्दाम पहावी.

**चौ. ३-५ (१) विबुधविपिन =** देववन. इंद्राचे नन्दनवन, कुबेराचे चैत्ररथ वन या प्रमाणे प्रत्येक लोकपालाच्या लोकांत १।१ दिव्य वन आहे. येथे ११३।१-८ या **चौपायांशी** तुलना करावी म्हणजे कारण सहज ध्यानी येईल. (**क**) मंदाकिनीत आता रामलक्ष्मण व सीता रोज स्नान करणार व तिचे पाणी पिणार व हे भाग्य २।४ दिवस नव्हे की कित्येक महिने तरी तिला लाभणार. हे भाग्य शरयू शिवाय इतर कोणत्याही महानदीला सुद्धा अजून लाभले नाही. म्हणूनच येथे शरयूचे नाव नाही. (**ख**) **मेकलसुता =** नर्मदा नदी. 'रेवा तु नर्मदा सोमोद्भवा मेकलकन्यका' (अमरे) मेकलस्य ऋषेः अद्रेः वा कन्या. (अ.व्या.सु.) मेकलपर्वत = अमर कंटक.

***हिं.*** *। उदय अस्त गिरि अरु कैलासू । मंदर मेरु सकल सुरबासू ॥६॥*
*। सैल हिमाचल आदिक जेते । चित्रकूट-जसु गावहिं तेते ॥७॥*
*। बिंधि मुदित मन सुखु न समाई । श्रम बिनु बिपुल बड़ाई पाई ॥८॥*

***दो.*** *। चित्रकूट के बिहग मृग बेलि बिटप तृन जाति ॥*
*॥ पुन्यपुंज सब धन्य अस कहहिं देव दिन राति ॥१३८॥*

***म.*** *। उदय - अस्त - पर्वत कैलासहि । मंदर मेरु सकल सुरवासहि ॥६॥*
*। शैल हिमाचल आदिक जितके । चित्रकूट यश गाती तितके ॥७॥*
*। विंध्य मुदित, मुनिं सुख ना भावे । विपुल महत्त्व विनाश्रम पावे ॥८॥*

***दो.*** *। चित्रकूटचे विहग मृग वेलि-विटप-तृण जाति ॥*
*॥ पुण्यपुंज सव धन्य अस वदति देव दिनराति ॥१३८॥*

**अर्थ** - उदयाचल, अस्ताचल आणि कैलास पर्वत, मंदराचल, मेरु पर्वत इत्यादी सर्व देवांची निवासस्थाने आणि हिमालय वगैरे जितके पर्वत आहेत

तितके सर्व चित्रकूट पर्वताचे यश गाऊ लागले.।।६-७।। विंध्य पर्वत (विंध्याद्रि) फार प्रसन्न झाला व सुख मनात मावेनासे झाले (कारण) काही श्रम न करता (सहज) पुष्कळ मोठेपणा मिळाला.।।८।। चित्रकूटचे पक्षी, पशू आणि वेली विटप (वृक्ष) व तृण यांच्या विविध जाती (प्रकार) इत्यादी सर्व पुण्यराशी असून धन्य आहेत असे (अस) देव रात्रंदिवस म्हणू लागले.।।दो.१३८।।

**टीका.** - (१) **उदय पर्वत** = उदयाचल; जेथून, ज्याच्या जवळून सूर्याचा उदय होताना दिसतो तो. ज्याच्या शिखरावरून सूर्य अस्तास जाताना दिसतो तो अस्ताचल. अस्तपर्वत = इत्यादी पृथ्वीवरील सर्व पर्वत रामनिवास बनलेल्या चित्रकूट पर्वताची प्रशंसा करू लागले. (क) विंध्याद्रिचाच एक भाग चित्रकूट असल्याने विंध्य पर्वताला परमानंद होऊन परमसुख वाटू लागले व त्याची प्रतिष्ठा, महती वाढली. (ख) खगमृग वृक्षलतादिकांची प्रशंसा देव रात्रंदिवस करू लागले. याने दाखविले की वन, नदी व चित्रकूट पर्वत यांच्यापेक्षा या खगमृग तरुतृणांचे भाग्य विशेषच असले पाहिजे. कारण की रामचंद्रांचे चरणरज यांच्यावर दिवसरात्री अनेकवार उडणार व ते इतरांपेक्षा अधिक सुखी होणार. ज्या ज्या चरणरजाच्या स्पर्शाने पाषाणरूप झालेली अहल्या पापमुक्त होऊन उद्धरून गेली, त्या प्रभुपादरजाचा या सर्वावर नित्य अभिषेक होत आहे व होत राहणर ! 'यत्पादपांसुः बहुजन्य कृच्छ्रता धृतात्मभिर्योगिभिरप्यगम्यः' (भाग. १०।१२।१२) 'अनेक जन्म कष्ट करून समाधीसारख्या उपायांनी ज्या योग्याने आपले मन जिंकले त्यांना सुद्धा ज्याचे चरणरज प्राप्त होत नाहीत' ते या खगमृगतरुलतादिकांना रात्रंदिवस सहज मिळत आहे व मिळणार आहे; 'पण आपल्या भाग्यात ते नाही.' या बद्दल देवांना रात्रंदिवस वाईट वाटत आहे. हे खगमृगादि इतके प्रशंसनीय आहेत तर मग ज्या कोळी भिल्लादी वनचरांना या पदरजांचा लाभ नित्य होणार, दर्शन संभाषणादी करण्यास सापडणार, आणि दास्यभावाने सेवा करण्यास सापडणार त्यांच्या भाग्याची महती कोण किती वर्णन करणार ! हा ध्वनि येथे गूढ आहे.

***श्री मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकाण्ड अध्याय १४ वा समाप्त.***

●●●

# अध्याय १५ वा

हिं. *। नयनवंत रघुबरहि बिलोकी । पाइ जनम फल होहिं बिसोकी ॥१॥*
*। परसि चरनरज अचर सुखारी । भए परम पद के अधिकारी ॥२॥*
*। सो बनु सैलु सुभायँ सुहावन । मंगलमय अति पावन पावन ॥३॥*
*। महिमा कहिअ कवनि बिधि तासू । सुख सागर जहँ कीन्ह निवासू ॥४॥*
*। पय पयोधि तजि अवध बिहाई । जहँ सिय लखनु रामु रहे आई ॥५॥*

म. *। नयनवंत रघुवरास पाहुनि । होति विशोक जन्म-फल पावुनि ॥१॥*
*। चरणरजें अचरां सुख भारी । झाले परम पदा अधिकारी ॥२॥*
*। गिरि कानन तें स्वभाव शोभन । मंगलमय अति पावन-पावन ॥३॥*
*। महिमा त्याचा ववे कैसा । जिथें करिति सुख सिंधु निवासा ॥४॥*
*। क्षीराब्धीस अयोध्ये त्यागुनि । सिता राम जिथ राहति येउनि ॥५॥*

**अर्थ** - नेत्र असणारे जीव रघुवरास पाहून जन्माचे फळ मिळून शोकरहित झाले.॥१॥ जे अचर जीव आहेत ते चरणरजांच्या स्पर्शाने फार सुखी झाले व परमपदाचे (मोक्षाचे) अधिकारी बनले.॥२॥ ते वन व पर्वत सहज सुन्दर व मंगलमय होऊन अति पावनानासुद्धा पावन करणारे झाले.॥३॥ जिथे सुखसागर निवास करतात त्याचा महिमा कसा (कशा रीतीने) वर्णन करता येईल?॥४॥ क्षीरसागर सोडून व अयोध्येचा (ही) त्याग करून राम, सीता व लक्ष्मण येऊन जेथे राहिले (त्याचा महिमा कोण वर्णन करणार) ! ॥५॥

**टीका. चौ.** १-२ (१) ल.ठे. या दोन चौपायांचा अर्थ २१७ १-२ मध्ये व तेथील अर्थ या दोन चौपायांनी अधिक स्पष्ट केला आहे. येथील एका चरणाची पुनरुक्ति तेथे झाली आहे. '**पथिंजड चेतन जिव बहुनाना । ज्यां बघती प्रभु दिसले ज्यांना ॥ ते सब परम पदा अधिकारी** । (ते सब भए परम पद जोगू) (२१७।१-२) **नयनवंत** = जंगम प्राणी - चेतनांत दोन प्रकार स्थावर व जंगम असे आहेत. अचरांतही जड, पाषाणादि व चेतन वृक्षादि असे दोन प्रकार आहेत. (**क**) शास्त्र दृष्टीने पाहता वृक्षादि स्थावरांना नेत्र आहेत असे आजसुद्धा सिद्ध झाले आहे. तथापि प्रत्यक्ष व्यवहारात तसे दिसत नाही. २१७।१ च्या आधारे

हा अर्थ होतो की ज्यांनी प्रभूंना पाहिले (नयनवंत...) असे जंगम खगमृगादि मनुष्यान्त प्राणी व प्रभूंनी ज्यांना पाहिले ते पाषाणांसारखे जड, वृक्षांसारखे स्थावर चेतन किंवा मानवादि कृमिकिटान्त चेतन जंगम असोत ते विशोक म्हणजे शोकरहित झाले म्हणजेच मुक्त झाले. ज्यांच्यावर प्रभूची दृष्टी पडली नाही किंवा जे प्रभूला पाहू शकले नाहीत; पण प्रभु चालत असता त्यांच्या पायांनी उडालेल्या धुळीचा ज्यांना स्पर्श झाला ते परमपदाचे म्हणजे मोक्षाचे अधिकारी झाले. २१७।२ मधील 'ते सब परमपदा अधिकारी' याचा अर्थ येथील 'चरण रजें अचरां सुख भारी' या चरणाने स्पष्ट करावयाचा आहे.

**चौ. ३-४ (१) अति पावन - पावन** - तीर्थे अपवित्रांना पावन करतात; पण ज्ञानीभक्त = संत त्या तीर्थांना पावन करतात. **'तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि'** (ना.भ.सू. ६९) म्हणून संत अतिपावन; पण हा चित्रकूट पर्वत अशा अति पावनांना म्हणजे संतांनासुद्धा पावन करणारा झाला. कारण इथे सुखसिंधूंनी निवास केला. सागरांत जसे सर्व नद्यांचे व सर्व तीर्थांचे जल असते तशीच सर्व सुखे सागरांप्रमाणे ज्यांच्याजवळ आहेत तेच जेथे येऊन राहिले तिथे सुखाला तोटा काय. हे सुखसिंधु कोण व कोठून आले ते सांगतात :

**चौ. ५ - (१) क्षीराब्धीस त्यागुनि** - याने सांगितले की राम शेषशायी नारायण आहेत. लक्ष्मण शेष आहेत व सीता महालक्ष्मी आहे. या तिघांना जणू क्षीरसागरात चैन पडेना व क्षीरसागरापेक्षा सुंदर, पावन व मंगलमय स्थान असेल तेथे राहण्याचा विचार केला म्हणून क्षीराब्धीचा त्याग करून मनुष्य रूपाने अयोध्येत येऊन राहिले; पण अयोध्यासुद्धा कंटाळवाणी वाटू लागली; तेव्हा अयोध्येपेक्षा सुंदर, पावन व मंगलमय स्थानाचा शोध घेता चित्रकूट पसंत पडले तेव्हा अयोध्येचा त्याग करून मुनिवेषाने येथे येऊन राहिले आहेत. जे स्थान क्षीरसागर व अयोध्या यांच्यापेक्षा अधिक रम्य, अधिक पावन व अधिक मंगलमय आहे त्याचे वर्णन कोण व कशा पद्धतीने करू शकेल ! राम दशरथनंदन नसून परमात्मा आहेत; सीता आदिशक्ती आहे व लक्ष्मण शेषावतार आहेत हे जसे वाल्मीकी भेटीत सांगितले तसेच येथे कवि सांगत आहेत. **(क) ल.ठे.** - शेषशायी नारायणाच्या या उल्लेखाने सुचविले आहे की वक्ते ज्ञानवल्क्य आहेत; कारण याज्ञवल्क्य

भरद्वाज संवादात राम नारायणाचे अवतार आहेत. काकभुशुंडी गरुड संवादात नारायणावतारच राम असले तरी त्या संवादाचा संबंध प्रत्यक्ष येथे नाही.

हिं. *। कहिं न सकहिं सुषमा जसि कानन । जौं सत सहस होहिं सहसानन ॥६॥*
*। सो मैं बरनि कहौं बिधि केहीं । डाबर कमठ कि मंदर लेहीं ॥७॥*
*। सेवहिं लखनु करम मन बानी । जाइ न सीलु सनेहु बखानी ॥८॥*

दो. *। छिनु छिनु लखि सिय राम पद जानि आपु पर नेहु ॥*
*॥ करत न सपनेहुँ लखनु चितु बंधु मातु पितु गेहु ॥१३९॥*

म. *। वन-सुषमा ना करवे वर्णन । जरि शत सहस्त्र सहस्र - आनन ॥६॥*
*। ती मज वर्णु कशी तरि येई । पल्वल-कमठ किं मंदर घेई ॥७॥*
*। सेविति लक्ष्मण तनमनवाणीं । शील-स्नेह कोण वाखाणी ॥८॥*

दो. *। सिताराम-पद बघ बघुनि अपणांवरती स्नेह ।*
*॥ स्वप्निं न लक्ष्मणचित्तिं कधिं बंधु मातृ पितृ गेह ॥१३९॥*

**अर्थ** - या वनाची परमशोभा (= सुषमा) शतसहस्त्र सहस्त्रमुखानांसुद्धा वर्णन करता येणार नाही.॥६॥ ती मी वर्णन करू शकेन तरी कसा? डबक्यातील कासवाला (आपल्या पाठीवर) मंदर पर्वत घेता येईल काय?॥७॥ लक्ष्मण शरीराने, मनाने व वाणीने (सीता-रामाची) सेवा करू लागले. त्यांचे शील व स्नेह कोण वर्णू शकेल?॥६॥ वरचेवर (वारंवार) सीतारामचंद्रांच्या चरणांकडे पाहिल्याने व (त्यांचे) आपणांवरील प्रेम पाहून (जाणून) लक्ष्मणाच्या चित्तांत बंधू, माता, पिता, घर इत्यादींची आठवण कधी स्वप्नातसुद्धा होत नाही.॥दो.१३९॥

**टीका.** - **चौ. ६-७ (१) सुषमा** = परमा शोभा (अमरे) या वनाची परम शोभा जशी आहे तशी सहस्त्रमुखांच्या लाखो शेषांनासुद्धा वर्णन करता येत नाही. मग पृथ्वीवरील कोणता कवि तिचे यथार्थ वर्णन करू शकेल. **(क) पल्वल कमठ** - पल्वल - डबके - मंदर पर्वत धारण करण्यास प्रत्यक्ष भगवान विष्णूच कमठरूप (कासव) झाले. महासागरातील कासवसुद्धा ते करू शकणार नाही. मग डबक्यातील कासवाला कसे करता येईल. तुलसीदास स्वतःस डबक्यातील कासवासारखे अति क्षुद्र मानीत आहेत; आणि व्यास वाल्मीकींना महासागरावरील कासवाप्रमाणे सुचवित आहेत.

**चौ. ८ दो. (१) सेविति लक्ष्मण** - लक्ष्मण प्रेमाने सीतारामचंद्रांची सेवा करतात व क्षणोक्षणी त्यांच्या चरण कमलांकडे पाहतात. दास्य भक्ति सुचविली. **(क) बघुनि आपणां वरती स्नेह** याने सीतारामांचे लक्ष्मणावरील प्रेम दाखविले. 'शील' शब्दाने व 'सीताराम पद बघुनि' याने सुचविले की लक्ष्मण नेहमी सीतेच्या पायांशिवाय इतर अवयवांकडे कधी बघत नाहीत व या नियमाचा भंग होऊ नये म्हणून राम व सीता जवळ जवळ असताना रामचंद्रांच्याही इतर अवयवांकडे बघत नाहीत. हे शीलाचे अलौकिक लक्षण आहे. **(ख)** येथे दाखविले की लक्ष्मण सुमित्रेच्या उपदेशाप्रमाणे वागत आहेत व **'गुरु पितु माय न कुणि मज ठावी'** असे जे रघुनाथांस सांगितले ते अगदी यथार्थ करून दाखविले. ज्याला आईबाप, घरदार इ. काही ठाऊकच नाही त्याला त्यांची आठवण येणे - होणे शक्यच नाही.

*हिं.* *। राम संग सिय रहति सुखारी । पुर परिजन गृह सुरति बिसारी ॥१॥*
*। छिनु छिनु पिय बिधु बदनु निहारी । प्रमुदित मनहुँ चकोर-कुमारी ॥२॥*
*। नाह नेहु नित बढ़-त बिलोकी । हरषित रहति दिवस जिमि कोकी ॥३॥*
*। सियमनु राम चरन अनुरागा । अवध सहस सम बनु प्रिय लागा ॥४॥*
*। परनकुटी प्रिय प्रियतम संगा । प्रिय परिवारु कुरंग बिहंगा ॥५॥*
*। सासु ससुर सम मुनितिय मुनिबर । असनु अमिअ सम कंद मूल फर ॥६॥*
*। नाथ साथ साँथरी सुहाई । मयन सयन सय सम सुखदाई ॥७॥*
*। लोकप होहिं बिलोकत जासू । तेहि कि मोहि सक बिषय बिलासू ॥८॥*

*म.* *। सुखी सिता रामासह राही । पुर परिजन गृह अठवण नाहीं ॥१॥*
*। प्रियविधुवदना पळ पळ निरखित । जणूं चकोर - कुमारी प्रमुदित ॥२॥*
*। पतीस्नेह नव वाढत पाही । कोकी दिनिं तशि हर्षत राही ॥३॥*
*। सियमन रामचरणिं अनुरागे । अमित-अयोध्याप्रिय वन लागे ॥४॥*
*। पर्णकुटी प्रिय प्रियतम - संगें । प्रिय परिवार विहंग कुरंगें ॥५॥*
*। श्वशुरसासुसम मुनिवर-दंपति । अशन मूल फलकंद सुधा अति ॥६॥*
*। नाथ साथ तृणशय्या सुंदर । मदन शयन शत समान सुखकर ॥७॥*
*। जिच्या विलोकनिं लोकप होती । विषय विलास किं तिला मोहिती ॥८॥*

**अर्थ** - रामचंद्र बरोबर असल्यामुळे सीता (सदा) सुखी असते. नगर,

कुटुंबातील मंडळी, घर इ. कशाची तिला आठवणसुद्धा येत नाही.॥१॥ पतीच्या मुखचंद्राकडे क्षणोक्षणी निरखत अशी प्रमुदित राहते की जणू चकोर कुमारीच.॥२॥ पतीचा (आपल्या वरील) स्नेह (नित्य) नवा वाढत आहे हे पाहून, चक्रवाकी जशी दिवसा हर्षित राहते तशी सीता हर्षित राहात आहे.॥३॥ सीतेचे मन रामचरणी अनुरक्त असल्यामुळे तिला वन हजारो अयोध्यासारखे प्रिय वाटत आहे.॥४॥ अत्यंत प्रिय पतीच्या संगतीत पर्णकुटी प्रिय वाटत आहे व पक्षी व हरणे परिवाराप्रमाणे प्रिय वाटत आहेत.॥५॥ मुनिवर व मुनिवर नारी (मुनिवरदंपति) श्वशुर-सासू सारखी प्रिय वाटतात व कंदमूल फलाहार अगदी अमृताचा आहार वाटतो.॥६॥ पति संगतीत सुंदर तृणशय्या शेकडो मदनांच्या शेजेसारखी सुखकर वाटते.॥७॥ जिच्या विलोकनाने लोकपाल बनतात (होतात) तिला विषयविलास मोहित करतील की काय? (शक्यच नाही.)॥८॥

**टीका.** - या आठ चौपायांत व दोह्यांत वनवासांतील सीतेच्या मनस्थितीचे व पतिप्रेमाचे वर्णन करतात.

**चौ. १-२ (१)** प्रिय परिवारादि सर्व नातेवाईक आकाशस्थ तारांगणांसारखे व नक्षत्र गणांसारखे आहेत; राम शरत्पौर्णिमेचा चंद्र आहे व **सीता चकोर कुमारी** आहे. चकोरकुमारीला लक्षावधी तारा, नक्षत्रे व ग्रह यांच्याकडून सुखाची आशा व इच्छाच नसते व तिच्या सर्व सुखाचे आगर एकटा चंद्रच असतो. मग ती त्यांच्याकडे बघते कशाला व आठवण होण्याचं कारण काय? चकोरी न म्हणता चकोरकुमारी म्हणण्यात भाव हा की सीता पतिमुखाकडे क्षणोक्षणी बघत असली तरी कामवासनाविहीन, कुमारीकेसारखी राहते. लहान मुली चंद्रबिंबाकडे पाहतात त्या केवळ आनंदलाभासाठीच; तशीच सीता आहे.

**चौ. ३ - (१)** चकोरांचे व चकोरींचे व चकोर कुमारकुमारींचे चंद्रावर अनन्य प्रेम असते पण चंद्राचे त्यांच्यावर नसते. असे अनुमान काढण्यास जागा नसावी म्हणून चक्रवाकीची उपमा देतात. जसा जसा दिवस वर येतो तसतसा चक्रवाक चक्रवाकीचा उत्साह व आनंद वाढत जातो. वनवासाचे दिवस जसजसे जाऊ लागले तसतसे रामाचे प्रेम सीतेवर रोज वाढू लागले. **चकोरकुमारी व चक्रवाकी या दोन उपमानांनी दाखविले की सीता रात्री व दिवसा अत्यंत सुखी व**

**प्रसन्न असते.** पुढील चौपायांत दाखविले आहे की पूर्वी वनात बरोबर न्यावी म्हणून विनंती करताना, 'मला मुळीच दुःख होणार नाही व मी अत्यंत सुखाने राहीन' हे सांगताना सीतेने जे विचार प्रकट केले त्यांची सार्थकता तिने करून दाखविली आहे. खाली तुलना केली आहे.

**चौ. ८ - (१) जिच्या विलोकनिं लोकप होती** - हा चरण पूर्वी १०३।६ मध्ये गंगेच्या वचनात आहे. या पुनरुक्तीने सुचविले आहे की तेथील 'तुज सेविति सब सिद्धि बद्धकर' हा दुसरा चरण येथे भरीस घ्यावयाचा आहे. सर्व सिद्धि हात जोडून दासीप्रमाणे जिच्या सेवेला हजर असतात व जिच्या कृपादृष्टीने मनुष्य लोकपाल होऊ शकतात तिला विषयांचा लोभ असणे शक्यच नाही. येथे सीतेचे ऐश्वर्य सुचविले आहे.

| सीतेचे पूर्वीचे वचन | वनातील तिची प्रत्यक्ष राहणी |
|---|---|
| १. प्रभु ! सुख सकल तुम्हांसह असतां शरद-विमल-विधु-वदन निरखतां' (६५।८) | सुखी सीता रामासह राही. प्रिय विधु वदना पळ पळ निरखित । **चकोर कुमारी** प्रमुदित ॥ |
| २. प्रभुपदपद्मां पळपळ पाहिन । कोकी-प्रमुदित दिनिं तशि राहिन' (६६।४) | पतीस्नेह नव वाढत पाही ॥ कोकी दिनिं तशि हर्षित राही ॥ |
| ३. नगर, वन, वल्कल, विमल दुकूल (६५) | **अमित अयोध्याप्रिय वन लागे.** |
| ४. नाथ साथ सुरसदनसम पर्णकुटी-सुखमूल.' (६५) | पर्णकुटी प्रिय प्रियतम संगें. |
| ५. खग मृग परिजन (६५) | प्रिय परिवार विहंग कुरंगें |
| ६. **वन-सुरदेवि** उदार सदा अति । सासु-सासऱ्यासम सांभाळति ॥ (६६।१) | श्वशुर-सासुसम **मुनिवर-दंपति** |
| ७. कंदमूलफल अमृत-सुभोजन (६६।३) | अशन मूल-फलकंद सुधा अति |
| ८. कुश किसलयमय शय्या सुंदर । प्रभुसह मदन शयन सम सुखकर (६६।२) | नाथ साथ तृणशय्या सुंदर । मदन शयन शत समान सुखकर ॥ |

**वि.ल.ठे.** - वरील तुलनेतील ठळक अक्षरांतील शब्दांवरून दिसेल की सीतेने पूर्वी म्हटल्यापेक्षा काही बाबतीत तिला अधिकच सुख झाले हे कवींनी वस्तुस्थिती वर्णनात सहज दाखविले आहे. १. वदनविधु निरखणे दोन्हीकडे असले तरी प्रथम चकोर कुमारी नाही. २. वन अयोध्येसारखे प्रिय - सुखद होईल असे वाटले होते; पण हजारो - अमित अयोध्यांच्यासारखे प्रिय झाले. अपेक्षेपेक्षा हजारो पट सुख वनात मिळू लागले. ३. शय्या मदनशय्येसारखी सुखकर होईल असे वाटले होते पण मदनशयनशतसमान सुखकर झाली; म्हणजे हे सुख शतपट मिळू लागले. याचे कारण सांगितले आहे की पतीस्नेह नित्यनवा वाढत राहिला. ४. फरक एकाच बाबतीत पडला की वनदेव वनदेवींच्या ऐवजी मुनिवरदंपती सांभाळ करू लागली. यांतही अपेक्षेपेक्षा अधिकच लाभ झाला. देवदेवी मुनिवर व मुनिवरनारीपेक्षा अधिक स्वार्थी असतात व अप्रत्यक्ष रक्षण-सांभाळ करणार ! मुनि - मुनिपत्नी कमी स्वार्थी असल्याने अधिक प्रेमाने सांभाळ करणार व प्रत्यक्ष करणार. 'सुर नर मुनि सर्वांची रीती । स्वार्थास्तव सब करिती प्रीती ॥' (४।१२।२) स्वार्थी व्यक्तींत देव अग्रगण्य, नर मध्यम आणि मुनि कनिष्ठ असा क्रम आहे.

**हिं.दो.** *। सुमिरत रामहि तजहि जन तृन सम बिषय बिलासु ॥*
*॥ रामप्रिया जगजननि सिय कछु न आचरजु तासु ॥१४०॥*

**म.दो.** *। स्मरतां रामा त्यजति जन तृणसम विषयविलास ॥*
*॥ राम-प्रिया जगजननि सिय विस्मय इथें कशास ॥१४०॥*

**अर्थ** - रामाचे स्मरण करताच रामदास (जन) विषय विलासांचा तृणाप्रमाणे (सहज) त्याग करतात (मग) सीता तर जगाची जननी आणि रामप्रिया आहे; (तिने असा विषय त्याग केला.) यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे? (आश्चर्य कशाला).

**टीका.** - (१) **स्मरतां रामा त्यजति...विलास** - असे अयोध्येतील प्रजेनेच केले. **'जिथें राम तिथं सब सुखसाधन । विण रघुवीर अयोध्ये काम न ॥ जाति सर्वे हा निश्चय ठरवुनि । सुरदुर्लभ सुखसदनां सोडुनि ॥ रामचरणपंकजें प्रिय जयां । विषयभोग कीं करिति वश तयां ॥** (८४।६-८) **'रमाविलास राम-अनुरागी ॥ त्यजिति**

**वमन सम जन बहुभागी ॥८॥ रामप्रेमास्पद भरत महा न, या करतूतिं'** (२।३२४।-) दो. ३२२ पाहा. भरताने त्याग केला विषयांचा त्यातसुद्धा काही विशेष आहे असे नाही. तर मग सर्व जग निर्माण करणारी, सर्व विषयविलास जिच्या कृपाकटाक्षाने प्राप्त होतात; व जिच्यावर रामचंद्रांचे अत्यंत प्रेम आहे त्या सीतेने विषयविलासांचा त्याग केला व ती रामसंगतीत सर्व प्रकारे सुखी व सदा प्रसन्न राहते यात नवल ते काय? **येथे हे दाखविले की ज्या प्रमाणात रामप्रेमलाभ होईल त्या प्रमाणात विषयत्याग सहजच घडतो. 'मिळे अमृत ते न मद्या पिती'** अमृत पिण्यास मिळू लागल्यावर मद्य-दारू कोण पील? (क) प्रथम लक्ष्मणाची राहणी थोडक्यात सांगितली. नंतर सीतेची राहणी सविस्तर सांगितली. आता रघुनाथाची वनातील राहणी सांगतील व या प्रकरणाचा उपसंहार करतील.

*हिं. । सीय लखन जेहि बिधि सुखु लहहीं । सोइ रघुनाथ करहिं सोइ कहहीं ॥१॥*
*। कहहिं पुरातन कथा कहानी । सुनहिं लखनु सिय अति सुखु मानी ॥२॥*
*। जब जब राम अवध सुधि करहीं । तब तब बारि बिलोचन भरहीं ॥३॥*
*। सुमिरि मातु पितु परिजन भाई । भरत सनेहु सीलु सेवकाई ॥४॥*
*। कृपासिंधु प्रभु होहीं दुखारी । धीरजु धरहिं कुसमउ बिचारी ॥५॥*
*। लखि सिय लखनु बिकल होइ जाहीं । जिमि पुरुषहि अनुसर परिछाहीं ॥६॥*
*। प्रिया बंधु गति लखि रघुनन्दनु । धीर कृपाल भगत उर चंदनु ॥७॥*
*। लगे कहन कछु कथा पुनीता । सुनि सुखु लहहिं लखनु अरु सीता ॥८॥*

*म. । जशिं सीता लक्ष्मण सुख लभतीं । तेंच करिति रघुनाथ बोलती ॥१॥*
*। कथिति पुरातन कथा कहाणी । श्रवणिं बंधु सीता सुखखाणी ॥२॥*
*। जैं जैं राम अयोध्ये स्मरती । तैं तैं जलें विलोचन भरती ॥३॥*
*। स्मरुनि मातु पितृ परिजन भावां । भरतस्नेह सुशील सुसेवा ॥४॥*
*। कृपासिंधु दुःखा प्रभु पावति । धरिति धीर ही वेळ न जाणति ॥५॥*
*। बघुनि, बंधु सीता व्याकुळती । जेविं तनुस छाया अनुसरती ॥६॥*
*। त्यांची दशा बघुनि रघुनन्दन । धीर कृपाल भक्त-उर-चंदन ॥७॥*
*। सांगुं लागले कथा पुनीता । श्रवणिं सुखावति लक्ष्मण सीता ॥८॥*

**अर्थ** - जेणे करून लक्ष्मण व सीता सुखी होतील असे रघुनाथ करतात व

बोलतात.॥१॥ पुरातन (भक्ति) कथा व (ज्ञान) कहाण्या रघुनाथ सांगतात व त्यांचे श्रवण करण्यात लक्ष्मण व सीता फार सुखी होतात.॥२॥ ज्या ज्या वेळी रामचंद्रांस अयोध्येची आठवण होते त्या त्या वेळी त्यांचे डोळे पाण्याने भरतात.॥३॥ माता, पिता, परिजन, भाऊ आणि भरताचा स्नेह, सुशील व सुसेवा यांचे स्मरण करून.॥४॥ कृपासागर प्रभु दुःखी होतात; (पण दुःख करीत बसण्याची) ही वेळ नाही असे जाणून धीर धरतात.॥५॥ देहाचे अनुकरण छाया करतात त्याप्रमाणेच रामचंद्रांना दुःखी झालेले पाहून बंधू लक्ष्मण व सीता व्याकुळ होतात.॥६॥ त्यांची ती दशा पाहून धीर, कृपाळू व भक्तांच्या हृदयांचे चन्दन (असणारे) रघुनंदन - ॥७॥ पुनीत कथा सांगू लागले म्हणजे त्यांच्या श्रवणाने सीता व लक्ष्मण सुख पावतात (सुखी होतात).॥८॥

**टीका. चौ. १-२ (१) तेंच करिति रघुनाथ** - रघुनाथ असल्याने ते जाणतात की सीता व लक्ष्मण सर्व सुखाचा व सर्वांचा त्याग करून वनवासात आली असल्याने त्यांना सुखी ठेवणे हे रघुनाथ या नात्याने आपले कर्तव्य आहे; त्यांना सुखी ठेवण्यासाठी काय करतात याचा सुंदर नमुना गीतावलीत आहे. सीता व लक्ष्मण ही दोघेही बरोबर असतील तेव्हा - **'प्रिया, प्रिय बंधु को, दिखावत बिटप बेलि, मंजुकुंज, सिलातल, दल फूल फर हैं ॥ ऋषिन्ह के आश्रम सराहैं मृगनाम कहैं'** (२।४५।३-४) **जेव्हा लक्ष्मण बरोबर नसून सीताच बरोबर असेल, जवळ असेल तेव्हा - 'निज कर राजीवनयन पल्लव दल रचित सयन । प्यास परसपर पियूश प्रेम-पान की ॥३॥ सिय अँग लिखैं धातुराग, सुमननि भूषनबिभाग । तिलक करनि का कहौं कलानिधान की ॥ माधुरी - विलास - हास'** (२।४४।४) सीता व लक्ष्मण यांस वृक्ष, लता, कुंज, पशुपक्षी दाखवून त्यांची माहिती व नावे वगैरे सांगतात. मुनींच्या आश्रमांची प्रशंसा करून महिमा सांगतात. सीतेच्या अंगावर विविध नैसर्गिक रंगांनी चित्रे रंगविणे, फुलांची भूषणे वगैरे करून घालणे व तिच्याशी प्रेमाने हास्य विनोद वगैरे करीत असतात. कथा म्हणजे भक्तिप्रधान कथा दोघांना सांगतात व कहाण्या म्हणजे ज्ञानसिद्धान्त निरुपणासाठी कल्पित कथाही सीता व लक्ष्मण या दोघांना सांगतात.

**चौ. ३-५ (१) अयोध्ये स्मरती** - तमसेच्या तीरावर लोकांना निद्रित टाकून

आलो; त्यांचे पुढे काय झाले असेल; माझ्यामुळे व माझ्यासाठी अशा प्रेमळ प्रजेला किती दुःख होत असेल इ. (क) **स्मरूनि मातृ-पितृ सुसेवा** - माझी अति प्रेमळ माता आमच्यासाठी किती शोक करीत असेल ! चिंतेने, शोकाने व व्रतादिकांनी किती कृश झाली असेल ! वडिलांना तर बेशुद्ध दशेत सोडून निघालो; त्यांची काय दशा झाली असेल ! सुमंत्र गेल्यावर त्यांचे काय होईल कोणास ठाऊक ! वडील आसन्नमरण, भरत राजधानीत नाहीत; सर्व माता दुःखी, दीन, कुटुंबातील मंडळींची काळजी कोण घेत असेल? भरतशत्रुघ्न गेल्याला तर किती वर्षे झाली, ते कधी भेटतील व माझ्या वनवासाची बातमी त्यांना मामाकडे कळल्यावर त्यांना किती दुःख झाले असेल? नगरात राहतील भरत की होतील वनवासी? कारण स्नेहापुढे त्यांना शीलाची किंमत वाटत नाही ! प्रभु भक्त दुःख चिंतनाने दुःखी झाले, होतात, हे कृपासिंधु शब्दाने सांगितले आहे.

**चौ. ६ (१) बघुनि, बंधु सीता व्याकुळती** - सीता किंवा लक्ष्मण यांना अशा प्रकारच्या आठवणी येत नाहीत व दुःखही होत नाही; पण रघुनाथांस दुःखी पाहून लक्ष्मण आणि सीता नुसती दुःखीच नव्हे दुःखाने व्याकुळ होतात; हे सहज स्नेहाचे लक्षण आहे. देह अशा क्रिया करील तशा त्या सर्व त्याची छाया करते. अनेक बाजूंनी प्रकाश येत असला म्हणजे एकाच देहाच्या अनेक छाया पडतात. तसेच येथे घडत आहे. देहाच्या क्रियांचे अनुकरण जशा छाया करतात त्या प्रमाणे राम दुःखी की सीतालक्ष्मण दुःखी व राम सुखी की सीता व लक्ष्मण सुखी इतकेच येथे दाखवावयाचे आहे. मनात जे विचार येतात त्यांचे अनुकरण छाया करीत नाहीत. तशीच सीता व लक्ष्मण यांना रामाशिवाय कोणाची आठवण येत नाही.

**चौ. ७-८ (१) त्यांची दशा बघुनि रघुनंदन - चंदन** - सीता व लक्ष्मण अति दुःखी झालेली दिसली की त्यांच्या दुःखाचे कारण आपणच आहोत हे जाणून भक्तांच्या हृदयाला चंदनाप्रमाणे शीतलता देण्यासाठी व रघुवंशांतील त्या दोघांना आनंद देण्यासाठी, धीर धरून कृपालुपणाने सुंदर सुंदर भक्तांच्या कथा सांगून त्या दोघांचे मनोरंजन करू लागतात. भगवान दुःख विसरून प्रसन्न झालेले दिसले की त्या दोघांचे दुःख आपोआपच नष्ट होते व कथा-श्रवणाने सुख होते.

हिं.दो. । रामु लखन सीता सहित सोहत परन निकेत ॥
॥ जिमि बासव बस अमरपुर सची जयंत समेत ॥१४१॥

म.दो. । राम बंधु-सीतेसहित शोभति पर्णकुटींत ॥
॥ शची जयंता सह जसे वासव - अमरपुरींत ॥१४१॥

**अर्थ** - जसे अमरपुरींत वासव (इंद्र) शची व जयंत यांच्यासह रहात असता शोभतात तसे लक्ष्मण व सीता यांच्यासह राम पर्णकुटीत शोभत आहेत.।।दो.१४१॥

**टीका.** - (१) लक्ष्मणाला जयंताची उपमा देऊन हे दाखविले की राम व सीता लक्ष्मणावर पुत्रवत प्रेम करतात व लक्ष्मण दोघांची सेवा मातापिता मानून करतात. मुख्य भाव हा दाखविला की अमरावतीसारख्या स्वर्गाच्या राजधानीत, वैजयन्त प्रसादांत इन्द्र शची (इंद्र पत्नी) व जयंत (त्यांचा मुलगा) यांना आपल्या सर्व ऐश्वर्यभोगात व अनुपम वैभवात जे सुख मिळते ते या तिघांना चित्रकूटावरील पर्णकुटीत धन, ऐश्वर्य, सत्ता, वैभव, वस्त्रालंकार यांनी रहित स्थितीत मिळत आहे. १३३ व्या दोह्यांत ब्रह्मलोकातील सुख सुचविले व येथे स्वर्ग लोकातील सुख स्पष्ट सांगितले. म्हणजेच राम जेथे असतील तेथे सीता व लक्ष्मण यांना स्वर्गलोकांपासून ब्रह्मलोकांपर्यतच्या सर्व स्वर्गातील सर्व सुख समाधान मिळते. रामसंगति नसेल तर 'सुरपुर नर्कसमान' (६४।-)

हिं. । जोगवहिं प्रभु सिय लखनहि कैसें । पलक बिलोचन गोलक जैसें ॥१॥
। सेवहिं लखन सीय रघुबीरहि । जिमि अबिबेकी पुरुष सरीरहि ॥२॥
। एहि बिधि प्रभु बन बसहिं सुखारी । खगमृग सुर तापस हितकारी ॥३॥
। कहेउँ राम बन गवनु सुहावा । सुनहु सुमंत्र अवध जिमि आवा ॥४॥

म. । प्रभु सीता लक्ष्मणास रक्षति । बुबुळानां पापण्या जशा अति ॥१॥
। सेविति बंधु सिता रघुवीरा । नर अविवेकी जसा शरीरा ॥२॥
। प्रभु वनिं असे वसति सुखिं भारी । खग-मृग-सुर-तापस-हितकारी ॥३॥
। रामगमन वनिं शोभन कथिलें । ऐका सचिव जसे पुरिं आले ॥४॥

**अर्थ** - डोळ्यांच्या पापण्या जशा बुबुळांना अतिशय जपतात तसेच प्रभु सीतेला व लक्ष्मणास रक्षतात ।।१।। अविवेकी मनुष्य जशी आपल्या शरीराची

सेवा करतो तसे लक्ष्मण (बंधु) व सीता रघुवीराची सेवा करतात; आणि लक्ष्मण सीतारघुवीरांची सेवा करतात.॥२॥ खग, मृग, सुर व तपस्वी यांचे हित करणारे प्रभु या प्रमाणे अति सुखात वनात राहू लागले.॥३॥ (याप्रमाणे) रामचंद्रांचे सुंदर वनगमन सांगितले; सचिव सुमंत्र अयोध्येत जसे (परत) आले ते (सांगतो) ऐका.॥४॥

**टीका. - चौ. १-२** (१) रामचंद्रांनी सीतेला व लक्ष्मणाला जपणे, त्यांचे संरक्षण करणे जितके स्वाभाविक व आवश्यक आहे तितकेच सीतेने लक्ष्मणास जपणे जरूर आहे. येथे तीन व्यक्ती आहेत त्यांतील प्रत्येक व्यक्तीस शेष दोन व्यक्ती जपतात. राम सीतेला व लक्ष्मणाला, सीता रामलक्ष्मणांना व लक्ष्मण सीतारामांस जपतात. मोठी माणसे जपतात म्हणजे सांभाळतात, संरक्षण करतात व लहान माणसे मोठ्यांना जपतात म्हणजे त्यांची सेवा करतात. (क) कसे जपतात याला दृष्टान्त पापण्या बुबुळ यांचा दिला. पापण्या बुबुळांचे संरक्षण किती दक्षतेने करतात हे जन्मांधाशिवाय सर्वांना ठाऊक आहे. दुःखांना दूर ठेऊन सुख देणे हे पापण्यांचे काम आहे. पापण्या बुबुळांचे संरक्षण कसे करतात हे बुबुळांना कळतसुद्धा नाही. तसेच लक्ष्मणाचे संरक्षण राम व सीता करतात.

(२) **नर अविवेकी जसा शरीरा - अविवेकी** = देहालाच 'मी' (= आत्मा) समजणारा. असा मनुष्य शरीर सुखी, चांगले, धष्टपुष्ट, निरोगी, सुंदर रहावे, अमर व्हावे या हेतूने जसे सतत रात्रंदिवस प्रयत्न करीत असतो, सर्व व्यवहार, विचार, उद्योग इ. सर्व त्यासाठीच करीत असतो त्याप्रमाणे लक्ष्मण सीतारामांची व सीता रामाची सेवा करीत असते. तीन माणसे अशा परस्पर प्रेमभावाने वागतील तर कशी सुखी राहू शकतात हे वर दाखविलेच आहे.

**चौ. ४ (१) रामगमन बनि शोभन** - येथे 'रामवनगमन' प्रकरणाचा उपसंहार केला. उपक्रम ७९।८ व ७९ मध्ये केला आहे. या प्रकरणांत अनेक उपप्रकरणे आली आहेत - चित्रकूट निवास, वाल्मीकी भेट, वनवासी व यमुनातीरवासी जन प्रेम, प्रयागवास, नाविक अनुराग व निषादराज भेट. हा निर्देश उलट क्रमाने केला आहे. कारण आता आपल्याला प्रथम शृंगवेरपुरास जावे लागेल. तेथून अयोध्येत जाऊन काही दिवस तेथे राहून परत भरतांबरोबरच चित्रकूटात येऊन

पुन्हा अयोध्येत जावे लागेल. (क) वनगमनाला सुंदर म्हटले; कारण तमसातीर सोडल्यापासून मधे मधे थोडा विषाद असला तरी सर्वत्र आनंद, परमानंद भरला आहे. **रामचंद्रांकडे मुख वळवले म्हणजे जिकडे तिकडे आनंदच दिसणार आणि रामचंद्रांकडे पाठ फिरविली की शोकविषादांचेच दर्शन होणार.** आता पुन्हा अयोध्येतून परत निघेपर्यंत विषादच विषाद ! या चौपाईत मागील मुख्य प्रकरणाचा उपसंहार व पुढील प्रकरणाचा उपक्रम केला.

(२) **सचिव - सुमंत्र आले** असे म्हटले यावरून कवि सुमंत्राच्या बरोबर निघून जरा आधी अयोध्येत गेले असावेत ! ल.ठे. अयोध्येतून निघाल्यानंतर पाच रात्री वाटेत वस्ती करून सहाव्या रात्री राम प्रथम चित्रकूटच्या पर्णकुटीत झोपले. पाचव्या दिवशी यमुना ओलांडून आल्यावर निषादराजाला रघुनाथाने परत पाठविले आहे.

***'चित्रकूटि भगवंत राहिले' हे उपप्रकरण व रामवनगमन प्रकरण येथे समाप्त झाले.***



## "सचिवागमन नगरिं नृप - मरण" प्रकरण (१४२।५ - १५७।४)

**(रामगमन वनिं शोभन कथिलें । ऐका सचिव जसे पुरिं आले ॥ १४२।४)**

*हिं. । फिरेउ निषादु प्रभुहि पहुँचाई । सचिव सहित रथ देखेसि आई ॥५॥*
*। मंत्री बिकल बिलोकि निषादू । कहि न जाइ जस भयउ बिषादू ॥६॥*
*। राम राम सिय लखन पुकारी । परेउ धरनितल ब्याकुल भारी ॥७॥*
*। देखि दखिन दिसि हय हिहिनाहीं । जनु बिनु पंख बिहग अकुलाहीं ॥८॥*
*दो. । नहिं तृन चरहिं न पिअहिं जलु मोचहिं लोचन बारि ॥*
*॥ ब्याकुल भए निषाद सब रघुबर बाजि निहारि ॥१४२॥*
*म. । प्रभुस पोचवुनि निषाद फिरला । येतां सचिव सहित रथ दिसला ॥५॥*
*। मंत्री विकल बघुनि निषाद । वदवे ना किति होइ विषाद ॥६॥*
*। राम राम ! सिय ! लक्ष्मण ! वदला । सचिव विकल अति महिवरि पडला ॥७॥*
*। बघुनि दक्षिणे हय खिंकाळती । पंखांविण जणुं विहग विव्हळति ॥८॥*
*दो. । तृण न चरति ना पिती जळ ढाळिति लोचन वारि ॥*
*॥ पाहुनि रघुवर-वाजि, सब व्याकुळ निषाद भारि ॥१४२॥*

**अर्थ** - प्रभु रामचंद्रांना पोचवून निषादराज परत फिरला (गांवी) येतो तोच त्यास सचिव रथासहित दिसला.॥५॥ निषादाला (आलेला) पाहून मंत्री (सुमंत्र) व्याकुळ झाला व त्यास इतका विषाद वाटला की त्याचे वर्णन करवत नाही (व मंत्री व्याकुळ आहे असे पाहून निषादासही विषाद झाला.)॥६॥ राम राम ! सीते लक्ष्मणा ! असे म्हणून मंत्री अतिशय व्याकुळ होऊन जमिनीवर पडला.॥७॥ दक्षिणेकडे पाहून घोडे (रथाचे) असे खिंकाळू लागले की जणू पंखहीन झालेले पक्षीच (विहंग) विव्हळत आहेत.॥८॥ ते गवत खात नाहीत की पाणीही पीत नाहीत आणि त्यांच्या नेत्रांतून अश्रू गळत आहेत. रघुवराच्या वाजीनां-घोड्यांना (या दशेत) पाहून सगळे निषाद व्याकुळ झाले.॥दो.१४२॥

**टीका. चौ. ५ - (१) प्रभुस पोचवुनि निषाद फिरला** - प्रभूच्या बरोबर गेलेला निषाद गुह निघाल्यापासून तिसऱ्या दिवशी दुपारी परत फिरला व **आज चौथ्या दिवशी** सकाळी (९।१० वाजण्याच्या सुमारास) शृंगवेरपुरास मधल्या वाटेने

**परत आला.** दो. १११ च्या टिकेत विस्तार पहावा. **हा रामवनवासाचा सहावा दिवस आहे.** तिकडे राम एक रात्र झाडाखाली मुक्काम करून वाल्मीकींच्या आश्रमात पोचले व इकडे गुह एक रात्र वाटेत वस्ती करून आपल्या गावी आला. **(क) येतां सचिव सहित रथ दिसला** - गावाजवळ आला तोच रामरथ दुरून दिसला म्हणून घरी न जाता रथाजवळ आला तो सचिव सुमंत्रही दिसला.

(२) रामलक्ष्मणसीता व निषादराज निघून गेल्यावर सुमंत्राने तीन रात्री व तीन दिवस कोठे काढले? पुढे सुमंत्राने दशरथांस जे सांगितले आहे त्यावरून ठरते की रघुनाथाने जबरीने पाठविल्यावर सुमंत्र रथ घेऊन निघाला खरा (१००।२ पहा) पण त्याने रामादिकांस नावेत बसताना पाहिले. सुमंत्र सांगतो, **'रामसखा मग नाव मागवति । प्रिये चढवुनी चढले रघुपति'** (१५१।३) यावरून ठरते की ज्या उंच ठिकाणावरून गंगेच्या जळांत असलेल्या होडीत बसणे वगैरे दिसू शकेल अशा ठिकाणी सुमंत्राने रथ थांबविला व गंगेकडे डोळे लावून रथात बसून राहिला. पुढे राम गेलेले पाहिल्यावर त्यास बहुधा रथांतच मूर्छा आली असावी. मूर्छा उडाल्यावर त्यास निषादांकडून कळले की निषादराज बरोबर गेले आहेत चार दिवस, तेव्हा त्याने विचार केला असेल की निषादराज परत येईपर्यंत थांबल्यास प्रभु कुठे गेले व कुठे राहिले इतके तरी कळेल; म्हणून रामसखा येण्याची वाट पहात सुमंत्र राहिला तीन दिवस.

**चौ. ६ - (१) मंत्री विकल बघूनि निषाद** - मंत्री गुहाच्या वाटेकडे डोळे लावूनच बसले होते. निषादाला जसा सचिव दिसला तसा सचिवाला त्याच वेळी निषाद राजा एकटाच येत असलेला दिसला. त्याबरोबर 'मंत्री विकल' झाला. व्याकुळ झाला सुमंत्र. कारण त्यास अत्यंत विषाद झाला. निदान सीता तरी कदाचित परत येईल. घोर अरण्य पाहिल्यावर घाबरली म्हणजे प्रभु लक्ष्मणाबरोबर धाडतील अशी थोडी आशा होती व ती फोल ठरली म्हणून फार विषाद झाला व सुमंत्राची ही व्याकुळ दशा व त्याला अजून तिथेच असलेला पाहून गुहालाही अति विषाद झाला. याप्रमाणे दुसरा चरण दोघांकडे लागतो व तसा लावला म्हणजे पुढील चौपाईत दूरान्वय होत नाही. एकट्या निषादराजाकडेच दुसरा चरण घेतल्यास तो दोष उत्पन्न होईल.

**चौ. ७ - (१) राम राम ! सिय लक्ष्मण बदला... पडला...** सचिवाला निषादराजा दुरून दिसताच तो विषादाने व्याकुळ झाला; व रामसीतालक्ष्मण यांपैकी कोणीच आले नाहीत असे पाहुन पुढील परिणामाचा विचार करतो, तोच निषादराज जवळ आल्याबरोबर सुमंत्राने असा टाहो फोडणे अगदी स्वाभाविक आहे. सुमंत्र व दशरथ यांचे रामप्रेम जवळ जवळ एका पातळीत आहे हे पूर्वीच दाखविले आहे. त्याची ही जबरदस्त प्रतीति आहे. असाच टाहो फोडित दशरथ तळमळत पडलेले आहेत. **'बदति राम हे रामा स्नेही । बदति राम लक्ष्मण वैदेही'** (१४८।८) व असाच टाहो फोडित दशरथ प्राण सोडतात. **(क) सचिव विकल अति महिवरि पडला** - हिंदीतील या चौपाईत कर्ता नाही व त्यामुळे मतभेद झाले आहेत म्हणून येथे सचिव शब्द घालून शंकेला जागा ठेवली नाही. प्रथम व्याकुळ झाला व आता अति (भारी) व्याकुळ होताच धाडकन जमिनीवर पडला. ही झाली गुहाला आलेला पाहून सुमंत्राची दशा ! आता घोड्यांची दशा पहा :

**चौ. ८ - (१) बघुनि दक्षिणे हय खिंकाळति** - राम दक्षिणेकडे गेले; तिकडूनच गुह आला; पण रामलक्ष्मणसीता त्याच्या बरोबर नाहीत, हे पाहताच घोडे दक्षिण दिशेकडे बघत शोकाकुळ होऊन खिंकाळू लागले. **(क) पंखांविण जणुं विहग विव्हळति** - घोड्यांच्या खिंकाळण्यात जी व्यथा, असहाय्यतेची भावना, आर्ति इ. कळून आले ते या उत्प्रेक्षेने सुचविले आहे. पंख तोडून टाकल्यावर आकाशातून जमिनीवर पडलेले पक्षी जसे प्राणांतिक वेदनांनी, अति आर्त होऊन ओरडत असतात तसा या घोड्यांच्या खिंकाळण्याचा ध्वनि निघत आहे. ते मनात विचार करीत असतील की आम्हाला जर पंख असते तर केव्हाच भरारी मारून प्रभूच्या मागोमाग गेलो असतो; पण काय करणार पराधीन झालो आहोत. या क्लेशांनी सुद्धा प्राण जात नाहीत ! पंख तोडून टाकलेल्या चातक पक्ष्यांनी जे विचार मनात आणले असते तसेच या घोड्यांच्या मनात येत असतील.

**दो. - (१) तृण न चरति ना पिती जळ** - यावरून अनुमान निघते की रघुवर वाजी चरण्यासाठी मोकळे सोडले आहेत. **वाजी** = (सं. वजिन्) **'वाजि बाणाश्च पक्षिषु'** (मेदिनी) 'वाजी'चा पक्षी असाही अर्थ आहे. गीता. २।८७ मध्ये याच घोड्यांची दशा वर्णन करताना कौसल्येने वाजी शब्दच वापरला

आहे. **राम यांना आपल्या हातांनी दूध पाजीत असत** वगैरे वर्णन त्या पदांत मुद्दाम पहावे. (क) **व्याकुळ सब निषादे भारि** - सर्व निषाद्र फार व्याकुळ झाले. यावरून ठरते की सुमंत्र गेले नाहीत हे कळताच निषाद राजाचे मित्रपुत्र वगैरेंनी सुमंत्र व घोडे यांची तीन दिवस सेवा केली व ते तेथे जमलेले आहेत. शिवाय निषादराज परभारे सुमंत्राजवळ आल्याचे कळताच पुष्कळ सेवकही आले असतील. घोड्यांची दशा पाहून सगळेच व्याकुळ झाले पण निषादराज भारी व्याकुळ झाला असा ध्वनि यांतून निघतो व पुढील चौपाईतील 'धैर्य धरुनि' शब्दांवरून तो यथार्थ ठरतो.

*हिं.* ***। धरि धीरजु तब कहइ निषादू । अब सुमंत्र परिहरहु बिषादू ॥१॥***
***। तुम्ह पंडित परमारथ ग्याता । धरहु धीर लखि बिमुख बिधाता ॥२॥***
***। बिबिधि कथा कहि कहि मृदु बानी । रथ बैठारेउ बरबस आनी ॥३॥***
***। सोक सिथिल रथु सकइ न हाँकी । रघुबर बिरह पीर उर बाँकी ॥४॥***
***। चरफराहिं मग चलहिं न घोरे । बन मृग मनहुँ आनि रथ जोरे ॥५॥***
***। अढुकि परहिं फिरि हेरहिं पीछें । राम बियोगि बिकल दुख तीछें ॥६॥***
***। जो कह रामु लखनु बैदेही । हिंकरि हिंकरि हित हेरहिं तेही ॥७॥***
***। बाजिबिरहगति किमि कहि जाती । बिनु मनि फनिक बिकल जेहिं भाँती ॥८॥***

*म.* ***। धैर्य धरुनि तैं वदे निषादू । सोडा अतां सुमंत्र विषादू ॥१॥***
***। तुम्हिं पंडित परमार्थि शहाणे । गणुनि वाम विधि धीरा धरणें ॥२॥***
***। विविध कथा मृदुवचनें सांगुनि । रथीं बसविले उचलुनि आणुनि ॥३॥***
***। शोक-शिथिल रथ हाकू शकत न । रघुवरविरह-दुःख हृदिं दारुण ॥४॥***
***। पथिं न चालती हय तडफडले । जणुं वनमृग रथिं अणुनि जोडले ॥५॥***
***। ठेपाळति मग मागें पाहति । रामवियोगि विकल पीडा अति ॥६॥***
***। राम सिता लक्ष्मण जे वदती । त्यां प्रेमें खिंकाळत बघती ॥७॥***
***। बाजिविरहगति केवीं वदणें । मणिविण फणी विकळ तशि गणणें ॥८॥***

**अर्थ** - मग धैर्य धरून निषादराजा म्हणाला की, सुमंत्र ! आता विषाद सोडा.॥१॥ तुम्ही पंडित आहात व परमार्थात पण जाणते (ज्ञाते) आहात; दैव फिरले आहे असे समजून आता धीर धरा.॥२॥ मृदु वाणीने विविध कथा सांगून

त्याने सुमंत्राला उचलून आणून रथात बसविला.।।३।। पण शोकाने शरीर गळल्यासारखे झाल्याने सुमंत्रास रथ हाकता येईना; व हृदयात रघुवरविरहाचे दारूण दुःख (होत) आहे.।।४।। घोडेसुद्धा रस्त्याने चालेनात, व असे तडफडू लागले की जणू वनांतील (रोही किंवा नीळ जातीच्या) पशूंना पकडून आणूनच रथास जुंपले आहेत.।।५।। (त्यामुळे) ते चालताना ढेपाळू लागले व पुनःपुन्हा मागे वळून (मान वळवून) पाहू लागले, असे हे रामवियोगी घोडे व्याकुळ व फार पीडित झाले आहेत.।।६।। जो कोणी राम, सीता, लक्ष्मण इ. शब्द उच्चारतो त्याच्याकडे ते खिंकाळत प्रेमाने पाहू लागतात.।।७।। या घोड्यांची विरहदशा कशी वर्णन करणार ! मणिविहीन सर्प जसा व्याकुळ होतो तशी झाली असे म्हणता येईल.

**टीका. चौ. १-२ (१) धैर्य धरुनि निषादू (निषाद राजा) वदे** - व्याकुळ होऊन धरणीवर पडलेल्या सुमंत्राची समजूत घालून त्यास अयोध्येत धाडणे हे रामसेवक नात्याने आपले कर्तव्य आहे असा विचार करून निषादराजाने धीर धरला. **(क) अतां विषाद सोडा** - विषाद करीत बसण्याची ही वेळ नाही. जे होणार ते होऊन गेले. त्यात आता शोक करून काही बदल कोणालाच करता येण्यासारखा नाही. तुम्ही शक्य तो प्रयत्न त्या दिवशी केलातच पण 'होणारें न चुकेचि होइल जरी ब्रह्मा तया आडवा' **(ख) तुम्हिं पंडित परमार्थि शहाणे** - तुम्ही धर्मनीतिशास्त्रादि सर्व शास्त्रात पारंगत आहात व कोरडे वाक्पंडित नसून परमार्थात ज्ञाते आहात. 'तात धर्मव्रत तुम्हिं सब शोधित' (९५।२) इ. रघुनाथांनी सुमंत्रास जे सांगितले तेच रामसखा सांगत आहे. सुमंत्राची व घोड्यांची दशा पाहून फार व्याकुळ झालेला रामसखा सुमंत्राची समजूत घालीत आहे. अशा वेळी जो सांत्वन करीत असतो. तो शोक मोहातीत झालेला असतोच असे नाही. पण हा मनुष्य स्वभाव आहे व स्नेहाची रीत आहे की अशा वेळी जो धैर्य करू शकतो त्याने अशा कोणीतरी फार व्याकुळ झालेल्या माणसाची समजूत घालावयाची व नित्याच्या व्यवहाराचा गाडा चालू करावयाचा. हा सुमंत्रच पुढे दशरथांची अशीच समजूत घालणार आहे.

**चौ. ३-४ (१) रथीं बसविले उचलुनि आणुनि** - सुमंत्र शोकाने इतके व्याकुळ झालेले दिसले की उठून चालत जाण्याची किंवा रथांत चढण्याची शक्ती नाही

म्हणून उचलून आणावे लागले. पायांत शक्ति नाही हे ठरले **(क) रथ हाकू शकत न** - घोड्याचे लगाम नीट धरण्याची शक्ती हातात नाही. हृदयात दारूण दुःख होत असल्याने मन ठिकाणावर नाही; मग रथ कसा हाकता येणार ! ही झाली रामसारथी सुमंत्र सचिवाची दुर्दशा ! घोड्यांचीही अशीच दुर्दशा झालेली आहे.

**चौ. ५-६ (१) पथिं न चालती हय तडफडले** - त्या मोकळे, सुटे सोडलेल्या घोड्यांना धरून रथाला जुंपण्यासाठी आणू लागले. तेव्हा ते चालेचनात. तडफड तडफड करू लागले. रथाला जुंपले जाऊ नये, येथेच रहावे, अयोध्येत जाऊच नये असे सुमंत्राप्रमाणे रघुवरवाजींना वाटत आहे. **(क) जणु वनमृग** - रोही नावाची हरिणांसारखीच एक वनपशूची जात आहे. हे घोड्यांपेक्षा थोडे लहान व भुरकट, राखाडी रंगाचे असतात. हरिणांच्या पेक्षाही वेगाने पळतात. ते आधी मनुष्याच्या वाऱ्याला उभे रहात नाहीत; पण युक्तिप्रयुक्तिने पकडून वाहनाला जुंपले तर सुटून जाण्यासाठी धडपड, तडफड करतात. अशीच नीळ नावाची एक जात आहे. हे घोड्याएवढे किंवा त्यापेक्षा मोठे व नीलवर्णाचे मृगच असतात. हे रोहींपेक्षा चपळ असतात. मरतील पण वाहनाला चालणार नाहीत. या घोड्यांनी असाच प्रयत्न सुरू केला; पण सुमंत्राला रथात पाहून कसेतरी जुंपू दिले. **(ख) ढेपाळति मग मागें पाहति** - पावली पावलीं ढेपाळू लागले. त्यांच्या पायांतील शक्तीच गेली. वारंवार मागे वळून पाहण्यात भाव हा आहे की आम्हाला रामविमुख करून बलात्काराने का नेता? द्या सोडून आम्हाला. एक तर राम गेले तिकडे जाऊ, नाहीतर चारापाणी बंद करून रामस्मरण करीत गंगातटी राम गेले तिकडे बघत प्राण सोडू. पण आम्हाला रामविरही अयोध्येत नका नेऊ. आधीच रामवियोगी, त्यात आता व्याकुळ झालेले, हृदयात पीडा, अंगात ताकद नाही, पायांत शक्ती नाही, अशी अगदी सुमंत्रासारखी या घोड्यांची दुर्दशा झाली आहे !

**चौ. ७-८ (१) राम सिता लक्ष्मण जे वदती** - वैदेही, रघुनाथ इत्यादी नावांचा ध्वनि कानांवर आला म्हणजे त्या घोड्यांना जरा बरे वाटते व ती नावे उच्चारणारा त्यांना प्रिय वाटतो व कृतज्ञतासूचक दृष्टीने त्याच्याकडे बघत, खिंकाळत जणू सांगत आहेत की, रामरूप नाही तर नाही, पण ही त्यांची नावे कोणीतरी आम्हाला सतत ऐकवा; म्हणजे आम्ही जगू शकू ! **(क) बाजिविरहगति** अवर्णनीय

आहे. पूर्वी पंखहीन विहगांची उपमा दिली; आता मणिविहीन फणींची उपमा देऊन दाखविले की आपली प्राणप्रिय, जीवनाधार वस्तू हरवल्यासारखे त्यांस झाले आहे. दशरथ व सुमंत्र यांच्या दशेचे वर्णनही याच उपमेने केले आहे. सचिव **'होइ विकल जणुं फणि मणिहानी'** (९१।३) दशरथांची दशा प्रसिद्धच आहे. दशरथांची दशासुद्धा पंख तोडलेल्या विहंगासारखी झाली आहे. 'राम राम मुखिं भूप विकळ तो । जणुं विहंग विण पंख विवळतो.' (२।३७।१) अयोध्येतील नरनारीसुद्धा 'कर चोळिति शिर पिटती रडती । जणुं विण पंख विहग विव्हळती' (७६।५) यांतील दुसऱ्या चरणाची येथे पुनरुक्ति झाली आहे. ते लोक असहाय्य होऊन जसे व्याकुळ झाले तसेच घोडे झाले आहेत. वरील ठिकाणी गू.चं. पहावी. येथील फणिमणि उत्प्रेक्षेने दाखविले की दशरथांचे व सुमंत्राचे रामावर जितके प्रेम आहे तितकेच या घोड्यांचे आहे. सुमंत्राला जितके व जसे दुःख झाले तितके व तसेच या घोड्यांना होत आहे.

*हिं.दो. । भयउ निषादु बिषादबस देखत सचिव तुरंग ॥*
*॥ बोलि सुसेवक चारि तब दिए सारथी संग ॥१४३॥*

*म.दो. । होइ निषाद विषादवश बघुनि सचिव तुरगांस ॥*
*॥ धाडि तदा सूतासवें चौघां सुसेवकांस ॥१४३॥*

**अर्थ** - सचिवाला व तुरगांना पाहून विषादवश झाला; (पण) तेव्हा त्याने चार सुसेवकांना सुमंत्र सारथ्याबरोबर पाठविले.।।दो.१४३।।

**टीका.** (१) ज्या निषादराजाने विविध कथा सांगून सचिवाला विषाद सोडून धीर धरण्यास सांगितले तो स्वतःच आता विषादवश झाला ! रामविरहजनित दुःखाची प्रभुताही अशी आहे. गुह दुःखी, विषण्ण झाला खरा पण कर्तव्य विसरण्याइतका अधीर झाला नाही. सारथी जितका विरह विव्हळ झाला आहे, तितकेच घोडे शोकसंतप्त, निःशक्त व विषण्ण झाले आहेत. अशाच स्थितीत रथ जाऊ दिला तर तो अयोध्येस न पोचता परत शृंगवेरपुरास येऊन कोणास न कळता गंगेच्या पलीकडेही जाईल की काय होईल हे सांगणे कठीण; असा सुविचार करून सारथी व रथ यांना अयोध्येपर्यंत कुशल पोचवू शकतील असे चार चांगले अनुभवी, विश्वासू सेवक बरोबर पाठविले.

*हिं.* *। गुह सारथिहि फिरेउ पहुँचाई । बिरहु बिषादु बरनि नहिं जाई ॥१॥*
*। चले अवध लेइ रथहि निषादा । होहिं छनहिं छन मगन बिषादा ॥२॥*
*। सोच सुमंत्र बिकल दुख दीना । धिग जीवन रघुबीर बिहीना ॥३॥*
*। रहिहि न अंतहुँ अधम सरीरू । जसु न लहेउ बिछुरत रघुबीरू ॥४॥*

*म.* *। सूता पोचवुनी गुह फिरला । विरह-विषाद न जाई वदला ॥१॥*
*। घेउनि रथ पुरिं निषाद निघती । क्षणोक्षणी अति विषण्ण बनती ॥२॥*
*। चिंति सचिव दुःखाकुल दीन । धिग् जीवन रघुवीर - विहीन ॥३॥*
*। अंतिं न राही अधम शरीर । घेइ न यश वियोगिं रघुवीर ॥४॥*

**अर्थ** - सारथ्याला (सूताला) पोचवून गुह परत फिरला (तेव्हा) त्याला विरहाने जो विषाद झाला तो वर्णन करता येत नाही.॥१॥ ते (चौघे) निषाद रथ घेऊन अयोध्येस निघाले; पण (वाटेत) क्षणोक्षणी ते (सुद्धा सचिव व वाजी यांची दशा पाहून) अति दुःखी होत आहेत.॥२॥ दुःखाने व्याकुळ व दीन झालेला सचिव सुमंत्र विचार करू लागला की रघुवीरविहीन झालेल्या जीवनाला धिक्कार असो.॥३॥ हे अधम शरीर शेवटी राहणार तर नाहीच (एक दिवस नष्ट होणारच) मग रघुवीराचा वियोग होताच याचा त्याग करून यश का मिळविले नाही?॥४॥

**टीका. चौ. १-२** (१) सुमंत्राला पोचवून, निरोप देऊन, गुह परत फिरला; पण तोही विरहदुःखाकुलच झाला. जे चार चांगले सेवक दिले तेही दुःखहीन राहू शकले नाहीत. दृष्टीसमोर घोड्यांची व आत वळून पाहिले की सुमंत्राची विरहव्यथा पाहून ते सुद्धा वारंवार शोकदुःखाकुल होऊ लागलेच. येथे हे दाखविले की विषाद सोडा असा उपदेश करणारा निषादराजा असो की रामसखा असो किंवा ज्यांचा रामाशी फारसा संबंध आला नाही असे गुहाचे सेवक असोत; घोडे व सुमंत्र यांना इतके दुःख होत आहे की ते पाहून पाषाणसुद्धा दुःखी होतील, मग यांची अशी दशा होईल यात नवल काय !

**चौ. ३** - (१) येथपासून दो. १४६ अखेर सुमंत्राच्या शोकदुःखाकुल दशेचे चित्र त्याच्याच स्वगत भाषणाने चितारले आहे. सुमंत्र दशरथांच्या आज्ञेप्रमाणे रामलक्ष्मणसीता यांना किंवा निदान सीतेला अयोध्येत परत घेऊन जाण्याच्या आशेने रथ घेऊन आला होता. मात्र मी कोणाला तरी आणीनच अशी प्रतिज्ञा

त्याने केली नव्हती; पण पुढील त्याच्या पश्चात्तापावरून दिसते की त्यास तशी आशा वाटत होती. (क) **धिग् जीवन रघुबीरविहीन** - प्रथम तो आपल्या जीवाला धिक्कारीत आहे, की 'ज्या वेळी रामवियोग झाला, रामाज्ञेने रिकामा रथ घेऊन परत फिरलो त्या वेळीच जीव या देहाला सोडून निघून गेला नाही.' निघून जाणारा जीवच असतो; तोच प्राणादिकांना घेऊन जातो.

**चौ. ४ - (१) अंतिं न राही अधम शरीर** - केव्हा ना केव्हा तरी या शरीराला सोडून जावे लागणारच; मग ज्या क्षणी रामवियोग झाला त्याच क्षणी जर जीवाने या नीच शरीराचा त्याग केला असता तर निदान खरा रामस्नेही असे सुयश तरी जीवाला मिळाले असते. आता जे क्लेश भोगावे लागत आहेत व पुढे लागणार आहेत ते वाचले असते. दशरथ सुमंत्राच्या देखतच म्हणाले आहेत की 'जाति राम वनिं प्राण न जाती । तनुमधिं कोण्या सुखा रहाती ।। व्यथा बलवती याहुन कोणती । प्राण तनुस ज्या दुःखें सोडति' (८१।६-७ टी.प.) हाच भाव येथे सुमंत्राच्या मनात आहे. जीव का निघून गेला नाही याचा विचार करतो :

*हिं.* *। भए अजस अघ भाजन प्राना । कवन हेतु नहिं करत पयाना ।।५।।*
*। अहह मंद मन अवसर चूका । अजहूँ न हृदय होत दुइ टूका ।।६।।*
*। मीजि हाथ सिर धुनि पछिताई । मनहुँ कृपन धनरासि गवाँई ।।७।।*
*। बिरिद बाँधि बरु बीरु कहाई । चलेउ समर जनु सुभट पराई।।८।।*

*म.* *। झाले प्राण अपयश-अघ-भाजन । तरी न जाती काय की कारण ।।५।।*
*। अहह मंद मन अवसर चुकलें । हृदय अजुन तरि कां नहिं फुटलें ।।६।।*
*। हात चोळि, शिर पिटि पस्तावत । जणूं कृपण धनराशि गमावत ।।७।।*
*। बाणा बांधुनि सुवीर म्हणवुनि । सुभट जाइ जणुं पळुनि रणांतुनि ।।८।।*

**अर्थ** - हे प्राण पापांचे व अपयशाचे पात्र बनले तरी अजून निघून जात नाहीत. याचे कारण (हेतु) तरी काय?।।५।। हाय हाय ! या नीच मनाने सुसंधी गमावली. अजून (अयोध्येत जाण्यापूर्वी) तरी या हृदयाचे फुटून तुकडे का नाही होत?।।६।। हात चोळीत, कपाळ पिटीत असा पश्चात्ताप करीत आहे की जणू कृपणाने धनाची रासच गमावली.।।७।। ब्रीद बांधून व उत्तम वीर म्हणवून सुभटच जणू रणांगणातून पळून जात आहे !।।८।।

**टीका. चौ. ५** - (१) जीव न जाण्याच्या कारणांचा विचार करू लागला तो वाटले की जीवाची जाण्याची इच्छा असूनसुद्धा **'न जाती (प्राण) काय किं कारण'** - प्राण निघून जाण्यास कबूल दिसत नाहीत. याचे कारण अजून त्यांना विषय भोगांची भूक असेल. हा भाव भरताच्या वचनाने अगदी स्पष्ट केला आहे. **'विण रघुवीर बघुन आवासा । जगले प्राण सहुनि उपहासा ॥ राम पुनीत विषयरस रुक्षू । लोलुप भूमी भोग बुभुक्षू'** (१७९।६-७) या प्राणांचे प्रभूवर खरे प्रेम नसून यांना विविध भोगांची लालसा व भूक आहे म्हणूनच हे देह सोडून जाण्यास तयार नाहीत. प्राणांना असे वाटते त्या अर्थी ते अघभाजन = पापपात्र आहेत. त्या पापांचे फळ अपयश, अकीर्ति, निंदा पदरांत घेण्यास **'अयशभाजन** = अपयश पात्र झाले आहेत. कारण **'अपयशलाभ किं जेथें पाप न'** (७।११२।७) रिकामा रथ घेऊन जाण्याने निंदा व अपयश पदरात पडणार आहे असे वाटून हा विचार मनात चालला आहे. अपयश मिळाले असेच वाटत आहे. पण विचार करता ठरले की प्राण बिचारे जड आहेत. सुखदुःखांचे कारण मन आहे.

**चौ. ६ - (१) अहह मंद मन अवसर चुकलें** - जगात जन्माला येऊन सुयश मिळविण्याचा परम दुर्लभ सुयोग सहज कळून आला असता या मनाने शरीर सोडले नाही ही फार मोठी चूक केली. मनाने चूक केली तरी व्यथा भोगाव्या लागतात हृदयालाच. **(क) हृदय अजुन तरि का नहिं फुटलें** - हृदय फुटून दुभंग झाले असते तर काय बिघडले असते? भरतानेसुद्धा प्रथम प्राणांना दोष देऊन मगच हृदयाची निंदा केली आहे. **'किती वदूं मी हृदयकठिणता । कुलिशा लाजवि मिळवि महत्ता'** (१७९।८) हाच भाव येथे सुमंत्राच्या म्हणण्याचा आहे. **(क) अझुन तरि** - भाव हा की अझून काही फारसे बिघडले नाही. अयोध्येत जाण्यापूर्वी जरी हे फुटले तरी अपयश होणार नाही व अनेक अनर्थांचे मूळ बनावे लागणार नाही. पण आता हृदय दुभंग होण्याची शक्यता दिसत नाही. ज्या क्षणी वियोग झाला त्या क्षणी जे फुटले नाही ते फुटण्यास आता रामवियोगापेक्षा भयंकर असे कोणते असह्य दुःख कोसळणार आहे? त्यापेक्षा दारुण दुःखच नाही जगात ! निष्कर्ष निघाला की आपल्या हाती आता काही उपाय राहिला नाही.

**चौ. ७ (१) हात चोळि शिरपिटि** - ही असहाय निराश झालेल्या हृदयाची

चिन्हे आहेत. (क) **कृपण धनराशि गमावत** - कृपणाचे धनावर अत्यंत प्रेम असते; 'लोभिजनां प्रिय दाम' (७।१३० म). या उत्प्रेक्षेने दाखविले की सुमंत्राला राम 'लोभिजनां प्रिय दाम' तसे प्रिय होते, आहेत. 'मुनि धन, जन सर्वस्व' (१।१९८।२) असे मुनींचे धन राम आहेत. पण सुमंत्राला राम म्हणजे 'धनराशि' आहे. म्हणजेच मुनिगणांपेक्षा सुमंत्राचे रामावर अधिक प्रेम आहे. कृपणाला धनाचा साठा प्राणांसारखा प्रिय असतो. इतर कोणत्याही वस्तूपेक्षा, व्यक्तीपेक्षा फार काय स्वतःच्या देहापेक्षा त्याला धनराशी अधिक प्रिय असते. 'चमडी देगा पर दमडी नहीं देगा' असे म्हणतातच. तथापि धन नष्ट झाल्यामुळे कृपण मेल्याचे उदाहरण नाही. असेच सुमंत्राचे झाले. कृपण असून सर्व धनसंग्रह एकदम गमावला म्हणजे मूर्खपणा पदरात पडतो. सदा दीन बनून बेचैन रहातो; तसेच सुमंत्राचे झाले आहे व होणार आहे.

**चौ. ८ - (१) बाणा बांधुनि - बाणा** = ब्रीद, ब्रीदावली; आपल्या छातीवर, ध्वजावर, वगैरे ज्याने आपले सुविचाराचे ब्रीद घोषित केले आहे व जो आपल्याला खंदा वीर समजतो व तशा उत्साहाने जो युद्धास गेला तो जर रणांतून पळून गेला तर त्याची अत्यंत अपकीर्ति होते; निंदा होते. 'अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तवाहिताः । निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥' (भ.गी. २।३६) भाव हा की राजाज्ञेची पूर्ती करण्यात आजपर्यंत कधी अपयश पदरी पडले नाही; म्हणून राजांनी मला आज्ञा दिली व मीही मोठ्या भरवशाने, आशेने रथ घेऊन गेलो आणि आता दीन बनून रिकामा रथ घेऊन गेलो म्हणजे राजांना काय वाटेल? लोक माझी निंदा करतील. मानसांत मात्र सुमंत्राला कोणी दोष दिला नाही. **वा.रा.** 'अहो धिगिति निःश्वस्य हा रामेतिच चुक्रुशुः' (७५।११) असा पहिल्या तडाक्यालाच धिक्कार केला गेला आहे.

***हिं.दो.*** *। बिप्र बिबेकी बेदबिद संमत साधु सुजाति ॥*
*॥ जिमि धोखें मद पान कर सचिव सोच तेहि भाँति ॥१४४॥*

***म.दो.*** *। विप्र विवेकी वेदविद संमत साधु सुजाति ॥*
*॥ जसा सुरा चुकुनी पितां सचिवा ताप तसाऽति ॥१४४॥*

**अर्थ** - जसा कोणी विवेकी, वेदज्ञ, साधुसंमत व चांगल्या कुळातला विप्र

(ब्राह्मण) चुकून दारू प्यायला म्हणजे अति शोक (पश्चात्ताप) संतप्त, व्हावा तसा सुमंत्र झाला आहे.॥१४४॥

**टीका.** - (१) **सुजाति** = कुलीन, उत्तम कुळातला. **जाति** = स्त्री, **गोत्र** जन्मनोः (मेदिनी). येथे ब्राह्मणाला जी विशेषणे लावली आहेत त्यातील कोणतेही एक विशेषण असले तरी त्याला इतका पश्चात्ताप होईल की यापेक्षा मरण आले असते तर परवडले असते. मग वेदवेत्ता, साधुसंतांत मान मिळणारा, ज्ञानी व कुलीन असेल आणि त्याच्याकडून चुकीने सुरापान केले गेले तर त्याला आपल्या चुकीबद्दल, बेसावधपणाबद्दल जितका व जसा पश्चात्ताप होईल तसा सुमंत्राला झाला. I सुमंत्र सूत जातीचा होता. ब्राह्मण नव्हता हे लक्षात ठेवले म्हणजे वरील विशेषणांची तुलना करण्याची त्या दृष्टीने जरूर वाटणार नाही. मात्र सुमंत्र ज्ञानी (विवेकी) संतसम्मत, कुलीन व पंडित होता यांत संदेह नाही. सुमंत्राकडून अशी कोणती भयंकर चूक झाली याचा विचार केला पाहिजे. **(क) सुमंत्र विवेकी होता** म्हणून त्याने प्रथमच ही गोष्ट करावयास हवी होती. : दशरथांनी रामराज्याभिषेकाचा प्रस्ताव मंत्रिमंडळापुढे मांडला त्या वेळी सुचविणे जरूर होते की भरतांस आणण्यापूर्वी हे परमप्रिय व सर्वांस इष्ट वाटणारे कार्य घाईने केल्यास त्यांतून कलहाग्नि निर्माण होण्याचा संभव आहे. पण कैकयीच्या रामप्रेमावर भाळलेले असल्याने राज्याभिषेकनिश्चय सुरा नसून अमृत आहे असे त्यांस वाटले. **ही पहिली चूक.** कैकयीचे रामावर प्रेम दिसत असले तरी ती कौसल्येला छळीत असते. राजा तिच्या मुठीत आहेत व पति वश आहे या अभिमानाने ती कोणाला जुमानीत नाही हे सुमंत्रास माहीत होते. राजनीति व व्यवहार यांची सांगड दूरदर्शीपणाने न घालता रामप्रेमवश होऊन मनासारखी गोष्ट घडत आहे असे ऐकताच संमती दिली; हीच पहिली गफलत झाली. **(ख) वेदशास्त्रांचे सार जाणणारा,** धर्मज्ञ होता. राजाने कैकयीला वचन दिले असता, म्हणजेच रामवनवास मान्य केला असता व रामचंद्रांनी ते वचन पूर्ण करण्याची प्रतिज्ञा सुमंत्राच्या देखत केली असता; रामलक्ष्मणसीता यांना परत आणण्याची आज्ञा जेव्हा राजाने सुमंत्रास दिली त्या वेळी **सचिव या नात्याने** सांगणे **कर्तव्य** होते की अशी आज्ञा देणे वेदधर्म बाह्य आहे. केवळ प्राण जातील या भीतीने दिलेल्या वचनाच्या विरुद्ध

वागणे व सत्यसंध पुत्रास प्रतिज्ञाभंग करण्यास सांगणे हा अधर्म आहे, असे सांगणे सचिवाचे कर्तव्य होते. **दोह्यांत 'सचिव' शब्द आहे** सुमंत्र नाही. परम श्रेष्ठ पतिव्रतेला पतीला वनात सोडून घरी परत येण्यास सांगणे हाही अधर्म आहे; म्हणून अशी आज्ञा देऊ नये असे सांगणे हेही सचिवाचे कर्तव्य होते. परंतु राम परत आल्यास राजांचे प्राण वाचतील, अनेकांना सुख होईल, विनापराध दिलेला वनवास टळेल व रामसीता यांचे कष्ट वाचतील या सद्भावनेने त्यास चकविले. (ग) **साधु-संमत** - दशरथांची आज्ञा धर्मविरोधी आहे हे जाणून निदान तिची अंमल बजावणी करण्यापूर्वी वसिष्ठांसारख्या सर्वज्ञ, सर्वदर्शी संतांची संमति घेणे सचिव या नात्याने जरूर होते. पण सुमंत्राने 'सचिव' या अधिकाराचा विचार न करता फक्त **सूत - सारथी या नात्याचाच विचार केला** व 'आज्ञापालनं धर्मः' इकडेच लक्ष गेले व बेसावधपणा झाला. (घ) **सुजाति** = प्रतिष्ठित, संभावित कुळातील. विचार करायला हवा होता की या कार्यात यश येईल की नाही. रामलक्ष्मण परत येणार नाहीत असे दशरथांससुद्धा वाटत असता सुमंत्राने ही आज्ञा का मान्य केली? सीता पतिव्रता आहे व ती रामाबरोबर वनात गेल्याशिवाय राहणार नाही हे सर्व पुरनरनारींनासुद्धा माहीत असता, तिला परत आणण्याची जबाबदारी केवळ राजाच्या प्रेमाला वश होऊन स्वीकारली ही या दृष्टीने चूकच झाली. **'संभावितास अपयश लाहो । मरण कोटिसम दारुण दाहो.'** रथांतून गंगेपर्यंत पोचविण्याची कामगिरी एखाद्या साधारण सूताने घेतली असती तर त्याला कोणी दोष दिला नसता. अशा प्रकारे, न जाणता सद्भावनेने घडलेल्या प्रत्येक चुकीबद्दल सचिवास पश्चात्ताप होत आहे. 'हरि इच्छा भावी बलवान अति !'

***हिं.*** ***। जिमि कुलीन तिय साधु सयानी । पतिदेवता करम मन बानी ॥१॥***
***। रहै करम बस परिहरि नाहू । सचिव हृदयँ तिमि दारुन दाहू ॥२॥***

***म.*** ***। स्त्री कुलीन जशि साध्वी ज्ञानी । पतिदेवता कर्म-मन-वाणी ॥१॥***
***। राहि कर्मवश सोडुनि नाहो । तसा सचिव - हृदिं दारुण दाहो ॥२॥***

**अर्थ** - कुलीन, साध्वी, शाहणी (ज्ञानी) व कर्माने, मनाने व वाणीने पतीला देव मानणारी एखादी स्त्री प्रारब्धाने पतीला सोडून राहिली म्हणजे तिला जसा दारुण दाह होतो तसा दारुण दाह सचिवाला होत आहे.॥१-२॥

**टीका.** - (१) सचिव सुमंत्र रामचंद्रास आपले स्वामी = नाथ = नाही (नाहू) मानतात. इतकेच नव्हे तर नाथ ! असे त्यांनी रघुनाथांस संबोधिलेही आहे. **'नाथ'** म्हणाले **कोशलनाथ किं । जा रथ घेऊनि सह रघुनाथ किं'** (९४।६) त्यांना वनात सोडून सचिवाला नाथविरहावस्थेत रहावे लागत आहे. **'रहि कर्मवश सोडुनि नाहो.'** पतिव्रता स्त्री, कुलीन साध्वी वगैरे असल्यावर ती पतीचा - प्राणनाथाचा - त्याग स्वतः कधीच करीत नाही; त्याप्रमाणेच सुमंत्र रामास सोडून येण्यास तयार नव्हताच. पण जबरीने परत पाठविल्यामुळे प्रारब्धवशात परतावे लागले. त्याची इच्छा रामाबरोबर वनात जाण्याचीच होती; निदान अयोध्येत परत येण्याची नव्हती, पण निषाद राजाने त्यास बळेच रथास बसविला. रथ हाकवत नाही तरी गुहाचे चार सेवक रथ आणीत आहेत. हा सर्व कर्माचा बलात्कार नाही असे कोण म्हणेल? एकतर रामविरहाग्नीच्या ज्वाळांनी हृदयदाह होत आहे; आणि शिवाय या पतिव्रतेची जशी निंदा होते तशी आपली होईल ही धास्ती आहे, अशा दुहेरी ज्वाळा भडकल्या आहेत. (क) **अशा पतिव्रतेचे उदाहरण सीतेचेच आहे.** प्राणनाथ रामास वनात सोडून १४।। महिने अशोक वनात लंकेत राहावे लागले. अग्निदिव्य केले तरी लोकनिंदा व तिचा घोर परिणाम सहन करण्याची पाळी कर्मवशच आली ५।१२।२ पासून पुढील चौपाया पहाव्या व ५।३१।७ पहा. रामविरहाने लंकेत सीतेच्या हृदयाचा जसा **दारुण असह्य दाह** होत होता तसाच **सचिवाच्या हृदयाचा होत आहे.** रावणाने जशी सीतेला उचलून रथात बसविली तसाच सुमंत्राला निषादराजाने बसविला ! **विरहानलाने होणारा दाह ही मुख्य पीडा येथे सांगितली.** (ख) **ल.ठे. परिहरि** = सोडून, टाकून असा स्पष्ट उल्लेख असल्याने पतिनिधनानंतर सती न जाणाऱ्या पतिव्रतेचे येथे ग्रहण करता येत नाही. (ग) मूर्खपणा पदरात पडणार याचे भय, दैन्य, अकीर्तीचे भय, स्वतःच्या चुकीचा परमावधीचा पश्चात्ताप, विरहदावानलाचा दारूण दाह इ. अनेक दुःखांचा जो प्रत्यक्ष परिणाम सचिवावर झाला त्याचे आता वर्णन करतात :

***हिं.*** *। लोचन सजल डीठि भइ थोरी । सुनइ न श्रवण बिकल मति भोरी ॥३॥*
*। सूखहिं अधर लागि मुँह लाटी । जिउ न जाइ उर अवधि कपाटी ॥४॥*
*। बिबरन भयउ न जाइ निहारी । मारेसि मनहुँ पिता महतारी ॥५॥*

*। हानि गलानि बिपुल मन ब्यापी । जमपुर पंथ सोच जिमि पापी ॥६॥*
*। बचनु न आव हदयँ पछिताई । अवध काह मैं देखब जाई ॥७॥*
*। राम रहित रथ देखिहि जोई । सकुचिहि मोहि बिलोकत सोई ॥८॥*
म. *। सजल विलोचन दृष्टिहि थोडी । कान न ऐकति बुद्धिहि सोडी ॥३॥*
*। शुष्क ओष्ठ मुखिं बसली लाटी । जिव न जाइ, उरिं अवधि कपाटीं ॥४॥*
*। बघवत ना तो विवर्ण भारी । मातापित्यां जणू कीं मारी ॥५॥*
*। हानी-ग्लानी चित्ता व्यापी । यमपुरिचा पांथिकसा पापी ॥६॥*
*। शब्द न उमटे मनिं पस्तावे । जाउन नगरीं काय पहावें ॥७॥*
*। रामरहित रथ बघतिल जेही । संकोचति मज बघतां तेही ॥८॥*

**अर्थ** - डोळ्यांतून अश्रू वहात आहेत. पाहण्याची शक्ती (दृष्टी) अगदी क्षीण झाली आहे. कान ऐकेतनासे झाले व बुद्धि जागेवर राहिली नाही. (बावळी झाली) ॥३॥ ओठ सुकून गेले, तोंड कोरडे ठणठणीत पडले. चौदा वर्षांची मुदत रुपी दाराच्या फळ्यांनी हृदयात अडकवून ठेवल्यामुळे जीव जात नाही.॥४॥ सचिव इतका विवर्ण-निस्तेज (काळा ठिक्कर) झाला आहे की त्याच्याकडे बघवत नाही; जणू काय आईबापांची हत्याच घडली की काय असा दिसत आहे.॥५॥ हानीमुळे उत्पन्न झालेल्या ग्लानीने असे व्यापले आहे की जसा यमपुरीला नेला जात असलेला पापी प्रवासी ! ॥६॥ तोंडातून शब्द निघत नाही, पण मनात पश्चात्ताप करीत आहे की मी अयोध्येत जाऊन पाहणार तरी काय? (काय पाहण्याचे माझ्या कर्मात आहे) ॥७॥ जे कोणी रामरहित रथ पाहतील ते सर्व मला पाहून लाजतील (माझे तोंड पाहण्यास त्यांस संकोच वाटेल.)॥८॥

**टीका.** - (१) ल.ठे. - रामविरह व्याकुळ झाल्याने हातापायांची शक्ती, कर्मेंद्रियांची शक्ती अति क्षीण झाल्याचे पूर्वीच दाखविले आहे. नेत्र, कान, रसना इ. ज्ञानेंद्रिये शक्तिहीन झाली व बुद्धी काम करीत नाहीशी झाली हे येथे दाखविले आहे.

**चौ. ३-४** (१) **सजल बिलोचन** झाले म्हणजे नीट दिसत नाहीच व त्यांतही डोळ्यांची शक्ति क्षीण झाली आहे. कोणी काही सांगितले तर ऐकू येत नाही, मोठ्याने ओरडून किंवा कानांजवळ बोलावून सांगितले तर बुद्धि ठिकाणावर नसल्यामुळे अर्थ समजत नाही; आणि चौदा वर्षांनी रामदर्शन होणार आहे ही

आशा जीवाला हृदयात कोंडून ठेवते. जाऊ देत नाही.

**चौ. ५ - (१) विवर्ण भारी** - पूर्वी सजल विलोचन हा एक सात्त्विक भाव दिसला. येथे वैवर्ण्य = शरीराची कान्ति नष्ट होऊन ते विरूप दिसू लागणे हा आणखी एक अनुभाव दिसला व कंठावरोध हा आणखी एक पुढे दाखविला आहे. असा काळा ठिक्कर पडला की जणू काय मातृपितृवधाचे पातकच शरीरावर पसरले आहे असा दिसू लागला. भाव हा की राम पिता व सीता माता यांना वनात सोडून त्यांच्याकडे पाठ फिरवून येणे म्हणजे मातृपितृ हत्येसारखे घोर पाप घडले असे त्यास वाटत आहे.

**चौ. ६ - (१) हानीग्लानी - 'या सम हानि असे कीं जगतीं । नरतनु मिळुनिहि राम न भजती'** (७।११२।९) रामलक्ष्मणसीता यांना वनात सोडून यावे लागले ही सर्वात मोठी हानी झाली ७२ व ७३।१-२ पहा. व त्यामुळे चित्ताला-मनाला अत्यंत ग्लानि म्हणजे क्षीणता आली आहे. धड विचार करवत नाही, धड चिंतन करवत नाही. **(क) यमपुरिचा पांथिकसां पापी** - यमपुरीचा - यातना भोगविण्यासाठी नेल्या जाणाऱ्या प्रवाशाने पुष्कळ पश्चात्ताप केला तरी त्यांचा काही उपयोग होत नाही; प्रार्थना विनवण्या केल्या तरी कोणी ऐकून घेत नाही मग क्षमा कोण करणार ! अयोध्येत जाणे म्हणजे यमपुरीस जाण्यासारखे वाटत आहे. (८३।७ पहा) रामाज्ञा आहे म्हणूनच गेले पाहिजे; नाहीतर अयोध्येत जाण्याची मुळीच इच्छा नाही.

**चौ. ७ - (१) शब्द न उमटे** - बोलता आले असते तर त्या निषादाजवळ सांगून दुःख थोडे कमी करता आले असते. पण जणू काय दातखीळच बसली आहे. शृंगवेरपुरास जे काही पहावे लागले त्याचा हा परिणाम ! जाउन नगरीं काय पहावें ! आता अयोध्येत गेल्यावर काय काय अनर्थ पाहण्याचे नशिबात आहे कोणास ठाऊक !

**चौ. ८ - (१) संकोचति मज बघतां तेही** - माझे तोंड पाहण्यास लोकांना संकोच वाटेल. काळतोंड्या ! रिकामा रथ घेऊन आला तरी कशाला असे म्हणतील. आता अयोध्येत गेल्यावर काय करावे लागणार याची प्रश्नोत्तरावली सचिवाचे मन तयार करीत आहे ती पाहू या :

*हिं.दो. । धाइ पूँछिहहिं मोहि जब बिकल नगर नर नारि ॥*
*॥ उतरु देब मैं सबहि तब हृदयँ बज्रु बैठारि ॥१४५॥*
*हिं. । पुछिहहिं दीन दुखित सब माता । कहब काह मैं तिन्हहि बिधाता ॥१॥*
*। पूछिहि जबहिं लखन महतारी । कहिहउँ कवन सँदेसु सुखारी ॥२॥*
*। राम जननि जब आइहि धाई । सुमिरि बच्छु जिमि धेनु लवाई ॥३॥*
*। पूँछत उतरु देब मैं तेही । गे बनु राम लखनु बैदेही ॥४॥*
*म.दो. । धावुनि पुसतिल जैं मला विकल नगर-नर-नारि ॥*
*॥ उत्तर देणें त्यांस मी घालुनि उरिं पवि भारि ॥१४५॥*
*म. । पुसतिल दीन दुःखि सब माता । काय तयां मी सांगु विधाता ! ॥१॥*
*। यदा विचारिल लक्ष्मण-आई । सांगु निरोप काय सुखदाई ॥२॥*
*। रामजननि जैं येईल धाउनी । जशी धेनु नव वत्सा स्मरुनी ॥३॥*
*। पुसतां वदणें मी तीतें ही । गत वनिं राम बंधु वैदेही ॥४॥*

**अर्थ** - व्याकुळ झालेले नगरातील पुरुष व स्त्रिया धावत येऊन मला विचारतील तेव्हा (स्वतःच्या) छातीवर मोठे वज्र (पावि) घालून मी त्या सर्वांना उत्तर देणार !॥दो.१४५॥ दीन व दुःखी झालेल्या (बाकीच्या) सर्व माता मला विचारतील तेव्हा, हा दैवा ! मी त्यांना काय सांगू?॥१॥ लक्ष्मणाची आई विचारील तेव्हा मी तिला कोणता सुखदायक निरोप-संदेश सांगू?॥२॥ नवीन वासराच्या आठवणीने धेनु जशी धावत यावी तशी रामजननी जेव्हा (मला पाहिल्यावर) धावत येईल तेव्हा तिलासुद्धा मी हेच उत्तर द्यायचेना ! की रामलक्ष्मण आणि वैदेही वनात गेली (आणि मी जिवंत आलो.)॥३-४॥

**टीका** - I नगरात प्रवेश केल्यापासून क्रमाक्रमाने दशरथांच्या वाड्यापर्यंत कोणाकोणाच्या प्रश्नास तोंड द्यावे लागेल याची जणू जंत्रीच केली जात आहे. (१) प्रथम नगरात शिरून अंतःपुरापर्यंत जाताना सर्व पुरुषांना व स्त्रियांना जिथे जिथे भेटतील तिथे तिथे पदोपदी उत्तर द्यावे लागणार; पण ते हृदय अनेक वज्रांपेक्षा कठोर करून देता येईल की रिकामा रथ सांगतोच आहे की कोणी परत येत नाहीत. गंगेच्या पलीकडे गेली; पण तुम्ही का चिंता करता. आता भरत लवकरच येतील व सर्वांना सुख देतील. हा एक वर्ग झाला. २. सर्व माता,

३ सुमित्रा, ४ रामजननी, इतक्यांचा उल्लेख येथे क्रमशः केला. यांचे याच क्रमाने रामावर अधिकाधिक प्रेम आहे हे ठरले. (क) **सर्व माता** असे म्हणून पुन्हा सुमित्रा व कौसल्या यांचा उल्लेख आहेच; याने येथे स्पष्ट **दाखविले की दशरथांच्या इतर पुष्कळ राण्या आहेत.** (ख) सुमित्रेला सुखदायक असा संदेश सुमंत्र सांगू शकले असते पण लक्ष्मणसुमित्रा भेटीतील मर्म सुमंत्रांस कळलेले नाही !

**हिं.** *। जोइ पूँछिहि तेही ऊतरु देबा । जाइ अवध अब यहु सुखु लेबा ॥५॥*
*। पूँछिहि जबहिं राउ दुःख दीना । जिवनु जासु रघुनाथ अधीना ॥६॥*
*। देहउँ उतर कौन मुहँ लाई । आयउँ कुसल कुअँर पहुँचाई ॥७॥*
*। सुनत लखन सिय राम सँदेसू । तृन जिमि तनु परिहरिहि नरेसू ॥८॥*

**म.** *। जो विचारि त्या उत्तर देणें । जाउनि नगरिं हेंच सुख घेणे ॥५॥*
*। जैं पुसतिल नृप दुःखी दीन । यज्जीवन रघुनाथाधीन ॥६॥*
*। उत्तर देउं कुठुन मुख आणुनि । आलो कुशल कुमार पोचवुनि ॥७॥*
*। लक्ष्मण-सिता-राम-संदेश । श्रवुनि तजिति तनु-तृणहि नरेश ॥८॥*

**अर्थ** - जो जो विचारील त्याला त्याला उत्तर देणे हेच सुख (आता) नगरात जाऊन घ्यायचे (राहिले) आहे.॥५॥ ज्यांचे जीवन, जीवित, रघुनाथाच्या अधीन आहे ते दीन दुःखी (झालेले) महाराज जेव्हा विचारतील तेव्हा त्यांना कुठल्या तोंडाने उत्तर देऊ की कुमारांना (वनात) पोचवून मी कुशल आलो?॥६-७॥ लक्ष्मण, सीता व राम यांचे संदेश ऐकून नरेश आपल्या देहरुपी तृणाचा त्यागच करतील.॥८॥

**टीका - चौ. ५ (१) जो विचारि त्या उत्तर देणें** - नगर नरनारींपासून वर्णनास प्रारंभ करून मागल्या चौपाईपर्यंत कौसल्येपर्यंतचे जे वर्णन केले त्याचा उपसंहार रूपाने येथे सारांश सांगितला की जन्माला येऊन जी सर्व सुखे मिळवावयाची ती भरपूर मिळाली. एकच सुख मिळायचे राहिले आहे ते आता नगरात जाऊन घ्यायचे आहे. ही व्यंग्योक्ति आहे. प्रत्येकाला रामवनगमनाची हकीगत सांगताना अत्यंत दुःख भोगावे लागणार आहे. त्याला सुख म्हटले. ही स्वभावोक्तीही आहे. (क) पुढील चौपाईपासून दशरथांचा स्वतंत्र निर्देश आहे. कौसल्या आणि दशरथ यांच्यामध्ये नामनिर्देश न करण्यासारखी एक व्यक्ती राहिली आहे व तिच्याच वाड्यांत दशरथांस भेटण्यास जावे लागणार असे पूर्व परिस्थितीवरून सचिवास

वाटत आहे. ती व्यक्ति म्हणजे भरत जननी विचारणारच व तिलाही उत्तर द्यावे लागणार व राम वनात गेले कोणीच परत येण्यास कबूल नाहीत हे ऐकून ती प्रसन्न होणार व तिचे प्रसन्न मुख पाहून मला अपूर्व सुखच होणार !!

**चौ. ६-७ (१) जैं पुसतिल नृप - रघुनाथाधीन - 'वारिविहीन मीन तरि जगती। फणि मणिविण दिन दीन कंठती ॥... जीवन मम रामाविण नाहीं ॥- रामदर्शनाअधीन जीवन'** (३३।९-३) **'आणुनि दावि रामसिय लक्ष्मण' 'नातर शेवटिं मरण मला ही'** (८२।८,७) असे दशरथ म्हणाले आहेत. इतर सर्वांना उत्तर देता येईल पण अशा राजाला सांगण्याची खोटी की ते प्राण सोडतील. मग या तोंडाने ज्याने त्यांचे अन्न खाल्ले त्या तोंडाने, कसे सांगू व राजाच्या मरणाचे निमित्त बनू? आजपर्यंत ज्या तोंडाने राजाज्ञेप्रमाणे कार्य फत्ते झाल्याचेच सांगत आलो, त्याच तोंडाने अयशस्वी झाल्याचे सांगू तरी कसे? बरे या तोंडाने न सांगावे तर दुसऱ्या कुठल्या तोंडाने सांगावे की रामलक्ष्मण वैदेही यांना वनात पोचवून मी अगदी सुखरूप आलो? भाव हा की माझ्याशिवाय हे शब्द उच्चारण्यास कोण तयार होईल? हे सांगण्यासाठी कोणाचे हृदय माझ्याइतके वज्रापेक्षासुद्धा विलक्षण कठोर अशा वस्तूचे घडले आहे? व दुसऱ्या कोणाच्या तोंडून सांगवून महाराजांचे समाधान कसे होईल? मी ही कटू कठोर बातमी सांगताच राजांचे प्राण राहणार नाहीत.

**चौ. ८ लक्ष्मण सिता रामसंदेश** - या वचनावरून दिसते की लक्ष्मणसंदेश न सांगण्याविषयी स्वतःची शपथ घालून प्रभूंनी केलेली विनंती सुमंत्र आपल्या व्याकुळतेने विसरले आहेत; तथापि संदेश सांगताना त्यांस रामवचनाची आठवण झाली आहे व मोठ्या कौशल्याने सुमंत्राने आपले नाव सार्थ केले आहे.

*हिं.दो. । हृदउ न बिदरेउ पंक जिमि बिछुरत प्रीतम नीरु ॥*
*॥ जानत हौं मोहि दीन्ह बिधि यहु जातना सरीरु ॥१४६॥*

*हिं. । एहि बिधि करत पंथ पछितावा । तमसा तीर तुरत रथु आवा ॥१॥*
*। बिदा किए करि बिनय निषादा । फिरें पायँ परि बिकल बिषादा ॥२॥*

*म.दो. । हृदय न भंगत पंकसे अटतां प्रियतम नीर ।*
*॥ वाटे विधिनें दिलें मज हें यातना शरीर ॥१४६॥*

म. *। पश्चात्तापा करत पथिं असे । तमसातटिं रथ शीघ्र येतसे ॥१॥*
*। विनवुनि दिला निरोप निषादां । गत पदिं वंदुनि विकल विषादां ॥२॥*

**अर्थ** - प्रियतम नीर (पाणी) आटून गेले म्हणजे चिखलाला जशा भेगा पडतात तसे प्रियतम रामाचा विरह होताच माझे हृदय भंग पावले नाही; त्या अर्थी असे वाटते की विधीने मला हे यातना शरीरच दिले आहे.॥दो.१४६॥ सुमंत्र रस्त्याने असे पश्चात्ताप करीत आहेत तोच रथ त्वरेने तमसातीरावर आला.॥१॥ (तेव्हा) त्या चार निषादांना विनंती करून निरोप दिला व सुमंत्राच्या पाया पडून ते विषादाने व्याकुळ होऊन (परत) गेले.॥२॥

**टीका. दो. (१) हृदय न भंगत पंकसें** - पंक = चिखल. पाणी आटत चालले की इतर जलचर जलाशय सोडून जातात. पाणी आटून गेले की मासे त्याच्या विरहाने प्राण सोडतात. अत्यंत नीच असा चिखलसुद्धा सुकून जाऊन भंग पावतो. त्याला भेगा पडतात. पण मला प्रियतम असणाऱ्या रामाचा विरह होताच माझे हृदय भंग पावले नाही. माशाला पाणी प्रियतम असते तसेच राम मला प्रियतम असल्यामुळे वियोग होतांच प्राण निघून जावयास पाहिजे होते, ते गेले नाहीत तरी त्यांनीच चिखलासारखे माझे हृदय अयोध्येत जाण्यापूर्वी भंग पावणे जरूर होते. ते अजून भंगले नाही यावरून ठरते की - (क) विधिने दिले मज हे यातना शरीर – यातना शरीर - मनुष्य मेल्यावर त्याला येथून जेथे न्यावयाचा असेल तेथपर्यंत **प्रथम अतिवाहिक** देह दिला जातो. त्याचा उपयोग फक्त वाहनासारखा होतो. इष्ट स्थळी पोहोचल्यावर त्याच्या पापपुण्याचा निवाडा धर्मराजाकडून होतो. स्वर्गात पाठवावयाचा असला तर **देवशरीर** दिले जाते. त्याला दंड, यमयातना भोगण्यासाठी पाठवावयाचा असेल तर **यातना शरीर** दिले जाते. त्या शरीरात राहून जीवाला यमयातना भोगाव्या लागतात. त्या यातना शरीराला कितीही यातना दिल्या गेल्या, तेलात उकळले, करवतीने चिरले, तरी त्याचा नाश होत नाही; पण त्या जीवाला मात्र असह्य यातना, कष्ट, दुःखे होतात. भाव हा आहे की इतक्या यातनांनी मनुष्याचे सामान्य शरीर केव्हाच मेले असते, पण ज्याअर्थी ते अजून मेले नाही त्या अर्थी हे मनुष्यशरीर नसून यातनाशरीर असले पाहिजे. (क) 'यमपुरीचा पांथिकसा पापी' (१४५/६) असे जे पूर्वी म्हटले

त्याची पूर्तता येथे सुमंत्राच्या मुखाने केली. अयोध्येत नेऊन यमयातना भोगविण्यासाठीच हा देह विधिने दिला आहे असे सुमंत्रास वाटले.

**चौ. १ (१) पश्चात्तापा करत पथि असे –** 'शब्द न उमटे मनिं पस्तावे' (१४५/७) असा उपक्रम केला व येथे त्याचा उपसंहार केला. शृंगवेरपुराहून रथ निघाल्यापासून पश्चात्ताप करण्यात सुमंत्र इतके गुंग होते की तमसानदीपर्यंत ४५ कोस रथ केव्हा व कसा आला हे त्यास कळलेसुद्धा नाही. (८७/१टी.प.) (तमसेपासून अयोध्या ६/७ कोस आहे.) कवीनी १४५/७ पासून १४६ अखेरपर्यंत त्या पश्चात्तापाचा अल्पसा नमुना येथे दिला आहे (क) हे रामरथाचे घोडे अत्यंत व्याकुळ व निःशक्त झालेले असता ४५ कोस म्हणजे ९० मैल इतक्या लवकर आले की अजून दिवस मावळण्यास बराच वेळ आहे; म्हणून याना वाजी (= पक्षी) म्हटले ते बरोबरच आहे. वा. रा. त सुद्धा रथ असाच एका दिवसात परत आल्याचा उल्लेख आहे.

**चौ. २ –** (१) सुमंत्र येथे थांबला आहे. त्याने रथ पोचविण्यास आलेल्या निषाद राजाच्या चार सेवकांना विनंती करून परत पाठविले. ते परत गेले पण व्याकुळ, दुःखी होऊन गेले. (क) सुमंत्र येथे बराच वेळ थांबणार आहे. संध्याकाळ झाली म्हणजे अयोध्येत जाण्यास निघेल. याप्रमाणे सचिवाचे आगमन अयोध्येच्या सीमेपर्यंत झाले. **आता नागरी प्रवेश व नृपमरण – प्रकरण पुढे आहे.**

***खंड २ रा समाप्त***

